# नवनीत

आद्य कर्ते

परशुराम बल्लाळ गोडबोले

शतसांवत्सरिक ( अठरावी ) आवृत्ति

संपादक

अनंत काकबा प्रियोळकर



मुंबई राज्य शिक्षणखातें, मुंबई

१९५७

# नवनीत

अथवा

# मराठी कवितांचे वेंचे

हें पुस्तक

**कै. परशुराम बल्लाळ गोडबोले**

यांनीं केलें व इ. स. १८५४ मध्यें प्रथम प्रसिद्ध झालें.

त्यानंतर

**कै. रावजी शास्त्री गोडबोले**

यांनीं त्यांत बराच फेरफार करून इ. स. १८८२ मध्यें (नवीन) आवृत्ति काढिली.

पुढें

पुणें येथील ट्रेनिंग कॉलेजांत वेळोवेळीं असलेले व्हाइस-प्रिन्सिपाल यांनीं सुधारणा केल्या.

प्रस्तुत



शतसांवत्सरिक (अठरावी) आवृत्ति

**अनंत काकबा प्रियोळकर**

डायरेक्टर, मराठी संशोधन मंडळ, मुंबई

यांनीं प्रथम इ. स. १९५४ मध्यें प्रसिद्ध करण्याकरितां सुधारून वाढविली.



मुंबई राज्य शिक्षणखातें

मुंबई :

गव्हर्मेंट सेंट्रल प्रेस

शके १८७९ | इसवी सन १९५७

आवृत्ति १ ली १८५४, २री १८५७, ३री १८५९, ४थी १८६२, ५ वी १८६४, ६ वी १८६८, ७वी १८७१, ८वी १८७३, ९ वी १८७८, १० वी १८८२, ११ वी १८८६, १२ वी १८८९, १३ वी १८९४, १४ वी १९०७, १५ वी १९१०, १६ वी १९१८, १७ वी १९२३;

प्रस्तुत (शतसांवत्सरिक) आवृत्ति १८ वी १९५७

ह्या पुस्तकाच्या प्रती
डायरेक्टर, गव्हर्मेंट प्रिंटिंग आणि स्टेशनरी, मुंबई,
यांजकडे विकत मिळतील

# या आवृत्तीची प्रस्तावना

## पूर्वेतिहास

'नवनीत' हा ग्रंथ प्रथम इ. स. १८५४ सालीं प्रसिद्ध झाला. प्रस्तुत आवृत्ति १९५४ सालीं मुद्रित होण्यासाठीं तयार केलेली आहे; म्हणून तिला 'नवनीता'ची **शतसांवत्सरिक आवृत्ति** असें नांव द्यावयास हरकत नाहीं. आणखीही एका दृष्टीनें या आवृत्तीला महत्त्व आहे. जुन्या नव्या सर्व मागच्या आवृत्त्या जमेस धरतां प्रस्तुत आवृत्तीचा अनुक्रमांक अठरावा लागतो. अठरा या आंकड्याला भारतीय वाङ्मयांत फार मोठें स्थान आहे. पुराणें अष्टादश, महाभारताचीं पर्वें अष्टादश आणि श्रीमद्भगवद्गीतेचे अध्यायही अष्टादशच.

जुन्या मराठी वाङ्मयाची लोकप्रियता वाढविण्याचें फार मोठें कार्य 'नवनीत' या पुस्तकानें केलेलें आहे. तें कसें हें पाहण्याकरितां थोडा पूर्वेतिहास लक्षांत ठेवणें अवश्य आहे.

इ. स. अठराशें अठरा सालीं नव्या इंग्रजी सत्तेचा अंमल महाराष्ट्रांत सर्वत्र प्रस्थापित झाल्यावर लोकशिक्षणाचें कार्य अंगावर घेणें हें नव्या राज्यकर्त्यांना आपलें कर्तव्य वाटलें. १८२२ सालच्या ऑगष्ट महिन्यांत २१ तारखेला गव्हर्नर मौंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन यांच्या नेतृत्वाखालीं 'नेटीव स्कुल बुक अँड स्कुल सोसायटी' अथवा 'हैंदशाळा पुस्तक मंडळी' ही संस्था अस्तित्वांत आली. या संस्थेचा युरोपियन 'सक्रतार' कॅ. जॉर्ज जर्विस हा होता. यावेळीं हिंदी लोकांमध्यें रूढ असलेल्या शिक्षणपद्धतीची पाहणी करून त्यांत काय काय सुधारणा घडवून आणतां येतील, हें ठरविण्याकरितां एक खास समिति नेमण्यांत आली. या समितीनें तयार केलेलें कॅ. जर्विस याची सही असलेलें तारीख १३ सप्टेंबर १८२३ चें एक निवेदन उपलब्ध आहे. त्यावरून त्याकाळच्या राज्यकर्त्यांना मराठीच्या जुन्या ग्रंथभांडाराची माहिती असलेली बिलकूल दिसत नाहीं. शून्यांतून ही नवी वाङ्मयसृष्टि आपणांस निर्माण करावयाची आहे अशी त्यांची कल्पना असावी, असें दिसतें. या निवेदनांत पुढील मजकूर आढळतो :—

"The Society have long ago been convinced that their earliest attention should be directed to the preparation and publication of Books, both for the elementary and for the more advanced

stages of education among the natives. In vernacular dialects of the two provinces subject to this Presidency they can discover scarcely any work calculated to promote instruction. The Maratha and Goojratthi languages have always been restricted to the purposes of conversation and business and have never been applied to the cultivation and extension of literature even in its humblest forms. The committee therefore must depend on the exertions of European gentlemen in order to point out, to such intelligent natives as may lend their assistance, the proper mode of reducing these languages to fixed rules and principles and of employing them successfully in the translation of such works from English as may be approved by the directors."[१]

कर्नल व्हॅन्स केनेडी यानेंही १८२४ सालीं प्रसिद्ध झालेल्या आपल्या इंग्रजी-मराठी व मराठी-इंग्रजी कोशाच्या प्रस्तावनेंत असेंच अज्ञानमूलक विधान केलें आहे. तो लिहितो :—

"It must be observed that the Marathi is merely a spoken language, and that it has never been cultivated or refined by authors either in prose or verse."

या लोकांची अशी दिशाभूल होण्याचें कारण, ज्ञानेश्वरापासून मोरोपंतापर्यंत कवींनीं ज्या भाषेंत ग्रंथरचना केली ती, 'प्राकृत' या नांवानें सामान्यत: प्रसिद्ध असलेली भाषा, मराठीहून भिन्न आहे. अशी त्यांची चुकीची समजूत झाली होती, हेंच दिसतें.

युरोपियन लोकांचा मराठी भाषेचा अभ्यास जसजसा वाढत चालला तसतशा ह्या भ्रामक कल्पना हळुहळू नष्ट होऊं लागल्या. १८४१ च्या जुलै महिन्याच्या मुंबई शाखेच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें डॉ. स्टीव्हन्सन यानें पुढील मत प्रदर्शित केलें आहे :—

"The Marathas have been long famed throughout India for their war-like prowess and martial deeds; and their history has been written not only by natives of the country, but has been deemed worthy of being transmitted to posterity in a distinct work in our own language. It has, however, I fear, been by all, except a few, generally supposed that they were destitute of any vernacular literature; in fact, that the nation which, issuing from the Deccan, rolled back the tide of Mahommedan conquest, gave laws to the Emperor of Delhi, and disputed the sovereignty

१ *The Bombay Secretariat,* G. D., Vol. 8/63 of 1824, p. 100.

of India with our countrymen, was little better than a horde of barbarians. The literature of the Marathas cannot indeed be compared with that of European nations, but they are by no means so far behind in literary matters as has often been supposed. The Brahminical portion of them can vie in their acquaintance with the common stores of Sanscrit literature with the Brahmins of most provinces in India: nor have there been wanting instances—as in the case of Sridhara, who wrote comments on the Bhagavat—of writers who have added their contributions to the general treasury. The Marathas have, besides, a literature of their own written in a dialect called the Pracrit. This Pracrit, as will fully appear from the specimens afterwards to be given, is nothing but the present spoken language in an antique dress, and without any of the modern additions to the language introduced by the Mahomedans. People, indeed, in familiar conversations, call all the spoken languages of India Pracrit; but this dialect, which was probably that used by their fathers three or four centuries ago, is so named by way of eminence." २

याच निबंधाच्या शेवटीं त्यानें, पुढें बारा तेरा वर्षांनीं मूर्त स्वरूप लाधलेल्या 'नवनीत' प्रकाशनाची कल्पना मांडिली आहे. तो लिहितो:—

"I should wish to see the attention of learned natives directed to a selection of some of the best of the pieces abovementioned, for the purpose of having two or three volumes accurately printed, with an index of difficult words for the sake of beginners. The study of these authors would improve the style of Maratha composition, which is in danger at present from an almost exclusive attention to foreign literature. To a learned native the English is needful to open up to him a storehouse of ideas; but the Pracrit must be studied in order that he may be able to diffuse beneficially among his countrymen, the knowledge he has acquired."

बोर्ड ऑफ एज्युकेशन असें नवें नांव मिळालेल्या हैंदशाळा पुस्तक मंडळीलाही, उशीरां कां होईना, जुन्या मराठी वाङ्मयाच्या महत्त्वाची जाणीव झाली. १८४९ सालच्या रिपोर्टीत आपणांस पुढील मजकूर आढळतो:—

"The true literature of the Marathas, as amongst all people arrived at a similar stage of civilization, is to be found in their

२ Dr. Stevenson, "An Essay on the Vernacular Literature of the Marathas", *Journal of the Bombay Branch Royal Asiatic Society*, Vol. I, No. 1, July 1841, pp. 1-2.

songs, of which immense collections might be made if sufficient encouragement were afforded and in which alone the genuine expression of their feelings and tone of thought is to be found." ३

तथापि, 'नवनीत' जें प्रथम तयार झालें तें उपरिनिर्दिष्ट डॉ. स्टीव्हन्सनच्या सूचनेमुळें नव्हे.

पुना कॉलेजमधील मराठी वर्गाच्या वरिष्ठ विद्यार्थ्यांना मराठी कविता शिकवावी, अशी सूचना कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं मेजर कँडींना केली होती; आणि त्याकरितां जुन्या मराठी कवींच्या वेंच्यांचा संग्रह प्रसिद्ध करण्याची आवश्यकता कँडींना वाटली. १८५२ सालच्या रिपोर्टींत ते लिहितात :—

"With regard to Krishna Shastri's suggestion that some poetry should be read in this Department, I beg to mention that some time ago I requested my personal Pandit to compile a volume of 'Elegant Extracts' from Marathi Poets which I hope to be able soon to present to the Board." ४

अशा प्रकारें 'सुरस वेंच्यांचें' (Elegant Extracts) पुस्तक लवकरच तयार झालें. यासंबंधीं शिक्षणसमितीच्या कार्यवाहाला त्यांनीं लिहिलेलें पत्र५ पहा :—

To,

M. Stovell, Esquire,
Secretary to the Board of Education,
Bombay.

Sir,

I have the honour to report for the information of the Board that the Book of Poetical extracts, which I stated in my Report of the College for last year was under preparation by my Pandit, is ready for the Press.

2. It contains extracts from the works of Tukárám, Námdeo, Janábái, Rámdás, Wáman, Anant Tanaya, Amrit Rái and Moropant, consisting of *abhangas*, *shlokas*, *áryás* and *Katibands*.

---

३ *Report of the Board of Education for the year 1845*, No. V, Bombay, 1846, p. 18.

४ Director of Public Instruction Records, Poona. *Poona College Report for the year 1852*, p. 276.

५ D. P. I., *Board of Education*, 1853, p. 300.

Besides the above there are a good many specimens of the composition called *"Pad"* from different authors. The book will probably contain about 300 pages.

3. I solicit permission to lithograph an edition of 500 (Five hundred) copies.

I have the honour to be, Sir,
Your most obedient Servant,

(Signed) THOMAS CANDY,
Major,
Principal of the Poona College.

Poona College :
15th September 1853.

'नवनीता'च्या निर्मितीचा पूर्वेतिहास हा असा आहे.

## पहिल्या आवृत्तीचें स्वरूप

'नवनीत' अथवा 'महाराष्ट्र भाषेंतील कवितांचे वेंचे' हें पुस्तक पुणें पाठशाळेकडील छापखान्यांत इ. स. १८५४ सालीं शिळाछापावर मुद्रित झालें [आकार (इंच) ८·१×९·२ ; पृष्ठसंख्या ८+४०० ]. याच्या 'प्रस्तावनें'त परशुराम तात्या गोडबोले त्याच्या उद्दिष्टासंबंधीं लिहितात :—

"बहुतकरून कोणत्याही भाषेंत कविता नाहीं असें नाहीं. ह्या हिंदुस्थानांत अनेक भाषा चालू आहेत, तितक्याही भाषांत विद्वानांनीं कविता केल्या आहेत. कोणत्याही भाषेचा उत्तम परिणाम म्हटला म्हणजे कविता होय. ज्याला भाषाज्ञान चांगलें असतें तोच कविता करूं शकतो. आणि त्याचीच कविता सरस व लोकमान्य होते. भाषा सुधारण्यास व मनाची शक्ति वाढविण्यास कविता हें एक मोठें साधन आहे. सांप्रत सर्व विद्या शिकविण्याचे प्रयत्न चालले आहेत, त्यांत कविता शिकविण्याचें साधन कमी आहे तें अवश्य असलें पाहिजे असें बहुतांचें मत आहे. तोच उद्देश हें पुस्तक रचण्याचा आहे.

सांप्रत या महाराष्ट्र देशांत महाराष्ट्र (मराठी) भाषा चालत आहे. ह्या मराठी भाषेस प्राकृत भाषा म्हणतात. ह्या प्राकृत भाषेंत कविता करणारे कवि मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, वामनपंडित, रामदास, तुकाराम, श्रीधर, मोरोपंत, अमृतराय, इत्यादिक बहुत होऊन गेले. ह्यांनीं पुष्कळ

प्रकारच्या कविता केल्या आहेत. ज्याला मराठी भाषेचें ज्ञान चांगलें असावें अशी इच्छा असेल त्यांनीं प्राचीन व अर्वाचीन कवींचे प्राकृत ग्रंथ पुष्कळ वाचावे हें आवश्यक आहे. ज्याला ज्या भाषेचें पूर्ण ज्ञान असतें त्याला त्या भाषेच्या कवितांतील नाना प्रकारचे चमत्कार व रस पाहून किती आनंद वाटतो ! साधारणपणें लिहिलेल्या विषयापेक्षां कवितेंत वर्णिलेला विषय वाचणाऱ्यांस गोड लागतो, कारण कीं कवितेंत भक्त्यादि भाव व करुणा शृंगारादि रस असतात, तसेंच उपमादिक अनेक अर्थालंकार व अनुप्रास यमकादिक शब्दालंकार असतात, ह्यामुळें वाचणाऱ्यांचें मनोरंजन फार होतें. मराठी भाषेंतील गद्य कवितेपेक्षां पद्य कविता लोकांस फार आवडते. कविताग्रंथ वाचून त्यांचा अर्थ लावणें हें एक मोठें आनंदाचें कृत्य आहे.

मराठी भाषेंत कविताग्रंथ पुष्कळ व मोठाले आहेत, त्यांत छंद व चालीही अनेक प्रकारच्या आहेत. त्यांची गोडी लागून तिकडे तरुणांच्या मनाची प्रवृत्ति व्हावी ह्याकरितां मराठी भाषेंतल्या बहुतेक कवितांतील थोडथोडे वेंचे घेऊन हें एक लहानसें पुस्तक केलें आहे. हें मन लावून वाचिलें असतां कवितांचे प्रकार व रीती व त्यांतील चमत्कार व रस हीं सर्व थोडक्यांत समजतील. ह्या लहान पुस्तकाचा अभ्यास चांगला झाला असतां मोठाले ग्रंथ पाहाण्यास मार्ग सुलभ होईल. किंबहुना कविता करण्याची शक्तिही प्राप्त होईल. काव्याचीं लक्षणें व काव्य करण्याची पद्धति ह्यांविषयीं दुसरे ग्रंथ आहेत, म्हणून एथें लिहिण्याची गरज नाहीं. ह्या पुस्तकांत लिहिण्याचा क्रम म्हटला तर कवींच्या काळावरून किंवा कवितांच्या योग्यतेवरून धरला असें नाहीं, तर, जसा संग्रह होत गेला तसा धरिला आहे. तो असा, प्रथम अभंग, त्यापुढें ओंव्या, त्याच्यापुढें वामनी श्लोक, मग मोरोपंती आर्या वगैरे. त्यानंतर कितीएक कवींनीं केलेलीं आख्यानें, कटिबंध, पदें, वगैरे लिहिलीं आहेत. त्या त्या ठिकाणीं कितीएक कवींचे माहीत होते तितके थोडथोडे वृत्तांतही लिहिले आहेत. असें पुस्तक करण्याचा हा प्रथमच प्रसंग आहे म्हणून सुज्ञ पुरुष दोषदृष्टि न करितां गुणलेश घेऊन अधिक उत्तेजन देतील अशी आशा आहे.''

'नवनीता'ची ही पहिली संपादणी त्याच्या अलीकडील आवृत्तीशीं ताडून पाहिली असतां त्या दोहींमध्यें पुष्कळच फरक आढळून येईल. कांहीं जुने वेंचे गाळण्यांत आले ; अनेक नवीन वेंचे घालण्यांत आले ; टीपा प्रायः

नव्हत्या त्या भरपूर दिल्या ; शब्दकोश नव्हता तो शेवटीं जोडण्यांत आला ; शब्द तोडलेले नव्हते ते तोडले ; किरकोळ सुधारणा ठिकठिकाणीं करण्यांत आल्या ; 'महाराष्ट्र भाषेंतील कवितांचे वेंचे' हें ग्रंथाचें जें मुख्य स्वरूप तेवढें मात्र सर्वतोपरी अबाधित राहिलें आहे.

पहिल्या आवृत्तीच्या आरंभीं चार चरणांचा एक श्लोक आढळतो, तो स्वत: परशुरामतात्यांचा असावा. तो असा :—

सच्चेत:कैरवांतें विकच करि जगत्ताप संपूर्ण टाळी ।
अज्ञानध्वांत सारें हरि रसिकचकोरासि अत्यंत पाळी ।
नाना वस्तु प्रकाशी कविहृदयपयोराशिसंतोषहेतू ।
काव्येंदु स्वप्रभेनें खळजनहृदया होतसे धूमकेतू ॥

ग्रंथाच्या शेवटीं परशुरामतात्यांनीं 'रसिकजनांस प्रार्थना' केली आहे ती अशी :—

काव्यामृताचा नवनीत भेला ।
हा गोड लागो तुमच्या जिभेला ।
याची तुम्ही चाखुनि घ्याल गोडी ।
तरी सुखाची मिळवाल जोडी ॥

नाना काव्यतरुव्रजीं हुडकितां जीं जीं बरीं भावलीं ।
तीं तीं वेंचुनि घेतलीं सुकुसुमें पात्रांत जीं मावलीं ।
त्यांची गुंफुनि रम्य माळ विबुधां अत्यादरें अर्पिली ।
ती कंठीं विलसो तिणें कविसभा होवो सदा तर्पिली ॥

हे वेंचे बहुयत्नें मेळविले परशुरामतात्यानें ।
ज्यानें अवलोकावे पावावी शीघ्र रसिकता त्यानें ॥

शेवटीं रचनाकालाचा निर्देश पुढीलप्रमाणें आहे :—

आनंदअब्दीं सत्राशेंशेहत्तर शकीं भला ।
मार्गकृष्णतृतीयेला ग्रंथ संपूर्ण जाहला ॥

शंभर वर्षांपूर्वी तयार झालेल्या पहिल्या 'नवनीता'चें स्वरूप हें असें आहे.

या पहिल्या आवृत्तीच्या केवळ पांचशेंच प्रती छापल्या होत्या. त्या खपून गेल्यामुळें १८९७ सालीं 'नवनीता'ची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करावी लागली. हिला ऑफिशिएटिंग ट्रान्स्लेटर भास्कर दामोदर पाळंदे

यांनीं 'पद्यरचना' व 'कवींचें वर्णन' या विषयांवर दोन लहानसे निबंध आरंभीं जोडलेले आहेत.[६] पहिल्या आवृत्तीमध्यें नसलेला कठीण शब्दांचा कोशही या आवृत्तीमध्यें पहावयास सांपडतो. या दुसऱ्या आवृत्तीला भास्कर दामोदर पाळंदे यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. तिच्यामध्यें ते लिहितात,

"या ग्रंथाची दुसरी आवृत्ती छापणें अवश्य वाटल्यावरून परशुरामपंत यांस पहिल्या आवृत्तींत जे दोष राहिले होते ते नीट करावयास सांगितले. मुख्य दोष हा होता कीं कवी ज्या ज्या काळीं होऊन गेले त्या त्या काळांच्या अनुक्रमानें त्यांच्या कवितांतील वेंचे जुळले नव्हते. मागचा कवि पुढें आणि पुढला मागें असें झालें होतें. कितीएक चांगले ग्रंथ न सांपडल्यामुळें त्यांमधून कांहींच उतारे घेतले नव्हते व दुसरेही कांहीं फेरफार करण्यासारखे होते.

हल्लीं परशुरामपंत यांनीं पुष्कळ श्रम करून, ग्रंथ सांपडले नव्हते ते बहुतेक मिळविले आणि त्यांतून वेंचे करून घातले. हे वेंचे त्या त्या ग्रंथांतील केवळ उत्कृष्ट कवितेचे प्रदर्शक आहेत असें म्हणतां येत नाहीं. कारण सर्व ग्रंथ साद्यंत वाचून त्यांतून सर्वोत्कृष्ट स्थळें निवडणें हें अल्प कालाचें व अल्प सायासाचें काम नव्हे. तथापि वेंच्यांवरून प्राय: त्या त्या कवीच्या गुणांचें स्वरूप लक्षांत आल्याशिवाय राहाणार नाहीं. जुन्या वेंच्यांत त्याज्य जे अंश होते तेही जितके दृष्टीस पडले तितके काढून टाकले."

पहिल्या आवृत्तींतील हिंदुस्तानी व संस्कृत उतारे दुसऱ्या आवृत्तींत गाळलेले आढळतात. तिसरी आवृत्ति दोन स्वरूपांत १८५९ व १८६० सालीं आणि

६ 'नवनीता'च्या आठव्या (१८७३) आवृत्तीच्या 'सूचने' मध्यें 'नवनीता'ची दुसरी आवृत्ति १८५७ सालीं व तिसरी १८६० सालीं निघाली, असें नमूद आहे; परंतु रा. शं. ग. दाते यांच्या मराठी ग्रंथसूचीमध्यें द्वितीयावृत्ति १८५८ सालीं निघाल्याचें वर्णन आहे. यावरून पाळंदे यांच्या उपरनिर्दिष्ट निबंधांशिवाय साधी आवृत्ति १८५७ सालीं व निबंधांसह तीच पुढें १८५८ सालीं प्रसिद्ध झाली, असें वाटूं लागतें. पुणें विद्यापीठामध्यें मुखपृष्ठ नसलेली दुसऱ्या आवृत्तीची निबंध असलेली प्रत आहे. ब्रिटिश म्युझियमच्या मराठी मुद्रित ग्रंथाच्या कॅटलॉगमध्यें (१८९२, कॉलम ९२-९३ पहा) तिसऱ्या आवृत्तीच्याही, पाळंद्यांच्या निबंधांशिवाय (१८५९) व निबंधांसह (१८६०) अशा, दोन प्रकारांची तपशीलवार वर्णनासह नोंद आहे. प्रस्तुत लेखकाकडे तिसऱ्या आवृत्तीच्या या दोनही प्रकारच्या प्रती आहेत; परंतु त्यांस मुखपृष्ठें नसल्यामुळें त्यांच्या प्रकाशनवर्षाचा निर्णय होत नाहीं.

चवथीही तशीच ( दोन स्वरूपांत ) १८६१ सालीं निघाली; त्यांत विशेष मोठे फरक केलेले दिसत नाहींत. मात्र भास्कर दामोदर पाळंदे यांचे उपरिनिर्दिष्ट 'पद्यरचना' व 'कविवर्णन' हे निबंध स्वतंत्र छापून या दोनही आवृत्तींत कांहीं प्रतींनाच जोडलेले आढळतात. निबंधांसह प्रतीची पावणेदोन रुपये, व निबंधांशिवाय प्रतीची दीड रुपया, अशी किंमत ठेवण्यांत आली. हा प्रकार भास्कर दामोदर यांना रुचला नाहीं. ता. ३० नवंबर १८६३ च्या पत्रांत ते डी. पी. आय. मि. हॉवर्ड यांना लिहितात,

"I would take this opportunity to mention, with respect to the selections from the Marathi Poets, that it was intended that my Essays should always be printed with them. The separation of the two is on no account desirable and if insisted on will render considerable changes in both. They will therefore be always printed together, unless I hear from you contrary." ७

ही भानगड कशी उपस्थित झाली याचा उगम आपणांस सरकारी बुक डेपोचे ॲक्टिंग क्युरेटर माधव एन. शिरगांवकर यांच्या एका पत्रांत सांपडतो. आपल्या ता. २७ जून १८६४ च्या पत्रांत त्यावेळचे ॲक्टिंग डी. पी. आय. मि. ए. ग्रांट यांना ते लिहितात,

"Selections from the Marathi Poets was compiled by Mr. Parshram Balal Godbole, Pandit to the Marathi translator. The copyright of the work was bought by Government for Rs. 150 at the recommendation of Major Candy in 1853-54. No doubt Rao Saheb Bhaskar Damodar added to it his essays on prosody and lives of the Marathi poets. But I do not think that this addition can entitle him to the copyright of this book. He may if he like print his essays separate. As the copyright of this book has been paid for by Government and as it is in much request, its publication should not be given up to Rao Saheb Bhaskar Damodar, whose claim for the copyright is not in my opinion tenable.

He proposes that the publication of the work without his essay should be discontinued and that with the essays should be printed. The generality of the Marathi reading people do not care for his essay on Prosody or the lives of the Poets. What

---

७ D. P. I. *Book Depot*, Vol. XX, 1864-65, p. 583.

they want is mere poetry. I am therefore of opinion that the selections from the Marathi Poets without Mr. Bhaskar's Essays should not be discontinued." ८

या प्रश्नाचा निकाल पाळंद्यांविरुद्ध झालेला दिसतो. १८६४ सालची पांचवी आवृत्ति मला पाहावयास मिळालेली नाहीं; परंतु माझ्या संग्रहीं असलेल्या पुढील सहावी (१८६८), सातवी (१८७१) व आठवी (१८७३) या परशुरामतात्यांच्या हयातींत प्रसिद्ध झालेल्या आवृत्त्यांमध्यें ते निबंध प्रसिद्ध झालेले दिसत नाहींत. नवव्या (१८७८) आवृत्तीच्या तपासणाऱ्यांच्या सूचनेंत भास्कर दामोदर ह्यांनीं छंदांविषयीं लिहिलेला निबंध नवनीताच्या मागील कित्येक आवृत्तींत आरंभीं छापला होता, परंतु आतां त्या विषयावर परशुरामपंत तात्या ह्यांचा स्वतंत्र ग्रंथ झाल्यामुळें तो निबंध येथें गाळला आहे, अशा अर्थाचा शेरा आढळतो.

## 'नवनीता'चा दुसरा भाग

'नवनीत भाग २. कवितासारसंग्रह' नांवाचें नवनीताच्याच आकाराचें एक लहानसें पुस्तक परशुरामपंत गोडबोले यांनीं १८६३ सालीं म्हणजे 'नवनीता'ची चवथी आवृत्ती प्रकाशित झाल्यावर स्वतःच प्रसिद्ध केलें, त्याचाही येथें उल्लेख करणें अवश्य आहे.

या पुस्तकाला आश्रय देण्याबद्दल डायरेक्टर ऑफ एज्युकेशनकडे पाठविलेला अर्ज सरकारी दप्तरांत उपलब्ध आहे. त्यांत तात्या लिहितात, "अर्ज करितों ऐसाजे. पूर्वी नवनीत किंवा प्राकृत कवितांचे वेंचे या नांवाचें बुक जालें आहे. त्यांत ग्रंथसंग्रह पुष्कळ असल्यामुळें त्याची किंमत देण्याचें गरीब लोकांस सामर्थ्य नसल्यामुळें तें बुक त्यांच्यानें विकत घेवत नाहीं तेणेंकरून कविताग्रंथ वाचण्याची त्यांची हौस पूर्ण होत नाहीं. यासाठीं त्याच मासल्याचें थोड्या किंमतींत लहानसें एकादें बुक असावें अशी बहुतांची इच्छा समजण्यांत आल्यावरून मी एक नवनीताच्या मासल्याचें लहान बुक तयार केलें आहे. त्यामध्यें नवनीतांतील कविता न घेतां दुसरे वेंचे घेऊन घातले आहेत. बहुतकरून मराठी सर्व कवींच्या कवितांचे थोडथोडे वेंचे नमुने यांत आहेत, व जे चांगले मनोरंजकसे वाटले तेच घेतले आहेत. हें बुक गरीब लोकांस घेण्यास सोयीवार पडावें म्हणोन याची किंमत आठ आणे

८. *Ibid*; pp. 585-86.

ठेविली आहे. नफ्याकडे विशेष दृष्टि दिली नाहीं. हें बुक मी स्वतःच्या खर्चावर छापविणार आहें. परंतु या कामास सरकारचा आश्रय मिळेल तर फार चांगलें होईल असें मनांत आणून खावंदांस अर्ज केला आहे. तर या बुकाच्या दोन हजार प्रती सरकारनें घ्याव्या, अशी माझी विनंति आहे. याहून जास्ती घेतल्या तरी सरकारचें नुकसान नाहीं, असें मला वाटतें. कदाचित इतक्या प्रती घेण्यास सरकारची मर्जी नसेल तर निदान पंचराशें प्रती तरी घेण्याचा हुकूम व्हावा. याविषयीं जसा हुकूम होईल तशा प्रती छापविण्याचा बेत धरतां येईल. केलेलें बुक पाहाण्यास हुजूर पाठविलें आहे. हें पाहाण्यांत येऊन परत पाठविण्याचा हुकूम व्हावा. ज्यादा अर्ज करण्यास ताकद नाहीं. तारीख [दिली नाहीं.] माहे आगष्ट सन १८६२ इ. मु. पुणें.

(सही) परशुरामपंत गोडबोले. "[१]

मेजर कँडींचा या पुस्तकावर, "I have looked at the book and find that it is quite of the same character as Navanit. I doubt not that it will be popular," असा शेरा पडला (१२ ऑगष्ट); आणि दहा टक्के कमिशन दिल्यास दोन हजार प्रती घेण्याची मि. हावर्ड यांनीं मान्यता दिली. आपल्या अर्जांत जरी आठ आणे किंमत ठेवण्याचें ग्रंथकारानें कबूल केलें होतें, तरी पुस्तकावर किंमत नऊ आणे छापलेली आढळते. पृष्ठसंख्या ४ + १२६ ; आकार (इंच) ८·४ × ५·२.

या दुसऱ्या भागाच्या आरंभीं नवनीताच्या पहिल्या भागांत आरंभीं घातलेला 'सच्चेतःकैरवांतें'— इत्यादि 'काव्यप्रशंसा श्लोक' दिलेला असून पांच पृष्ठें "मंगल श्लोक" घातले आहेत ; ते त्यांचेच स्वकृत दिसतात. 'स्तुती करावी परमेश्वराची'—'आस ही तुझी फार लागली'— अशा यांतील दोन-तीन कवितांना क्रमिक पुस्तकांमध्येंही पुढें स्थान मिळालेलें आढळतें. शेवटच्या पानावर "ग्रंथकर्त्याची रसिकजनांस प्रार्थना" अशी आहे :—

अनेक काव्यामृत सागरांतें। जें शोधितां सार अलें करातें ॥
तें अर्पिलें म्यां रसिकां जनांला। त्यांच्या करो हृष्ट सदा मनाला ॥
काव्यामृताचा नवनीत भेला। हा गोड लागो तुमच्या जिभेला ॥
याची तुम्हीं चाखुनि घ्याल गोडी। तेव्हां सुखाची मिळवाल गोडी ॥

---

१ Director of Public Instruction, *Book Depot*, Vol. 16, 1862-63, p. 198.

हा संग्रह बहुयत्नें केला म्यां परशुरामतात्यानें ।
ज्यानें अवलोकावा पावावी शीघ्र रसिकता त्यानें ॥
जरि याचा जन आदर करितिल घेतील हा पहायास ।
तरि उत्तेजन होइल मज तिसरा भाग तो करायास ॥

या दुसऱ्या भागाचा व्हावा तसा खप न झाल्यामुळें, पुढें वर निर्दिष्ट केलेला तात्यांचा संकल्पित 'तिसरा भाग' कधींच प्रसिद्ध झाला नाहीं. त्यांची वरील आर्या उद्धृत करून निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळुणकर उद्वेगानें लिहितात, "ही आशा कितपत सफळ झाली हें सांगायला नकोच. तिसऱ्याची गोष्ट तर दूरच, पण दुसरा भागहि करण्याची विशेष जरूर नव्हती असें सदरील ग्रंथकारास बहुधा लवकरच वाटलें असावें !"[१०]

चिपळुणकरांच्या मतें या दुसऱ्या भागांतील वेंचे "एकंदरीनें पाहातां पहिल्यापेक्षां सरस आहेत;" परंतु त्याचा 'आदर' बिलकूल झालेला दिसत नाहीं. हा 'नवनीता'चा दुसरा भाग पाहिलेले तर सोडाच, परंतु असें पुस्तक प्रसिद्ध झालें होतें, हें ज्यांना माहीत आहे, असे वाचकही फार थोडे आढळतील ! या दुसऱ्या भागांतील मुक्तेश्वराच्या सभापर्वातील 'नारदनीति', ध्रुवाख्यान दिंड्या, प्रभाकराचा 'लक्ष्मीपार्वतीसंवाद' असे कांहीं वेंचे पुढें १८७८ सालच्या नवनीताच्या नवव्या (किंवा नव्या) आवृत्तिमध्यें अंतर्भूत करण्यांत आलेले आढळतात.

## तात्यांच्या निधनोत्तर नवी आवृत्ति

परशुरामपंत तात्या १८७४ सालीं निधन पावले. पुढें 'नवनीता'ची नवीन (नववी) आवृत्ति काढण्याचा ज्यावेळीं प्रसंग आला त्यावेळीं हें काम विद्याखात्याचे डायरेक्टर मि. चाटफिल्ड यांनीं मेजर कँडीमार्फत श्रीकृष्णशास्त्री तळेकर व रावजीशास्त्री गोडबोले या विद्वानांकडे सोंपविलें. 'पहिल्या आवृत्तींतील कठिण वेंचे सर्व काढून त्या ठिकाणीं सुलभ वेंचे घालावे आणि सर्वांस समजण्यास सुलभ पडेल अशी ह्या पुस्तकाची आवृत्ति काढावी,' असा त्यांना वरिष्ठांकडून आदेश होता. त्याला अनुसरून या नव्या आवृत्तींत त्यांनीं कोणत्या सुधारणा केल्या त्या संपादकांच्या शब्दांतच पाहा :—

"(१) मागील आवृत्तींत जे फार दुर्बोध आणि अध्यात्मसंबंधी किंवा वेदांतसंबंधी वेंचे होते ते गाळून नवे सुलभ, मनोरंजक आणि तरुण पुरुषांनीं वाचण्यास योग्य असे वेंचे घातले आहेत.

---

१० **निबंधमाला.** अंक ५८ (पुणें १८७८), पृ० २१.

(२) सभ्य रीतीस सोडून जें वर्णन होतें तें काढलें आहे.

(३) कवितेंतील सर्व शब्द निरनिराळे तोडून समासांतील शब्द ( – ) अशा खुणेनें निरनिराळे करून दाखविले आहेत.

(४) कठीण स्थलांचा अर्थ समजण्याकरितां पुष्कळ टीपा दिल्या आहेत.

(५) ज्या कवींचे उतारे घेतले आहेत त्यांचें स्वल्प चरित्र वेंच्याचे आरंभीं माहिती मिळाली त्याप्रमाणें दिलें आहे.

(६) आख्यानांच्या किंवा प्रकरणांच्या आरंभीं त्यांच्या मूळपीठिका म्हणजे अवतरणें दिलीं आहेत.

(७) रा. सा. भास्कर दामोदर ह्यांनीं छंदांविषयीं लिहिलेला निबंध नवनीताच्या मागील कित्येक आवृत्तींत आरंभीं छापला होता; परंतु आतां त्या विषयावर परशुरामपंत तात्या ह्यांचा स्वतंत्र ग्रंथ झाल्यामुळें तो निबंध येथें गाळला आहे.

(८) आख्यान ज्या वृत्तांत असेल तें वृत्त मागील आवृत्तींत उजव्या हातच्या पृष्ठावर दिलें होतें; पण आतां तसें न करितां त्या ठिकाणीं आख्यानाचें नांव दिलें आहे.

(९) वेंचे कवींच्या कालानुक्रमाप्रमाणें साधतील तितके जुळले आहेत.

(१०) मुकुंदराज आणि ज्ञानेश्वर ह्यांच्या कवितांत सर्व वेदांत असल्यामुळें त्यांचा अर्थ समजण्यास कठीण पडतो, म्हणून त्यांची कविता ह्या आवृत्तींतून अजीच काढून टाकिली आहे.

(११) जे कवि ह्या आवृत्तींत गाळले आहेत त्यांच्या बदला दुसरे कवि घातले आहेत.

(१२) जुन्या कोशांत नवे पुष्कळ शब्द घालून तो कोश बराच वाढविला आहे."

या नवीन आवृत्तींत माधव चंद्रोबांनीं 'सर्वसंग्रहां'त अनुसरलेल्या पद्धती-प्रमाणें कवितेंतील शब्द तोडून निराळे दाखविणें वगैरे केलेल्या कांहीं सुधारणा स्वागतार्ह होत्या; परंतु वर लिहिल्याप्रमाणें मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांच्या कविता "अजीच काढून टाकल्या" हें पुष्कळांना आवडलें नाहीं. विष्णुशास्त्री चिपळुणकरांनीं 'केसरी' मध्यें लेख लिहून या गोष्टीचा निषेध केला. तो असा:

" 'नवनीता' विषयीं विचार करतांना प्रथमतः ही एक मोठी गोष्ट लक्षांत आणली पाहिजे कीं, एकंदर महाराष्ट्रकवितेचें तें सार होय ; म्हणजे, एकंदर मराठी कविता अत्यंत विस्तीर्ण आहे तेव्हां स्थालीपुलाकन्यायेंकरून, अथवा मराठींत म्हणतात कीं 'शितावरून भाताची परीक्षा करावयाची' त्याप्रमाणें, थोडक्यांत ज्याला तिच्या स्वरूपाचें ज्ञान करून घेणें असेल त्याला तें वरील पुस्तकावरून व्हावें, अशी त्याची रचना असली पाहिजे. मग हें खरें आहे, तर महाराष्ट्रकवींपैकीं कोणी अध्यात्म किंवा वेदांत विषयच मुख्यतः वर्णिला असतां, त्यास 'नवनीतां'तून 'अजीच काढून टाकणें' हें काय उपयोगी ? मेहरबान चाटफिल्ड साहेब किंवा क्यांडी साहेब यांस जरी आमच्या ज्ञानोबांचें ब्रह्मज्ञान दुर्बोध वाटलें, किंवा त्यांविषयीं त्यांचा खासगत मतें कांहींही असलीं, तरी 'नवनीतां'तून मुकुंदराज किंवा ज्ञानदेव यांजसारख्या अत्यंत प्रसिद्ध कवींवर अर्धचंद्रप्रयोग करणें म्हणजे केवढा अन्याय होय ! इंग्रजी कवितेचें सार म्हणून एकादा ग्रंथ रचला, आणि त्यांत बायरन कवीच्या ग्रंथांत अश्लीलत्व आहे किंवा शेलीच्या ग्रंथांत नास्तिकपणा आहे म्हणून त्यांचे वेंचे जर मुळींच घेतले नाहींत, तर चालेल काय ? या दृष्टीनें पाहतां पूर्वोक्त कविद्वयाचा निषेध अत्यंत असमंजसतेचा होय हें उघड आहे.... 'नवनीता'च्या या नवीन आवृत्तीची पुनः दुसरी आवृत्ति निघत आहे असें आम्हीं ऐकिलें आहे. तरी या वेळेस आमचे डायरेक्टर साहेबांनीं मेहरबानी करून महाराष्ट्र भाषेचे आद्य कवींची कांहीं कींव करून, त्यांस सांप्रत जो निवळ अर्धचंद्र मिळाला आहे त्याविषयींचा कडक हुकूम रद्द करावा, व कोठें एकाद्या कोनाकोपऱ्यांत तरी त्यांस जागा द्यावी, अशी सदर कवींच्या तर्फेनें त्यांस आमची विज्ञापना आहे. "[११]

'निबंधमाले'च्या १८८१ सालच्या जानेवारीच्या [ मे महिन्यांत प्रसिद्ध झालेल्या ] अंकांतही याच विषयावर 'आपला एक वाचक' अशा टोपण नांवानें ता. ९ एप्रिल १८८१ चें एक मार्मिक व विस्तृत पत्र प्रसिद्ध झालें असून तें मूळांत वाचण्यासारखें आहे.[१२] 'केसरी'तील उपरिनिर्दिष्ट लेख वाचूनच हें पत्र लिहिण्यास लेखकास स्फूर्ति झाली असावी. या पत्राचे लेखक 'काव्येतिहाससंग्रहा'चे संपादक कै. जनार्दन बाळाजी मोडक हे असावेत.

---

११ **केसरी**. पुणें. ता. ११, १८, २५ जानेवारी १८८१.

१२ **निबंधमाला** ( अं० ७३, पृ. २३–३१ ), पुणें १८८१.

## नवनीताची 'पहिली (नवीन)' आवृत्ति

यानंतर १८८२ सालीं 'नवनीता'ची दहावी आवृत्ति प्रसिद्ध झाली. तिला 'पहिली (नवीन) आवृत्ति' असें नांव देण्यांत आलें. ही आवृत्ति तयार करण्याचें काम, मागच्या आवृत्तीच्या संपादकद्वयापैकीं एक रावजी-शास्त्री गोडबोले यांच्या स्वाधीन करण्यांत आलें. १८७८ च्या आवृत्तीमध्यें बराच फरक करून ही नवीन आवृत्ति त्यांनीं लोकांपुढें आणिली. या आवृत्तीमध्यें कांहीं कवींचे उतारे कमीजास्त करून याशिवाय अशुद्धांची दुरुस्ती, ऱ्हस्वदीर्घ, पाठभेद वगैरे किरकोळ फेरफार केल्याचेंही नमूद आहे.

या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत 'केसरीं'तील उपरिनिर्दिष्ट टीकेचा नामनिर्देश नाहीं; पण निबंधमालेंतील पत्रांतील टीकेचें "निबंधमालेच्या ७३ व्या अंकामध्यें एका मार्मिक विद्वान गृहस्थानें 'नवनीता'च्या सन १८७८ सालच्या आवृत्तींतले कित्येक दोष काढून प्रसिद्ध केले, या कृत्याबद्दल त्याचे आम्हीं आभार मानतों," अशा शब्दांनीं स्वागत करण्यांत आलें आहे. मुकुंद-राज व ज्ञानेश्वर यांचे वेंचे गाळल्याबद्दल जी टीका झाली तिला अनुलक्षून या प्रस्तावनेंत पुढील खुलासा आढळतो :—

"ही आवृत्ति तयार करण्याविषयीं मे० दैरेक्तर साहेब ह्यांचा सन १८८१ सालच्या जुलै महिन्यांत हुकूम आला, त्यांतदेखील ही आवृत्ति सामान्य विद्यार्थ्यांस समजण्याजोगी असावी असें स्पष्ट लिहिलें आहे; त्यामुळें ह्या आवृत्तिमध्येंही ज्ञानेश्वरींतल्यासारिखे लोकप्रिय वेंचे गाळणें प्राप्त झालें. आतां हे दुर्बोध वेंचे समजण्याची योग्यता ज्या विद्यार्थ्यांचे आंगीं आली असेल त्यांच्या अवलोकनांत तेही यावे व इतर लोकांचेंही मनोरंजन व्हावें, म्हणून तसले वेंचे ज्यांत घातले आहेत असा नवनीताचा दुसरा भाग तयार करावा असा मुख्य अधिकारी ह्यांचा उद्देश आहे."

हा दुसरा संकल्पित भाग कधीं उजेडाला आलाच नाहीं!

यापुढील दुसरी नवीन (म्हणजे वास्तविक अकरावी) आवृत्ति १८८६ सालीं प्रसिद्ध झाली. या आवृत्तीमध्यें काय फरक करण्यांत आले त्यांपैकीं मुख्य मूळ संपादकांच्या शब्दांतच पहा:—

"१. ही आवृत्ति तयार होऊन छापण्यास सुरवात झाली असतां मे० दैरेक्तर साहेब यांजकडून पत्र आलें, त्यांत त्यांनीं असा सक्त हुकूम दिला कीं, नवनीतामध्यें जीं ग्राम्यधर्मसूचक पद्यें असतील तीं सर्व काढून टाकावीं.

त्या हुकुमान्वयें मुक्तेश्वराचें दुष्यंतशकुंतलाख्यान, व मोरोपंताच्या काव्यांपैकीं ययातीचें आख्यान व दुष्यंतशकुंतलाख्यान हीं तर ह्या आवृत्तींतून मुळींच गाळून टाकावीं लागलीं. त्याचप्रमाणें प्रायशः प्रत्येक कवीच्या वेंच्यांतून कांहीं कांहीं पद्यें गाळावीं लागलीं; व तीं पद्यें गाळल्यामुळें जेथें जेथें पूर्वापार संबंध सुटतो असें वाटलें तेथें तेथें तो दर्शविण्यासाठीं गद्यरूपानें संक्षेपतः कथाभाग घातला आहे. त्याचप्रमाणें कांहीं कांहीं वेंचे विशेष सुरस वाटले नाहींत तेही गाळून टाकिले आहेत.

२. ह्या आवृत्तींत मुक्तेश्वराचें हरिश्चंद्राख्यान, मोरोपंताचें अंबरीषाख्यान व कर्णपर्वांतील कर्णार्जुनयुद्ध आणि कांहीं कवींचीं पदें असे सुरस व उपदेशपर वेंचे नवीन घातले आहेत.

३. सन १८७८ व सन १८८२ ह्या सालीं तयार झालेल्या नवनीताच्या आवृत्तींमध्यें पूर्वींच्या आवृत्तींतली ज्ञानेश्वराची कविता सारीच गाळून टाकिली होती ती गाळण्याचें कारण त्या त्या सालीं छापलेल्या आवृत्तींच्या प्रस्तावनेंत दर्शविलें आहे. आतां कित्येक एज्युकेशनल इन्स्पेक्टर ह्यांचें मत असें पडलें कीं, ती गाळून टाकिली हें चांगलें झालें नाहीं. त्यावरून ती कविता ह्या आवृत्तींत घालण्याविषयीं मे० दैरेक्तर साहेब ह्यांचा हुकूम आला; परंतु त्या वेळीं ही आवृत्ति सुमारें अर्धी अधिक छापून तयार झाली होती म्हणून ज्ञानेश्वरींतील वेंचे ( अध्याय १२ व १३ ) ह्या आवृत्तीमध्यें शेवटीं घालावे लागले. ”

तिसरी ( नवीन ) आवृत्ति—वास्तविक बारावी—रावजी शास्त्री गोडबोले यांनींच तयार केली व ती १८८९ सालीं प्रसिद्ध झाली. ही आवृत्ति तयार करतांना विशेष गोष्टी करण्यांत आल्या त्या अशा :—

“ पूर्वींच्या आवृत्तींतल्या ज्या ज्या पद्यांमध्यें अश्लील किंवा असभ्य शब्द चुकून राहिलेले आढळले, तीं सारीं पद्यें काढून टाकिलीं आहेत. तसेंच ज्यांपासून वाचकांस विशेष सदुपयोग किंवा ज्ञान प्राप्त होण्यासारखें नाहीं, जीं विशेष मनोरंजक नाहींत किंवा जीं विशेष पंथांस अनुलक्षून आहेत, अशीं प्रकरणें, अभंग, श्लोक, कटाव इत्यादिक काढून टाकून त्यांचे ऐवजीं बोधपर, ज्ञानप्रद, रसभरित आणि विशेष पंथास अनुलक्षून नसणारीं अशीं प्रकरणें वगैरे घातलीं आहेत. ”

इतर फुटकळ फेरफार सोडले तर जुन्या आवृत्तींत मागच्या द्वारानें प्रवेश केलेल्या ज्ञानेश्वराला या आवृत्तींत पहिलें स्थान मिळालें आणि 'गंगारत्नमाला' नांवाच्या काव्यांतील वेंचे 'नवनीतां'त नव्यानें समाविष्ट झाले.

यापुढील आवृत्त्यांमध्यें किरकोळ सुधारणांखेरीज म्हणण्यासारखी विशेष उलथापालथ झाली नाहीं. या आवृत्त्यांचे संपादक पुणें ट्रेनिंग कॉलेजचे व्हॉइस-प्रिन्सिपाल असत. या आवृत्त्या केव्हां व कोणाच्या संपादकत्वाखालीं निघाल्या तें पहा :—

१८९४ चवथी नवीन (तेरावी)—ना. बा. गोडबोले.

१९०७ पांचवी नवीन (चवदावी)—(ग. वि. डांगे), ना. बा. गोडबोले.

१९१० सहावी नवीन (पंधरावी)—शं. गो. साठे.

१९१८ सातवी नवीन (सोळावी)—म. सा. तिरोडकर.

१९२३ आठवी नवीन (सतरावी)—सोळावीचें पुनर्मुद्रण.

जुन्या मराठी काव्यवाङ्मयाचें महत्त्व विदेशी राजाधिकाऱ्यांनादेखील नवनीताच्या यशामुळें जास्त जास्त पटूं लागलें, आणि इतर देशी भाषांत 'नवनीता'चें अनुकरण व्हावयास लागलें. डी. पी. आय. मि. हावर्ड दक्षिणा प्राइज कमिटीला पाठविलेल्या १८६२ सालच्या एका पत्रांत लिहितात,

"The value of indigenous poetry is very great. The success of the Navnit led me to endeavour to bring out a similar Gujerati collection. After considerable difficulties which chiefly arose from what I must call short-sighted objections stated by the exclusive advocates of 'useful knowledge', I succeeded in inducing the Gujerat Vernacular Society to allow their Secretary to compile, for a handsome remuneration, a book of the kind which I desired. It has been now published, and is selling so rapidly that I hope shortly to recover all the rather heavy expenditure which is caused to my Department."[१३]

हावर्डनें उल्लेखिलेलें उपरिनिर्दिष्ट गुजराती पुस्तक म्हणजे दलपतराम डाह्याभाई यानें तयार केलेलें 'काव्यदोहन' हें दिसतें. (प्रकाशनवर्ष इ. स. १८६४).

'नवनीता'चा उगम व विकास कसा झाला, हें वरील विवेचनावरून कळून येईल. 'नवनीत' ज्या काळांत तयार झालें त्या काळांत, रा. ब. दादोबा पांडुरंग यांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, नवीन विद्वानांना 'मराठी ती काय आडु

१३ D. P. I., Records, *Daxina Fund*, Vol. 15, 1862-63, p. 115.

लोकांची भाषा आहे ', असें वाटत असे. अशा लोकांना आपल्या जुन्या मराठी वाङ्मयवैभवाची ओळख देऊन त्यांचा न्यूनगंड नष्ट करण्याचें व आपल्या मायभाषेचें प्रेम वाढविण्याचें महान कार्य 'नवनीत' या ग्रंथानें केलें. 'नवनीता'ची सोळावी आवृत्ति १९१८ सालीं निघाली, आणि लगेच पांच वर्षांनीं १९२३ सालीं त्याची ( पुनर्मुद्रणात्मक ) सतरावी आवृत्ति प्रसिद्ध करावी लागली, यावरून त्याची लोकप्रियता अलीकडेपर्यंत कशी टिकून राहिली आहे, हें उघड दिसून येईल. 'नवनीता'ची ही शेवटची आवृत्तिही लवकरच खपून गेली. गेलीं कित्येक वर्षें 'नवनीता'ची प्रत विकत मिळणें तर सोडाच, परंतु पहावयाला मिळणेंही कठीण झालें होतें. त्याची नवीन आवृत्ति काढण्याची सरकारची हालचाल दिसून येत नाहीं, असें पाहून कांहीं खाजगी प्रकाशक ती प्रसिद्ध करण्याच्या खटपटींत होते. अशा परिस्थितींत कै. बाळ गंगाधर खेर व कै. पु. मं. लाड यांच्या प्रेरणेनें मुंबई सरकारनें 'नवनीता'ची नवीन सुधारून वाढविलेली आवृत्ति काढण्याचें निश्चित करून ती कामगिरी प्रस्तुत संपादकाकडे सोंपविली. त्याप्रमाणें हें काम १९५३ सालींच पुरें होऊन १९५४ सालीं 'नवनीता'ची शतसांवत्सरिक आवृत्ति म्हणून हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा संकल्प होता. परंतु कांहीं अनपेक्षित अडचणींमुळें तो सिद्धीस जाऊं शकला नाहीं. तरी पण २९ डिसेंबर १९५४ रोजीं पहिले कांहीं फार्म छापून या शतसांवत्सरिक आवृत्तीच्या मुद्रणारंभाचा मुहूर्त करण्यांत आला ; आणि आतां ती संपूर्ण स्वरूपांत प्रसिद्ध होत आहे.

प्रस्तुत शतसांवत्सरिक 'अठराव्या' आवृत्तीमध्यें मागच्या आवृत्तींतील कांहीं उतारे कमी करून तितक्या प्रमाणांत नव्या कवींचे उतारे घालावे, अशी एक सूचना होती ; परंतु आपला आवडता एकादा उतारा गाळला गेला, अशा तक्रारीस बिलकूल जागा राहूं नये म्हणून जुने उतारे मागच्या आवृत्तींत होते ते सर्व कायम ठेविले आहेत. त्यामुळें नवे उतारे जास्त कवींचे व फार मोठे असे घेतां आले नाहींत. तथापि नव्या उताऱ्यांमुळें सुमारें पाउणशें पृष्ठें शेवटीं वाढलींच. आपला धर्म, पंथ किंवा जात जरी निराळी असली तरी सर्वांची मातृभाषा एकच मराठी आहे, ही गोष्ट सर्वांच्या लक्षांत राहावी म्हणून प्रातिनिधिक स्वरूपाचे कांहीं उतारे घेतले आहेत. 'नवनीता' ची ही आवृत्ति पाहून कोणत्याही धर्माच्या, पंथाच्या किंवा जातीच्या माणसाला मराठी मातृभाषेबद्दल आपुलकी वाटावी व तद्द्वारा महाराष्ट्र व भारत यांबद्दल त्याच्या

मनांत प्रेम व अभिमान निर्माण व्हावा, हाही यांत एक हेतु आहे. असेच आणखीही प्रातिनिधिक चांगले उतारे देतां आले असते तर बरें झालें असतें. हे नवे उतारे निवडतांना कै. पु. मं. लाड यांच्याशीं विचारविनिमय करूनच निश्चित केले होते. आरंभींचे कांहीं छापील फार्मही त्यांनीं पाहिले होते. हा ग्रंथ छापून तयार झालेला पाहण्यास ते आपल्यामध्यें नाहींत, याबद्दल अत्यंत दुःख होतें.

प्रस्तुत आवृत्तींत केलेल्या कांहीं विशेष गोष्टी पुढीलप्रमाणें आहेत :—

(१) १८७८ च्या आवृत्तीपासून मुकुंदराजाला 'नवनीतां'तून जो 'अजीच' कमी केला होता त्याला, विवेकसिंधूंतील जुनाच उतारा या आवृत्तींत घालून, पुनः 'नवनीतां'त स्थानापन्न केला आहे.

(२) (अ) पुढील नवीन कवींचे उतारे घेतले आहेत :—कवि नरेंद्र, भास्करभट बोरीकर, पंडित दामोदर, विष्णुदास नामा, शेख महंमद, दासोपंत, तोमास स्टिफन्स, शाहीर तुळशीदास, आणि सामराज.

(आ) देवनाथाचें एक पद आणि निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, चोखा महार, सेना, सावता माळी व बहिणाबाई यांचे अभंग नवे घेतले आहेत. सोहिरोबा आंबिये यांचे पदांखेरीज अनेक ओवीबद्ध ग्रंथ आहेत, त्यांतीलही एकादा उतारा घ्यावा, अशी एक सूचना होती; परंतु विस्तारभयास्तव ती कृतींत आणतां आली नाहीं. त्यांचीं दोन पदें मात्र नवीं घातलीं आहेत.

(३) पूर्वीच्या कवींचे उतारे त्या त्या कवींच्या अधिकृत आवृत्त्यांशीं व कांहीं ठिकाणीं त्यांच्या काव्यांच्या हस्तलिखितांशींही ताडून पाहून अवश्य वाटल्या तेथें दुरुस्त्या केल्या आहेत.

(४) निबंधमालेंत (अंक ७३) प्रसिद्ध झालेल्या, 'नवनीता'वरील उपरिनिर्दिष्ट टीकालेखांत, "जागजागीं कवींचे मूळचे पाठ (जुन्या आवृत्तींतील) फिरवून त्या ठिकाणीं आपल्या अकलेनें नवे पाठ केले आहेत ... या कारणानें या पाठांतरांनीं कवींच्या मूळच्या शुद्ध कीर्तीस मात्र डाग लागूं पाहातो, सुधारणा तर होत नाहींत," अशी रास्त टीका होती. नलदमयंती-स्वयंवराख्यानामध्यें असे नवे पाठ बरेच होते ते बदलून 'नवनीता'च्या जुन्या १८६० च्या आवृत्तीप्रमाणें फिरवून घेण्याचा प्रयत्न केला आहे. तसेंच या काव्याचीं बरींच जुनीं हस्तलिखितें पाहून व अंतर्गत प्रमाणांवरूनही प्रक्षिप्त वाटलेलीं, मागच्या आवृत्तींतील या काव्यामधील १२०-१२१ आणि १२३-१२८ व १३० या क्रमांकांचीं पद्यें गाळून टाकिलीं आहेत.

(५) मागच्या आवृत्तींत चिंतामणीच्या नांवावर असलेलें 'ध्रुवाख्यान' हें दिंडीबद्ध काव्य वास्तविक उद्धवचिद्घनाचें आहे, असें अनेक जुन्या हस्त-लिखितांवरून व जुन्या काळीं प्रसिद्ध झालेल्या मुद्रित काव्यांवरून आणि अंतर्गत प्रमाणांवरून दिसून येतें. म्हणून या काव्याच्या एका जुन्या प्रतीप्रमाणें तें उद्धवचिद्घनाच्या नांवावर छापलें आहे.

(६) अलीकडे झालेलें संशोधन लक्षांत घेऊन कवींच्या चरित्रांमध्यें अवश्य वाटलें तेथें बदल केले आहेत व कवीच्या परिचयानंतर, एकाद्या वाचकाला त्याच्यासंबंधीं जास्त माहिती मिळविण्याची इच्छा झाल्यास ती त्याला पुरी करतां यावी म्हणून, कांहीं निवडक ग्रंथांचा निर्देश करण्यांत आला आहे.

(७) या ग्रंथाचे आद्य संयोजक कै. परशुरामपंत गोडबोले यांचें लहानसें चरित्र व त्यांच्या ग्रंथांची यादी, आद्य नवनीताचें मुखपृष्ठ व परशुरामपंतांचीं हस्ताक्षरें व फोटो यांसह, पुढें जोडिली आहे.

जुन्या आवृत्तींतील दोष काढून काढण्याचा जरी या आवृत्तींत प्रयत्न असला, तरी या आवृत्तींतही अनवधानामुळें मुद्रणाचे किंवा अन्य कांहीं दोष राहून गेले असणें अगदीं शक्य आहे. वाचकांनीं कृपा करून ते आमच्या नजरेस आणल्यास किंवा अन्य कांहीं उपयुक्त सूचना केल्यास 'नवनीता'ची पुढची आवृत्ति तयार करतांना उपयोगी पडावी म्हणून सरकारकडे एक शुद्ध प्रत तयार करून देण्याची आमची मनीषा आहे. मात्र या सूचनांच्या ग्राह्याग्राह्यतेबद्दल निष्कारण पत्रव्यवहार करीत न बसतां, केवळ पत्रांची साभार पोंच अवश्य देण्यांत येईल.

प्रस्तुत आवृत्ति तयार करतांना ज्या ज्या मित्रांचें साहाय्य झालें त्या सर्वांचा प्रस्तुत लेखक ऋणी आहे. शेवटीं या 'नवनीता'च्या शतसांवत्सरिक आवृत्तीची संपादकीय कामगिरी आमच्याकडे सोंपवून मराठी भाषेची सेवा करण्यास ही जी एक नवी संधि प्राप्त करून दिली, त्याबद्दल मुंबई सरकारचे आभार मानणें अवश्य आहे.

सरस्वती बिल्डिंग,<br>केनेडी ब्रिज, मुंबई ४.<br>ता. २२-१०-५७

अ. का. प्रियोळकर.

# नवनीत.

## महाराष्ट्र भाषेंतील कवितांचे वेंचे.

हें पुस्तक मेहेरबान् मेजर क्यांडी साहेब बहादुर
पुणे पाठशाळेचे प्रिन्सिपाल
ह्यांच्या आज्ञेवरून

परशुरामपंत गोडबोले ह्यांनी
संग्रह करून रचिलें, तें

मेहरबान् बोर्ड आफ् एड्युकेशन
ह्यांच्या हुकुमावरून

पुणे पाठशाळेकडील छापखान्यांत छापिलें.

मुकाम पुणें.

छापणार नारोरामचंद्र ठकार क० छा०

इसवी सन १८५४

शके १७७६

नवनीत पुस्तक छापल्यानंतर मराठीभाषा
शिकविण्याचीरीत इतकी बदलली कीं, शाळांत
शिकावयाच्या पुस्तकांत कवितांचा प्रवेश झाला
या सुधारलेल्या शिक्षण पद्धतीमुळें शाळांतील
मुलांसही कवितांची गोडी लागत चालली.
शाळेंत मुलांस कविता शिकवाव्या असा
सरकारचा हुकूम असल्यावरून मास्तरलोक
मुलांस कविता शिकवितात. परंतु अर्थ सांग
तांना चुकतात असें बहुत ठिकाणी घडते
तरी हा मास्तर लोकांस दोष लावितां येत
नाहीं. कवितांचा एक कायम अर्थ लिहिले
ला कोठे नाही यामुळें एकाचा अर्थ एका
स मिळत नाहीं. युनिवार्सिटींत विद्यार्थ्यांची
परीक्षा घेतात तेथेही मराठीकवितांचे अर्थ वि
चारतात. तेव्हां तेथेंही अर्थ सांगण्यांत फरक पडतो
आलीकडे एकहजार व दोनहजार रुपयांची
बक्षिसें नेमून साहेबलोकांनी मराठीकवितांची
परीक्षा घ्यावी असे प्रसिद्ध केलें आहे. यावरून
साहेबलोक मराठीकवितांचा अभ्यास करतील

परशुरामपंतांचें बाळबोध हस्ताक्षर

परशुरामपंत गोडबोले



# परशुराम बल्लाळ गोडबोले

## ( चरित्र आणि वाङ्मय )

'नवनीत'कर्ते परशुरामतात्या गोडबोले यांचा जन्म वाई (जि. सातारा) येथें इ. स. १७९९ सालीं झाला. गोडबोल्यांचें घराणें वास्तविक मूळ कोकणांतलें; पण तात्यांचे पणजोबा बळवंतराव हे केव्हांतरी रत्नागिरी जिल्ह्यांतील पावसगोळप हें आपलें मूळ गांव सोडून रास्त्यांच्या कारकीर्दींत वाई येथें जाऊन तेथें स्थायिक झाले. या बळवंतरावांचे चिरंजीव परशुरामपंत, आणि त्यांचे चिरंजीव बळवंत ऊर्फ बल्लाळ. 'नवनीत'कार परशुरामपंत हे यांचे पुत्र होत.* तात्यांचें शिक्षण वाई येथेंच झालें. नारायणशास्त्री देव यांजपाशीं त्यांनीं संस्कृत भाषेचा अभ्यास केला. मराठी काव्याची जी त्यांना गोडी लागली ती मात्र त्यांचे बंधु दाजिबा यांच्यामुळें, असें म्हणतात.

परशुरामतात्या यांचे जोग नांवाचे एक मामा पुण्यास राहात असत. त्यांची तेथें पेढी होती. आपलें शिक्षण वाईस पुरें केल्यावर तात्या पुण्यास येऊन त्या पेढीवर कारकून म्हणून नोकरीस राहिले. पुढें मुंबईच्या शिक्षा-मंडळीनें ज्यावेळीं 'महाराष्ट्र भाषेचा कोश' तयार करावयास घेतला, त्यावेळीं सहा पंडितांची या कामावर योजना झाली. त्यांपैकीं एक परशुरामतात्या गोडबोले होते. या कोशाचे दोन भाग १८२९ मध्यें व पुरवणी १८३१ सालीं प्रसिद्ध झाली. या तिन्ही भागांच्या मुखपृष्ठांवर तात्यांचें नांव (सहांपैकीं एक) कर्ते म्हणून आढळतें. मुंबईला असतांना मोल्स्वर्थचा मराठी इंग्रजी

---

* 'नामार्थदीपिका' व 'नवनीत भाग २' या आपल्या ग्रंथांतील स्वरचित कवितांमध्यें परशुरामपंतांनीं 'नारायणसुत' असा स्वतःचा नामोल्लेख केला आहे. 'नारायण' हें कदाचित तात्यांच्या वडिलांचें नक्षत्रनाम असावें. कारण प्रा. केरूनाना छत्र्यांचे चिरंजीव नीळकंठ हे आपलें नांव 'नीळकंठ विनायक छत्रे' लिहीत, असें केरूनानांच्या टिपणवहीवरून दिसतें. 'विनायक' हें केरूनानांचें नक्षत्रनाम होतें. (मराठी संशोधन पत्रिका, मुंबई वर्ष ५ अंक १, ऑक्टो० १९५७ पहा.) दुसराही एक तर्क संभवतो :— ज्याप्रमाणें आपले गुरु निवृत्तिनाथ यांसंबंधींचा आदर श्रीज्ञानदेवांनीं 'श्रीनिवृत्तिनाथसुतें। केलें ज्ञानदेवें गीते। देशीकारलेणें ॥' या शब्दांनीं ज्ञानेश्वरीच्या शेवटीं व्यक्त केला आहे, त्याप्रमाणें परशुरामतात्यांनींही आपले गुरु नारायणशास्त्री देव यांच्याविषयींची आपली पूज्यबुद्धि 'नारायणसुत' या अभिधानानें नमूद करून ठेविली असावी.

कोश (१८३१) व डॉ. स्टीव्हन्सनचें मराठी ग्रामर यांच्या बाबतींत परशुरामपंतांचें त्यांना साहाय्य होतें, असें मेजर कँडींनीं लिहून ठेविलें आहे. पुणें येथील सरकारी इंग्रजी शाळेचे हेडमास्तर मि. ईस्डेल यांनाही परशुरामपंतांचा उपयोग झाला असें कँडी लिहितात. (D.P.I. *Board of Education, Institution* 1842, p. 386). स्वत: कँडीनाही त्यांच्या इंग्रजी-मराठी कोशाच्या कार्यांत परशुरामपंतांची मदत झाली असली पाहिजे.

कॅ. जर्विस यांच्या हाताखालीं मुंबईच्या नेटिव एज्युकेशन सोसायटीमध्यें तीन वर्षें काम केल्यावर, दोन वर्षें पुण्याच्या कलेक्टरच्या कचेरींत कारकून म्हणून परशुरामपंत राहिले. पुढें पुणें पाठशाळेच्या छापखान्यामध्यें सुपरिंटेंडेंट म्हणून आठ वर्षें चार महिने त्यांनीं काम केलें. (D. P. I. *Government,* 1856, pp. 490-491). ‘नवीन लघु हितोपदेश’ (१८४९), ‘सरळरेघ त्रिकोणमिति’ (१८४९), ‘मराठ्यांची बखर’ (पूर्वार्ध, १८४६ ची द्वितीय आवृत्ति) अशा या पाठशाळेंत छापलेल्या कांहीं पुस्तकांवर मुद्रक म्हणून परशुरामपंतांचें नांव आढळतें. स्वत: तात्यांचें ‘नवनीत’ याच शिळा-छापखान्यांत पुढें १८५४ सालीं मुद्रित झालें; परंतु त्यावेळीं ते तिकडे नव्हते. पुणें पाठशाळेचे मुख्य मे. कँडी यांच्याकडे मराठी ट्रान्स्लेटर व रेफरी हें काम १८४७ मध्यें आल्यावर परशुरामपंतांना त्यांनीं आपले पंडित म्हणून ता. २९ नवंबर १८४७ पासून नेमून घेतलें. (D.P.I., *Poona College.* Vol. 8, 1855). या ठिकाणीं तात्या आयुष्याच्या अखेरपर्यंत होते, असें दिसतें. कारण पंचावन्नाव्या वर्षीं सेवानिवृत्त झालेंच पाहिजे, असा आजच्यासारखा त्या काळीं कडक निर्बंध नसावा. कँडींचा जन्म १८०४ सालीं झाला व ते मराठी ट्रान्स्लेटर या जागीं १८७६ पर्यंत (म्हणजे तात्यांचें निधन झाल्यावर पुढें दोन वर्षें) होते.

मे. कँडींचे मदतनीस पंडित म्हणून काम करीत असतांनाच तात्यांनीं मराठी भाषेची निरनिराळ्या प्रकारें सेवा केली. जुन्या मराठी कवितेचा त्यांचा व्यासंग प्रगाढ होता. एक रसिक व मार्मिक पंडित म्हणून त्यांचा सर्वत्र लौकिक असे. मोरोपंतासारख्या कवीच्या एकाद्या कठीण स्थळाचा अर्थ नीट लागला नाहीं, म्हणजे कृष्णशास्त्री चिपळुणकरांसारखे पंडितदेखील त्यांच्याकडे धांव घेत, असें नमूद आहे. सर्वसंग्रहकार माधव चंद्रोबा डुकले

यांनीं जुन्या मराठी काव्यसंपादनाचा व प्रकाशनाचा जो प्रचंड उद्योग चालविला होता त्यांत तात्यांचें त्यांना मोठें साहाय्य होतें व तें माधव चंद्रोबांनीं आपण प्रकाशित केलेल्या ग्रंथांच्या मुखपृष्ठांवर वेळोवेळीं कृतज्ञतापूर्वक नमूद करून ठेविलेंही आहे. तात्या स्वतः चांगले मराठी कवि होते. जुन्या मराठी क्रमिक पुस्तकांतील नव्या कविता बहुतेक सर्व तात्यांच्या होत्या. गंगामाहात्म्य ( अप्रसिद्ध ), बालबोधामृत असे कांहीं पद्य ग्रंथ त्यांनीं रचिले आहेत. अनेक संस्कृत नाटकांचीं त्यांनीं गद्यपद्यात्मक भाषांतरें केलीं. बाळशास्त्री देव टोंकेकर यांनीं १८६६ सालीं कादंबरीचें मराठी भाषांतर केलें होतें त्याचें सार तात्यांनीं काढलें. त्याचा पूर्वार्ध प्रसिद्ध झाला; तथापि उत्तरार्ध कांहीं कारणानें अप्रकाशितच राहिला. ही गोष्ट माहीत नसल्यामुळें सीताराम बाबाजी गुर्जर यांनीं कादंबरीच्या उत्तरार्धाचें भाषांतर करून पुढें १८८४ सालीं प्रसिद्धीला आणिलें. 'नवनीता' वरून तात्यांची रसिकता ज्याप्रमाणें दिसून येते त्याप्रमाणें 'केकादर्शा'वरून त्यांची टीकाकार म्हणूनही योग्यता कळते. छंदःशास्त्रावरील 'वृत्तदर्पण' हा त्यांचा लहानसा ग्रंथ सुप्रसिद्धच आहे. रा. धों. बर्वे यांचें चंद्रहास्य नाटक (१८६४), रामचंद्रशास्त्री तळेकर यांचें नैषध सर्ग १ (१८६९), अशीं कांहीं पुस्तकें त्यांनीं सुधारून दिलीं.

नांवाप्रमाणें तात्या अत्यंत गोड स्वभावाचे व मनमिळाऊ होते. त्यामुळें सर्वांना ते प्रिय झाले. श्रावण वद्य अष्टमी ( गोकुळाष्टमी ) शके १७९६ या दिवशीं, म्हणजे ता. ३ सप्टेंबर १८७४ गुरुवार रोजीं, पुणें येथें त्यांनीं आपली इहलोकची यात्रा संपविली.

---

## परशुरामपंत गोडबोल्यांचे मराठी ग्रंथ

### मुद्रित

१. **महाराष्ट्र-भाषेचा कोश**, भा० १–२ (सहांपैकीं एक कर्ते), मुंबई १८२९.
   ,, पुरवणी, ,, १८३१.

२. **नवनीत** (प्राकृत कवितांचे वेंचे), पुणें १८५४.
   (या ग्रंथाच्या तात्यांच्या हयातींत आठ व प्रस्तुत आवृत्ति धरून एकंदर अठरा आवृत्त्या निघाल्या).

३. **वेणीसंहार** (मराठी भाषांतर), पुणें १८५७.
   (पुढील आवृत्त्या १८६१, १८८१, १९२३).

४. **उत्तररामचरित्र** (मराठी भाषांतर), मुंबई १८५९.
   (पुढील आवृत्त्या १८८१, १९२६).

५. **वृत्तदर्पण**, पुणें १८६०.
   (तात्यांच्या हयातींत १८७४ ची सहावी (शिळाछाप) आवृत्ति निघाली; चालू १९५० च्या आवृत्तिवर ती २९ वी म्हणून नमूद आहे).

६. **शाकुंतल** (मराठी भाषांतर), पुणें १८६१.
   (पुढील आवृत्ति १८९०).

७. **मृच्छकटिक** (मराठी भाषांतर), मुंबई १८६२.
   (पुढील आवृत्त्या १८८१, १९३५).

८. **कवितासारसंग्रह** (नवनीत भाग २), पुणें १८६३.

९. **पंचांगदर्शन किंवा पंचांग समजण्याची रीत**, पुणें १८६४.

१०. **मराठ्यांच्या इतिहासावर लहान मुलांकरितां सोपी कविता**, पुणें १८६४.

११. **नागानंद** ( मराठी भाषांतर ), मुंबई १८६५.
( याची मूळ संस्कृतासह प्रतही त्याच वर्षी छापिली होती).

१२. **संक्षिप्त भूगोलवर्णन**, मुंबई १८६५.
( चौथी आवृत्ति १८६९).

१३. **नामार्थदीपिका** ( विष्णुसहस्रनामावर आर्याबद्ध टीका ), मुंबई १८६६.

१४. **केकादर्श** ( मयूरकविकृत केकावलीवर गद्य टीका ), मुंबई १८६७.
( पुढील आवृत्त्या १८७३, १८८२, १९१७).

१५. **कादंबरीसार** ( पूर्वार्ध ), मुंबई १८७२.

१६. **पार्वतीपरिणय नाटक** ( संस्कृत मूळासह मराठी भाषांतर), मुंबई १८७२.

१७. **बालबोधामृत** ( कविता ), पुणें १८७४.

१८. **श्रीमच्छंकराचार्यकृत श्रीपांडुरंगस्तोत्राची टीका** ( मूळ संस्कृतासह मराठी गद्यात्मक टीका ), मुंबई १८७५.

## अप्रकाशित

१. **गंगामाहात्म्य**–समाप्तिकाल ता. १४ नवंबर १८७०.

२. **कादंबरीसार**–( उत्तरार्ध ). समाप्तिकाल १८७२.

## संस्कृत मुद्रित ग्रंथ

१. संस्कृत पाठावलि ( संस्कृत भाषेचें प्रथम पुस्तक ), १८५४.

२. संस्कृत पाठावलि, भाग २, १८६३.

३. संस्कृत पाठावलिप्रकाश, १८६४.

---

## अनुक्रमणिका

---

### १ मुकुंदराज



### २ ज्ञानदेव



### ३ नामदेव



### ४ कवि नरेंद्र



### ५ भास्करभट्ट बोरीकर



### ६ पंडित दामोदर

## ७ विष्णुदास नामा



## ८ एकनाथ



## ९ शेख महमद



## १० दासोपंत



## ११ 'क्रिस्तदास' तोमास स्टिफन्स



## १२ तुकाराम



## १३ वामनपंडित

## १७ रघुनाथपंडित



## १८ शाहीर तुळशीदास



## १९ सामराज



## २० श्रीधर



## २१ अमृतराय



## २२ महीपति



## २३ मोरोपंत

# नवनीत

## मुकुंदराज

परंपरागत समजाप्रमाणें मुकुंदराज हा आद्य मराठी कवि मानला जातो. म्हणूनच जुन्या नवनीतांत त्याला प्रथम स्थान देण्यांत आलें होतें. पण या कवीचा काळ व स्थळ या दोनही बाबतींत विद्वानांमध्यें एकवाक्यता नाहीं. मुकुंदराजानें आपल्या 'विवेकसिंधू'त वर्णिलेली बाणगंगातीरावरील अंबानगरी म्हणजे नागपूर प्रांतांतील भंडाऱ्याजवळील वैनगंगेच्या कांठचें अंभोर हें गांव असें कांहीं लोक समजतात; तर कांहीं लोक आंबेजोगाई (मोमिनाबाद-हैद्राबाद) मानतात. 'विवेकसिंधू'च्या कांहीं हस्तलिखित प्रतींत 'शके अकरा दाहोत्तरु' असा काळ नमूद आहे, तर पुष्कळ प्रतींत अशी कालनिदर्शक ओवी मुळींच नाहीं. 'विवेकसिंधू'च्या उपलब्ध मुद्रित प्रतींची भाषा अलीकडील वाटते; त्यामुळें हा कवि ज्ञानदेवाच्या नंतरचा असावा, असें पुष्कळ लोक म्हणतात. तर राजवाडे लिहितात, "विवेकसिंधूची एक पोथी—सुमारें ३०० वर्षांची जुनी—तंजावरच्या सरस्वतीमहालांत आहे. तिची भाषा मजजवळील मुकुंदराजाच्या ज्ञानेश्वरीच्या पोथींतल्यासारखी आहे. जोगाईच्या आंब्यास जी जुनी पोथी आहे ती तर शिष्यमंडळीस वाचतांही येत नाहीं. ह्यावरून असें अनुमान करतां येतें कीं, ज्ञानेश्वरीच्या सुमारास—किंचित् अगोदर—'विवेकसिंधु' लिहिला गेला असावा." (ग्रंथमाला). हा कवि नाथपंथी होता. 'विवेकसिंधू'च्या संस्कृत हस्तलिखित प्रतीही अलीकडे सांपडल्या आहेत. मुकुंदराजाच्या नांवावर 'विवेकसिंधू' खेरीज, 'परमामृत', 'पवनविजय', 'मूलस्तंभ' वगैरे ग्रंथ सांपडतात; पण त्यांचा कर्ता 'विवेकसिंधु'कार मुकुंदराजच आहे कीं काय, याविषयीं शंका आहे. 'विवेकसिंधू'च्या पुष्कळ मुद्रित आवृत्त्या निघाल्या असल्या तरी त्याची संशोधित शुद्ध प्रत अद्याप निघालेली नव्हती; पण अशा प्रकारचा एक प्रयत्न रा. गोपाळ रावजी गोगटे यांनीं अलीकडे (शके १८७४) केला आहे.

विशेष माहितीकरितां पहा :—महाराष्ट्र सारस्वत (भा. १)—वि. ल. भावे, पुरवणी—शं. गो. तुळपुळे; मराठी वाङ्मयाचा इतिहास (खं. १)—ल. रा. पांगारकर; मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास—बा. अ. भिडे.

---

## विवेकसिंधु

### परब्रह्माचें स्वरूप

ओव्या

जें शक्तिचक्राशीं[१] वेगळ[२] । जें ज्ञप्तिचिन्मात्र[३] केवळ । तें निजानंद निर्मळ । परब्रह्म ॥ १ ॥ दृश्य द्रष्टा दर्शन । हे त्रिपुटी[४] जेथें क्षीण । तें परब्रह्म जाण । अनिर्देश्य[५] ॥ २ ॥ ज्ञाता ज्ञान ज्ञेय । जेथ नाहीं हें त्रितय[६] । तें परब्रह्म अप्रमेय[७] । जाणावें पैं ॥ ३ ॥ ज्ञान ह्मणों तरी नाहीं जाणीव[८] । अज्ञान ह्मणों तरी नाहीं नेणीव[९] । अभाव[१०] ह्मणों तरी ठेव । नवल-आनंदाची ॥ ४ ॥ अभाव ह्मणजे शून्य । शून्यवादीयांचें मत जघन्य[११] । ह्मणऊनि जगीं तेचि धन्य । जे परब्रह्मविद्या ॥ ५ ॥ आहे ह्मणों तरी कैसेनि घ्यावें । नाहीं ह्मणों तरी कैसेनि सांडावें । असो हें ब्रह्म भावें अनुभवावें । ज्याचें तेणेंची ॥ ६ ॥ जें निद्रिस्तातें चेववी[१२] । जें चेवलियातें जागवी । जागलियातें भोगवी । परी अक्रिय[१३] तें ॥ ७ ॥ जैसें स्फटिकशिळेचें पोट । जें निरंतर वर्ते निघोट[१४] । तैसें चैतन्य[१५] एकदाट । जाणावें परब्रह्म ॥ ८ ॥ नातरी गगना ऐसें पोकळ । व्यापक[१६] परी व्याप्यासीं[१७] वेगळ । निजप्रकाशें सोज्वळ । आपणा आपेंची ॥ ९ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वरू । हेही शीणती करितां सृष्ट्यादि व्यापारू । मग सेविती विश्राममंदिरू । परब्रह्म तें ॥ १० ॥ जेथ विद्या[१८] ना अविद्या[१९] । जें अनुपम्य स्वयंवेद्य[२०] । तें जाणावें सुखसंवेद्य । परब्रह्मस्वरूप ॥ ११ ॥ जाला जरी सर्वेश्वरू । धरिला जरी जाणिवेचा अहंकारू । तरि तोही नेणे पारू[२१] । त्या स्वरूपाचा ॥ १२ ॥ ह्मणऊनि

---

१ मायोपाधीहून. २ भिन्न. ३ ज्ञानस्वरूप. ४ क्रिया, कर्ता आणि कर्म. ५ अमुक ह्मणून सांगतां येत नाहीं असें. ६ तीन पदार्थांचा समुदाय. ७ जाणावयास कठीण असें. ८ ज्ञान. ९ अज्ञान. १० नसतेपणा. ११ नीच, कनिष्ठ. १२ सचेतन करी. १३ क्रियाशून्य. १४ परिपूर्ण, एकरूप. १५ आत्मस्वरूप. १६ सर्वगत. १७ एकदेशस्थिताशीं. १८ ज्ञान. १९ अज्ञान. २० स्वानुभवानें जाणावयाचें असें. २१ अंत.

अहंकार गळे । कल्पना ते पहिलीच मावळे । तरीच ब्रह्म आकळे[१] । स्वानुभवाशीं ॥ १३ ॥ ब्रह्मांडगोळ सहस्र । व्यापोनि सबाह्यअभ्यंतर । असे उरलें निरंतर । परब्रह्मस्वरूप तें ॥ १४ ॥ गगनीं नाथिलें[२] आभाळ । तैसें ब्रह्मीं मायापडळ[३] । तें विरालिया केवळ । ब्रह्मचि असे ॥ १५ ॥ जें ध्यानावीण ध्याइजे । जें चित्तावीण चिंतिजे । जें जाणिवेवीण जाणिजे । परब्रह्म तें ॥ १६ ॥ जें परब्रह्म निर्गुण । सर्वेश्वराचें निजरूप जाण । मूळमायेचें अधिष्ठान । पूर्ण चैतन्य जें ॥ १७ ॥ मायाब्रह्मींचा विवर्त[४] । ऐसा बोले वेदांतसिद्धांत । जो उपनिषदांचा मथितार्थ[५] । प्रमाणसिद्ध ॥ १८ ॥ ब्रह्म निर्विकार जैसें तैसें । तें असतांचि सदा असे । तेथें अन्यथा भास भासे । तो तद्विवर्त गा ॥ १९ ॥ नातरी जैसा दोरू । न मोडे तेथचा आकारू । नाथिलाचि आभास थोरू । सर्प जैसा ॥ २० ॥ तैसें ब्रह्म उपमारहित । तेथें कायसा दृष्टांत । परी एकदेशीं होय उचित । बुझावया[६] उद्देशें ॥ २१ ॥ सृष्ट्यादि व्यापार । जो करीतसे सर्वेश्वर । तोही मायेचा बडिवार[७] । ऐसा जाणिजे ॥ २२ ॥ हे असंभाविनी[८] माया । अनिर्वचनीय शिष्यराया । ह्मणऊनि मिथ्याचि गा परि वायां । आभासत असे ॥ २३ ॥ अहो ब्रह्म आपाणियातें । मी ब्रह्म ऐसें न ह्मणतें । तरी ब्रह्मींचें काय उणें होतें । ब्रह्मपणासी ॥ २४ ॥ ह्मणऊनि मिथ्या भूतमाया । आणि विश्व हें मायामय । तरी ब्रह्म तें अद्वय । कां न ह्मणावें ॥ २५ ॥ जें मिथ्या तें काय असे । जरी साचासारिखें आभासे । गगनीं गंधर्वनगर जैसें । नाथिलेंचि गा ॥ २६ ॥ तें परब्रह्मीं अधिष्ठिली । तियें प्रकृतिपुरुषें बोलिलीं । ऐसी माया उठली । सांख्यमतें ॥ २७ ॥ हे माया मूळप्रकृती । परमपुरुषाची निजशक्ती । तियेशीं तयाची संगती । तें ऐक पां ॥ २८ ॥ घट जो जो निपजे । तो तो आधींच गगनें व्यापिजे । तैसें जें जें तत्त्व उपजे । तें व्यापिजे चैतन्यें ॥ २९ ॥ नातरी उठलिया तरंगातें । जळ आधींच व्यापोनि वर्ते । तैसें पूर्वीं मायेतें । व्यापिजे परब्रह्में ॥ ३० ॥ जेणें मायेतें व्यापिलें । तें सगुणब्रह्म बोलिलें । येर जैसें तैसें उरलें । केवळ ब्रह्म पैं ॥ ३१ ॥ जेणें माया अधिष्ठिजे[९] । तें ब्रह्म मायोपाधि बोलिजे । मायाशबळ[१०] ऐसें ह्मणिजे । तयातेंचि ॥ ३२ ॥ जें ब्रह्म सगुण । तोचि परमात्मा जाण । परमपुरुष ऐसी खूण । तेथेंचि बोलिजे ॥ ३३ ॥ जो सर्वात्मा सर्वसाक्षी । सर्वेश्वर सर्वकुक्षी । जो कांहींच

---

१ समजे. २ नाहीं तें. ३ मायेचें आवरण. ४ अन्यथाभास. ५ आशय. ६ जाणावया. ७ थोरवी. ८ संभव नाहीं अशी, अतर्क्य. ९ आक्रमिली जाते. १० मायेनें मिश्रित.

नुपेक्षी । निजभक्तां ॥ ३४ ॥ जो देव अनादी लाघवी । नाहीं तो ब्रह्मगोळ दाखवी । गेलें ह्मणऊनि लपवी । जेथिचें तेथेंचि ॥ ३५ ॥ जयाशी कानावीण ऐकणें । हातांवीण देणेंघेणें । जिव्हेवीण चाखणें । सर्व-रसांतें ॥ ३६ ॥ पायांवीण सर्वत्र हिंडणें । चक्षूवीण वस्तु देखणें ॥ जेणें जीवांशी उद्धरणें । इच्छामात्रें ॥ ३७ ॥ जो जवळीच परी अतिदूरी । दूरस्थ परी जिवाभीतरी । ज्याचिया निज सत्ताव्यापारीं । चेष्टवी इंद्रिय-ग्राम ॥ ३८ ॥ प्रतिबिंबीं आभासक । जैसा का तरणि[1] सर्वत्र एक । तैसा सर्वजीवांशीं प्रकाशक । परमात्मा तोचि ॥ ३९ ॥ तो शुद्ध तत्पदार्थु[2] । ज्ञानविग्रह अमूर्तु । सर्वव्यापक परी मूर्तिमंतु । भक्तांकारणें ॥ ४० ॥ नट नाट्यें शिणतां । आपणयाशी न भुले सर्वथा । तैसा अवतार धरितां । न भुले स्वस्वरूपातें ॥ ४१ ॥ सगुणरूप कीर[3] मायिक । ऐसें जाणोनि भजती तें कौतुक । न भजती ते हीनविवेक । पुढें जाणावें ॥ ४२ ॥ सोंग संपादितां चोख्खाळपणें[4] । नटाशिं दीजे अलंकरणें । सोंग लटकें परि भूषणें । नटासीचि अर्पिती ॥ ४३ ॥ तैसें मायिक कीर अवतरण[5] । तेथें किजे भजन । तें होय कीं अर्पण । जगदीश्वरीं ॥ ४४ ॥ ह्मणऊनि सर्वेश्वराचें भजन । कधींचि नव्हे अप्रमाण । जें भक्तासी कैवल्यसाधन[6] । ज्ञान-द्वारें ॥ ४५ ॥

—अध्याय २-३.

---

१ सूर्य. २ ब्रह्मज्ञापक. ३ निश्चयेंकरून. ४ चांगल्या प्रकारें. ५ अवतार. ६ मोक्षाचें साधन.

# ज्ञानदेव

ह्याचा जन्म शके ११९७ श्रावण वद्य ८ स* आळंदी येथें झाला. आपेगांव हेंच त्याचें जन्मस्थान असेंही पुष्कळांचें मत आहे. ह्याच्या आईचें नांव रखमाबाई व बापाचें नांव विठ्ठलपंत. विठ्ठलपंत हा पैठणाजवळील आपेगांवच्या गोविंदपंत नांवाच्या कुळकर्ण्याचा मुलगा, व रखमाबाई ही आळंदी येथील सिद्धोपंत कुळकर्ण्याची मुलगी. विठ्ठलपंतानें काशींतील रामानंदस्वामींकडून संन्यास घेतला होता; पण पुढें रखमाबाईच्या विनवणी-वरून त्याच स्वामींनीं विठ्ठलपंताकडून पुनः गृहस्थाश्रम घेवविला. विठ्ठलपंत आळंदीस आपल्या सासुरवाडीसच राहात असे. तेथें त्यास निवृत्तिनाथ, ज्ञानदेव (ज्ञानेश्वर), सोपानदेव व मुक्ताबाई अशीं चार मुलें झालीं. तीं सर्व बाळपणापासूनच विरक्त, विठ्ठलभक्त व ज्ञानी अशीं होतीं. ही संन्याशाची संतति म्हणून ब्राह्मणांनीं त्या तिघां मुलांच्या मुंजी न करितां त्या सर्वांस वाळींत टाकिलें होतें. पुढें ज्ञानेश्वरानें पैठणास कांहीं अद्भुत चमत्कार केल्यामुळें तेथील ब्राह्मणांनीं हीं मुलें सामान्य नव्हेत, देवांश आहेत, असें समजून त्यांस शुद्धिपत्र दिलें व त्यांची क्षमा मागितली.

ज्ञानेश्वराचे ज्ञानेश्वरी† व अमृतानुभव असे मुख्यत्वें ओवीबद्ध ग्रंथ आहेत. याखेरीज स्वात्मानुभव, चांगदेवपासष्टी, भक्तराज, योगवासिष्ठ वगैरे कांहीं

---

* ज्ञानेश्वरांचा हा जन्मशक खरा धरून चालल्यास ज्ञानेश्वरी शके १२१२ त म्हणजे वयाच्या पंधराव्या वर्षी त्यांनीं समाप्त केली असें मानावें लागेल. ज्ञानेश्वर किंवा त्यांचीं भावंडें यांच्या जन्मांच्या वर दिलेल्या कालापेक्षां जनीच्या नांवावर असलेल्या एका अभंगांत दिलेले काल जास्त ग्राह्य वाटतातः—शालिवाहन शके अक्राशें नव्वद । निवृत्ति आनंद प्रगटले ॥१॥ त्र्याण्णवाच्या सालीं ज्ञानेश्वर प्रगटले । सोपान देखिले शाण्णवांत ॥२॥ नव्याण्णवाच्या सालीं मुक्ताई देखिली । जनी म्हणे केली मात त्यांनीं ॥ ३ ॥

† या ग्रंथाचें नांव 'भावार्थदीपिका' असेंही आहे. ज्ञानेश्वरी हें नांव तिच्या कर्त्यावरून पडलें आहे. ज्ञानेश्वरी ही श्रीमद्भगवद्गीतेवर टीका आहे. अध्यात्म विषयाची ज्यांस गोडी आहे अशा लोकांत ह्या ग्रंथाची योग्यता फार आहे. वारकरी पंथाचे लोकांत ह्यास फार मान आहे. शिवाय मराठी भाषेच्या इतिहासाच्या दृष्टीनेंही हा ग्रंथ महत्त्वाचा आहे; कारण प्राकृतांतील मूळ रूपें व कांहीं अपभ्रष्ट झालेलीं रूपें ह्यांत आहेत. एकनाथानें हा ग्रंथ शुद्ध केला; म्हणजे निरनिराळीं पाठांतरें पाहून ज्ञानेश्वराचें हृद्गत कोणतें तें ठरवून शुद्ध केला. (श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारण नाम संवत्सरीं । एकाजनार्दनें अत्यादरीं । गीता-ज्ञानेश्वरी प्रति शुद्ध केली ॥ १ ॥ ग्रंथ पूर्वीच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्ध ज्ञानेश्वरी ॥ २ ॥). हा ग्रंथ शके १२१२ ह्या वर्षी लिहून पूर्ण झाला असा उल्लेख त्या ग्रंथाचे शेवटीं पुढील ओवींत आहे—शके बारा शतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबावा आदरें । लेखकु जाहला ॥.

प्रकरणें ज्ञानेश्वराचीं मानलीं जातात; परंतु विद्वानांमध्यें यासंबंधीं एकवाक्यता नाहीं. भक्तिपर, वैराग्यपर व ज्ञानपर असे ज्ञानेश्वराचे बहुत उत्कृष्ट अभंग प्रसिद्ध आहेत; परंतु हे अभंग लिहिणारा ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरीच्या कर्त्याहून निराळा, असेंही जुनें एक मत आहे. ह्याची वाणी सुरस असून उपमा, रूपकें व दृष्टांत इत्यादि अलंकारांनीं अशी परिपूर्ण आहे कीं, वर्ण्य अर्थ जसा कांहीं वाचकाच्या डोळ्यांसमोर प्रत्यक्ष उभा राहतो, व त्याचें प्रतिपाद्य विषयाशीं तादात्म्य होतें. हा कवि आळंदी येथें शके १२१८ कार्तिक वद्य ८ स समाधिस्थ झाला.*

निर्वृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताबाई ह्यांचें जन्मस्थान, जन्मशक व दिवस आणि हे समाधिस्थ झाल्याचीं स्थानें, मरणशक* व दिवस नवनीताच्या मागच्या आवृत्तींत खालीं लिहिल्याप्रमाणें दिले आहेत :—

| कवीचें नांव. | | जन्मशक व दिवस. | | जन्मस्थान. |
|---|---|---|---|---|
| निवृत्तिनाथ | ... | शके ११९९ माघ वद्य १ | ... | आळंदी. |
| सोपानदेव | ... | शके ११९९ कार्तिक शुद्ध १५ | ... | ,, |
| मुक्ताबाई | ... | शके १२०१ आश्विन शुद्ध १ | ... | ,, |

| कवीचें नांव. | | मरणशक व दिवस. | | समाधिस्थान. |
|---|---|---|---|---|
| निवृत्तिनाथ | ... | शके १२२० पौष वद्य ११ | ... | त्र्यंबकेश्वर. |
| सोपानदेव | ... | शके १२१९ वैशाख शुद्ध ११ | ... | सासवड. |
| मुक्ताबाई | ... | शके १२२० वैशाख वद्य ११ | ... | तापीनदीच्या कांठीं (मेहूण). |

ज्ञानेश्वरीची भाषेच्या दृष्टीनें जुन्यांतील जुनी एकनाथपूर्व प्रत वि. का. राजवाडे यांनीं संपादिलेली ज्ञानेश्वरी (श. १८३१) असून अनेक हस्तलिखितें मिळवून संशोधित अशी रामचंद्र विष्णु माडगांवकर यांची ज्ञानदेवी आहे.

* या चार भावंडांच्या समाधिकालांसंबंधींही एकवाक्यता नाहीं. पांगारकर ज्ञानेश्वरांचा समाधिकाल "शके १२१८ कार्तिक वद्य १३ गुरुवार" असा देतात. इतर भावंडांचा समाधिकाल त्यांनीं असा दिला आहे:—निवृत्तिनाथ (श. १२१९ ज्येष्ठ व. १२); सोपानदेव (श. १२१८ मार्गशीर्ष व. १३); मुक्ताबाई (श. १२१९ वैशाख व. १२). भाव्यांनाही हे नवे जन्ममृत्युशक मान्य दिसतात.

रा. ग. हर्षे यांनींही ज्ञानेश्वरीचा पहिला अध्याय शोधपूर्वक प्रसिद्ध केला आहे. (१९४७) याशिवाय कुंटे, आठल्ये, आगाशे, साखरे, भिडे, बंकटस्वामी-दांडेकर, वगैरे विद्वानांनीं संपादिलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रती आहेत.

विशेष माहितीकरितां पहा :—महाराष्ट्र सारस्वत ( भा. १ )—भावे; मराठी वाङ्मयाचा इतिहास ( खं. १ )—पांगारकर; ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान—शं. दा. पेंडसे; ज्ञानदेव व ज्ञानेश्वर—भारद्वाज; ज्ञानदेवांचा कालनिर्णय—श्री. र. भिंगारकर; ज्ञानेश्वरदर्शन ( दोन भाग ).

---

## ज्ञानेश्वरी

### अध्याय १२ वा

#### ओव्या

जो सर्व भूतांचे ठायीं । द्वेषातें नेणेचि कहीं[1] । आप-परु[2] नाहीं । चैतन्या[3] जैसा ॥ १ ॥ उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे । हें कांहींचि नेणिजे । वसुधा जेवीं ॥ २ ॥ कां[4] रायाचें देह चाळूं[5] । रंका परौतें[6] गाळूं[7] । हें न म्हणेचि कृपाळू । प्राण पैं गा ॥ ३ ॥ गाईची तृषा हरूं । व्याघ्रा विष होऊनि मारूं । ऐसें नेणेचि गा करूं । तोय जैसें ॥ ४ ॥ तैसी अवघिया[8] भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री । कृपेसी धात्री[9] । आपण जो ॥ ५ ॥ आणि[10] मी हे भाष[10] नेणे[10] । माझें कांहींचि न म्हणे । सुख दुःख जाणणें । नाहीं जया ॥६॥ वर्षावावीण[11] सागरु । जैसा जळें निर्भरु[12] । तैसा निरुपचारु[13] । संतोषी जो ॥७॥ हें[14] ना[14], तो आवडे । मज जीवाचेनि

---

१ कधीं. २ स्वकीय परकीय. ३ चलनवलनादिक व्यापार जिच्या योगानें चालतात ती जीवनकला ज्याप्रमाणें सर्व जीवांमध्यें सारख्या भावानें राहते त्याप्रमाणें; ( चैतन्या म्ह० चिच्छक्तीला ). ४ अथवा. ५ हालवूं, चालवूं. ६ एकीकडे, दूर. ७ टाकूं. ८ सर्व. ९ पृथ्वी ( आधार ). १० आणखी ज्याला अहंता मुळींच नाहीं; ( भाष म्ह० बोलणें. ) ११ पर्जन्यवृष्टीवांचून. १२ पूर्ण भरलेला. १३ साधनावांचून. १४ इतकेंच नाहीं.

पाडें[१] । हेंही येथ थोकडें[२] । रूप[३] करणें[३] ॥ ८ ॥ व्यापक[४] आणि उदास[५] । जैसें का आकाश । तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥ ९ ॥ संसार-व्यथे फिटला[६] । जो नैराश्यें[७] निवटला[८] । व्याधा हातोनि सुटला । विहंगमु जैसा ॥ १० ॥ जो आत्मलाभासारिखें[९] । गोमटें[१०] कांहींचि न देखे । म्हणोनि भोग-विशेखें[११] । हरिखेना जो ॥ ११ ॥ आपणचि विश्व जाला । तरि भेदभाव सहजचि गेला । ह्मणोनि द्वेष न ठेला । जया पुरुषा ॥ १२ ॥ पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे[१२] । हें जाणोनि गताचें[१३] । न शोची जो ॥ १३ ॥ वोखटें[१४] का गोमटें[१५] । हें कांहींचि तया नुमटे[१६] । रात्रि-दिवस न घटे[१७] । सूर्यासि जेवीं ॥ १४ ॥ ऐसा बोधुचि केवळु । जो होऊनि असे निष्कळु[१८] । त्याहीवरी भजनशीळु । माझिया ठायीं ॥ १५ ॥ तरि तयाऐसें दुसरें । आम्हां पढियंतें[१९] सोयरें[२०] । नाहीं गा साचोकारें[२१] । तुझी आण पांडवा[२२] ॥ १६ ॥ पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची[२३] वार्ता नाहीं ॥ रिपु-मित्रां दोहीं । सरिसा[२४] पाडु[२४] ॥ १७ ॥ कां घरींचिया उजियेड करावा । पारखियां[२५] आंधार पाडावा । हें नेणेचि गा पांडवा । दीप जैसा ॥ १८ ॥ जो खांडावया घाव घाली । का लावणी जेणें केली । दोघां एकचि साउली । वृक्षु जैसा ॥ १९ ॥ नातरी इक्षु-दंडु । पाळितया[२६] गोडु । गाळितया कडु[२७] । नोहेचि जेवीं ॥ २० ॥ अरि-मित्रीं तैसा । अर्जुना जया भाव ऐसा । मानापमानीं सरिसा । होत जाय ॥ २१ ॥ तिहीं ऋतूं[२८] समान । जैसें कां गगन । तैसा एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ २२ ॥ दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पाण्डु-सुता । तैसा सुख-दुःख-प्राप्तां[२९] । मध्यस्थु जो ॥ २३ ॥ माधुर्यें[३०] चंद्रिका । सरिशी राया रंका । तैसा जो सकळिकां । भूतां समु ॥ २४ ॥ अवघिया जगा एक । सेव्य जैसें उदक । तैसे जयातें

---

१ सारखेपणानें, प्रमाणें. २ उणें, थोडकें. ३ दृष्टांत देऊन सांगणें. ४ सर्व भरून राहणारें. ५ निरपेक्ष, अलिप्त. ६ मुकला, सुटला. ७ निराशेनें. ८ टाकला. ९ आत्मज्ञानाच्या प्राप्तीसारखें. १० चांगलें. ११ विशेष प्रकारच्या विषयांच्या उपभोगानें. १२ जात नाहीं. १३ गेलेल्या विषयीं. १४ वाईट. १५ सुंदर, चांगलें. १६ उमटत नाहीं, भासत नाहीं. १७ घडे. १८ एकरूप, कलंकरहित, शुद्ध. १९ आवडतें. २० जिवलग. २१ खरोखर. २२ अर्जुना. २३ भेदबुद्धीची. २४ सारखी योग्यता. २५ परक्यांना. २६ राखणाराला. २७ चरकांत घालून रस काढणाराला. २८ ऋतूंत. २९ सुखदुःखें प्राप्त झालीं असतां. ३० आल्हादकपणानें.

तिन्ही[1] लोक । आकांक्षिती[2] ॥ २५ ॥ जो निंदेतें ने वे । स्तुतीतें न श्लाघे । आकाशा न लगे । लेपु[3] जैसा ॥ २६ ॥ तैसें निंदे आणि स्तुति । मान करूनि एके पांती[4] । विचरे प्राण-वृत्ति[5] । जनीं वनीं ॥ २७ ॥ जो यथा-लाभें तोखे । अ-लाभें न[6] पारुखे[6] । पाऊसेंवीण न सुके । समुद्र जैसा ॥ २८ ॥ आणि वायूसि एके ठायीं । बिढार[7] जैसें नाहीं । तैसा न धरीच कहीं[8] । आश्रय जो ॥ २९ ॥ हें विश्वचि माझें घर । ऐशी मति जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाला ॥ ३० ॥ मग यावरीही पार्था । माझिया भजनीं आस्था । तरी तयातें मी माथां । मुकुट करीं ॥ ३१ ॥

---

## अध्याय १३ वा

### ओव्या

(ह्या ओव्या भगवद्गीतेंतील पुढील श्लोकावर आहेत—

**अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥** —अध्याय १३, ७.)

**अ-मानित्व**[9]—तरि कवणेही[10] विषींचें[10] । साम्य[10] होणें न रुचे[10] । संभावितपणाचें । वोझें जया ॥ १ ॥ आथिलेचि[11] गुण वानितां । मान्यपणें मानितां । योग्यतेचें येतां । रूप अंगा ॥ २ ॥ तैं गजबजों[12] लागे[12] कैसा । व्याधें रुंधला[13] मृगु जैसा । कां बाहीं[14] तरतां[14] वळसां[15] । दाटला[16] जेवीं ॥ ३ ॥ पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे[17] । गरिमेतें[18] अंगाकडे । येवोंचि नेदी ॥ ४ ॥ पूज्यता डोळां न देखावी । स्व-कीर्ति कानीं नायकावी । हा अमुका ऐसी नोहावी[19] । से-चि[20] लोकां ॥ ५ ॥ तेथ सत्काराची कें[21] गोठी । कें[21] आदरा देईल भेटी । मरणेसीं

---

१ शत्रु, मित्र, उदासीन हे तीन किंवा स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ. २ इच्छितात. ३ (कशाचाही) लेप. ४ (पंक्ती) ओळीला. ५ प्राण राहतील अशा प्रकारानें. ६ रुसत नाहीं, दुःखी होत नाहीं. ७ राहणें, वस्ती. ८ कोठें. ९ आपल्या गुणांच्या स्तुतीविषयीं निरिच्छा. १० कोणत्याहि गोष्टींत हा अमुकाच्या बरोबरीचा आहे असें म्हणणें ज्याला आवडत नाहीं. ११ आहेत तेच. १२ घाबरूं लागतो. १३ अडविला. १४ हातांनीं पोहून जात असतां. १५ भोवऱ्यांत. १६ सांपडला. १७ संकटांत पडतो. १८ मोठेपणाला. १९ न व्हावी. २० स्मरणच. २१ कोठची, कसली.

साटी[१] । नमस्कारितां ॥ ६ ॥ वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजि दडे । महिमे भेणें ॥ ७ ॥ चातुर्य लपवी । महत्त्व हारवी । पिसेपण मिरवी । आवडोनी ॥ ८ ॥ लौकिकाचा उद्वेगु[२] । शास्त्रांवरी उबगु[३] । उगेपणीं[४] चांगु । आथी भरू[४] ॥ ९ ॥ जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं सोय[५] न धरावी[५] । ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ॥ १० ॥ माझें असतेपण लोपो । नाम-रूप हारपो । मज झणें वासिपो[६] । भूत-जात[६] ॥ ११ ॥ अ-दंभित्व[७]—तरि अ-दंभित्व ऐसें । लोभियाचें मन जैसें । जिवु जावो परि नुमसे[८] । ठेविला ठावो[९] ॥ १२ ॥ तयापरी किरीटी । पडिलाही प्राण-संकटीं । परि सु-कृत ना प्रकटी । अंगें[१०] बोलें[१०] ॥ १३ ॥ नाना[११] कृषिवळु आपुलें । पांघुरवी[१२] पेरिलें । तैसें झांकी निफजलें । दान-पुण्य ॥ १४ ॥ वरिवरी[१३] देह न पूजी[१३] । लोकांतें न[१४] रंजी[१४] । स्वधर्म वाग्ध्वजीं[१५] । बांधों[१५] नेणे[१५] ॥ १५ ॥ परोपकार न बोले । न मिरवी अभ्यासिलें । न शके विकूं[१६] जोडिलें[१६] । स्फीतीसाठीं[१६] ॥ १६ ॥ आंग-भोगाकडे । पाहतां कृपण आवडे[१७] । येऱ्हवीं धर्म-विषयीं थोडें । बहु न म्हणे ॥ १७ ॥ किंबहुना स्व-धर्मीं थोरु । अवसरीं उदारु । आत्म-चर्चे[१८] चतुरु । येऱ्हवीं वेडा ॥ १८ ॥ पैं गा अ-दंभपण । म्हणितलें तें हें जाण । आतां आईक खूण । अहिंसेची ॥ १९ ॥ अ-हिंसा—तरि अहिंसा बहुतीं परी । बोलिली असे अवधारीं[१९] । आपुलाल्या मतांतरीं । निरूपिली ॥ २० ॥ परि ते ऐसी देखा । जैशा खांडूनियां शाखा । मग तयाचिया बुडुखा[२०] । कुंपु[२१] कीजे ॥ २१ ॥ कां बाहु तोडोनि पचविजे[२२] । मग भुकेची पीडा राखिजे । कीं देऊळ मोडोनि कीजे । पौळि[२३] देवा ॥ २२ ॥ तैसी हिंसाचि करूनि अ-हिंसा । निफजविजे हा ऐसा । पैं पूर्व-मीमांसा[२४] । निर्णयो[२५] केला ॥ २३ ॥

---

१ बरोबरी. २ कंटाळा, भीति. ३ उपेक्षा, कंटाळा. ४ कांहीं न करितां स्वस्थ बसण्यांत ज्याचा भर आहे. ५ संबंध्यांशीं मिळून राहत नाहीं. ६ प्राणिमात्र मला कदाचित् भितील ते न भिवोत. ७ आंत एक व बाहेर एक असें न वागणें--किंवा लोकांकरितांच क्रिया करण्याचा स्वभाव नसणें. ८ उघड करीत नाहीं. ९ ठेव. १० आपण स्वतः बोलून दाखवून. ११ अथवा. १२ आच्छादी, लपवून ठेवी. १३ बाहेरून थाटमाट करीत नाहीं. १४ रंजवीत नाहीं. १५ आपलें सदाचरण आपण बोलून दाखवीत नाहीं. १६ प्रतिष्ठेसाठीं आपण संपादिलेलें खर्चीं घालीत नाहीं. १७ दिसे, वाटे. १८ आत्मज्ञानाच्या वाटाघाटीविषयीं. १९ ऐक. २० बुंध्याला. २१ कुंपण. २२ शिजवावें. २३ आवार. २४ कर्मकांडसंबंधीं शंकांचें ज्यांत निवारण केलें आहे असा जैमिनीनें केलेला ग्रंथ त्यांत. २५ निर्णय.

जे अ-वृष्टीचेनि उपद्रवें। गादलें[१] विश्व आघवें। म्हणोनि पर्जन्येष्टी[२] करावे। नाना याग ॥ २४ ॥ तंव तिये इष्टीचिया बुडीं। पशु-हिंसा रोकडी। मग अ-हिंसेची थडी[३]। कैंची दिसे ॥ २५ ॥ पेरिजे नुसधी[४] हिंसा। तेथ उगवेल काय अ-हिंसा। परि नवल बापा धिंवसा[५]। या याज्ञिकांचा ॥ २६ ॥ आणि आयुर्वेदु[६] आघवा। तो याचि मोहरा[७] पांडवा। जे जीवाकारणें करावा। जीव-घातु ॥ २७ ॥ नाना-रोगें आहाळलीं[८]। लोळतीं भूतें[९] देखिलीं। ते हिंसा निवारावया केली। चिकित्सा[१०] पैं ॥ २८ ॥ तंव ते चिकित्से पहिले[११]। एकाचे कंद खाणविले। आणि एका उपडविलें। स-मूळीं स-पत्रीं ॥ २९ ॥ एकें आडमोडविलीं[१२]। अ-जंगमाची[१३] खाल[१३] काढविली। एकें गर्भिणी[१४] उकडविलीं। पुटामाजी[१५] ॥३०॥ अहो वसतीं[१६] धवळारें[१६]। मोडूनि केलीं देव्हारे। नागऊनि वेव्हारे[१७]। गवादी[१८] घातली ॥ ३१ ॥ मस्तक पांघुरविलें। तंव तळवटीं उघडें पडिलें। घर मोडोनि केले। मांडव पुढें ॥३२॥ नाना पांघरुणें। जाळूनि जैसें तापणें[१९]। कां जालें आंग-धुणें। कुंजराचें ॥ ३३ ॥ नातरि बैल विकूनि गोठा। पुंस[२०] लावोनि[२१] बांधिजे गांठा[२२]। इया करणीं[२३] कीं चेष्टा[२३]। काइ हंसों ॥ ३४ ॥ एकीं धर्माचिया वाहणी[२४]। गाळूं आदरिलें पाणी। तंव गाळितया[२५] आहाळणी[२६]। जीव मेले ॥ ३५ ॥ एक न पचवितीचि कण। इये हिंसेचिये भेणें[२७]। तेथ कदर्थले[२८] प्राण। तेचि हिंसा ॥ ३६ ॥ ऐसी हे अवधारीं। निरूपिती परी। आतां यावरी ॥ मुख्य जें गा ॥ ३७ ॥ तें स्व-मत बोलिजेल। अ-हिंसे रूप कीजेल। जिया[२९] उठलिया[२९] आंतुल[३०]। ज्ञान दिसे ॥ ३८ ॥

---

१ पीडलेलें. २ पाऊस पडावा म्हणून केलेले यज्ञयागादि (पर्जन्य+इष्टि). ३ तड. ४ नुसती. ५ फार इच्छा, उत्साह. ६ वैद्यशास्त्र. ७ मार्गींचा, दिशेकडे. ८ पिडलीं, पोळलीं. ९ प्राणी. १० औषधाची योजना. ११ आरंभीं. १२ तोडून साफ केलीं. १३ वृक्षाची साल. १४ विंचू वगैरे प्राणी सगर्भ असतां तळून त्यांची औषधांत योजना करितात त्यास अनुलक्षून हें लिहिलें आहे. १५ खालीवर झांकण घालून; (पायाला बाकचवडा वगैरे झाला असतां त्यावर गाभण बेडकुळी बांधितात, त्याला अनुलक्षून ही ओवी आहे). १६ राहण्याचीं घरें, मंदिरें. १७ व्यापारी. १८ अन्नसत्र. १९ शेकत बसणें. २० पोपट. २१ हाकून लावून. २२ पिंजरा. २३ ह्या कर्तव्यगोष्टी किंवा थट्टा. २४ संप्रदायाप्रमाणें. २५ गाळण्याच्या वस्त्राच्या. २६ त्रासानें. २७ कणांमध्यें जीवनशक्ती आहे तिचा नाश होईल ह्या भीतीनें. २८ त्रासले. २९ जी अहिंसा उत्पन्न झाली असतां. ३० आंतलें.

परि ते अधिष्ठिलेनि[१] अंगें[१] । जाणिजे आचरतेनि[२] बागें[२] । जैसी कसवटीचि सांगे । वानियातें[३] ॥ ३९ ॥ तैसें ज्ञान-मनाचियें भेटी— । सरिसेंचि अ-हिंसेचें बिंब[४] उठी[४] । तेंचि ऐसें किरीटी । परिस आतां ॥ ४० ॥ तरि तरंगु नोलांडितु[५] । लहरी पाये न फोडितु । सांचलु[६] न मोडतु । पाणियाचा ॥ ४१ ॥ वेगें आणि लेसां[७] । दिठी घालूनि आंविसा[८] । जळीं बकु जैसा । पाउल सुये[९] ॥ ४२ ॥ कां कमळावरी भ्रमर । पाय ठेविती हळुवार[१०] । कुचंबैल[११] केसर । इया शंका ॥ ४३ ॥ तैसें परमाणु[१२] पांगुंतले[१२] । जाणूनि जीव सानुले[१३] । तेथ कारुण्यामाजि पाउलें । लपवूनि[१४] चाले[१४] ॥ ४४ ॥ ते वाट कृपेची करितु । ते दिशाचि स्नेहभरितु । जीवां तळीं आंथरितु । आपुला जीवु ॥ ४५ ॥ ऐसिया जतना । चालणें जया अर्जुना । हें अनिर्वाच्य[१५] परिमाणा[१५] । पुरिजेना[१५] ॥ ४६ ॥ पैं मोहाचेनि[१६] सांगडें । लासी[१७] पिलीं धरी तोंडें । तेथ दांतांचे आगरडे[१८] । लागती जैसे ॥ ४७ ॥ कां स्नेहाळू माये । तान्हयाची वास[१९] पाहे । तिये दिठी[२०] आहे । हळूवार[२०] जें ॥ ४८ ॥ तैसेनि मार्दवें पाय । भूमिवरी न्यसीतू[२१] जाय[२१] । लागती तेथ होय । जीवां सुख ॥ ४९ ॥ ऐसिया लघिमा[२२] चालतां । कृमि कीटक पांडुसुता । देखे, तरि माघौता । हळूचि निघे ॥ ५० ॥ मुंगिये मेरु नोलांडवे । मशका सिंधु न तरवे । तैसें भेटालिया न करवे । अतिक्रम[२३] ॥ ५१ ॥ पुढां स्नेह पाझरे । मागां चालती अक्षरें । शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥ ५२ ॥ तंव बोलणेंचि नाहीं । बोलों म्हणे जरी कांहीं । तरि बोलु कोणाही । खुपैल कां ॥ ५३ ॥ बोलतां अधिकहि निघे । तरि कोणाही वर्मीं न लगे । आणि कवणासि न रिघे । शंका मनीं ॥ ५४ ॥ तैसे साच[२४] आणि मवाळ[२४] । मितलें[२५] आणि रसाळ । शब्द जैसे कल्लोळ ।

---

१ ती अहिंसा अंगीं बाणली असतां. २ आचरणाच्या मार्गानें. ३ कसाला. ४ स्वरूप दिसूं लागतें. ५ न ओलांडतां. ६ स्थिरता. ७ फार जपून. ८ आमिषाकडे. ९ ठेवितो. १० फार हळू. ११ चिरडेल. १२ परमाणूंनीं आच्छादिलेले. १३ अतिशय लहान. १४ फार जपून चालतो. १५ त्याचें ममताळूपणाचें वर्तन बोलून दाखवितां येत नाहीं व तें किती आहे हें मापतां येत नाहीं म्हणजे किती मोठें आहे हें कळत नाहीं. १६ लोभानें, प्रीतीनें. १७ मांजरी. १८ अणकुच्या, अग्रें, टोंकें. १९ वाट. २० तिच्या दृष्टीमध्यें जसें कारुण्य दिसून येतें तसें हें कारुण्य. २१ ठेवीत चालतो. २२ हळूहळू. २३ अनादर, उल्लंघन. २४ सत्य व मृदु. २५ मोजकें, परिमित.

अमृताचे ॥ ९५ ॥ अवयव आणि शरीर । हें वेगळालें काय कीर[1] । कीं रस आणि नीर । सीनानीं[2] आथी ॥ ९६ ॥ म्हणौनि हे जे सर्व । सांगीतले बाह्यभाव[3] । तें मनचि गा सावयव । ऐसें जाण ॥ ९७ ॥ जें बीं भुंई खोविलें[4] । तेंचि वरी रुख[5] जाहलें । तैसें इंद्रिय-द्वारा फांकलें । अंतरचि ॥ ९८ ॥ पैं मानसींचि जरी । अ-हिंसेची अवसरी[6] । तरि कैंची[7] बाहेरी[7] । वोसंडैल[7] ॥ ९९ ॥ वांचूनि[8] मनींचि नाहीं । तें वाचेसि उमटैल काई । बीजेंवीण भूई । अंकुरू असे ॥ ६० ॥ म्हणोनि मनपण जैं मोडे । तैं इंद्रियां आधींचि उबडे[9] । सूत्रधारेंवीण साइखडें[10] । वावो[11] जैसें ॥ ६१ ॥ उगमींचि वाळूनि जाये । तें वोघीं कैचें वाहे । जीवो गेलिया आहे । चेष्टा देहीं ॥ ६२ ॥ तैसें मन हें पांडवा । मूळ यया इंद्रिय-भावा । हेंचि राहटे[12] आघवा । द्वारीं इहीं ॥ ६३ ॥ परि जिये वेळे जैसें । जें होऊनि आंत असे । बाहेरि ये तैसें । व्यापाररूपें ॥ ६४ ॥ यालागीं साचोकारें । मनीं अ-हिंसा थांवे[13] थोरें[13] । जैसी पिकलीं[14] द्रुती[15] आदरें[16] । बोभात[17] निघे ॥ ६५ ॥ तैसें दयाळुत्व आपुलें । मनें हातापायां[18] आणिलें[18] । मग तेथ उपजविलें । अ-हिंसेतें ॥ ६६ ॥ या कारणें किरीटी । इंद्रियांचिया गोठी । मनाचियेचि राहाटी । रूप केलें ॥ ६७ ॥ ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यास[19] दंडाचा[19] । जाला ठायीं जयाचा । देखशील ॥ ६८ ॥ तो जाण वेल्हाळ[20] । ज्ञानाचें वेळाउळ[21] । हें असो निखळ । ज्ञानचि तो[22] ॥ ६९ ॥ क्षांति—म्हणे [23] उन्मेष-सु-लोचना[24] । सावध होईं अर्जुना । करूं तुज ज्ञाना । वोळखी आतां ॥ ७० ॥ तरि ज्ञान गा तें येथें । वोळख तूं निरुतें[25] । आक्रोशेंवीण[26] जेथें । क्षमा असे ॥ ७१ ॥ अगाध सरोवरीं । कमळिणी जियापरी । कां सदैवांचिया[27] घरीं । संपत्ति जैसी ॥ ७२ ॥ पार्था तेणें पाडें । क्षमा जयातें वाढे । तोही[28] लक्षे तें[28] फुडें । लक्षण[28] सांगों ॥ ७३ ॥ तरि पढियंतें लेणें । अंगीं भावें[29] जेणें[29] । धरिजे, तेविं

---

१ निश्चयानें. २ वेगळे वेगळे. ३ बाहेरील वागणुकीचे प्रकार. ४ पेरिलें. ५ वृक्ष, झाड. ६ प्रतिबंध, हरकत ; (पाठा०) अनवसरी. ७ बाहेर कशी येईल. ८ शिवाय. ९ रिकामें, व्यर्थ. १० कळसुत्री बाहुलें. ११ व्यर्थ. १२ व्यापार करितें. १३ पूर्ण स्थिरावते. १४ पिकलेल्या फळांचा वगैरे. १५ सुवास. १६ आपण होऊन. १७ बोभाट करीत. १८ त्यास आकार दिला. १९ त्रिदंडी संन्यास. २० विस्तृत, आवडतें. २१ घर. २२ सर्व. २३ ह्याचा अध्याहृत कर्ता 'कृष्ण'. २४ ज्ञानदृष्टि आहे ज्याला अशा. २५ खरें. २६ दुःखावांचून. २७ भाग्यवानांच्या. २८ अनाक्रोश क्षमायुक्त पुरुष पूर्ण मनांत येईल तें लक्षण स्पष्ट सांगतों. २९ ज्या आवडीनें.

साहणें । सर्वचि जया ॥ ७४ ॥ त्रिविध[1] मुख्य आघवे । उपद्रवांचे[1] मेळावे । वरि पडलिया नव्हे । वांकडा जो ॥ ७५ ॥ अपेक्षित पावे । तैं जेणें तोषें मानवे । अनपेक्षिताहि करवे । तोचि मान ॥ ७६ ॥ जो मानापमानातें साहे । सुख-दुःख जेथ सामाये[2] । निंदा-स्तुती नोहे । दु-खंडु[3] जो ॥ ७७ ॥ उन्हाळेनि जो न तापे । हिमवंती[4] न कांपे । कायसेनिही[5] न[6] वासिपे[6] । पातलेया[7] ॥ ७८ ॥ स्व-शिखरांचा भारु । नेणे जैसा मेरु । कीं धरा यज्ञ-सूकरु[8] । वोझें न म्हणे ॥ ७९ ॥ नाना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे क्षिती । तैसा नाना द्वंद्व-प्राप्तीं[9] । घामेजेना ॥ ८० ॥ घेऊनि जळाचे लोटु । आलिया नदी-नदांचे संघाटु[10] । करी वाड[11] पोटु । समुद्र जेवीं ॥ ८१ ॥ तैसें जयाचिया ठायीं । न साहणें कांहींचि नाहीं । आणि साहतु[12] ऐसेंही । स्मरण नुरे ॥ ८२ ॥ शरीरा जें पातलें । तें करूनि घाली आपुलें । तेथ साहतेनि[13] नवलें[13] । घेपिजेना[13] ॥ ८३ ॥ हे अनाक्रोश[14] क्षमा[14] । जेथ आथी प्रियोत्तमा । जाण तेणें महिमा । ज्ञानासि गा ॥ ८४ ॥ तो पुरुष पांडवा । ज्ञानाचा ओलावा । आतां परिस आर्जवा । रूप करूं ॥ ८५ ॥ **आर्जव**[15]—तरि आर्जव तें ऐसें । प्राणांचें सौजन्य[16] जैसें । आवडतयाहि दोषें[17] । एकाचि पैं गा ॥ ८६ ॥ कां तोंड पाहूनि प्रकाशु । न करी जेवीं चंडांशु । जगा एक अवकाशु । आकाश जैसें ॥ ८७ ॥ तैसें जयाचें मन । माणुसाप्रति आन[18] आन[18] । नोहे आणि वर्तन । ऐसें पैं तें ॥ ८८ ॥ जें जगचि सनोळख[19] । जगेंसीं जुनाट सोयरिक । आप पर हे भाख[20] । जाणणें नाहीं ॥ ८९ ॥ मिळतेणेंसीं मेळु[21] । पाणिया ऐसा ढाळु[22] । कवणे विषीं आडळु[23] । ने घे चित्त ॥ ९० ॥ वारेयाची[24] धांव । तैसे सरळ भाव ।

---

१ आधिदैविक ( देवतेच्या क्षोभापासून होणारा ताप—जसा वीज पडणें, सांत येणें, इ० ); आध्यात्मिक—मनाच्या क्षोभापासून किंवा शरीररोगापासून होणारा ताप इ० ); आणि आधिभौतिक—( पृथिव्यादि पंचमहाभूतांच्या क्षोभापासून होणारा ताप—धरणीकंप इ० ); असे त्रिविध ताप. २ समावलें जातें. ३ दुभंगलेला. ४ हिंवाळ्यांत. ५ कशानेंही. ६ भीत नाहीं. ७ प्राप्त झालेल्यास. ८ वराह अवतार. ९ सुखदुःखादि द्वंद्वांच्या प्राप्तीनें. १० समुदाय. ११ मोठें. १२ सहन करितों. १३ सहन केल्याबद्दलच्या आश्चर्यानें गुंडाळला जात नाहीं; म्हणजे ज्याला सहन केल्याबद्दल आश्चर्य वाटत नाहीं. १४ दुःखावांचून शांति. १५ कापट्यराहित्य, सरळपणा. १६ प्रीती. १७ उद्देशानें. १८ निरनिराळें. १९ ओळखीचें. २० बोलणें. २१ संगति. २२ रीत. २३ अडथळा. २४ वाऱ्याची.

शंका आणि हांव[1] । नाहीं जया ॥ ९१ ॥ मायेपुढें बाळका । रिगतां नाहीं शंका । तैसें मन देतां लोकां । नालोची[2] जो ॥ ९२ ॥ फांकलिया[3] इंदीवरा । परिवर[4] नाहीं धनुर्धरा । तैसा कोन-कोंपरा । नेणेचि जो ॥ ९३ ॥ चोखाळपण[5] रत्नाचें । रत्नावरी किरणाचें । तैसें पुढां मन जयाचें । करणें पाठी ॥ ९४ ॥ दिठी नोहे मिणधी[6] । बोलणें नाहीं संदिग्धी[7] । कवणेंसीं हीन-बुद्धी[8] । राहाटों नेणे ॥ ९५ ॥ दाहाही इंद्रियें प्रांजळें[9] । निःप्रपंचें[10] निर्मळें । पांचही[11] पालव[11] मोकळे । आठही पाहर[12] ॥ ९६ ॥ अमृताचि धार । तैसें उजू अंतर । किंबहुना जो माहेर । या चिन्हाचें ॥ ९७ ॥ तो पुरुष सुभटा । आर्जवाचा आंगवठा[13] । जाण तेथेंचि वरटा[14] । ज्ञानें केला ॥ ९८ ॥ **आचार्योपासन** (गुरुभक्ति)—आतां यावरी । गुरु-भक्तीची परी । सांगों गा अवधारीं । चतुर-नाथा ॥ ९९ ॥ तैसें सबाह्य[15] आपुलें । जेणें गुरु-कुळीं वोपिलें । आपणा पैं केलें । भक्तीचें घर ॥ १०० ॥ तिये कडोनि येतसे वारा । देखोनि धांवे सामोरा । आडपडे[16] म्हणे घरा । बीजें[17] कीजो ॥ १०१ ॥ परी गुरु-आज्ञा धरिलें । देह गांवीं असे एकलें । वांसरुवा[18] लाविलें । दांवें जैसें ॥ १०२ ॥ म्हणे कैं हें बिरडें[19] फिटैल[20] । कैं तो स्वामी भेटैल । युगाहूनि वाडिल[21] । निमिष मानी ॥ १०३ ॥ ऐसेया गुरु-ग्रामींचें आलें । कां स्वयें गुरुंनींचि धाडिलें । तरी गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥ १०४ ॥ कां सुकतेया अंकुरा । वरि पडिलिया पीयूष-धारा । नाना अल्पोदकींचा सागरा । आला मासा ॥ १०५ ॥ नातरी रंकें निधान देखिलें । कां आंधळेया डोळे उघडले । भणंगाचिया[22] आंगा आलें । इंद्र-पद ॥ १०६ ॥ तैसा गुरु-कुळींचेनि नांवें ॥ महा-सुखें अति थोरावे । जें कोंडेंही[23] पोटाळवे[24] । आकाश कां ॥ १०७ ॥ पैं गुरुकुळीं ऐसी । आवडी जया देखसी । जाण ज्ञान तयापासीं । पाइकी[25] करी ॥ १०८ ॥ [**अर्चन**]—कां चैतन्याचिये[26] पोवळी-। माजि आनंदाचिया राउळीं । श्री-गुरुलिंगा[27] ढाळी[28] ।

---

१ इच्छा. २ विचार करीत नाहीं. ३ फुललेल्या. ४ गुप्त ठिकाण. ५ प्रकाशितपणा. ६ ओशाळलेली. ७ संशयात्मक. ८ हा नीच आहे अशा समजुतीनें. ९ सरळ. १० विषयांविषयीं विमुख. ११ अंतःकरणपंचक—अंतःकरण, मन, चित्त, बुद्धि, अहंकार. १२ प्रहर. १३ स्वरूप किंवा मूर्ति. १४ ठिकाण. १५ अंतर्बाह्य (शरीर व मन). १६ नमस्कार घालितो. १७ आगमन. १८ वासराला. १९ पेडें. २० सुटेल. २१ मोठे. २२ भिकाऱ्याच्या. २३ आवडीनें. २४ आलिंगावें. २५ चाकरी. २६ ज्ञानाच्या. २७ श्रीगुरुरूप लिंग (महादेवाचें) त्यास. २८ घाली.

ध्यानामृत[१] ॥ १०९ ॥ उदैजतां बोधार्का । बुद्धीची[२] डाळ[२] सात्विका[२] । भरोनियां त्र्यंबका । लाखोली वाहे ॥ ११० ॥ काळ-शुद्धि[३] त्रिकाळीं[३] । जीवदश[४] धूप जाळी । ज्ञान-दीपें वोंवाळी । निरंतर ॥ १११ ॥ सामरस्याची[५] रस-सोय[६] । अखंड अर्पित जाय । आपण भराडा[७] होय । गुरु तो लिंग ॥ ११२॥ [सख्य]—एकाधिये वेळे । गुरु माय करी भाव-बळें । मग स्तन्य-सुखें[८] लोळे । अंकावरी ॥ ११३ ॥ नातरी गा किरीटी । चैतन्य-तरु-तळवटीं । गुरु धेनु आपण पाठीं । वत्स होय ॥ ११४ ॥ गुरु-कृपा-स्नेह-सलिलीं । आपण होय मासोळी । कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥ ११५ ॥ गुरुकृपामृताचें वडप[९] । आपण सेवा-वृत्तीचें होय रोप । ऐसेसे संकल्प । विये मन ॥ ११६ ॥ चक्षु-पक्षेंवीण । पिलूं होय आपण । कैसें पैं अपारपण । आवडीचें ॥ ११७॥ गुरूतें पाक्षिणी करी । चारा घे चांचूवरी[१०] । गुरु तारू, धरी । आपण कास ॥ ११८ ॥ ऐसे प्रेमाचेनि थावें[११] । ध्यानचि[१२] ध्यानें[१२] प्रसवे । पूर्ण-सिंधू हेलावे[१३] । फुटती जैसे ॥ ११९ ॥ किंबहुना यापरी । श्री-गुरु-मूर्ती अंतरीं । भोगी, आतां अवधारीं । बाह्य सेवा ॥ १२० ॥ [दास्य]—तरि जीवीं ऐसे आवांके[१४] । म्हणे दास्य करीन निकें । जैसेनि गुरु कौतुकें । माग म्हणती ॥ १२१ ॥ तैसिया साच्या उपास्ती[१५] । गोसावी[१६] प्रसन्न होती । तेथ मी विनंती । ऐसी करिन ॥ १२२ ॥ म्हणेन तुमचा देवा । परिवारु जो आघवा । तेतुलीं रूपें होआवा[१७] । मीचि एकु ॥ १२३ ॥ आणि उपकरतीं[१८] आपुलीं । उपकरणें आथी जेतुलीं । माझीं रूपें तेतुलीं । होआवीं स्वामी ॥ १२४ ॥ ऐसा मागैन वरु । तेथ हो म्हणती श्री-गुरु । मग तो परिवारु । मीचि होईन ॥ १२५ ॥ उपकरण-जात सकळिक । तें मीचि होईन एकैक । तेव्हां उपास्तीचें कौतुक । देखिजैल ॥ १२६ ॥ आपुलिया गुणांचीं लेणीं । करीन गुरु-सेवे स्वामिणी । हें असो, होईन गवसणी[१९] । गुरुभक्तीसी ॥ १२७ ॥ गुरु-स्नेहाचिये वृष्टी । मी पृथ्वी होईन तळवटीं । ऐसिया मनोरथांचिया सृष्टी । अनंता रचीं ॥ १२८ ॥ म्हणे

---

१ ध्यानरूप अमृत (उदक). २ शुद्धसत्त्वगुण जी बुद्धि हीच डाळ. ३ तिन्ही शुद्ध काळीं. ४ जीवत्वरूप. ५ ऐक्याची. ६ पाक किंवा पक्वान्न. ७ गोसावी, पुजारी. ८ स्तनांतील दूध पिण्याच्या सुखानें. ९ वृष्टि. १० चोंचीनें. ११ पूर्णत्वानें, बळानें. १२ पुष्कळ ध्यानें. १३ लाटा. १४ हुरूप धरतो. १५ भक्तीनें. १६ गुरु. १७ व्हावा. १८ उपयोगाचीं. १९ आच्छादन, पिशवी.

श्री-गुरुचें भुवन । आपण मी होईन । आणि दास होऊनि करीन । दास्य तेथिंचें ॥ १२९ ॥ मी ताट काढीन । शेज मी झाडीन । चरणसंवाहन[1] । मीचि करीन ॥ १३० ॥ जंव देह हें असैल । तंव वोळगी[2] ऐसी कीजैल । मग देहांतीं[3] नवल । बुद्धि[3] आहे ॥ १३१ ॥ परि जीतु मेला न संडीं । निमेष लोकां न धडीं । ऐसेनि गणावया[4] कोडी । कल्पांचिया[4] ॥ १३२ ॥ जो गुरु-दास्यें कृशु । जो गुरु-प्रेमें सपोषु[5] । जो गुरु-आज्ञे निवासु । आपणचि ॥ १३३ ॥ गुरु-संप्रदाय-धर्म । तेचि जयाचे वर्णाश्रम । गुरु-परिचर्या[6] नित्यकर्म । जयाचें गा ॥ १३४ ॥ गुरु क्षेत्र गुरु देवता । गुरु माता गुरु पिता । जो गुरु-सेवेपरता । मार्गु नेणे ॥ १३५ ॥ जयाचें वक्त्र । वाहे गुरु-नामाचे मंत्र । गुरुवाक्यावांचूनि शास्त्र । हातीं न सिवे ॥ १३६ ॥ जया इये भक्तीची चाड । जया इये विषयींचें कोड[7] । जो हे सेवेवांचूनि गोड । न मनी कांहीं ॥ १३७ ॥ तो तत्त्व-ज्ञानाचा ठावो । ज्ञाना तेणेंचि आवो । हें असो तो देवो । ज्ञानभक्तु ॥ १३८ ॥

**शौच** ( शुचित्व )—म्हणे शुचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे । आगमन[8] जैसें । कापुराचें ॥ १३९ ॥ का रत्नाचें दळवाडें[9] । जैसें सबाह्य चोखडें । आंत बाहेरि एके पाडें । सूर्य जैसा ॥ १४० ॥ बाहेरि कर्में क्षाळला । भीतरीं ज्ञानें उजळला । इहीं दोहीं परी आला । पाखाळा[10] एका ॥ १४१ ॥ किंबहुना यियापरी । बाह्य चोख अवधारी । आणि ज्ञान-दीप अंतरीं । म्हणोनि शुद्ध ॥ १४२ ॥ येऱ्हवीं तरी पांडु-सुता । अंतर शुद्ध नसतां । बाहेरि कर्म तों सर्वथा । विटंबु गा ॥ १४३ ॥ मृत जैसा शृंगारिला । गाढव तीर्थीं न्हाणिला । कडु-दुधिया माखिला । गुळें जैसा ॥ १४४ ॥ तैसें कर्मीं वरिचिलेकडां[11] । न सरे थोर[12] मोलें कुडा[12] । न्व्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगें[13] ॥ १४५ ॥ म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें । मग बाह्य लाभैल स्वभावें । वरि ज्ञान कर्में संभवे । ऐसें कें[14] जोडे[14] ॥ १४६ ॥ यालागीं

---

१ पाय रगडणें. २ सेवा. ३ देहावसान झालें तरी गुरूची सेवा करण्याची त्याची बुद्धि तशीच राहते ह्यांत नवल काय? ४ कोट्यवधि कल्पपर्यंत जरी लोक ह्याच्या गुरूसेवेचा काळ मोजूं लागले तरी तेवढ्या काळांत एक निमेषभरही तो व्यर्थ जाऊं देत नाहीं हें तात्पर्य. ५ पुष्ट. ६ गुरूची सेवा. ७ तकवा, डौल. ८ प्राप्ति, (पा०) आंग, मन. ९ घनवटपणा, भरीवपणा. १० निर्मळपणास, स्वच्छतेस. ११ बाह्यात्कारीं. १२ हीन पदार्थ (कुडा) मोठ्या मोलानें जात नाहीं. १३ गंगेमध्यें. १४ कोठें मिळे?

बाह्य भाग । कर्में धूतला चांग । ज्ञानें फिटला वग[१] । अंतरींचा ॥ १४७ ॥ तेथ अंतर-बाह्य गेलें । निर्मळत्व एक जालें । किंबहुना उरलें । शुचित्वाचि ॥ १४८ ॥ पाणियें हिरा न भिजे । आधणीं हरळ[२] न सिजे । तैसी विकल्प-जातीं न लिंपिजे । मनोवृत्ति ॥ १४९ ॥ तया नांव शुचित्वपण । पार्था गा संपूर्ण । हें देखसी तेथ जाण । ज्ञान असे ॥ १५० ॥ **स्थैर्य**—आणि स्थिरता साचें । घर रिघाली जयाचें । तो पुरुष ज्ञानाचें । आयुष्य गा ॥ १५१ ॥ देह तरी वरिचिलीकडे[३] । आपुलिया परी हिंडे । परी बैसका[४] न मोडे । मानसाची ॥ १५२ ॥ कां लोभिया[५] दूरी जाये । परी जीवु ठेवाचिये[६] ठाये[६] । तैसा देह चाळतां न होये । चळु चित्ता ॥ १५३ ॥ जातया अभ्रांसवें । जैसें आकाश न धंवे । भ्रमण-चक्रीं[७] न भंवे[८] । ध्रुव जैसा ॥ १५४ ॥ पांथिकाचिया[९] येरझारां- । सवें पंथ न चले धनुर्धरा । कां नाहीं जेविं तरुवरां । येणें जाणें ॥ १५५ ॥ तैसा चळण-वळणात्मकीं । असोनि ये पांच-भौतिकीं[१०] । भूतौर्मी[११] एकीं । चळीजेना ॥ १५६ ॥ वाहुटोळीचेनि बळें । पृथ्वी जेवीं न ढळे । तैसा उपद्रव-उमाळें[१२] । न लोटे जो ॥ १५७ ॥ दैन्य-दुःखीं न तपे । भय-शोकीं न कंपे । देह-मृत्यु न वासिपे । पातलेनी ॥ १५८ ॥ आकाश हें वोसरो[१३] । पृथ्वी वरि[१४] विरो । परि नेणे मोहरों[१५] । चित्त-वृत्ति ॥ १५९ ॥ क्षीरार्णवाचिया कल्लोळीं । कंप नाहीं मंदराचळीं । आकाश न जळे जाळीं । वणवेयाच्या ॥ १६० ॥ तैशा आल्या गेल्या उर्मी । नव्हे गजबज मनोधर्मी । किंबहुनां धैर्य-क्षमीं[१६] । कल्पांतींही ॥ १६१ ॥ हें स्थैर्य निधडें[१७] । जेथ अंगें जीवें जोडे । तें ज्ञानाचें उघडें । निधान साचें ॥ १६२ ॥ **आत्म-विनिग्रह**—आणि इसाळु[१८] जैसा घरा । कां दंदिया[१९] हतियेरा । न विसंबें भांडारा । लुब्धकु जैसा ॥ ॥१६३ ॥ कां एकलौतिया[२०] बाळका । वरिपडौनि[२१] ठाके अंबिका । मधुविषीं मधु-मक्षिका । लोभिणी जैसी ॥ १६४ ॥ अर्जुना जो यापरी । अंतःकरण जतन करी । नेदी उभें ठाकों द्वारीं ।

---

१ कलंक. २ खडा, दगड. ३ बाह्यात्कारीं. ४ आत्मस्वरूपीं पडलेली बैठक. ५ लोभी पुरुष. ६ ठेव्याजवळ गुंतून राहतो. ७ फिरणाऱ्या नक्षत्रमंडळांत. ८ फिरे. ९ वाटसराच्या. १० ह्या पंचमहाभूतात्मक सृष्टींत. ११ पंचमहाभूतांच्या एकाही विकारानें. १२ उपद्रवांच्या लोटानें. १३ नाश पावो. १४ अथवा, शिवाय, आणखी. १५ मागें फिरण्यास. १६ धैर्य आणि क्षमा ह्यांनीं युक्त. १७ बळकट. १८ ब्रह्मराक्षस. १९ योद्धा. २० एकुलत्या. २१ जवळ होऊन.

इंद्रियांच्या ॥ १६५ ॥ अगा अंतःकरण-निग्रहो जो । तो हा हें जाणिजो । हा आथी तेथ विजो[1] । ज्ञानाचा पैं ॥ १६६ ॥ [**इंद्रियार्थ-वैराग्य**] (विषय-वैराग्य)—आणि विषयांविखीं[2] । वैराग्याची निकी । पुरवणी[3] मानसीं कीं । जिती[4] आथी ॥ १६७ ॥ वमिलिया अन्ना । लाळ न घोंटी रसना । अंग न[5] सूये[5] आलिंगना । प्रेताचिया ॥ १६८ ॥ विष खाणें नागवे[6] । जळते घरीं न रिघवे । व्याघ्र-विवरा न वचवे[7] । वस्ती[8] जेवीं ॥ १६९ ॥ धडाडीत[9] लोहरसीं । उडी न घलवे जैसी । न करवे उसी । अजगराची ॥ १७० ॥ अर्जुना तेणें पाडें । जयासीं विषयवार्ता नावडे । नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहींचि जावों ॥ १७१ ॥ बहु योगाभ्यासीं हांव । विजनाकडे धांव । न साहे जो नांव । संघाताचें ॥ १७२ ॥ नाराचांचीं[10] आंथरुणें । पूय-पंकीं[11] लोळणें । तैसें लेखी भोगणें । ऐहिकींचें[12] ॥ १७३ ॥ आणि स्वर्गातें मानसें । आइकोनि मानी ऐसें । कुहिलें[13] पिशित[14] जैसें । श्वानाचें गा ॥ १७४ ॥ तें हें विषय-वैराग्य । आत्म-लाभाचें भाग्य । येणें ब्रह्मानंदा योग्य । होती जीव ॥ १७५ ॥ ऐसा उभयभोगीं त्रासु । देखसी जेथ बहुवसु । तेथ जाण राहिवासु । ज्ञानाचा तूं ॥ १७६ ॥ [**सम-चित्तत्व**]—महा सिंधु जैसे । ग्रीष्मवर्षीं[15] सारिसे । इष्टानिष्ट तैसें । जयाचिया ठायीं ॥ १७७ ॥ कां तिन्ही काळ होतां । त्रिधा नव्हे सविता । तैसा सुख-दुखीं चित्ता । भेदु नाहीं ॥ १७८ ॥ जेथ नभाचेनि पाडें । समत्वा न्यून न पडे । तेथ ज्ञान रोकडें । ओळख तूं ॥ १७९ ॥

---

१ विजयो. २ विषयांविषयीं. ३ पुरवठा. ४ जिवंत. ५ घालीत नाहीं. ६ न रुचे, (पाठा०) नांगवे. ७ जावबे. ८ राहण्यास. ९ रसरशीत. १० बाणांचीं. ११ पुवाच्या चिखलांत. १२ इहलोकींचें. १३ कुजलेलें. १४ मांस. १५ उन्हाळा व पावसाळा यांमध्ये.

# नामदेव

नामदेव जातीचा शिंपी, पंढरपूरचा राहणारा होता. त्याच्या बापाचें नांव दामाशेटी आणि आईचें नांव गोणाई. नामदेव शके ११९२ कार्तिक शुद्ध ११ रोजीं जन्मला व शके १२७२ आषाढ वद्य १२ रोजीं समाधिस्थ झाला असें नमूद आहे. हा उद्धवाचा अवतार होता असें म्हणतात. ह्याच्या बायकोचें नांव राजाई. ह्यास चार मुलगे होते. ह्याच्या कुटुंबांतील मनुष्यांची माहिती पुढील २२ व्या अभंगांत दिली आहे. ह्याची जनी म्हणून एक दासी होती. तिनेंही बरेच अभंग केले आहेत.

नामदेवानें पुष्कळ अभंग केले; परंतु त्यांपैकीं फार थोडे आतां प्रसिद्ध आहेत. अभंग रचण्यास त्याला प्रयास पडत नसत; सहज बोलावें त्याप्रमाणें तो ते म्हणत जाई. नामदेवाच्या नांवावर जे आज अभंग प्रसिद्ध आहेत त्यांत इतर नामदेव नांवाच्या कवींच्या अभंगांची भेसळ झाली आहे.

नामदेवाच्या अभंगांचे गाथा माधव चंद्रोबा, गोंधळेकर, तुकारामतात्या, आवटे, जोग आणि सुबंध (सार्थ तीन भाग प्रसिद्ध) यांनीं प्रकाशित केले आहेत.

विशेष माहितीकरितां पहा:—महाराष्ट्र सारस्वत, भाग १—भावे; मराठी वाङ्मयाचा इतिहास, खं. १—पांगारकर; श्री नामदेवचरित्र—मा. आ. मुळे; श्री नामदेव महाराज—ज. र. आजगांवकर.

## स्फुट अभंग

(१)

सर्व सावधान होउनी विचारा । सोडवण करा संसाराची ॥ १ ॥
अववें आयुष्य सरोनी जाईल । कोण तें होईल साह्य आम्हां ॥ २ ॥
सकल संसार जाणोनि लटिका । शरण जा एका विठोबासी ॥ ३ ॥
सर्व-काळ वाचे म्हणा नारायण । वायां एक क्षण जावों नेदीं ॥ ४ ॥
नामा म्हणे सर्व सुखची होईल । मन हें ठेवाल हरी-पायीं ॥ ५ ॥

(२)

झणी दृष्टि लागे तुज केशव-राजा । जेणें मना माझ्या बोध केला ॥ १ ॥
अनंत जन्मींचें विसरलों दुःख । पाहतां श्री-मुख केशवाचें ॥ २ ॥
योगीयांचे ध्यानीं ध्यातां नातुडशी । तो तूं आम्हांपाशीं मागें पुढें ॥ ३ ॥
नामा म्हणे करीन जिवें निंबलोण[1] । विठ्ठलचरण वोंवाळीन ॥ ४ ॥

(३)

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा । केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥
नाहीं नाहीं मज आणीक सोयरा । न करीं अव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥
अनाथाचा नाथ होसी तूं दयाळा । किती वेळोवेळां प्रार्थूं आतां ॥ ३ ॥
नामा म्हणे जीव होतो कासावीस । केली तुझी आस आतां बरी ॥ ४ ॥

(४)

पाहें पर-दारा जननीसमान । द्रव्यही पाषाण-सम मानीं ॥ १ ॥
पराव्याकारणें प्राण वेंचीं आतां । जाणें पर-व्यथा अंतरींची ॥ २ ॥
विहित संतोष धरीं बा मानसीं । कीं पर-लोकासी जाणें आहे ॥ ३ ॥
सर्व काळ प्रीति संतांचीया संगें । गावें अनुरागें हरी-नाम ॥ ४ ॥
सर्वां भूतीं सम ठेवूनीयां बुद्धी । सांडावि उपाधी प्रपंचाची ॥ ५ ॥
सर्व परमात्मा सर्व काळीं देशीं । भाव अहर्निशीं दृढ धरीं ॥ ६ ॥
संत-समुदाय मिळतील जेथें । लोटांगणें तेथें जावें आधीं ॥ ७ ॥
चिंता नको नाम्या तरसी तूं जाण । सांगितली खूण मनें माझ्या ॥ ८ ॥

(५)

कलि-युगाचे मुळें । जालें धर्माचें वाटोळें ॥ १ ॥
पलंगीं बैसवूनी राणी । माते हातीं आणवी पाणी ॥ २ ॥
स्त्रिये पाटावाची चोळी । माता अखंड[2] चिंध्या गाळी ॥ ३ ॥
ऐसा कलि-युगाचा महिमा । म्हणे विष्णूदास नामा ॥ ४ ॥

(६)

क्षीर-सागरांत अससी बैसला । धांवोनि मजला भेटी देईं ॥ १ ॥
शेषावरी जरी अससी निजेला । धांवोनि मजला भेटी देईं ॥ २ ॥

---

१ दृष्टीचा अगर भूतबाधेचा विकार न व्हावा म्हणून मीठ, मोहऱ्या व कडूनिंबाचीं पानें हीं ओवाळून टाकणें, ह्या कृत्याला "निंबलोण करणें" म्हणतात. २ नेहमीं.

कैलासींचा शिव पूजितसे तुजला । धांवोनि मजला भेटी देई ॥ ३ ॥
गहिंवरुनि नामा बाहतो विठ्ठला । धांवोनि मजला भेटी देई ॥ ४ ॥

(७)

चक्रवाक पक्षी वियोगें बाहती । जालें मजप्रती तैसें आतां ॥ १ ॥
चुकलीया माय बाळकें रडती । जालें मजप्रती तैसें आतां ॥ २ ॥
वत्स न देखतां गाई हंबरती । जालें मजप्रती तैसें आतां ॥ ३ ॥
जीवनावेगळे मच्छ तळमळती । जालें मजप्रती तैसें आतां ॥ ४ ॥
नामा म्हणे मज वाटे ऐसें चित्तीं । करितसें खंती फार तुझी ॥ ५ ॥

(८)

काय माझा आतां पाहतोसि अंत । येई बा धांवत देव-राया ॥ १ ॥
तुजवीण माझे जीवासि आकांत । येई बा धांवत देव-राया ॥ २ ॥
असे जरी काम भेटोनियां जावें । धांवोनीया यावें देव-राया ॥ ३ ॥
ये रे ये रे देवा नामा तुज बाहत । येई बा धांवत देव-राया ॥ ४ ॥

(९)

युगा ऐसें पळ तुजविण जाय । पाहतोसि काय अंत माझा ॥ १ ॥
कोमळ हृदय तुझें पंढरीच्या राया । कठीण सखया कैसें केलें ॥ २ ॥
विचारिलें चित्तीं दुर्लभ हरि-हरां । कैसा जाऊं घरा रंकाचीया ॥ ३ ॥
अंगीकारावरी अव्हेराची मात । नोहे हें उचित देव-राया ॥ ४ ॥
मागें जे जे आळी[1] केली वासुदेवा । उदारा केशवा पुरवीली ॥ ५ ॥
नुपेक्षिसी ऐसा चित्तीं हा भरंवसा । आशेचि निराशा जाली आतां ॥ ६ ॥
वांचोनियां दुःख भोगावें रे आतां । प्राणांसी मूकतां तेंचि भलें ॥ ७ ॥
वर्णितां तो नामा जाला समाधिस्थ[2] । जाहालें विदित पांडुरंगा ॥ ८ ॥

(१०)

त्वरें धांवोनीयां आलासे गोविंद । सावध सावध नामदेवा ॥ १ ॥
रुसलासे नामा देवासिं न बोले । करें कुरवाळीलें वदन तेव्हां ॥ २ ॥
समजावोनि देवें धरिला पोटासीं । बोलें रे मजसीं नामदेवा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा उशीर कां केला । किंवा माझा आला तुज राग ॥ ४ ॥

(११)

अभिमानें घाला घातला आम्हांसी । म्हणोनि लपसी देवराया ॥ १ ॥
तुजवांचुनीयां जाऊं पाहे प्राण । दाखवीं वदन एक वेळां ॥ २ ॥

---

१ हट्ट. २ ज्याचें देहभान गेलें आहे असा.

मुकुट कुंडलें श्रीमुख सांवळें । केशरी लाविलें गंध भाळीं ॥ ३ ॥
पाहोनियां जीवा होय फार सुख । हरेल ही भूक डोळियांची ॥ ४ ॥
तुजवांचोनियां आम्हां नाहीं कोणी । तिहीं त्रिभुवनीं नामा म्हणे ॥ ५ ॥

(१२)

त्रिविध-तापें[1] प्राणी होताति संतप्त । शीतळ करीत कथामृतें ॥ १ ॥
अमृतापरीस कथा ते अधिक । सांगतसें एक देवराया ॥ २ ॥
स्वर्गीं जे अमृत प्राशन करीती । पुण्य सरल्या येती मृत्युलोका ॥ ३ ॥
तुझी कथा देत अच्युतपदासी[2] । न विचारी मानसीं याती[3] कांहीं ॥ ४ ॥
नाहीं चतुराई बोबडे हे बोल । लिहित विठ्ठल नामा म्हणे ॥ ५ ॥

(१३)

अवघे निरंतर करा हा विचार । भवसिंधूचा पार तरिजे केवीं ॥ १ ॥
अवघें जन्म वाया गेलें विषया-संगें । शिणलेती वाउगे माया-मोहें ॥ २ ॥
अवघा वेळ करा संसाराचा धंदा । परि वाचे वदा हरिचें नाम ॥ ३ ॥
अवघे भावें एका विठ्ठलातें भजा । आर्तें[4] करा पूजा हरि-दासांची ॥ ४ ॥
नामा म्हणे अवघें अनुभवूनी पाहा । सर्वकाळ राहा साधु-संगें ॥ ५ ॥

(१४)

अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे । अवघें कूळ त्यांचें पुण्यवंत ॥१॥
अवघेचि संसारीं जाणावे ते धन्य । ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं ॥ २ ॥
अवघा[5] विठ्ठल[5] भोगिती[5] दिन-राती । वोळगे[6] किंकर-वृत्ती नामा त्यांतें[6] ॥ ३ ॥

(१५)

अवघी चित्त-वृत्ति एकवटूनि जेणें । अवघा धरिला मनें पांडुरंग ॥ १ ॥
अवघें सुख एक तयासि पावलें । अवघें सफळ जालें जन्म त्याचें ॥ २ ॥
अवघीं व्रतें दानें केलीं पैं तयानें । जयाचें विठ्ठलीं ध्यानें मन जडलें ॥ ३ ॥
नित्य विठ्ठलनाम गर्जती स-प्रेम । अवघे नित्य-नेम जाले त्याचे ॥ ४ ॥

---

१ ज्ञानदेव—(पृ० १४) अ० १३, ओवी ७५ 'त्रिविध उपद्रवांचे' यावरील टीप १ पहा. २ अविनाशि पदास=मोक्षास. ३ जाति; उच्च नीच असें. ४ उत्कंठेनें, प्रेमानें. ५ विठ्ठलाच्या स्वरूपाच्या चिंतनानें होणारें सुख अखंड भोगितात हें तात्पर्य. ६ अशांचा दास होऊन त्यांस चिकटून राहतो म्ह० त्यांच्या सेवेंत तत्पर असतो.

अवघे इष्ट मित्र बंधु माता पिता । केला आवडता पांडुरंग ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसे अवघे संप्रदाय[1] । मिळोनि धरा पाय विठोबाचे ॥ ६ ॥

(१६)

अवघाचि संसार सुखाचा करीन । अवघ्या भावें धरीन विठ्ठल एक ॥ १ ॥
अवघा शीणभाग हिरोनि घेईन । अवघेचि तोडीन मायापाश ॥ २ ॥
अवघा जीवलग हाचिं पैं होईल । अवघा घेईल भार माथां ॥ ३ ॥
अवघा त्रिविधताप क्षणें मालवील । अवघा चालवील योग-क्षेम[2] ॥ ४ ॥
अवघ्या संसाराचें बसणें मोडील । अवघेचि तोडील माया-जाळ ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघी सोडा मिथ्या भ्रांति । विठ्ठलेंविण विश्रांति नाहीं कोठें ॥ ६ ॥

(१७)

ज्ञानदेव म्हणे नामदेवाप्रती । ऐकावी विनंती एक माझी ॥ १ ॥
पृथिवीचीं तीर्थें करावीं समस्त । पाहावे महंत साधुजन ॥ २ ॥
जीवन्मुक्ता तुज नाहीं कांहीं काज । इच्छा असे मज त्वांहीं यावें ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्हीं पुसावें विठ्ठला । देतां आज्ञा मला मीही येतों ॥ ४ ॥

(१८)

सर्व सुख आहे भीवरेचे[3] तीरीं । आमुची पंढरी कामधेनू ॥ १ ॥
प्रेमामृत दुभे[4] सदा संत-जना । वोसंडत[5] पान्हा नित्य नवा ॥ २ ॥
धर्म अर्थ काम मोक्ष चारी स्तन । दोहोणार धन्य पुंडलीक[6] ॥ ३ ॥
भक्तीचें[7] मेळवण भावाचेनि[8] बळें । देखोनियां वोळे[9] अधिकाधीक ॥ ४ ॥
जियेचें दुभतें नित्य नवें वाढे । पंढरी पहुडे[10] पूर्व पुण्यें ॥ ५ ॥
भाग्यवंत नामा तें क्षीर लाधला । प्रेमें वोसंडला गर्जे नामें ॥ ६ ॥

(१९)

माझें मज कळे माझें मज कळे । माझें मज कळे प्रेम-सुख ॥ १ ॥
न करीं तुझें ध्यान न लगे ब्रह्म-ज्ञान । माझी आहे खूण वेगळीच ॥ २ ॥
न करीं तुझी स्तुती न वाखाणीं कीर्ती । धरिली ते युक्ती वेगळीच ॥ ३ ॥

---

१ व्रत, दान, तप, योग, ध्यान इत्यादि निरनिराळ्या साधनांनीं ईश्वरप्राप्ति करून घेण्यास इच्छिणारे साधक. २ ह्या शब्दाचा मूळ अर्थ—**योग** म्हणजे आपल्याजवळ नाहीं तें मिळविणें आणि **क्षेम** म्हणजे मिळाल्याचें संरक्षण, असा आहे; परंतु येथें उपजीवन असा समजावा. ३ भीमेच्या. ४ दूध देते. ५ भरून वाहूं लागतो. ६ विठ्ठलाचा एक प्रसिद्ध भक्त. ७ देव, गुरु इत्यादिकांवर परम प्रेम व तदनुकूल कृति त्यांचें. ८ देव, गुरु इत्यादिकांवर जो विश्वास त्याच्या. ९ वळते. १० प्राप्त होते.

न करीं काया-क्लेश इंद्रियां निरोधु[1] । मज आहे बोधु वेगळाचि ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प[2] । येसी आपें आप गीवसीत[3] ॥ ५ ॥

(२०)

चंद्रभागे तटीं ऐकियेली गोष्टी । वाल्मीकें शत-कोटी ग्रंथ केला ॥ १ ॥
येऊनीयां नामा विठ्ठलासी म्हणे । केलें रामायण वाल्मीकानें ॥ २ ॥
तेणें माझ्या चित्ता बहु जाले क्लेश । व्यर्थ म्यां आयुष्य गमावीलें ॥ ३ ॥
जरी तुझा दास असेन मी देवा । तरी सिद्धी न्यावा पण माझा ॥ ४ ॥
करीन मी तुझे शतकोटी अभंग । बोले पांडुरंग ऐकें नाम्या ॥ ५ ॥
तये काळीं होती आयुष्याची वृद्धी । आतांची अवधी थोडी आहे ॥ ६ ॥
नामा म्हणे जरी न होती संपूर्ण । जिव्हा उतरून ठेवीन मी ॥ ७ ॥

(२१)

भीमा-तीरीं सांगे सारजेसी[4] हरी । बैस जिव्हेवरी नामयाच्या ॥ १ ॥
लडीवाळ माझा नामा बाळ तान्हें । मजवीण आहे कोण त्यासी ॥ २ ॥
मजवरी त्याचें फार आहे रीण । एवढ्यानें उत्तीर्ण[5] होईन मी ॥ ३ ॥
नामा म्हणे अंगें[6] बांधोनीयां वह्या । बैसे ल्याहावया पांडुरंग ॥ ४ ॥

(२२)

गोणाई राजाई दोघी सासू-सुना । दामा नामा जाणा बाप-लेंक ॥ १ ॥
नारा म्हादा गोंदा विठा चौघे पुत्र । जन्मले पवित्र त्याचे वंशीं ॥ २ ॥
लाडाई गोडाई येसाई साकराई । चौघी सुना पाहीं नामयाच्या ॥ ३ ॥
निंबाई ते लेकी आउबाई बहिणी । वेडी पिशी जनी दासी त्याची ॥ ४ ॥
इतुक्याही जणीं अभंग आरंभीले । देवें पूर्ण केले नामा म्हणे ॥ ५ ॥

(२३)

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं माझा भावो ॥ १ ॥
चरण न सोडीं सर्वथा । आण तुझी पंढरिनाथा ॥ २ ॥
वदनीं तुझें मंगळ नाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवराजा । केला पण चालवीं माझा ॥ ४ ॥

(२४)

माझी कोण गती सांगा पंढरि-नाथा । तारीसी अनाथा केव्हां मज ॥ १ ॥
मनापासोनीयां सांगा मजप्रती । पुसें काकुळती जीवांचिया ॥ २ ॥
न बोलसी कां रे धरीला अबोला । कोणासी विठ्ठला शरण जाऊं ॥ ३ ॥

---

१ नियमन. २ निभ्रांत. ३ शोधीत. ४ सरस्वतीस. ५ उतराई. ६ स्वतः.

कोणासी सांकडें घालावें हें सांग । नको धरूं राग दीनावरी ॥ ४ ॥
बाळकासी जैसी एकाचि ते माय । तैसे तुझे पाय मजलागीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा । कृपाळूवा कांता रखुमाईच्या ॥ ६ ॥

(२५)

किती देवा तुम्हां येऊं काकूळती । काय या संचितीं[1] लिहिलें माझ्या ॥ १ ॥
कांहो माझी सांड केली हृषीकेशी[2] । आम्ही कोणापासीं तोंड वासों ॥ २ ॥
ब्रीदाचा तोडर[3] गर्जे त्रि-भुवनीं । तूंचि एक धणी त्रैलोक्याचा ॥ ३ ॥
समूळ घेतला पृथिवीचा भार । माझाचि जैंजार[4] काय तूला ॥ ४ ॥
नको पाहूं अंत पांडुरंगे आई । नामा हरिपायीं घाली मिठी ॥ ५ ॥

(२६)

माझा भाव तुझे चरणीं । तुझें रूप माझे नयनीं ॥ १ ॥
सांपडलों एकामेका । जन्मोजन्मीं नोहे सुटका ॥ २ ॥
त्वां तोडिली माझी माया । मी तों जडलों तुझ्या पायां ॥ ३ ॥
त्वां मज मोकलिलें विदेहीं[5] । म्यां तुज घातलें हृदयीं ॥ ४ ॥
नामा म्हणे बा सुजाणा । सांग त्वां न ठकाविलें कोणा ॥ ५ ॥

---

## अभंग—बाल-क्रीडा

कृष्ण गोकुळांत असतां त्यानें लहानपणीं केलेल्या क्रीडा या प्रकरणांत वर्णन केल्या आहेत, म्हणून या प्रकरणास 'बालक्रीडा' असें नांव दिलें आहे.

(१)

गोपिका म्हणती यशोदे सुंदरी । करीतो मुरारी खोडी बहू ॥ १ ॥
यशोदेप्रती त्या गौळणी बोलती । संकष्ट-चतुर्थी-व्रत घेईं ॥ २ ॥
गणेश देईल यासी उत्तम गुण । वचन प्रमाण मानावें हें ॥ ३ ॥
गजमुखा तेव्हां म्हणत यशोदा । माझीया मुकुंदा गुण देईं ॥ ४ ॥
ऐसें हें वचन ऐकोनि कृष्ण-नाथें । सत्य गणेशातें केलें तेव्हां ॥ ५ ॥
एक मास खोडी देवें नाहीं केली । प्रचीती ते आली यशोदेसी ॥ ६ ॥
धन्य धन्य देव गणपति पाहें । यशोदा ते राहे उपवासी ॥ ७ ॥
इंदिरा-बंधूचा[6] उदय होऊं पहात । यशोदा करीत पूजनासी ॥ ८ ॥
शर्करा-मिश्रित लाडू एकवीस । आणीक बहुवस[7] मोदक ते ॥ ९ ॥

---

१ पूर्व-कर्मी. २ इंद्रियांच्या स्वामी, हे विष्णु. ३ डंका. ४ भार, ओझें.
५ देहाभिमानरहित स्थितींत. ६ लक्ष्मीचा भाऊ चंद्र ह्याचा. ७ बहुत.

ऐसा नैवेद्याचा हारा तो भरोनी । देव्हारा[1] नेऊनी ठेवी माता ॥ १० ॥
मातेसी म्हणत तेव्हां हृषीकेशी । लाडू केव्हां देसी मजलागीं ॥ ११ ॥
यशोदा म्हणत पूजिन गजवदन । नैवेद्य दाऊन देइन तूज ॥ १२ ॥
ऐसें म्हणोनीयां माता बाहेर गेली । देव्हाऱ्याजवळीं हरी होता ॥ १३ ॥
एकांत देखोनी हारा उचलीला । सर्व स्वाहा[2] केला एकदांची ॥ १४ ॥
घेऊनीयां ग्रास उगाची बैसला । भक्तालागीं लीला दावीतसे ॥ १५ ॥
धूप घेऊनीयां आली सदनातें । रिता हारा तेथें देखीयेला ॥ १६ ॥
विस्मय बहुत मातेसी वाटला । नैवेद्य हरीला पूसतसे ॥ १७ ॥
कृष्ण म्हणे सत्य वचन मानीं माते । एक सहस्र येथें उंदिर आले ॥ १८ ॥
त्यांत एक थोर होता तो मूषक । त्यावरि विनायक बैसलासे ॥ १९ ॥
सकळहि लाडू सोंडेनें उचलीले । सर्व आकर्षीले एकदांची ॥ २० ॥
सर्वांगासी त्यानें चर्चीला सेंदूर । सोंड भयंकर हलवीतसे ॥ २१ ॥
उंदिर भ्यासूर भ्यालों मी देखूनी । वळली वदनीं बोबडी ते ॥ २२ ॥
न बोलवे कांहीं माझेनी जननी । क्षुधा मजलागोनी लागलीसे ॥ २३ ॥
लाडू मज देईं म्हणे जनार्दन । माता क्रोधेंकरून बोलतसे ॥ २४ ॥
माता म्हणे कृष्णा पाहूं तुझें वदन । लाडू त्वांची पूर्ण भक्षीयेले ॥ २५ ॥
हरि म्हणे माते लाडू ते बहुत । मावतील मुखांत कैसे माझ्या ॥ २६ ॥
गणपति लाडू गेलासे घेऊन । आलें विहरण[3] मजवरी ॥ २७ ॥
हरि म्हणे मज मारूं नको माते । तुज वदनातें दावीतों मी ॥ २८ ॥
कृष्णनाथें तेव्हां मुख पसरीलें । ब्रह्मांड देखीलें मुखामाजी ॥ २९ ॥
असंख्य गणपती दिसती वदनीं । पहातसे नयनीं यशोदा ते ॥ ३० ॥
मुखांतुन गणपति मातेसी बोलत । पूजावें त्वरीत हरीलागीं ॥ ३१ ॥
ऐसें देखोनीयां समाधिस्थ[4] होत । चहूंकडे पहात तटस्थ[5] ते ॥ ३२ ॥
योग-माया[6] तेव्हां हरीनें घालून । मातेपुढें जाण उभा असे ॥ ३३ ॥
यशोदा हरीसी कडेवरी घेत । मुखातें चुंबीत आवडीनें ॥ ३४ ॥
हरि घेऊनियां घरांत ती गेली । भोजना बैसली नामा म्हणे ॥ ३५ ॥

(२)

शिवादिक ज्याचें वंदी पायवणी । पायांवरी न्हाणी यशोदा ते ॥ १ ॥
नंद-पुण्य-लेखा[7] नव्हे आम्हांप्रती । शुक परीक्षिती सांगतसे ॥ २ ॥

---

१ देवघरांत. २ गट्ट. ३ आळ. ४ निर्विषय चित्तवृत्ति आहे जिची अशी.
५ विस्मित. ६ परमेश्वराची अचिंत्य मोहशक्ति. ७ गणना.

सनकादिक[१] ज्याचे ध्यानीं जाले पिसे । गाई चारितसे गोकुळांत ॥ ३ ॥
गडीयासी काला[२] वांटीतो श्रीधर । कौतुक सुरवर पाहताती ॥ ४ ॥
नामा म्हणे सुख देईल भक्तांसी । वधील दुष्टांसी स्वामी माझा ॥ ५ ॥

(३)

श्रवणें जळती पापाचे पर्वत । ऐसें ब्रह्म-गीत[३] शुक म्हणे ॥ १ ॥
धरूनि विश्वास करी जो पठण । तरेल तो जाण भव-सिंधू ॥ २ ॥
आपण तरेल नव्हे हें नवल । कुळें उद्धरील सकळही ॥ ३ ॥
एकैक अक्षर निर्दाळी महा-पाप । करा याचा जप सात्विक[४] हो ॥ ४ ॥
नाम घेतां धांवे अनवाणिच पायें । कोमळ हृदय कृष्णजीचें ॥ ५ ॥
न विचारी जाती कुळ अ-मंगळ । न विचारी काळवेळ धांवतसे ॥ ६ ॥
शरणागता नेदी काळाचिये हातीं । नामा म्हणे चित्तीं दृढ धरा ॥ ७ ॥

(४)

भव-सिंधू तराया एकाचि उपाय । ध्यावे तुझे पाय वासुदेवा ॥ १ ॥
गोविंद गोपाळ वाचेसी निखळ[५] । उद्धरे तात्काळ कलीमाजी ॥ २ ॥
नारायण नारायण करि जो पारायण[६] । तो उद्धरे जाण इहलोकीं ॥ ३ ॥
तुटती यातना कर्माच्या भावना[७] । जड-जीवा उद्धरणा नाम स्मरा ॥ ४ ॥
अहर्निशीं कीर्ति गाती भाविक भोळे । त्यांणीं तुज जिंकीलें ब्रह्मा म्हणे ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसें दाविलें सुगम । नलगे तुम्हां नेम नाना कोटी ॥ ६ ॥

---

## अभंग—कालियमर्दन

कालिय नांवाचा मोठा सर्प यमुनेच्या डोहांत राहत होता. एके दिवशीं गोपाळांचीं व कृष्णाचीं गुरेंवासरें कालियाच्या विषानें दूषित झालेल्या डोहांतलें पाणी पिऊन मरून पडलीं. हें पाहून कृष्णानें डोहांत उडी टाकिली व त्याच्या राहण्याच्या ठिकाणीं जाऊन त्यास शासन केलें, आणि त्यास तेथून समुद्रांत रहावयास लावून दिलें; अशी कथा ह्या प्रकरणांत आहे, म्हणून ह्यास 'कालियमर्दन' ही संज्ञा दिली आहे.

---

१ सनकसनंदनादि, हे ब्रह्मदेवाचे मानसपुत्र. २ अनेक प्रकारचें एकत्र कालविलेलें अन्न. ३ ब्रह्मदेवानें केलेली कृष्णाची स्तुति. ४ भोळे, भाविक. ५ न खळतां, निरंतर. ६ अखंड पठन. ७ वासना.

(१)

कालिंदीचे डोहीं काळीयाची वस्ती । ऐक परिक्षीती चरित्र हें ॥ १ ॥
पक्षि-श्वापदांनीं सोडिलें त्या स्थळा । निघताति ज्वाळा तया डोहीं ॥ २ ॥
विषाचिया योगें झाडें जळताती । जीवन न घेती कोणी त्याचें ॥ ३ ॥
वैकुंठ-नायक तया वनीं आला । गोपाळांचा मेळा बरोबरी ॥ ४ ॥
हुतुतु हामामा[1] लपंडाई खेळती । देवासी म्हणती लपें आतां ॥ ५ ॥
तृषाक्रांत जाले ते गाई-गोपाळ । पिती तेव्हां जळ काळीयाचें[2] ॥ ६ ॥
लहानलीं मुलें नाहीं तयां ज्ञान । जाले गत प्राण सकळांचे ॥ ७ ॥
नामा म्हणे तेव्हां कृपादृष्टी पाहात । उठवी समस्त गाई गडी ॥ ८ ॥

(२)

जगजेठी[3] तेव्हां क्रोधावला चित्तीं । करीन मी शांती तूझी आतां ॥ १ ॥
माझीया लेंकरां दीधलासि त्रास । करीन मी नाश आतां तूझा ॥ २ ॥
त्रैलोक्यांत कोण ऐसा हो समर्थ । माझे शरणागत मारील तो ॥ ३ ॥
माझीया भक्तासी जो कां दु:ख-दाय[4] । करीन प्रळय त्याजवरी ॥ ४ ॥
स्फुरताती दंड कांपती अधर । उठला सत्वर जगदीश ॥ ५ ॥
कळंबाचे वृक्षीं देव चढतसे । पीतांबर कासे खोवीतसे ॥ ६ ॥
जगद्गुरु तेव्हां पुष्पमाळा काढी । टाकीतसे उडी जळामधें ॥ ७ ॥
नामा म्हणे शोकें व्यापीले समग्र । करूनी एकाग्र मन ऐका ॥ ८ ॥

(३)

घालीतसे वेढे दीसतसे जळीं । आकांत सकळीं मांडीयेला ॥ १ ॥
गडी रडताती वत्सें पडताती । कपाळ पिटिती सकळीक ॥ २ ॥
तुजवांचुनीयां रक्षी कोण आम्हां । काय सांगूं रामा[5] सकळीक ॥ ३ ॥
रूसलिया आमुचें करिसि समाधान । तुजवीण वन वोस वाटे ॥ ४ ॥
आम्हांसाठीं तुवां दुष्टांसि मारीलें । कोण आतां लळे पुरवील ॥ ५ ॥
तुजवांचुनीयां आम्ही सर्व दीन । न जाऊं येथून गोकूळासी ॥ ६ ॥
वियोगानें तेव्हां पक्षी रडताती । आतां कृष्ण-मूर्ती कैंची आम्हां ॥ ७ ॥
बोलोनीयां ऐसें निस्तेज पडती । नदी वाहती[6] ती स्थिरावली ॥ ८ ॥
नामा म्हणे होती दुश्चिन्हें बहूत । गोकुळीं समस्त वीचारीत ॥ ९ ॥

---

१ एक प्रकारचा खेळ. २ 'कालिंदीचें' हा पाठ बरा दिसतो खरा, परंतु 'काळीयाचे' असाच पाठ 'सर्वसंग्रहांत' व अन्यत्र सांपडतो. ३ जगाहून श्रेष्ठ अथवा जगाच्या पूर्वीं असणारा ईश्वर. ४ दु:ख देणारा. ५ बलरामाला. ६ वाहत होती ती.

(४)

यशोदा व्याकूळ होऊनियां म्हणे । सुखी असो तान्हें वनामाजी ॥ १ ॥
उठती तिडका स्तनीं माझ्या फार । लवतसे नेत्र वेळोवेळां ॥ २ ॥
जीव तळमळी दाटे माझा घसा । पाहीन पाडसा केव्हां आतां ॥ ३ ॥
गोकुळींचे जन निवाले सकळ । पहाति गोपाळ वनामध्यें ॥ ४ ॥
कालिंदीच्या तीरीं पडले सकळ । पाहोनि कोल्हाळ करीताती ॥ ५ ॥
कपाळ पिटीती यशोदा रोहिणी[१] । आतां चक्रपाणी कैंचा आम्हां ॥ ६ ॥
धांव धांव कृष्णा दावीं रे वदना । पाजूं आतां पान्हा कोणालागीं ॥ ७ ॥
तुझिया कौतुकें कंठीं[२] मी संसार । जळतें अंतर तुजसाठीं ॥ ८ ॥
कोणावरी आतां घालूं अलंकार । बुडालें हें घर माझें आतां ॥ ९ ॥
नामा म्हणे शोकें जाऊं पाहे प्राण । सकळांचें जीवन कृष्णनाथ ॥ १० ॥

(५)

नंद म्हणे माझें बुडालें जहाज । अभाग्यासी मज कृष्ण कैंचा ॥ १ ॥
काय माझें तप संपूर्ण सरलें । म्हणोनि बुडालें तान्हें माझें ॥ २ ॥
चिंतेनें व्याकुळ पिटी वक्षस्थळा । दावा रे सांवळा प्राण माझा ॥ ३ ॥
आलीया अतीथा त्रासें दवडीलें । म्हणोनि बुडालें बाळ माझें ॥ ४ ॥
प्रातःकाळीं पाहूं कोणाचें मी मुख । येथूनीयां सुख नाहीं नाहीं ॥ ५ ॥
समस्तांचि दृष्टी करी तुज कष्टी । म्हणोनी जगजेठी टाकीयेलें ॥ ६ ॥
गोकुळींचें जन देऊं पाहति प्राण । वांचाया कारण काय आतां ॥ ७ ॥
अभय देतसे बळिभद्र[३] सर्वांसी । मारूनी दुष्टासी येईल आतां ॥ ८ ॥
अंतर्यामीं जाणे[४] जन जाले वेडे । नामा म्हणे वेढे काढीतसे ॥ ९ ॥

(६)

तयाचे मस्तकीं नाचे नारायण । आरंभी गायन जगदीश ॥ १ ॥
त्रैलोक्याचा भार घाली हृषीकेशी । दमीत[५] दुष्टासी स्वामी माझा ॥ २ ॥
होतां एक क्षण जाला तेव्हां क्षीण । जाऊं पाहे प्राण काळीयाचा ॥ ३ ॥
तेव्हां त्याच्या स्त्रिया येती काकुळती । लक्ष्मिच्या पती कृपाळूवा ॥ ४ ॥
यज्ञेशा अच्युता गोविंदा माधवा । दया-निधि केशवा कृष्णनाथा ॥ ५ ॥
श्रीधरा वामना अगा वासुदेवा । ऐकावी ही देवा विज्ञापना ॥ ६ ॥

---

१ वसुदेवाची बायको व बळरामाची आई. २ कंठितें. ३ बलराम. ४ जाणती (कृष्ण). ५ शासन करीत.

आम्हांलागीं आतां देई चुडेदान[1] । धरीती चरण देवाजीचे ॥ ७ ॥
दीनाचा दयाळ दासाचा कैवारी । नामा म्हणे हरी उतरला ॥ ८ ॥

(७)

राहुं नका येथें जावें समुद्रासी । सांगे हृषीकेशी सकळीकां[2] ॥ १ ॥
तुझीया मस्तकीं असती माझे चरण । न भाक्षि तुज जाण पक्षी-राज[3] ॥ २ ॥
दिव्य सुमनांच्या घालीताति माळा । पूजिती सांवळा बाप माझा ॥ ३ ॥
अनर्घ्य[4] रत्नांचे देती अलंकार । श्री-मुख सुंदर पाहाताती ॥ ४ ॥
जांबूनदताटीं[5] घालीति भोजन । निवती तेथून सकळीक ॥ ५ ॥
आला भगवान आनंदले गडी । उभारीति गुढी जन तेव्हां ॥ ६ ॥
काळियाआख्यान स्मरे जो मानसीं । न डंकी[6] तयासी सर्प-कुळ ॥ ७ ॥
अहर्निशीं याचें करी जो पठण । नामा म्हणे विघ्न नाहीं तया ॥ ८ ॥

(८)

आला वनमाळी । मग भेटती सकळी ॥ १ ॥
यशोदा रोहिणी । पोटिं धरिती चक्रपाणी ॥ २ ॥
गाई धांवताती । कृष्ण-अंगातें चाटिती ॥ ३ ॥
उड्या मारीताती । गडी आनंदें नाचती ॥ ४ ॥
न वर्णवे तो आनंद । नामयाची बुद्धि मंद ॥ ५ ॥

---

## अभंग—कंसवध

मथुरेचा राजा कंस ह्यानें एकदां राम-कृष्णांस मल्लांच्या कुस्त्यांत मारावें म्हणून अक्रूराला पाठवून त्यांस गोकुळाहून मथुरेस आणविलें; परंतु तेथें आल्यावर चाणूर व मुष्टिक ह्या प्रबळ मल्लांस कृष्ण व बळराम ह्यांनींच ठार मारिलें आणि शेवटीं कृष्णानें कंसासही मारिलें. अशी कथा ह्या प्रकरणांत आहे; म्हणून ह्यास 'कंसवध' हें नांव दिलें आहे.

(१)

कंसासुर सारे करोनि विचार । धाडितो अक्रूर[7] गोकुळासी ॥ १ ॥
अक्रुरा आनंद जाला असे फार । पाहीन श्रीधर डोळेभरी ॥ २ ॥

---

१ सौभाग्य. २ कालियाचे सर्व कुटुंबास. ३ गरुड. ४ अमूल्य. ५ सोन्याच्या ताटांत. ६ दंश करी. ७ कृष्णाचा भक्त एक यादव.

आजि होइल माझ्या जन्माचें सार्थक । वैकुंठ-नायक पाहीन मी ॥ ३ ॥
उजवे जाती काक दक्षिण करीं मृग । पाहीन श्रीरंग[1] स्वामी माझा ॥ ४ ॥
शुभ ते शकून मार्गीं हे होताती । पाहीन भू-पती वैकुंठींचा ॥ ५ ॥
येथूनियां माझी सरली येरझार[2] । कंसानें उपकार केला मोठा ॥ ६ ॥
आजि माझे पितर उद्धरति सकळ । पाहीन गोपाळ कृपा-सिंधू ॥ ७ ॥
नामा म्हणे आला गोकुळासन्निध । हृदयीं आनंद न समाये ॥ ८ ॥

(२)

चौदाजणें[3] ज्याच्या चरणांतें पूजिती । त्याची घेइन माती आपुले शिरीं ॥ १ ॥
एकांतीं अर्चन करीतसे धूर्जटी । त्यासीं बोलेन गोष्टी आवडीच्या ॥ २ ॥
सप्त-ऋषी ज्याचे वर्णिताति गुण । करीतसे ध्यान ब्रह्मा ज्याचें ॥ ३ ॥
तेहतीस[4] कोटी देव जयातें पूजिती । श्रुति वर्णिताति गुण ज्याचे ॥ ४ ॥
चारी वेद ज्याची वर्णिताति कीर्ती । करिताति स्तुती साहीजणें[5] ॥ ५ ॥
लक्षुमीचा पती ध्याति सनकादिक । पाहीन श्रीमुख एक वेळां ॥ ६ ॥
पृथिवीचा भार करावा हा दूर । म्हणोनि अवतार घेत असे ॥ ७ ॥
नामा म्हणे आला यमुनेजवळीं । उतरला खालीं रथाचीया ॥ ८ ॥

(३)

तनु हें आकाश चंद्रमा तें मुख । ऐसें निष्कलंक परीक्षीती[6] ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्र त्याहुनि अधीक । शोभत श्री-मुख कृष्णजीचें ॥ २ ॥
भोंवता हा शोभे नक्षत्रांचा मेळा । खेळत सांवळा जगद्गुरू ॥ ३ ॥
वैजयन्ती[7] माळा किरीटकुंडलें । अक्रूरें देखिले दोघेजण[8] ॥ ४ ॥
जोडोनियां हात घाली नमस्कार । वाहातसे नीर क्षणक्षणा ॥ ५ ॥
नामा म्हणे त्वरें धांवे हृषीकेशी । धरीत पोटासीं अक्रूरातें ॥ ६ ॥

---

१ लक्ष्मीचा प्रिय. २ जन्ममरणांचे हेलपाटे. ३ चार वेद; शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, ज्योतिष, आणि छंद हीं सहा अंगें; पुराणें; न्याय; मीमांसा आणि धर्मशास्त्र मिळून १४ विद्या, अथवा १४ भुवनांतील लोक. ४ आठ वसु, अकरा रुद्र, बारा आदित्य आणि दोन अश्विनीकुमार अथवा प्रजापति व वषट्कार असे ३३ कोटि म्हणजे प्रकार. ५ (१) मीमांसा, (२) वेदांत, (३) सांख्य, (४) योग, (५) न्याय, (६) व्याकरण, धर्म अशीं सहा शास्त्रें. ६ हें संबोधन. ७ विष्णूच्या गळयांतील पांच प्रकारच्या रत्नांची माला. ८ बळराम व कृष्ण.

(४)

भेटी देई मज म्हणे बळिरामा । न वर्णवे प्रेमा अक्रूराचा ॥ १ ॥
पेंद्यासी[1] पुसती अवघे गडी तेव्हां । कोण रे हा बावा आला येथें ॥ २ ॥
आपुल्या कान्होबाच्या[2] पायां कां पडतो । काय हा मागतो आम्हां सांगें ॥ ३ ॥
अक्रूर बळिराम घरिं आले गोपाळ । नंदादि सकळ भेटीयेले ॥ ४ ॥
मधुपर्क-विधि[3] करीती पूजन । म्हणे धन्य दिन आजिचा हा ॥ ५ ॥
अक्रूराबरोबरी करीती भोजन । पुसे वर्तमान मग त्यासी ॥ ६ ॥
भक्त माझें दैवत जगा दावी मात । कृपाळु बहुत नामा म्हणे ॥ ७ ॥

(५)

प्रातःकाळीं मात[4] जाली गोकुळांत । जातो भगवंत मथुरेसी ॥ १ ॥
गौळणींचा मेळा मिळाला सकळ । पिटीती कपाळ आपुले हातें ॥ २ ॥
एकी त्या घालीती केसांमध्यें माती । एकी त्या लोळती भूमीवरी ॥ ३ ॥
आम्हां सोडोनीयां तूं रे कैसा जासी । तुजवीण पीसीं आम्हीं सर्व ॥ ४ ॥
कोण्ही रथापुढें जावोनियां पडती । आक्रोशें रडती सकळीक ॥ ५ ॥
अक्रूर[5] नव्हे बाई मोठा असे क्रूर । नामीं निरंतर[5] क्रिया वसे ॥ ६ ॥
अक्रूरा आम्ही सर्व पसरितों पदर । नेऊं नको श्रीधर मथुरेसी ॥ ७ ॥
नामा म्हणे शोक न वर्णवे आतां । जाला तो हाकीता रथ त्वरें ॥ ८ ॥

(६)

ब्रह्म-निष्ठ तेव्हां स्थिरावला चित्तीं । अक्रूराचे गळती दोन्ही नेत्र ॥ १ ॥
दहीं-दूध-तूपें भरिल्या कावडी । चालती तांतडी सकळीक ॥ २ ॥
चिंतेनें व्यापिलें अक्रूराचें मन । काय वर्तमान होइल नेणों ॥ ३ ॥
नर-नारी शोक करिती सकळ । दुराचारी खळ कंस आहे ॥ ४ ॥
मार्गीं तो स्नानासी उतरला अक्रूर । रथावरी किशोर नंदजीचे ॥ ५ ॥
सोडोनियां घोडीं चालला तांतडी । दिली असे बुडी जळामध्यें ॥ ६ ॥

---

१ कृष्णाच्या खेळगड्यांपैकीं एक भोळसर खेळगडी. २ कृष्णाच्या. ३ कोणी प्रतिष्ठित पाहुणा घरीं आला असतां दहीं, तूप व मध हीं त्यास देण्याची पूर्वी चाल असे, त्याला मधुपर्क म्हणत. ४ गोष्ट, बातमी. ५ हा अक्रूर नव्हे, तर क्रूरच आहे, आणि त्या नांवासारखी त्याची करणी आहे हा भाव.

दावोनी कौतुक[१] निरसी त्याचा धाक[१] । सांगतसे शुक परीक्षीती ॥ ७ ॥
झुंपोनीयां घोडीं चालीला सत्वर । लोपे दिनकर नामा म्हणे ॥ ८ ॥

(७)

इच्छामात्रें मोडी ब्रह्मांडांच्या कोटी । चालिला जगजेठी कंस-द्वारा ॥ १ ॥
मदोन्मत्त हस्ती देखोनीयां हांसे । पीतांबर कासे खोवींयेला ॥ २ ॥
सावरोनी हातें केसां देत गांठ । खोवीतसे नीट वैजयंती ॥ ३ ॥
खांब ठोकोनियां[२] राहे पुढें उभा । सांवळी ही प्रभा अंगकांती ॥ ४ ॥
पाहोनियां मुख जाले समाधिस्थ । ऋषिमुनी समस्त वेडावले ॥ ५ ॥
दुष्ट पापी हत्ती घाली अंगावरी । क्षणार्धेंचि मारी गजालागीं ॥ ६ ॥
उपडोनियां दांत घेतसे श्रीधर । जहाला उद्धार कुवलयाचा[३] ॥ ७ ॥
नामा म्हणे पुढें चालीला गोविंद । सावध सावध परीक्षीती ॥ ८ ॥

(८)

चौदा भुवनें वसती जयाचीये पोटीं । त्यासी आणि जेठी[४] मारावया ॥ १ ॥
इंद्रादि सुरवर जयाचे किंकर । त्याशीं आणी पामर झोंबीसाठीं ॥ २ ॥
आतुर्बली तेव्हां दिसे नारायण । जळतसे मन वैरीयांचें ॥ ३ ॥
कंसाचे अंगणीं उभा असे देव । जैसा ज्याचा भाव तैसा भासे ॥ ४ ॥
कृष्णातें देखोनी वल्गना करीती । चोळिताति माती दंडालागीं ॥ ५ ॥
बळिभद्रासी खूण दावीयेलि तेव्हां । उशीर न लावा मारायासी ॥ ६ ॥
नामा म्हणे एक उरलासे कंस । वधिती सकळांस दोवेजण ॥ ७ ॥

(९)

रमेच्या वल्लभें देखीयेला कंस । धरूनी आवेश बैसलासे ॥ १ ॥
त्वरें जावोनीयां धरियेला केशीं । पाडीला भूमीसी दुष्ट-बुद्धी ॥ २ ॥

---

१ मथुरेस जातांना वाटेंत यमुनेवर अक्रूर स्नानास उतरला, तेव्हां बळराम व कृष्ण हे झाडाखालीं रथावरच होते. इकडे अक्रूरानें बुडी मारली तों पाण्यांतही ते दोघे त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हां विस्मित होऊन त्यानें वर रथाकडे पाहिलें तों त्यांत ते आहेतच, असें पाहून त्यास वाटलें कीं, पाण्यांत ते दृष्टीस पडले, ती भ्रांति असावी; म्हणून त्यानें पुन: बुडी मारली, तेव्हांही ते पूर्वीप्रमाणें तेथें त्याच्या दृष्टीस पडले. हा अद्भुत चमत्कार पाहून हे ईश्वरांश आहेत, ह्यांस कंसापासून कांहींएक भय नाहीं, अशी त्याची पूर्ण खात्री झाली; आणि त्यानें हा चमत्कार इतर गोपजनांस सांगितल्यावरून त्यांचीही भीति दूर झाली. २ अन्य पाठ—'खांबा टेकोनीयां', ठाण मांडून, खांबाप्रमाणें दृढ उभा राहून. ३ कुवलयापीड नांवाच्या हत्तीचा. ४ मल्ल.

वज्रप्राय मुष्टी वोपी नारायण । सोडीयेला प्राण कंसें तेव्हां ॥ ३ ॥
देव वर्षताती सुमनांचे भार । भक्त जयजयकार गर्जताती ॥ ४ ॥
गाऱ्हाणें सांगती ऋषिमुनि सर्व । गाताती गंधर्व सप्त-स्वरें ॥ ५ ॥
नामा म्हणे पुढें अप्सरा नाचती । वर्णिताती कीर्ति कृष्णजीची ॥ ६ ॥

## जनाबाईचे[1] स्फुट अभंग

(१)

ऐसी कीर्तनाची गोडी । वैकुंठींहुनि घाली उडी ॥ १ ॥
आपण वैकुंठींच नसे । भक्तांपाशीं जाण वसे ॥ २ ॥
जनी म्हणे कृपा-निधी । भक्ति-भावाची मांदी[2] शोधी ॥ ३ ॥

(२)

ये रे ये रे माझ्या रामा । मन-मोहन मेघश्यामा ॥ १ ॥
संत-मिसें भेटी । देईं देईं कृपा दृष्टी ॥ २ ॥
आमची चुकवीं जन्म-व्याधी । आम्हां देईं हो समाधि[3] ॥ ३ ॥
जनी म्हणे चक्र-पाणी । करीं ऐसी हो करणी ॥ ४ ॥

(३)

अहो नारायणा । मजवरी कृपा कां कराना ॥ १ ॥
मी तों अज्ञानाची राशी । म्हणून आलें पायांपाशीं ॥ २ ॥
जनी म्हणे आतां । मज सोडविं कृपावंता ॥ ३ ॥

(४)

गंगा गेली सिंधूपासीं । त्याणें अव्हेरिलें तिसी ॥ १ ॥
तरि तें सांगावें कोणाला । ऐसें बोलें बा विठ्ठला ॥ २ ॥
जळ कोपलें जळचरा । माता अव्हेरी कुमारा ॥ ३ ॥
जनी म्हणे शरण आले । पाहिजे ते उद्धरिले ॥ ४ ॥

(५)

तुझी नाहीं केली सेवा । दुःख वाटतसे जीवा ॥ १ ॥
नष्ट पापीण मी हीन । नाहीं केलें तुझें ध्यान ॥ २ ॥
जें जें दुःख जालें मला । तें तूं सोशिलें विठ्ठला ॥ ३ ॥
क्षमा करीं देवराया । दासी जनी लागे पाया ॥ ४ ॥

---

१ ही नामदेवाच्या घरची दासी होती. २ मंडळी. ३ समाधान.

(६)

विवेकसागर[१] । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥
मरोनियां जावें । बा माझ्याच्या पोटा यावें ॥ २ ॥
ऐसें करीं गा माझ्या भावा । बापा माझ्या ज्ञानदेवा ॥ ३ ॥
जाईन ओंवाळोनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ ४ ॥

(७)

देव भावाचा लंपट । सोडुनी आला वैकुंठ ॥ १ ॥
पुंडलिकापुढें उभा । समचरणांची शोभा ॥ २ ॥
उभा बैसेना सर्वथा । पाईं वीट पंढरिनाथा ॥ ३ ॥
सर्व सुखाचा सागर । जनी म्हणे सारंगधर[२] ॥ ४ ॥

(८)

ज्याचा सखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी ॥ १ ॥
उणें पडों नेदी त्याचें । वारें[३] सोशी आघाताचें[३] ॥ २ ॥
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दूरी ॥ ३ ॥
आंग आपुलें वोढोनि[४] । त्याला राखे जो निर्वाणीं[५] ॥ ४ ॥
ऐसा अंकीत[६] भक्तासी । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

(९)

जेवीं जेवीं गा मुरारी । तुज वाढितें शिदोरी[७] ॥ १ ॥
कनकाचिये ताटीं । रत्नजडित ठेविली वाटी ॥ २ ॥
आमुचें ब्रह्म सारंगपाणी । फिरतसे वनोवनीं ॥ ३ ॥
गोपाळांचे मेळीं । करीतसे हो राडोळी[८] ॥ ४ ॥
तुळसीच्या वनीं । उभी राहे दासी जनी ॥ ५ ॥

(१०)

जाति-हीन चोखामेळा[९] । त्याला भक्तीचा कळवळा ॥ १ ॥
त्याचा जाला म्हणीयारा[१०] । राहे वरीं धरी थारा ॥ २ ॥
देव जेवी तया घरा । त्याचा भक्ति-भाव खरा ॥ ३ ॥
देव बाटवीला तेणें । हांसे जनी गाय गाणें ॥ ४ ॥

---

१ विचाराचा समुद्र. २ शार्ङ्ग नांवाचें धनुष्य धारण करणारा, विष्णु. ३ संकट किंवा दुःख ह्यांचा प्रहार—घाव. ४ पुढें करून. ५ संकटसमयीं. ६ स्वाधीन. ७ सिद्ध अन्न. ८ क्रीडा. ९ हा जातीचा महार असून विठोबाचा परम भक्त होता. १० म्हणविणारा—सेवक.

(११)

चोरा संगतीनें गेला । वाटे जातां नागवला ॥ १ ॥
तैसी सांडोनियां भक्ती । धरी विषयाची संगती ॥ २ ॥
अग्नीसवें खेळे । न जळला तरी पोळे ॥ ३ ॥
विश्वासला चोरा । जनी म्हणे घाला खरा ॥ ४ ॥

(१२)

कोणे एके दिवसीं । विठो गेला जनीपासीं ॥ १ ॥
हळूच मागतो खायासी । काय देऊं बा मी तुसी ॥ २ ॥
हातीं धरून नेला आंत । वाढी पंचामृत भात ॥ ३ ॥
प्रेमसुखाचा ढेंकर दिला । जनी म्हणे वीठो धाला ॥ ४ ॥

(१३)

लोलो[1] लागला अंबेचा । विठाबाई आनंदीचा[2] ॥ १ ॥
आदिठाणें पंढरपुर । नांदे कान्हाई सुंदर ॥ २ ॥
गोणाईनें नवस केला । देवा पुत्र देईं मला ॥ ३ ॥
शुद्ध देखोनियां भाव । पोटीं आले नामदेव ॥ ४ ॥
दामाशेटी हरुषला । दासी जनीस आनंद जाला ॥ ५ ॥

(१४)

काय करूं पंढरि-नाथा । काळ साह्य नाहीं आतां ॥ १ ॥
मज टाकिलें परदेशीं । नाहीं विठ्ठला तुजपाशीं ॥ २ ॥
बहु श्रम जाले जीवा । आतां सांभाळीं केशवा ॥ ३ ॥
तुजवीण सखा कोण । माझें करी समाधान ॥ ४ ॥
लीन दीन तुझे पोटीं । जनी म्हणे देईं भेटी ॥ ५ ॥

(१५)

आम्ही बळवंताच्या दासी । कोण गर्भवास सोसी ॥ १ ॥
करूं यमासी ताडण । आमुचा धनी नारायण ॥ २ ॥
जनी म्हणे हरी । पाप उरों नेदी उरीं ॥ ३ ॥

---

१ छंद. २ देवीचा.

## राजाईचे[१] स्फुट अभंग

(१)

घरधन्यानीं केला गुरू । बाई मी आतां काय करूं ।
असून नाहीं हा संसारू । चमत्कारू कृपेचा ॥ १ ॥
धांव पाव गे मेसाई । कवणाचेंही न चले काई ।
सत्यपण तुझिये ठायीं । असून नाहींसें करी हें ॥ २ ॥
मंत्र घेतलासे जैसा । घरीं संताचा वोळसा ।
वोस पडो या हरिदासां । गेले न येती मागुती ॥ ३ ॥
काय सांगूं यांच्या रीती । सोसें पायवणी पिती ।
अवघे भांबरभूते[२] होती । नाचताती आनंदें ॥ ४ ॥
एकमेकांच्या पडती पायां । लौकिकांतुन गेले वायां ।
म्हणती ये गा पंढरीराया । ब्रह्मानंदें डुल्लती ॥ ५ ॥
भोळी सासू गोणाबाई । पांढरा स्फटीक व्याली काई ।
त्यानें जोडला शेषशायी । म्हणे राजाई काय करूं ॥ ६ ॥

(२)

दोन प्रहर रात्र पाहोनि एकांत । राजाई वृत्तांत सांगे माते ॥ १ ॥
अहो रखुमाबाई विठोबासी सांगा । भ्रतारासी कां गा वेडें केलें ॥ २ ॥
वस्त्रपात्र नाहीं खाया जेवायासी । नाचे अहर्निशि निर्लज्जसा ॥ ३ ॥
चवदा मनुष्यें आहेति माझे घरीं । हिंडती दारोदारीं अन्नासाठीं ॥ ४ ॥
बरा मार्ग तुम्ही उमजोनी सांगा । नामयाची राजा[३] भली नव्हे ॥ ५ ॥

---

## गोणाईचे[४] स्फुट अभंग

गोणाई म्हणे नाम्या सांडीं देवपिसें । बळें घर कैसें बुडविशी ॥ १ ॥
जनाची लेंकुरें वर्तताती कैशीं । तूं मज जालासी कुलदीपु[५] ॥ २ ॥
धन्य धन्य पुत्र-कलत्रें नांदती । अभाग्याचे चित्तीं पांडुरंग ॥ ३ ॥
यातें जे अनुसरती त्यांचें नुरे कांहीं । हा देव नोहे पाहीं घर-घेणा ॥ ४ ॥
याची भक्ती कैसी लौकिकावेगळी । संसाराची होळी केली नाम्या ॥ ५ ॥
गोणाई म्हणे नाम्या हें रे नव्हे भलें । घर त्वां बुडविलें कुळासहित ॥ ६ ॥

---

१ नामदेवाची बायको. २ वेडे. ३ राजाई. ४ नामदेवाच्या आईचें नांव.
५ कुळाला भूषण (येथें व्याजोक्ति आहे).

### गोंदोबाचे[1] स्फुट अभंग

भावें भक्ति-वादें करावें कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ॥ १ ॥
निष्कामें[2] करावें देवाचें कीर्तन । भय हें सांडून शरीराचें ॥ २ ॥
रणामध्यें कैसा भिडतो रणशूर । होवोनी उदार जीवावरी ॥ ३ ॥
तैसा पांडुरंगीं धरा हो निर्धार । उतरा हा पार भव-सिंधु ॥ ४ ॥
सिंधु उतरोनी लावा जग-ढाल[3] । पाहा तें नवल विठ्ठलाचें ॥ ५ ॥
देव जोडियेला तया काय उणें । गोंदा म्हणे मन धीट करा ॥ ६ ॥

---

# कवि नरेंद्र

**नरेंद्र** हा रामदेवराव यादवाच्या दरबारांतील एक कवि होता. त्याला साल व नृसिंह असे दोन भाऊ होते. त्यांनीं अनुक्रमें रामायण व नलोपाख्यान हीं काव्यें लिहिलीं. नरेंद्र पंडितानें 'रुक्मिणी-स्वयंवर' हा ग्रंथ ज्यावेळीं राजसभेंत वाचून दाखविला, त्यावेळीं रामदेवरावाला तो इतका आवडला कीं, तो आपल्या नांवावर घालण्याची त्यानें नरेंद्राला विनंति केली ; पण कवीनें ती साफ नाकारली. त्यानें पुढें नागदेवाचार्याकडे जाऊन महानुभावपंथाची दीक्षा घेतली. रुक्मिणीस्वयंवर या काव्याच्या १८०० व २९३४ ओव्यांच्या हस्तलिखित पोथ्या सांपडतात ; परंतु पहिल्या ८७९ ओव्याच महानुभाव लोकांना मान्य आहेत. या काव्याचा रचनाकाल श० १२१३–१४ हा आहे.

विशेष माहितीकरितां पहा :—नरेंद्रकविकृत रुक्मिणीस्वयंवर—सं० वि. भि. कोलते.

---

१ नामदेवाच्या मुलांपैकीं एकाचें नांव. २ कामनेवांचून. ३ झेंडा, ध्वज.

## रुक्मिणी-स्वयंवर

### कथारंभ

ओव्या

आतां परियसा कथा-मुख[१] । कैसी कवितेची रेख[२] । तुम्हां दीजैल[३] आनंद-सुख । साहानुकेसी[४] ॥ १ ॥ श्रीचक्रधराचा[५] वाणितां कीर्तिचंद्रु । चढवीन सुखाचा समुद्रु । जळसेन[६] करीन म्हणे नरींद्रु । सभेचे लोक ॥ २ ॥ आदि-कवीचें बोलणें । वेदांवरि[७] रचिलीं स्मृति-पुराणें । परि सरि न पवेति[८] पवित्रपणें । श्रीकृष्णकथेसीं ॥ ३ ॥ आणिकें काव्यें नाटकें कथा । आख्यानें प्रबंध चित्र-गाथा । परि सरि न पवेति[८] सर्वथा । देवाचिया पवाडेयासीं[९] ॥ ४ ॥ श्रीकृष्णु परब्रह्म निरवधी[१०] । येर अवतार ते प्रतिनिधि । अंशकळा[११] अवतरती हे प्रसिद्धी । देव बोलती ॥ ५ ॥ या कारणें देवकी-नंदनेंसीं । आणिक देव न पवेति सरिसी[१२] । म्हणौनि श्रीप्रभूचीं चरित्रें गोडसीं । सकळ शास्त्रें पांता[१३] ॥ ६ ॥ याचि कारणें शुकादिकीं आपण । ज्ञानाचें करूनि मेळवण[१४] । शब्द-ब्रह्म दुहिलें अदुहन[१५] । काढिलें लीळामृत ॥ ७ ॥ तया रस-कवींचे शब्द । चंद्रकळेसी बोलेती[१६] ब्रीद[१७] । ते आइकतां निगे[१८] दोंद[१९] । क्षीर-सागरासी ॥८॥ कुंकुमाची[२०] वेलि लांबी । तिया मुक्ताफळांचिया तुरंबी[२१] । तैसिया अक्षेरांचिया लोंबी[२२] । कविता-लते ॥ ९ ॥ प्रबंधिचा झळके परिमळु[२३] । तेथ खांचनां[२४] होय मळयानिळु । सराउ[२५] दे पदाचा ढाळु[२६] । कामिनीं-कटाक्षांसी ॥ १० ॥ साहित्यसेवंतियांचां घाटौलीं[२७] । जे ग्रंथदेवते वाति[२८] लाखौली[२९] । विणेयापासौनि[३०] तयाचां बोलीं । वोता[३१] रंगु दिसे ॥ ११ ॥ उन्मेख-चंद्राचां[३२] तुषारीं[३३] । कथा-कापुरकेळीचां[३४] उदरीं । प्रमयांचा[३५] पोतास[३६] कवणेपरी । निफजे[३७]

---

१ कथेचा आरंभ. २ सुंदर मांडणी. ३ देईल. ४ शांतिसमाधानासह. ५ श्रीकृष्णाचा. ६ जलशयन, शांत, सुखी. ७ वेदांच्या आधारावर. ८ पावती. ९ यशोगीतास. १० अनंत, अमर्याद. ११ अंशमात्रेंकरून. १२ बरोबरी. १३ पाहतां. १४ आंबोण. १५ दोहन करण्यास कठीण असें. १६-१७ पराक्रमाच्या गोष्टी सांगतात. १८-१९ भरतें येतें, आनंद होतो. २० कुंकुम-केशराची. २१ मंजिऱ्या. २२ कणसें. २३ सुवास. २४ तुच्छ. २५ अभ्यास, शिकवण. २६ डौल. २७ कलिका. २८ वाहाती. २९ लक्षसमूह. ३० तंबोऱ्यापेक्षां. ३१ अधिक. ३२ ज्ञानरूपी चंद्राच्या. ३३ वर्षावांत. ३४ कापूर हा केळीपासून निघतो अशी कल्पना आहे. ३५ प्रमेयांचा, सिद्धांतांचा. ३६ भीमसेनी कापूर. ३७ उत्पन्न होई.

जें देशीं सरतें[१] ॥ २५ ॥ जैसें मेघांचिये जवळिके । जरि बापैये[२] नव्हेति बोलिके । तरि भू-गोळकाची पव्हे[३] उदकें । कवण भरिते ? ॥ २६ ॥ तैसें कळाविदाचेनि[४] रितु-राजें[५] । सुरंग[६] शब्द कोकिळ कुजे[७] । तया सुखाचिये सेजे । विसंवातिये[८] रस-राजहंसें ॥ २७ ॥ जाणिवेचेनि[९] चंद्र-मंडळें । रस-समुद्रा भरितें चढे आगळें[१०] । यऱ्हवीं उपेखे[११] वडवानळें । नेणिवेचेनि[१२] ॥ २८ ॥ जरि रसु वोडवे[१३] शब्द-वेधी । तरि नेणिवेचिया लोहातें वेधी । तेवीचि अमरा होति देहसिद्धी । कवितेसी ॥ २९ ॥ आतां सुमन[१४] देतु अवधान । धुमकुसें[१५] साहित्याचेन । जग भोजें[१६] नाचवीन । आनंदाचां ॥ ३० ॥ आधींचि जगा चंदन आवडे । वरि देवाचें अनुलेपन[१७] जोडे । तरि कवणां वालभ[१८] न पडे । तया सुखाचें ? ॥ ३१ ॥ तैसें आइकतां श्रीकृष्ण-चरित्र । होय सकळ सुखाचें छेत्र[१९] । वरि जोडे ब्रह्म-सुख पवित्र । ते मऱ्हाटी बोलैन ॥ ३२ ॥ जिये भाषेचिये रसवृत्ती । सा[२०] भाषांचे कुपे[२१] कीजेति निगुती[२२] । ते मऱ्हाटी कवण जाणे निरूती । जे रसांचें जीवन ॥ ३३ ॥ ते मऱ्हाटे बोल रसिक । वरि दावीन देशियेचें बिक[२३] । म्हणैन सव्याख्यान श्लोक । मिसें वोवियेचेनि ॥ ३४ ॥ चौदा विद्यांचीं रसायनें । असेखां[२४] धर्मांचीं जीवनें । काढुनि ब्रह्म-सुखाचें बोनें[२५] । सुकें[२६] केलें भागवत ॥ ३५ ॥ तो पुराणांतुल आनंद-समुद्रु । तेथ दशम स्कंदु तोचि चंद्रु । तें चांदिणें सांधैन म्हणे नरेंद्रु । रुक्मिणी-सैंवर ॥ ३६ ॥

---

१ सर्वमान्य, चालणारें. २ चातक. ३ पाणपोई. ४ मर्मज्ञांच्या. ५ वसंतामुळें. ६ सुंदर, गोड. ७ गातो. ८ विश्रांति घेतात. ९ ज्ञानाच्या. १० विशेष. ११ निस्तेज होतो. १२ अज्ञानाच्या. १३ पुढें करी. १४ सज्जन. १५ गर्दीनें. १६ कौतुकानें. १७ उटी. १८ आवड, प्रेम. १९ आश्रयस्थान. २० सहा (संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, पैशाची, मागधी व शौरसेनी). २१ बाटल्या. २२ नीट, कौशल्यानें. २३ महत्त्व. २४ सर्व. २५ भोजन. २६ शुकमुनीनें.

जें देशीं सरतें[१] ॥ २५ ॥ जैसें मेघांचिये जवळिके । जरि बापैये[२] नव्हेति बोलिके । तरि भू-गोळकाची पव्हे[३] उदकें । कवण भरिते ? ॥ २६ ॥ तैसें कळाविदाचेनि[४] रितु-राजें[५] । सुरंग[६] शब्द कोकिळ कुजे[७] । तया सुखाचिये सेजे । विसंवतिये[८] रस-राजहंसें ॥ २७ ॥ जाणिवेचेनि[९] चंद्र-मंडळें । रस-समुद्रा भरितें चढे आगळें[१०] । यऱ्हवीं उपेखे[११] वडवानळें । नेणिवेचेनि[१२] ॥ २८ ॥ जरि रसु वोडवे[१३] शब्द-वेधी । तरि नेणिवेचिया लोहातें वेधी । तेवींचि अमरा होति देहसिद्धी । कवितेसी ॥ २९ ॥ आतां सुमन[१४] देतु अवधान । धुमकुसें[१५] साहित्याचेन । जग भोजें[१६] नाचवीन । आनंदाचां ॥ ३० ॥ आधींचि जगा चंदन आवडे । वरि देवाचें अनुलेपन[१७] जोडे । तरि कवणां वालभ[१८] न पडे । तया सुखाचें ? ॥ ३१ ॥ तैसें आइकतां श्रीकृष्ण-चरित्र । होय सकळ सुखाचें छेत्र[१९] । वरि जोडे ब्रह्म-सुख पवित्र । ते मऱ्हाटी बोलैन ॥ ३२ ॥ जिये भाषेचिये रसवृत्ती । सा[२०] भाषांचे कुपे[२१] कीजेति निगुती[२२] । ते मऱ्हाटी कवण जाणे निरूती । जे रसांचें जीवन ॥ ३३ ॥ ते मऱ्हाटे बोल रासिक । वरि दावीन देशियेचें बिक[२३] । म्हणैन सव्याख्यान श्लोक । मिसें वोवियेचेनि ॥ ३४ ॥ चौदा विद्यांचीं रसायनें । असेखां[२४] धर्मांचीं जीवनें । काढुनि ब्रह्म-सुखाचें बोनें[२५] । सुकें[२६] केलें भागवत ॥ ३५ ॥ तो पुराणांतुल आनंद-समुद्र । तेथ दशम स्कंदु तोचि चंद्र । तें चांदिणें सांवैन म्हणे नरिंद्रु । रुक्मिणी-सैंवर ॥ ३६ ॥

---

१ सर्वमान्य, चालणारें. २ चातक. ३ पाणपोई. ४ मर्मज्ञांच्या. ५ वसंतामुळें. ६ सुंदर, गोड. ७ गातो. ८ विश्रांति घेतात. ९ ज्ञानाच्या. १० विशेष. ११ निस्तेज होतो. १२ अज्ञानाच्या. १३ पुढें करी. १४ सज्जन. १५ गर्दीनें. १६ कौतुकानें. १७ उटी. १८ आवड, प्रेम. १९ आश्रयस्थान. २० सहा (संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, पैशाची, मागधी व शौरसेनी). २१ बाटल्या. २२ नीट, कौशल्यानें. २३ महत्त्व. २४ सर्व. २५ भोजन. २६ शुकमुनीनें.

# भास्करभट्ट बोरीकर

भास्करभट्ट बोरीकर हे कासार-बोरी (सध्याच्या हैद्राबाद संस्थानांत) येथें राहणारे. ते चांगले व्युत्पन्न पंडित आणि मोठे कवि होते. प्रथम ते वेदांत-मार्गानुयायी होते; पण नंतर ते महानुभावपंथांत शिरले. चक्रधराचे पट्टशिष्य श्रीनागदेवाचार्य यांच्या जवळून त्यांनीं दीक्षा घेतली होती. नागदेवांच्या मागें बाइदेवबासांनंतर महानुभावपंथाचें आचार्यत्व भास्करभट्ट बोरीकरांकडेच आलें होतें. नागदेवाचार्यांच्या मृत्यूनतर त्यांनीं आपलीं महत्त्वाचीं काव्यें लिहिलीं. 'शिशुपालवध', 'उद्धवगीता' आणि 'पूजावसर' हीं त्यांचीं मुख्य काव्यें होत. यांचा लेखनकाल स्थूलमानानें शके १२३०–३१ हा आहे. शिशुपालवध हें काव्य वि. ल. भावे यांनीं १९२६ सालीं प्रथम प्रसिद्ध केलें.

विशेष माहितीकरितां पहा:—भास्करभट्ट बोरीकर—वि. भि. कोलते, भास्करभट्टकृत उद्धवगीता—सं० वि. भि. कोलते.

## शिशुपालवध

### शिशुपालावरील स्वारीची तयारी

ओव्या

स्वस्ति[1] श्रीचक्रधरा। माझी विनती अवधारा। येन्हवीं[2] यावें दातारा। यागसिद्धीलागीं ॥ १ ॥ अरिराये विभांडावे[3]। मग राजसूययागा यावें। ऐसे माझे पुरवावे। मनोरथ ॥ २ ॥ सांडौनि सकळै[4] काजें। देवें येथें करावें बीजें[5]। नातरी राणीवु[6] सांभाळिजे। मज दीजे अनुज्ञा ॥ ३ ॥ ऐसेयां सुवर्मीं[7] बोलां। सर्वज्ञ रात्रो मानवला[8]। मग संदेहा मानु दिह्नला। इच्छावशें ॥ ४ ॥ मग देवो भणे[9] बळिभद्रातें। दोनी कार्यें प्रस्तुतें[10]। कवण कीजे तें निरुतें[11]। तें सांगा तुह्मी ॥ ५ ॥ तवं बळभद्रें भणितलें। आम्हां हेंचि प्रत्यया आलें। जें चालावें सर्वदळें। शिशुपाळावरी ॥ ६ ॥ जें चैद्यें[12] केलें। तें आतांचि नारदें सांगीतलें। तें देवो काय विसरले।

---

१ क्षेम. २ सहज. ३ मारावे. ४ सकळही. ५ स्थलांतर, आगमन. ६ राज्याधिकार. ७ मार्मिक. ८ तोषला. ९ म्हणे. १० नजीक येऊन ठेपलेलीं. ११ निश्चयानें. १२ शिशुपाळानें.

राणेपणें[1] ॥ ७ ॥ व्याधी आणि वैरी । यें कोवळीं जवंवेन्ही । तवं तोडावीं सर्वप्रकारीं । जाणतेनी ॥ ८ ॥ वैरी सरिसा[2] जीये[3] । तरी निद्रा कैसेनि ये । लांबतिये[4] सुरिये[5] । केवि लाजिजे ना ? ॥ ९ ॥ रावो[6] राणिये[7] जाला[8] । जरि घे लोहाचा[9] कांटाळा । तरि क्षत्रियाचेया कुळां । बोलु लागे ॥ १० ॥ पायें धूळि रगडे । तरि सळें[10] माथेयां चढे । तयाही वैर साधन घडे । अचेतनासी ॥ ११ ॥ आगीं हातु लावों भीजे[11] । पाणियां तरि मीठी दीजे[12] । भलतेन निकें[13] मारिजे । तिहीं लोकीं ॥ १२ ॥ म्हणोनि असाहानेयां[14] होइजे । पुढां भाटु धाडिजे । पाठीं आपण जाइजे । अमोलपणें[15] ॥ १३ ॥ नातरि राणीव[16] सांडावी । कापडें भगवावीं । वाराणशी सेवावी । तापसां होवोनी ॥ १४ ॥ तवं म्हणे यादवनरेंद्रु । नीकें म्हणताए बळिभद्रु । आम्हां हाचि मंत्रु । प्रत्यया आला ॥ १५ ॥ उद्धवदेवा तुमचां मतीं । यादवांची राणीव धडौती[17] । तरि काइ कीजे प्रस्तुतीं । तें तुम्हीं सांघा[18] ॥ १६ ॥ तवं म्हणे उद्धवदेवो । जी तूं सर्वज्ञरावो । तुवां नेणीतिला[19] ठावो[20] । कवणु असे ? ॥ १७ ॥ आम्ही असों मंत्रीपणें । खावों राउळींचीं जेवणें । म्हणौनि कांहींएक बोलणें । तऱ्हीं लागे ॥ १८ ॥ न मिळतां नायकवडी[21] । दळाची आइती[22] थोडी । म्हणौनि चालिजे दडवादडीं[23] । हा मंत्रूचि नोहे ॥ १९ ॥ अवंदांचा[24] काळीं । मोटकी[25] राणीव सांसिनली[26] । सवेंचि विग्रहो[27] परमंडळीं । कवणें बोलें ? ॥ २० ॥ शिशुपाळाजवळां । असे रायांचा मेळा । जरासंदु एकला । कवणां नपुरे[28] ! ॥ २१ ॥ जरासंदाचा घायेवारा[29] । लागला यादवां वीरां । तो आझूंई[30] भेदरा[31] । फिटेचि ना ॥ २२ ॥ ऐसें वदतां कोपाल । येऱ्हवीं पुढें पळाल । गिरि डोंगर लंघाल । देखत-खेवों[32] ॥ २३ ॥ कीरू[33] तुम्हीचि वीरु धाकड[34] । ते तवं निऱ्हां[35] भेड[36] । तरी चालिजे[37]

---

१ मोठेपणें. २ बरोबर. ३ राहात असेल. ४ लोंबत असलेल्या. ५ सुरीनें. ६-८ राज्यावर बसलेला राजा. ९ शस्त्राचा. १० ईर्ष्येनें, एकदम. ११ भितात. १२ देतात. १३ नीट, बरवें. १४ (अव्यवस्था) सहन न करणारा. १५ पुरुषार्थानें, पराक्रमाला शोभेल अशा रीतीनें. १६ राज्य. १७ उत्तम, व्यवस्थित. १८ सांगा. १९ ठाऊक नाही असा. २० गोष्ट. २१ सेनापति. २२ सामुग्री, तयारी. २३ तातडीनें. २४ यंदाच्या. २५ चांगली. २६ बहरली. २७ भांडण. २८ आटोपत नाहीं. २९ तडाका. ३० अजून. ३१ भय. ३२ देखतक्षणीं. ३३ खरोखर. ३४ बलवान. ३५ केवळ, अगदीं. ३६ भ्याड. ३७ स्वारी करावी.

हे मति कुड[१] । अपाडपणें[२] ॥ २४ ॥ हातींचिया[३] मोहडां[४] । सिंहो करी रगडा । तो नुचली चवडा[५] । कोल्हेयावरी ॥ २५ ॥ आंगिचेनि धुधुवाटें[६] । वायो न मोडी तनकुटें[७] । आडमोडें[८] करी खरांटे[९] । महातरूंचे ॥ २६ ॥ दिवाकराची धाडी[१०] । साइलिएतें न मोडी । कसकसां रगडी । अंधकारातें ॥ २७ ॥ तो धावडूं[११] असे आवेशला । तेयावरी तुम्हीं राये चाला । तरी रोकडी अवकळा । हेचि एकी ॥ २८ ॥ म्हणौनि आपणेयां उखेडी[१२] न पडे । शिशुपाळु हातां चढे । ऐसा मंत्रु घडे । तरि तोचि कीजे ॥ २९ ॥ तूं धर्माचा कुढावा[१३] । तरि तेयाचा अडलावो[१४] करावा । अवदसा या पांडवां । येवों नेदावी ॥ ३० ॥ आजी तुझेनि बळें । जीणावीं[१५] राज्यकुळें । मग यज्ञतरूचीं फळें । हातें तोडावीं ॥ ३१ ॥ म्हणौनि वऱ्हाडिकें[१६] जाइजे । तेथ मिळती सकळही राजे । आववींचि होतील काजें । अनायासें ॥ ३२ ॥ दिग्गजा पांडवां-करवीं । रिपूंची अवधी[१७] तोडावी । कांटियां कांटी झाडावी । बाहिरी बाहिरी[१८] ॥ ३३ ॥ भीमसेनाकरवीं या । मागधतरूचिया झिपतळिया[१९] । प्रताप-भानवसीं[२०] जाळाविया । दुफोडी करौनि ॥ ३४ ॥ अग्रपूजेचां वेळीं । शिशुपाळ देइल गाळी[२१] । ते वेळीं तेयाची द्यावी बळी । महाकाळासी ॥३५॥ धुर पडिलेयां पळती । ऐसांही नाइकवडी परतेती । तरि खांडेन[२२] भडाड[२३] देती । पंडुपुत्र ॥ ३६ ॥ मंत्रियां दीक्षागुरू । ऐसें बोलिला उद्धववीरू । तवं केला जयजयकारू । सकळजनीं ॥ ३७ ॥ रामकृष्ण मानवले । म्हणती उद्धवा तूं आमुचे डोळे । राज्य भुंजों[२४] तुझेनि बळें । तिहीं लोकीं ॥ ३८ ॥ मग येणेचि विचारें । नागार्जुनाचेनि[२५] दातारें[२६] । पालानवीले[२७] श्रीचक्रधरें । यादवां करवीं ॥ ३९ ॥

---

१ चुकीची, वाईट. २ दोघांत बरोबरी नसल्यानें. ३ हत्तीच्या. ४ मुखाला, गंडस्थळाला. ५ पंजा. ६ वेगानें, सामर्थ्यानें. ७ गवत. ८ मोडतोडीनें. ९ पर्णहीन, बोडके. १० हल्ला. ११ पिटाळण्यास, धीट. १२ हलकेपणा. १३ साह्यकर्ता, उद्धारक. १४ अडचणींत मदत. १५ जिंकावीं. १६ वऱ्हाडी, पाहुणे म्हणून. १७ वेल. १८ परस्पर. १९ झिलप्या. २० प्रतापरूपी स्वयंपाकगृहांत. २१ शिव्या. २२ तरवारीनें. २३ मार. २४ उपभोगितों. २५-२६ नागार्जुनाचा स्वामी = चक्रधर, श्रीकृष्ण. २७ घोडे (सैन्य) सज्ज करण्यास सांगितलें.

# पंडित दामोदर

महानुभावपंथाचे पहिले आचार्य श्रीनागदेवाचार्य यांचे पंडित दामोदर हे शिष्य. संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषांत ते पारंगत होते. त्यांची पत्नी हीराइसा हिनें आधीं महानुभावपंथाची दीक्षा घेतली आणि मागाहून दामोदर पंडितांनीं घेतली. दीक्षाग्रहणानंतरचा आपला सर्व काळ त्यांनीं निंबा (जि. अहमदनगर) येथें नागदेवांच्या सान्निध्यांत घालविला. ते अत्यंत विरक्त असूनही गायनाची त्यांना विशेष आवड होती. नागदेवाचार्यांच्या अनेक शिष्यांपैकीं केसोबासावर त्यांची विशेष प्रीति होती. केसोबासाच्या मृत्यूनंतर (कित्येकांच्या मतें केसोबासाच्या हयातींतच) दामोदर पंडितांनीं 'वच्छाहरण' हें ओवीबद्ध काव्य लिहिलें. त्यांत आपल्या मित्रप्रेमाचें द्योतक म्हणून केसोबासाचेंच नांव घातलें. (त्यापूर्वी केसोबासानें रचलेल्या रत्नमाळास्तोत्रांत यानें दामोदर पंडितांचें नांव घातलें होतें.) या काव्याशिवाय दामोदर पंडितांनीं लिहिलेल्या चौपद्याही महानुभावांत प्रसिद्ध आहेत. वच्छाहरणाचा रचनाकाल शके १२३८ च्या सुमारास. हें काव्य वि. ल. भावे यांनीं १९२४ सालीं प्रथम प्रसिद्ध केलें.

विशेष माहितीकरितां पहा :—दामोदर पंडितविरचित वछाहरण, सं० वि. भि. कोलते.

## वच्छाहरण

### यमुनावर्णन

ओव्या

कालिंदीजल[1] निर्मल । श्रीकृष्ण-कांती श्यामल । प्रतिबिंबली म्हणौनि सुनील । होऊनि ठेली ॥ १ ॥ भक्तिभावें वोळगतां[2] । केवि वर्णावी सायुज्यता[3] । जेयाचियां सन्निधीं सरूपता[3] । जडां[4] जाली ॥ २ ॥

---

१ यमुनेचें पाणी. २ सेवा करीत असतांना. ३ सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता हे मुक्तीचे चार प्रकार आहेत. ४ निर्जीव वस्तूंना.

देखौनि श्रीचक्रपाणि । कैसी संभ्रमित जाली तरंगिणी[1] । कीं आनंदली अंतःकरणीं । रोमांच दाटले ॥ ३ ॥ कीं आलिंगावेया श्रीकृष्णुराजा । तियां बहुति केलिया भुजा । तैसे तरंग पढियासले[2] मज । कालिंदीयेचे ॥४॥ मग आनंदसागरीं मीनली[3] । तैसी निश्चल जाली । कीं देहभाव विसरली । श्रीकृष्णवेधें ॥ ५ ॥ कीं जन्मली देवाचां चरणीं । तें उतावीळपण असे मनीं । म्हणौनि भेटों आली मंदाकिनी[4] । कालिंदी नव्हे ॥ ६ ॥ कीं श्रीकृष्णाचिया संगतीं । आमुची फिटैल अधोगती । म्हणौनि भेटों आली भोगावती[5] । पाताळौनी[6] ॥ ७ ॥ आधींचि पढिजे[7] पुराणीं । वरि स्पर्श जाला देवाचां चरणीं । तेथौनि[8] तीर्थां सिरोमाणि । ऐसें बिरीद[9] जालें ॥ ८ ॥ सोमकांतीं[10] बांधले घाट । जेथ हिरेलग[11] वाळुवंट । मुक्तिगर्भ[12] सुक्तिसंपुट[13] । दिसताती ॥ ९ ॥ श्रीकृष्णकांतीची फांकतसे किळ[14] । तैसे ठाईं ठाईं इंद्रनीळ । रत्नकूटाची[15] केवाळु[16] मौवाळ[17] । उदकाजवळीं ॥ १० ॥ कीं तें रत्नाकराचें अर्धांग । म्हणौनि आंगाथिलें[18] ठीकलग[19] । तैसें एके वेळे सप्तांग[20] । लेणें[21] लेइली ॥ ११ ॥ कीं कैवल्यनाथा श्रीचक्रपाणी । नवरत्नांची ओवाळणी । करीं कमळांची उचलनी[22] । तैसी दिसतसे ॥ १२ ॥ उभयकुळा द्विजवृंदें[23] । निजकर्मरतें निःशब्दें । दृष्टिपूतें ठेवित पदें । जैसे मुनिराज ॥ १३ ॥ एकांगुष्टतपिये[24] बक । नासाग्रीं दृष्टि घालिती ढोंक[25] । यज्ञदीक्षित[26] तैसे चक्रवाक । प्रियातें सांडिती ना ॥ १४ ॥ प्रकृति-पुरुष-विवेकातें[27] । जैसे परमहंस जाणते । तैसे क्षीरानीरा निवाडू[28] करिते । ते निर्मळ राजहंस ॥ १५ ॥ जेयाचेनि जडें[29] वेधती । लतातरू रोमांचु दाटती । पशु चरों विसरती ।

---

१ नदी. यमुना नदीला येणाऱ्या लाटा म्हणजें श्रीकृष्णदर्शनानें तिच्या ठिकाणीं निर्माण झालेला संभ्रम दाखवीत होत्या. तिसऱ्या व चौथ्या ओवींत कवीनें या लाटांवरच अनेक कल्पना केल्या आहेत. २ भासले. ३ विलीन झाली. ४ गंगानदी. ५ पाताळांतील गंगा. ६ पाताळांतून. ७ वर्णिलेली, इतकी थोर. ८ तेव्हांपासून. ९ कीर्ति, लौकीक. १० सोमकांत हा चंद्रप्रकाशानें पाझरणारा एक मणि. ११ हिरेजडित. १२ मौक्तिक आंत असलेला. १३ सुक्ति (शुक्ति)= शिंपले–त्याचा करंडा. १४ प्रकाश, किरण. १५ कूट=पूड, चूर्ण. १६ बारीक वाळू. १७ मऊ. १८ स्वीकारलें. १९ रत्नजडित अलंकार. २० शरीराच्या सातही अवयवांच्या ठिकाणीं. २१ दागिने. २२ उठाव, उचलणें. २३ पक्ष्यांचे समूह. २४ एका आंगठ्यावर उभे राहून तपश्चर्या करणारे. २५ पक्षिविशेष. २६ यज्ञाचें व्रत ज्यांनीं घेतले आहे असे; यांना व यांच्या पत्नींना यज्ञ संपेपर्यंत आपली जागा सोडून जातां येत नाहीं. २७ माया व जीव यांचा विचार. २८ वेगळे. २९ निर्जीव वस्तु.

तो ध्वनि आइकौनियां ॥ १६ ॥ जेयाचेनि दृष्टिपातें । पांखिरुवें[१] जालीं आनंदभरितें । हें काई वानावें श्रीकृष्णातें । जेयाचां नामींचि वेधु[२] ॥ १७ ॥ मेघीं झांकोळलेयां[३] रवीचा प्रकाशु । न[४] धरे[४] पद्मिनीचा[५] विकासु । तैसा गोपवेशें गुप्त परेशु[६] । परि वेधु संचरताती ॥ १८ ॥ हातिरुवें[७] सिंहेसीं खेळत । मृग व्याघ्रासीं कुरुवाळा[८] करित । मोराचां पाखवां[९] विसंवत । फणिक[१०] देखा ॥ १९॥ मूषक मांजरांचे पालखतीं[११] । अश्वमहिषां परम प्रीती । यमुनेचां पानियेडां[१२] दिसती । निर्वैर भूतें ॥ २० ॥ धन्य तेथिचीं जलचरें । जियें अवलोकिती ईश्वरें । वरौतीं येवौनी आनंदभरें । पाळांती[१३] श्रीमूर्तीतें ॥ २१ ॥ श्रीकृष्णाचें रूप सांवळें । जलाभीतरीं प्रतिबिंबलें । तें उतावेळपणें आळंगिलें । सकळीं मत्स्यादिकीं ॥ २२ ॥ ब्रह्मादिक भूलविले विज्ञानें[१४] । देवांगणा बरवेपणें[१५] । चराचरां वेधु जियेचेनि गुणें । ते शक्ति वानौं[१६] नेणें ॥ २३ ॥ ब्रह्मचारी ग्रहस्त[१७] । वानप्रस्थ यति सुस्नात । नित्यें नैमित्यकें कर्मे करीत । आश्रमभेदें ॥२४ ॥ एक अघमर्षणीं[१८] रिघत । एक मृत्तिकास्नानें करीत । एक कर्मचि तारक मानीत । नेणती परब्रह्मातें ॥ २५ ॥ घाटीं जपियांचिया[१९] कोडी[२०] । कूर्मासनीं बैसले त्रिदंडी[२१] । नमस्कारीं व्याकुळ एकदंडी । जवळांचि[२२] देवो देखती ना ॥ २६ ॥ आश्रमधर्माचेनि अभिमानें । कर्मयागाचेनि यजनें । ईश्वरतत्त्वाचें जाणणें । तें आनौतेंचि[२३] ठेलें ॥ २७ ॥ नसतां प्रकाश-संपत्ती । अंधकारा दवडों पांती[२४] । ईश्वरकृपेवीण जाणों म्हणती । परा-वस्तूतें[२५] ॥ २८ ॥ जैसा जवळां असतां परमात्मा । ठाउवा न होय विषयारामा[२६] । तैसा श्रीकृष्ण मूर्त परब्रह्म । न देखती कर्मासक्त[२७] ॥ २९ ॥ हा अपराधु नाहीं जना । प्रवृत्तिनिवृत्ति तोचि कारण । साउमिल[२८] आइका कथानुसंधान । म्हणे मुनि केशिराजु ॥ ३० ॥

---

१ पक्षी. २ आकर्षण. ३ झांकला तर. ४ रोखला जात नाहीं. ५ कमलिनीचा. ६ परमेश्वर, श्रीकृष्ण. ७ हत्तीचीं पिलें. ८ गोंजारणें, ममतेनें अंगावर हात फिरविणें. ९ पिसांच्याच्या छायेंत. १० सर्प. ११ मांडीवर. १२ पाणवठ्यावर. १३ पाहातात. १४ चमत्कार दाखवण्याच्या सामर्थ्यानें. १५ सौंदर्यानें. १६ वर्णन करण्यास. १७ गृहस्थ. १८ पापनाशक स्नानविधींत. १९ जपणाऱ्यांच्या. २० कोटी. २१ संन्याशांचा एक प्रकार. २२ जवळ असलेला. २३ अलिकडेच, दूरच. २४ पाहाती. २५ परमेश्वराला. २६ उपभोगांत रममाण झालेल्यांना, विषयासक्तांना. २७ केवळ कर्माच्या ठिकाणीं रममाण झालेले. २८ पुढील.

# विष्णुदास नामा

विष्णुदास नामा हा संपूर्ण महाभारत लिहिणारा पहिलाच मराठी कवि होय. महाभारताशिवाय त्याचीं एकादशीमाहात्म्य, मुळकासुरवध, कपोताख्यान, हरिश्चंद्राख्यान, वगैरे अनेक आख्यानें, स्फुट अभंग व पदें उपलब्ध आहेत. याची बरीचशी स्फुट कविता प्रसिद्ध संत नामदेवाच्या नांवावर प्रकाशित झाली असली तरी त्या शिंपी नामदेवाहून प्रस्तुत विष्णुदास नामा अगदीं वेगळा आहे. याचा निश्चित काळ सांगण्यास साधन नाहीं; पण ज्ञानेश्वर व एकनाथ यांच्यामधील काळांत तो होऊन गेलेला दिसतो. एकेकाळीं त्याची कविता फार लोकप्रिय होती. त्यामुळें व हा कवि बराच जुना असल्यामुळें त्याच्या काव्यांच्या निरनिराळ्या हस्तलिखितांमध्यें पाठभेद आणि प्रक्षेप व अवक्षेप यांचें रान माजलेलें आढळतें. एकादशीमाहात्म्य, बुधबावनी व महाभारतांतील आश्रमवासिक पर्व एवढेच याचे ग्रंथ मुद्रित झालेले दिसतात. याची कविता साधी व सुबोध आहे. प्राचीन मराठी कवींमध्यें विष्णुदास नाम्याइतका उपेक्षित कवि सध्यां दुसरा नाहीं. म्हणून याच्या महाभारताच्या आदिपर्वातील एक उतारा संक्षिप्त स्वरूपांत पुढें उद्धृत करण्यांत येत आहे.

विशेष माहितीकरितां पहा :—महाराष्ट्रसारस्वत, भा. २—भावे.

## महाभारत

### द्रौपदी-स्वयंवर

ओव्या

नगर सांडूनियां तये वेळीं । मार्गीं राहिले एका तटाकाचे पाळीं[१] । तंव तेथें अपूर्व नव्हाळी[२] । देखते जाले पांडव ॥ १ ॥ सहस्र सूर्य एके वेळे । अति तेजोन्मय उगवले । तैसे प्रकाश देखिले । दाही दिशा व्यापुनियां ॥ २ ॥ तेज देखोनि बहुत । पांडव जाले विस्मित । मग

१ कांठीं. २ नावीन्य, नवलाई.

गगनीं अवलोकित । कायसें तेज म्हणोनियां ॥ ३ ॥ पाहाती तवं एकसरें । तेज पसरलें अंबरें । येतां देखिलें युधिष्ठिरें । वेगवत्तर[1] ॥ ४ ॥ धर्म म्हणे हें अपूर्व काई । आकाशींहूनि येतसे लवलाहीं । कीं सूर्यो होऊनि दों ठाईं । भूमंडळा येतसे ॥ ५ ॥ परि सूर्य नव्हे एक्या गुणें । त्याचें वक्र चालणें । तया अधोगति येणें । हें न घडे सर्वथा ॥ ६ ॥ कीं निर्धूम होऊनियां वन्हि । उतरतसे ये मेदिनी । तरी त्याचें वर्तणें उर्ध्ववांचुनी । नव्हे अनारिसें[2] ॥ ७ ॥ तरी कायसा हा तेजाचा पसरु । धर्मा संशयो पडला थोरु । तवं पराशराचा कुमरु । अति समीप पातला ॥ ८ ॥ पाहाती तवं पुरुषाकारु । देदीप्यमान मनोहरु । समीप आला मुनीश्वरु । व्यासदेवो ॥ ९ ॥ मस्तकीं जटाभार मिरवला । कंठीं शोभतसे जपमाळा । खांदिये कृष्णाजीन वर्ण नीळा । हातीं कमंडलु झळकतु ॥ १० ॥ ऐसा योगीश्वर ते अवस्वरीं[3] । येतां देखिला पंडुकुमरीं । मग लोटांगणें धरणीवरी । घातलीं देखा ॥ ११ ॥ कमळाहूनि कोमळ । आसन घातलें निर्मळ । स्वामी बैसावें म्हणौनि मंजुळ । बोले धर्मराजु ॥ १२ ॥ ऐसे संतोषले पंडुनंदन । मग करिते जाले स्तवन । म्हणती भवतारक चरण । डोळां देखिले आजी ॥ १३ ॥ जयजयाजी जगद्वंधु । तूं सुरवरां सकळां वंद्यु । धर्मसंरक्षणीं अगाधु । तूंचि एकु स्वामिया ॥ १४ ॥ ऐसें करूनियां स्तुतीस्तवन । मग षोडशोपचारीं पंडुनंदन । करिता जाला पूजन । व्यासदेवाचें ॥१५ ॥ मग व्यास धर्मातें पुसे । तुम्हीं जोहरीं[4] वांचलेति कैसे । येरू म्हणे हृषीकेशें । विवरद्वारें रक्षिलें ॥ १६ ॥ व्यास म्हणे कष्टलेति फार । आतां ऐका माझें उत्तर । होतसे द्रौपदीचें सैंवर । वेगवत्तर तेथें जावें ॥ १७ ॥ राजे जिंकाल सकळ । द्रौपदी पार्थासि घालील माळ । विजयलक्ष्मी वराल । यदर्थीं संदेह नाहीं ॥ १८ ॥ पूर्वीं तपोवनीं नियमें । ऋषिकन्या पवित्रधर्में । भ्रतारप्राप्तीलागीं कामें । तपश्चर्या आचरे ॥ १९ ॥ तीसि तपांतीं द्यावया फळ । कृपेनें पावला शिवदयाळ । माग म्हणतां पांच वेळ । 'दे भ्रतार' बोलली ॥ २० ॥ हांसोनि वदे दयासिंधू । होसी पांचांजणांची वधू । येरी म्हणे समर्थशब्दु । कोणें विपरीत करावा ॥ २१ ॥ ते हे द्रुपदाची नंदिनी । जन्म पावली याज्ञसेनी । तुम्हां पांचांजणांची पत्नी । ते होईल निर्धारें ॥ २२ ॥ आतां पांचाळपुरा करावें गमन ।

---

१ अतिवेगानें. २ वेगळें. ३ अवसरीं, प्रसंगीं. ४ अग्नीत.

तेथें भेटती राम कृष्ण । मग मी पुढती देईन दर्शन । लग्नकाळीं तुम्हांतें ॥ २३ ॥ ऐसें वदोनि आज्ञावचन । अदृश्य जाहाला द्वैपायन । मग साहीजणीं करूनि गमन । पांचाळपुरा चाललीं ॥ २४ ॥ पांडव प्रवेशले द्रुपदनगरीं । बिऱ्हाड न मिळे ब्राह्मणाचे घरीं । मग कुल्लाळाचे[1] मंदिरीं । जाऊनियां राहिले ॥ २५ ॥ मग म्हणे युधिष्ठिरु । येथें विपरित नामें धरूं । तेणें नामें पाचारूं । एकमेकांतें ॥ २६ ॥ धर्मा नांव जयवंतु । भीमा नांव जयबळिवंतु । अर्जुना विजयवंतु । जयसुत नांव नकुळाचें ॥ २७ ॥ सहदेवा नाम महाबळवंतु । ऐसा नांवाचा संकेतु । धर्म अनुक्रमें असे सांगतु । तये वेळीं ॥ २८ ॥ ऐसें जालें हें कथन । ऐकिजे पुढील अनुसंधान । श्रोतीं होऊनियां सावधान । चित्त देऊनि परिसावें ॥ २९ ॥ राया द्रुपदाचे राजमंदिरीं । सभा घनवटली तये अवसरीं । शहाणौ कुळींचे राजे सभेभीतरी । बैसले देखा ॥ ३० ॥ बैसला असे भीष्मद्रोण । शकुनि आणि दुर्योधन । कर्ण सूर्याचा नंदन । अनुक्रमें बैसले ॥ ३१ ॥ मग द्रौपदी ते सुंदरी । आरुढोनियां हस्तीवरी । माळ घेऊनियां करीं । लक्ष्यासमीप उभी असे ॥ ३२ ॥ नोवरी नेतील घाला घालून । म्हणौनि समागमें असे धृष्टद्युम्न । अतिरथी महारथी सैन्य । शाहाणौ क्षोणींसीं[2] राजकुमर ॥ ३३ ॥ वाद्यें वाजती नाना ध्वनीं । गगन गर्जत असे निशाणीं । भेरीचे नाद गर्जती तेणें मेदिनी । दणाणत असे ॥ ३४ ॥ द्रौपदीचें रूप देखुनी । राजे बोलती आपुलां मनीं । म्हणती हें अवघड यंत्र भेदुनी । नेणों कवण ईतें परणील ॥ ३५ ॥ तवं श्रीकृष्ण म्हणे द्रुपदासी । उभें राहुनियां लक्ष्यापासीं । कवण भेदील लक्ष्यासी । तेणें राहावें सादर ॥ ३६ ॥ मग उभा राहिला लक्ष्याजवळा । म्हणे समस्तां भूपाळां । जो कोणी भेदील लक्ष्याला । त्यासि माळ घालील द्रौपदी ॥ ३७ ॥ तेल उततसे प्रलयाग्नीं । त्यामध्यें मच्छाचें रूप पाहोनी । लक्ष्य पाडावें भेदोनी । मग परणावी द्रौपदी ॥ ३८ ॥ पुढती पुढती असें बोलत । वाट रायांची पाहात । कोण्ही कोण्हासी न बोलत । तटस्थ बैसले असती ॥ ३९ ॥ द्रुपदु म्हणे कृष्णातें । कोण्हीही वीर न देखों येथें । जो भेदोनियां लक्ष्यातें । द्रौपदीतें परणील ॥ ४० ॥ तवं बोले राजा सुकर्णु । तुम्हीं केला असे बरवा पणु । येथें लक्ष्य भेदील कोणु । प्राण

---

१ कुंभाराच्या. २ अक्षौहिणी ( २१८७० हत्ती, २१८७० रथ, ६५६१० घोडे, व १०९३५० पायदळ एवढें सैन्य ).

देईल आपुला ॥ ४१ ॥ जरी चुकतील तीन्ही बाण । तरी कढेमाजी द्यावें लोटून । ऐसा अवघड केला असे पण । तो कवणु भेदुं शके ॥ ४२ ॥ लक्ष्य भेदिता जावें जीवें । मग त्या द्रौपदीचें काय ध्यावें । आम्ही राजे सहजस्वभावें । कौतुक पाहावया पातलों ॥ ४३ ॥ मागेंही राजे उदंड होते । सैंवरेंही जालीं बहुतें । परी येव्हडिया लक्ष्यातें । कोण्हीं नाहीं मांडिलें ॥ ४४ ॥ यावरी राजा द्रुपदु म्हणे । क्षत्रियांचें ऐसेंचि काय बोलणें । तरी आतां कवणातें पुसणें । लक्ष्य भेदा म्हणौनी ॥ ४५ ॥ तवं राजा दुर्योधन म्हणे । लक्ष्य पांचां बाणीं भेदणें । श्रीकृष्ण म्हणे वेगु करणें । भेदूनि पाडणें लक्ष्यातें ॥ ४६ ॥ मग उठिला दुर्योधनु । धनुष्या चढविला गुणु । तप्त कढेपासीं येऊनु । लक्ष्य लक्षिता जाहला ॥ ४७ ॥ तयावरी बोले मधुसूदन । लक्ष्य भेदितसे दुर्योधन । अधिक दिधले दोनी बाण । लक्ष्य भेदावें म्हणऊनी ॥ ४८ ॥ मग श्रीकृष्ण म्हणे यादवांसी । उभें राहाणें चौपासीं । लक्ष्य न भेदवे ज्यासी । त्या कढेमाजी लोटावें ॥ ४९ ॥ दुर्योधन कढेमाजी पाहे । तवं तें तेल उतत आहे । मुखीं लागतसे उष्ण आहे[1] । मग पाहे वरुतेंची ॥ ५० ॥ खालुती करुनीयां मान । लक्ष्यावरी केलें संधान । लक्ष्य न भेदितां जाण । गेला बाण आकाशा ॥ ५१ ॥ ते वेळीं तो दुर्योधनु । धनुष्यीं सज्जी दुसरा बाणु । वेगें करी संधानु । न्याहाळुनियां लक्ष्यातें ॥ ५२ ॥ तोही न भेदतां गेला अंबरा । मग घेतला बाण तिसरा । तोही टांकिला तिये अवस्वरा । परी लक्ष्यातें न भेदवे ॥ ५३ ॥ मग म्हणती भीष्मद्रोण । चवथाही वृथा जाईल बाण । परी लक्ष्य न भेदवेचि जाण । म्हणउनी कर्ण धाविंनला ॥ ५४ ॥ श्रीकृष्ण म्हणे सूर्यसुता । या दुर्योधनाचा निवाड न होतां । तूं आलासि धाउनी त्वरिता । वृथा प्राण द्यावया ॥ ५५ ॥ यावरी कर्ण म्हणे मुरारी । तीन बाण असती करीं । लक्ष्य यांनीं न भेदे तरी । मज कढेमाजी उचलूनि घालावें ॥ ५६ ॥ मग श्रीकृष्ण म्हणे दुर्योधनासी । जाय जाय रे जीवें सोडिलासी । उपरि धनुष्य दिधलें कर्णापासीं । म्हणे न लाजसी रे निलाजन्या ॥ ५७ ॥ अरे तूं लक्ष्य काय भेदिसी । आम्हीं काय नेणों तुम्हांसी । कपट करूनियां पांडवांसी । लाखाजोहरीं घातलें ॥ ५८ ॥ जरी येथें अर्जुन असता । तरी एकाचि बाणें लक्ष्य भेदिता । जाय जाय रे परता । झांकी माथा वीरांमध्यें ॥ ५९ ॥ यावरी

---

[1] ज्वाला.

राधेय कर्ण । लक्ष्यावरी सोडी दोनी बाण । ते व्यर्थ गेले मग म्हणे गंगानंदन । सांडी आंगवण[1] उगा राहें ॥ ६० ॥ कळला तयाचा भ्रम जाणा । मग द्रुपदा म्हणे यादवराणा । रायांचेनि लक्ष्य सर्वथा भेदेना । आतां ब्राह्मणांसि विनवावें ॥ ६१ ॥ द्रुपद विनवी ब्राह्मणसभेसी । ब्राह्मण जो भेदील या लक्ष्यासी । हे द्रौपदी माळ घालील त्यासी । स्वामी झडकरीं उठीजे ॥ ६२ ॥ तयाप्रती म्हणती ब्राह्मण । हें लक्ष्य राया भेदील कवण । उगेंचि आमुचे चरण प्रक्षाळुन । द्यावी दान द्रौपदी ॥ ६३ ॥ कैंचा पण कैंचें लक्ष्य । आम्हीं सुब्राह्मण सर्वाध्यक्ष । अभिमानीं वाद्धनि मारवणें प्रत्यक्ष । हें महापातक राजेंद्रा ॥ ६४ ॥ आम्हीं पंचांग हातीं धरावें । तिथि वार नक्षत्रासि सांगावें । त्या ब्राह्मणें लक्ष भेदावें । थितें[2] मुकावें संसारा ॥ ६५ ॥ ऐसें ऐकोनियां बोलणें । अर्जुन धर्माप्रति म्हणे । स्वामी मज आज्ञा देणें । भेदावया लक्ष्यातें ॥ ६६ ॥ मग जयवंत[3] म्हणे विजयवंता । तूं लक्ष्यातें होईं भेदिता । ऐसी आज्ञा जाला देता । पार्थालागीं ते वेळीं ॥ ६७ ॥ मग उभा राहूनियां पार्थु । धोत्रासि कास असे घालितु । द्रुपदासी म्हणतु । लक्ष्य आपण भेदीन ॥ ६८ ॥ ते वेळीं तो कैसा गमला । जैसा खोपेंतूनि[4] सिंह निघाला । कीं महाकाळु चालिला । भूतांवरी जैसा ॥ ६९ ॥ कीं तो प्रळयकाळींचा रुद्र । कोपला करावया संहार । कीं तो क्षोभला बळिभद्र । दक्ष प्रजापतीवरी ॥ ७० ॥ रूपें स्वरूप अति सुंदर । जैसा मदनाचा अवतार । यौवनदशारूढ शरीर । शोभतसे साजिरा ॥ ७१ ॥ ऐसा आला लक्ष्यापासीं । पूजा करूनियां धनुष्यासी । नमस्कारुनियां गुरुद्रोणासी । बाण करीं घेतला ॥ ७२ ॥ नमस्कारिलें श्रीकृष्णनाथा । गंगानंदना आणि वडिलां समस्तां । देखोनियां रायांचिया चित्ता । अति आश्चिर्य वाटलें ॥ ७३ ॥ म्हणती पाहा हो हा ब्राह्मणु । याचा पराक्रम मोठा गहनु । बळेंचि देतसे प्राणु । लक्ष्या केवीं भेदील ॥ ७४ ॥ भटोरें केव्हडें मातलें । द्रौपदीआसेनें भुललें । थित्या जीवासि मुकलें । फुकट मरेल पाहा हो ॥ ७५ ॥ असे सभालोक चर्चा करिती । एक आश्चिर्य मानूनि राहाती । एक टकमकां पाहाती । अति विस्मित होऊनियां ॥ ७६ ॥ मग भीष्मद्रोण तयाकडे पाहे । तव तो आजानुबाहु दिसताहे । म्हणती हा अर्जुनासारिखा वीर आहे । तरी हाचि

---

१ प्रयत्न. २ व्यर्थ. ३ वर ओवी २७ पहा. ४ ढोलींतून, गुहेंतून.

भेदील लक्ष्यातें ॥ ७७ ॥ ऐसें म्हणती एकमेकां । तवं अर्जुन वदे रायां सकाळिकां । हें लक्ष्य मी भेदीन आइका । परी एक वळसा[१] न करावा ॥ ७८ ॥ मज देखोनियां एकला । जरी बहुतीं गलबला केला । तरी मी उर्त्तीर्ण आपुलिया बोला । व्यर्थ मारिले जाल वायांची ॥ ७९ ॥ ऐसें बोलतां ते अवस्वरीं । लोकां समस्तां ठक[२] पडिलें अंतरीं । कित्येक भेभीस्त[३] जाले परोपरीं । अति विस्मयो करूं लागले ॥ ८० ॥ असो अर्जुनें तये अवस्वरीं । धनुष्य टणत्कारूनि घेतलें करीं । बाण होते त्या माझारीं । एक उचलुनी घेतला ॥ ८१ ॥ विद्या गंधर्वें होती दिधली । ते विधिपूर्वक जपोनि ते वेळीं । मग दर्भशिखा अभिमंत्रिली । ते घातली कढेमाजी ॥ ८२ ॥ उतत होते जे अग्निकल्लोळ । ते जाहाले सुशीतळ । तेणें तेल जालें अति निर्मळ । त्यांत लक्ष्य सकळ दिसतसे ॥ ८३ ॥ मग तेथें रूप पाहोनी । लक्ष्य बरवें न्याहाळोनी । एकेचि बाणें लक्ष्य भेदोनी । मच्छातें तळीं पाडिलें ॥ ८४ ॥ लक्ष्य पडतांचि भूमंडळीं । द्रौपदी अजुर्नातें माळ घाली । हें देखोनियां राजीं सकळीं । अति विरोध मांडिला ॥ ८५ ॥ तवं दिन गेला अस्तमाना । धर्म म्हणे भीमार्जुना । आतां जाईजे स्वस्थाना । मेळीकारां[४] आपुलिया ॥ ८६ ॥ मग बैसोनियां हस्तिणीवरी । निघते जाले वेगवत्तरीं । आले कुल्लाळाच्या मंदिरीं । द्रौपदीतें घेऊनियां ॥ ८७ ॥ द्रौपदी जिंकिलिया उपरी । बोलती नगरींच्या नारी । पाहा हो कैसी अनुपम सुंदरी । जाली अंतुरी भिक्षुकाची ॥ ८८ ॥ असो ऐसें हरुनी आणिलें द्रौपदीसी । तवं कुंती पुसे वाढवेळु[५] कां तुम्हांसी । तो वृत्तांत सांगीजे मजपासीं । कारण काय जाहलें ॥ ८९ ॥ बा रे रात्री बहुत जाली । भिक्षा काय तुम्हांसि मिळाली । ऐसें पुसतसे माउली । तवं धर्म अनुवादत ॥ ९० ॥ माते भिक्षा मिळाली बरवी । आतां अनुज्ञा तुम्हीं द्यावी । तवं कुंती म्हणे वांटूनि घ्यावी । पांचांजणीं मिळोनियां ॥ ९१ ॥ ऐसें माता बोले । तवं पांचही सामोरे पातले । समागमें द्रौपदीतें देखिलें । मग जाहाली विस्मित ॥ ९२ ॥

---

१ धामधूम, गडबड. २ दिङ्मूढता, आश्चर्य. ३ (बेभिस्त), गलितगात्र. ४ वसतीस्थानीं, शिबीरामध्यें. ५ विलंब.

# एकनाथ

ज्ञानदेव, नामदेव ह्यांच्या पाठीमागून सुमारें तीनशें वर्षांनीं एकनाथ झाला. ह्याला साधूंत गणितात, इतकेंच नाहीं, तर ज्ञानदेवाचा प्रत्यक्ष अवतार असें ह्याला समजतात. हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण गोदातीरीं प्रतिष्ठानास म्हणजे पैठणास राहत असे. ह्याचा जन्मकाल निश्चित[1] नाहीं. ह्याच्या बापाचें नांव सूर्यनारायण आणि आईचें नांव रुक्मिणीबाई. ह्याचा बाप लहानपणींच वारला व ह्याचें पालनपोषण ह्याच्या आजानें केलें.

एकनाथाच्या स्त्रीचें नांव गिरजाबाई. ह्यास एक पुत्र आणि दोन कन्या होत्या. पुत्राचें नांव हरिपंडित आणि कन्यांचीं नांवें गोदूबाई व गंगाबाई.

एकनाथ मोठा परोपकारी असून त्याचें आचरण फार पवित्र असे. तसेंच शांति, क्षमा इत्यादि गुणही त्याच्या ठायीं लोकोत्तर होते. पितरांच्या उद्देशानें केलेलें अन्न अन्त्यजांस देणें, उन्हांत तळमळणाऱ्या चांभाराच्या पोराला कडेवर घेऊन घरीं पोहोंचविणें, इत्यादि त्याच्या संबंधाच्या गोष्टींवरून अस्पृश्य मानलेल्या जातींतील लोकांविषयींही त्याच्या अन्तःकरणांत प्रेमभाव असल्याचें स्पष्ट होतें.

एकनाथ स्वतः संस्कृत भाषेंत मोठा पंडित होता, तरी महाराष्ट्र भाषेच्या उद्धाराकरितां त्यानें मुख्यत्वें ओवीबद्ध ग्रंथ केले आहेत; शिवाय कांहीं अभंग व पदेंही केलीं आहेत. ह्यानें हिंदुस्तानी भाषेंतही कांहीं कविता केली आहे. एकनाथाचा गुरु जनार्दनपंत नामें होता, त्या संबंधानें त्यानें आपल्या कवितेंत आपलें नांव एकाजनार्दन असें लिहिलें आहे.

ज्ञानेश्वरीच्या भिन्न भिन्न प्रती जमवून व त्यांतील पाठांतरांचा विचार करून एकनाथानें शके १५०६ त ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत तयार केली.

---

१ एकनाथ हा शके १४७० त जन्मला असें एक, आणि शके १४५५ मध्यें जन्मला असें दुसरें मत प्रचलित आहे.

एकनाथाची भाषा सरळ आहे व तींत फारसे अप्रसिद्ध शब्द नाहींत. ह्याची वर्णन करण्याची शैली चांगली आहे. याचा मरणशक १५२१ आहे. फाल्गुन वद्य ६ रोजीं एकनाथ समाधिस्थ झाला असें वर्णन आहे.

### ह्यानें केलेले ग्रंथ

१ एकनाथी भागवत (भागवताच्या एकादश स्कंधावरील टीका); २ भावार्थ-रामायण; ३ रुक्मिणीस्वयंवर; ४ स्वात्मसुख; ५ चतुःश्लोकी भागवत टीका; ६ हस्तामलक; ७ आनंदलहरी; ८ अभंग; ९ भारुडें वगैरे.

भागवत-निर्णयसागर (सं. पांगारकर), के. भि. ढवळे (आठल्ये), कृष्णानंद सरस्वती; रामायण-निर्णयसागर (देवस्थळी); रुक्मिणीस्वयंवर-चित्रशाळा (देशमुख), समर्थ बुक डेपो (जोशी), के. भि. ढवळे (रानडे); अभंगाची गाथा-तुकारामतात्या, आवटे, इंदुप्रकाश, चित्रशाळा; यांनीं हीं काव्यें प्रसिद्ध केलीं आहेत.

विशेष माहितीकरितां पहा:—महाराष्ट्र सारस्वत, भा. १-भावे; मराठी वाङ्मयाचा इतिहास, खं. २-पांगारकर; श्री एकनाथ महाराजांचें चरित्र-ज. र. आजगांवकर; Eknath-W. S. Deming; एकनाथदर्शन; एकनाथ-न. र. फाटक.

---

## भागवत

### नरनारायणाख्यान

पूर्वीं नारायण या नांवाचा एक ऋषि होऊन गेला. त्यानें बद्रिकाश्रमांत राहून तप आरंभिलें. तेव्हां त्याचें उग्र तप पाहून इंद्राला आपल्या पदाविषयीं शंका आली व त्यानें काम क्रोध वगैरे मंडळी अप्सरांसह त्याच्याकडे त्याच्या तपाचा भंग करण्याकरितां रवाना केली. त्या प्रसंगीं नारायणानें आपली शांति न ढळूं देतां त्यांस फजित केलें अशी कथा या आख्यानांत आहे.

ओव्या

जो अ-जन्मा नित्य त्रि-भुवनीं । जो न जन्मोनि जन्मला योनीं । तेणें धर्माची[1] धर्म-पत्नी । केली जननी दक्ष-कन्या मूर्ती ॥ १ ॥ ते[2] मूर्ति-मातेच्या[3] उदरीं । नर-नारायण अवतारी । एकचि दों रूपेंकरीं[4] । धर्माच्या घरीं अवतरले ॥ २ ॥ तेणें नारदादिकांसि जाण । निरूपिलें नैष्कर्म्यलक्षण[5]। स्वयें आचरला आपण । तें कथन ऐक राया[6] ॥ ३ ॥ नारायण म्हणसी कोणे देशीं । तो बदरिकाश्रमीं आश्रम-वासी । नारद-सनकादिक ऋषि । अद्यापि त्यापाशीं सेवे असती ॥ ४ ॥ त्यासि स्वरूपाचें लक्ष । सहजीं असे प्रत्यक्ष । ते स्वरूप-निष्ठेचा पक्ष । अलक्ष्याचें[7] लक्ष प्रबोधी स्वयें ॥ ५ ॥ तया स्वरूपाचा निजबोध । स्वयें पावावया विशद । अद्यापवरी ऋषि-वृंद । नित्य संवाद करिताती त्यासीं ॥६॥ जें स्वरूप लक्षेना जनीं । तें विशद करूनि दे वचनीं । तेंचि अनुग्रहेंकरूनी । अनुभवा आणी तत्काळ ॥ ७ ॥ ज्ञाते बहुसाळ ऋषीश्वर । त्यांमाजीं नारायण अवतार । तेथें वर्तलें जें चरीत्र । अति विचित्र ऐक राया ॥ ८ ॥ ऐसा नारायणाचा प्रताप । देखोनि निष्ठा दृढ तप । तेणें इंद्रासि आला कंप । म्हणे स्वर्ग निष्पाप वेईल माझा ॥ ९ ॥ त्याचें तप देखोनि परम । म्हणे गेलें गेलें स्वर्ग-धाम । इंद्रें कोपें प्रेरिला काम । अप्सरा-संभ्रमसमवेत ॥ १० ॥ कामसमवेत अप्सरा । सवें वसंतही दुसरा । क्रोध अवघियां पुढारा । जो तापसांतें पुरा नागवी सदा ॥ ११ ॥ तीर्थोतीर्थींच्या अनुष्टाना । क्षमा नुपजे अंतःकरणा । कोप येतांच जाणा । करी उगाणा[8] तपाचा ॥ १२ ॥ क्रोधु तापसांचा उघड वैरी । तापसां नागवी नाना-परी । तोही नारायणावरी । अवघ्यां अग्रीं चालिला ॥ १३ ॥ ऐसीं मिळोनी बिरुदाइतें । आलीं बदरिकाश्रमा समस्तें । नारायण तप करी जेथें । उठावलीं तेथें अनुक्रमेंसी ॥ १४ ॥ वसंतें शृंगारिलें वन । कोकिळा कला-रावें[9] गायन । सुगंध शीतळ झळके पवन । पराग संपूर्ण वर्षती सुमनें ॥१५॥ शस्त्रें तोडितां आकाशासी । आकाश स्वयें सावकाशी । तेवीं कामें छळितां नारायणासी । तो निज-संतोषीं निर्द्वंद्व[10] ॥ १६ ॥ नेणतां नारायण-महिमे ।

---

१ ह्या नांवाच्या ऋषीची. २ त्या. ३ मूर्ति (हें नरनारायणाच्या आईचें नांव). ४ रूपांनीं. ५ पूर्ण ज्ञानाच्या योगानें कर्म करूनही कर्मकर्तृत्वाचा अभिमान नसणें. ६ हे जनकराजा. ७ मनाला व वाणीला अगोचर जें आत्मतत्त्व त्याचें ज्ञान. ८ लूट, नाश. ९ (कल+आरावें) अव्यक्त व मधुर अशा शब्दानें. १० आत्मस्वरूपा-व्यतिरिक्त ज्यास दुसऱ्या कशाचेंही भान नाहीं असा.

धांवोनि घाला घातला कामें । तेव्हां अवघींच पराक्रमें । स्व-निंद्यकर्में लाजलीं ॥१७॥ तेथें अवघीं जालीं पराङ्मुखें । पाठमोरीं निघालीं अधोमुखें । तेव्हां त्यांची गती निःशेखें । नारायण देखे खुंटली ॥१८॥ इंद्रियनियंता नारायण । नेणूनि छळूं गेलीं आपण । यापुढती पुनरागमन । सर्वथा जाण करवेना ॥ १९ ॥ मागें न निघवे निश्चितें । ऐसें जाणोनि समस्तें । थोर गजबजिलीं तेथें । भयचकितें व्याकुळ ॥ २० ॥ जाणोनि नारायण-प्रताप । आतां कोपून देईल शाप । येणें धाकें म्लानरूप । अति स-कंप भय-भीतें ॥२१॥ ऐसी देखोनि त्यांची स्थिती । कृपेनें तुष्टला कृपा-मूर्ती । अणुमात्र कोपु न ये चित्तीं । अभिनव शांती नारायणाची ॥ २२ ॥ इंद्रें केला अपराध । तरी नारायणासि न येचि क्रोध । बाप[1] निज-शांतीं अगाध । न मनी विरुद्ध कामादिकांचें ॥ २३ ॥ न येचि कामादिकांवरी कोप । इंद्रासही नेदीच शाप । नारायणाच्या ठायीं अल्प । कदा विकल्प नुपजेची ॥ २४ ॥ अपकाऱ्यावरी जो कोपला । तो तत्काळ कोपें नागविला । अपकाऱ्या जेणें उपकार केला । तोचि लाधला परमार्था ॥ २५ ॥ अपकाऱ्या उपकार करिती । त्याचि नांव गा परम शांती । ते शांतीची निजस्थिती । दावी लोकांप्रती आचरोनी ॥ २६ ॥ परमार्थाची मुख्यत्वें स्थिती । पाहिजे गा परम शांती । ते शांतीची उत्कट गती । दावी लोकांप्रती आचरोनी ॥ २७ ॥ भय-भीत कामादिक । अप्सरा-गण सारांक । त्यांतें अभय-दानें सुख । देऊनियां देख नारायण बोले ॥ २८ ॥ अहो कामवसंतादिक स्वामी । कृपा करून आलेत तुम्हीं । तुमचेनि पदागमीं । आश्रम-भूमि पुनीत जाली ॥ २९ ॥ तुमचें जालीया आगमन । अवश्य करावें आम्हीं पूजन । हेंचि आमुचें अनुष्ठान । कांहीं बळि-दान[2] अंगीकारा माझें ॥ ३० ॥ अवो अप्सरा देवकांता । तुम्ही भेवों नका सर्वथा । येथें आलिया समस्ता । पूज्य सर्वथा तुम्हीं मज ॥ ३१ ॥ आश्रमा आलिया अतिथी । जे कोणी पूजा न करिती । त्यांची शून्य पुण्य-संपत्ती । आश्रम-स्थिती शून्य होय ॥ ३२ ॥ तुम्हीं नांगीकारितां पूजन । कांहीं न घेतां बळि-दान । गेल्या आश्रम हा होईल शून्य । यालागीं कृपा करून पूजा घ्यावी ॥ ३३ ॥ आश्रमा आलिया अतिथी । तो पूज्य सर्वांस सर्वार्थीं । अतिथी आश्रमीं जे पूजिती । ते आश्रम-कीर्ती शिव वानी ॥ ३४ ॥ व्याही रुसलिया पायां पडती । तेवीं विमुख

---

१ मोठी. २ पूजाद्रव्य.

जातां अतिथी । जे वंदूनियां सुखी करिती । ते सुख पावती स्वानंदें ॥ ३५ ॥ व्याही रुसलिया कन्या न धाडी । अतिथि रुसलिया पुण्य-कोडी[1] । पूर्वापर जे कां जोडी । तेही रोकडी क्षय पावे ॥ ३६ ॥ वैकुंठीं ज्याची निज-स्थिती । तो त्या आश्रमा ये नित्य वस्ती । जे आश्रमीं अतिथी । पूजिती प्रीतीं ब्रह्मात्मभावें ॥ ३७ ॥ ऐसें बोलिला तयांप्रती । परी माझी हे अगाध शांती । हेही नारायणाचे चित्तीं । गर्व-स्थिती असेना ॥ ३८ ॥ ऐक राया अति-अपूर्व । असोनि निज-शांती अनुभव । ज्याच्या ठायीं नाहीं गर्व । तोचि देवाधिदेव निश्चयेंसी ॥ ३९ ॥ जो नित्य नाचवी सुर-नरांसी । ज्या भेणें तप सोडिलें तापसीं । त्या अभय देवोनि काम-क्रोधांसी । आपणापासीं राहविलें ॥ ४० ॥ एवं अभय देत नारायण । स्वमुखें बोलिला आपण । तेणें कामादि अप्सरा-गण । लाज विरोन अधोमुख जालीं ॥ ४१ ॥ देखोनि निर्विकार पूर्ण क्षमा । श्रीनारायण हा परमात्मा । कळों[2] सरलें[2] वसंतादि-कामां । त्याचाचि महिमा वर्णिती स्वयें ॥ ४२ ॥ ऐकें नरदेव-चक्रवर्ती । विदेहा सार्वभौमा भूपती । त्या नारायणाची निज-स्तुती । कामादि करिती सद्भावेंसी ॥ ४३ ॥ जे सदा सर्वांतें छळिती । त्यांहीं देखिली पूर्ण शांती । तेचि शांतीची स्तुती करिती । नारायणाप्रती कामादि क्रोध ॥ ४४ ॥ जेणें संतोषे श्रीनारायण । त्यासी कृपा उपजे पूर्ण । ऐसिया परीचें स्तवन । मांडिलें संपूर्ण परमार्थ-बुद्धी ॥ ४५ ॥ जय जय देवाधिदेवा । तुझिया अविकार-भावा । पाहतां न देखों जी सर्वां । देवां मानवां माझारी ॥ ४६ ॥ मज मन्मथाचा यावा[3] । न साहवे देवां दानवां । मग तेथ इतरां मानवां । कोण केवा साहावयासी ॥ ४७ ॥ त्या मज कामा न सरतें केलें । शांतीचें कल्याण पाहिलें । हें तुवांचि एकें यश नेलें । स्वभाव जिंकिले निज-शांति-योगें ॥ ४८ ॥ तो मी न सरता केला काम । क्रोधा आणिला उपशम । वासनेचा संभ्रम । नित्य निर्भ्रम त्वां केला ॥ ४९ ॥ हे नारायणा तुझी निष्ठा । न ये आणिका तपोनिष्ठा । केला अनुभवाचा चोहटा[4] । शांतीचा मोठा सुकाळ केला ॥ ५० ॥ मागें तपस्वी वाखाणिले । म्हणती काम-क्रोधां

१ पुण्यकोटी. २ कळून आलें. ३ आगमन. ४ चावडी.

जिंकलें । त्यांसिही आम्हीं पूर्ण छळिलें । ऐक तें भलें सांगेन ॥ ९१ ॥ कपिला[१] ऐसा तेजोराशी । क्रोधें तत्काळ छळिलें त्यासी । शाप देतांचि सगरासी । तोही क्रोधासी वश्य जाला ॥ ९२ ॥ जो सर्वदा विघ्नांतें आकळी । विघ्नेशातें[२] कोप छळी । तेणें अतिकोपें कोपानळीं । चंद्रासी तत्काळीं दिधला शाप ॥ ९३ ॥ कोप आला दुर्वासासी[३] । शाप दीधला अंबरीषासी[४] । देव आणिला गर्भ-वासासी[४] । क्रोधें महाऋषी छळिले ऐसे ॥ ९४ ॥ जे दुजी सृष्टी करूं शकती । तेही काम-क्रोधें झडपिजेती । सागरीं पडे इंद्र-संपत्ती[५] । हे क्रोधाची ख्याती पुराण-प्रसिद्ध ॥ ९५ ॥

---

१ सूर्यवंशांतील सगर राजानें यज्ञासंबंधीं घोडा पृथ्वीवर फिरावयास सोडिला, आणि त्याच्या संरक्षणार्थ आपले साठ हजार मुलगे बरोबर पाठविले. वाटेंत इंद्रानें तो घोडा चोरून विवरांत कपिलमहामुनि ध्यानस्थ होता त्याच्या जवळ बांधून ठेविला. तेव्हां एकाएकीं घोडा काय झाला म्हणून पहावयास, ज्या जागीं घोडा अदृश्य झाला ती जागा सगरपुत्रांनीं उकरिली; तों तो घोडा कपिलाशेजारीं दृष्टीस पडला. तेव्हां हाच आपला घोडा चोरणारा असें त्यांस वाटलें. नंतर त्यांच्या गडबडीनें ध्यानविसर्जन करून कपिलानें डोळे उघडून कोपानें त्यांजकडे पाहतांच ते भस्म झाले, अशी कथा रामायणांत आहे. २ चंद्राला आपल्या रूपाविषयीं मोठा गर्व होता. तो एकदां गणपतीकडे पाहून त्याच्या रूपाच्या बेढबपणामुळें त्यास हांसला, तेव्हां गणपतीस कोप येऊन त्यानें चंद्रास तुजकडे कोणीही पाहणार नाहीं असा शाप दिला. मग चतुर्थीव्रताचरणानें चंद्र शाप-मुक्त झाला, अशी कथा स्कंदपुराणांत आहे. ३ एकदा दुर्वास ऋषि, द्वादशीचे दिवशीं, अंबरीष म्हणून सूर्यवंशीय परम धार्मिक राजा होता त्याजकडे आला. तेव्हां राजानें आगतस्वागत करून भोजनास राहण्याविषयीं त्यास प्रार्थिलें. मग दुर्वास होय म्हणून कांहीं उरलेलें आह्निक संपवावयासाठीं बाहेर गेला; तों त्यास परत येण्यास उशीर लागला. त्या दिवशीं द्वादशी थोडी होती, म्हणून व्रतभंग न व्हावा ह्याकरितां अंबरीषानें देवास नैवेद्य अर्पिला आणि तीर्थसेवनरूप पारणा करून तो ऋषीची वाट पाहत बसला. नंतर दुर्वास आला, तेव्हां त्यास हें समजतांच कोपून त्यानें आपल्या केसांतून एक कृत्या निर्मिली, ती राजाकडे धावली तेव्हां विष्णूनें आपलें सुदर्शनचक्र पाठवून तिला मारिलें, इत्यादि कथा भागवतांत आहे. ४ दुर्वासानें अंबरीषाला दिलेल्या शापाकरितां श्री विष्णूला दहा अवतार घ्यावे लागले, अशी कथा आहे. ५ एके समयीं दुर्वासऋषीनें आपल्या गळ्यांतील माळ इंद्रास दिली, ती त्यानें उन्मतपणानें ऐरावताच्या मस्तकावर फेंकून दिली. ती ऐरावतानें आपल्या पायाखालीं तुडवून टाकिली. ह्या अनादरानें दुर्वासास क्रोध येऊन त्यानें तुझें ऐश्वर्य नष्ट होईल असा इंद्रास शाप दिला, आणि त्याप्रमाणें त्याचें ऐश्वर्य नष्ट झालें अशी कथा आहे. हिला लक्षून हें लिहिलें असावें असें वाटतें.

इतरांची गोष्टी कायसी । क्रोधें छळिलें ईश्वरासी[१] । तेणें दीक्षिता द्विज-दक्षासी । शिरच्छेदासी करविता जाला ॥ ५६ ॥ जेथें मी काम स्वयें वसें । तेथें क्रोध वसे सावकाशें । काम-क्रोध असतचि नसे । नारायणा ऐसें तुवां केलें ॥ ५७ ॥ हें परमाद्भुत तुझें वीर्य । आणिकां एवढें नाहीं धैर्य । यालागीं तुझें परिचर्य । सदा मुनिवर्य सेविती चरण ॥ ५८ ॥ शांतीच्या चाडें देवाधिदेवा । जे नित्य करिती तुझी सेवा । ते काम-क्रोधादि स्वभावा । स्मरतां तव नांवा जिंकिती सुखें ॥ ५९ ॥ जेथें सन्मानें काम पुरत । तेथें आदरें अनुग्रहो करीत । काम सन्मानें जेथें अतृप्त । तेथें शाप देत अति-क्रोधें ॥ ६० ॥ यालागीं शापानुग्रह-समर्थ । ते सर्वदा कामक्रोधयुक्त । परी नवल तुझें सत्वोचित । केले अंकित काम-क्रोध ॥ ६१ ॥ मज गर्व नाहीं सर्वथा । हेही तुज नाहीं अहंता । छळवाद्या द्यावी लघुता । अथवा उपेक्ष्यता न करिसी ॥ ६२ ॥ पृथ्वी दुःखी करिती नांगरीं । ते पिकोनि त्यांतें सुखी करी । तेवीं अपकाऱ्या जो उपकारी । तो मोक्षाच्या शिरीं मुगुटु ॥ ६३ ॥ तुजमाजी निर्विकार शांती । हें नवल नव्हे कृपा-मूर्ती । तुझ्या स्वरूपाची स्थिती । आजि निश्चिती कळली आम्हां ॥ ६४ ॥ तूं निर्गुण निरुपम । मायातीत पूर्ण ब्रह्म । तुझें स्वभावें स्मरतां नाम । स-कामांही काम स्पर्शों न शके ॥ ६५ ॥ जो नित्य स्मरे तुझें नाम । त्यासी मी कामचि करीं निष्काम । क्रोधचि करी क्रोधा शम । मोहो तो परम प्रबोध होय ॥ ६६ ॥ जे धीर-वीर निज-शांती । ज्यांसि परमानंदें नित्य तृप्ती । ऐसियांचिया अमित पंक्ति । पाया लागती तूझिया ॥ ६७ ॥ तुज करावया नमस्कार । पुढें सरसे महा-सिद्धींचा संभार । त्यांसही न लभे आवर[२] । तूं परात्पर परमात्मा ॥ ६८ ॥ तुझिया सेवकांकडे । विघ्न रिघतां होय बापुडें । तें रिघावयां तुजपुढें । कोण्या[३] पडिपाडें[३] रिघेल ॥ ६९ ॥ तापसां बहु विघ्नअपावो । आम्हीं करावा अंतरावो । हा आमुचा निज-स्वभावो । नव्हे नवलावो नारायणा ॥ ७० ॥ हृदयींचा मुक्त करोनि काम । बाह्य जप-तप भक्ति-संभ्रम । ऐसे जे कां शठ परम । विघ्नांचा आक्रम त्यांवरी

१ महादेवाचा सासरा दक्षप्रजापति ह्यानें एकदां यज्ञ केला, त्यांत सर्व देवांस बोलाविलें. परंतु महादेवास बोलाविलें नाहीं. तथापि पार्वतीच्या आग्रहामुळें तो तेथें गेला असतां दक्षानें त्याचा आदर केला नाहीं. पुढें महादेवास राग येऊन त्यानें दक्षाचें शिर तोडविलें, अशी कथा स्कंदपुराणांत आहे. २ नियमन, आळा. ३ कोणत्या तोंडानें (पडिपाड म्ह. किंमत, योग्यता).

चाले ॥ ७१ ॥ ते आमची विघ्न-स्थिती । न चले तुझिया भक्तांप्रती । तूं रक्षिता भूत-पती । तेथें विघ्नाची गती पराङ्मुख ॥ ७२ ॥ माझिया निज-भक्तांसी । विघ्नें कैचीं म्हणसी यांसी । ऐक त्याही अभिप्रायासी । सांगेन तुजपाशीं देवाधिदेवा ॥ ७३ ॥ पावावया निज-पदातें । लाता हाणून स्वर्ग-भोगातें । जे नित्य निष्काम भजती तूतें । नाना विघ्नें त्यांतें सुर-वर चिंती ॥ ७४ ॥ उल्लंघूनियां आमुतें । हे पावती अच्युत-पदातें । यालागीं सुर-वर त्यांतें । अति-विघ्नातें प्रेरिती ॥ ७५ ॥ बळी नेदूनि आम्हांसी । हे जाऊं पाहती पूर्ण-पदासी । येणें क्षोभें इंद्रादिक त्यांपासीं । नाना-विघ्नांसी मोकलिती ॥ ७६ ॥ यालागीं त्याच्या भजनापाशीं । विघ्नें छळूं धांवती आपैसीं । विघ्नीं अभिभव[1] नव्हे त्यांसी । तूं हृषीकेशी रक्षिता ॥ ७७ ॥ सांडूनि स-काम कल्पना । जे रतले तुझ्या चरणा । त्यांस आठही प्रहर जाणा । तूं नारायणा रक्षिसी ॥ ७८ ॥ भक्त विघ्नीं होती कासाविसी । धांव धांव म्हणती हृषीकेशी । तेव्हां तूं धांवण्या धांवसी । निष्ठुर नव्हसी नारायणा ॥ ७९ ॥ विघ्न न येतां भक्तांपासीं । आधींच भक्त-संरक्षणासी । तूं भक्तांचे चौंपासीं[2] । अहर्निशीं संरक्षिता ॥ ८० ॥ विघ्न छळूं धांवे सकोप । तंव विघ्नीं प्रगट तुझें स्वरूप । यालागीं भक्तांसि अल्प । विघ्नप्रताप बाधूं न शके ॥ ८१ ॥ कामें छळावें हरि-भक्तांसी । तंव हरि कामाचा हृदय-वासी । तेव्हां विघ्नचि निर्विघ्न त्यांसी । भय भक्तांसी स्वप्नीं नाहीं ॥ ८२ ॥ विघ्न उपजवी विरोध । तंव विरोधा स-बाह्य गोविंद । मग विरोध तोचि महा-बोध । स्वानंद-कंद निज-भक्तां ॥ ८३ ॥ ज्यांसि तुझ्या चरणीं भावार्थ । त्यांसि विघ्नीं प्रगटे परमार्थ । ऐसा भावबळें तूं समर्थ । साह्य सतत निज भक्तां ॥ ८४ ॥ यापरि समर्थ तूं संरक्षिता । तें जाणोनि विघ्नां समस्तां । पाय देऊनि इंद्र-पद-माथां । पावती परमार्था तुझिया कृपें ॥ ८५ ॥ देव संरक्षिता ज्यांसी । विघ्नें छळूं धांवती त्यांसी । मग सकामांची गती कायसी । विदेहा[3] म्हणसी तें ऐक ॥ ८६ ॥ विषय-काम धरोनि मनीं । इंद्रादि देवां बळि-पूजनीं । जे भजले याग-यजनीं । देव त्यांलागोनी करिती विघ्न ॥ ८७ ॥ इंद्र याज्ञिकांचा राजा । स-काम याज्ञिक त्याच्या प्रजा । यज्ञभाग अर्पिती वोजा । पावल्या बळि-पूजा न करिती विघ्न ॥ ८८ ॥ म्हणसी कामादिक विटंबिती । ते निष्काम कदा नातळती । सहज कामा वश्य असती । सदा कर्में करिती स-काम ॥ ८९ ॥ जे मज कामासी वश होती । ते तप वेंचूनि

१ पराभव. २ चोहींकडे. ३ हे जनकराजा.

भोग भोगिती । जे आतुडले[1] क्रोधाच्या हातीं । ते वृथा नागवती तापसी ॥ ९० ॥ प्राणायामें प्राणापानीं । निज प्राणातें आकळोनी । वात वर्ष[2] शीत उष्ण साहोनी । जे अनुष्ठानीं गुंतले ॥ ९१ ॥ जे अल्प अभिमानाहातीं । जे क्रोधासि वश होती । ते शाप देऊनि तप-संपत्ती । व्यर्थ नागविती निज-निष्ठा ॥ ९२ ॥ जे अपार सागर तरती । ते गोष्पदोदकीं बुडती । तेवीं मज कामातें जिणोनि जाती । तेही नागवती निज-क्रोधें ॥ ९३ ॥ मज कामाची अ-पूर्ण काम-वृत्ती । तेचि क्रोधाची दृढ स्थिती । काम-क्रोध अ-भक्तां बाधिती । हरि-भक्तांप्रती तें न चले ॥ ९४ ॥ तुझ्या भक्तांप्रती जाण । न चले काम-क्रोध-बंधन । तो तूं भक्त-पति नारायण । तुज आमुचें कामपण केवीं बाधी ॥ ९५ ॥ नेणतां तुझा महिमा । आम्ही करूं आलों निजधर्मा । तुजपासीं नित्य निज-क्षेमा । पुरुषोत्तमा कृपाळुवा ॥ ९६ ॥ अपकाऱ्या उपकार करिती । या नांव निर्विकार निज-शांती । तेचि शांतीची परिपाक-स्थिती । विप्रकर्त्याप्रती हरि दावी ॥ ९७ ॥ सांगोनियां आपुली स्थिती । कामादिक स्तुति करिती । तंव परमाश्चर्य देखती । स्त्रिया अत्यद्भुती अकस्मात ॥ ९८ ॥ रूप वैभव अलंकार । श्रियेहूनियां सुंदर । सेवेलागीं अति-तत्पर । सदा सादर सावधानें ॥ ९९ ॥ नवल लाघव नारायणा । कैसें या दाखविलें विंदाना । त्या स्त्रिया सकळ सर्वांगना । दिवा खद्योत जाणा तैशा दिसती ॥ १०० ॥ देखोनि त्यांचिया स्वरूपासी ॥ अप्सरा दिसती जैशा दासी । अत्यंत लज्जा जाली त्यांसी । काळिमेसी उतरल्या ॥ १०१ ॥ त्यांचे अंगींचा सुगंध-वात । तेणें भुलला वसंत । मलयानिल जाला भ्रांत । त्याचा अंग-वात लागतां ॥ १०२ ॥ नारायणासी विद्या कैसी । जे भुलवूं आले आपणासी । भुली पाडिली तयांसी । योगमायेसी दावुनी ॥ १०३ ॥ सुंदरत्वें रंभा तिलोत्तमा । जियां मंदर-मथनीं जिंतली रमा । रंभेहुनियां उपमा । उत्तमोत्तमा अति-रूपें ॥ १०४ ॥ तें अति-आश्चर्य देखोन । जाले कामादिक मूर्छायमान । तयांप्रती नारायण । काय हांसोनी बोलिला ॥ १०५ ॥ आम्हीं अवश्य पूजावें तुम्हांसी । कांहीं अर्पावें बलिदानासी । संतोषावया इंद्रासी । यांतील एकादी दासी अंगीकारा तुम्ही ॥ १०६ ॥ यांचें सौंदर्य अति-थोर । म्हणाल होईल अपमानकर । तुम्हांसमान जे सुंदर । तिचा अंगीकार करावा तुम्हीं ॥ १०७ ॥ म्हणाल यांत नाहीं हीन । अवघ्या सौंदर्यें संपूर्ण ।

---

१ सांपडले. २ पाऊस.

कोणी न दिसे आम्हांसमान । केवीं आपण अंगीकारावी ॥ १०८ ॥ जरी नाहीं तुम्हांसमान । सकळ सौंदर्यें अति-संपन्न । तरी एकीचें करावें अंगीकरण । होईल भूषण स्वर्गासी ॥ १०९ ॥ ऐसें नारायणाचें वचन । ऐकोनि हरिखलीं संपूर्ण । करूनियां साष्टांग नमन । मस्तकीं वचन वंदिलें ॥ ११० ॥ ऐकोनि नारायण-वचन । मस्तकांबुजीं करूनियां नमन । ऊर्वशी पुढारून । कामादिगण निघती वेगीं ॥ १११ ॥ नारायणाचे ऊरु-स्पर्शीं । उभी होती नारायणापाशीं । तेंचि नांव जालें तिसी । म्हणती ऊर्वशी स्वर्गांगना ॥ ११२ ॥ ते देवांचे दूत । स्वर्ग पावले समस्त । मग शक्राचे सभेआंत । सांगती अद्भुत नारायण-शक्ति ॥ ११३ ॥ तिहीं नारायणाचें चरित्र । सांगीतलें अति-विचित्र । तेणें अवघेचि सुर-वर । जाले थोर विस्मित पैं ॥ ११४ ॥

—अध्याय ४

---

## भावार्थ रामायण

### अंगदशिष्टाई

रामचंद्र सेनेसहित रावणाशीं युद्ध करण्याकरितां लंकेस गेल्यावर युद्ध करावयाच्या पूर्वीं, त्यानें वालीचा मुलगा अंगद ह्यास वकील करून रावणाकडे शिष्टसंप्रदायाप्रमाणें पाठविलें. अंगदानें रावणाच्या सभेंत जाऊन सीता रामाला परत देण्याविषयीं त्यास पुष्कळ उपदेश केला ; परंतु रावणानें तो ऐकिला नाहीं. मग अंगद रामाकडे परत आला. हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे.

ओव्या

याउपरि काय कर्तव्यता । श्रीराम पुसे समस्तां । अवघे म्हणती रघुनाथा । युद्ध तत्त्वतां करावें ॥ १ ॥ स-सैन्य मारावें लंका-नाथा । विचार कायसा पैं आतां । ऐसें समस्तीं सांगतां । तें रघुनाथा न माने ॥ २ ॥ जे जे राज-धर्म विहित । त्यांहींच साधे परमार्थ । ऐसे धर्म रघुनाथ । उपपादित शास्त्रार्थु[1] ॥ ३ ॥ अतिशयें जो समर्थ । शिष्ट[2] धाडावा लंकेंत । ऐसें बोलतां रघुनाथ । कपि समस्त क्षोभले ॥ ४ ॥ आपुली चोरूनि नेली सीता । आपणचि शिष्ट पाठवावा आतां । हें

---

१ शास्त्रार्थाला अनुसरून असणारे. २ वकील.

तंव अ-युक्त रघुनाथा । युद्ध करितां भय काय ॥ ५ ॥ ऐसें बोलतां समस्त । राम सांगे राजधर्मार्थ । भूत-दया आणि परमार्थ । समन्वित[१] उपपादी ॥ ६ ॥ युद्ध-धर्म चतुर्विध । साम दाम दंड भेद । हे अनादि-सिद्ध प्रसिद्ध । विशद भेद वर्णिले ॥ ७ ॥ युद्ध-समयीं सामानुक्रम[२] । हाचि मुख्यत्वें राज-धर्म । सामीं भूत-दया-संभ्रम[३] । सामचि होय परमार्थ[४] ॥ ८ ॥ साम न करितां जे जाण । युद्ध करिती दारुण । अ-संख्य मरती प्राणि-जन । हत्या कवण सोशील ॥ ९ ॥ ऐकोनि रामाचें वचन । हनुमान् घाली लोटांगण । अंगद सुग्रीव बिभीषण । वानर-गणासमवेत ॥ १० ॥ पडतां वानरांचें अनुमोदन । स्वयें पुसे रघुनंदन । शिष्ट पाठवावा कोण । तो निवडोनि सांगा मज ॥ ११ ॥ शिष्ट नसावा महा भ्याड । शिष्टें न धरावी भीड । शिष्ट बोलका सुवड[५] । निवडा प्रौढ निज-बुद्धी ॥ १२ ॥ शिष्ट पाहिजे चपळ चतुर । देऊं जाणे प्रत्युत्तर । राहोनियां धुरे-समोर[६] । स्वामि-कार्य-साधक ॥ १३ ॥ हनुमान् म्हणे रघुनंदना । वानर-वीरांची गणना । वीस पद्में संख्या जाणा । आंगवणें[७] अति-बळी ॥ १४ ॥ यांहि माजी वाळि-सुत । अंगद बळें विख्यात । रावणाचे सभेआंत । अति समर्थ बोलावया ॥ १५ ॥ अंगद बोलोनि निधोट । अंगद वीर धीर सु-भट । गांजूं शके दश-कंठ । तोचि शिष्ट योजावा ॥ १६ ॥ पाचारूनि अंगदासी । राम आलिंगी हृदयासीं । शिष्ट होऊनी रावणापाशीं । सांगें त्यासी मद्वाक्य ॥ १७ ॥ दंडासि कारण मुख्य चोरी । तुवां चोरिली माझी नारी । तुज दंडावया बाणधारी । आलों निर्धारीं मी राम ॥ १८ ॥ मुख्यत्वें पर-दारा-हरण । तुझ्या मरणाचें कारण । दुर्धर सुटल्या माझे बाण । तुजला कोण राखेल ॥ १९ ॥ यालागीं तूं अर्पी सीता । शरण जाईं अयोध्या-नाथा । लंका-निज-राज्यीं स्वस्थता । तरीच तूतें होईल ॥ २० ॥ ऐसें श्रीरामें आपण । स्वमुखें अंगदा सांगून । अमृत-फळें देऊनि जाण । करवी गमन लंकेशी ॥ २१ ॥ अंगद म्हणे श्रीरघुनाथा । आज्ञा प्रमाण जी समर्था । स्वयें पुरुषार्थ[८] बोलतां । अंगीं मूर्खता येऊं पाहे ॥ २ ॥ श्रीरामासि नमस्कार । करूनी मुखीं नाम-गजर । अवलोकूनी लंका-पुर ।

---

१ समर्पक रीतीनें. २ सामोपायापासून आरंभ. ३ सर्व प्राण्यांचा आदर. ४ स्तुत्य कृत्य. ५ चतुर. ६ अग्रभागीं. ७ शक्तीनें. ८ पराक्रम.

अंगद वीर उडाला ॥ २३ ॥ जैसा श्रीरामाचा बाण । तैसें अंगदाचें उड्डाण । सत्वर क्रमूनि गगन । आला आपण लंकेसी ॥ २४ ॥ रावण-सभे-पुढें जाण । आलें अंगदाचें उड्डाण । तेणें दचकला दशानन । कंपायमान भय-भीत ॥ २५ ॥ अवघ्यांचा करावया घात । पुढती आला रे हनुमंत । ऐसा वळसा[१] लंकेआंत । अति आकांत[२] राक्षसां ॥ २६ ॥ अंगदासी सन्मुख । बोलों न शके दश-मुख । आणीक कोण बोले मशक । जाली टकमक राक्षसां ॥ २७ ॥ मी अतिथी आलों सभेंत । कोणी न पुसां स्वागत । भयें झालां अति-भ्रांत । निश्चित महामूर्ख हो ॥ २८ ॥ हनुमंतें अशोक-वनीं बळी । केली राक्षसां रंवदळी[३] । तेणें तुम्हां दांत-खिळी । वच-नावळी खुंटली ॥ २९ ॥ ऐकोनि अंगदाचें वचन । दुरुक्ति बोलामाजीं छळण[४] । स्वयें अनुवादे रावण । सावधान अवधारा ॥ ३० ॥ सांडूनि दुर्ग-द्वार-भूमी[५] । तूं आलासी अमार्ग-गामी । यास्तव तुजशीं न बोलों आम्ही । मौनानुक्रमें[६] राहिलों ॥ ३१ ॥ अमार्ग-गामियासीं भाषण । हें तों आम्हां अति दूषण । ऐकोनि रावणाचें वचन । हास्य आलें अंगदा ॥ ३२ ॥ रावणा ऐक सावधान । देखे पुढिलाचे अवगुण । आपुले न देखे दुर्गुण । रासभ पूर्ण तो एक ॥ ३३ ॥ मुख्य अ-धर्म तस्करपण । तेंही पर-दारा-हरण । तैसा तूं पापी रावण । काळें वदन त्रि-लोकीं ॥ ३४ ॥ अंगद खव-ळला देखोन । चळचळ कांपे दशानन । म्हणती राक्षस प्रधान । दुसरें विघ्न हें आलें ॥ ३५ ॥ पहिला करूनी गेला होळी । दुसरा त्याहूनि आला बळी । राक्षस कांपती चळचळी । आतुर्बळी वानर ॥ ३६ ॥ रावणासन्मुख सिंहासनीं । अंगद बैसला पुच्छासनीं[७] । वांकुल्या दावी फळें खाउनी । मिचकाउनी नयनांतें ॥ ३७ ॥ अंगद बैसला देखोन । हळूच पुसे दशानन । हनुमान् नव्हेसि तरि तूं कोण । किमर्थ येथें आलासी ॥ ३८ ॥ ऐसें पुसतां लंका-नाथ । अंगद आपुला वृत्तांत । स्वयें असे पैं सांगत । रघुनाथातें स्मरोनि ॥ ३९ ॥ जेणें मारीच मारिला वनांत । खर-दूषणां केला घात । त्या श्रीरामाचा मी दूत । वालि-सुत अंगद ॥ ४० ॥ रावणा घालूनि काखेतळीं । समुद्रीं केल्या आंघोळी । त्याचा पुत्र मी आतुर्बळी । आलों तुजजवळीं तें ऐक ॥ ४१ ॥ सीता देउनी शरणागत । जाल्या वांचेल लंका-नाथ । नातरी त्याचा करीन घात । ऐसें रघुनाथ बोलिला ॥ ४२ ॥

---

१ पुकारा. २ हाहाकार. ३ नाश. ४ मर्मभेदक भाषण. ५ किल्ल्याच्या दरवाज्याचा मार्ग. ६ मौन धरून. ७ शेपटाच्या आसनावर.

धिक् रामाचा पुरुषार्थ । धिक् धिक् तुझाही बळार्थ । जेणें केला पितृ-घात । त्याचा दूत म्हणविसी ॥ ४३ ॥ ठकुनी[1] केला पितृ-घात । मातेसीं दुजा योजिला कांत । ऐसा नष्ट जो रघुनाथ । त्याचा दूत म्हणविसी ॥ ४४ ॥ अंगदाऐसा निलाजिरा । पाहतां जनीं न दिसे दुसरा । काय मुख दाखविशी वानरा । रिघोनी सागरीं जीव देईं ॥ ४५ ॥ नातरी करीं आड-विहिरी । पोटीं घालोन घेईं सुरी । जळो जळो तुझी थोरी । निंद्य संसारीं तूं एक ॥ ४६ ॥ साधावया पितृ-कार्यार्थ । मिथ्या म्हणविसी राम-दूत । हाही कळला मज भावार्थ । शरणागत तूं माझा ॥ ४७ ॥ मारुनी राम-लक्ष्मण । करूनि सुग्रीवाचें हनन । तुज किष्किंधा देईन । सत्य वचन हें माझें ॥ ४८ ॥ ऐसें बोलतां दशानन । अंगद जाला हास्य-वदन । खोंचूनि देतसे प्रति-वचन । तें सावधान[2] अवधारा[3] ॥ ४९ ॥ स्वयंवरीं धनुष्या बाण । चढवितां सभेंत पडलासि उलथोन । तुझें अंगीं नपुंसकपण । कैसें शरण म्यां व्हावें ॥ ५० ॥ बहुत ऐकिले रावण । त्यांमाजी तूं कवण । त्यांचें विविध लक्षण । विचक्षण जाणती ॥ ५१ ॥ रावण दशमुखांचें किडें । किंवा पातलें घुंगुरडें । बळी[4] न पाहे तयाकडे । तो कोणता रावण ॥ ५२ ॥ विचित्र देखोनी वानरीं । मज अंगदाच्या पाळण्यावरी । रावण बांधिला खेळण्यापरी । हेम-सूत्रीं[5] शृंखळें[5] ॥ ५३ ॥ त्यांतील तूं कोण रावण । हें पुसावें न लगे जाण । माझ्या पद-लत्तांचे वण । मुखीं संपूर्ण दीसती ॥ ५४ ॥ तो तूं अतिशय दीन हीन । भद्रीं[6] बैसलासी रावण । तुज कैची आंगवण । करावया रण रामासीं ॥ ५५ ॥ अंगदाचे वाग्बाण । हृदयीं खोंचले संपूर्ण । तेणें तळमळी रावण । प्राण जाऊं पाहती ॥ ५६ ॥ सभेसि बैसोनी वानरा । किती जल्पशी सैरावैरा । तोंडा नाहीं वोढावारा[7] । दश-शिरा[8] नोळखिसी ॥ ५७ ॥ ऐकें माझी आंगवण । बंदीं घातले सुर-गण । राम बापुडें तें कोण । मजसीं रण करावया ॥ ५८ ॥ इंद्र-चंद्रादि सकळ सुर । माझे घरचे जाले चाकर । मद्भयें कांपती थरथर । अहर्निशीं राबती ॥ ५९ ॥ राम बापुडें केवळ नर । आमुचें खाजुगें[9] ग्रासमात्र । वानर जे कां वन-चर । धाकेंची संग्रामीं मरतील ॥ ६० ॥ मुख्य भक्ष्य राम-लक्ष्मण । मर्कटें कोशिंबिरी जाण । एका

---

१ ठकवून. २ लक्ष्य देऊन. ३ ऐका. ४ विष्णूनें वामनावतार घेऊन पाताळीं घातलेल्या दैत्यांचा राजा. ५ सोन्याच्या सांखळीनें. ६ सिंहासनावर. ७ प्रतिबंध. ८ रावणाला. ९ खाद्य.

ग्रासें कुंभकर्ण । भक्षील आपण क्षणार्धें ॥ ६१ ॥ ऐक रे रावणा दुर्मती । दुष्ट-बुद्धी दुष्ट-राती । चैतन्यविग्रही[१] राम-मूर्ती । त्याप्रती मनुष्य म्हणसी तूं ॥६२॥ श्री-रामाचा सेवक । हनुमंत एकला एक । तेणें मर्दूनि तुझें कटक । तुझें मुख जाळिलें ॥ ६३ ॥ सीता अर्पूनि आपण । रामासि रिघालिया शरण । तैंच वांचती तुझे प्राण । एऱ्हवीं मरण तुज आलें ॥ ६४ ॥ सीता रामासि न देतां जाण । रावणा तुज राखेल कोण । मीच तुझा घेईन प्राण । आंगवण पाहें माझी ॥ ६५ ॥ रावणा तुझीं दहा-शिरें । मीच छेदितों नखाग्रें । परि तीं शिव-स्व[२] अ-पवित्रें । म्हणोनी करें स्पर्शेना ॥ ६६ ॥ अंगद आदळला आंगासी । बोलिला निष्ठुर वाक्यासी । तेणें रावण कासाविसी । अतिकोपेसीं कोपला ॥ ६७ ॥ वांचवावया आपणास । क्रोधें सांगे प्रधानांस । धरा मारा वानरास । मज सभेंत निर्भत्सी ॥ ६८ ॥ कांहीं न धरितां भीड । सभेमध्यें हा माकड । माझें म्हणे काळें तोंड । खंडविखंड करा यासी ॥ ६९ ॥ ऐकोनि रावणाचें वचन । अंगदा धरावया जाण । सैन्य सेनानी प्रधान । अति गर्जोनि ऊठले ॥ ७० ॥ कटीं पुच्छीं बाहु-मूळीं । अंगद धरिला राक्षसीं सकळीं । तयांसहित तो आतुर्बळी । वेगें तत्काळीं उडाला ॥ ७१ ॥ आंग झाडिलें अंतराळीं । राक्षसीं धरिला तो बळी । अंग-वातें पडोनि तळीं । जाली रांगोळी अव्र्ह्यांची ॥७२॥ स्वयें मारूं नये रावण । अंगद जाणोनि आपण । पायीं दडपोनि दशानन । मुकुट हिरोनी घेतला ॥ ७३ ॥ मुकुट घेऊनि आपण । अंगद उडाला सत्राण[३] । शिरें मंडप ऊचलिला पूर्ण । हें नाहीं अवगत अंगदा ॥ ७४ ॥ मंडप देखोनियां माथां । कोप आला श्रीरघुनाथा । अंगदा केली अधर्मता । दत्त[४] अर्थ आणिला ॥ ७५ ॥ अंगद म्हणे श्रीरघुनाथा । मी निज बळें उडतां । केव्हां मंडप बैसला माथां । मज न कळतां येथें आला ॥ ७६ ॥ ऐशीं-सहस्र स्तंभ ज्यासी । ऐसा मंडप घेऊनी सहजेसीं । पुनरपि नेऊनि लंकेसी । ठेवी स्व-स्थानीं अंगद ॥ ७७ ॥ श्रीरामें मुकुट घेऊन । पाचारिला बिभीषण । त्याचे मस्तकीं आपण । संतोषोनी घातला ॥ ७८ ॥

—युद्धकांड, अ० ६–८.

---

१ ज्ञानमूर्ति—ज्ञानस्वरूपी. २ शिवाला अर्पिलेली वस्तु घेतल्यास महापाप लागतें. रावणानें आपलीं शिरें शिवास वाहिलीं होतीं, ह्या गोष्टीस उद्देशून येथें त्यास 'शिवस्व' म्हटलें आहे. ३ सवेग. ४ पूर्वीच लंकेचें राज्य रामानें बिभीषणास दिलें होतें म्हणून 'दत्त अर्थ' ( दिलेली वस्तु ) असें म्हटलें आहे.

# शेख महंमद

अहमदनगर येथील रुईबाहिरें या नांवाचें खेडें हें शेख महंमदाचें मूळ ठिकाण. त्याच्या बापाचें नांव महंमद व आईचें नांव फुलाई. पंधरासोळा वर्षांचा असतांना वडिलांच्या आज्ञेवरून बकरें कापण्यास गेला असतां त्या प्राण्याचें ओरडणें ऐकून शेख महंमदाचें अन्तःकरण द्रवलें व शस्त्रघावाचें दुःख कसें असतें हें पाहण्याकरितां त्यानें स्वतःचें बोट कापून घेतलें. त्यावरून जनावरांस क्लेश कसे होतात याची त्याला कल्पना आली, आणि इतःपर प्राणहानि करणार नाहीं अशी त्यानें शपथ वाहिली, असें म्हणतात. त्याचा नक्की काळ कळत नाहीं. 'योगसंग्रामा'च्या पंधराव्या अध्यायाच्या आरंभीं तो आपल्या गुरूचा निर्देश करतांना लिहितो, "ॐ नमोजी श्रीगुरु चांग (चांद) बोधले। त्यांनीं जाणोपंता अंगिकारलें। जाणोबानें **एका** उपदेशिलें। दास्यत्वगुणें". 'एका' उपदेश करणारा हा जाणोपंत म्हणजे जनार्दनपंत दिसतो. तसेंच एकनाथास चतुश्लोकी भागवत मराठींत लिहिण्यास ज्या ब्राह्मणाची भेट कारणीभूत झाली व जो पुढें "जनार्दन स्वामीचा उपदेश घेऊन त्याच्या सान्निध्यांत राहिला" असें भावे म्हणतात, तो चंद्रभट चांद बोधला असणें शक्य आहे. आणि असें असल्यास तो एकनाथाचा समकालीन म्हणतां येईल. शेख महंमदाला कबिराचा अवतार मानतात. श्रीगोंदें येथें याचा मठ आहे. "शेख महंमदास मालोजी राजे भोसले व त्याचे दिवाण बाळाजी कोन्हेरपंत यांनीं गुरु म्हणून बारा बिघे जमीन इ. स. १५९६ पूर्वी मकरंदपूर वसवतांना दिली होती," असें रा. वा. सी. बेंद्रे कळवितात. महिपतीनें भक्तिविजयांत (अ. ५२) याची कथा वर्णन केली आहे. 'योगसंग्राम', 'निष्कलंकबोध' व 'पवनविजय' असे याचे ओवीबद्ध ग्रंथ व पुष्कळ स्फुट अभंगही उपलब्ध आहेत. पुढील तीन उतारे 'योगसंग्राम' या त्याच्या ग्रंथांतून घेतले आहेत.

विशेष माहितीकरितां पहा :—'योगसंग्राम'—सं० शि. सी. वागळे, मुंबई, १८८९.

## योगसंग्राम

### परमेश्वर एकच

### ओव्या

श्रीगणेशाय नमः । जल्लेजला[१] लहु[२] अल्ला[३] गनि[४] प्यारा[५] । जयजय जी जयवंत नरा । विश्वव्यापक निजपरमेश्वरा । रहीमान[६] साचा ॥ १ ॥ अव्वल[७] समजो एक बिस्मिल्ला[८] । मग सहस्त्र नामें विश्व व्यापला । बंदगी[९] करो[१०] छोडो[११] गलबला । सद्गुरु सेवूनियां ॥ २ ॥ सच्चा पीर कहे[१२] मुसलमान । मऱ्हाठे म्हणविती सद्गुरु पूर्ण । परि दोन्हींत नाहीं भिन्नत्वपण । आंखी[१३] खोल[१४] देखो[१५] भाई ॥ ३ ॥ छप्पन्न भाषा वचनप्रकार । करती एक अल्लाकी[१६] जिकिर[१७] । भाषण भाषतां करती किरकिर । किल्लाफ[१८] पकडकर[१९] ॥ ४ ॥ वोळखा किल्लाफ कुफरकी[२०] निशाणी[२१] । तेणें ईश्वर गोविला भांडणीं । स्वहीत करील आत्मज्ञानी । पीरके[२२] मेहरसु[२३] ॥ ५ ॥ फारसीनें आब[२४] बियाद्[२५] । पाणी मागे मऱ्हाठा नेणें भेद । तेणें प्रवर्तला अनुवाद । देखो समजेविण ॥ ६ ॥ तान्हेला कानडा म्हणे निर्कुड[२६] । मुसलमान म्हणे कंव[२७] करता गडबड । दुभाषानें दोहींस करून मूढ । नीर पाजिलें परियेसा ॥ ७ ॥ दीर्घ छप्पन्न भाषेची किल्ली । कळों आली अनिर्वाच्य बोली । त्याचीच जाणा भ्रांत फिटली । ईश्वर आभास भासे ॥ ८ ॥

—प्रसंग १७.

### ईश्वराचा उपकार

एकें दाहांस दिधलें वस्त्र-अन्न । तो जगीं म्हणे म्यां पोसिले संतजन । पुसल्याविण मिरवी भूषण । अभिमान धरूनियां ॥ १ ॥ पहा चराचर पोशिलें ईश्वरें । कोण्हापें[२८] सांगीतलें नाहीं दातारें । पर्जन्यें शीत केलें कृपाधारें । जिवांचे काकुळती ॥ २ ॥ पर्जन्यकाळीं केली उत्पत्ति । उष्णकाळीं जीव करपोन मरती । यालागीं वायूच्या झुळका फिरती ।

---

१–५ अल्ला श्रेष्ठ व बिनपरवा आहे. ६ कृपाळु. ७ आरंभींचा. ८ परमेश्वर. ९ नमस्कार. १० करा. ११ सोडा. १२ बोले. १३ डोळे. १४ उघडा. १५ पहा. १६ अल्लाची. १७ घासाघीस. १८ द्वेष, वैषम्य. १९ धरून. २० पाखंडाची. २१ खूण. २२–२३ गुरूच्या कृपेनें. २४–२५ पाणी आण. २६ पाणी आण. २७ कशाला. २८ कोणापाशीं.

ईश्वराच्या सत्तेनें ॥ ३ ॥ पहा शीतकाळीं आंकडती[1] जीव । यालागीं रवि उष्ण-उपाव । अंधारालागीं केला असे ठाव । उजेडाचा ॥ ४ ॥ महा स्वार्थ-शोकें उन्मत्तती । म्हणोनि निद्रा निशीं विश्रांति । केली दयाळुवा श्रीपती । चक्रवर्तीपणें ॥ ५ ॥ कोण्ही पोही[2] चालून[2] पाजिलें पाणी । तंव तो भूषण जनांत वाणी । तैसा नव्हे ईश्वर कल्पदानी । चराचर ठाईंच पाजिलें ॥ ६ ॥ शेख महंमद सांगे ईश्वरसौभाग्य । नवखंड पृथ्वी जयाचा भोग । अनेक चौदा भुवनीं उपभोग । करूनि अकर्ता माळी ॥ ७ ॥ अठरा भार वनस्थळिचा मेवा । तुवां जिवांलागीं केला गा अव्यक्त देवा । उन्मत्त नेणती तुझिया ठेवा । टवाळी करितील ॥ ८ ॥ अनेक भोग अळंकार प्रतिष्ठा । हे मनुष्यास केली गा गुणवरिष्ठा । तुझे स्तुतीविण अनेक खटपटा । बचके[3] पाणी[3] धरितील[3] ॥ ९ ॥ जगदीशाची वर्णना असे अपार । मी काय स्तुति करूं जाणें पामर । सद्गुरु बोलते जाले सगुणाकार । स्वानुभवें आपुल्या ॥ १० ॥ कोण्ही एकास विंजणवारा[4] घातला । त्याचा त्यानें उपकार मानिला । ईश्वरें विश्वास वायो घातला । त्याचा उपकार नाहीं ॥ ११ ॥ सप्तसागर नद्या अनेक वोहळा । ह्या ईश्वराच्या पोह्या प्रबळा । उदक सेवूनि नाठविती गोपाळा । उपकारभावेंसीं ॥ १२ ॥ जे उपकार ईश्वराचे मानिती । त्यांचे चरणींची होईन रजरति[5] । मज दिले उपकार मानीन संतीं । शेख महंमद म्हणे ॥ १३ ॥ स्वयें शरीर मृत्तिकेचा पुतळा । त्यास करचरण दिधले गोपाळा । पाठ पोट विषयसुखलीला । ऐसें देणें तुझें ॥ १४ ॥ उदर हृदय मन पवन मति । शुद्ध आत्मज्ञानाची आनंदस्फूर्ति । भावें लक्ष्मी धनधान्य संपत्ति । मज उदारीव[6] तुझी ॥ १५ ॥ सर्व नवद्वारांचा आभारु । ऐकें तुझ्या निजनामाचा उच्चारू । यावेगळे अनेक ध्वनि दणात्कारु । ब्रह्मानंदीं टाळी लागल्या ॥ १६ ॥ मज ईश्वरा नेत्र तुझें देणें । देखिलें सगुण तुझें पेखणें[7] । शुद्ध पवित्र वाचेचें बोलणें । हे मज उदारिव तुझी ॥ १७ ॥ या स्थूळीं रस ना गोडी । मज चवि घेतां लागे आवडी । परी चित्त जिवें न सोडी । नामस्मरण तुझें ॥ १८ ॥ एक दिवटी लावून नेला बिऱ्हाडा । तो म्हणे उपकार केला गाढा । परी रविशशीचा उपकार

---

१ कुडकडतात. २ पाणपोई करून. ३ अशक्य गोष्ट करूं पाहातील. ४ पंख्याचा वारा. ५ धुळीचा कण. ६ औदार्य. ७ नाचरंग.

वेडा । मानीचना कांहीं ॥ १९ ॥ रविशशी ईश्वराचे दिवटे थोर । या जीवांलागीं केला उपकार । अभक्त मानितीना त्याचा उपकार । विषयीं लोलुप जाले ॥ २० ॥ कोणी कोणास बैसों घातली तिवासी[1] । तो जन्मवरी आठवी उपकारासी । पहा ईश्वरें अंथरिलें महीशी । मूढ उपकार न मानिती ॥ २१ ॥ कोणी मंडप दिधल्याचा उपकार । तो जन्मवरी आठविती साचार । ईश्वरें मंडप दिधला नभाकार । जीव असोन न मानिती ॥ २२ ॥ कोणी दिधली पालखी छत्र घोडा । तो आखुरजाद[2] म्हणवी रोकडा । देह सरल्या जालासे वेडा । चौऱ्यांशीं लक्ष भोगितां ॥ २३ ॥ छत्री पालखी राजपद भोगणें । ऐका तेंही ईश्वराचें देणें । महातपसामग्री करूनि मरणें । कल्पनेसी पावती ॥ २४ ॥ भव सुख दुःख ईश्वराचें देणें । जैसा भाव भजन तैसें भोगणें । कोणी रुसावया नाहीं कारण । अहिक्यीं[3] अहिक्य[4] श्रोते ॥ २५ ॥ शेख महंमद म्हणे निर्गुणासी । बा वर्णवेना तुझिया रूपासी । अगाध उपकाराच्या राशी । उत्तीर्ण नोहेचि कांहीं ॥ २६ ॥ उपकार आत्मज्ञानें न्याहाळितां । प्रेमें उमासा[5] येतो वर्णितां । शरण रिघतों संतां महंतां । ईश्वर-उपकार वर्णावया ॥ २७ ॥

—प्रसंग ७.

## साधुसंत

विंधला तीर मागें मुरडे[6] । तरी साधूस निंदा घडे । हें गुह्य न कळतां म्हणती वेडे । साधु थोर निंदक ॥ १ ॥ पडोन पर्जन्याचा थेंबुटा[7] । जरी चढोन जाय वैकुंठा । तरी साधु हे म्हणती खोटा । बाध जडों पाहे ॥ २ ॥ उंबराचें फूल तेंच फळ । तैसे साधूचे शब्द केवळ । मूर्खाचे शब्द निर्फळ । वायफुलान्यायें[8] ॥ ३ ॥ खारीक वरी गोडत्वपणें । भितरीं कठीण आठोळी जाणें । तैशींच नष्टाचीं वचनें । वरपंगाची गोडी ॥ ४ ॥ केकतीला कांट्याचे वेढे । भितरीं निपजती केवडे । तैसे साधूचे शब्द गाढे । परोपकारालागीं ॥ ५ ॥ फणस सर्वांगीं कांटवले । भितरीं महा गोडीनें कोंदले । तेसें साधुहृदय जालें । बोधासंगें परियेसा ॥ ६ ॥ नारळ कठीण दिसे बाहेर । भितरीं खोबरें अरुवार[9] । तैसें साधूचें अंतर । बोधें

---

१ गालीचा, तक्या. २ (?). ३ ऐहिक्यीं. ४ ऐहिक्य. ५ उसासा. ६ परते. ७ लहान थेंब. ८ वांझ मोहोरासारखें. ९ मृदु.

वोसंडलें[१] ॥ ७ ॥ आंबें सालें तुरट रस गोड । आठोळी निबर[२] जैसा दगड । तैसे अभक्ताचे कैवाड[३] । वरदळ[४] गोमटे[४] ॥ ८ ॥ इंद्रावनें[५] कोवळीं कडवट । पक्क जाल्या येतसे वीट । तैसे अभक्त अति नष्ट । तारुण्य वृद्धपणीं ॥ ९ ॥ पक्क जालिया इंद्रावन । अमृतफळसें दिसे दुरून । हातीं धरूं नये, कडूपण । तद्न्यायें कपट्याचें ॥ १० ॥ जो स्वयें अति नष्ट चांडाळ । त्याला साधु दिसती अमंगळ । संचितानें पापें तुंबळ । तेणें गुणें ॥ ११ ॥ परमात्मा आणि साधु । या दोहीं नांवांत नाहीं भेदु । जैसें घृतमिश्रित असे दुधु । द्वैतीं अद्वैतपणें ॥ १२ ॥ ऐसा सद्गुरुशीं धरा भाव । तो कैसा करावा उपाव । शेख महंमद सांगती सेव[६] । सभे श्रोत्यांप्रती ॥ १३ ॥ जैसा गोडीस झोंबे मुंगळा । ओढितां तुटोन ये वेगळा । तैसें प्रवर्तावें वेल्हाळा । सद्गुरूचरणीं ॥ १४ ॥ जैसा निःसंग होउनी मासा । आहारालागीं गळ गिळी तैसा । ऐसीच विषयांची आसा । जीवघात करी ॥ १५ ॥ दृष्टी देखोनियां सुंदरी । एकाग्र होती अविचारी । तैसें मन गुरूचरणावरी । माथा ठेवावा ॥ १६ ॥ दरवडा घ्यावया दरवडकरी । नाना परीचा लाग करी । तैसा भाव सद्गुरुसेवेवरी । धरावा श्रोतीं वक्तीं ॥ १७ ॥ पक्षी कवडपांखडे आंवळोन । लक्षें न्याहाळी मीन । बुडी आंवोळी ग्रास करणें । तैसें गुरूचरणीं व्हावें ॥ १८ ॥ उडता पक्षी तो राजहंस । त्यास मोतियांचा सौरस । तैसा साधुसंतांस विश्वास । सोहं नामरत्नाचा ॥ १९ ॥

—प्रसंग १५.

---

१ थबथबलें, भरून राहिलें. २ घट्ट. ३ कारस्थान. ४ वरून सुंदर. ५ कवंडलें. ६ सेवा, उपासना.

# दासोपंत

बेदरच्या बाहमनी पादशाहींतील नारायण पेठ या गांवीं दिगंबरपंत नांवाचे देशपांडे होते. दासोपंत (ज० १५५१, मृ० १६१५) हा त्यांचा मुलगा. दासोपंताच्या आईचें नांव पार्वतीबाई. लहान वयांत कांहीं संकट प्राप्त झाल्यामुळें दासोपंतांचें लक्ष परमार्थाकडे लागलें व ते दत्तोपासक बनले. आंबेजोगाई येथें त्यांच्या वंशजांकडे दासोपंतांनीं लिहिलेला आणि नष्ट होत चाललेला मोठा ग्रंथसंग्रह आहे. गीतेवरच त्यांच्या सहा टीका आहेत. त्यांपैकीं सर्वांत मोठी 'गीतार्णव' नांवाची जी टीका आहे तिची ओवीसंख्या सवा लक्ष आहे, असें म्हणतात. गीतार्णवाचे तीन-चार अध्याय भावे वगैरेंनीं प्रसिद्ध केले आहेत. तसेंच ग्रंथराज (सं० शं. श्री. देव), पदें (सं० का. बा. लेले) वगैरे त्यांच्या वाङ्मयाचा अल्प भाग छापला गेला आहे. बाकी सर्व अप्रकाशित आहे. यापैकीं पंचीकरण नांवाचा एक ग्रंथ दासोपंतांनीं पासोडीवर लिहिलेला असून तो नुकताच प्रसिद्ध झाला आहे. खालील उतारा त्यांच्या 'ग्रंथराज' या काव्यांतील आहे.

विशेष माहितीकरितां पहा :—महाराष्ट्र सारस्वत (भा. १)—भावे; मराठी वाङ्मयाचा इतिहास खं. २—पांगारकर; महाराष्ट्रीय वाङ्मय व जीवन (म. अ. करंदीकरांचा लेख); दासोपंतांची पासोडी—सं० न. शे. पोहनेरकर.

## ग्रंथराज

### संसार असार

ओव्या

आश्रमधर्मावांचून । न घडे वैदिक धर्मसाधन । मोक्षाचे उपाय साधारण । वांचूनि तेणें ॥ १ ॥ ऐसाचि स्फुरे तैं विचारु । ना तरी पशुऐसा तो नरु । उपावो न चले प्रकारु । मग दारा मेळवी ॥ २ ॥ परम लाभु अंतःकरणीं । तेचि कृतकृत्यता मानी । मग तया आइणी[1] । पुरवितां कामाची ॥ ३ ॥ देखोनि जनाची रंजना[2] । उपजे पुत्राची वासना । विश्रांती न वटे[3] मना । आश्रमीं तयां ॥ ४ ॥ येकी वासना आपुली । शरीरीं होती पहिली । आतां दुसरीहि लागली । स्त्रीची पुरवणें ॥ ५ ॥ सुखाचें न वटे अन्न । आश्रमु निद्रा जीवन । निरंतर लागलें ध्यान ।

---

१ इच्छा. २ करमणूक. ३ वाटे.

बाळकाचें ॥ ६ ॥ तीर्थें दानें तपें व्रतें । पुत्रार्थ करिती सुकृतें[1] । देव देवालयें बहुतें । तीर्थीं न्हाती ॥ ७ ॥ ऐसी करितां सोसणी[2] । कन्या जाली निदानीं[3] । तथापि तयांचे मनीं । विश्रांती न वटे ॥ ८ ॥ पुत्रेंवीण आपुला । संसारु वायां गेला । म्हणती दुःखाचा जाला । आश्रमु हा ॥९॥ आशेचां सागरीं वाहातां । मानसपर्वत उल्लंघिता । पुत्रु जाला अवचितां । तया दोघांतें ॥ १० ॥ वदन पुत्राचें देखोनी । कृतकृत्यता मानिती मनीं । परमानंदु अन्तःकरणीं । पूर्णु जाला ॥ ११ ॥ थोरें स्नेहें वाढविती । देखोनि क्रीडाप्रवृत्ती । हर्षवंतें होती । दोघेंहि जणें ॥ १२ ॥ मुखींचा ग्रासु काढुनि । घालिती त्यांचां वदनीं । प्राणातें वोवाळिती प्राणी । आशावंतें ॥ १३ ॥ आतां हो कैं[4] वाढेल । कैं आश्रमा योग्य होईल । आपुलें आपण चालवील । आश्रमादिक हें ॥ १४ ॥ ऐसें क्रमितां अपार । दिन भरलें संवछर । उपनयनाचा विचार । करितीं जालीं ॥ १५ ॥ उपनयनाचे पाठीं जाण । अव्यवधानें करून[5] । कन्या एकाची पाहोन । विवाहो केला ॥ १६ ॥ परिग्रहो[6] जाला अपारु । आतां पाळणाचा विचारु । तो अर्थसाध्यु समग्रु । ऐसें असतां ॥ १७ ॥ इच्छा उपजली वित्ताची । कल्पना अर्थसाधनाची । अर्थींचि प्रीति समस्तांची । ऐसें जालें ॥ १८ ॥ स्त्रीवासना आपुलीचि । पुत्रवासना दोघांची । अर्थवासना सकळांची । ऐसें जालें ॥ १९ ॥ अर्थाचां ठाईं आसक्तें । पोषती वासनावंतें । अवघींचि कर्मीं ययातें । प्रेरितीं जालीं ॥ २० ॥ स्त्री बोले अवधारा । तुम्हीं जावें देशान्तरा । दिवसां दों-चौंचा चारा[7] । जंव असे घरीं ॥ २१ ॥ पुत्र बोले उपावो । करावा कांहीं व्यवसावो । टाकावा[8] एकादा ठावो । उद्यमाचा ॥ २२ ॥ दिवस उगवतांचि पुरे । कडकडां खाती कुमरें । शंकूं लागले सोयरे । इष्टमित्र ॥ २३ ॥ घरचीं बोलती कठीण । न वटे तें सुखाचें अन्न । मग मुहूर्तमात्र पाहोन । बाहेरींचि घालिती ॥२४॥ जे वेळीं तो बाहेरी पडला । ते वेळीं समस्तां संतोषु जाला । मग तो विदेशा चालिला । एकट्टुचि ॥ २५ ॥ आंगीं साहे शीत उष्ण । मारी निद्रा भूक तहान । केवळ भूमीवरी शयन । करूं प्रवर्तला ॥ २६ ॥ ऐसा तो मार्गु क्रमूनि । पावला एके स्थानीं । मग अर्थप्राप्तीलागूनि । करी क्रिया ॥२७॥ वेदांशास्त्रांचा विकरा । पंडितपणें तो पसारा । तेथें तया वाग्व्यापारा । उसंताचि[9] नसे ॥ २८ ॥ बहुतांचे हारिले मान । वादें प्रतिवादें करून । वृत्तीचें[10] केलें खंडन । बहुतांचिये ॥ २९ ॥ विद्येचेनि अपूर्णपणें ।

---

१ पुण्यकर्में, व्रतें. २ हांव, तीव्र इच्छा. ३ अखेर. ४ कधीं. ५ लवकरच. ६ परिवार. ७ अन्नसामुग्री. ८ मिळवावा. ९ विसांवा. १० निर्वाहाचें साधन.

आंगबळेंसीं उठणें । वर्म कर्म बोलणें । तें तयावरी ॥ ३० ॥ विद्याबळें वादबळें । शरीरबळें । कौटिल्यबळें[१]। जेणें आंगें द्रव्य मिळे । हरे परावे[२]॥३१॥ तें तें कर्म करितां । पापराशी जालिया अगणिता । परंतु संपूर्णा अर्था । पुरुषु न पवेचि ॥ ३२ ॥ मग तो जाला व्यापारी । नीचसेवाहि अंगीकारी । घातपात परोपरी । कल्पी परावे ॥ ३३ ॥ स्वामीद्रव्य चोरणें । तो विधुचि[३] ऐसें माने । परावया शब्दें हाणे । हरी सर्वस्व ॥ ३४ ॥ अपार द्रव्य जोडिलें । तें दंडाखंडापरी गेलें । पाप अपार सांचलें । आपुलें तेंचि ॥ ३५ ॥ मग ते वृत्ति सोडून । उद्दिमावरी घातलें मन । क्रयविक्रय जाण । प्रवर्तला करूं ॥ ३६ ॥ सत्यवचन विसरला । स्नानसंध्ये मुकला । उगाचि करी गुरळा[४] । पान खाये ॥ ३७ ॥ नीचसंगु निरंतरु । नीचत्व पावला तो नरु । कुडा[५] वांकुडा वाग्व्यापारु । तोचि प्रवर्तला ॥ ३८ ॥ करूं नये तें करितां । करावें तें न करितां । पापराशी अनंता । संचित जालें ॥ ३९ ॥ तेणें अर्थु न मिळे । मग चोरीवरी मन घातलें । येणें प्रकारें केलें । नाना कर्म ॥ ४० ॥ दिवस लागले विदेशीं । मग स्मरोनि स्त्रीपुत्रासी । जावें ऐसा मानसीं । निर्धारु केला ॥ ४१ ॥ वेगें द्रव्यांशु एकवटिला । मग तो पालवीं[६] बांधिला । सत्वरु स्वार जाला । आला स्वग्रामा ॥ ४२ ॥ देखोनि तयालागोनी । आनंदु केला स्वजनीं । ययातेंहि अन्तःकरणीं । जाला संतोषु ॥ ४३ ॥ सातपांच दिवस क्रमिले । भेटीचें आरत गेलें । उपसर्ग सोडूं लागले । पुत्रादिक ॥ ४४ ॥ अवघींच म्हणती जावें । स्त्री म्हणे मुहूर्त पाहावे । हैत्र[७] नक्षत्र बरवें । आजिचि असे ॥ ४५ ॥ ऐसा नानाप्रकारीं । गृहस्थु घातला बाहेरी । तो मातें गमे तस्करीं । जैसा नागविला[८] ॥ ४६ ॥ सर्वस्व तयाचें हरिलें । प्राणेंसीं शरीर सोडिलें । स्वजनीं ऐसें केलें । परी तो नेणे ॥ ४७ ॥ ना कीं संसारु सरिकतीचा[९] । द्रव्यविभागु सकळांचा । पापवांटा ययाचा । तो यातें दिधला ॥ ४८ ॥ येणें पापाचि करावें । मग तें एकलेनिच भोगावें । द्रव्य तें तया द्यावें । ऐसा वांटा ॥ ४९ ॥ तो आपुलिया वासना । बळिकटु बांधला सुटेना । दुःख भोगी तें नाना । सुखचि मानी ॥ ५० ॥ यापरी देशांतराप्रति जाये । तेचि क्रिया करिता होये । तैसाचि मागुता स्वाश्रमा ये । जाय पुडती ॥ ५१ ॥ वावडी[१०] उडे अंबरीं[११] । सूत्र तें धारकाचां करीं ।

---

१ कपट. २ दुसरे, इतर. ३ शास्त्राज्ञा. ४ चूळ, गुळणा. ५ वाईट. ६ पदरांत. ७ हयवर(?), अश्विनी. ८ लुबाडिला. ९ भागीदारीचा. १० पतंग. ११ आकाश.

तैसा वासना ठेवूनि घरीं । तयांप्रति ॥ ५२ ॥ पुरुषु विदेशा जाये । वासनाबद्ध पुडती ये । ऐसियापरी तारुण्य जाये । पावे वार्धक्य ॥ ५३ ॥ जाणें येणें तें खुंटलें । तंव पुत्र प्रबुद्ध जाले । तेहीं आपुलें आवरिलें । व्यवहारिक ॥ ५४ ॥ बाह्य सामर्थ्य पुत्राचें । आश्रमीं सर्व सुनेचें । वचन मातापित्याचें । तें चालेचिना ॥ ५५ ॥ दिवसेंदिवसु उदासीन । बोलती बोल कठीण । कोठें जावें निघोन । शरीरें क्षीणें ॥ ५६ ॥ नित्य कलहो भांडण । मग तीं न घालिती अन्न । एवं आश्रमाबाहेरी लोटून । घातलीं दोघें ॥ ५७ ॥ मरणावस्था जंव पावे । तंव परिग्रहाचेंचि बरवें । दास्यत्व केलें आघवें । शरीरें अर्थें ॥ ५८ ॥ माझी माझी म्हणोन । केलें भावें समर्पण । आतां ययाचें कवण । तेंचि विचारितां ॥ ५९ ॥ सात वरुषें वाढविली । ते कन्या नव्हे आपुली । दानीं जया समर्पिली । तयाची होये ॥ ६० ॥ तीवरी न चले सत्ता । आश्रमा[1] तिचिया जातां । लोकां निंद्य समस्तां । वैरी होइजे ॥ ६१ ॥ आतां ते पुत्र आपुले । ऐसें होतें मानिलें । तंव कन्येहूनि परतले । हेचि वैरी ॥ ६२ ॥ कन्या देइजे एकातें । सामर्थ्य न चले आपुलें तेथें । पुत्रु वाढवूनि एकीतें । तैसाचि दिजे ॥ ६३ ॥ तो तियेचे हातींचा । आपणु नव्हे दोघांचा । व्यर्थ चाळा[2] ममतेचा । प्राणियासी ॥ ६४ ॥ कन्या एकातें दिधली । परि तेची नव्हे आपुली । एके शरीरें गेली । परावेया गृहा ॥ ६५ ॥ पुत्रु एकीतें दिधला । तो घरचि घेऊनि गेला । तिये आधीनु जाला । आपुला नव्हे ॥ ६६ ॥ शरीरसंबंधें केलें । तें पापपुण्यचि आपुलें । पुढें मरणा राहिलें । उभें म्हणौनि ॥ ६७ ॥ एवं आपणु आपुला निर्वाणीं[3] । सखा ना मित्रु कव्हणी । आपण करी ते करणी । भोगी जीवु ॥ ६८ ॥ संसार नामें हे सांत[4] । नाना वर्णाचे जन येथ । मीनले[5] ते पावत । तया अंगसंगातें ॥ ६९ ॥ नाना विद्यांचा पसारा । करिती आयुष्याचा विकरा । संचितार्थी[6] अपारा । भरिती क्रिय-माणातें[7] ॥ ७० ॥ आले तैसेचि गेले । आपुलालिया वाटा लागले । जीव स्वभावें वेगळे । एकट जातां येतां ॥ ७१ ॥ येथ विरक्तातेंचि[8] फावलें[9] । योगु केणें[10] सांपडलें । अविरक्त नागवले । गेले सर्वस्वें ॥ ७२ ॥

---

१ घरा. २ नाद, खोड. ३ परिणामीं. ४ बाजार. ५ एकत्र जाले. ६ कर्माचा सांठा. ७ मागील जन्मार्जे चालू जन्मीं भोगावें लागणारें फळ किंवा पुढील जन्माच्या प्रारब्धाला कारण होणाऱ्या चालू जन्मांतील कृती. ८ अनासक्त. ९ संधी मिळाली. १० माल.

# ‘क्रिस्तदास’ तोमास स्टिफन्स

स्टिफन्स (ज० १५४९, मृ० १६१९) हा जेजुइट पंथाचा इंग्रज पाद्री १५७९ सालीं गोव्यामध्यें आला. यानें इकडून आपल्या वडिलांना पाठविलेलीं पत्रें वाचून इंग्रजांना आपली ईस्ट इंडिया कंपनी स्थापन करण्याची बुद्धि झाली, असें म्हणतात. गोमंतकांतील सासष्ट येथील क्रिस्ती गुरुकुलाचा तो कुलपति होता. तिकडील ब्राह्मणांच्या बोलींत ‘दौत्रिन क्रिस्तां’ (क्रिस्ती धर्मतत्त्व) नांवाचें एक प्रश्नोत्तररूप धार्मिक चोपडें व एक व्याकरण अशीं पुस्तकें त्यानें प्रथम तयार केलीं. हीं पुस्तकें त्याच्या मृत्यूनंतर अनुक्रमें १६२२ व १६४० सालीं रोमन लिपींत प्रसिद्ध झालीं. तथापि त्याचें मुख्य वाङ्मयकार्य म्हणजे क्रिश्चनपुराण हा मराठी ओवीबद्ध ग्रंथ होय. जुन्या हिंदुधर्माचे ग्रंथ वाचण्यास आपणास प्रतिबंध केला, तरी नव्या खिस्ती धर्माचीं ‘मराठी प्रतिपुस्तकें’ तयार करावीं, असा बाटलेल्या ब्राह्मणांनीं आग्रह केल्यावरून त्यानें हा पुराणग्रंथ लिहावयास घेतला व १६१४ सालीं पुरा केला. याची पहिली प्रत त्याच्या हयातींतच १६१६ सालीं रोमन लिपींत मुद्रित झाली. दुसरी व तिसरी आवृत्ति अनुक्रमें १६४९ व १६५४ सालीं प्रसिद्ध झाली. पण या पहिल्या तीन आवृत्त्यांपैकीं एकही प्रत जगांत आज उपलब्ध नाहीं. १९०७ सालीं श्री. साल्डाणा यांनीं मंगळूर येथें चवथी आवृत्ति छापिली ती कांहीं हस्तलिखितांवरून होय. आपल्या पुराणाच्या शेवटीं ‘क्रिस्तदासु’ असें आपलें मुद्रानाम हा कवि नमूद करतो तें विष्णुदास नामा किंवा कृष्णदास नामा या नांवांवरून त्यास सूचलें असावें.

याच्या जागेवर आलेल्या एतियेन द ला क्रुवा (१५७९–१६४३) या फ्रेंच पाद्रीनें सेंट पीटरवर मराठी पुराण लिहून त्यांत हिंदु देवदेवतांचें खंडण करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच्या ओव्या सुमारें पंधरा हजार आहेत. हा ग्रंथ १६२९–३४ सालीं गोव्यांत मुद्रित झाला.

ह्याच्या मागून आंतोनियु द सालदान्ज हा क्रिस्ती गुरुकुलाचा कुलपति झाला. ‘सांतु आंतोनिची जीवित्वकथा’ नांवाचें एक मराठी ओवीबद्ध पुराण यानें लिहिलें आहे. त्याची रचना पाहून महिपतीच्या संतचरित्रांची

आठवण होते. हा ग्रंथ १६१९ सालीं प्रथम मुद्रित झाला. याशिवाय क्रिस्ताच्या वधस्तंभावरील कांहीं स्फुट मराठी काव्येंही या विदेशी मिशनरी लोकांनीं लिहिलेलीं आढळतात.

खालील पहिल्या दोन उताऱ्यांत देवनागरी लिप्यंतर अगदीं मूळ रोमन लेखनाबरहुकूम राखण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. श बद्दल स, क्ष बद्दल ख, य बद्दल ए, ऋ बद्दल रु किंवा री, ज्ञ बद्दल ग्न्य, द्ध बद्दल ध किंवा अल्पप्राणाबद्दल महाप्राण व महाप्राणाबद्दल अल्पप्राण व्यंजन वापरण्याची स्टिफन्सची पद्धति जुन्या काळच्या इतर एतद्देशीय मराठी कवींच्या हस्तलिखित ग्रंथांतही आढळते. सर्वसाधारण वाचकाला दुर्बोध होऊं नये म्हणून तिसऱ्या व चवथ्या उताऱ्यांतील भाषेवर थोडा संस्कार केला आहे.

विशेष माहितीकरितां पहा :—क्रिश्चन पुराण—सं० जे. एल्. साल्डाणा; जेजुइतांचे मराठी वाङ्मयकार्य (यशवंत, एप्रिल १९३८); क्रिस्ताचें वधस्तंभारोहण (The Journal of the University of Bombay, Sept. 1940); सांतु आंतोनिची जीवित्वकथा—सं० अ. का. प्रियोळकर.

## क्रिश्चन पुराण

### मंगलाचरण

#### ओव्या

वो नमो विस्वभरिता । देवा बापा सर्वे समरथा[1] । परमेस्वरा सतेवंता[2] । स्वर्गप्रथुविचेआ रचणारा ॥ १ ॥ तूं रिधीसिधिचा[3] दातारु । क्रुपानिधी करुणाकरु । तूं सर्व सुखाचा सावरु[4] । आदि अंतु नातोडे[5] ॥२॥ तूं परमानंदु सर्व स्वरुपु । विस्वव्यापकु ग्न्यानदिपु । तूं सर्व गुणीं निर्लेपु । निर्मळु निर्विकारु स्वामिया ॥ ३ ॥ तूं अद्रुस्टु तूं अवेक्तु । सम दयाळु सर्व प्रातु । सर्व ग्न्यानु सर्व नितिवंतु । येकुचि देवो तूं ॥ ४ ॥ तूं साख्यात[6] परमेस्वरु । अनादसिधु[7] अपरांपरु[8] । आदि अनादि अविनासु अमरु । तुजें स्तवन त्रिलोकीं ॥ ५ ॥ स्वर्गु स्रुस्टि तुवां हेळामात्रें[9] । केला चंद्रु

१ [समर्था]. २ [सत्यवंता]. ३ [रिद्धीसिद्धीचा]. ४ [सागरु]. ५ [नातुडे] सांपडत नाहीं, समजत नाहीं. ६ [साक्षात्]. ७ अनादिसिद्ध, अनादिकालापासून अस्तित्व असलेला. ८ [अ+पारंपरिय] परंपरा नाहीं असा, अनंत अमर्याद. ९ लीलेनें.

सुर्यु नखेत्रें[१] । तुजेनि येके सब्दें[२] पवित्रें । केली सर्व रचना ॥ ६ ॥ तूं आणी तुजा येकुचि सुतु । आणी स्पिरितु[३] सांतु[४] । तेगै[५] जण एकुचि सतेवंतु । देवो जाणावा ॥ ७ ॥ तेया तुजेया दयाळा कुमरा । कृपानिधी अम्रुतसावरा । स्वर्गस्त्रुस्टिचेआ स्वस्तकरा[६] । नमन माजें ॥ ८ ॥ नमो विस्वाचिये दिप्ती । नमो वैकुंठसभेचे कांती । देवा बापाचा दखिण हस्तीं । सिहासण तुजें ॥ ९ ॥ जरि तूं आमां मनीं रिघावा करिसी । तरि अग्न्यानपटळ फेडिसी । अम्रुता सारिखी घोडिव[७] दाविसी । प्रेमभरित करोनि ॥ १० ॥

पु. १, अ. १.

## मराठी भाषेची प्रशस्ति

जैसी हरळां[८] माजि रत्नकिळा[९] । कि रत्नां माजि हिरा निळा[१०] ।
तैसी भासां माजि चोखाळ[११] । भासा मराठी ॥

जैसी पुस्पां माजि पुस्प मोगरी । कि परिमळां[१२] माजि कस्तुरि ।
तैसी भाषां माजि साजिरी । मराठिया ॥

पखिआं[१३] मधें मयोरु । व्रुखिआं[१४] मधें कल्पतरु ।
भासां मधें मानु थोरु । मराठियेसी ॥

तारां मधें बारा रासी । सप्त वारां माजि रवी ससी[१५] ।
यां दिपिचेआं[१६] भासां मधें तैसी । मराठिया ॥

पु. १, अ. १.

---

१ [नक्षत्रें]. २ [शब्दें]. ३-४ पवित्र आत्मा ( Holy Ghost ). ५ तिघेही. ६ [स्वस्थकरा], शांति देणारा. ७ [गोडीव], रुचि. ८ लहान दगड किंवा खडा, यां. ९ रत्नकिळ असा खरा पाठ असावा. ज्या मूळ ज्ञानेश्वराच्या योगवासिष्ठावर ही प्रशस्ति आधारली आहे, त्यांत 'हरळांमध्यें रत्नकिळ । कीं पुष्पांमध्यें कमळ' असा मजकूर आढळतो. रत्नकीळ हें एका पर्वताचें नांव आहे. पहा: "वोलांडिला हिमाचल । गंधमादनगिरी विशाळ । तेथूनि पुढां रत्नकील । महापर्वत टाकिला ।"— मुक्ते० वन० अ. ४, ओ. ८७. १० नीळ. नीलकांत मणि. ११ शुद्ध. १२ सुवासां. १३ [पक्ष्यां]. १४ [वृक्षां]. १५ [शशी] चंद्र. १६ द्वीपांतील.

## कुमारी मेरीचें वर्णन

पुढां ती दाविदनंदनी[१] । दिवसीं मासीं वाढुनी । पितया घरीं वरुषें तीनी । होती मरी[२] ॥ १ ॥ मग एके अवसरीं । मायबापें आपुले कुमरी । नेली जेरुजाल्या नगरीं । तेंप्लापासीं[३] ॥ २ ॥ बरवी बुद्धि घ्यावया । नगरीं आंकुवारी[४] होतिया । त्यांच्या मंदिरीं नेली राहावया । तेंप्लाजवळीं ॥ ३ ॥ तया तेंप्लाच्या द्वारीं । सोपाणें[५] होतीं पंधरावरी । पाषाण-जोडित बरव्या परी । बांधलीं होतीं ॥ ४ ॥ तीं सोपाणें मरी वळगुनी[६] । स्वामियाचें[७] चिंतन करोनी । गेली महाद्वार टांकोनी । चरणचाली ॥ ५ ॥ वरी पावतां उभी राहे । मातेपितयाची वास[८] पाहे । वंकट[९] दृष्टी निहाळिताहे । तयां दोघां ॥ ६ ॥ दोहीं अधरांसारिसें । मरियेन उन्मळिलें[१०] हंसें । प्रकाश-काळींचें जैसें । दिसे कमळ ॥ ७ ॥ दोहीं दांतांचिया पंगती । जैसीं मुक्ताफळें ढाळु[११] देती । तोखोनी[१२] माता पिता आलिंगिती । मग निघालीं तेंप्लीं ॥ ८ ॥ भजन करोनि तेंप्लातें । निवेद्यु अर्पिला देवातें । मग दोघें घेउनि गेलीं मरियेतें । आंकुवारींच्या[१३] मंदिरा[१३] ॥ ९ ॥ तेथें मायबापें आपुले कुमरी । ठेऊनि आंकुवारींच्या घरीं । परतोनि गेलीं माघारीं । आपुल्या आश्रमातें ॥ १० ॥ तेंप्लाच्या आंकुवारी समस्ती । मरियेचें रूप निहाळिती । देखोनियां उत्तम कांती । पावती सुख ॥ ११ ॥ दीर्घ तियेचें मुखकमळ । नयन सुरेख निर्मळ । अधर सुरंग झळाळ । पोवळें जैसें ॥ १२ ॥ सुवर्णसरियांसारिसे[१४] । केंस मिरवती तैसे । अरुणउदयीं जैसीं । किरणें फांकलीं ॥ १३ ॥ आंकुवारींसि विस्मयो जाहाला । म्हणती स्वर्गींचा बहुवा[१५] आला । आम्हां माजी राहिला । कन्येचेनि रूपें ॥ १४ ॥ आंकुवारींच्या घरीं होती । तेथें वर्तली बरवे रीती । तियेच्या करणिया गुण कीर्ति । अल्पमती न वर्णवे ॥ १५ ॥ तिये घरींची शिरोमणि[१६] । ती मानिली जैसी जननी । पाळिलें बरवें करोनी । तियेचें वचन ॥ १६ ॥ क्षुधे तृषे निद्रे ठाईं । देहवासना मनीं नाहीं । भक्तिमर्यादेवीण कांहीं । न

---

१ डेविडची कन्या. २ मेरी. ३ मंदिर. Temple हा शब्द जेरुसलेम येथें सालोमन यानें उभारिलेल्या धर्ममंदिरास योजतात. ४ कुमारी. ५ पायऱ्या. ६ चढून. ७ प्रभूचें. ८ मार्गप्रतिक्षा. ९ वांकड्या. १० विकसविलें. ११ तेज, पाणी. १२ संतोष पावून. १३ बालिकाश्रम. १४ सोन्याच्या तारांसारखे. १५ देवदूत. १६ मुख्य (Superior).

चिंती आन ॥ १७ ॥ नित्य प्रभातें उठोनु । परमेश्वरीं लयलक्ष[1] लावुनु । राहे तयाचे चिंतन करोनु । येकु प्रहरूवरी ॥ १८ ॥ सकळीं पुढां उठोनि मरी । सकळां मागें निद्रा करी । अवघ्यांहूनि बरविये परी । करी कामधंदा ॥ १९ ॥ चालतां बोलतां वर्ततां । गृहाचारु चालवितां । अष्टही प्रहर स्मरण करीत । परमेश्वराचें ॥ २० ॥ विवेकावांचोनि न बोले । युक्त वचनीं बोले । वोखटे[2] शब्द नाहीं उच्चारिले । मुखेंकरोनी ॥ २१ ॥ चालतां न चाले चंचळपणें । नेणे चपळ बोलणें । कोपा क्रोधाचें करणें । नेणेंचि मरी ॥ २२ ॥ सांडोनियां गर्वाचारु । वर्जिला मनिंचा अहंकारु । लीनत्वाचा निर्धारु । सदां वसे जीवीं[3] ॥ २३ ॥ मनिचेनि कपटें । न घे दुसऱ्याचें वोखटें । जूझ भांडण खोटें । कधींचि नाहीं ॥ २४ ॥ बरवेपणें सकळां ठाईं । अनाथातें अव्हेरी नाहीं । सांगातिणींचा शिणु[4] कांहीं । न धरी जीवीं ॥ २५ ॥ आपणाहूनि ज्या महंती । तयांसि मानु देत होती । येरांसि हांसें न करी ती । कवणी वेळां ॥२६ ॥ कवणातें अपमानु न करी । दुर्बळांचा प्रतिपाळु करी । भांडती ज्या अंकुवारी । तियांसि करी मैत्रिक[5] ॥ २७ ॥ ऐसियां गुणांनिमितीं मरी । कीर्तिवंती जाहली थोरी । सकळांतें आंकुवारी । पडिये[6] बरवी ॥ २८ ॥ येवढी स्वरूपी सलक्षणी । जरी तियेसि देखिली जनीं । तरी वोखटी कल्पना मनीं । न रिघे कवणा ॥ २९ ॥ जंव जंव तिये पाहाती जन । तंव तंव भक्तिस्नेहो मना । आणि बरव्यां गुणांची वासना । उठे तयांतें ॥ ३० ॥ लोहा परिसु लागलेया । सुवर्ण करी लोहा तया । तैसें मरिये दरुषणें पापियां । मन होय निर्मळ ॥ ३१ ॥ ऐसी अंकुवारींच्या घरीं राटली[7] । मग चवदां वरुषांची जाहाली । कन्या उपवरी वाढीनली । मरी बाळा ॥ ३२ ॥

पु. २, अ. ३.

## संतां महंतां होताहे दुःख मधुपानाचें

काना नांवाच्या गांवामध्यें एका विवाहप्रसंगीं द्राक्षरस (wine) कमी पडला ; त्यावेळीं रिकामे रांजण क्रिस्तानें भरावयास लाविले व त्याच्या आशीर्वादानें त्या पाण्याचें द्राक्षरसांत रूपांतर झालें. या चमत्काराचें

---

१ अतिशय चित्त. २ वाईट. ३ मनांत. ४ खेद, राग. ५ मैत्री. ६ आवडती. ७ रुळली.

वर्णन करतांना हिंदुस्थानासारख्या उष्णप्रदेशांत मद्यप्राशन करणें लाजीरवाणें असून त्यामुळें संतमहंतांना दुःख होतें, असें कवीनें फारच मार्मिक व प्रत्ययोत्पादक रीतीनें या उताऱ्यांत सांगितलें आहे.

मधुरेचें[1] आश्चर्य[2] ऐकुनु । उठिला एकु क्रिस्तांवजनु । करिता जाहाला प्रश्नु । पाद्रीपासीं ॥ १ ॥ म्हणे हें आश्चर्य स्वामियाचें पहिलें । ऐकुनु आम्हां सुख जाहालें । तेणें लोकप्रसिद्ध नवल केलें । म्हणोनियां ॥ २ ॥ पण परियेसा माझी विनंति । आमचे लोकु मधुपान[3] न करिती । म्हणोनियां ह्या आश्चर्याचा धरिती । विटाळु एकादे वेळां ॥ ३ ॥ तंव पाद्री म्हणे यां देशींच्या नरां । अपवित्र दिसे मधु मधुरा । म्हणउनु सांगतों अवधारा । श्रोतेजन ॥ ४ ॥ हे आवविये क्षिती । वेवेगळीं द्वीपें आहेती । खंड देश अपरमित । नाना परींचे ॥ ५ ॥ त्यां त्यां द्वीपवतियांसी । आपुल्यां गुणांसारिखें तयांसी । देवें भक्षु दिधला मनुष्यांसी । हवा तैसा ॥ ६ ॥ एकिचि द्वीपवती । न प्रसवे वस्तु समस्ती । द्वीपोंद्वीपीं निपजती । वेवेगळिया ॥ ७ ॥ हिंदुस्थानामाजी नारियेळी । मिरीं पान पोफळी । आंबे पणस केळीं । उपजती ॥ ८ ॥ माल्लुका[4] द्वीपा होउनु[4] । आणिती काराफुल[5] भरुनु । सैलाणा[6] जुंवेयापासाउनु[7] । येताहे तिखी[8] ॥ ९ ॥ फ्रिंगियांचीं[9] द्वीपें बहुतीं । द्राक्षफळें ओसंडिती[10] । आणिएकी वस्तु प्रसवती । नाना परींच्या ॥ १० ॥ हे हिंदुस्थानींचे जन । करूं न शकती मधुपान । तयांसी नाहीं देखुन । द्राक्षफळें ॥ ११ ॥ आणि सूर्यु चाले मस्तकावरुता । तेणें उष्ण धगी उमटत । म्हणोनि गरज नाहीं सर्वथा । मधुपानाची ॥ १२ ॥ फ्रिंगियांचे देशीं । शुद्ध पाणी सदां न घेती तृषेसी । तेथें सूर्यु आकाशीं । दूर आहे ॥ १३ ॥ शैत्य[11] पडे म्हणोनी । द्राक्षरसा मिसाळिती पाणीं । प्राशन करिती प्राणीं । एकवटुनु ॥ १४ ॥ आणिएकां देशीं भेदे शैत्य । तेणें पाणीं आटे तेथ । अति निबर[12] होत । गुंड्यासमाने[13] ॥ १५ ॥ तयां देशांतु शैत्यकाळीं । पाणीं हाणिती कुदळीं । गोणियांतु भरोनि तया वेळीं । गर्दभांवरी

---

१ मद्याचें. २ चमत्कार. ३ मद्यपान. ४ मलाका देशांतून. ५ लवंग. ६ सिलोन. ७ बेटांतून. ८ दालचिनी. ९ पोर्तुगिजांचीं. १० भरून वाहातात. ११ थंडी. १२ कठीण, घट्ट. १३ दगडाप्रमाणें.

वाहिती ॥ १६ ॥ तेथें थुंकी घालितां भूमिकेसी । आटुनु जाय तात्काळेसी । निबरी काजूसारिखी[1] । झिळिमिळी[2] करी ॥ १७ ॥ आणि बहुवेळां मनुष्यें तेथें । वाट चुकुनु पडती पर्वतातें । शैत्य भेदोनि हिंडतां तेथें । सांडिती प्राणु ॥ १८ ॥ जैसें पाषाणाचें बाहुलें । हाले चाले ना ओगुलें । तैसें शरीर निबर जाहालें । शैत्येंकरोनी ॥ १९ ॥ ऐशां तयां देशीं । वोखटें[3] पाणीं पिवनासी । आणि नाहीं प्रबंदु[4] तेथेंसी । द्राक्षरसाचा ॥ २० ॥ म्हणोनि द्राक्षांच्या गांवीं जेथ । उष्ण बहुतेक नाहीं तेथ । पाणीं करोनि मिश्रित । मधुपान सेविती ॥ २१ ॥ आणि शैत्यापासोनि द्राक्ष नाहीं । पाणी वोखटें न सेवे कांहीं । जेथ जवा आणि पाणियाचें पाहीं । करिती पिवन ॥ २२ ॥ जेथ द्राक्ष नाहीं उष्ण बहुत । आणि निर्झरोदक वाहात । तेथें मधुपानाविरहित । शुद्ध पाणी सेविती ॥ २३ ॥ ऐसा देवो कृपावंतु । जैसें हवें ज्यांच्या देशांतु । तैसाचि भक्षु संसारांतु । दिधला मनुष्यातें ॥ २४ ॥ म्हणोनि जें वेगळें पिवन । स्वामियें दिधलें जनां । तें अपवित्र न म्हणा । सर्वथा तुम्हीं ॥ २५ ॥ अथवा जीं मनुष्यें देवपुत्रें । आपुलेनि रक्तें केलीं पवित्रें । तयांसि तुम्ही अपवित्रें । न म्हणा सर्वथा ॥ २६ ॥ जो कवणु मधुपान करी । तो अपवित्रु नव्हे शरीरीं । जया लागे मधुघुमारी[5] तोचि अपवित्रु ॥ २७ ॥ पापावांचोनि प्राणिया । येरी कवणही वस्तु जाहालिया । अपवित्रु न करिती भलतेया । मनुष्यातें ॥ २८ ॥ पण जो मधु हिंदुस्थानाप्रति । कल्पवृक्षाचा[6] रसु काढिती । अग्नीवरवुनु कढविती । तापउनिया ॥ २९ ॥ आपुल्या लाभा काढिती दुकानां । देती अधम-जातींच्या जनां । तो मधु कवण । म्हणेल बरवा ॥ ३० ॥ ऐसी मधुरा घेती मूर्ख । पाणीं न करितां मिश्रादिक[7] । लोळत पडती अल्प सुखा- । साठीं घुमारियें ॥ ३१ ॥ कन्यापुत्रातें कष्टविती । गृहाश्रमु विभाडिती[8] । सर्व संपदा हारपिती[9] । हे मधुरेकारणें ॥ ३२ ॥ अपरात्रीं रिघती घरीं । खावया न मिळे ते अवसरीं । म्हणोनि स्त्रियेतें मारी । निर्दयु पुरुषु ॥ ३३ ॥ तें देखोनि लेकरूंबाळ । करिती बोमाट कोल्हाळ । धांवोनि येती सकळ । शेजीवासी[10] ॥ ३४ ॥ मधुरापिवन करतेयां । आणि लोभियां दुकानियां ।

---

१ कांचेप्रमाणें. २ चमकणें. ३ वाईट. ४ प्रतिबंध, आडकाठी. ५ दारूचें कैफ, धुंदी. ६ नारळीचा. ७ मिश्रित. ८ बिघडविती. ९ घालवितात. १० शेजारी.

देती गाळी शिविया । मेळले जनु ॥ ३५ ॥ या मधुपिवनापासोनि । आपुली वृत्तिभूमी विकुनी । उरली तिही सांडुनी । न करिती कृषी ॥ ३६ ॥ राजकरु द्यावयासी । शक्ति उपावो नाहीं तयांसी । द्रव्य नाहीं गांठिसी । कपाळीं नाहीं मति ॥ ३७ ॥ मधु मधुरा आंगीं भेदली । तेणें काळिजें करपलीं । आयुष्यासी हानि पडली । हळुहळु ॥ ३८ ॥ हें सेवितां मधुपान । हिंदुस्थानिंच्यां क्रिस्तांवजनां । थोरी लज्जा अपमानु । हांसती लोकु ॥ ३९ ॥ देवचाराशी[1] जाहालें सुख । परमेश्वरु तयांसि विमुख । संता महंतां होताहे दुःख । मधुपानाचें ॥ ४० ॥

पु. २, अ. २२.

---

# तुकाराम

तुकाराम हा पुण्यापासून नऊ कोसांवर देहू म्हणून एक गांव आहे तेथचा राहणारा. ह्याचा बाप जातीचा शूद्र असून वाण्याचा धंदा करीत असे. तुकारामानेंही कांहीं दिवस व्यापार केला. परंतु त्याचें चित्त लहानपणापासूनच संसारांत नव्हतें. त्यामुळें व्यापाराच्या चोपड्या, खतेंपत्रें वगैरे त्यानें इंद्रायणींत बुडवून टाकिलीं व संसारोपाधीपासून मुक्त होऊन तो ईश्वरोपासना करूं लागला. शिवाय त्याची बायको जिजाबाई ही स्वभावानें कजाग असून त्याला पुष्कळ त्रास देई; ह्यामुळें तो अधिकच उदास झाला.

तुकाराम विठ्ठलाचा निःसीम भक्त होता; इतका कीं "देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं माझा भावो," असा त्याचा संकल्प होता. तो पंढरीची वारी करीत असे व कथा करीत असे. त्याच्या कथेंत गायनादिक मनोरंजक साधनें नसत. आपण केलेले अभंग म्हणून त्यांचा अर्थ स्पष्ट करून दाखवावा आणि लोकांस बोध करावा, हाच त्याचा उद्देश असे. कथा करण्याची चाल तेव्हांपासूनच पडली असें म्हणतात.

---

[1] सैतानास.

तुकाराम शिवाजीराजाच्या कारकीर्दींत होता. नामदेवाप्रमाणें तुकारामानें हजारों अभंग केले आहेत. त्याच्या कवितेंत औत्सुक्य व प्रेम पुष्कळ आहे; तसेंच त्याची वाणी प्रासादिक, रसाळ व प्रेमळ आहे व तींत एक प्रकारचा जोर आहे. सोप्या व साध्या शब्दांनीं त्यानें केलेला उपदेश सर्वांच्या मनावर चांगला ठसतो.

भक्ति, ज्ञान, वैराग्य व नीति ह्यांवर मुख्यत्वेंकरून ह्याचे अभंग आहेत.

तुकारामाचा जन्मशक व निर्याणशक यांसंबंधीं एकवाक्यता नाहीं. जन्मशक १५४९ पर्यंत मागें नेतात; परंतु जन्मशक १५३० व निर्याण-शक १५७१ (फाल्गुन वद्य २) हे काल बरेचसे मान्य झालेले दिसतात.

विशेष माहितीकरितां पहा: श्रीतुकारामाचे अभंग (सरकारी गाथा); तुकारामाचें चरित्र (पूर्वार्ध)-पु. मं. लाड; श्रीतुकारामचरित्र—पांगारकर; मुद्रित तुकारामवाङ्मय—प्रियोळकर.

## स्फुट अभंग

(१)

अगा करुणाकरा करितसें धांवा । या मज सोडवा लवकरी ॥ १ ॥ ध्रु० ॥
ऐकोनियां माझीं करुणेचीं वचनें । व्हावें नारायणें उतावीळ ॥ छ ॥
मागें पुढें अवघा दिसे रिता ठाव । ठेवूनि पायीं भाव वाट पाहें ॥ २ ॥
उशीर तो आतां न पाहिजे केला । अहो जी विठ्ठला माय-बापा ॥ ३ ॥
उरलें तें एक हेंचि मज आतां । अवघें विचारितां शून्य जालें ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां करीं कृपा-दान । पाउलें समान दावीं डोळां ॥ ५ ॥

(२)

नाहीं संतपण मिळत हें हाटीं । हिंडतां कपाटीं रानीं वनीं ॥ १ ॥
न ये मोल देतां धनाचिया राशी । नाहीं तें आकाशीं पाताळीं तें ॥ २ ॥
तुका म्हणे मिळे जिवाचिये साटीं[1] । नाहीं तरी गोष्टी बोलों नये ॥ ३ ॥

(३)

भोरप्यानें[2] सोंग पालटिलें वरी । बक ध्यान धरी मत्स्या जैसें ॥ १ ॥
टिळे माळा भेंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदि जगीं फांसे जैसे ॥ २ ॥

१ बदला. २ बहुरूप्यानें.

ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ॥ ३ ॥
खाटिक हा स्नेहवादें पशु पाळी । कापावया नळी[1] तयासाठीं[1] ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसा भला मी लोकांत । परि तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ५ ॥

(४)

विरोधाचें मज न साहे वचन । बहु होतें मन कासावीस ॥ १ ॥
म्हणउनि जीवा न साहे संगती । बैसतां एकांतीं गोड वाटे ॥ २ ॥
देहाची भावना वासनेचा संग । नावडे उबग आला यांचा ॥ ३ ॥
तुका म्हणे देव अंतरे यामुळें । आशा-मोह-जाळें दुःख वाटे ॥ ४ ॥

(५)

न-लगे मायेसी बाळें निरवावें । आपुल्या स्वभावें वोढे त्यासि ॥ १ ॥
मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार[2] भार त्याचे माथां ॥ २ ॥
गोडधड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥ ३ ॥
खेळतां गुंतलें उमगूनी आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ॥ ४ ॥
त्याच्या दुःखें पडे आपण खापरीं । लाही तळीं वरी होय जैसी ॥ ५ ॥
तुका म्हणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥ ६ ॥

(६)

सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वानालागीं ॥ १ ॥
मुक्ताफळ-हार खरासि घातला । कस्तुरी सुकराला चोजविली ॥ २ ॥
वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खूण[3] काय जाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे । भक्तिचें महिमान साधु जाणे ॥ ४ ॥

(७)

संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश ॥ १ ॥
तेथें मी राहीन होऊनि याचक । घालतील भीक तेचि मज ॥ २ ॥
संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ ३ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान । करीती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥
संतांचा उदीम उपदेशाची पेंठ । प्रेम-सुख साटीं घेती देती ॥ ५ ॥
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी । म्हणोनि भिकारी जालों त्यांचा ॥ ६ ॥

---

१ त्याची मान. २ गर्भवेष्टन. ३ वर्म.

(८)

सर्व-भावें आलों तुजचि शरण । काया-वाचा-मनेंसहित देवा ॥ १ ॥
आणीक दुसरें न ये माझे मना । राहिली वासना तुझे पायीं ॥ २ ॥
माझियेवरीचें कांहीं जड-भारी । तुजविण वारी कोण एक ॥ ३ ॥
तुझे आम्ही दास आमचा तूं ऋणी । चालत दुरूनी आलों मागें ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां घेतलें धरणें । हिशोबाकारणें भेटी देई ॥ ५ ॥

(९)

नीचपण[1] बरवें देवा । न चले कोणाचाही हेवा ॥ १ ॥
महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे राहती ॥ २ ॥
येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरी ॥ ३ ॥
तुका म्हणे कळ । पाय धरिल्या न चले बळ ॥ ४ ॥

(१०)

कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनी पाहे ॥ १ ॥
तैसें जालें माझ्या जिवा । केव्हां भेटसी केशवा ॥ २ ॥
चुकलीया माये । बाळ हुरूहुरू[2] पाहे ॥ ३ ॥
जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ ४ ॥

(११)

घरोघरीं अवघें जालें ब्रह्म-ज्ञान । परी मेळवण बहु माजी[3] ॥ १ ॥
निरें कोणापासीं होय एक रज । तरी द्या रे मज दुर्बळासी ॥ २ ॥
आशा तृष्णा माया कालवूनि दोन्ही । दंभ तो दुरूनि दीसतसे ॥ ३ ॥
काम क्रोध लोभ शिणवी बहूत । मेळवूनि आंत काळकूट ॥ ४ ॥
तुका म्हणे तेथें कांहीं हाता न ये । आयुष्य मोलें जाये वायांवीण ॥ ५ ॥

(१२)

थुंकोनियां मान । दंभ करितों कीर्तन ॥ १ ॥
जालों उदासीन देहीं । एकावीण चाड नाहीं ॥ २ ॥
अर्थ अनर्थ सारिखा । करूनि ठेवीला पारिखा[4] ॥ ३ ॥
उपाधी-वेगळा । तुका राहिला सोंवळा ॥ ४ ॥

---

१ लहानपण. २ घाबरून. ३ ब्रह्मज्ञानामध्यें. ४ निराळा, एकीकडे.

(१३)

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशा-पाश निवारूनी ॥ १ ॥
विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे धन जन माता पिता ॥ २ ॥
निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य-कर्मा व्हावें साह्य । घातलिया भय नरका जाणें ॥ ४ ॥

(१४)

याजसाठीं केला होता अट्टाहास[1] । शेवटाचा दीस गोड व्हावा ॥ १ ॥
आतां निश्चितीनें पावलों विसांवा । खुंटलिया धांवा तृष्णेचीया ॥ २ ॥
कवतुक वाटे जालिया वेचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ ३ ॥
तुका म्हणे मुक्ति परिणली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळी ॥ ४ ॥

(१५)

आणिकांच्या घातें । ज्यांचीं निवतील चित्तें ॥ १ ॥
तेचि ओळखावे पापी । निरय-वासी शीघ्र-कोपी ॥ २ ॥
कान पसरोनी । ऐके वदे दुष्ट वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे भांडा । धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥ ४ ॥

(१६)

मांडे पुऱ्या मुखें सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रितें ॥ १ ॥
ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥ २ ॥
बोलों जाणे अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु तोंडें जे वाचाळ । तेंग[2] तेंच मूळ लटिक्याचें ॥ ४ ॥

(१७)

निंदा स्तुती करवी पोट । सोंग दाखवी बोभाट ॥ १ ॥
जटा राख विटंबना[3] । धीर नाहीं क्षमा मना ॥ २ ॥
शृंगारिलें मढें । जीवेंवीण जैसें कुडें ॥ ३ ॥
तुका म्हणे रागें[4] । भलतें चावळे वाउगें ॥ ४ ॥

---

१ पराकाष्ठेची खटपट. २ तेंच. ३ फजीतीला कारण. ४ विषयाच्या आवडीनें.

(१८)

माय ती सर्पीण बाप जरी बोका । त्यांचे संगें सुखा न पवे बाळ ॥ १ ॥
चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी प्राण नाशी ॥ २ ॥
तुका म्हणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान-गर्व ताठा ॥ ३ ॥

(१९)

साधूनी[1] बचनाग खाती तोळा तोळा । आणिकांतें डोळां न पाहवे ॥ १ ॥
साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥ २ ॥
अ-साध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥ ३ ॥

(२०)

मृग-जळा काय करावा उतार । पावावया पार पैल थडी ॥ १ ॥
खापराचे होन खेळती लेंकुरें । कोण त्या वेव्हारें लाभ हाणी ॥ २ ॥
मंगळ-दायक[2] करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥ ३ ॥
स्वप्नींचें जें सुख दुःख जालें कांहीं । जागृतीं तो नाहीं साच भाव ॥ ४ ॥
सारीं जालीं मेलीं लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका म्हणे ॥ ५ ॥

(२१)

बोलविसी तैसें आणीं अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना ॥ १ ॥
मिठेंविण काय करावें मिष्टान्न । शव जीवेंविण शृंगारिलें ॥ २ ॥
संपादणीविण[3] विटंबिलें सोंग । गुणेंविण चांग रूप हीन ॥ ३ ॥
कन्या-पुत्रेंविण मंगळ-दायकें । वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसी होते मज परी । न देखें अंतरीं प्रेम-भाव ॥ ५ ॥

(२२)

बोलणेंचि नाहीं । आतां देवावीण कांहीं ॥ १ ॥
एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ २ ॥
पाहेन ते पाय । जोंवरी हे दृष्टि धाय ॥ ३ ॥
तुका म्हणे मनें । हेचि संकल्प वाहाणें ॥ ४ ॥

(२३)

खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥
ऐसे फुकाचे उपाय । सांडूनियां वायां जाय ॥ २ ॥
पर-उपकार । एका वचनाचा फार ॥ ३ ॥
तुका म्हणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥ ४ ॥

---

१ हळूहळू सवय करून. २ मुलींच्या खेळांतील लग्न वगैरे मंगल-कृत्यें.
३ बतावणी—ज्याचें सोंग घेतलें त्याचें हुबेहुब अनुकरण.

(२४)

दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ॥ १ ॥
पावे धांवोनियां घरा । राहे धरूनियां थारा ॥ २ ॥
कीर्तनाचे वाटे । बराडिया ऐसा लोटे ॥ ३ ॥
तुका म्हणे घडे । पूजा नामें देव जोडे ॥ ४ ॥

(२५)

शिष्याची जो न घे सेवा । मानी देवासारिखें ॥ १ ॥
त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ॥ २ ॥
त्याचें खरें ब्रह्म-ज्ञान । उदासीन देह-भावीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य सांगें । योत रागें येती ते ॥ ४ ॥

(२६)

कोटि-जन्म पुण्य-साधन साधिलें । तेणें हाता आलें हरि-दास्य ॥ १ ॥
रात्रंदिवस ध्यान हरीचें भजन । काया-वाचा-मन भगवंतीं ॥ २ ॥
ऐसिया प्रेमळा म्हणताती वेडा । संसार रोकडा बुडवीला ॥ ३ ॥
एकवीस कुळें जेणें उद्धरिलीं । हें तो न कळे खोली[1] भाग्य-मंदा ॥ ४ ॥
तुका म्हणे त्याची पाय-धूळी मिळे । भव-भय पळे वंदितांचि ॥ ५ ॥

(२७)

आशा हे समूळ खणोनी काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥ १ ॥
नाहीं तरि सुखें असावें संसारीं । फजिति दुसरी करूं नये ॥ २ ॥
आशा मारूनियां जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनी ॥ ३ ॥
तुका म्हणे जरी योगाची[2] तांतडी । आशेची बीबुडी[3] करीं आधीं ॥ ४ ॥

(२८)

हेचि वेळ देवा नका मागें घेऊं । तुम्हांविण जाऊं शरण कोणा ॥ १ ॥
नारायणा ये रे पाहें विचारून । तुजाविण कोण आहे मज ॥ २ ॥
रात्रंदिवस तुज आठवूनि आहें । पाहतोसि काये सत्त्व माझें ॥ ३ ॥
तुका म्हणे किती येऊं काकुलती । कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ॥ ४ ॥

---

१ रहस्य—वर्म. २ ईश्वर जोडण्याची. ३ बींमोड.

(२९)

कुमुदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ॥ १ ॥
तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हीच तें प्रेम-सुख जाणों ॥ २ ॥
माते तृण बाळा दुधाचि ते गोडी । ज्याची न ये जोडी त्यासी कामा ॥ ३ ॥
तुका म्हणे मुक्ता-फळशिंपी-पोटीं । नाहीं त्याची[1] भेटी भोग तिये ॥ ४ ॥

(३०)

जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण ते मुक्ति पाखंड्याची ॥ १ ॥
पिंडाच्या पोषणीं नागवले जन । लटिकें पुराण केले वेद ॥ २ ॥
मना आला तैसा करिति विचार । म्हणती संसार नाहीं पुन्हा ॥ ३ ॥
तुका म्हणे पाठीं उडती यम-दंड । पाप पुण्य लंड न विचारीती ॥ ४ ॥

(३१)

मोक्षाचें आम्हांसी नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस ॥ १ ॥
भक्तीचे सोहळे होतलि जीवासी । नवल त्यावीशीं पुरवितां ॥ २ ॥
ज्याचें त्यासी देणें कोण तें उचित । मानोनियां[2] हित घेतों सुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखें देईं वा संसार । आवडीसी थार करीं माझे ॥ ४ ॥

(३२)

भाव धरी तया तारील पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥
करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ । खापरा परीस काय करी ॥ २ ॥
काय करील तया[3] साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥ ३ ॥
तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥ ४ ॥

(३३)

ठेवा जाणीव गुंडून । येथें भावचि प्रमाण ॥ १ ॥
एका अनुसरल्या काज । अवघें जाणे पंढरीराज ॥ २ ॥
तर्कावितर्कासी । वाव नलगे सायासीं ॥ ३ ॥
तुका म्हणे भावेंवीण । अवघा बोलती तो शीण ॥ ४ ॥

---

१ मोतीं एकदां शिंपींतून काढीलें म्हणजे मग त्याचा तिला उपभोग व भेटी होत नाहीं. तीं दुसऱ्यास होतात, हा भाव. २ भक्तीचे सोहाळे द्याल तर ते हितकारक समजून आम्ही आनंदानें स्वीकारतों. ३ कारलें, कडू वृंदावन इत्यादि वनस्पतींस.

( ३४ )

अवघ्यां पातकांची मी एक रासी । अवघा तूं होसी सर्वोत्तमु ॥ १ ॥
जैसा तैसा लागे करणें अंगीकार । माझा सर्व भार चालविणें ॥ २ ॥
अवघेंचि मज गिळियेलें काळें । अवघींच बळें तुझे अंगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां खुंटला उपाय । अवघेचि पाय तुझे मज ॥ ४ ॥

( ३५ )

त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचें त्या काई असे ओझें ॥ १ ॥
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चारा कोण घाली ॥ २ ॥
पक्षी अजगर न करी संचित । तयासि अनंत प्रतिपाळी ॥ ३ ॥
तुका म्हणे तया भार घातलीया । उपेक्षिना दयासिंधु माझा ॥ ४ ॥

( ३६ )

गोड नांवें क्षीर । परी साखरेचा धीर ॥ १ ॥
तैसें जाणा ब्रह्म-ज्ञान । बापुडें तें भक्तीविण ॥ २ ॥
रुची नेदी अन्न । त्यांत नसतां लवण ॥ ३ ॥
आंधळ्यांचे[1] श्रम । सिकविल्याचेचि नाम ॥ ४ ॥
तुका म्हणे तारा । नांवें तंबुऱ्याच्या सारा ॥ ५ ॥

( ३७ )

बोली मैंदाची बरवी असे । वाटे अंतरीं घालावे फांसे ॥ १ ॥
कसा वरिवरि दिसताहे चांग । नव्हे भाविक केवळ मांग ॥ २ ॥
टिळा टोपी माळा कंठीं । अंधारीं नेउनि चेंपी घांटी ॥ ३ ॥
तुका म्हणे तो केवळ पुंड । त्यावरि वाजती यम-दंड ॥ ४ ॥

( ३८ )

आशा-बद्ध वक्ता । धाक श्रोतियांच्या चित्ता ॥ १ ॥
वायां गेलें तें भजन । उभयतां लोभी मन ॥ २ ॥
बहिर्मुख एके ठायीं । तैसें जालें तया दोहीं ॥ ३ ॥
माप तैसी गोणी । तुका म्हणे रितीं दोन्ही ॥ ४ ॥

---

[1] अन्वय—आंधळ्यांचे शिकविल्याचे श्रम नामची—म्हणजे त्यांला शिकविलें तर फक्त शिकविलें इतकेंच म्हणतां येईल. म्हणजे शब्द मात्र ते उच्चारितील, त्यांला रूप प्रत्यक्ष नसल्यामुळें शिकल्यापासून खरें सुख अथवा खरें ज्ञान होणार नाहीं.

(३९)

निर्वाहापुरतें अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोपि गूहा ॥ १ ॥
कोठेंही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांठवावा ॥ २ ॥
नये बोलों फार बैसों जनामधीं । सावधान बुद्धी इंद्रियें दमी ॥ ३ ॥
तुका म्हणे घडी घडीनें साधावी । त्रि-गुणांची[१] गोवी उगवूनी ॥ ४ ॥

(४०)

याचि नांवें दोष । राहे अंतरीं किल्मिष ॥ १ ॥
मना अंगीं पुण्य पाप । शुभ उत्तम संकल्प ॥ २ ॥
बीजाऐशीं फळें । उत्तम कां अ-मंगळें ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त । शुद्ध करावें हें हित ॥ ४ ॥

(४१)

काय माझें नेती वाईट म्हणोन । करूं समाधान कशासाठीं ॥ १ ॥
काय मज लोक नेतील परलोका । जातां कोणाएका निवारेल ॥ २ ॥
न म्हणें कोणासी उत्तम वाईट । सुखें[२] माझी कूट[२] खावो[२] मागें ॥ ३ ॥
सर्व माझा भार असे पांडुरंगा । काय माझें जगासवें काज ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें सर्वही साधन । नाम-संकीर्तन विठोबाचें ॥ ५ ॥

(४२)

शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार ॥
शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अ-पवित्र शरीरा ऐसें ॥ १ ॥
शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोंसुलें[३] ॥
शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें पर-ब्रह्म ॥ २ ॥
शरीर विटाळाचें आळें । माया-मोह-पाशजाळें ॥
पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥ ३ ॥
शरीर सकळ हें शुद्ध । शरीर निधींचा हा निध ॥
शरीरें तुटे भव-बंध । वसे मध्यें भोगी देव शरीरा ॥ ४ ॥

---

१ सत्त्व, रज आणि तम ह्या तीन गुणांचा गुंता उकलून म्हणजे हे तीन गुण अथवा गुणकार्यें ह्यांहून आत्मस्वरूप अगदीं भिन्न आहे असें समजून. २ मी मरण पावल्यावर लोक माझी खुशाल निंदा करोत, असा भाव. ३ ज्याला अनेक सुखें लगडून आहेत असें.

शरीर अ-विद्येचा बांधा । शरीर अव-गुणाचा रांधा ॥
शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुण सुदा एक शरीरीं ॥ ५ ॥
शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख न करीं त्याग ॥
नव्हे वोखटें ना चांग । तुका म्हणे वेग करीं हरि-भजनीं ॥ ६ ॥

( ४३ )

न करीं दंभाचा सायास । शांती राहें बहुवस ॥
जिव्हे सेवीं सुंगध-रस । न करीं आळस राम-नामीं ॥ १ ॥
जन-मित्र होई सकळांचा । अ-शुभ न बोलावी वाचा ॥
संग न धरावा दुर्जनाचा । करी संतांचा सायास ॥ २ ॥
करिसी देवाविण आस । अवघी होईल निरास ॥
तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखास न पवसी ॥ ३ ॥
धरूनि विश्वास धरीं धीर । करिता देव हाची निर्धार ॥
तयाचा वाहे योग-क्षेम-भार । नाहीं अंतर तुका म्हणे ॥ ४ ॥

( ४४ )

ठाकलोंसें द्वारीं । उभें याचक भीकारी ॥ १ ॥
मज भीक घालीं देवा । प्रेमभातुकें पाठवा ॥ २ ॥
याचकाचा भार । नये घेऊं येरझार ॥ ३ ॥
तुका म्हणे दान । सेवा घेतल्यावांचून ॥ ४ ॥

( ४५ )

सोइरियासि करी पाहुणेरु बरा । कांडितो ठोंबरा संतांलागीं ॥ १ ॥
गाईसी देखोनि बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड लागे ॥ २ ॥
बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । माता-पितयासि दवडितो ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यम-पुरी भोगावया ॥ ४ ॥

( ४६ )

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणे शिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हें भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्त्रवतसे ॥ ५ ॥

(४७)

अवघा तो शकुन । हृदयीं देवाचे चरण ॥ १ ॥
येथें नसता वियोग । लाभा उणें काय मग ॥ २ ॥
संग हरीच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे हरिच्या दासां । शुभ काळ अवघ्या दिशा ॥ ४ ॥

(४८)

बोल बोलतां वाटे सोपें । करणी करितां टीर कांपे ॥ १ ॥
नव्हे वैराग्य सोपारें । मज बोलतां न वाटे खरें ॥ २ ॥
विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तोचि एक सोसी ॥ ३ ॥
तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जिवीं ॥ ४ ॥

(४९)

धेनु चरे वनांतरीं । चित्त बाळका-पें[1] घरीं ॥ १ ॥
तैसें करी वो माझे आई । ठाव देउनि राखें पायीं ॥ २ ॥
काढितां तळमळी । जीवनाबाहेर मासोळी ॥ ३ ॥
तुका म्हणे कुडी । जीव-प्राणांची[2] आवडी ॥ ४ ॥

(५०)

डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ १ ॥
तरी ते नव्हती संत-जन । तेथें नाहीं आत्म-खूण ॥ २ ॥
मेळवुनी नर-नारी । शकुन सांगती नाना-परी ॥ ३ ॥
तुका म्हणे मैंद । नाहिं त्यांपाशीं गोविंद ॥ ४ ॥

(५१)

पोट लागलें पाठीसी । हिंडवीतें देशोदेशीं ॥ १ ॥
पोटा भेणें जिकडे जावें । तिकडे पोट येतें सवें ॥ २ ॥
जप तप अनुष्ठान । पोटासाठीं जाले दीन ॥ ३ ॥
पोटें सांडीयेली चवी । नीचापुढें तें नाचवी ॥ ४ ॥
पोट काशियानें भरे । तुका म्हणे झुरझुरू मरे ॥ ५ ॥

---

१ बाळकापाशीं. २ जीवाला ( देहाभिमान धरणारी चित्कला इला ) कुडी (देह) परम प्रिय वाटते, ती सोडून जाण्याचें त्याला महत् दुःख वाटतें, तसें तुजविषयीं मला वाटूं दे.

(९२)

सर्वां भूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारून ॥
उपतिष्ठे कारण[१] । तेथें बीज पेरीजे ॥ १ ॥
पुण्य करितां होय पाप । दुग्ध पाजूनि पोसिला साप ॥
करूनि अघोराचा[२] जप । दुःख विकत घेतलें ॥ २ ॥
भूमी पाहातां नाहीं वेगळी । माळ बरड एक काळी ॥
उत्तम निराळी । मध्यम आणि कनिष्ट ॥ ३ ॥
म्हणोनी विवेकें । कांहीं करणें निकें ॥
तुका म्हणे फिकें । रुची नेदी मिष्टान्न ॥ ४ ॥

(९३)

कन्या गो करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवें ॥ १ ॥
गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातिशीं कारण नाहीं देवा ॥ २ ॥
आशाबद्ध नये करूं तें करिती । तुका म्हणे जाती नरकामधीं ॥ ३ ॥

(९४)

दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥ १ ॥
आतां ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरीं ॥ २ ॥
उपजला भावो । तुझे कृपें सिद्धी जावो ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां । लाभ नाहीं यापरता ॥ ४ ॥

(९५)

साखरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं । तयासी शेवटीं करबाडें ॥ १ ॥
मालाचे पैं पेटे वाहताति उंटें । तयांलागीं कांटे भक्षावया ॥ २ ॥
वाऊगा हा धंदा आशा वाढविती । बांधोनिया घेती यमा हातीं ॥ ३ ॥
ज्यासी असे लाभ तोची जाणे गोडी । येर तीं बापुडीं शिणलीं वायां ॥ ४ ॥
तुका म्हणे शाहणा होईं रे गव्हारा । चौऱ्यासींचा फेरा फिरों नको ॥ ५ ॥

(९६)

जेवीं नव-ज्वरें तापलें शरीर । लागे तया क्षीर विष-तुल्य ॥ १ ॥
तेवीं परमार्थ जीहीं दुराविला । तयालागीं जाला सन्निपात[३] ॥ २ ॥
कामीण जयाच्या जाहली नेत्रासी । देखी तो चंद्रासी पीत-वर्ण ॥ ३ ॥
तुका म्हणे मद्य-पानाची आवडी । न रुचे त्या गोडी नवनीताची ॥ ४ ॥

---

१ (जेथें) कारण (बीज) उपतिष्ठे (फलोत्पादक होतें). २ क्रूरदेवतेचा.
३ त्रिदोष-सन्निपात-झाला असतां जसा मनुष्य मरतोच तसा ज्यास परमार्थ नाहीं तो नाश पावतोच.

(५७)

राजा चाले तेथें वैभव सांगातें । हें काय लागतें सांगावें त्या ॥ १ ॥
कोणी कोणा येथें न मनी जी फुका । कृपेविण एका देवाचिया ॥ २ ॥
शृंगारिलें नाहीं[1] तगों येत वरी । उमटे लौकरी जैसें तैसें ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं वसे नारायण । कृपेची ते खुण दिसों येते ॥ ४ ॥

(५८)

कईं वाहावें जीवन । कईं पलंगीं शयन ॥ १ ॥
जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥ २ ॥
कईं भोज्य नाना परी । कईं कोरड्या भाकरी ॥ ३ ॥
कईं बैसावें वाहनीं । कईं पायीं अनवाणी ॥ ४ ॥
कईं उत्तम प्रावर्णें । कईं वसनें तींही जीर्णें ॥ ५ ॥
कईं सकळ संपत्ती । कईं भोगणें विपत्ति ॥ ६ ॥
कईं सज्जनासीं संग । कईं दुर्जनासीं योग ॥ ७ ॥
तुका म्हणे जाण । सुख दुःख तें समान ॥ ८ ॥

(५९)

कासया पाषाण पूजिति पितळ । अष्ट धातू खळ भावेंविण ॥ १ ॥
भावचि कारण भावाचि तारण । मोक्षाचें साधन बोलीयेलें ॥ २ ॥
काय करिल जप-माळ कंठ-माळा । करिसी वेळोवेळां विषय-जप ॥ ३ ॥
काय करिसील पंडित हे वाणी । अक्षराभिमानी थोर होय ॥ ४ ॥
काय करिसील कुशल गायन । अंतरीं मळीन कु-बुद्धि ते ॥ ५ ॥
तुका म्हणे भाव नाहीं करी सेवा । तेणें काय देवा योग्य होसी ॥ ६ ॥

(६०)

साधकाचीं दशा उदास असावी । उपाधि नसावी अंतर्बाह्य ॥ १ ॥
लोलुपता काय निद्रेतें जिणावें । भोजन करावें परिमित ॥ २ ॥
एकांतीं लोकांत स्त्रियांसीं वचन । प्राण गेल्या जाण बोलों नये ॥ ३ ॥
संग सज्जनाचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशीं ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरु-कृपा ॥ ५ ॥

(६१)

कासया गा मज घातलें संसारीं । चित्त पायांवरी नाहीं तुझ्या ॥ १ ॥
कासया गा मज घातलें ह्या जन्मा । नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा ॥ २ ॥

---

1 वरच्यावर आणलेली शोभा (फार वेळ) टिकत नाहीं.

नामावीण माझी वाचा अमंगळ । ऐसा कां चांडाळ निर्मियेलें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी जळो जळो काया । विठ्ठला सखया वांचूनियां ॥ ४ ॥

(६२)

माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ॥ १ ॥
हें कां नेणां नारायणा । मज चाळवितां दीना ॥ २ ॥
नागवी[१] धांवणें[१] । तेथें साह्य व्हावें कोणें ॥ ३ ॥
राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ॥ ४ ॥
तुझ्या केल्याविण । नव्हे स्थिर वश मन ॥ ५ ॥
तुका म्हणे हरी । सूत्र तुम्हां हातीं दोरी ॥ ६ ॥

(६३)

टिळे टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ॥ १ ॥
अवघा वर-पंग सारा । पोटीं विषयांचा थारा ॥ २ ॥
मुद्रा लावितो कोरूनी । मान व्हावयासी जनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ॥ ४ ॥

(६४)

ऐसे संत जाले कळीं । तोंडीं तमाखूची नळी ॥ १ ॥
स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोडवली ॥ २ ॥
भांगभुर्का हें साधन । पचनीं पडे मद्यपान ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ ४ ॥

(६५)

वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची । कीर्ती मानवाची सांगों नये ॥ १ ॥
उदंडचि जाले जन्मोनियां मेले । होवोनियां गेले राव रंक ॥ २ ॥
त्यांचें नाम कोणी न घे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ॥ ३ ॥
अ-क्षय अ-ढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुम्ही विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्म-मरण-व्यथा दूर होती ॥ ५ ॥

(६६)

जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें[२] वेंच करी ॥ १ ॥
उत्तमाचि गती तो एक पावेल । उत्तम[३] भोगील जीव-खाणी[३] ॥ २ ॥

---

१ आपलें रक्षण व्हावें म्हणून ज्यास बोलाविलें, तोच जर आपणांस लुटील तर. २ विषयलुब्ध न होतां ( खरें कल्याण होईल अशा रीतीनें). ३ उत्तम योनींत जन्म पावेल.

पर-उपकारी नेणे पर-निंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ ३ ॥
भूत-दया गायी-पशूंचें पाळण । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ४ ॥
शांति-रूपें नव्हे कोणाचें वाईट । वाढवी महत्त्व वडीलांचें ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परम-पद बळ वैराग्याचें ॥ ६ ॥

(६७)

आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्यां भटां जाली धणी ॥ १ ॥
अंतरीं पापाच्या कोडी । वरि वरी बोडी डोई दाढी ॥ २ ॥
बोडिलें तें निघालें । काय पालटलें सांग वहिलें ॥ ३ ॥
पाप गेल्याची खुण । नाहीं पालटले अवगुण ॥ ४ ॥
भक्ति-भावेंवीण । तुका म्हणे अवघा शीण ॥ ५ ॥

(६८)

मऊ मेणाहून आम्ही विष्णु-दास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेले जित असों निजोनियां जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥ २ ॥
भले तरी देऊं ××× लंगोटी । नाठाळाचे काठी देऊं माथां ॥ ३ ॥
माय-बापांहूनि बहु मायावंत । करूं घात-पात शत्रूहूनि ॥ ४ ॥
अमृत तें काय गोड आम्हांपुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरें कोड त्याचे परी ॥ ६ ॥

(६९)

हेंचि थोर भक्ति आवडती देवा । संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥
ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें । चित्तीं असो द्यावें समाधान ॥ २ ॥
वाहिल्या उद्वेग दुःखाचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥ ३ ॥
तुका म्हणे घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवापायीं ॥ ४ ॥

(७०)

धनवंतालागीं । सर्व मान्यता आहे जगीं ॥ १ ॥
माता पिता बंधु जन । सर्व मानिती वचन ॥ २ ॥
जंव चाले मोठा धंदा । तंव बहीण म्हणे दादा ॥ ३ ॥
सदा शृंगार-भूषणें । कांता लवे बहु-मानें ॥ ४ ॥
तुका म्हणे धन । भाग्य अशाश्वत जाण ॥ ५ ॥

(७१)

लोहो परीसा रूसलें । सोनेंपणासी सूकलें ॥ १ ॥
येथें कोणाचें काय गेलें । ज्याचें तेणें अन-हित केलें ॥ २ ॥

गंगा आली आळशावरी । आळशी देखुनि पळे दुरी ॥ ३ ॥
गांवाखालील ओहळें । रागें गंगेसी न मिळे ॥ ४ ॥
तुका म्हणे होऊनी दास । गुरूसी न भजती शिष्य ॥ ५ ॥

(७२)

मागेन तें एक तुज । देईं विचारोनी मज ॥ १ ॥
नको दुर्जनाचा संग । क्षणक्षणा चित्त-भंग ॥ २ ॥
जन्म घेईन मी नाना । बहु सोसीन यातना ॥ ३ ॥
रंक होईन दीनाचा । घायें देह-पात साचा ॥ ४ ॥
तुका म्हणे हेंचि आतां । देईं देईं तूं सर्वथा ॥ ५ ॥

(७३)

कल्प-तरु[१] रुया[१] नव्हती बाभुळा[१] । पुरविती फळा इच्छितिया ॥ १ ॥
उदंड त्या गाई म्हैसी आणि शेळ्या । परी त्या निराळ्या काम-धेनु ॥ २ ॥
तुका म्हणे देव दाखवील दृष्टी । तयासवें भेटी थोर पुण्य ॥ ३ ॥

(७४)

जळो प्रेमा तैसा रंग । जाय उडोनी पतंग ॥ १ ॥
सासूसाठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥ २ ॥
मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥ ३ ॥
जैसी वृंदावन-कांति । उत्तम धरूं नये हातीं ॥ ४ ॥
बक ध्यान धरी । सोंग करूनी मासे मारी ॥ ५ ॥
तुका म्हणे सर्प डोले । तैसा कथेमाजी खुले ॥ ६ ॥

(७५)

जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें । बा अंत-काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥
जाल्या हीन शक्ति नाक डोळे गळती । सांडोनियां पळती रांडा पोरें ॥ २ ॥
बाईल म्हणे खर मरता तरी बरें । नासलें हें घर थुंकोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी न होत हीं कोणी । तुज चक्र-पाणीवांचूनियां ॥ ४ ॥

(७६)

मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया ॥ १ ॥
तैसा भक्ति-वाद काय । रंगबेगडीचा न्याय ॥ २ ॥
वेठीं धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ॥ ३ ॥
काजव्याच्या ज्योती । तुका म्हणे न लगे वाती ॥ ४ ॥

---

१ रुईच्या आणि बाभळीच्या झाडांना कांहीं कल्पवृक्षाची योग्यता नाहीं, असा भाव.

(७७)

पतित मी पापी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा ॥ १ ॥
तारियेले भक्त न कळे तुझा अंत । थोर मी पतित पांडुरंगा ॥ २ ॥
द्रौपदी बहीण वैरीं गांजियेली । आपणाऐसी केली पांडुरंगा ॥ ३ ॥
प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार । माझा कां विसर पांडुरंगा ॥ ४ ॥
सुदामा ब्राह्मण दरिद्रें पिडिला । आपणाऐसा केला पांडुरंगा ॥ ५ ॥
तुका म्हणे तुज शरण निज-भावें । पाप निर्दाळावें पांडुरंगा ॥ ६ ॥

(७८)

पुण्य पर-उपकार पाप ते पर-पीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १ ॥
सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणिक हें वर्म नाहीं दुजें ॥ २ ॥
गति तेचि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥
संतांचा हा संग तोचि स्वर्गवास । नरक तो उदास अनर्गळा ॥ ४ ॥
तुका म्हणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसे ॥ ५ ॥

(७९)

चातुर्याचे योगें कवित्व करिती । प्रासादिक रंग आणितां न ये ॥ १ ॥
संन्याशाचें सोंग संपादिलें सांग । वैराग्याचें अंग आणितां न ये ॥ २ ॥
चंद्र-सूर्य-चित्रें लिहिताति भिंतीं । प्रकाशाचें अंग लिहतां न ये ॥ ३ ॥
शिपायाचें सोंग आणितां येइल सांग । शूरत्वाचें अंग आणितां न ये ॥ ४ ॥
तुका म्हणे गाऊन नाचून करितील सीमा । पांडुरंगीं प्रेमा आणितां न ये ॥ ५ ॥

(८०)

लेंकरा लेववी माता अलंकार । नाहीं अंत-पार आवडीसी ॥ १ ॥
कृपेचें पोसणें तुमचें मी दीन । आजि संतजन माय-बाप ॥ २ ॥
आरुषा उत्तरीं संतोषे माऊली । कवळूनि घाली हृदयाआंत ॥ ३ ॥
पोटा आलें त्याचे न पाहे गुणदोष । कल्याणचि असे असावें हें ॥ ४ ॥
मनाची ते चाली मोहाचिये सोई । ओघें गंगा काई परतों जाणे ॥ ५ ॥
तुका म्हणे कोठें उदार मेघां शक्ति । माझी तृषा किती चातकाची ॥ ६ ॥

(८१)

हा मी आलों म्हणे कोणी बुडतया । तेणें किती तया बळ चढे ॥ १ ॥
तुम्हीं माझा भार घेतला सकळ । आश्वासिलों बाळ अभयकरें ॥ २ ॥

भुकेलीया आस दावीतां निर्धार । किती होय धीर समाधान ॥ ३ ॥
तुका म्हणे दिली चिंता-मणिसाठीं[1] । उचित काचवटी[1] दंडवत ॥ ४ ॥

(८२)

समर्थाचें बाळ कीविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ॥ १ ॥
अव-गुणी जरी जालें तें ओंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥ २ ॥
तुका म्हणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित जालों तूझा ॥ ३ ॥

(८३)

तूं माझी माउली तूं माझी साउली । पाहतों वाटूली पांडूरंगे ॥ १ ॥
तूं मज एकुला वडील धाकुला । तूं मज आपुला सोयरा जीव ॥ २ ॥
तुका म्हणे जीव तुजपाशीं असे । तुजवीण ओस सर्व दिशा ॥ ३ ॥

(८४)

घातलें दुकान । देती आलियासी दान ॥ १ ॥
संत उदार उदार । भरलें अनंत भांडार ॥ २ ॥
मागत्याची पुरे । धणी आणीकांसी उरे ॥ ३ ॥
तुका म्हणे पोतें । देवें भरिलें नव्हे रितें ॥ ४ ॥

(८५)

मज शेवटींचा द्यावा । ठाव तयाचीये देवा ॥
नाहीं करीत मी हेवा । कांहीं थोरपणाचा ॥ १ ॥
पाहा किती आले । शरण समानची केले ॥
नाहीं विचारिले । गुण-दोष कोणाचे ॥ २ ॥
नाहीं पाहिला आचार । कुळ-गोत्राचा विचार ॥
फेडूं आला भार । मग न म्हणे दगड ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व जाणा । तुझ्या आल्यावरी मना ॥
केला तो उगाणा । वडल्या महादोषांचा ॥ ४ ॥

(८६)

दुष्ट आचरण ग्वाही माझें मन । मज ठावे गुण दोष माझे ॥ १ ॥
आतां तुम्ही सर्व जाणा पांडुरंगा । पाहिजे प्रसंगाऐसें केलें ॥ २ ॥
व्याह्याजांवयांचे पंगती दुर्बळ । वंचिजे तो काळ नव्हे कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां जालों शरणागत । पुढील उचित तुम्हां हातीं ॥ ४ ॥

---

१ चिंतामणि न देतां मला जरी काचेचा मणि दिला तरी तें करणें उचित, व त्याबद्दलहि माझें दंडवत आहे; ( मला एकदम मोक्ष न देतां तो देण्याची आपण नुसती आशा दाखविली तरी तें करणें योग्य होईल व तेवढ्याबद्दलही मी आभारी होईन, असा भाव. )

(८७)

जरा[१] कर्ण-मूळीं सांगों आली गोष्टी । मृत्यूचिये भेटी जवळी आली ॥ १ ॥
आतां माझ्या मना होईं सावधान । वो पुण्याची जाण कार्य-सिद्धी ॥ २ ॥
शेवटील घडी बुडतां न लगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंतीं कुळींची देवता । वारावा[२] भोंवता[२] शब्द[२] मिथ्या[२] ॥ ४ ॥

(८८)

संतांसी क्षोभवी कोण्याही प्रकारें । त्याचें नव्हे बरें उभय-लोकीं ॥ १ ॥
देवाचा तो वैरी शत्रु दावेदार । पृथ्वीही थार नेदी तया ॥ २ ॥
संतांपाशीं ज्याचा नुरेचि विश्वास । त्याचे जाले दोष बळिवंत ॥ ३ ॥
तुका म्हणे क्षीर वासराच्या अंगें । किंवा धांवे लागें विषमें मारूं ॥ ४ ॥

(८९)

बसोनी थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी ॥ १ ॥
नाहीं देखिला ना ठावा । तोंडपिटी[३] करी हांवा ॥ २ ॥
फुगतें काउळें । म्हणे मी राजहंसा आगळें ॥ ३ ॥
गजाहूनी खर । म्हणे चांगला मी फार ॥ ४ ॥
मुलाम्याचें नाणें । तुका म्हणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

(९०)

दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद । पडलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥
तैसें खळां मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥ २ ॥
काय करावीं तीं बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वायां गेलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैशी संवसर्गें ॥ ४ ॥

(९१)

काय केलें जळ-चरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ॥ १ ॥
हा तों ठायींचा[४] विचार । आहे यातीं-वैराकार ॥ २ ॥
श्वापदातें वधी । निरपराधें पारधी ॥ ३ ॥
तुका म्हणे खळ । संता पीडीती चांडाळ ॥ ४ ॥

(९२)

जाणतें लेंकरूं । माता लागे दुरी धरूं ॥ १ ॥
तैसें न करीं कृपावंते । पांडुरंगे माझे माते ॥ २ ॥

---

१ वार्धक्य. २ ईश्वरचिंतनावांचून इतर सर्व गोष्टी खोट्या समजून सोडून द्याव्या. ३ बडबड. ४ मूळचा—ईश्वरी संकेताचा.

नाहीं मुक्ता-फळा । भेटी मागुती त्या जळा ॥ ४ ॥
तुका म्हणे लोणी । ताक सांडी निवडूनी ॥ ३ ॥

(९३)

वाईटानें भलें । हीनें दाविलें चांगलें ॥ १ ॥
एकाविण एका । कैंचें मोल होतें फुका ॥ २ ॥
विषें दाविलें अमृत । कडू गोड घातें हित ॥ ३ ॥
काळिमेनें ज्योति । दिवस कळों आला राती ॥ ४ ॥
उंच नीच गारा । हिरा परीस मोहरा ॥ ५ ॥
तुका म्हणे भले । ऐसे नष्टांनीं कळले ॥ ६ ॥

(९४)

आधीं होता वाघ्या । दैव-योगें जाला पाग्या ॥ १ ॥
त्याचा येळकोट राहीना । मूळ-स्वभाव जाईना ॥ २ ॥
आधीं होता ग्राम-जोशी । राज्य-पद आलें त्याशी ॥ ३ ॥
त्याचें पंचांग राहीना । मूळ-स्वभाव जाईना ॥ ४ ॥
आधीं होती दासी । पट्टराणी केलें तिसी ॥ ५ ॥
तिचें हिंडणें राहीना । मूळ-स्वभाव जाईना ॥ ६ ॥
आधीं होतां संत-संग । तुका जाला पांडुरंग ॥ ७ ॥
त्याचें भजन राहीना । मूळ-स्वभाव जाईना ॥ ८ ॥

(९५)

दुष्टाचें चित्त न भिने अंतरीं । जरी जन्मवरी उपदेशिला ॥ १ ॥
पालथे घागरी घातलें जीवन । न धरीच जाण तेंही त्याला ॥ २ ॥
जन्मा येउनि तेणें पतनचि साधिलें । तमोगुणें व्यापिलें जया नरा ॥ ३ ॥
जळो जळो हें त्याचें ज्यालेपण । कासया हें आलें संवसारा ॥ ४ ॥
पाषाण जीवनीं असतां कल्पवरी । पहातां अंतरीं कोरडा तो ॥ ५ ॥
कुचर मूग नयेचि पाका । पाहातां सारीखा होता तैसा ॥ ६ ॥
तुका म्हणे असे उपाय सकळां । न चले या खळा प्रयत्न कांहीं ॥ ७ ॥
म्हणऊनि संग न करितां भला । धरितां अ-बोला सर्व हित ॥ ८ ॥

(९६)

जेणें सांडीला संसार । तयावरी माया फार ॥ १ ॥
धांवे चाले मागें मागें । सुख दुःख सोशी अंगें ॥ २ ॥

ज्याणें घ्यावें नाम । त्याचें करावें तें काम ॥ ३ ॥
तुका म्हणे भोळी । विठ्ठल कृपेची साउली ॥ ४ ॥

(९७)

घेंई घेंई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
डोळे तुम्ही घ्यारे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥ २ ॥
तुम्ही आइका रे कान । माझे विठोबाचे गुण ॥ ३ ॥
मना तेथें धांव घेंई । राहीं विठोबाचे पायीं ॥ ४ ॥
तुका म्हणे जीवा । नको सांडूं या केशवा ॥ ५ ॥

(९८)

ब्रह्म-रस घेंई काढा । जेणें पीडा वारेल ॥ १ ॥
पथ्य नाम विठोबाचें । आणिक वाचे न सेवीं ॥ २ ॥
भव-रोगाऐसें जाय । आणिक काय क्षुल्लकें ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे बाधा । आणिक कदा भूतांची ॥ ४ ॥

(९९)

पडतां जड भारी । दासीं आठवावा हरी ॥ १ ॥
मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥ २ ॥
नामाचे चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥ ३ ॥
तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥ ४ ॥

(१००)

जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ॥ १ ॥
तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ २ ॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ ३ ॥
ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासि धरी जो हृदयीं ॥ ४ ॥
दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥
तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ ६ ॥

(१०१)

जाउनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरी वरी ॥ १ ॥
अंतरींचें शुद्ध कासयानें जालें । भूषण त्वां केलें आपणया ॥ २ ॥
वृंदावन-फळ घोळिलें साकरा । भीतरील[1] धारा[1] मोडेचिना ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरीं कासया फुंदां[2] तुम्ही ॥ ४ ॥

---

१ आंगच्या कडूपणाचा गुण. २ फुगतां.

(१०२)

गंगा-जळा पाहीं पाठी पोट नाहीं । अव-गुण तो कांहीं अमृतासी ॥ १ ॥
रवि दीप काळिमा काय जाणे हिरा । आणिकां तिमिरां नाश तेणें ॥ २ ॥
कर्पूर-कांडणीं काय कोंडा कणी । सिंधू[1] मिळवणीं[1] काय चाले[1] ॥ ३ ॥
परिस चिंतामणि आणिकांच्या गुणीं । पालटे लागोनी नव्हे तैसा ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसे जाणा संत-जन । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ५ ॥

(१०३)

आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालूं नये ॥ १ ॥
तोची कृपा-सिंधु निवारी सांकडें । येर ते बापुडे काय रंक ॥ २ ॥
भवाचीये पोटीं दुःखाचिया राशी । शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

(१०४)

तुझा दास ऐसें म्हणती लोकपाळ । म्हणोनी सांभाळ करीं माझा ॥ १ ॥
अ-नाथाचा नाथ पतित-पावन । हें आतां जतन करीं नाम ॥ २ ॥
माझे गुणदोष पाहातां न लगे अंत । ऐसें माझें चित्त मज ग्वाही ॥ ३ ॥
नेणें तुझी कैसी करावी ते सेवा । जाणसी केशवा अंतरींचें ॥ ४ ॥
तुका म्हणे तूं गा करुणेचा सिंधु । तोडीं भव-बंधु माझा देवा ॥ ५ ॥

(१०५)

तुजवीण वाणीं आणिकाची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥ १ ॥
तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥ २ ॥
नेत्रीं आणिकासी पाहीन आवडी । जावोत तेचि घडी चांडाळ हे ॥ ३ ॥
कथामृत-पान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ॥ ४ ॥
तुका म्हणे काय वांचूनि कारण । तुज एक क्षण विसंबितां ॥ ५ ॥

(१०६)

नर-देहा यावें हरिदास व्हावें । तेणें चुकवावें गर्भ-वासा ॥ १ ॥
नाहीं तरी वांया शिणविली माय । नरकासि जाय जन्मोजन्मीं ॥ २ ॥
तीर्थे व्रत दान देवाचें पूजन । ऐसें हें साधन साधकाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे मुखीं नित्य म्हणे हरी । तया सुखा सरी नाहीं पार ॥ ४ ॥

---

१ निरनिराळीं उदकें समुद्रास मिळतात तरी समुद्रपणांत कांहीं भेद पडतो काय ?

(१०७)

कां रे नाठवीसी कृपाळु देवासी । पोसितो जनासी एकला तो ॥ १ ॥
बाळा दुधा कोण करितें उत्पत्ती । वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥ २ ॥
फुटति तरुवर उष्ण-काळ-मासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥ ३ ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहें त्या अनंता आठवूनी ॥ ४ ॥
तुका म्हणे त्याचें नांव विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ५ ॥

(१०८)

नारायणीं जेणें घडे अंतराय । हो[1] कां बाप-माय त्यजावीं तीं ॥ १ ॥
येर प्रिया पुत्रा असे कोण लेखा । करीती ते दुःखा पात्र शत्रू ॥ २ ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधू । आणि माता निंद्यु भरतें केली ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व धर्म हरी-पाय । आणीक उपाय दुःख-मूळ ॥ ४ ॥

(१०९)

हरिचिया भक्ता नाहीं भय-चिंता । दुःख निवारीता नारायण ॥ १ ॥
नलगे वाहणें संसार-उद्वेग । जडों नेदी पांग देव-राय ॥ २ ॥
असों द्यावा धीर सदा समाधान । आहे नारायण जवळीच ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा सखा पांडुरंग । व्यापियेलें जग तेणें एकें ॥ ४ ॥

(११०)

तैसें नव्हों आम्ही विठोबाचे दास । यावें आणिकांस काकुळती ॥ १ ॥
स्वामीचिये सत्ते ठेंगणें सकळ । आला कळि-काळ हाताखालीं ॥ २ ॥
अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनी हेवा असों पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें । कोड नारायणें पूरवावें ॥ ४ ॥

(१११)

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ । त्याचे गळां माळ असो नसो ॥ १ ॥
आत्मा-अनुभवीं चोखळील्या वाटा । त्याचे माथां जटा असो नसो ॥ २ ॥
पर-द्रव्या अंध निंदेसि जो मूका । तोचि संत देखा तुका म्हणे ॥ ३ ॥

(११२)

न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥ १ ॥
ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हेंची सांगे ॥ २ ॥

---

1 होतना कां.

विटंबो शरीर होत कां विपत्ती । परि राहो चित्तीं नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे नाशिवंत हें सकळ । आठवी गोपाळ तेंचि हित ॥ ४ ॥

(११३)

सद्गुरुवांचूनी सांपडेना सोय । धरावे ते पाय आधीं त्याचे ॥ १ ॥
आपणासारिखें करिती तात्काळ । कांहीं काळ-वेळ नलगे त्यांसी ॥ २ ॥
लोह परिसासी न साहे उपमा । सद्गुरु-महिमा अगाधचि ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें आंधळें हें जन । गेलें विसरून खऱ्या देवा ॥ ४ ॥

(११४)

विषयाचें सुख येथें वाटे गोड । पुढे अवघड यम-दंड ॥ १ ॥
मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाळ ॥ २ ॥
असि-पत्र-तरुवर खैराचे इंगळ । निवतील ज्वाळ तैल-पाकीं ॥ ३ ॥
तप्त-भूमिवरी लोळाविती पाहीं । अग्नि-स्तंभ बाहीं कवळविती ॥ ४ ॥
म्हणोनियां तुका येतो काकुळती । पुरें आतां याती गर्भ-वास ॥ ५ ॥

(११५)

जननी हे जाणे बाळकाचें वर्म । सुख दुःख धर्म जें जें कांहीं ॥ १ ॥
अंधापुढें जेणें दिधला आधार । त्याचा हा विचार तोचि जाणे ॥ २ ॥
शरणागता जेणें घातिलें पाठीशीं । तो जाणे तेविशीं राखों तया ॥ ३ ॥
कासे लागे तया न लगती सायास । पोहोणारा त्यास पार पावी ॥ ४ ॥
तुका म्हणे जीव विठ्ठलाचे हातीं । दिला त्याची गति तोचि जाणे ॥ ५ ॥

(११६)

नको जाउं देउं भंगा । गात्रें माझीं पांडुरंगा ॥ १ ॥
हरि-कथेची सामुग्री । देह-अवसानावरी ॥ २ ॥
माझें आयुष्य जालें ऊन । परी मज आवडो कीर्तन ॥ ३ ॥
तुका म्हणे हाणी । यावेगळी मना नाणीं ॥ ४ ॥

(११७)

मुंगीचिया घरा कोण धाडि मूळ । देखूनियां गूळ धांव घाली ॥ १ ॥
याचकाविण काय खोळंबला दाता । तोचि धांदे हिता आपुलिया ॥ २ ॥
उदक अन्न काये म्हणे मज खा ये । भुकेला तो जाये चोजवित ॥ ३ ॥
व्याधी पिडिला धांवे वैद्याचिया घरा । दुःखाच्या परिहारा आपुलिया ॥ ४ ॥
तुका म्हणे जया आपुलें स्वहित । करणें तोचि प्रीत धरी कथे ॥ ५ ॥

(११८)

ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला । कु-संगें नाडला तैसा साधु ॥ १ ॥
ओढाळाचे संगें सात्विक नासलीं । क्षण एक नाडलीं समागमें ॥ २ ॥
डांकाच्या संगती सोनें हीन जालें । मोल तें तुटलें लक्ष कोडीं ॥ ३ ॥
विषानें पक्कान्नें गोड कडु जालीं । कुसंगानें केली तैसी परी ॥ ४ ॥
तुका म्हणे भावें सत्संग हा बरा । चुकेल हा फेरा चौऱ्यांशींचा ॥ ५ ॥

(११९)

आतां देवा ऐसा करीं उपकार । देहाचा विसर पडो माझ्या ॥ १ ॥
तरीच हा जीव सुख पावे माझा । बरवें केशव-राजा कळों आलें ॥ २ ॥
ठाव देईं चित्ता राखें पायांपाशीं । सकळ वृत्तींशी अखंडीत ॥ ३ ॥
आस भय लाज चिंता काम क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ॥ ४ ॥
मागणें हें देवा तुज एक आतां । नाम मुखीं संत-संग देईं ॥ ५ ॥
तुका म्हणे नको वरपंग देवा । घेईं माझी सेवा भाव-शुद्ध ॥ ६ ॥

(१२०)

जरी जाला भाग्यवंत । तरी का भेटेल भगवंत ॥ १ ॥
उंच वाढला एरंड । तरी का होईल इक्षु-दंड ॥ २ ॥
जरी गर्दभ वेगीं धांवे । तरी का अश्व-मोल पावे ॥ ३ ॥
तुका म्हणे तोची थोर । ज्याचे मुखीं रघू-वीर ॥ ४ ॥

(१२१)

अग्नीमाजी गेलें । अग्नि होऊन तेंच ठेलें ॥ १ ॥
काय उरलें तया पण । मागील ते नाम गुण ॥ २ ॥
लोह लागे परिसा अंगीं । तोही भूषण जाला जगीं ॥ ३ ॥
सरिता ओहळा ओघा । गंगे मिळोनि जाहल्या गंगा ॥ ४ ॥
चंदनाच्या वासें । तरु चंदन जाले स्पर्शें ॥ ५ ॥
तुका जडला संतां पायीं । दुजेपणा ठाव नाहीं ॥ ६ ॥

(१२२)

नका दंतकथा येथें सांगों कोणी । कोरडे ते मानी बोल कोण ॥ १ ॥
अनुभव येथें पाहिजे साचार । न चलती चार आम्हांपुढें ॥ २ ॥
वरी कोणी मानी रसाळ बोलणें । नाहीं जाली मनें ओळखी तों ॥ ३ ॥
निवडी वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं ॥ ४ ॥
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचें । येरा गाबाळाचें काम नाहीं ॥ ५ ॥

(१२३)

आंधळ्यासि जन अवघेचि आंधळे । आपणासि डोळे[1] दृष्टी नाहीं ॥ १ ॥
रोग्या विष-तुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासि कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रि-भुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

(१२४)

मायें मोकलिलें कोठें जावें बाळें । आपुलिया बळें न[2] वंचे[2] तें ॥ १ ॥
रुसोनियां पळे सांडोनियां ताट । मागें पाहे वाट यावें ऐसी ॥ २ ॥
भांडवल आम्हां आळी करावी हे । आपणचि माये धांवसील ॥ ३ ॥
तुका म्हणे आळी करूनियां निकी । देसील भातुकीं बुझाऊनी ॥ ४ ॥

(१२५)

तिवासीया लोड टाकूनि बैससी । दंड तो करीसी अनाथातें ॥ १ ॥
अनाथासी दुःख देशी सर्व-काळ । ऐसी तुज वेळ पुढें आहे ॥ २ ॥
आहे नाहीं काय न करी[3] विचार । काय तूं पामर जन्मलासी ॥ ३ ॥
तुका म्हणे धरीं एक भूत-दया । अहंता ते वांया न धरीं मनीं ॥ ४ ॥

(१२६)

संसाराच्या तापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥
म्हणवोनी तुझे आठविले पाय । येईं वो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥
बहुतां जन्मींचा जालों भार-वाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ ३ ॥
वेढियेलों[4] चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव[5] न करी कोणी माझी ॥ ४ ॥
बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दिवस जालों कासावीस ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीन-नाथा ॥ ६ ॥

(१२७)

पाप ताप माझे गुण दोष निवारीं । कृष्णा विष्णु हरि नारायणा ॥ १ ॥
काम क्रोध वैरी घालूनि बाहेरी । तूं राहें अंतरीं पांडुरंगा ॥ २ ॥
करिसील तरी नव्हे कांई एक । निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें ॥ ३ ॥
समर्थासि काय आम्हीं शिकवावें । तुका म्हणे यावें पांडुरंगा ॥ ४ ॥

---

१ (कारण) आपणास डोळ्यांनीं कांहीं दिसत नाहीं. २ न वांचे. ३ करिसी.
४ पराधीन झालों—संकटांत पडलों. ५ करुणा.

(१२८)

धन्य तेचि प्राणी क्षमा ज्यांचे अंगीं । न भंगे प्रसंगीं धैर्य-बळ ॥ १ ॥
न म्हणे कोणासी उत्तम वाईट । महत्त्व वरिष्ठ नसे जेथें ॥ २ ॥
अंतरीं सबाह्य सारिखे निर्मळ । हृदय कोमळ गंगारूप ॥ ३ ॥
तुका म्हणे काया कुरवंडीं तयां । ठेवीन मी पायां मस्तक हें ॥ ४ ॥

(१२९)

सदा सर्वकाळ अंतरीं कुटिल । तेणें गळां माळ घालूं नये ॥ १ ॥
ज्यासी नाहीं धर्म दया क्षमा शांति । तेणें अंगीं विभूती लावूं नये ॥ २ ॥
जयासि न कळे भक्तीचें महिमान । तेणें ब्रह्म-ज्ञान बोलूं नये ॥ ३ ॥
ज्याचें मन नाहीं लागलें हातासी । तेणें प्रपंचासी टाकूं नये ॥ ४ ॥
तुका म्हणे ज्यासी नाहीं हरि-भक्ति । तेणें भगवें हातीं धरूं नये ॥ ५ ॥

(१३०)

पावलें पावलें तुझें आम्हां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ॥ १ ॥ध्रु० ॥
जेथें तेथें देखें तुझींच पाउलें । त्रि-भुवन संचलें विठ्ठला गा ॥ छ ॥
भेदाभेद-मतें भ्रमाचे संवाद । आम्हां नको वाद त्यांशीं देऊं ॥ २ ॥
तुका म्हणे अणु तुजविण[१] नाहीं । नभाहूनि पाहीं वाढ[२] आहे ॥ ३ ॥

(१३१)

भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्र-दिवस वाट तुझी ॥ १ ॥
पूर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥
दिवाळीच्या मुळा लेंकी आसावली[३] । पाहतसे वाटुली पंढरीची ॥ ३ ॥
भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परि माउलीची ॥ ४ ॥
तुका म्हणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्री-मुख दावीं देवा ॥ ५ ॥

(१३२)

निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ १ ॥ ध्रु० ॥
मज हेंही नाहीं तेंही नाहीं । वेगळा दोहींपासुनी ॥ छ ॥
देह-भोग भोगें घडे । जें जें जोडे तें तें बरें ॥ २ ॥
अवघें पावे नारायणीं । जनार्दनीं तुक्याचें ॥ ३ ॥

---

१ तुझ्यापेक्षां. २ मोठेपणा. ३ आशा लागली आहे अशी.

(१३३)

हिरा ठेवितां ऐरणीं । वांचे मारितां जो घणीं ॥ १ ॥ ध्रु० ॥
तोची मोल पावे खरा । करणीचा[1] होय चुरा ॥ छ ॥
मोहरा[2] होय तोचि अंगें । सूत न जळे ज्याचे संगें ॥ २ ॥
तुका म्हणे तोचि संत । सोसी जगाचे आघात ॥ ३ ॥

(१३४)

महारासि सिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥ ध्रु० ॥
तया प्रायश्चित्त कांहीं । देह-त्याग करितां नाहीं ॥ छ ॥
नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ॥ २ ॥
ज्याचा संग चित्तीं । तुका म्हणे तो त्या[3] याती[3] ॥ ३ ॥

(१३५)

न करितां पर-निंदा पर-द्रव्य-अभिलाष । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ १ ॥
बैसलिये ठायीं म्हणतां राम राम । काय होय श्रम ऐसें सांगा ॥ २ ॥
संतांचे वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ ३ ॥
खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेचे यास ऐसें सांगा ॥ ४ ॥
तुका म्हणे देव जोडे याचसाठीं । आणीक ते आटी नलगे कांहीं ॥ ५ ॥

(१३६)

शुद्ध-बीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥ ध्रु० ॥
मुखीं अमृताची वाणी । देह वेचावा कारणीं ॥ छ ॥
सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगा-जळ ॥ २ ॥
तुका म्हणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ ३ ॥

(१३७)

चित्त समाधानें[4] । तरी विष वाटे सोनें ॥ १ ॥ ध्रु० ॥
बहु खोटा[5] अतिशय । जाणा भले सांगों काय ॥ छ ॥
मनाच्या तळमळें । चंदनेंही अंग पोळे ॥ २ ॥
तुका म्हणे दुजा । उपचार पीडा पूजा ॥ ३ ॥

---

१ कृतीनें केलेल्याचा. २ सर्पाच्या फडेंतील मणि ( ह्याला सूत गुंडाळून तो अग्नींत टाकिला असतां सूत जळत नाहीं अशी आख्यायिका आहे. ). ३ त्या जातीचा. ४ समाधान पावे. ५ विषयाचा हव्यास.

(१३८)

परिमळ म्हूण[१] चोळूं नये फूल । खाऊं नये मूल आवडतें ॥ १ ॥
मोतियाचें पाणी चाखूं नये स्वाद । यंत्र भेदुनि नाद पाहूं नये ॥ २ ॥
कर्म-फळ म्हणुनी इच्छूं नये काम । तुका म्हणे वर्म दावूं लोकां ॥ ३ ॥

(१३९)

काय नाहीं माता गौरवीत बाळा । काय नाहीं लळा पाळीत ते ॥ १ ॥
काय नाहीं त्याची करीत ते सेवा । काय नाहीं जीवा गोमटें तें ॥ २ ॥
अमंगळपणें कंटाळा न धरी । उचलोनी करीं कंठीं लावी ॥ ३ ॥
लेववी आपुले अंगें अळंकार । संतोषा ये फार देखोनियां ॥ ४ ॥
तुका म्हणे स्तुति योग्य नाहीं परी । तुम्हां लाज थोरी अंकिताची ॥ ५ ॥

(१४०)

मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचें कारण ॥
मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ॥ १ ॥
मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली ॥
मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥ २ ॥
मन गुरू आणि शिष्य । करी आपुलेंचि दास्य ॥
प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगति ॥ ३ ॥
साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात ॥
नाहीं नाहीं आनु[२] दैवत । तुका म्हणे दुसरें ॥ ४ ॥

(१४१)

हीन माझी याति । वरी स्तुति केली संतीं ॥ १ ॥
अंगीं वसूं पाहे गर्व । माझें हरावया सर्व ॥ २ ॥
मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ॥ ३ ॥
राख राख गेलों वायां । तुका म्हणे पंढरी-राया ॥ ४ ॥

(१४२)

प्रीतीचिया बोला नाहीं पेसपाड[३] । भलतसें गोड करुनी घेई ॥ १ ॥
तैसें विठ्ठल-राया तुज मज आहे । आवडीनें गायें नाम तुझें ॥ २ ॥
वेडे वांकडे बाळकाचे बोल । करिती नवल माय-बाप ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज येवो माझी दया । जीवींच्या सखया जीवलगा ॥ ४ ॥

---

१ म्हणून. २ अन्य. ३ पंचपांच.

(१४३)

मान अप-मान गोवे[1] । अवघे गुंडूनी ठेवावे ॥ १ ॥ ध्रु० ॥
हेंचि देवाचें दर्शन । सदा राहे समाधान ॥ छ ॥
शांतीची वसती । तेथें खुंटे काळ-गती ॥ २ ॥
आली ऊर्मी साहें । तुका म्हणे थोडें आहे ॥ ३ ॥

(१४४)

दुर्जनाची गंधी विष्टेचिया परी । देखोनीयां दुरी व्हावें तया ॥ १ ॥ध्रु०॥
आइका हो तुम्ही मात हे सज्जन । करूं संघट्टन नये बोलों ॥ छ ॥
दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसाळलेवरी धांवे श्वान ॥ २ ॥
दुर्जनाचा भला नव्हे अंग-संग । बोलिलासे त्याग देशांचा त्या ॥ ३ ॥
तुका म्हणे किती सांगावें पृथक । अंग कुंभी-पाक दुर्जनाचें ॥ ४ ॥

(१४५)

गाजराची पुंगी । तैसे नवे जाले जोगी ॥ १ ॥
काय करूनि पठण । केली अहंता जतन ॥ २ ॥
अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥ ३ ॥
तुका म्हणे लंड । त्यांचें हाणोनि फोडा तोंड ॥ ४ ॥

(१४६)

शब्दा[2] नाहीं धीर[2]। ज्याची बुद्धि नाहीं स्थिर ॥ १ ॥ ध्रु० ॥
त्याचें न व्हावें दर्शन । खळा पंगती भोजन ॥ छ ॥
संतांस जो निंदी । अधम लोभासाठीं वंदी ॥ २ ॥
तुका म्हणे पोटीं । भाव आणीक जया होटीं ॥ ३ ॥

(१४७)

माझे मज कळों येती अव-गुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥
आतां आड उभा राहें नारायणा । दया-सिंधुपणा साच करीं ॥ २ ॥
वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियां आधीन जालों देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास माय-बापा ॥ ४ ॥

(१४८)

होऊं नको कांहीं या मना आधीन । नाईकें वचन याचें कांहीं ॥ १ ॥
हटियाची गोष्टी मोडून टाकावी । सोई ही धरावी विठोबाची ॥ २ ॥

---

१ गोत्याच्या जागा. २ ज्याच्या बोलण्यांत प्रमाण नाहीं.

आपुले आधीन करूनियां ठेवा । नाहीं तरी जीवा घातक हें ॥ ३
तुका म्हणे जाले जे मना आधीन । तयांसी बंधन यम करी ॥ ४

(१४९)

काय वाणूं मी या संतांचे उपकार । मज निरंतर जागवीती ॥१॥ ध्रु०
काय द्यावें यांसि व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ छ ।
सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥ २ ।
तुका म्हणे वत्स धेनुचिया चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥ ३ ॥

(१५०)

उपदेश तो भलत्या हातीं । जाला चित्तीं धरावा ॥ १ ॥ ध्रु०
नये जाऊं पात्रावरी । कवटी सारी नारळें ॥ छ ॥
स्त्री पुत्र बंदी जन । नारायण स्मरविती ॥ २ ॥
तुका म्हणे रत्न-सार । परि उपकार चिंधीचे ॥ ३ ॥

(१५१)

ऐसा हा लौकिक कदा राखवेना । पतित-पावना देव-राया ॥ १ ॥ ध्रु० ।
धर्म करी त्याला उधळा म्हणती । न केल्या बोलती पोट-पोशा ॥ छ ।
आचार करितां म्हणती हा पसारा । न करितां नरा निंदिताती ॥ २ ।
संत-संग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासि ज्ञान नाहीं ॥ ३ ।
धन नाहीं त्यासि ठायींचा करंटा । समर्थासि ताठा लाविताती ॥ ४ ।
वहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ । न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥ ५ ।
भेटीसि नव जातां म्हणती निष्ठुर । येतां जातां घर बुडविलें ॥ ६ ।
निपुत्रिका म्हणती मुख न पहा हो । पातकाचें मूळ पोरवडा ॥ ७ ।
लोक जैसा ओक धरितां धरवेना । अभक्ता जिरेना संत-संग ॥ ८ ।
तुका म्हणे आतां ऐकावें वचन । त्यजूनियां जन भक्ति करा ॥ ९ ।

(१५२)

सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार आशा समूळ ॥
निंदा हिंसा कांहीं कपट देह-बुद्धि । निर्मळ स्फटिक जैसा ॥ १
मोक्षाचें तीर्थ नलगे वाराणसी । येती तयापासीं अवघीं जनें ॥
तीर्थासी तीर्थ जाला तोचि एक । मोक्ष तेणें दर्शनें ॥ २
मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळां भूषणांसीं ॥
हरीच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तया मानसीं ॥ ३

तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची ॥
तुका म्हणे तो परिसाहूनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ॥ ४ ॥

(१९३)

नलगे चंदना सांगावा परिमळ । वनस्पति-मेळ हाकारुनी ॥ १ ॥ ध्रु० ॥
अंतरींचें धांवें स्वभावें बाहेरी । धरितां ही परी आवरेना ॥ छ ॥
सूर्य नाहीं जागें करीत या जना । प्रकाश किरणा कर म्हूण ॥ २ ॥
तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें । लपवितां खरें येत नाहीं ॥ ३ ॥

(१९४)

चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥ ध्रु० ॥
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ॥ छ ॥
तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहतां अव-गुण मिळेचि ना ॥ २ ॥

(१९५)

अंगीं ज्वर तया नावडे साकर । जन तो इतर गोडी जाणे ॥ १ ॥ ध्रु० ॥
एकाचिये तोंडीं पडिली ते माती । अवघे ते खाती पोटभरी ॥ छ ॥
चारितां बळें येत असे दांतीं । मागोनियां घेती भाग्यवंत ॥ २ ॥
तुका म्हणे नसे संचित हें बरें । तयासि दुसरें काय करी ॥ ३ ॥

(१९६)

धिग जीणें तो बाईले आधीन । पर-लोक मान नाहीं दोन्ही ॥ १ ॥ ध्रु० ॥
धिग जीणें ज्याचें लोभावरी मन । अतीत-पूजन घडेचि ना ॥ छ ॥
धिग जीणें आळस निद्रा जया फार । अमित आहार अघोरिया ॥ २ ॥
धिग जीणें नाहीं विवेक वैराग्य । झुरे मानालागीं[1] साधुपणा[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे धिग ऐसे जाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥ ४ ॥

(१९७)

नलगे द्यावा जीव सहजचि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं ॥ १ ॥
मरण जो मागे गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥ २ ॥
तुका म्हणे काई होईल स्व-हित । निधान जो थीत[2] टाकूं पाहे ॥ ३ ॥

(१९८)

बरा कुणबी केलों । नाहीं तरि दंभें असतों मेलों ॥ १ ॥ ध्रु० ॥
भलें केलें देव-राया । नाचे तुका लागे पायां ॥ छ ॥

---

१ साधुपणाच्या मानाकरितां. २ व्यर्थ.

विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥ २ ॥
सेवा चुकतों संतांची । नागवण हे फुकाची ॥ ३ ॥
गर्व होता ताठा । जातों यम-पंथें वाटा ॥ ४ ॥
तुका म्हणे थोरपणें । नरक होती अभिमानें ॥ ५ ॥

(१५९)

भुंकोनियां सुणें लागे हस्ती-पाठी । होऊनी हिंपुटी दुःख पावे ॥ १ ॥
काय त्या मशकें तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ २ ॥
मातलें बोकड विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तेणें ॥ ३ ॥
तुका म्हणे संता पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥ ४ ॥

(१६०)

दुबळें सदैवा । म्हणे नागवेल केव्हां ॥ १ ॥
आपणासारिखें त्या पाहे । स्वभावासी करील काये ॥ २ ॥
मूढ सभेआंत । इच्छि पंडितांचा घात ॥ ३ ॥
गांढें देखुनि शूरा । उगें करितें बुरबुरा ॥ ४ ॥
आणिकांचा हेवा । न करीं शरण जाईं देवा ॥ ५ ॥
तुका म्हणे किती । करूं दुष्टांची फजिती ॥ ६ ॥

(१६१)

माकडा दिसती कवटी नारळा । भोक्ता निराळा वरील सारी ॥ १ ॥
एका रस एका तोंडी पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥ २ ॥
सुनियांसि क्षीर वाढिल्या ओकवी । भोगत्या पोसवी धणीवरी[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे भार वागविती मूर्ख । नेतील तें सार परीक्षक ॥ ४ ॥

(१६२)

तुम्हीं माझा देवा करिजे अंगीकार । हा नाहीं विचार मजपाशीं ॥ १ ॥
आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन । देव-भक्तपण लाजविलें ॥ २ ॥
एकांतीं एकलें न राहे निश्चळ । न राहेच पळ मन ठायीं ॥ ३ ॥
पायीं महत्त्वाची पडली शृंखळा । बांधविला गळा स्नेहा हातीं ॥ ४ ॥
शरीर सोकलें देखिलिया सुखा । कदान्न हें मुखा मान्य नाहीं ॥ ५ ॥
तुका म्हणे जाला अवगुणांचा थारा । वाढली हे निद्रा अळस बहु ॥ ६ ॥

---

१ पूर्णपणें.

(१६३)

सकळगुणें संपन्न । एक देवाचें लक्षण ॥ १ ॥
वरकड कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं ॥ २ ॥
षड्गुण-ऐश्वर्य-संपन्न[१] । एक भगवंतीं जाण ॥ ३ ॥
तुका म्हणे जें जें बोला । तें तें साजे ह्या विठ्ठला ॥ ४ ॥

(१६४)

दर्पणासी बुजे । नखटें तोंड पळवी लाजे ॥ १ ॥
गुण ज्याचे जो अंतरीं । तोचि त्यासी पीडा करी ॥ २ ॥
चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी ॥ ३ ॥
तुका म्हणे जन । देवा असे भाग्य-हीन ॥ ४ ॥

(१६५)

कोणी एकाचिया पोरें केली आळी । ठावी नाहीं पोळी मागे देखी ॥ १ ॥
बुझाविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥ २ ॥
तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे माय-बापांचें उचित । करावें हें हित बाळकांचें ॥ ४ ॥

(१६६)

भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥ १ ॥
वाढवुनी जटा फिरे दाही दिशा । तरी जंबु-वेषा[२] सहज स्थिती ॥ २ ॥
कोरोनियां भूमि करिती मधीं वास । तरी उंदरास काय वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें कासया करावें । देहासि दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

(१६७)

आपणा लागे काम वाण्या घरीं गुळ । त्याचें याति कुळ काय कीजे ॥ १ ॥
उकरड्यावरी वाढली तुळसी । टाकावी ते कैसी ठाया गुणें ॥ २ ॥
गाईचा जो भक्ष अमंगळ खाय । तीचें दुग्ध काय सेवूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे काय सलपटासी काज । फणसांतील बीज काढुनि घ्यावें ॥ ४ ॥

(१६८)

वांझेनें दाविलें गऱ्हवार-लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला[३] ॥ १ ॥
तेवि शब्द-ज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूनियां ॥ २ ॥

---

१ समग्र ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य मिळून षड्गुणैश्वर्य होतें.
२ गुजराथेंतील ब्राह्मणाची एक जात किंवा त्या जातीचा मनुष्य; (मोलस्वर्थकृत कोश, पृ. २०७ पहा). ३ पोटाला.

बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवूनियां तृप्त कोण जाला ॥ ३ ॥
कागदीं लिहितां नामाची साकर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ४ ॥
तुका म्हणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ ५ ॥

(१६९)

जुंझायाच्या गोष्टी ऐकतांचि सुख । करितां हें दुःख थोर आहे ॥ १ ॥
तैसी हरि-भक्ति सुळावरिल पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥ २ ॥
पिंड पोसिलिया विषयांचा पाईक । वैकुंठ-नायक कैंचा तेथें ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हावें देहासी उदार । रखुमादेवी-वर जोडावया ॥ ४ ॥

(१७०)

क्षुधार्थी अन्नें दुष्काळें पीडिलें । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥ १ ॥
तैसें तुझे पायीं लांचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥ २ ॥
मांजरें देखिला लोणियाचा गोळा । लावुनियां डोळा बैसलेंसे ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां झडी घालूं पाहें । पांडुरंगे माये तुझे पायीं ॥ ४ ॥

(१७१)

आयुष्य वेचूनि कुटुंब पोशिलें । काय हित केलें सांग बापा ॥ १ ॥
फुकाचा चाकर जालासि काबाडी । नाहीं सुख घडी भोगावया ॥ २ ॥
दुर्लभ मनुष्य-जन्म कष्टें पावलासी । दिला कुटुंबासी काम भोग ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें आयुष्य नासिलें । पाप तें सांचिलें पतनासि ॥ ४ ॥

(१७२)

अर्थेंविण पाठांतर कासया करावें । व्यर्थचि मरावें घोकुनियां ॥ १ ॥
घोकुनियां काय वेगीं अर्थ पाहें । अर्थरूप राहें होऊनियां ॥ २ ॥
तुका म्हणे ज्याला अर्थीं आहे भेटी । नाहीं तरी गोष्टी बोलूं नका ॥ ३ ॥

(१७३)

वसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धि । देखतांचि चिंधी मान धांवे ॥ १ ॥
प्रपंचाचा छंद टाकुनियां गोंवा । धरावें केशवा हृदयांत ॥ २ ॥
सांडूनिया देईं संसाराची बेडी । कीर्तनाची गोडी धरावी गा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुला सांगतों मी एक । रुक्मिणी-नायक मुखीं गावा ॥ ४ ॥

(१७४)

क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी ॥ १ ॥
तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि । जाय तो विझोनी आपसया ॥ २ ॥
तुका म्हणे क्षमा सर्वांचें स्व-हित । धरा अखंडित सुख-रूप ॥ ३ ॥

(१७५)

मृगाचिये अंगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥ १ ॥
भाग्यवंत घेती वेचोनिया मोलें । भार-वाही मेले वाहतां वोझें ॥ २ ॥
चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ ३ ॥
अधिकारी[१] येथें घेती[१] हातवटी[१] । परीक्षवंता[१] दृष्टि[१] रत्न[१] जैसें ॥ ४ ॥
तुका म्हणे काय अंधळिया हातीं । दिलें जैसें मोतीं वायां जाय ॥ ५ ॥

(१७६)

कोणी वंदा कोणी निंदा । आम्हां स्वहिताचा धंदा ॥ १ ॥
काय तुम्हांसी गरज । आम्ही भजूं पंढरीराज ॥ २ ॥
तुम्हांसारिखें चालावें । तेव्हां स्वहिता मुकावें ॥ ३ ॥
तुका म्हणे हो कां कांहीं । गळ दिला विठ्ठल-पायीं ॥ ४ ॥

(१७७)

बोले तैसा चाले । त्याचीं वंदीन पाउलें ॥ १ ॥
अंगें झाडीन अंगण । त्याचें दासत्व करीन ॥ २ ॥
त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥ ३ ॥
तुका म्हणे देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥ ४ ॥

(१७८)

भक्तिऋण घेतलें माझें । चरण गहाण आहेत तूझे ॥ १ ॥
प्रेम व्याज देई हरी । माझा हिशेब लवकरी करीं ॥ २ ॥
माझें मी न सोडीं धन । नित्य करितों कीर्तन ॥ ३ ॥
तुझें नाम आहे खत । सुखें करीं पंचाईत ॥ ४ ॥
तुका म्हणे गरुड-ध्वजा । यासी साक्ष श्रीगुरु-राजा ॥ ५ ॥

(१७९)

किडा अन्नाचें माणुस । त्याचा म्हणविल्या दास ॥ १ ॥
तेंही त्यासी उपेक्षीना । बोल आपुला सांडीना ॥ २ ॥
तो तूं नराचा नरेंद्र । तुजपासूनि इंद्र चंद्र ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभर । तुज वर्णी फणी-वर ॥ ४ ॥

---

१ रत्नपारख्याच्या दृष्टीस रत्न पडलें असतां जशी त्याची खरी पारख होते, त्याप्रमाणें योग्य मनुष्य ( अधिकारी ) असेल तोच कोणत्याही गोष्टीचें मर्म जाणतो.

(१८०)

पाया जाला नारु । तेथें बांधला कापूरू ॥ १ ॥
तेथें बिबव्याचें काम । अधमासि तों अधम ॥ २ ॥
रुसला गुलाम । धणी करीतो सलाम ॥ ३ ॥
तेथें चाकराचें काम । अधमासि तों अधम ॥ ४ ॥
रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसी ॥ ५ ॥
तेथें बटकीचें काम । अधमासि तों अधम ॥ ६ ॥
देव्हाऱ्यावरि विंचू आला । देव-पूजा नावडे त्याला ॥ ७ ॥
तेथें पैजारेचें काम । अधमासि तों अधम ॥ ८ ॥
तुका म्हणे जाती ॥ जातीसाठीं खाती माती ॥ ९ ॥

(१८१)

काम-क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥ १ ॥
नुलंघवे मज न सांपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ २ ॥
आतां कैचा मज सखा नारायण । गेला अंतरून पांडुरंग ॥ ३ ॥
तुका म्हणे व्यर्थ मोलाचें शरीर । गेलें हा विचार कळों आला ॥ ४ ॥

(१८२)

तुझे म्हणों आम्हां । मग उणें पुरुषोत्तमा ॥ १ ॥
ऐसा धर्म काय । अमृतानें मृत्यु होय ॥ २ ॥
कल्पवृक्षा तळीं । गांठीं बांधिलिया झोळी ॥ ३ ॥
तुका म्हणे परीस । सांपडल्या उपवास ॥ ४ ॥

(१८३)

रासभ धुतला महा-तीर्थीमाजी । नव्हे जैसा तेजी श्याम-कर्ण ॥ १ ॥
तेवीं खळा काय केला उपदेश । नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥ २ ॥
सर्पासी पाजीलें शर्करा-पीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणे ॥ ३ ॥
तुका म्हणे श्वाना क्षीरीचें भोजन । सवेंचि वमन जेवीं तया ॥ ४ ॥

(१८४)

तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तीहीं त्रिभुवनीं ॥ १ ॥
सहस्र-मुखें शेष सिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥ २ ॥
अ-व्यक्ता अ-लक्षा अ-पारा अनंता । निर्गुणा सच्चिदा नारायणा ॥ ३ ॥
रूप नाम घेसी आपुल्या स्व-इच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ४ ॥
तुका म्हणे जरी दाविसी आपणा । तरिच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

(१८५)

देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वारावार करूनि ठेवी ॥ १ ॥
भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा । म्हणूनि करंटा करूनि ठेवी ॥ २ ॥
स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा । यालागीं कर्कशा पाठी लावी ॥ ३ ॥
तुका म्हणे मज प्रचित आली देखा । आणीक ह्या लोकां काय सांगूं ॥ ४ ॥

(१८६)

वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खाऊं द्यावें मला ॥ १ ॥
अंतीं मरसी तें न चुके । मजही मारीतोसी भुके ॥ २ ॥
येरू म्हणे भला भला । निवाड तुझ्या तोंडें जाला ॥ ३ ॥
देह तंव जाणार । घडेल हा पर-उपकार ॥ ४ ॥
येरू म्हणे मनीं । ऐसें जावें समजोनी ॥ ५ ॥
गांठी पडली ठका ठका । त्यांचा धर्म बोले तुका ॥ ६ ॥

(१८७)

नको नको मना गुंतूं माया-जाळीं । काळ आला जवळी ग्रासावया ॥ १ ॥
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां । सोडवीना तेव्हां माय-बाप ॥ २ ॥
सोडवीना राजा देशींचा चौधरी । आणीक सोइरीं भलीं भलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुला सोडवीना कोणी । एका चक्रपाणीवांचूनियां ॥ ४ ॥

(१८८)

जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार । येर मांस पर हाता न कळे ॥ १ ॥
देखावें नेत्रीं बोलावें मुखें । चित्ता सुख-दुःखें कळों येती ॥ २ ॥
परिमळासी घ्राण ऐकती श्रवण । एकाचें कारण[1] एका नव्हे ॥ ३ ॥
एक देहीं भिन्न ठेवियेल्या कळा । नाचवी पुतळा सूत्र-धारी ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐशी जयाची ते सत्ता । कां तया अनंता विसरलेती ॥ ५ ॥

**तुकारामाची स्त्री तुकारामास रागानें बोलली त्यासंबंधाचे अभंग.**

(१८९)

मजचि भोंवता केला येणें जोग । काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥ध्रु०॥
चालोनियां घरा सर्व सुखें येती । माझी तों फजिती चुकेचिना ॥ छ ॥
कोणाची बाईल होऊनियां वोढूं । संसारीं काढूं आपदा किती ॥ २ ॥
काय तरी देऊं तोंडितील पोरें । मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ३ ॥
कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर । सारवाया ढोर-शेण नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे रांड न करितां विचार । वाहुनियां भार कुंथे माथां ॥ ५ ॥

---

1 काम.

(१९०)

आतां पोरा काय खासी । गोहो[१] जाला देवलसी[२] ॥ १ ॥ध्रु०॥
डोचकें तिंबी घातल्या माळा । उदमाचा सांडी चाळा ॥ छ ॥
आपल्या पोटा केली थार । आमचा नाहीं येसपार[३] ॥ २ ॥
हातीं टाळ तोंड वासी । जाय देउळीं देवापासीं ॥ ३ ॥
आतां आम्ही करूं काय । न बसे घरीं राणा जाय ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां धीरी । अझुनि नाहीं जालें तरी ॥ ५ ॥

(१९१)

न करवे धंदा । आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥ध्रु०॥
उठितें तें कुटितें टाळ । अवघा मांडिला कोल्हाळ ॥ छ ॥
जीवंतचि मेले । लाजा वाटूनियां प्याले ॥ २ ॥
संसाराकडे । न पाहाती ओस पडे ॥ ३ ॥
तळमळती यांच्या रांडा । घालिती जीवा नांवें धोंडा ॥ ४ ॥
तुका म्हणे बरें जालें । घे गे बाईले लीहिलें ॥ ५ ॥

(१९२)

कोण घरा येतें अमुच्या कशाला । काय ज्याचा त्याला नाहीं धंदा ॥ १ ॥ध्रु०॥
देवासाठीं जालें ब्रह्मांड सोईरें । कोमळ्या उत्तरें काय वेचे ॥ छ ॥
मानें पाचारितां नव्हे आराणुक[४] । ऐसे येती लोक प्रीतीसाठीं ॥ २ ॥
तुका म्हणे रांडे नावडे भूषण । कांतेलेंसें[५] श्वान लागे पाठी ॥ ३ ॥

**शिवाजी राजानें कारकुनाबरोबर पत्र, अबदागीर वगैरे देऊन तुकारामास बोलावणें पाठविलें, तेव्हां त्यानें अभंगात्मक उत्तर पाठविलें तें हें:—**

(१९३)

दिवटया छत्री घोडे । हें तों बऱ्यांत न पडे ॥ १ ॥ ध्रु० ॥
आतां येथें पंढरि-राया । मज गोंविसी कासया ॥ छ ॥
मान दंभ चेष्टा । हे तों शूकराची विष्टा ॥ २ ॥
तुका म्हणे देवा । माझे सोडवणे[६] धांवा ॥ ३ ॥

---

१ नवरा. २ देवपिसा. ३ अगत्य. ४ सुख किंवा शांति. ५ कांतावलेलें (पिसाळलेलें). ६ सोडविण्याकरितां.

(१९४)

नावडे जें चित्ता । तेंचि होसी पुरविता ॥ १ ॥
कां रे पुरविली पाठी । माझी केली जीवें साठी ॥ध्रु०॥
न करावा संग । वाटे दुरावावें जग ॥ २ ॥
सेवावा एकांत । वाटे न बोलावी मात ॥ ३ ॥
जन धन तन । वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥
तुका म्हणे सत्ता । हातीं तुझ्या पंढरिनाथा ॥ ५ ॥

(१९५)

विरिंचीनें केलें ब्रह्मांड सकळ । तयामाजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥ध्रु०॥
युक्तीचा चाळक ब्रह्म-निष्ठ ज्ञानी । गुरु-भक्ति मनीं विश्वासेंसी ॥ ध्रु० ॥
ऐसा तुझा प्रेमा कळला हा एक । पाहूनियां लेख पत्रिकींचे ॥ २ ॥
शिव तुझें नाम ठेविलें पवित्र । छत्र-पति सूत्र विश्वाचें कीं ॥ ३ ॥
व्रत नेम तप ध्यान योग कळा । करूनि मोकळा जालासी तूं ॥ ४ ॥
हेत हा लागला आमुचिये भेटी । पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ५ ॥
याचें हें उत्तर ऐकें गा भूपती । लिहिली विनंती हेताची हे ॥ ६ ॥
अरण्य-वासी आम्ही फिरूं उदासीन । दर्शनही हीन अमंगळ ॥ ७ ॥
वस्त्राविण काया जालीसे मळीन । अन्नरहित हीन फळाहारी ॥ ८ ॥
रोडके हात पाय दिसे अवकळा[1] । काय तो सोहळा दर्शनाचा ॥ ९ ॥
तुका म्हणे माझी विनंती सलगीची । वार्ता हे भेटीची करूं नका ॥ १० ॥

(१९६)

ऐसी माझी वाणी दिनरूप पाहे । हे करुणा त्या आहे हृदयस्थाची ॥ १ ॥ध्रु०॥
नहों कींविलवाणें नहों आम्ही दीन । सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ ध्रु० ॥
पांडुरंग आम्हां पाळिता पोसिता । आणिकांची कथा काय तेथें ॥ २ ॥
तुझी भेट घेणें काय हो मागणें । आशेचें हें शून्य केलें तेणें ॥ ३ ॥
निराशेचा गांव दिधला आम्हांसी । प्रवृत्ति-भागासी[2] सांडियेलें ॥ ४ ॥
पतिव्रतेचें हें मन पति भेटो । तैसे आम्ही विठोमाजी नांदों ॥ ५ ॥
विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं । देखणें तुझेंही तयामाजी ॥ ६ ॥
तुजही विठ्ठल ऐसेंचि वाटलें । परि एक आलें आडवें हें ॥ ७ ॥
सद्गुरु-श्रीरामदासाचें भाषण । तेथें घालीं मन चळों नको ॥ ८ ॥
बहुतां ठायीं वृत्ति चावळली जेव्हां । राम-दास्य तेव्हां घडे कैसें ॥ ९ ॥
तुका म्हणे बापा चातुर्य-सागरा । भक्ति-भाव तारा भाविकांसी ॥ १० ॥

---

१ निस्तेज. २ संसारमार्गास.

(१९७)

तुम्हांपासीं आम्ही येऊनियां काय । वृथा सीण आहे चालण्याचा ॥१॥ध्रु०॥
मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर । वस्त्रासीं हे थार चिंध्या बिदीं[1] ॥ छ ॥
निद्रेसी आसन उत्तम पाषाण । वरी आवरण आकाशाचें ॥ २ ॥
तेथें काय करणें कवणाची आस । वांयां होय नाश आयुष्याचा ॥ ३ ॥
राज-गृहा यावें मानाचिये आसे । तेथें काय वसे समाधान ॥ ४ ॥
रायाचिये घरीं भाग्यवंता मान । इतरां सामान्यां नाहीं तेथें ॥ ५ ॥
देखोनियां वस्त्रें भूषणांचे जन । तात्काळ मरण येतें मज ॥ ६ ॥
ऐकोनियां मानाल उदासता जरी । तरी आम्हां हरी उपेक्षीना ॥ ७ ॥
आतां हेंचि तुम्हां सांगणें कौतुक । भिक्षेऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ८ ॥
तप-व्रत-याग महा भले जन । आशा-बद्ध हीन वर्तताती ॥ ९ ॥
तुका म्हणे तुम्ही श्रीमंत मानाचे । पूर्वींच दैवाचे हरि-भक्त ॥ १० ॥

(१९८)

आतां एक योग साधावा हा नीट । भल्याचा तो वीट मानूं नये ॥१॥ध्रु०॥
जेणें योगें तुम्हां घडों पाहे दोष । ऐसा हा सायास करूं नये ॥ छ ॥
निंदक दुर्जन संग्रहीं असती । त्यांची युक्ति चित्तीं आणूं नका ॥ २ ॥
परीक्षावे कोण राज्याचे रक्षक । विवेकाविवेक[2] पाहोनियां ॥ ३ ॥
सांगणें नलगे सर्वज्ञ तूं राजा । अनाथाच्या काजा साह्य व्हावें ॥ ४ ॥
हेंचि ऐकोनियां चित्त समाधान । आणीक दर्शनें चाड नाहीं ॥ ५ ॥
घेवोनियां भेटी कोण हा संतोष । आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ६ ॥
तुका म्हणे राया धन्य जन्म क्षिती । त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥ ७ ॥

(१९९)

आतां हे विनवणी प्रधान-अष्टक । प्रभूसी विवेक समजावा ॥ १ ॥ध्रु०॥
प्रतिनिधि मान-रक्षक चतुर । सात्विकाचें घर तुम्हांपाशीं ॥ छ ॥
मुजुमुचे धनी लेखन-कारक । पत्रींचा विवेक समजावा ॥ २ ॥
पेशवे सुरनिस चिटणीस डबीर । राजाज्ञा सुमंत सेनापति ॥ ३ ॥
भूषण पंडित-राय विद्या-धन । वैद्य-राजा नमन माझें असे ॥ ४ ॥
पत्राचा हा अर्थ अंतरीं जाणोनि । विवंचोनि श्रवणीं घाला तया ॥ ५ ॥
सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें । बोलिलों बहुत कळावया ॥ ६ ॥
यथास्थित निरोप सांगणें हा राया । अर्थ पाहा वांयां जाऊं नेदा ॥ ७ ॥
भिडेसाठीं बोलाल गाळुनि अर्थातें । अनर्थकारी तुमतें होईल तेणें ॥ ८ ॥
तुका म्हणे तुम्हां नमन अधिकाऱ्यां । सांगणें हे राया पत्र माझें ॥ ९ ॥

---

१ मार्गांत. २ सारासार विचार.

# वामनपंडित

वामनपंडित हा सातारा जिल्ह्यांतील कोरेगांव कुमटें येथला जोशी होता. हा जातीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्याच्या आईचें नांव लक्ष्मीबाई व बापाचें नांव नरहरपंडित होतें. ह्याच्या बायकोचें नांव गिरीबाई. ह्यानें काशीस शास्त्राध्ययन केलें व वादविवाद करून पुष्कळ पंडितांस जिंकिलें. प्रथम ह्यानें संस्कृत कविता बरीच केली; पण पुढें ह्यास पश्चात्ताप होऊन रामदासस्वामीच्या सांगण्यावरून ह्यानें लोकोपयोगी मराठी ग्रंथ करण्यास आरंभ केला, असें नमूद आहे.

वामनाची कविता गंभीर आणि रसभरित असून ती अनेक वृत्तांत आहे. ह्याच्या कवितेंत यमकें फार म्हणून ह्यास रामदास "यमक्या वामन" म्हणत असे. शिवाय याच्या कवितेंत क्वचित् स्थळीं व्याकरणाकडे थोडेंसें दुर्लक्ष झालेलें आढळतें. ह्याचा जन्मकाल निश्चित नाहीं. तथापि कित्येकांच्या मतें हा शके १५४० च्या सुमारास जन्मला असावा. वामनपंडित कृष्णातीरीं वाई क्षेत्राजवळ पांडववाडी म्हणून एक गांव आहे तेथें शके १५९५ (वैशाख शुद्ध ६) रोजीं वारला, असें जुन्या नवनीतांत नमूद आहे, पण भाव्यांना तें मान्य नाहीं. वामनाचा मृत्यु शके १६१७ मध्यें झाला असें अलिकडे मत प्रचलित आहे.

वामनानें केलेले ग्रंथ—(१) यथार्थ-दीपिका (गीतेवर टीका) ओवीबद्ध; (२) निगमसार—(श. १५९५); (३) श्लोकबद्ध—सुमारें ४० प्रकरणें आहेत.

वामनाच्या नांवावर बरींच काव्यें, माधव चंद्रोबा (सर्वसंग्रह), बाळाजी आणि कंपनी व निर्णयसागर प्रेस (काव्यसंग्रह) यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. मात्र तीं सर्व एकाच वामनाचीं आहेत, असें वाटत नाहीं.

विशेष माहितीकरितां पहा:—महाराष्ट्र सारस्वत (भाग० २)—भावे; वामनपंडित—बाळकृष्ण मल्हार हंस; वामनपंडित—बा. अ. भिडे; नांदेडचें शेष घराणें (पोतदार स्मारकग्रंथ)—वि. अं. कानोले.

## वेंचे, वामनी श्लोक.

### मंगलाचरण.

शिख०. नसे ठावा ब्रह्मा, न शिव, अथवा श्रीपति हरी ॥
हरी[1] जो तापातें उचलुनि कृपा-सिंधु-लहरी[1] ॥
हरी[2] वाटे[2] काळा करिस[2], त्रि-पती[3] मृत्यु-भुजगा[3] ॥
जगाचा तूं ऐसा धणि कवण तो पाव मज गा ॥ १ ॥

### वेंचे, नामसुधेंतील.

अमृताप्रमाणें मधुर व भक्तीनें उच्चारिलें असतां जन्ममरणप्रवाहांतून सोडविणारें असें जें भगवंताचें नाम, त्याचा महिमा ह्या प्रकरणांत वर्णिला आहे; म्हणून ह्यास नामसुधा असें नांव दिलें आहे.

मालिनी. हरि-पण हरि-नामें धातु-मूर्तीसि आलें ॥
हरि-मय हरि-नामें विश्व संतांसि जालें ॥
भव-भय हरि-नामें साधकांचें[4] पळालें ॥
वद वद वद जिव्हे राम-नामें रसाळें ॥ १ ॥

व० ति०. आकाश-अंत[5] न कळूनिहि अंतरिक्षीं ॥
आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी ॥
नाम-प्रतापहि यथामति याच रीती ॥
सीमा न पावति तथापि मुनींद्र गाती ॥ २ ॥

द्रु० वि०. न कळतां पद अग्निवरी पडे । न करि दाह असें न कधीं घडे ॥
अजित-नाम[6] वदो भलत्या मिसें । सकळ पातक भस्म करीतसे ॥ ३ ॥

---

१ नदीच्या लाटा ज्याप्रमाणें दाह शांत करितात त्याप्रमाणें जो परमेश्वर आपल्या कृपेच्या योगानें लोकांचें दुःख निवारितो. २ यमरूप हत्तीस हरि म्हणजे सिंहच. ३ मृत्युरूप सर्पास विपति म्हणजे पक्ष्यांचा नायक गरुडच. ४ मोक्षप्राप्तीकरितां यत्न करणारांचें. ५ हा सामासिक शब्द असून येथें कवीनें संधि केला नाहीं. वामनाच्या कवितेंत अशीं उदाहरणें पुष्कळ आढळतात. ६ परमेश्वराचें नांव.

भु० प्र०. न जाणे शिशू अग्निची शक्ति कांहीं ।
जळो तूळ इच्छा अशी ज्यासि नाहीं ॥
तरी घालितां अग्नि कार्पास-राशीं[1] ।
जळे; ये रिती नामही पाप नाशी ॥ ४ ॥

व० ति०. येथें म्हणाल[2] जळती जरि सर्व पापें ।
मूळें[3] न कां जळति नाम-महा-प्रतापें ॥
नेणोनि नाम म्हणतां दुरितासि जैसें ।
जाळी न कां सकळ पातक-मूळ तैसें ॥ ५ ॥

धातूवरी अनळ नेणत बाळ घाली ।
तो अग्नि धातु-मळ तों अति-शीघ्र जाळी ॥
ताम्रादि भस्महि तया अनळेंचि जेव्हां ।
कर्ता अभिज्ञ बहु जाळिल धातु तेव्हां ॥ ६ ॥

पृथ्वी. न जाणतहि ये मुखा हरि तथापि पापें हरी ।
स्मरोनि महिमा स्मरे वदनिं तींच नामें जरी ॥
प्रवृत्तिविषयीं[4] जरी असति त्या जनांचीं मनें ।
विरक्त[5] करितो[5] हरी स्व-गुण-नाम-संकीर्तनें[5] ॥ ७ ॥

व० ति०. अत्यंत शुद्धि[6] हरि-कीर्तन-भक्ति-भावें ।
होतां खरें, परि न जाणतही स्व-भावें[7] ॥
नारायण-स्मरण-कीर्तनमात्र कांहीं ।
ज्याला घडेल मग पातक[8] त्यास नाहीं ॥ ८ ॥

मालिनी. कडुवट हरि-नामें वाटती पापियाला ।
परि दवडुनि पापें गोड होती तयाला ॥
मग विषय-सुखाची नाठवे त्यास वार्ता ।
म्हणउनि न पुन्हा तो होय अन्याय-कर्ता ॥ ९ ॥

---

१ कापसाच्या ढीगावर. २ ह्यावर अशी शंका घ्याल कीं. ३ पापाचें मूळ जी वासना ती. ४ संसाराविषयीं. ५ आपले गुण व नाम ह्यांच्या संकीर्तनानें लोकांच्या मनांत प्रपंचाविषयीं वैराग्य उत्पन्न करितो. ६ 'होते' या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ७ सहजगत्या. ८ त्याचें पातक नाहींसें होतें.

शा० वि. आयासाविण ही कथा परिसतां गोडी हरीच्या गुणीं ।
ज्या चित्तीं उपजे निघे सहज तो त्याच्या पदीं तत्क्षणीं ॥
ऐसे ये रिति अर्पिती सहजही जे एकदा त्या[१] मना ।
ते स्वप्नीं नयनीं न देखति यमा कैंच्या तयां यातना ॥१०॥

मालिनी. सकळहि अघ-बीजें नाशती अंतरींचीं ।
अति अघ-हर नामें ह्यास्तव श्रीहरीचीं ॥
हरि विषय मतीचा कीर्तनें होय जेव्हां ।
कर-तल-गत त्याला चारही[२] मोक्ष तेव्हां ॥ ११ ॥

शा० वि. नामोच्चारण मात्र ज्यांस घडलें ते पावले सद्गती ।
सामर्थ्यें हरिचीं अशीं घडिघडी जे वर्णिती ऐकती ॥
त्यांना जे उपजेल भक्ति हरिची अत्यंत ते शुद्धता ।
तैशीं तीर्थ-तपोव्रतें न करिती हें जाण तूं सु-व्रता[३] ॥१२॥

हस्तीतें धुतलें जळीं बसविलें मालिन्यही नाशिलें ।
तेणें तें पहिलें स्व-कर्म वहिलें तीरींच आरंभिलें ॥
शुंडाग्रें धरिलें धुळीस भरिलें सर्वांगही आपलें ।
प्रायश्चित्त दिलें तथापि न भलें ज्याचें मन क्षोभलें ॥ १३ ॥

स्वागता. शर्व-कंठ-विष-गर्व[४] हराया । शक्त नामचि तुझें रघु-राया ॥
सेतु सागर कपी[५] उतराया । नाम-सेतु भव-सिंधु तराया ॥ १४ ॥

व० ति०. प्राण-प्रयाण-समयीं[६] यम-दूत जेव्हां ।
येती घडे किमपिही हरि-दास्य तेव्हां ॥
आ-जन्म-पातक[७] जळे मग त्या पवित्रा ।
होतील दुर्गति[८] कशा विविधा विचित्रा ॥ १५ ॥

---

१ हरीला. २ सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता असे मुक्तीचे चार प्रकार. ३ उत्तम आचरणाच्या हे परीक्षिति राजा. ४ देवदैत्य समुद्रमंथन करीत असतां त्यांतून हालाहल नांवाचें अतिप्रखर विष उत्पन्न होऊन साऱ्या जगतास जाळूं लागलें, तेव्हां देवादिकांच्या प्रार्थनेवरून तें सांबानें भक्षिलें. तें त्याच्या कंठास फार जाळूं लागलें. ती पीडा शांत व्हावी म्हणून त्यानें मस्तकीं गंगा व चंद्र धारण करणें इत्यादि अनेक उपाय केले, तथापि पीडा शांत होईना. शेवटीं त्यानें रामनामाचा जप चालविला, तेव्हां तें विष शांत झालें, अशी कथा आहे. ५ सागर उतराया कपींना जसा सेतु तसा इ०. ६ प्राण जाण्याच्या वेळीं. ७ उपजल्यापासून मरेपर्यंत केलेलें पाप. ८ नरकयातना.

## वेंचे, वनसुधेंतील.

कृष्णानें कुंजवनांत गोपाळांसहवर्तमान जी क्रीडा केली ती सुधेसारिखी गोड आहे आणि ती ह्या प्रकरणांत वर्णिली आहे, म्हणून ह्यास 'वनसुधा' असें नांव दिलें आहे.

व० ति०. बोले मुलांप्रति हरी पहिले दिशीं कीं ।
रात्रींच सिद्ध करणें अशनादि[1] शिंकीं ॥
जाऊं समस्तहि उद्यां वन-भोजनातें ।
पोटांत भाव वधणें अवदुर्जनातें[2] ॥१॥

एके दिनीं मनिं धरूनि असें हरी तो ।
चाले प्रभात-समयीं खळ जो हरीतो[3] ॥
शृंगी-रवेंचि[4] करि जागृत मित्र-सेना ।
देणार जागृतिस[5] ज्याविण हो असे ना ॥२॥

द्रु० वि०. खडबडोनि समस्तहि धांवले । सहित-वत्स हरिप्रति पावले ॥
सकळ खेळति सोडुनि वासुरां । परम कौतुक जें गगनीं सुरां ॥३॥

भु० प्र०. वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे[6] । तुरे खोविती मस्तकीं पल्लवांचे ॥
फुलांचे गळां घालिती दिव्यहार । स्व-नाथा-सवें ते करीती विहार ॥४॥

स्व-कौशल्य ज्या गुंज-माळांत नाना । गळां घालिती ते करीती[7] तनाना[7] ॥
शिरीं बांधिती मोर-पत्रें[8] विचित्रें । शरीरावरी रेखिती दिव्य चित्रें ॥५॥

इं० व०. पक्ष्यांचिया साउलिच्याच संगें । ते धांवती हास्य-रसप्रसंगें ॥
हंसाचिया दाखविती गतीतें । जे लाधले हंस-गुरू-गतीतें[9] ॥६॥

उ० जा०. धांवोनि लावी पहिलें करातें । श्रेष्ठत्व दे त्या अजि लेंकरातें ॥
जो तो म्हणे लाविन मीच पाणी । धरीन आधीं प्रभु चक्र-पाणी ॥७॥

परोपरी खेळति जी[10] वनांत । अर्पूनि चित्तें जग-जीवनांत ॥
धरूनियां मर्कट-पुच्छ हातीं । तयांसवें वृक्ष उडों पहाती ॥८॥

---

१ खाण्याचे वगैरे पदार्थ. २ दुष्ट अघासुरातें. ( कृष्णास मारण्याकरितां हा पतनेचा भाऊ कंसानें पाठविला होता. त्यानें कपटानें अजगराचें रूप धरिलें होतें, त्याला कृष्णानें मारिलें ). ३ नाशितो. ४ लहान शिंगाच्या शब्दानें. ५ अज्ञाननिद्रेपासून सुटका—ज्ञान. ६ गवळ्यांचे. ७ ताना किंवा गाण्याचे आलाप घेती. ८ मोरांचीं पिसें ( संस्कृत व प्राकृत शब्दांचा समास ). ९ योगिजनांमध्यें जे श्रेष्ठ त्यांना प्राप्त होणाऱ्या गतीला. १० अहो.

भु० प्र० मुखें वासुनी लोचन-भ्रू-तटातें । उभारूनियां वांकुल्या मर्कटांतें ॥
अहो दाविती शब्द तैसे करीती । असे खेळती बाळ निःशंक-रीती ॥ ९ ॥

वनीं देखुनी[१] मेघ-नीळास मोर । प्रमोदें[२] करी नृत्यलीला समोर ॥
तयासारिखे नाचती तोक[३] सारे । खुणावूनि अन्योन्य कीं तो कसारे ॥१०॥

जसे दांभिक ध्यान-मुद्रा[४] धरीती । जना दाविती ज्ञानही बोध-रीतीं[५] ॥
तशी दाविती ते बकाभ्यास-मुद्रा[६] । गडी हांसवीती कृपेच्या[७] समुद्रा[७] ॥११॥

वदे कृष्ण गोपाळ-बाळां जनांतें । बसूनी करूं ये स्थळीं भोजनातें ॥
वनीं वत्स सोडा चरायासि, पाणी । तयां पाजुनीयां, म्हणे चक्रपाणी ॥१२॥

बरें कृष्णजी बोलसी तूं जसा रे । तसें वर्ततों लक्षितों तूज सारे ॥
असें बोलुनी सोडिती वासुरांतें । नभीं होय आश्चर्य सर्वां सुरांतें ॥१३॥

इं० व० संतोषतो नंद-कुमार साचा । बाळांत तैशा परमा[८] रसाचा[८] ॥
पंक्तीस दे लाभ अजी[९] वनांत । बुद्धी जयांच्या जग-जीवनांत[१०] ॥१४॥

मालिनी. निज-मुख कवणाही आड दृष्टी असेना ।
रचुनि बसवि ऐसी भोंवतीं बाळ-सेना ॥
हरि-वदन पहाया सर्व-दृष्टी भुकेल्या ।
म्हणुन बहुत पंक्ती मंडळाकार केल्या ॥ १५ ॥

भु० प्र० हरी कर्णिकेच्या स्थळीं मध्य-भागीं ।
मुलें भोंवतीं ऱ्हस्व-दीर्वें[११] विभागीं[११] ॥
लहानांपुढें थोर अंभोज-पत्रें[१२] ।
अशीं बैसवीलीं भवार्कातपत्रें[१३] ॥ १६ ॥

---

१ मोरपक्षीं नीलवर्ण मेघास व तोकपक्षीं मेघासारिख्या निळ्या कृष्णास. २ अत्यानंदानें. ३ लहान मुलें. ४ ईश्वरचिंतन एकाग्र मनानें करीत बसल्यासारिखी निश्चल स्थिति. ५ उपदेश करण्याच्या रीतीवरून. ६ माशांनीं आपणाजवळ निःशंकपणें यावें म्हणून बगळा जसा (ध्यानस्थ मुनीप्रमाणें) स्तब्ध बसतो, तसें बसणें. ७ कृष्णाला. ८ अत्युत्कट आनंदाचा. ९ अहो. १० जगताला आधारभूत जो कृष्ण त्याचे ठायीं. ह्या श्लोकाचा अन्वय—अजी, जयांच्या बुद्धि जगजीवनांत (आहेत) तैशा बाळांत (ही) नंदकुमार साचा संतोषतो, (म्हणून) वनांत त्यांच्या पंक्तीस परमा रसाचा लाभ दे. ११ ठेंगणीं आणि उंच निराळीं करी. १२ कमळाच्या पांकळ्या. १३ (भव+अर्क+आतप+त्र) —संसार हाच सूर्य त्याच्या संतापापासून रक्षणारा ह्यानें.

भु० प्र. असे कर्णिका अंबुजामाजिं जेवीं ।
मुलां मध्य-भागीं बसे कृष्ण जेवी ॥
मुखीं ग्रास स-प्रेम घालूनि हातीं ।
दहीं-भात दे, देव लीला पहाती ॥ १७ ॥

शा० वि. वंशी[1] नाद-नटी[2] तिला कटि-तटीं[3] खोवोनि पोटी-पटीं[4] ।
कक्षे वाम-पुटीं[5] स्व-शृंग[6], निकटीं, वेताटिही गोमटी ॥
जेवी नीर-तटीं[7] तरू-तळवटीं, श्री-श्याम-देहीं उटी ।
दाटी व्योम-वटीं[8] सुरां, सुख-लुटी घेती जटी धूर्जटी[9] ॥ १८ ॥

---

## वेंचे वेणुसुधेंतील.

श्रीकृष्ण वनांत वेणु वाजवीत असतां त्याचा अमृतासारखा गोड ध्वनि ऐकून सर्व प्राणी मोहित झाले, ही कथा ह्या प्रकरणांत वर्णिली आहे; म्हणून ह्यास 'वेणुसुधा' हें नांव दिलें आहे.

स्वागता. अंग वक्र अधरीं धरि पांवा । गोप-वेष हरि तोचि जपावा ॥
वाम-बाहु वरि गालहि डावा । तो ठसा स्व-हृदयांत पडावा ॥ १ ॥

उ० जा०. वेणु-ध्वनी तो सुर-गायकांनीं[10] । त्यांच्या विमानांतहि बायकांनीं ॥
आश्चर्य कानीं पडतांचि केलें । न तृप्त ज्यांचें मन हें भुकेलें ॥ २ ॥

स्वागता. मोहती व्रज-पशू[11] मृग-गाई । आमुचें नवल काय अगाई ॥
स्तब्ध होति लिखितें जसिं चित्रें । वेणुच्या ध्वनि-रसेंचि विचित्रें ॥ ३ ॥

उ० जा०. मातृ-स्तनींचा रस आननांत । तों होय वेणु-ध्वनि काननांत ॥
गळे गिळेना पय वासुरांतें । आश्चर्य वाटे गगनीं सुरांतें ॥ ४ ॥

स्वागता. मल्ल-वेष रचिला अभिराम । श्रीवरप्रमुसवें बळराम ॥
मोर-पत्र-मुकुटीं तरु-पत्रें । नेत्र सुंदर जसीं शत-पत्रें[12] ॥ ५ ॥

---

१ (वेळूची केलेली) मुरली किंवा पांवा. २ नादानें नटनारी म्हणजे मंजूळ नादाची. ३ कंबरेस. ४ निऱ्या खोवण्याच्या ठिकाणीं. ५ डाव्या काखेमध्यें. ६ आपलें वाजविण्याचें शिंग. ७ यमुनेच्या कांठीं. ८ आकाशाच्या पोटांत. ९ ह्या शब्दाचा अर्थ शंकर असा आहे, परंतु येथें हा शब्द तपस्वी ह्या अर्थानें योजिला आहे असें दिसतें. १० गंधर्वांनीं. ११ गोकुळांतील पशु. १२ कमळें.

उ० जा०. सये[१] असा म्यां हरि देखिला गे । तो प्रेम-रंगीं[२] मनिं रेखिला[३] गे ॥
पाचारितो वेणु-रवेंचि गाई । आश्चर्य तेव्हां करितों अगाई ॥ ६ ॥

स्वागता. गो-धनीं[४] बहु पुढें न वजावें[५] । ठाव एकचि धरूनि थिजावें[६] ॥
वाजवी म्हणुनि जो निज पांवा । कृष्ण तोचि हृदयांत जपावा ॥ ७ ॥

उ० जा०. आ-पाद[७] माळा प्रभु-कृष्णजीची । सुधा पिती षट्-पद[८] कृष्ण[९] जीची ॥
प्रदक्षिणा ते अवघे तिला हो । करूनि गुंजारव घेति लाहो ॥ ८ ॥

व० ति०. गुंजारवें भ्रमर गुंजति त्यांत देवें ।
वेणु-ध्वनी मिसळिला मृदु वासुदेवें ॥
आ-पादकंठ वन-माळ अशी विराजे ।
ते सेविती मधुप होउनि देव-राजे[१०] ॥ ९ ॥

भु० प्र०. वनीं राजहंसीं पिकांनीं शुकांनीं । ध्वनी गोड तो आयकोनी सु-कानीं[११] ॥
त्वरें येउनी सेवियेलें हरीतें । महा-पापही नाम ज्याचें हरीतें ॥ १० ॥

द्रु० वि०. वदन लावुनि ते सकल क्षिती[१२] । नयन झांकुनि अन्य न लक्षिती ॥
स्थिर-मनें करुनि स्थिर आसना । करिति ते खग कृष्ण-उपासना ॥ ११ ॥

भु० प्र०. जगज्जीवन[१३] श्रीहरी आणि काळा । करी तो जगीं जीवनाच्या[१४] सुकाळा ॥
असे मेघही, या निमित्तें सखा हो[१५]। सुहृद्भाव ऐसा नसे आणिकां हो ॥ १२ ॥
झणी उष्ण लागे सख्या केशवातें । म्हणूनि त्वरें येउनी लेश-वातें[१६] ॥
मुकुंदावरी मेघ तो छत्र जाला । करी स्वात्म-देहार्पण[१७] श्री-अजाला[१८] ॥ १३ ॥

द्रु० वि०. हळुहळू घन गर्जतसे नभीं । मुरलिहूनि चढेल[१९] म्हणोन भीं ॥
श्रवण-भक्ति-अतिक्रम[२०] वर्जितो[२१] । करित कीर्तनही घन गर्जतो ॥ १४ ॥

भु० प्र०. यशोदे तुझा पुत्र वंश-स्वरांनीं[२२] । सुधा ओष्ठिंची वर्षतो या स्व-रानीं[२३] ॥
तईं भोंवते मोहती देव-जाती । जयांचीं मनें उन्मनत्वास[२४] जाती ॥ १५ ॥

---

१ हे सखि. २ प्रेमरूप रंगांनीं. ३ तजबीर काढिली. ४ गायींच्या समुदायांनीं. ५ जावें. ६ थांबून रहावें. ७ पायघोळ. ८ काळे भुंगे. ९ कृष्णाच्या गळ्यांतील माळ. १० देवश्रेष्ठ. ११ कान देऊन. १२ भूमीकडे. १३ जगताच्या स्थितीला कारण. १४ वांचण्याच्या, पाण्याच्या. १५ होय. १६ वाऱ्याच्या झुळकीच्या योगानें. १७ आपलें मन व शरीर ह्यांचें अर्पण; ( नवविधा भक्तीपैकीं शेवटचा प्रकार. पृ० १६४ टीप पहा ). १८ जन्म-रहित जो परमेश्वर त्याला. १९ ह्याचा 'आपला ध्वनि' हा अध्याहृत कर्ता. २० आपल्या गर्जनेनें मुरलीचा शब्द लोपविला तर नवविध भक्तींतील श्रवणभक्तीचें उल्लंघन होईल म्हणून तें टाळण्याकरितां हळू शब्द करितो, हा भाव. २१ टाळतो. २२ पांव्याच्या सुरांनीं. २३ आपल्या वनांत. २४ ज्या स्थितींत मनाचाही लय होतो अशा (उन्मनी) स्थितीस.

## रुक्मिणी-पत्रिका.

रुक्मिणी ही विदर्भदेशाचा राजा भीष्मक याची कन्या होती. हिच्या बापानें आपला मुलगा रुक्मी याच्या आग्रहामुळें तीस चेदि देशाचा राजा शिशुपाल यास देऊं केलें. परंतु रुक्मिणीची निष्ठा कृष्णाच्या ठिकाणीं असल्यामुळें तिनें त्याजकडे सुदेव नांवाच्या ब्राह्मणास गुप्तपणें पाठवून अमुक दिवशीं येऊन मजला घेऊन जावें अशा आशयाचें त्याजबरोबर एक पत्र दिलें; त्यासंबंधीं हें आख्यान आहे.

व० ति०. श्रोत्यांचिया श्रवण-रंध्रिं रिघोनि चित्तीं ।
तूझे गुण त्रि-विध ताप हरी हरीती ॥
ऐकोनियां भुवन-सुंदर या गुणांतें ।
निर्लज्ज चित्त हरि हें तुजला वरीतें ॥ १ ॥

विद्या वय द्रविण रूप इहीं करोनी ।
हा आत्म-तुल्य पति हेंचि मनीं धरोनी ॥
जे सर्व-लक्षण-विचक्षण[1] सत्कुलीना ।
ते कां नृसिंह नवरी तुजला वरीना ॥ २ ॥

जे सर्व-लक्षण-विचक्षण आणि धीरा ।
तेही तुझे गुण असे जगदेक-वीरा ॥
ऐकोन कोण नवरी न वरील तूतें ।
निर्लज्ज यास्तव झणी म्हणशील मातें ॥ ३ ॥

देहार्पणा करुनि तूं पति म्यां वरीला ।
जाया करीं हरि तुं नेउनि शीघ्र माला[2] ॥
सिंहांगनेसि मज नेइल अंबुजाक्षा ।
जंबूक चैद्य[3] जरि तूं करिशी उपेक्षा ॥ ४ ॥

म्यां तूज निश्चित मनें वरिलें अनंता ।
येऊनियां कारिं धरूनि करीं स्व-कांता ॥
सिंहांगनेसि मज जंबुक अंबुजाक्षा ।
नेईल चैद्य जरि तूं करिशी उपेक्षा ॥ ५ ॥

---

१ सर्व लक्षणांनीं संपन्न. २ मला. ३ शिशुपाल.

व० ति०.

आराधिला जरि गदाग्रज[१], म्यां अ-गण्यें[२] ।
पूर्तेष्ट-दत्त-नियमादि[३] बहूत पुण्यें[३] ॥
येऊनियां करिं धरीं मज चक्र-पाणी ।
चैद्यादि[४] दुष्ट हरि हे न धरूत पाणी ॥ ६ ॥

सर्वेश्वरार्पण-विधी करुनी अ-गण्यें ।
केलीं जरी असति कीं बहु-जन्म-पुण्यें ॥
येऊनियां मज करीं धरिं चक्रपाणी ।
हे नातळोत दमघोष-सुतादि[५] कोणी ॥ ७ ॥

लग्नाचिया पहिलिया दिवसांत यावें ।
संगीं समग्र बळ यादवसैन्य घ्यावें ॥
या चैद्य-मागध-बळांबुधितें[६] मथावें ।
मातें निशाचर-विधी[७] करुनी हरावें ॥ ८ ॥

अंत:पुरांतुनि तुझें न वधूनि बंधू ।
न्यावें कसें म्हणसि तूं जरि सौख्य-सिंधू ॥
यांचे कुळीं हरि असे कुल-देवि-यात्रा ।
तेथूनि तूं मजसि ने शतपत्र-नेत्रा[८] ॥ ९ ॥

शर्वादि सर्व तुझि इच्छिति पाय-धूळी ।
तूझा प्रसाद नव्हतां मज याच काळीं ॥
जन्मा शतांत मरणें स्मरणें मुकुंदा ।
अंतीं तुझ्याच वरणें चरणारविंदा ॥ १० ॥

---

१ गद म्हणून वसुदेवाचा मुलगा होता तो आहे अग्रज (वडील भाऊ) ज्याचा, असा कृष्ण. २ अगणित. ३ (पुर्त, इष्ट, दत्त, नियम, आदि) पुर्त, (लोकोपयोगार्थ, धर्मशाळा, विहिरी वगैरे बांधणें), इष्ट (यजन), दत्त (दान), व नियम इत्यादि पुण्यकर्मानें. ४ चेदिदेशाचा राजा शिशुपाल वगैरे. ५ दमघोष हें शिशुपालाच्या बापाचें नांव. ६ शिशुपाल व जरासंध ह्यांच्या सैन्यरूप समुद्रास. ७ राक्षसविधि.* ८ कमलनयना.

* या विवाहाचे आठ प्रकार आहेत:—

(१) ब्राह्म—सालंकृत कन्यादान. (२) दैव—यज्ञाच्या शेवटीं ऋत्विजास सालंकृत कन्यादान. (३) आर्ष—हीं दोघें (वर व वधू) मिळून धर्माचरण करोत, अशा बुद्धीनें कन्यादान. (४) प्राजापत्य—वरापासून गोमिथुन (गाई व बैल) घेऊन कन्यादान. (५) गांधर्व—वर व वधू ह्यांच्या ऐकमत्यानें होणारा. (६) आसुर—वरापासून पुष्कळ द्रव्य घेऊन कन्यादान. (७) राक्षस—कन्येकडील लोकांस हाणमार करून त्यांच्या इच्छेविरुद्ध तिचें हरण. (८) पैशाच—कन्येकडील लोक निजले असतां किंवा दारू वगैरे पिऊन मत्त झाले असतां तिचें हरण.

मालिनी. हरि-चरण-सरोजीं रुक्मिणीची शिराणी[1] ।
विशद लिखित-रूपें बोलिली जे पुराणीं ॥
मनुज-तनुज जैसा भू-तळीं चक्रपाणी ।
जगदघ हरि भाषा-रूप हे व्यास-वाणी ॥ १ ॥

द्रु० वि०. असि विदर्भ-मही-पति-पुत्रिका ।
लिहि हरी-प्रति संस्कृत पत्रिका ॥
लिखित-भाव तिचा बरवा मनें ।
उकलिला हृदयांतुनि वामनें ॥

---

## वेंचे भामाविलासांतील

एकदा नारद मुनीनें श्रीकृष्णास स्वर्गांतील पारिजातक वृक्षाचें फूल आणून दिलें. तें त्यानें रुक्मिणीला देऊन टाकलें, असें समजल्यावरून कृष्णाची दुसरी बायको सत्यभामा ही अतिशय रागावली, तेव्हां तिची समजूत कृष्णानें केली; हें या आख्यानांत वर्णिलें आहे.

शिख०. लता सत्या[2] अंकीं खग-गमन[3] भक्तामर-तरू[4] ।
तरू[5] हातीं तो श्रीपति भव-नदी पार उतरू ॥
धरी लक्ष्मी पक्षी[6] कर-तल-युगीं पाद-युगळा ।
गळां रत्न ध्यावा द्रुम-गरुड-संयुक्त सगळा ॥ १ ॥

व० ति०. कृष्णासि कृष्ण-पद-भक्ति-विशारदानें[7] ।
जें स्वर्ग-पुष्प दिधलें मुनि-नारदानें ॥
तें रुक्मिणी-प्रति दिलें त्रि-जगन्निवासें ।
जें द्वारका करि भरोनि सु-गंधि वासें ॥ २ ॥

भु० प्र०. असी गोष्टि दासी-जनीं बायकांनीं ।
विचारूनियां सांगतां[8] जाय कानीं ॥
तईं सत्यभामा महा-क्रोध दावी ।
बुझावी[9] हरी तेचि लीळा वदावी ॥

---

१ कौतुक, आवड. २ सत्यभामा कृष्णाची स्त्री. ३ गरुडावर बसून संचार करणारा. ४ भक्तांना कल्पवृक्षासारखा. ५ पारिजातक. ६ गरुड, हा 'धरी', आणि 'लक्ष्मी' त्यांचा कर्ता. ७ कृष्णाच्या पायांच्या भक्तीविषयीं प्रवीण. ८ लोकांच्या बायकांनीं फूल कोठून आणिलें असं विचारल्यावरून रुक्मिणीच्या दासींनीं सांगितलें; तेव्हां ती गोष्ट सत्यभामेच्या कानीं गेली. ९ समजूत करी.

द्रु० वि०.

गडबडां धरणीवरि लोळते ।
वदवती न कवीसहि लोळ ते ॥
रडत मूर्छित होय घडी घडी ।
पवन[1] निश्चळ[1], नेत्र न ऊघडी ॥ ४ ॥

अलक[2] हार गळ्यांतिल तोडिते ।
कुरळ केश मुखावरि सोडिते ॥
कर-युगें उर मस्तक ताडिते ।
वसन आणिक कंचुकि फाडिते ॥ ५ ॥

शिख०.

महा-उष्ण-श्वासें करुनि वदते शुष्क अधरा ।
धरा-पृष्ठीं जोडा न शठ दुसरा या गिरि-धरा ॥
धराया माझा हा कर कपटि कैंचा जनमला[3] ।
मला जो निंदूनी कुसुम तिस देऊनि रमला ॥ ६ ॥

सख्या हो मेल्याही शवहि न शिवो हें यदु-पती ।
पती नाना-स्त्रींचा पतितजनही ज्यास जपती ॥
नका येऊं देऊं सदनिं सवतीच्या प्रियकरा ।
करातें लावीना मज कपटि ऐसें तुम्हि करा ॥ ७ ॥

मालिनी.

रडत रडत मूर्छेमाजि वृत्ती[4] बुडाल्या ।
परम विकळ; मी तूं या स्मृतीही उडाल्या ॥
उचलुनि सखियांहीं मंचकीं दिव्य सेजे ।
निजविलि मृत-तुल्या सत्यभामा दिसे जे ॥ ८ ॥

स्वागता.

ये अशांत सदनांत हरी तो ।
जो अनादि भव-शोक हरीतो ॥
किंकरी नमुनियां चरणांतें ।
सांगती सकळ आचरणांतें ॥ ९ ॥

भु० प्र०.

म्हणे शोक कां प्राप्त झाला महा हा ।
अशी कष्टली कां शुभांगी अहाहा ॥
न बोलेचि कां आमुशीं[5] आज राणी ।
जिच्या बोलण्याचीच आम्हा शिराणी ॥ १० ॥

---

१ श्वास बंद होई. २ केश. ३ जन्मास आला. ४ अंत:करणव्यापार. ५ आम्हांपाशीं.

शिख०.

जयीं श्री-वत्सांकप्रभु[1] करि निजांक-स्थित[2] शिरा[3] ।
शिरा-नाडी-प्राण प्रगटति न लावूनि उशिरा ॥
शिराणी शब्दांची पुरवि तरि डोळे न उघडी ।
घडी जों मानाची विघडलि असे तोंवरि[4] घडी ॥ ११ ॥

बजागी ते जागी स्व-मनिं परि डोळे न उघडी ।
घडी एक क्रोधीं मन बुडवि मानें अवघडीं[5] ॥
घडी[6] पूर्व-प्रेम-स्थितिस बसतां तीस वि-घडी[6] ।
घडी स्त्री-जातीची घडविलि[7] असे ख्याति उघडी ॥ १२ ॥

सख्या दुःखी तूझ्या मजसहित कीं कान उगले ।
गळे नेत्रीं पाणी न निघति मुखीं शब्द सगळे ॥
किती मी प्रार्थीतों धरुनि शिर अंकाचउपरी ।
परी क्रोधाची हे अधिकचि दिसे अद्भुत परी ॥ १३ ॥

वदे भामा कोपें अतिविकळ चावूनि अधरा ।
धरा-पृष्ठीं नाहीं ठक तुजअसा अंबुज-धरा[8] ॥
धरावें या अंकीं शिर अजि तिचें पक्षि-गमना ।
मना आलें देणें कुसुम जिस तें कंस-दमना ॥ १४ ॥

व० ति०.

जों नेत्र मोडुनि वदे ढकलूनि मांडी ।
भ्रू-मंडलीं[9] भ्रमण[9] अंगुलि-भंग[10] मांडी ॥
तों कृष्णजी करुनि हास्य म्हणे अहाहा ।
वेडे अनर्थ इतुक्यास्तव कां महा हा ॥ १५ ॥

स्वागता.

अर्पितां मुनि-वरें सुमनातें ।
वाटलें प्रथम हेंचि मनातें ॥
कीं असा तरु पुरींत असावा ।
त्यांतही स्व-सदनींच वसावा ॥ १६ ॥

---

१ ज्याच्या उरःस्थलावर भृगूच्या लातेची श्रीवत्स नांवाची खूण आहे असा प्रभु (कृष्ण). २ आपल्या मांडीवर ठेवलेलें. ३ मस्तकास. ४ जों मानाची घडी विघडली असे, तोंवरी घडि (घटकाभर) डोळे न उघडी असा अन्वय. ५ दुर्वह. हें क्रोधाचें विशेषण. ६ अन्वय-पूर्वप्रेमस्थितिस घडी बसतां (ती सत्यभामा) तीस (घडीस) विघडी (मोडी). ७ स्त्रीजातीची सुघडी (चांगली) घडी घडविली (अशी) ख्याति असे—असा अन्वय. ८ हातांत कमल धरणाऱ्या कृष्णा. ९ भिंवया फिरविणें. १० बोटें मोडणें.

व० ति०. तत्रापि जे प्रिय बहू स्व-वधूचि माजी ।
तो स्थापणें तरु तिच्या सदनाचिमाजी ॥
ते तूं प्रिया तुजचि देइन त्या द्रुमातें ।
हें वाटलें प्रथम आण तुझीच मातें ॥ १७ ॥

स्वागता. फूल देउनि तिला उतराई । होइं मी, समज हे चतुराई ॥
देतसें तरुचि तो तुजला गे । खेद हा न करणें तुज लागे ॥ १८ ॥

भु० प्र०. तुतें वृक्ष देणेंचि यालागिं आधीं ।
फुलें नाशिला जो तिला[1] होय आधी ॥
न जाणोनि केले तुवां कष्ट भारी ।
समाधान ऐसें करी कैटभारी[2] ॥ १९ ॥

---

## वेंचे, रुक्मिणीविलासांतील.

एके समयीं रुक्मिणीस मी कृष्णाची अत्यंत प्रियकर आहें असा गर्व झाला होता. तो तिचा गर्व कृष्णानें हरण केला ही कथा या आख्यानांत आहे.

मालिनी. करुनि नमन देवा रुक्मिणी-नायकातें ।
निज-पद[3] हरि दे जो कीर्तिच्या गायकातें ॥
स्मरत पद तयाचें त्याचिया लोक-लीला ।
कथिन हरिति गातां वर्णितां ज्या कलीला[4] ॥ १ ॥

व० ति०. चिच्छक्तिला[5] सतत चिन्मय[6] जेविं योग ।
श्री-रुक्मिणीस न कधीं हरिसीं वियोग ॥
मी वास्तव प्रियतमा परमा रमा ते ।
मानी अहंकृति शिवे असि मार-माते[7] ॥ २ ॥

मालिनी. म्हणउनि खिजवीतो रुक्मिणीतें हरी तो ।
परम करुण तीच्या मीपणाला हरीतो ॥
कथिन चरित तें जें वर्णिलें श्री-शुकानें ।
मनिं धरुनि पहावें सज्जनीं हें सु-कानें ॥ ३ ॥

उ० जा०. श्री-रुक्मिणीची बहु गोड वाणी । ग्रंथास तेथें न करीन वाणी[8] ।
कीं[9] कृष्ण जे शब्द अ-गाध वाचे । वदेल ते वर्णिन माधवाचे ॥ ४ ॥

---

१ रुक्मिणीला. २ कैटभ दैत्य मारणारा. ३ मुक्ति. ४ अधर्मप्रवृत्तीला. ५ मायेला. ६ ज्ञानस्वरूप-ब्रह्म (त्याशीं) ७ मदनाची आई रुक्मिणी हिला. ८ कमताई. ९ आणि.

उ० जा०. हा प्रेम-संवाद सुखी सु-जाणा[1] । करीतसे, नामहि[2] तेंचि जाणा ॥
आतां शुकाचार्य परीक्षितीतें । सांगे कथा धन्य करी क्षितीतें ॥५॥

भु० प्र०. पलंगावरी रुक्मिणीच्या सु-सेजे । बसे कृष्ण, ते त्यास सेवीतसे जे ॥
उभी सुंदरी ढाळिते चामरातें । मनीं जे शिवे मीपणा-पामरातें[3] ॥६॥

द्रु० वि०. कर मुद्रा-वलयांसह[4] चाळितां । चवर माधवजीवरि ढाळितां ॥
ध्वनि उठे चरणीं मृदु भूषणीं । हृदय लग्न जिचें यदु-भूषणीं[5] ॥७॥
चहुंकडूनिहि आनन शोभलें । पदक खालुनि शोभतसे भलें ॥
श्रवणिंचे नग शोभति दोंकडे । वरुनि चांचर[6] केशहि वांकुडे ॥८॥
गळसरी दुसरी न धरी गळां । प्रति-भवीं[7] न पती हरिवेगळा ॥
अवतरे अवतीर्ण जयीं पती । स्व-अनुरूप परस्पर दंपती ॥९॥
कसि असीस अहं-मति वाटते । नरक-जन्म-मृतींसहि वाट ते ॥
म्हणउनी खिजवूनि तितें हरी । निपुण कृष्ण अहंकृति ते हरी ॥१०॥

शिख०. वरावे ते राजे निजसम तुवां राज-तनये ।
नये आम्हां ऐसा कचिदपि[8] वरूं वो सु-विनये[9] ॥
दिलें बापें भावें त्यजुनि बरवे ते क्षिति-पती ।
पती केला ज्याचे कुल-पति[10] समुद्रांत लपती ॥ ११ ॥

स्वागता. चालिती नृपति येउनि घाले । यानिमित्त जलधींत निवाले ॥
शत्रु ज्यास नृप दानव, रीती[11] । ऐशियास नवऱ्या न वरीती ॥१२॥

द्रु० वि०. त्यजियलें[12] अजिहि स्व-नृपासना[12] । करिल त्याचिहि कोण उपासना ॥
प्रगट गोष्टिहि हे जनिं हो असी । कळत तूं ठकलीस अहा कसी ॥१३॥

व० ति०. ऐश्वर्यवंत वय आकृति हीं समान ।
स्वार्थार्थ[13] होतिल परस्पर[13] त्यांस मान ॥
मैत्री विवाह न घडे अधमोत्तमांतें ।
तूं भाळलीस[14] नृप-नंदिनि काय मातें ॥ १४ ॥

---

१ सुज्ञास. २ ह्या प्रकरणाचें नांवही 'प्रेमसंवाद' हेंच समजा. ३ अहंपणा ह्या नीचातें. ४ अंगठ्या व बांगड्या ह्यांसह. ५ कृष्णाच्या ठिकाणीं. ६ चंचल. ७ प्रत्येक जन्मीं. ८ कधींही. ९ सुशीले. १० जरासंधाच्या भयानें कृष्णानें समुद्रांत द्वारका नगरी बांधून तींत आपले सर्व आप्त व इष्ट घेऊन तो राहिला अशी कथा आहे, तीस लक्षून हें लिहिलें आहे. ११ अशी चाल आहे. १२ ययातिराजाच्या आज्ञेनें यदुवंशास राज्याधिकार नव्हता, ह्यास उद्देशून हें म्हटलें आहे. १३ एकमेकांच्या हितास कारण. १४ भोळेपणानें वश झालीस.

व० ति०.

येथें सु-जाणपण जाण तुझें बुडालें ।
कीं दीर्घ-दृष्टिपण तें अवघें उडालें ॥
ज्याला न लेश[१] गुण तो पति काय केला ।
ज्याकारणें जन अ-किंचन[२] तो भुकेला ॥ १५ ॥

मालिनी.

अटन करित भिक्षा भक्षणें ज्या समाजीं ।
गगन वसन[३], वारा सूत्रही त्यास माजीं[४] ॥
अ-गुणपण[५] जयाचें ऐसिया स्वादु लागे ।
तुज नृपति-सुते तो कायसा दादुला गे ॥ १६ ॥

उ० जा०.

आतां तरी क्षत्रिय तूं भला गे । वरीं जयाचा तुज लोभ लागे ॥
जेणें तुला साधति लोक दोनी । आम्हीं वृथा काय बहू वदोनी ॥१७॥

व० ति०.

झाली असें परिसतांचि अनाथ-वाणी[६] ।
ठावी नसे जिस कधीं असि नाथ-वाणी ॥
त्रैलोक्य-नाथ पति हा प्रिय आपणातें ।
त्यागावया तिस गमे करितो पणातें ॥ १८ ॥

दाटूनि कण्ठ पडली वदनास[७] मुद्रा[७] ।
शोकें भरे जल जसें भरितें समुद्रा ॥
वेऊनि चामर चुडासह मुद्रिकांहीं ।
भूई पडे उरि[८] नुरे तनुमाजि कांहीं ॥ १९ ॥

भु० प्र०.

पडे केळ जैसी महा-चंड-वातें । असें देखतां ये कृपा माधवातें ॥
उडी शीघ्र टाकी पलंगा-वरूनी । धरी उत्तरीयांबरा[९] सांवरूनि ॥ २० ॥

मालिनी.

मजविण न सुखाचा तूज तों हेतु कांहीं ।
समजत तुझिया या पाहतों कौतुकांहीं ॥
निज-वचन विनोदें बोलिलों तूजला गे ।
न कळत गति[१०] याची[१०] खेद हा तूज लागे ॥ २१ ॥

---

१ ऐश्वर्यादि; पक्षीं सत्त्वरजस्तम हे तीन. २ भिकारी; पक्षीं विरक्त. ३ आकाश हेंच वस्त्र. ४ कमरेला. ५ गुणहीनता (मूर्खपणा; पक्षीं सत्त्वादि गुणांचा अभाव). ६ दीनासारिखी. ७ बोलवेनासें झालें. ८ बाकी. ९ पांघरलेल्या वस्त्राला. १० ह्या वचनाचा रोख.

मालिनी. नयन-शर धनुष्यें भोंवयांच्या प्रतापें[1] ।
श्रवणवरिहि येती तांबडे कोप-तापें ॥
अधर थरथरीती रक्त-वर्ण स्वभावें ।
असिस तुज पहावें बोललों याचि भावें ॥ २२ ॥

जरि निपट[2] दरिद्री जो न लाहेचि कांजी ।
तरि अमृत मिळाल्या त्यास सोडील कां जी ॥
तसि बहुत उणी मी लभ्य झालास मातें ।
म्हणउनि वरिलें म्यां तूज सर्वोत्तमातें ॥ २३ ॥

उ० जा०. राज्यादिकें टाकुनि निर्विकारी[3] ।
त्वदर्थ होतात असे भिकारी ॥
राज्यांत दुःखें, सुख तूजमाजी ।
म्हणून तूं श्लाघ्य तया समाजीं ॥ २४ ॥

भु० प्र०. सुधा मानुनीयां पितो एक कांजी ।
सुधा-पान-कर्ता शिवे त्यास कां जी ॥
तसी टाकुनी मी तुला मंगळाला[4] ।
नृपांला तयां कां भजों वोंगळांला ॥ २५ ॥

---

## वेंचे, लोपामुद्रासंवादांतील.

रावणाला मारल्यानंतर लंकेहून राम सीतेला घेऊन अयोध्येकडे चालला असतां वाटेंत अगस्त्य ऋषीच्या आश्रमांत उतरला. तेथें अगस्त्य ऋषीची बायको लोपामुद्रा व सीता यांजमध्यें झालेला सेतुबंधाविषयींचा संवाद या आख्यानांत वर्णिला आहे.

शालिनी. वंदूनि श्रीराम संसार-साक्षी[5] ।
ज्याचे अंकीं जानकी सारसाक्षी ॥
लोपामुद्रेशीं तिशीं शब्द-माला[6] ।
झाल्या अर्पूं त्याचि सर्वोत्तमाला ॥ १ ॥

---

१ कोपतापें तांबडे नयनशर ( कटाक्षरूप बाण ) भोंवयांच्या धनुष्यें प्रतापें श्रवणवरिहि ( कर्णपर्यंत ) येती असा अन्वय म्ह० जी रागानें लाल झालेले डोळे भिंवया चढवून आकर्ण फिरवीत आहे अशीस. २ अत्यंत. ३ कामक्रोधादिविकाररहित. ४ कल्याणस्वरूपाला. ५ आपण अलिप्त राहून प्राण्यांची सदसत्कर्मै पाहणारा. ६ शब्दपरंपरारूप माला.

व० ति०. मारूनि रावण विदेह-सुता-श्रमातें[१] ।
नासूनि, ये कलश-संभव-आश्रमातें[२] ॥
तो[३] सिंधु बिंदु करि हा मनिं गर्व वाहे ।
त्याची वधू, विदितसे मति राघवा हे ॥ २ ॥

उ० जा०. न तींपुढें सेतु-कथा वदावी । म्हणोनि सीतेप्रति भाव दावी ॥
बोलोनिही सांवरिजे स्व-वाचा । हा[४] शब्द तो सूचवि लाघवाचा[५] ॥३॥

भु० प्र०. विचारी मनीं सर्व-संसार-साक्षी । जरी वारिली जानकी सारसाक्षी ॥
सदा सेतु-लीला-निदिध्यास[६] तीतें । वदेल स्व-वाचे ऋषीचे सतीतें ॥४॥

व० ति०. सर्वा कथा कथिं अगस्ति-वधूसि सीते ।
क्षाराब्दि-सेतु-रचना[७] न कथीं सतीतें ॥
कीं चूळ जो जलधिची करि त्या मुनीची ।
कांता वदेल तव वल्लभ-कीर्ति नीची[८] ॥ ५ ॥

उ० जा०. प्रमाण आज्ञा म्हणवूनि रामा । वंदूनि जातां मुनिवर्य-धामा ॥
पुसे[९] तिला क्षेम तया प्रसंगीं । संवाद[१०] हा[१०] राघव-विप्रसंगीं ॥६॥

स्वागता. राम तो स्व-रत[११] नित्य विरक्त । हा नसेल तुजशीं अनुरक्त ॥
कीं असेल सुख तें वद सीते । सांग गोष्टिहि सुख-प्रदसी[१२] ते ॥ ७ ॥
काय बोलत असे अभिराम । श्रांत तूज अवलोकुनि राम ॥
सांग आणिकहि वल्लभ-वार्ता । ज्या कथा करिति सौख्य भवार्ता[१३] ॥८॥

उ० जा०. विरक्त बाई रघु-राज साचा । भोक्ता नव्हे राजस-तामसांचा[१४] ॥
न या बहू कल्प-तरूपमा[१५] ते । दे सोहळे कल्पित-रूप[१६] मातें ॥ ९ ॥

मालिनी. जसि बहु रवि-तप्ता साउली गोड वाटे ।
तसि वनिं पति-लाडें मानितें कोड वाटे[१७] ॥
घरिंहुनि[१८] मज बाई सोहळे काननाचे ।
स-जल-जलद-संगें[१९] मोर वो कां न नाचे ॥ १० ॥

---

१ जनकाची मुलगी सीता तिच्या दुःखातें. २ अगस्तिऋषीच्या पवित्र स्थानातें. ३ अगस्तिऋषि. ४ हा शब्द = हें वाक्य, म्हणजे "बोलोनिही स्ववाचा सांवरिजे" हें वाक्य. ५ खुबीचा. ६ मोठा ध्यास. ७ क्षारसमुद्रावर सेतु बांधणें. ८ तुच्छ. ९ ह्याचा कर्ता लोपामुद्रा. १० राम व अगस्ति हे एकीकडे असतां लोपामुद्रा व सीता ह्यांचा हा पुढील संवाद झाला. ११ आपल्या स्वरूपीं रममाण. १२ सुखप्रद अशी. १३ संसार-दुःखानें पीडलेल्यास. १४ राजस व तामस ह्या विषयांचा. १५ कल्पतरूची उपमा. १६ जें जें मनांत आणावे ते. १७ मार्गांत. १८ घरांतल्यांपेक्षां. १९ पाण्यानें भरलेल्या मेघाच्या संगतीनें.

शिखरिणी. पथीं मागें मागें परम अनुरागें रघुपती ।
उभा राहे पाहे गुणहि मुनि हे हेचि जपती ॥
कृपापांगें[1] अंगें निववि करि संसार-धिंवसा[2] ।
धरा माता, भ्राता शशिच[3] सविता होय दिवसा ॥ ११ ॥

मालिनी. रघुपतिसह शय्या भूमि हे माय वाटे ।
मृदु सु-पथिहुनीही मानितें पाय-वाटे ॥
श्वशुर दिन-मणीही[4] होय एणांक भाऊ[4] ।
न कळत जन ऐसे क्लेश निःशेष भाऊ[5] ॥ १२ ॥

भु० प्र०. तिघें पावलों अत्रिच्या आश्रमातें ।
तयाची वधू ते हरी वो श्रमातें ॥
तयीं हार हे गंध लावूनि घाली ।
स्व-आतिथ्य-कौशल्य दावूं निवाली ॥ १३ ॥

व० ति०. ये देखतां बहु कृपा मज दत्त-माते[6] ।
पूजूनि ये रिति वदे सति उत्तमा ते ॥
वेणी फणी करिल वो तुज कोण वाटे ।
वाईट हें मज म्हणे मुलि फार वाटे ॥ १४ ॥

स्वागता. म्लानता कधिं न यो सुमनातें ।
क्लेश केश न करोत मनातें ॥
गंध आर्द्रचि असो अनसूया ।
दे असा वर न जीस असूया ॥ १५ ॥

मालिनी. कर-तळिं न दुखों दे फोड वो जेविं पाणी[7] ।
वनिं धरि मन माझें ये रिती चाप-पाणी[8] ॥
कनक-मृग[9] म्हणें, तों पाठिसी राम लागे ।
दश-मुख हरि ऐशामाजि[10] मेला मला गे ॥ १६ ॥

---

१ कृपाकटाक्षानें. २ संसाराची हौस. ३ दिवसा सविता भ्राता शशिच होय:—म्हणजे रामाच्या बरोबर असल्यानें सूर्यही चंद्रासारखा थंड वाटला. ४ सूर्य हा सासरा असून भाऊ जो चंद्र ह्यासारखा वाटला. ५ अशी माझी स्थिति न समजणारे लोक मला सारे क्लेशच होतात असें ( खुशाल ) मानोत असा अर्थ. ६ दत्तात्रेयाची आई अनसूया तिला. ७ हात. ८ धनुष्य धारण करणारा राम. ९ सोन्याचा हरिण. १० इतक्यांत.

भु० प्र.

मृग प्राण सोडी तयीं दीनवाणी ।
अरे लक्ष्मणा धांव ऐशी सु-वाणी ॥
वदे; तों मला राम-वाणीच वाटे ।
म्हणोनी बळें लाविलें[1] त्यास वाटे ॥ १७ ॥

न जातां, तया बोलिलें दुष्ट वाचा ।
अरे घात तूं इच्छिसी राघवाचा ॥
तुला प्राप्त होणार कां देवरा मी ।
धरीसी असा कां म्हणे भाव रामीं ॥ १८ ॥

अशा शब्द-बाणीं सुमित्रात्मजाला[2] ।
अवो विंधितां तो मृत-प्राय जाला ॥
रडे जाय तो राघवा लोक-पाळा ।
करूं काय आतां म्हणे मी कपाळा ॥ १९ ॥

स्वागता.

जाय तो रडत दाटत कंठ । प्राप्त होय मजला दश-कंठ ॥
पद्मिनी उपडुनी गज हस्तीं । ने तसा उचलुनी मज हस्तीं ॥ २० ॥

मालिनी.

असि सकळ अनर्था मूळ माझीच वाणी ।
धरुनि मज पळे तैं होय मी दीनवाणी ॥
बहुत मज-निमित्तें राघवें शोक केला ।
करुण म्हणुनि, न[3] स्त्री-काम कामीं भुकेला ॥ २१ ॥

द्रु० वि.

मज-निमित्त करी गडि वानरां । सुलभ जो न सुरां अथवा नरां ॥
धरि मदर्थ असा व्यवसाय कीं । दश-मुखा वधि[4] राघव सायकीं ॥२२॥

करिं धरी कमला कमला-पती । मथुनि सिंधु असाचि मला पती ॥
जलधि-मध्य-पुरींत[5] तिचा धणी[6] । वधुनि दे मज आत्म-सुखें धणी ॥२३॥

स्वागता.

जे जळांत बुडणार तीव्र ते । थोर पर्वत अवो पतिव्रते ॥
सागरीं तरति सेतु-वाट ते । हे अ-तर्क्य करणीच वाटते ॥२४॥

---

१ ह्याचें कर्म लक्ष्मणास (अध्याहृत). २ सुमित्रेचा मुलगा लक्ष्मण त्याला. ३ स्त्री-काम म्ह० स्त्रीलंपट, किंवा विषयासक्त असल्यामुळें त्यानें शोक केला असें नाहीं, तर त्याचें अंतःकरण अत्यंत दयार्द्र होतें म्हणून मज अबलेवर भयंकर प्रसंग गुदरलेला पाहून त्यानें शोक केला. ४ मारिता झाला. ५ समुद्रामध्यें असणाऱ्या पुरींत (लंकेंत). ६ रावण.

द्रु० वि०. परततां जळधीवरि पाहतें । तरति पर्वत, विस्मित राहतें ॥
जळ-तळावरि हो धरणी सये । करि, नसे तुळणा करणीस ये[1] ॥२५॥

भु० प्र०. समुद्रावरी सैन्य ये पाय-वाटे । मनीं हें सदा जीस आश्चर्य वाटे ॥
कशी सेतुची गोष्ट तीच्या सु-वाचे । न ये, वीसरे बोल ते राघवाचे ॥२६॥

शरीरीं भरे वर्णितां राम-वारें । उठाणें मनाचीं तयीं दुर्निवारें ॥
पतीचीं यशें जे निरोपीत जाते । वदे गोष्टि हेही विदेहात्मजा ते ॥२७॥

विदेहात्मजा पावली विस्मृतीतें । म्हणे बांधिला सेतु जों त्या सतीतें ॥
जसें हास्य ये[2], स्वामिच्या भारतीतें[3] । स्मरे, तों स्फुरे हा चमत्कार तीतें ॥२८॥

व० ति०. क्षाराब्धि-सेतु म्हणि सांगसि तीस सीते ।
जीचा पती जळ-धि चूळ करी तसी ते ॥
शब्दांत या रघुपतीच खुणेस दावी ।
कीं क्षार मूत्र अशि गोष्ट पुन्हा वदावी ॥ २९ ॥

शिख०. म्हणे लोपामुद्रा चुळभरि समुद्रा करि पती ।
तया या आयासेंकरुनि उतरे कां रघुपती ॥
द्विजाच्या हो मूत्रा शिवति अ-पवित्रा न कपि ते ।
म्हणे सीता नाहीं तरि स-गिरी-सप्ताब्धिहि[4] पिते ॥ ३० ॥

---

## वेंचे, वामनचरित्रांतील.

बळीनें इंद्रपद हरण केल्यानंतर तें पुन्हा इंद्रास द्यावें म्हणून, विष्णूनें वामनाचा अवतार घेऊन बळी यज्ञ करीत होता तेथें येऊन त्यापाशीं आपल्या पावलानें तीन पावलें जमीन मागितली. बळीनें घे म्हटल्यावर वामनानें विश्वव्यापक रूप धरून दोन पावलांत भूलोक व स्वर्गलोक व्यापिले, आणि पूर्वीच्या वचनाप्रमाणें तो बळीपाशीं आणखी पाऊलभर जमीन मागूं लागला, तेव्हां बळीनें आपलें बोलणें सत्य करण्यासाठीं आपल्या मस्तकावर तिसरें पाऊल ठेवावयास सांगितलें. मग वामनानें त्याच्या मस्तकावर पाय देऊन त्यास पाताळीं घातलें, अशी कथा ह्या आख्यानांत आहे.

---

१ ह्या. २ आलें (लोपामुद्रेला). ३ वाणीतें. ४ पर्वतांसहवर्तमान सात समुद्र.

शा० वि. इंद्राचें पद दैत्य-राज बळि तो विप्र-प्रसादें[१] हरी ।
तेव्हां कश्यप-मंदिरीं अदितिच्या दिव्य-व्रतें श्रीहरी ॥
झाला वामन, मुंजि तेचि समयीं होतांच भिक्षा-छळें ।
सर्वस्व त्रि-पदें[२] हरी, स्मर मना त्याचीं पदें कोमळें ॥ १ ॥

भु० प्र. बळी याग तो नर्मदेच्या तटाकीं । करी, आहुती शुक्र अग्नींत टाकी ॥
अकस्मात तों देखिलें वामनाला । सुखाचा गमे पूर्ण ठेवा मनाला ॥२॥

द्रु० वि. करिं कमंडलु दंड मृगाजिन । त्रि-जग-माप करी बटु वामन ॥
सकल-वेद-विशारद चांगला । कटि-तटीं अतिसुंदर मेखला ॥३॥

शा०वि. तूं गा कोण? अ-पूर्व[३]; कोठ वससी? हें विश्व[४] जी तत्त्वता; ।
पाळी कोण तुतें? अ-नाथ[५] आजि मी त्राता न माता पिता; ॥
द्यावें काय तुतें? त्रि-पाद धरणी माझ्या पदें; फार वे; ।
नेवें; वामन बोलिला बळिस कीं तृती त्रि-लोकीं[६] रिघे ॥४॥

व० ति. पूजी बळी मग म्हणे बटु वामनातें ।
कीं माग जें तव अभीष्ट गमे मनातें ॥
देणार गा इतर[७] मी मज काम नाहीं ।
तूं माग जे पुरवितों तव कामना ही ॥ ५ ॥

भु० प्र. म्हणे धन्य राया स्व-वंशानुसारें[८] । प्रभू बोलसी तूं तुझा बोल सारे[९] ॥
रणीं आणि दानीं तुझीया कुळीं रे । न दे पाठि कोणीच राया बळी रे ॥६॥

इं० व०. राया मला एक असे अपेक्षा । त्यावेगळी सर्व जनीं उपेक्षा ॥
मोजूनि माझ्या त्रि-पदेंचि मातें । दे भूमि विप्र-प्रवरोत्तमातें[१०] ॥७॥

---

१ दैत्यांचे कुलगुरु जें भृगु त्यांच्या प्रसादानें—इंद्राचा पराभव करण्याकरितां भृगूंनीं बळीच्या हातून विश्वजित् नांवाचा यज्ञ करविला ; तेव्हां अग्नींतून दिव्यरथ व धनुष्यबाण वगैरे युद्धोपयोगी सामग्री उत्पन्न झाली. ती मिळाल्यावर बळीनें अजिंक्य रथांत बसून इंद्रावर स्वारी केली, आणि त्याचा पराजय करून इंद्रपद घेतलें ; अशी कथा आहे ( भागवत, स्कं० ८ अ० १५ ). २ तीन पावलांनीं. ३ अपूर्व=( अनादि, पक्षीं ; विलक्षण ) नौखा. ४ विश्वव्यापक, पक्षीं ; जगांत कोठें तरी राहणारा. ५ ज्याहून कोणी समर्थ नाहीं, पक्षीं ; ज्याचें रक्षण करणारा कोणी नाहीं. ६ तीन पावलांनीं तिन्ही लोक व्यापले म्हणजें अधिक कांहींच उरणार नाहीं, असा आशय. ७ हें कामाचें विशेषण. ८ आपल्या कुळाला शोभेल अशा रीतीनें. ९ साजे. १० ब्राह्मणांमध्यें अतिश्रेष्ठ जो मी त्या मला.

दु० वि०. बळि म्हणे अति सादर वामना । बहुत वाटसि गा बरवा मना ॥
मज अशा भुवन-त्रय-पाळका । बहु न मागसि कां द्विज-बाळका ॥ ८ ॥

रथोद्धता. शब्द मी धरिन मस्तकावरी । ब्राह्मणा अधिक[१] भूमिका[१] वरीं[१] ॥
वाटसी बहुत नेटका मना । जे असेल वद नीट कामना ॥ ९ ॥

दु० वि०. द्विज-सुता तुझिया वचनामृतें । मज गमे उठतील शवें मृतें ॥
निपुण दीससि निर्मळ आरसा । परि न मागसि अर्थचि फारसा ॥ १० ॥

हरि म्हणे मजला इतुकें पुरे । त्रि-भुवनात्मक[२] होउनियां उरे ॥
त्रि-पदमात्रचि कार्य असें बरें । अधिक इच्छिति लोक न ते बरे ॥ ११ ॥

रथो०. शब्द-मात्र बळिलाहि नाकळे । शुक्र सन्निध तयासि तो कळे ॥
तो वदे भुज सभे उभारुनी । त्या बळीप्रतिच हाक मारुनी ॥ १२ ॥

दु० वि०. अदितिच्या उदरीं हरि जन्मला । म्हणुनि ये समयीं कळलें मला ॥
विभव राज्य समस्त हरील रे । यशहि होइल विस्तृत अस्त[३] रे ॥ १३ ॥

म्हणुनि सांगतसें तुज मी अगा । बस तुं मौनपणें[४] अथवा उगा[४] ॥
म्हणसि देइन यावरिही जरी । रिघसि दाटुनि पातक-पंजरीं ॥ १४ ॥

उ०जा०. संकल्प जो तूं करिशील बापा । न देववे जाशिल सद्य पापा[५] ॥
पद-द्वयीं विश्व नुरेचि जेव्हां । जावें तुवां कीं नरकासि तेव्हां ॥ १५ ॥

करूनि संकल्प न दे द्विजा तो । प्राणी स्व-पापें नरकासि जातो ॥
आधींच नेदीं म्हणतां भला हो । वेसी झणीं वैखरिमात्र[६] लाहो ॥ १६ ॥

दु० वि०. जरि विचारुनि गोंविसि वैखरी । तरिच होइल जाण अगा खरी ॥
म्हणुनि शुक्र अजी बहु बोलतो । परि तयीं वदला बळि बोल[७] तो ॥ १७ ॥

भु० प्र०. विचारूनि[८] आचार्य-वाचा[९] निदानीं । बळी तो धरी बुद्धि सर्वस्व-दानीं ॥
म्हणे बोलतां जी जरी सत्य वाणी । द्विजां केविं वाचा वदों दैन्यवाणी ॥ १८ ॥

---

१ जास्त भूमि माग. २ तीन पावलें जागा दिली असतां ती त्रैलोक्याहूनही जास्त होईल, असा उत्तानार्थ व तीन पावलें मावण्याला त्रैलोक्यही पुरणार नाहीं, असा गर्भितार्थ. ३ नाहींसें. ४ हे दोन्ही शब्द एकच अर्थाचे आहेत—अशीं वामनाच्या कवितेंत पुष्कळ दुसरीं उदाहरणें आहेत. ५ 'पापा जाशील' म्ह० तुला पाप लागेल. ६ नाहीं तर मी देतों असें म्हणण्याचा मात्र लाभ घेशील, वस्तुतः तुझ्यानें म्हटल्याप्रमाणें करवणार नाहीं, हा भाव. ७ भाषण,—हें 'वदला' ह्याचें कर्म. ८ विचार करून. ९ दैत्यगुरु शुक्र त्याची वाणी.

मालिनी. निगम-विधि-विधानें[1] मांडुनी हे पसारे[2] ।
यजुनि विविधयागीं वंदिती ज्यासि सारे ॥
वर-द हरिच तो हा विप्र कोण्हीच हो जी ।
कितितरि मज मागो भूमि देतों अहो जी ॥ १९ ॥

इं० व०. सर्व-स्व-दानीं बळि सिद्ध झाला । पूज्यासनीं बैसवि त्या द्विजाला ॥
प्रक्षाळि त्या श्री-पद-पंकजांतें[3] । ध्याती रमा-अब्ज-भवादि[4] ज्यातें ॥२०॥

व० ति०. आली समीप यजमानिन पट्टराणी ।
पाहे हरीस जिचि हो न पुरे शिराणी ॥
ओती करें कनक-पात्र धरूनि वारी ।
सर्व-स्व दे पति तयास न जे निवारी ॥ २१ ॥

उ० जा०. करूनि संकल्प करांत पाणी । घालूं म्हणे पूजुनि चक्रपाणी ॥
निघे न झारींतुनि नीर-बिंदु । म्लानत्व पावे बळिचा मुखेंदू ॥ २२ ॥
कीं शुक्र झारींत रिघोनि गोळा । करूनि अंगें अजि होय बोळा ॥
फोडी हरी घालुनि दर्भ डोळा । दिसे जना विप्र-कुमार भोळा ॥ २३ ॥
ऐशा रिती पूजुनि दानवारी[5] । घाली करीं तें मग दान-वारी[6] ॥
म्हणे स्व-पादीं आजि भूमि मोजीं । जे अर्पिली; त्याचि पदा नमो[7] जी ॥२४॥

व० ति०. संकल्प-युक्त पडतां स्व-करांत पाणी ।
वाढे त्वरेंकरुनि वामन चक्रपाणी ॥
पाताळिं पाद-तळ, मस्तक सत्य-लोकीं ।
कर्णीं दिशा, दिन-मणी नयनावलोकीं ॥ २५ ॥

उ० जा०. एका पदें भूमि भरोनि थोडी । दुज्या पदें अंड-कटाह[8] फोडी ॥
दे तीसरा पाद म्हणे बळीला । म्हणोनि पाशीं दृढ आकळीला ॥ २६ ॥
याकारणें प्रार्थुनियां हरीची । करी स्तुती प्रेम-रसें विरिंची[9] ॥
प्रल्हाद आजा बळि भू-पतीचा । आला महा-भक्त रमा-पतीचा ॥ २७ ॥
म्हणे तुवां हे दिधली त्रि-लोकी । नेली तुवां पूर्ण-कृपावलोकीं ॥
केला तुवां दंड कृतार्थ झाला । प्रल्हाद इत्यादि वदे अ-जाला ॥ २८ ॥

---

१ वेदोक्तकर्ममार्गप्रमाणें. २ खटपटी. ३ वामनाच्या सुंदर चरणकमलांस. ४ लक्ष्मी, ब्रह्मा आदिकरून. ५ दानव + अरि (दानवांचा शत्रू वामन). ६ दानोदक. ७ नमस्कार असो. ८ कटाह म्ह० कढईसारखें अंड म्हणजे ब्रह्मांड. ९ ब्रह्मदेव.

उ० जा०. पत्नी बळीची जगदीश्वरातें । वंदोनि बोले कमळा-वरातें ॥
म्हणे धणी तूंचि चराचरांचा । वृथाऽभिमान प्रभुजी नरांचा ॥ २९ ॥
सर्वांचिया आइकतां स्तुतीतें । बोलावुनी त्याच महा-मतीतें[1] ॥
म्हणे बळी दे तिसऱ्या पदातें । कीं भोगिं पापें[2] बहु आपदांतें ॥ ३० ॥
करूनि संकल्प न देसि जेव्हां । जाशील राया नरकासि तेव्हां ॥
म्हणे बळी देईन देव-राया । आहें स्व-संकल्प खरा कराया ॥ ३१ ॥
तसा न भीं मी नरकासि देवा । या पाश-बंधासहि वासुदेवा ॥
न भीं सुरांच्या जय-वाद्य-नादा[3] । भीतों जसा मी अप-कीर्ति-वादा[4] ॥ ३२ ॥
करूनि संकल्पहि तूज देना । कोण्ही मला धन्य जगीं वदेना ॥
माझ्या शिरीं ठेव निजा पदातें । जें छेदितें सर्वहि आपदांतें ॥ ३३ ॥
द्रु० वि०. पद-युगें भुवन-त्रय मोजिलें । पद तिजें बळिचे शिरिं योजिलें ॥
पद-नखें विधि-अंड[5] विदारिलें । पद-तळेंचि जगत्त्रय तारिलें ॥ ३४ ॥
उ० जा०. करी बळी स्वात्म-निवेदनातें[6] । संतोष झाला मधु-सूदनातें[7] ॥
दैत्येंद्र तत्काळचि मुक्त केला । प्रेमामृताचा हरि हा भुकेला ॥ ३५ ॥

---

## वेंचे, भरतभावांतील.

राम वनांत जातांच त्यांच्या वियोगानें दशरथ मरण पावला. तेव्हां भरत आपल्या मामाच्या गांवीं होता, तेथून त्यास वसिष्ठऋषीनें आणविलें. तेव्हां राम वनवासास जाण्याला व दशरथ मरण्याला आपली आई कैकेयी हीच कारण झाली, असें भरतास समजतांच त्यास परम खेद झाला. बापाची क्रिया संपल्यावर तो रामाला वनांतून परत आणावें म्हणून त्याजकडे गेला; परंतु मी वनांत जावें व तूं राज्य चालवावें, अशी पित्याची आज्ञा आहे; ती आपण दोघांनींही उल्लंघूं नये, असें रामानें सांगून त्यास राज्याधिकार चालविण्यास परत पाठविलें. नंतर भरत रामाच्या पादुका घेऊन अयोध्येजवळ नंदिग्रामीं आला, हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे. ह्यांत भरताची रामचंद्राविषयीं अलौकिक भक्ति वर्णिली आहे, म्हणून ह्यास **भरतभाव** ही संज्ञा कवीनें योजिली आहे.

---

१ उदार आहे बुद्धि ज्याची अशा बळीतें. २ देतों असें म्हणून दिलें नाहीं ह्या पातकामुळें. ३ माझा पराजय झाल्यामुळें देवांनीं केलेल्या जयसूचक वाद्यनादास. ४ दुष्कीर्तीच्या भाषणाला. ५ ब्रह्मांड. ६ आपल्या चित्ताचें अर्पण. ७ मधुनामक दैत्याला मारणारा वामन त्याला.

द्रु० वि०. करुनि वंदन जानकि-नायका । भरत-भाव निरोपिन आयका ॥
जननि[1] टाकुनि राम-पदीं निघे । सुकृति तो; मति हे समजोनि घे ॥१॥

मालिनी. भरत जवळिं नाहीं मातुल-ग्राम-वासी[2] ।
भरत-जननि धाडी कानना राघवासी ॥
दशरथ मृत झाला राम जातां वियोगें ।
तृण बहुत दिसांचें अग्निच्या जेविं योगें ॥ २ ॥

मग भरत वसिष्ठें आणिला जों अयोध्ये ।
नगरि गत-धवा तों आणि निर्वीर्य योद्धे ॥
जन मृत-सम देखे हेतु कांहीं कळेना ।
जननिकृत कु-चेष्टा बुद्धितें आकळेना ॥ ३ ॥

उ०जा०. वृत्तांत सांगे भरतासि माय । स्वानंद जीचा त्रि-जगीं न माय ॥
भेदूनि वक्षःस्थल शब्द तीचा । करी महा-क्षोभ महा-मतीचा[3] ॥ ४ ॥

जाळील तीतें निज-दृष्टि-पातें । पाहे असा हालविनाच पातें ॥
म्हणे अवो पापिणि[4] पाप-रूपे[4] । जळो तुझें तोंड जड-स्वरूपे[5] ॥ ५ ॥

जाळीन हें तोंडचि जाण आधीं । मुखें जया देशि अनंत आधी ॥
न माय तूं वैरिण होसि साची । माझे मनीं भाव खरा असाची ॥ ६ ॥

केला तुवां देखत[6] भर्तृ-घात । क्षणें ति-वाटा रचिल्या तिघांत ॥
शत्रुघ्न[7] मी, लक्ष्मण राम, जोडे । राजा तिजा, तींस अनर्थ जोडे ॥ ७ ॥

भु० प्र०. वना धाडिलें जेधवां राम-राया । तुवां हेतु केला स्व-भर्ता मराया ॥
अहा, राम-सीता अशा दंपतीतें । वना धाडिलें, मारिलें कां पतीतें ॥ ८ ॥

---

१ 'जननि टाकुनि (जो) रामपदीं निघे तो सुकृति; हे मति समजोनि घे'—अत्यंत प्रिय जी आई तिलाहि सोडून देऊन जो ईश्वरास शरण जाऊन त्याची सेवा करितो तोच धन्य होय, असा उपदेश घे, असें वाचकांस कवि म्हणतो. २ मामाच्या गांवीं राहिलेला. ३ थोर अंतःकरणाचा जो भरत त्याचा. ४ हीं दोन विशेषणें देण्याचें तात्पर्य हें कीं, तुला नुसतें पापिणी म्हणजे पाप करणारी असें म्हणणें शोभत नाहीं, तर तूं पापरूप म्हणजें साक्षात् पापाची मूर्तिच आहेस. ५ जड म्हणजे पाषाणादि त्याप्रमाणें आहे स्वरूप जिचें म्हणजे जिला अंतःकरणच नाहीं असा भावार्थ. ६ पाहतां पाहतां. ७ शत्रुघ्न (व) मी आणि लक्ष्मण ( व ) राम ( हे दोन ) जोडे, ( आणि ) तिजा राजा. ( ह्या तीन वाटा ) तिवाटा तिघांत रचिल्या, आणि तींस ( तिघांस ) अनर्थ जोडे असा अन्वय.

मालिनी. न कळत पतिताचें खादलें अन्न वोकी ।
तरि पतित नव्हे तो पाप-रूपे अवो कीं ॥
म्हणुनि उदरिं तूझ्या देह हा जन्मला गे ।
त्यजिन तरि मला हें पाप तूझें न लागे ॥ ९ ॥

व० ति०. हे[1] अग्नि-तापित-घृतांत तनू[1] जळेना ।
प्रत्यक्ष तो कधिंहि पावक आतळेना ॥
रामापराधिनि-सुतास[2] शिवेल कां जी ।
घे ब्राह्मणोत्तम न अंत्यज-पात्र-कांजी[3] ॥ १० ॥

मारील सद्य मज खाइन त्या विखातें ।
कीं पापियास निज-पातक जेविं खातें ॥
तूं पापिणी त्वरित जाशिल रौरवासी[4] ।
होसी सदा निरय-दारुण-लोक-वासी[5] ॥ ११ ॥

घनाक्षरी. अवो कैकेयी हें काय । केलें तुवां हाय हाय ॥
न म्हणवे तुज माय । जन्मोजन्मीं वैरिणी ॥ १ ॥

सर्व-जगदभिराम[6] । वना धाडिला तो राम ॥
केलें विख्यात कु-नाम । कीं हे पति-मारिणी ॥ २ ॥

तुझ्या वधें न अ-धर्म । तूज मारावें हा धर्म ॥
परि निंदील हें कर्म । राम पाप-कारिणी ॥ ३ ॥

नाहींतरी प्राण आज्य । तुझे घालूनियां प्राज्य ॥
जाळूनियां साम-राज्य[7] । दाखवितों करणी ॥ ४ ॥ १२ ॥

शालिनी. धिक्कारूनी गोष्टि मातेसि सांगे । कौसल्येच्या ये गृहा सानु-रागें[8] ॥
त्यातें देखे जेधवां राम-माय । श्रीरामाचा शोक लोकीं न माय ॥ १३ ॥

रथो०. मोकळा करुनि कंठ तेधवां । आठवूनि मनिं जानकी-धवा ॥
ते रडे भरतही तसा रडे । जोंवरी नयन होति कोरडे ॥ १४ ॥

---

१ हे तनू म्ह० हें माझें शरीर. २ येथें संस्कृत नियमाप्रमाणें 'नी' दीर्घ असावी. ३ अतिशूद्राच्या भांड्यांतील पेज. ४ एक प्रकारच्या नरकाला. ५ नरक. ६ संपूर्ण जगतामध्यें सुंदर. ७ साम्राज्य ( सार्वभौमराज्य ). ८ आवडीनें.

भु० प्र०. म्हणे वासरा घात झाला असा रे । तुझ्या माउलीचेच हे खेळ सारे ॥
वृथा धाडिला राम माझा वनासी । न देखों[1] शके[1] त्या जगज्जीवनासी ॥१५॥

अरे राघवें व्यापिले लोक सारे । तरी नावरे शोक माझा कसा रे ॥
तृषाक्रांत डोळे घन-श्याम रामा । पहायास रे सर्व-लोकाभिरामा ॥ १६ ॥

स्वागता. जानकी जनक-राजकुमारी । पाय कोमळ जिचे, सुकुमारी ॥
चालली जसि[2] वना अनवाणी । बोलली कटकटा जन-वाणी ॥ १७ ॥

सून सूनुहि वनाप्रति जाती । आणि जो जित असेल कु-जाती ॥
मानवी तनु पशूंत गणावी । ते शिळा परि स-जीव म्हणावी ॥ १८ ॥

द्रु० वि०. भरत शोक अनेक तिचे असे । परिसतां मग बोलत तो असे ॥
जननि गोष्टि समस्तहि हे खरी । परिस येविषयीं मम वैखरी ॥ १९ ॥

उ० जा०. मी ब्रह्म-हत्या-शत-पाप लाहें । ठावें असे लेश जरी मला हें ॥
खड्गें वसिष्ठासि अरुंधतीतें । वधीं जरी ठाउक हें मतीतें ॥ २० ॥

भु० प्र०. म्हणे राम-माता अरे वासरा मी । तुझा जाणतें प्रेम-उल्हास[3] रामीं ॥
तुला राम-सेवेविणें काम नाहीं । न राज्यादिकांची जया कामनाही ॥ २१ ॥

स्वागता. तों वसिष्ठ वदला भरतातें । राम-पाद-निज-लाभ-रतातें[4] ॥
पाळिं यावरि समस्त धरा हे । राज-नीति करिं, सावध राहें ॥ २२ ॥

व० ति०. रायें तुतेंचि दिधलें स्व-नृपासना रे ।
संपूर्ण तूं जननिची करिं वासना रे ॥
शब्दार्थ हे न कळती[5] गुरु-लाघवाचे ।
साचे म्हणूनि पद आठवि राघवाचे ॥ २३ ॥

घनाक्षरी. म्हणे भरत हा राम । त्राहे[6] त्राहे मेघ-श्याम ॥
वसिष्ठ हा गुरु नाम[7] । तोही मज कोपला ॥ १ ॥

---

१ ह्याचा 'ती' हा अध्याहृत कर्ता. २ जेव्हां. ३ प्रेमभर. ४ रामाच्या चरणाची आपणाला प्राप्ति करून घेण्याविषयीं उत्सुक. ५ भरताची फक्त परीक्षा पाहण्यासाठीं राज्य कर वगैरे जे वसिष्ठ फार खुबीचे शब्द बोलला त्यांचा उत्तानार्थच खरा मानून गुरुही असें बोलतो, असें पाहून भरतास फार दुःख झालें व त्यानें रामाचें स्मरण केलें. ६ त्राहि-तार. ७ उघड किंवा निंदा ह्या अर्थी हें अव्यय आहे.

अंतरले तुझे पाय । तया राज्याचे उपाय ॥
सांगे मज हाय हाय । नव्हे गुरु आपला ॥ २ ॥
अग्नि-तुल्य वाटे राज्य । मज जाळिल साम-राज्य ॥
वरी ऋषी घाली आज्य । त्याणें जीव तापला ॥ ३ ॥
दावीं सत्वर चरण । किंवा स्वामी दे मरण ॥
तुझ्या नामाचें स्मरण । त्याचा भव संपला ॥ ४ ॥ २४ ॥

उ० जा०. स्मरोनि ऐसें रघु-नंदनातें । त्या राववाच्या पद-वंदनातें ॥
जावें असा भाव धरूनि साच । बोले वसिष्ठाप्रतिही तसाच ॥ २५ ॥

व० ति०. राजाधिराज रघु-राजचि एक जाणा ।
पाहों चला सकळ जाउनि त्या सु-जाणा ॥
आम्ही समस्त जन किंकर राघवाचे ।
जे राम-नाम जपतों अजि नित्य वाचे ॥ २६ ॥

भु० प्र०. विना राक्षसी-कैकयी काननातें । चला सर्व पाहूं मृगांकाननातें[1] ॥
प्रयत्नेंचि घेऊनि येऊं गृहातें । न येतां समर्पूं शरीरें स्व-हातें ॥ २७ ॥

इंद्रवज्रा. येणार ते या अथवा नकाही । राहेन मी हें न घडेचि कांहीं ॥
बोलोनियां स्पष्टचि चालिला हो । शोकांतही घे प्रभु-नाम-लाहो ॥ २८ ॥

उ० जा०. हा राम हा राम असेंचि वाचे[2] । चित्तांत[3] पाय प्रभुराघवाचे ॥
त्यजी कुलाचार्यहि राम-वाटे[4] । कीं तो गुरू त्यास गुरु न वाटे ॥ २९ ॥

इंद्रवज्रा. येणार ते या अथवा नकाही । शब्दांत या अर्थ स-खोल कांहीं ॥
कीं जो गुरू अंतर राम-पायीं । पाडी, त्यजावा गुरु तो उपायीं ॥ ३० ॥

उ० जा०. श्री-रामही टाकुनि राज्य मातें । जो घे म्हणे त्या ऋषि-सत्तमातें ॥
गुरुत्व कैचें, तरि मी उपेक्षा । करीन, त्याची न मला अपेक्षा ॥ ३१ ॥

इं० व०. याकारणें या अथवा नकाही । राहेन मी हें न घडेचि कांहीं ॥
ऐशी उपेक्षा वदनीं वदे तो । श्लोकांत हा व्यासहि भाव देतो ॥ ३२ ॥

उ० जा०. नाहींतरी[5] या अथवा नकाही । गुरूस बोलेल घडेल कांहीं ? ॥
रामानिमित्तें गुरुही त्यजावा । वाक्यांत भावार्थ असा भजावा[6] ॥ ३३ ॥

---

१ मृगाचें—हरिणाचें चिन्ह ज्याला आहे तो मृगांक म्हणजे चंद्र त्यासारखें आहे मुख ज्याचें त्याला. २ प्राणत्याग करूं हा भाव. ३ म्हणे व स्मरे अशीं अध्याहृत क्रियापदें घ्यावीं. ४ रामाकडे जाण्याकरितां. ५ रामाकडे जाऊं नको व राज्य कर असें म्हणणारा गुरुच नव्हे असा भरताचा भाव; असें नसतें तर ‘ या अथवा नका ’ तो गुरूस बोलेल असें घडेल काय? ६ घ्यावा.

इं० व०. रामानिमित्तें जननीस टाकी । पाणी न पी राज्य-नदी-तटाकीं ॥
लंघूनियांही गुरु-संगतीतें । पावे अहो दे गुरु ज्या गतीतें ॥ ३४ ॥

द्रु० वि०. गुरुविणें न घडे परमा गती । गति शुकादि गुरूसचि मागती ॥
परि गुरू करि अंतर राघवीं । न गुरु तो ठक दांभिक लाघवी[१] ॥ ३५ ॥

उ०जा०. तो बाप जो राघव-भक्ति दावी । तसीच जे मायहि ते वदावी ॥
जो राम दावी गुरु तोचि साच । श्रुत्यर्थ-इत्यर्थ[२] असे असाच ॥ ३६ ॥
वसिष्ट घे राज्य म्हणेचि साच । परंतु भावार्थ नव्हे तसाच ॥
त्याच्या परीक्षार्थचि बोलिला हो । त्याहूनि[३] आधीं मुनि चालिला हो ॥३७॥
आज्ञा गुरूची अवघे करीती । सच्छिष्य ते लोक-अ-लोक-रीती[४] ॥
परंतु त्याच्या[५] वचनें तयातें । न टाकिती सत्पद-दातयातें ॥ ३८ ॥

स्वागता. राम न त्यजि[६] तईंच गुरूतें । न त्यजि स्व-सुख-कल्प-तरूतें ॥
जो असें वचनही न मनीतो । श्री-गुरू-नमर्नि हीन मनीं तो ॥ ३९ ॥

उ०जा०. म्हणे परीक्षार्थचि टाकिं मातें । तसा म्हणे टाकिं रघूत्तमातें ॥
उल्लंघितां शब्दचि इष्ट वाटे । म्हणोनि लागे ऋषि-वर्य वाटे ॥ ४०॥

द्रु० वि०. प्रकरणीं पुढल्या गुरु-राज तो । भरत-संगतिनेंच विराजतो ॥
जरि पथीं गुरु होय समागमीं । तरिच राम मिळे निगमागमीं ॥ ४१ ॥

उ०जा०. वसिष्ठ, तो[७] आणि समस्त माया[८] । रामार्थ टाकूनि समग्र माया ॥
सेना प्रजा सर्वहि त्याच वेळे । जाती, जसे लंघिति सिंधु[९] वेळे[९] ॥ ४२ ॥

व० ति०. पायीं निघे भरत सानुज राम-वाटे ।
रामाविणें इतर इष्ट न काम वाटे ॥
माथां जटामुकुट, वल्कल नेसला हो ।
श्री-राम-वेष, वदनीं प्रभु-नाम-लाहो ॥ ४३ ॥

स्वागता. राम-वल्कल-जटादिक-रीती । वेष तो उभय बंधु करीती ॥
राम सानुज तसें भरतातें । देखती सकळ राम-रतातें ॥ ४४ ॥

---

१ कावेबाज. २ तात्पर्यार्थ. ३ भरताच्या अगोदर. ४ लोकरीतीस अनुसरून असो अथवा नसो. ५ तथापि गुरूनें आपला त्याग करावयास सांगितलें तरी तो सत्पददाता म्हणजे परमेश्वरप्राप्ति करून देणारा आहे, म्हणून सच्छिष्य त्याला टाकीत नाहींत. असें असतां भरतानें गुरूचा त्याग केला, ह्याचें खरें तात्पर्य पुढील श्लोकांत कवीनें स्पष्ट केलें आहे. ६ ह्याचा कर्ता सच्छिष्य (अध्याहृत). ७ भरत. ८ भरताच्या आया. ९ समुद्र जसा वेळेला म्हणजे मर्यादेला सोडतो तसे सर्व लोक अयोध्या सोडून रामाकडे गेले.

व० ति०. तों भेटला गुहक-नाम किरात वाटे ।
श्री-राम-भक्त परमात तयास वाटे ॥
गंगा-तटीं रघुपती-शयनास[1] दावी ।
ते भक्ति काय म्हणुनी मुखिं वो वदावी ॥ ४५ ॥

स्वागता. दर्भ-निर्मित तया शयनातें । देखतां उदक ये नयनातें ॥
भू-तळीं भरत घालुनि घे हो । त्या स्थळींहुनि न चित्त निघे हो ॥ ४६ ॥
राम-वृत्त रघुवंश-वरातें । सर्व वर्णुनि गुहाख्यकिरातें ॥
लंघुनी सुर-नदी[2] भरतातें । ने स-सैन्य रघु-राज-रतातें ॥ ४७ ॥

उ०जा०. ब्रह्मा रमा वंदिति नित्य ज्यातें । त्या राघवाच्या चरणांबुजातें ॥
पाहूं त्वरें हे भरता असोसी[3] । वियोग तों प्राण-वियोग सोसी ॥ ४८ ॥

शालिनी. कैकेयीच्या दुष्ट-भावें जळाला । इच्छी रामाच्या पदाच्या जळाला ॥
तों स्वामीच्या देखिलें आश्रमातें । कांहीं चित्तें टाकिलें हो श्रमातें ॥ ४९ ॥

स्वागता. पाद-चिन्हित तये वसुधेतें । देखतां तृषित जेविं सुधेतें ॥
रामचंद्र-पद-सारस-मुद्रा[4] । वाढवी भरत-सौख्य-समुद्रा ॥ ५० ॥

व० ति०. घालूनि घे भरत देखुनि त्या रजातें ।
शत्रुघ्नही अनुसरोनि निजाग्रजातें ॥
चित्तीं स्मरे प्रभुचिया पद-नीरजातें ।
प्रेम-प्रवाह नयनीं सुख-नीर[5] ज्या[6] तें ॥ ५१ ॥

द्रु० वि०. तनुवरी[7] गुढियाच[7] उभारती[7] । कवि-मुखें किति वर्णिल भारती ॥
भरत ये रितिनें अजि लोळला । प्रभु-पदाब्ज-रजीं[8] बहु घोळला ॥ ५२ ॥

व० ति०. हा राम राम रघु-नंदन हेंचि वाचे ।
चित्तांत ते चरण दीसति राघवाचे ॥
ते रेणु हे मुकुट-मंडण[9] जे शिवाचे ।
ऐसें म्हणे त्यजुनि भाव[10] अहो जिवाचे ॥ ५३ ॥

मालिनी. भरत पद-रजीं त्या घोळला दीर्घकाळ ।
त्रि-भुवनिंहि सुखाचा होय तेव्हां सुकाळ ॥

---

१ रामाच्या आंथरुणास. येथें छंदाकरितां "ती" दीर्घ केली आहे. २ भागीरथी. ३ हव्यास; अति इच्छा. ४ रामाच्या पदकमलाचा ठसा. ५ आनंदाश्रु. ६ ज्या भरताच्या. ७ शरिरावर आनंदानें रोमांच उभे राहिले. ८ रामाच्या पदकमलांच्या धुळींत. ९ मुकुटास शोभविणारे. १० जिवाचे भाव त्यजुनि म्हणजे देहभान सोडून.

न मिळति पद-रेणू जे विरिंच्यादिकांही ।
सु-लभ मज म्हणे हें भाग्य माझेंचि कांहीं ॥ ५४ ॥

व० ति. देखोनि राघव-पदाब्ज-रजास वाटे ।
लोटांगणीं गडबडे सुख फार वाटे ॥
आनंद-नीर हृदयीं नयनांबुजांचें ।
चित्तांत राम शिव घे पद-अंबु ज्याचें[१] ॥ ५५ ॥

स्वागता. वाम-अंक-गत[२] भूमि-कुमारी[३] । वाम-बाहु-सु-रता[४] सु-कुमारी ॥
वल्कलांबर-जटा-अभिरामा । देखतो भरत त्या रघु-रामा ॥ ५६ ॥

इं० व०. दूर्वा-दल-श्यामल दीप्ति देहीं । सेवी पदें लक्ष्मण तो वि-देही[५] ॥
गंगा-तटीं सेवित मंद-वातें । देखे अशा श्री-रघु-पुंगवातें ॥ ५७ ॥

उ०जा०. देखोनि ऐसें रघु-नंदनातें । धांवे त्वरेनें पद-वंदनातें ॥
अ-लभ्य जो हर्ष सुरादिकांही । तो होय, त्यामाजिच शोक कांहीं ॥ ५८ ॥

भु० प्र०. रडे, फुंदफुंदे, शिरीं पाद-पद्मा । धरी, सद्म मानी जया नित्य पद्मा ॥
बळें क्षेम[६] दे त्यासि वोढूनि राम । स्व-भक्त-प्रिय स्वामि विश्वाभिराम॥५९॥

स्वागता. मांडियेउपरि बैसविला हो । अश्रु-नीर पुसि, दे सुख-लाहो ॥
वासरा न रड, सांग सु-वार्ता । शब्द हा निववि दुःखदवार्ता[७] ॥ ६० ॥

व० ति०. तों देखिला गुरु वसिष्ठ तयासि वंदी ।
ब्रह्मण्य देव जडला चरणारविंदीं ॥
तों माउल्या तिघिहि सत्वर पावल्या हो ।
भेटोनियां तिघिहि सत्वर सेविल्या हो ॥ ६१ ॥

उ० व०. पिता सुखी कीं म्हणतांचि रामा[८] । रडोनि त्या सांगति सूपरामा[९] ॥
रडे अहो रामहि लोक-रीती । स्त्रिया पुन्हा शोक महा करीती ॥ ६२ ॥

भु० प्र०. सपिंडी-क्रिया राम गंगा-तटाकीं । करी, आणि ते पिंड गंगेंत टाकी ॥
रडे लोक-दृष्टीस शोक-श्रमातें । प्रभू दाउनी ये पुन्हा आश्रमातें ॥ ६३ ॥

स्वागता. तों वदे भरत गोष्टि मनाची । प्रार्थना बहुत आगमनाची ॥
मांडिली, परि न राघव मानी । देखतां सुर-वरांस[१०] विमानीं॥ ६४ ॥

---

१ ज्या रामाचें. २ डाव्या मांडीवर बसलेली. ३ सीता. ४ रामाच्या डाव्या हातास लागून बसलेली. ५ वैराग्ययुक्त. ६ आलिंगन देता झाला. ७ दुःखरूप वणव्यानें पिडलेल्या भरतास. ८ बायका. ९ मरणाला ( सु+उपराम म्ह० उत्तम मरण ). १० देवकार्यासाठीं राम वनांत जाण्याला निघाला होता, म्हणून परत गेल्यानें तें सिद्धीस जाणार नाहीं ह्याचें स्मरण देवांना आकाशांत पाहून रामाला झालें म्हणून त्यानें भरताचें म्हणणें मान्य केलें नाहीं, असा भाव.

द्रु० वि०. म्हणि फिरे स्व-पुरीप्रति राम हा। म्हणुनि आधि मनीं अमरां महा ॥
भरत-शब्द तदर्थ न ये मना । पुरवणें प्रभुला सुर-कामना ॥ ६५ ॥

उ० जा०. आज्ञा पित्याची मज मोडवेना । वत्सा तुझी गोष्टहि तोडवेना ॥
वाळूं नको बा मज संकटांत । नको पडों या सहसा हटांत[1] ॥ ६६ ॥

भु० प्र०. असी आयके जेधवां राम-वाणी । मुखश्री करी बंधु तो दीनवाणी ॥
म्हणे तात-आज्ञा मृगांकानना रे । मला सांग जाईन मी कानना रे ॥ ६७ ॥

शालिनी. बापा ऐसें वर्ततां तों विशेषें । आज्ञा-भंग प्राप्त दोवां अशेषें[2] ॥
एवं[3] राज्यातें तुवां रे भजावें । तातज्ञेनें कानना म्यांच जावें ॥ ६८ ॥

व० ति०. येना असें भरत देखुनि राम-राया ।
गंगातटीं रचुनि दर्भ बसे मराया ॥
पाहे वसिष्ठ-मुनि-वक्त्र-सरोरुहातें ।
श्रीराम, आणि खुण दाखवि हो स्व-हातें ॥ ६९ ॥

कीं सांग गुह्य अवतार-चरित्र याला ।
जें तारितें चहुं युगांत जगत्त्रयाला ॥
बोले वसिष्ठ मग सन्निध जाउनीयां ।
कां प्राण टाकिसि म्हणे समजावुनीयां ॥ ७० ॥

उ० जा०. हा राम मारील दशाननासी । यालागिं जातो प्रभु काननासी ॥
नको निवारूं भरता तयाला । ब्रह्मादिकांच्या पद-दातयाला ॥ ७१ ॥

व० ति०. येणार मागुति चतुर्दश वत्सरांतीं ।
राहो वनांत तितुके दिन आणि राती ॥
आत्माच[4] तो तुज वियोग तयासि नाहीं ।
येऊनि हे करिल जे तव कामनाही ॥ ७२ ॥

हें आयकोनि जरि शोकहि दूर केला ।
प्रत्यक्ष दर्शन-सुखास बहू भुकेला ॥
तेव्हां उठोनि भरतें पद-वंदनातें ।
केलें, दुरूनि म्हणतो रघु-नंदनातें ॥ ७३ ॥

देखोनियां गमन-निग्रह राघवाचा ।
बोले उभा भरत निश्चय-रूप वाचा ॥
वर्षे चतुर्दशवरीच धरीन देहा ।
त्यानंतरें त्यजिन यास निरोप दे हा ॥ ७४ ॥

---

१ आग्रहांत. २ सर्व प्रकारें. ३ म्हणून. ४ सर्वव्यापक ईश्वर.

व० ति०. वर्षें द्वि-सप्तभरि[१] काल समाप्त झाला ।
त्यानंतरें अजि तुझ्या चरणांबुजाला ॥
स्पर्शे शिरें न जरि देह, तयाच वारीं ।
यातें त्यजीनचि विरिंचि जरी निवारी ॥ ७५ ॥

वर्षें चतुर्दशहि रक्षिन शासनातें ।
अंगीकरीन न बसेन नृपासनातें ॥
सिंहासनावरि तुझ्या पद-पादुका मी ।
पूजीन तों तव पदांबुज-लाभ-कामी ॥ ७६ ॥

स्वागता. पादुका जडित[२] आणुनि हातें । रामचंद्र-चरणांबु-रुहांतें ॥
लावुनी निज-शिरीं भरतानें । वंदिल्या रघुवरांघ्रि-रतानें[३] ॥ ७७ ॥

मालिनी. भरत-जननि जागी होय राम-प्रतापें ।
विकळ[४] रघुपतीच्या द्रोह-पापानुतापें[५] ॥
रडत म्हणतसे मी पापिणी राम-राया ।
न धरिन तनु, आज्ञा ये स्थळीं दे मराया ॥ ७८ ॥

रघुपति तिस बोले टाकि हा शोक माते ।
इतुकिहि मम माया जींत हे सृष्टि माते[६]॥
सकळहि सुर-कार्या म्यांच हे हेतु केले ।
अमर दश-मुखाच्या मृत्युतें वो भुकेले ॥ ७९ ॥

शिख०. झणी वो कैकेयी बुडविशिल शोकांत हृदया ।
तुझी माझे ठायीं सु-मति भरताहूनि सु-दया ॥
तुतें मी कौसल्येहुनि अधिक माते समजतों ।
तुवां ऐसें[७] केलें म्हणउनि न वाटेचि मज तों ॥ ८० ॥

द्रु० वि०. करुनि मागुति बुद्धि सकोमला । क्षणभरी विसरोंच नको मला ॥
तरि असा न पडे भ्रम मागुती । जिताचि पावसि हो परमा[८] गती[८]॥ ८१ ॥

---

१ चौदा. २ रत्नखचित. ३ रघुकुळांत श्रेष्ठ जो राम त्याच्या चरणीं आसक्त अशा. ४ दुःखी. ५ रामाच्या द्वेषाच्या पापापासून झालेल्या पश्चात्तापानें. ६ सामावे. ७ असें. ८ मुक्ति.

## नृसिंहावतार

हिरण्यकशिपूचा मुलगा प्रऱ्हाद हा बाळपणापासून भगवद्भक्त होता. ज्यानें आपला सख्खा भाऊ हिरण्याक्ष ह्यास मारिलें त्या नारायणाचें भजन करूं नको असें बापानें त्यास पुष्कळ वेळां सांगितलें; तरी तो तें सोडीना, म्हणून त्यास नानाप्रकारचे जाचही केले; परंतु तें सर्व फुकट गेलें. शेवटीं ज्या देवाचें तूं नामस्मरण करतोस तो आहे तरी कोठें, असें प्रऱ्हादास विचारतां त्यानें सर्व ठिकाणीं देव आहे असें सांगितलें. यावर आपल्या सभेंतील एका स्तंभाकडे बोट दाखवून यांतही तुझा देव आहे काय, असा बापानें त्यास प्रश्न केला. प्रऱ्हादानें होय म्हणून म्हणतांच हिरण्यकशिपूनें हातांत तरवार घेऊन त्या खांबावर मारिली; तत्क्षणींच जिचें तोंड सिंहाचें व बाकीचें शरीर मनुष्याचें अशी नृसिंहमूर्ति प्रगट होऊन तिनें त्याचा वध केला; ही कथा या आख्यानांत आहे.

मालिनी.

हरि नरहरि-रूपें क्रूर दैत्यां समस्तां[१]।
परम सु-लभ शांत श्री-कर स्वात्म-भक्तां ॥
स्व-चरण-शरणातें सौम्यही शीघ्र तो कीं।
जननि-भय मनीं कां मानिजे व्याघ्र-तोकीं[२] ॥ १ ॥

जय-विजय असे ते जावळे दो दितीचे[३]।
असुर इतर जाले पुत्र-पौत्रादि तीचे ॥
प्रथमचि उपजे तो धाकुटा बंधु होतो।
धरणि-धर-वराहें मारिला दैत्य हो तो ॥ २ ॥

भु० प्र०. बुडे क्ष्मा[४] तयीं उद्धरी जो क्षमेला[४]। तया क्रोड-रूपें[५] हिरण्याक्ष मेला ॥
तया दूसरा ज्येष्ठ त्या अग्रजाला। मनीं क्रोध अत्युग्र उत्पन्न जाला ॥ ३ ॥

---

१ पाठभेद—विभक्ता. २ वाघाच्या मुलांनीं. ३ (जसे) दितीचे इतर पुत्रपौत्रादि असुर जाले; असे जयविजय (ही) तीचे दो (दोन) जावळे (असुर जाले). एकदा ब्रह्मदेवाचे पुत्र सनकादिक वैकुंठास गेले असतां विष्णूचे द्वारपाळ जयविजय ह्यांनीं त्यांस आंत जाण्यास अटकाव केला. त्यामुळें त्यांस कोप येऊन त्यांनीं तुमचें देवत्व जाऊन तुम्हांस असुरयोनि प्राप्त होऊन तुमच्या हातून अतिनिंद्य कर्में घडतील, असा जयविजयांस शाप दिला; पण पुन्हा त्यांस दया येऊन ते म्हणाले कीं, तुम्ही तीन वेळ असुरयोनि पावून नंतर पुनः पूर्वपदाप्रत याल. त्याप्रमाणें जयविजय हे अनुक्रमानें हिरण्यकशिपु व हिरण्याक्ष; रावण व कुंभकर्ण; आणि शिशुपाळ व दंतवक्र असे तीन जन्म राक्षस झाले, अशी कथा आहे. (भागवत स्कं० ७, अ० १). ४ पृथ्वी. ५ वराहरूपानें.

स्वागता. तो हिरण्यकशिपु प्रिय भावा- । कारणें निज तमोगुणभावा[१] ॥
दाखवी त्वरित ठोकुनि मांडी । द्वेष विष्णु-चरणांप्रति मांडी ॥ ४ ॥

मालिनी. अ-जर अ-मर काया आपली तो कराया ।
तप करि वर मागे धातया लोक-राया ॥
न मृति मज म्हणे हो चेतनाचेतनांहीं ।
मरण हरि असें दे दीस-रातींत नाहीं ॥ ५ ॥

स्वागता. त्या वरें अमर-मानव-लोकीं । स्वामि तोचि फळ हें अवलोकी ॥
देव-वृंद अवघाच पळाला । भीति सर्वहि तया चपळाला ॥ ६ ॥

इ० व०. ते देवही प्रार्थिति देव-देवा । कीं आपुलें[२] घे पद देव देवा[२] ॥
झाली बहू बुद्धि अ-धीरवाणी । तों बोलली हो अ-शरीरवाणी ॥ ७ ॥
कीं हा तपें तोषुनि[३] अब्जजाला । त्याच्या वरें सर्व-अवध्य झाला ॥
तथापि मारीनचि दुर्धरा या । गांजील माझ्या जयिं भक्त-राया ॥ ८ ॥
प्रऱ्हाद त्याचा सुत त्या कुमारीं । वडे जयीं द्वेष मुकुंद मारी ॥
केव्हां असें होइल ही असोशी । दुःखें बहू तो सुर-वृंद सोशी ॥ ९ ॥
ऐसी प्रतीक्षा हृदयांत देवां । तों दैत्य त्या भागवता सदैवा[४] ॥
पुरोहिताच्या सदनींच ठेवी । ते शीकवीती अति नीच ठेवी[५] ॥१०॥
एके दिनीं घे सुत दैत्य अंकीं । तो स्नेह त्याचा गणवे न अंकीं ॥
पुसे तया भागवतोत्तमातें । कीं आवडे जें तुज सांग मातें ॥११॥
प्रऱ्हाद बोले सदन त्यजावें । तपोवनालागिं अगत्य जावें ॥
तेथें भजावें हरिच्या पदातें । जो आपदांतें हरि, दे पदातें ॥१२॥
दैत्येश्वरा आवडि हेचि मातें । कीं सेवणें श्री-पुरुषोत्तमातें ॥
त्यजूनि विष्णूस भजे गृहातें ॥ तो आपला नाश करी, स्व-हातें ॥१३॥
दुःखार्णवीं जो धरि कास याची । चिंता तयाला मग कासयाची ॥
न वीसरावेंचि कदापि त्याला । प्रऱ्हाद इत्यादि वदे पित्याला ॥१४॥

द्रु० वि०. परिसतां असुरेश्वर हांसिला । मग म्हणे कवणें शिशु नासिला ॥
शिकविलें बरवें अथवा जसें । वदति तेंचि मुलें असिं राजसें ॥१५॥

---

१ क्रोधास. २ कीं, (हे) देव, आपुलें (आमचें) पद (हिरण्यकशिपु) घे (तें) देवा (देववां). ३ तोषवून. ४ सदैव, नेहमीं. ५ रीति.

भु० प्र०. म्हणे हा करावा गुरूनें विचार। स्वयें ठाउके लेंकुरा काय चार[1] ॥
हरी आमुच्या वाइटाचा भुकेला। तयाच्या जनीं हा कुळीं भेद केला ॥१६॥
गुरूतें असें दैत्य सांगोनि धाडी। तयां गोष्टि हे वाटली देव-धाडी॥
भिऊनी मनीं तर्क नाना करीती। तया पूसती विप्र सामादि-रीती ॥१७॥

शिख०. अरे हें प्रऱ्हादा गुरु पुसति कोठून शिकसी।
कसी होती प्रज्ञा त्यजुनि तिस तूं स्वैर ठकसी ॥
स्वयें तूझ्या पोटामधिल अथवा बुद्धि-उकळी।
कळी हृत्पद्माची उगवलि कशी घेउनि कळी[2] ॥ १८ ॥

म्हणे श्री-प्रऱ्हाद स्व-पर म्हणजे भ्रांति-उकळी।
कळी ईर्ष्यामूळें असुर-अमरीं आणि सकळीं ॥
कळी हृत्पद्माची उकलिल कसी मोह-रजनी।
जनीं ऐशा मूढीं मति न धरितां विष्णु-भजनी ॥ १९ ॥

मालिनी. स्व-पर म्हणुनि ज्याची मोहिते स्वैर माया।
स्व-वश करि तिला जो षड्गुणत्वीं[3] रमाया ॥
नमिन मि भगवंता जो तुम्हां आकळेना।
स्व-पर-कुमति-भेदें तोचि आत्मा कळेना ॥ २० ॥

शिख०. शिळा-चुंबी[4] लोह भ्रमवि तिज येतांचि जवळी।
वळी तैशी माझी मतिहि हरि ते त्यास कवळी ॥
वळी[5] पोथ्यांच्या ह्या तुम्हि असुर-रीती शिकवितां।
वितां व्यर्थें काव्यें अ-लवण हरीवीण कविता ॥ २१ ॥

इं० व०. प्रऱ्हाद बोलोनि असें द्विजांला। जाला उगा ध्यात अधोक्षजाला ॥
पुढें न बोलेचि पुरोहितातें। तातें दिला धाडुनि जो हितातें ॥२२॥
तों बुद्धि कोपें खवळे द्विजांची। जाची म्हणे टाकि कथा अजाची ॥
बाभूळ हे चंदन-काननाशी। नाशील भेटूनि निरंजनाशी[6] ॥२३॥
प्रऱ्हाद हा विष्णु-कुठार-दंड। दंड-प्रसंगीं असुरां उदंड ॥
दैत्यांचिया चंदन-काननाशी। नाशील भेटूनि निरंजनाशी ॥२४॥

१ चाळे, चेष्टा. २ कलह. ३ ऐश्वर्य (आधिपत्य), धर्म, यश, श्री, ज्ञान, वैराग्य, हे ईश्वराच्या अंगचे सहा गुण ह्यांमध्यें. ४ चुंबी (चुंबन करणारी) + शिळा = लोहचुंबक. ५ ओळी. ६ निरुपाधिक चैतन्य जो विष्णु त्यास.

भु० प्र०. भविष्यानुरूपें वदे विप्र-वाणी । नसे तर्जना-भर्जनालागिं[1] वाणी[2] ॥
असे दंड दुःशब्द-दंडें करीती । पुन्हा शीकवीती तया लोक-रीती ॥२५॥

इं० व०. बापासि तों भेटवितां, सुतातें । तातें निजांकावरि सु-व्रतातें ॥
घेतां सुखाची न दिसेचि वाणी । वाणी वदे मानस-मंजुवाणी[3] ॥२६॥

व० ति०. बा शीकलासि गुरुपासुनि जो पसारा ।
सारा असो, तुज रुचे वद त्याच सारा ॥
गोष्टी वदे कुशल त्यावरि ज्या पित्याला ।
त्या लागतील मधुरा न कदापि त्याला ॥ २७ ॥

मालिनी. श्रवण[4] हरिकथेचें, कीर्तनीं गात जावें ।
स्मरण चरण-सेवा अर्चनींही भजावें ॥
नमन करुनि दास्यें सख्य आत्मार्पणातें ।
करिति तरति, वाटे सार हें आपणातें ॥ २८ ॥

पृथ्वी. हिरण्य-कशिपु स्वयें परिसतां असी वैखरी ।
म्हणे गुरुस[5] तो तुझी कपट-मित्रता हे खरी ॥
पुरोहित म्हणे न मी न जन अन्य हा भाव दे ।
अजी सहज बुद्धि हे तव कुमार जें जें वदे ॥ २९ ॥

द्रु० वि०. गुरु-मुखें न अरे जरि शीकसी । कु-मति उद्भवली तुज हे कसी ॥
सुत म्हणे विषयांत सदा पित्या । असि न बुद्धि नरासि कदापि त्या ॥३०॥

स्वागता. सार मानित असे विषयातें । विष्णु-भक्ति गमते विष यातें ॥
न स्वयें हरि तया प्रिय वाटे । बोधिला तरि न येचि सु-वाटे ॥३१॥

उ० जा०. सर्व प्रयत्नें भजती गृहातें । न सेविती भागवता महा ते ॥
गृह-व्रती ते मति त्या जनांची । न गोष्टिही घे भव-भंजनाची ॥३२॥

इं० व०. हे तों गुरू पाप-तरू म्हणावे । अंधासवें अंध तसे गणावे ॥
दे प्रीति कृष्णीं गुरु तोच साच । श्रुत्यर्थ इत्यर्थ असे असाच ॥३३॥

उ० जा०. पशू जसे चाविति चाविल्यातें । पुनःपुन्हा सेविति सेविल्यातें ॥
कृष्णीं नव्हे प्रीति कदापि त्यांला । प्रऱ्हाद इत्यादि वदे पित्याला ॥३४॥

---

१ जाचाला, (तर्जन म्ह० निंदा आणि भर्जन म्ह० जाळणें). २ कमताई. ३ मनोरंजक. ४ श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ ही नवविधा भक्ति ह्या श्लोकांत वर्णिली आहे. ५ दैत्यांचा गुरु शुक्राचार्य ह्याचे शंड व अमर्क असे दोन पुत्र हिरण्यकशिपूचे आचार्य होते. त्यांपैकीं एकास लक्षून हें हिरण्यकशिपूचें वाक्य आहे.

भु० प्र०. असा वर्णितां वर्णितां श्री-अजाला ।
पित्याच्याच अंकीं समाधिस्थ जाला ॥
अहो तो निजांकावरूनी अभाग्यें ।
दिला लोटुनी लभ्य जो पूर्व-भाग्यें ॥ ३५ ॥

इं० व०. याचा वधी जो चुलता सखा[1] रे । हा त्यास पूजी तुम्हि यास खा रे ॥
दांतें नखें पर्वत-शस्त्र-पातें । मारा म्हणे सत्वर निस्त्रपातें[2] ॥३६॥
मी बाप माझी नलगेच माया । तो आवडे विष्णु कुलाधमा या ॥
हें पांचवें वर्षचि या कुमारा । तों हा असा, सत्वर यास मारा ॥३७॥

उ० जा०. ते मारिती बाप म्हणेचि मारा । मारा न लागे तरि त्या कुमारा ॥
न तोडि तें खड्ग रुते न भाला । भा[3] लागते कीं तम हो नभाला[3] ॥३८॥
न अग्निहीमाजि अहो जळाला । न मग्नही तो करवे जळाला ॥
उरावरी आदळि पर्वतातें । केलें उपायांतर सर्व तातें ॥३९॥

व० ति०. चिंतार्णवांत बुडतां असुरोत्तमातें ।
वाटे तदा मरण याचि निमित्त मातें ॥
तों नीतिनें करिति ते द्विज बोध राया ।
कीं, बाल-चेष्टित न योग्य मनीं धराया ॥ ४० ॥
राजा म्हणे मग तयाच पुरोहितांतें ।
कीं यास न्या स्व-सदनीं शिकवा हितातें ॥
ऐसा करा त्वरित कीं धरि लोक-रीती ।
नेऊनि ते द्विज घरास तसें करीती ॥ ४१ ॥

इं० व०. तेथें मुलें जीं गुरु-गेहवासी । तीं योजिलीं सर्व जगन्निवासीं ॥
त्या दैत्य-बाळां गुरु हाचि जाला । जो दाखवीं स्वात्म-सुखीं अजाला ॥४२॥

उ० जा०. मुलांस त्या विस्मय थोर वाटे । कीं लागला हाचि कसा सु-वाटे ॥
ते पूसती हें तरि या द्विजाला । ठावें न तूतें गुरु कोण जाला ॥४३॥

द्रु० वि०. उमजला मजला हरि ज्या मुखें । गुरुच तो रुचतो हृदयीं सुखें ॥
शिकवणें कवणें मज त्याविना । निजपणीं[4] जपणीं[5] जड दाविना ॥४४॥

उ० जा०. दैत्यार्भकां हा हित शब्द वाटे । समस्तही लागति त्याच वाटे ॥
हें सर्वही आइकतांचि तातें । पाचारिलें क्रोध-वशें सुतातें ॥४५॥

---

१ सख्खा. २ निलाजऱ्याला. ३ नभाला भा (प्रकाश) कीं (किंवा) तम लागतें (काय) ? ४ आत्म्याव्यतिरिक्त कांहीं नाहीं अशी मनाची खातरी करून देणें हें मूर्खाचें काम नाहीं. ५ जपणें.

उ० जा०. गालि-प्रदानीं न करूनि वाणी । वाणी वदे हो अपवित्रवाणी ॥
म्हणे खळा दैत्य-कुळाधमातें । मारीन जो तूं न भिशीच मातें ॥ ४६ ॥

इं० व०. मी क्रुद्ध होतां मज लोक सारे । भीती, भिशी एक न तूं कसा रे ॥
या शासना लंघिशि दुर्गमातें । कोण्या बळें सत्वर सांग मातें ॥ ४७ ॥
प्रऱ्हाद बोले जग गांजितोसी । ज्याच्या बळें आत्मपणें[1] जितोसि[2] ॥
रक्षी अ-नाथा मजला हरी तो । ज्याला असा बापचि संहरीतो ॥ ४८ ॥

व० ति०. माझें तुझेंचि बळ तों इतुकेंचि नाहीं ।
त्याचेंच कीं बळ असे सकळा जनांही ॥
तूं शत्रु मानिशि तया असुर-स्वभावें ।
तो टाकिशील मग देखसि आत्म-भावें ॥ ४९ ॥

उ० जा०. या गोष्टिनें फारचि तप्त जाला । घे खड्ग बोले मग आत्मजाला ॥
कीं तूं मरूं इच्छिसि तो निपात[3] । स्वयें असें बोलवि सन्निपात ॥ ५० ॥

द्रु० वि०. त्रि-भुवनेश्वर जो मज-वेगळा । तुज गमे सकळांहुनि आगळा ॥
जरि दिसेल अरे मज ईक्षणीं । वधिन त्याचि पुढें तुज ये क्षणीं ॥ ५१ ॥
जरि समर्थ असेल तुझा धणी । तरि तुझी पुरवीलचि तो धणी ॥
परि वदे स्थळ कोण तया असे । म्हणुनि गर्जत शब्द करीतसे ॥ ५२ ॥

घनाक्षरी प्रऱ्हादाशी दैत्य थोर । म्हणे मज थोर थोर ॥
भीति बोलतां समोर । भें न तूजला ॥ १ ॥
तूं ना तरुण[4] किशोर[4] । पांचा वरषांचें पोर ॥
म्हणशी साजण[5] हे चोर । नागविती मजला ॥ २ ॥
बोल बोलसी तिखट । मरों पाहसी फुकट ॥
मृत्यु आलासे निकट । नाहीं तुज समजला ॥ ३ ॥
तुझा मी प्रत्यक्ष काळ । हाका मारून विशाळ ॥
अरे तुझा रक्षपाळ । लपे जाणों लाजला ॥ ४ ॥ ५३ ॥
अरे तुझा कोठें देव । म्हणे सर्व वासुदेव ॥
विश्व-पटीं स्वयमेव । तंतु तोचि वसतो ॥ १ ॥

---

१ अहंपणानें. २ जिवंत आहेस. ३ मृत्यु. ४ कौमारंपंचमाब्दांतं पौगंडं दशमावधि। कैशोरमापंचदशाद्यौवनं हि ततः परम् ॥ तरुण १५ वर्षांपुढें वयाचा; किशोर १० पासून १५ वर्षांपर्यंत; पौगंड ५ पासून १० वर्षांपर्यंत; आणि कुमार (पोर) पांच वर्षांपर्यंत. ५ कामादि सहा.

दैत्य म्हणे अरे थांब । गोष्टि ठेवीं लांबलांब ॥
मजसमोर हा खांब । येथें कैसा आसतो ॥ २ ॥
म्हणे स्तंभ दारु-रूप । दारूमध्यें चित्स्वरूप ॥
थिजलें तथापि तूप । रस तो न भासतो ॥ ३ ॥
तरी दिसेना कां मज । म्हणे भजोनि समज ॥
प्रत्यक्षही अधोक्षज । दिसेना तो दीसतो ॥ ४ ॥ ५४ ॥
स्तंभीं दिसतसे जाण । ऐसें बोलतां सुजाण ॥
दैत्यें घेतलें उड्डाण । सिंहासनावरुनी ॥ १ ॥
खवळला उच्छृंखळ । दांतें दांत खाय खळ ॥
हाणी खांबास निखळ[1] । खड्ग-मुष्टि धरुनी ॥ २ ॥
तेचि समयीं कठोर । बहु भयंकर थोर ॥
ध्वनि उठे महा घोर । मोठ्या बळेंकरूनी ॥ ३ ॥
म्हणे असुर विकळ । कोण गर्जतो प्रबळ ॥
पाहे चहूंकडे चळ । लोचनांसि पसरुनी ॥ ४ ॥ ५५ ॥

शिख०. असे रे तो कोठें तुज बहु जयाचे भरंवसे ।
वसे सर्वांठायीं स्थिर-चर-पटीं तंतु गवसे ॥
दिसेना कां स्तंभीं, मज दिसतसे तो नर-हरी ।
हरी तो दुष्टांचे त्वरित मद जो एकचि हरी ॥ ५६ ॥
असे स्तंभीं, ऐसा श्रवणिं पडतां शब्द असुरा ।
सुरा-पानीं मत्त स्व-हित-विषयीं जो निजसुरा[2]॥
सुराधीशा-द्वेषें करुनि दृढ-खड्गें क्षय-करें ।
करें हाणी मुष्टी वळुनि खळ खांबास निकरें ॥ ५७ ॥

स्वागता. स्तंभ तो अवचितांचि कडाडी । अब्जजांड अवघेंचि तडाडी ॥
अब्जजादि-हृदयांत धडाडी । काल-मेघ-शत-नाद गडाडी ॥५८॥

उ० जा०. खरी कराया निज-भृत्य-वाणी । आणी स्व कीं व्यातिसही न वाणी[3] ॥
स्तंभीं सभे अद्भुत-रूप दावी । मनुष्य ना सिंह तनू वदावी ॥५९॥

घनाक्षरी. मुख सिंहाचें उत्कट । नर-तनु जे विकट ॥
होय नरसिंह प्रकट । विधि-वर-रक्षणीं ॥ १ ॥

---

१ पूर्णपणें. २ निद्रिस्त. ३ उणीव.

बाहू बाहू चंड चंड । काळ-दंडसे उदंड ॥
ज्वाळा तोंडांत अखंड । चंड-रश्मि ईक्षणीं ॥ २ ॥
नखें वज्रेंशीं तिखट । दांतीं शब्द खट्ट खट्ट ॥
जीभ चंचळ चोखट । जाणों खड्ग-दक्षिणी[1] ॥ ३ ॥
कुंडलें मंडित गंड । अंगीं बाणलें श्रीखंड ॥
हृदयाचे खंड खंड । दैत्याचे तया क्षणीं ॥ ४ ॥ ६० ॥

द्रु० वि० मनुज-रूप नव्हे नर-केसरी । कनक-वर्ण कटीं पट केसरी ॥
सकळ सृष्टि करूं न शके सरी । प्रकट होय असा नर केसरी ॥ ६१ ॥

मालिनी. पसरट मुख मोठें आंत दाढा कराळा ।
परम चपळ जिव्हा खड्ग जैसा निराळा ॥
नयन-युगुल जाणों तापलें हेम-पाणी ।
बहु भुज नख शस्त्रें देखिला चक्रपाणी ॥ ६२ ॥

उ० जा० सिंहावरी त्या मग दैत्य-हस्ती । धांवे गदा घेउनि थोर हस्तीं ॥
पतंग अग्नीवरि जेविं जातो । हाणी गदा घोर अधोक्षजा तो ॥ ६३ ॥

द्रु० वि० विधि-वर-प्रतिपाळक जो हरि । न दिवसांत निशींतहि संहरि ॥
म्हणुनि युद्ध निशा-मुखिं तो करी । मग वधी बुडतां रवि लौकरी ॥ ६४ ॥
अ-मर तो मरतो अति लौकरी । चपळ तो पळतो धरितां करीं ॥
उसळला खळ लाघव-लक्षणी[2] । विलपती लपती सुर त्या क्षणीं ॥ ६५ ॥

व० ति० आश्चर्य हें नृ-हरि मानुनियां महास्यें[3] ।
स-क्रोध हास्य करि उत्कट अट्टहास्यें ॥
तों झांकले नयन भीति मनीं निघाली ।
मांडीवरी हरि अशास धरूनि घाली ॥ ६६ ॥

द्रु० वि० न धरणीवरि मृत्यु न वा नभीं ।
वर असा म्हणवूनिच तो न भी ॥
निज-तनूवर त्या खळ-शेखरा ।
चिरि धरूनि करी वर तो खरा ॥ ६७ ॥

भु० प्र० न गेहीं न बाहेरि यालागिं दारीं ।
बसे उंबरा पोट त्याचें विदारी ॥
स-जीवें अ-जीवें मरेना तसाची ।
चिरूनी नखें तो करी गोष्टि साची ॥ ६८ ॥

---

१ तलवारीप्रमाणें लवणारी व तीक्ष्ण. २ मायावी. ३ विशाल मुखानें.

०वि०. चुळबुळे निसटे करि तांतडी । असुर, तों हरि काढुनि आंतडीं ॥
उदर फाडुनि घालितसे गळां । करि सु-मंगळ देव अ-मंगळा ॥६९॥

चिरुनि वारण-गंड जसा हरी । अ-सुर मारुनि शोभतसे हरी ॥
दिति-ज तो गज केशव केसरी । इतर साम्य करूं न शके सरी ॥७०॥

दिति-ज यूथ-प जों मृति पावला । असुर-वारण-यूथहि धांवला ॥
मृतक[1] तें ढकलूनि धरा-तळीं । वधि तया हरि लात-बुक्या-तळीं ॥७१॥

पद-तळें किति-एक नखें करें । तुडविले दनुजेंद्र भयंकरें ॥
असुर-नाथ नृपासन त्यावरी । हरि बसे परि कोप न सांवरी ॥७२॥

स्तविति देव अजी कनकांबरा । असुर मारियला म्हणती बरा ॥
परि न आवरि कोप रमा-पती । स-भय लोक चतुर्दश कांपती ॥७३॥

स्वागता. प्रार्थिती अमर सागरजा ते । सांवरूनि कनकांबर जाते ॥
जाय पाद किति-एक रमा ते । तों गमे भय चराचर माते ॥७४॥

०वि०. परततां कबरांबर[2] नावरे । पदरही हृदयावरि वावरे ॥
स्मरण-भाव[3] न शीघ्र तिचा वळे[3] । नयन चंचळ जीभहि चावळे ॥७५॥

शिख०. मग प्रऱ्हादातें म्हणति अवघे भक्त-परमा ।
रमा ब्रह्मा खिन्न स्व-कृत-विभु-कोपाभ्युपरमा ॥
रमा-कांता येना तुजविण कृपा दैत्य-दमना ।
मनाच्या विश्रामा त्वरित करिं गा कोप-शमना ॥ ७६ ॥

०जा०. ज्याला भिती देव विरंचि पद्मा । प्रऱ्हाद त्याच्या धरि पाद-पद्मा ॥
आणी जया वंदिति सर्व भूतें । करी तया दंडवत प्रभूतें ॥७७॥

स्वागता. बाळकें स्व-चरणांबुरुहातें । वंदितां प्रभु जगद्गुरु हातें ॥
ऊचलोनि अवलोकुनि ठेवी । मस्तकीं अभय-हस्तक ठेवी ॥७८॥

शिख०. कर-स्पर्शें झालें परम सुख त्या दैत्य-तनया ।
न या संसाराचें स्मरण उरलें त्या सु-विनया ॥
नद्या नेत्रीं दोहीं स्रवति न निघे शब्द सगळा ।
गळा दाटे प्रेमें त्वरित हरि घे मोहुनि गळां ॥ ७९ ॥

---

१ प्रेत. २ वेणीवरचा पदर. ३ ती लवकर शुद्धीवर येईना.

व० ति०. प्रऱ्हाद्र याउपरि होउनि सावधान।
प्रेमें स्तवी त्रि-भुवनेश दया-निधान ॥
ब्रह्मादि सात्त्विक तयां कळसी न देवां।
मी तो म्हणे असुर-राजस वासुदेवा ॥ ८० ॥
भक्तीं करूनि तुज गाय अधोक्षजाला।
झालासि तूं स्व-पद-दायक त्या गजाला[१] ॥
मारूनि नक्र गति दे द्वि-रदा तयाला।
यालाग मी स्तवितसें वर-दातयाला ॥ ८१ ॥

भु० प्र०. मुखांतूनि नक्राचिया कुंजराशी। जसें सोडवीलें कृपा-पुंज-राशी ॥
मला सोडवीलें तसें बा सु-देवा। पित्याच्या करापासुनी वासुदेवा ॥८२॥

उ० जा०. प्रऱ्हाद इत्यादि करी स्तुतीतें। अर्पी नृसिंहास सरस्वती ते ॥
कृपा तया ऊपरि देव दावी। यानंतरें तेचि गमे वदावी ॥८३॥

इं० व०. ऐशा स्तुतीनें हरि तुष्ट झाला। बोले कृपेनें असुरात्मजाला ॥
कीं वर्णितां[२] या निगमागमातें[२]। संतोषलों मी वर माग मातें ॥८४॥

शिख०. म्हणे श्री-प्रऱ्हाद प्रभु-वचन हें लोभ-कर जी।
रजीं[३] मातें घाली म्हणुनि हे शब्द वरजीं ॥
रजीं या पायांच्या सुख कवण नाहीं मज हरी।
हरी दुःखें सारीं तव गुण-कथा श्री-नरहरी ॥ ८५ ॥

---

१ गजेंद्राला :—इंद्रद्युम्न नांवाचा द्रविड देशाचा राजा होता; तो मलयाचलावर आश्रम करून तपश्चर्येसाठीं राहिला असतां एक वेळ अगस्ति ऋषि त्याचे आश्रमांत शिष्यमंडळीसह आला. त्या वेळेस इंद्रद्युम्न ध्यानस्थ होता, म्हणून त्याकडून ऋषीचा अभ्युत्थानादि आदरसत्कार झाला नाहीं. तेव्हां ह्यानें आपला आळसानें अनादर केला, असें वाटून ऋषीस फार राग आला, आणि 'तूं हत्ती हो' म्हणून त्यानें त्यास शाप दिला; परंतु त्यानें प्रार्थना केल्यावर 'विष्णु तुझा उद्धार करिल' असें आश्वासनही दिलें. पुढें तो राजा हत्ती होऊन वनांत फिरत असतां पाणी प्यावयास एका सरोवरांत उतरला, तों त्यांतील नक्रानें त्याचा पाय धरिला. (तोही देवलऋषीच्या शापानें गंधर्वाचा नक्र झाला होता.) तेव्हां पुष्कळ वेळपर्यंत गजेंद्रानें आपण सुटण्याकरितां यत्न केला, परंतु नक्रापुढें त्याचें कांहीं चालेना. शेवटीं निरुपाय होऊन त्यानें ईश्वराचा धांवा केला आणि सोंडेनें एक कमळ उपटून भक्तीनें त्यास उद्देशून आकाशांत फेकीलें. तेव्हां विष्णूनें संतुष्ट होऊन चक्रानें नक्राला मारून गजेंद्रास सोडविलें, अशी कथा आहे. २ वेदशास्त्रांनीं केलेल्या स्तुतीप्रमाणें तूं केलेली स्तुति ऐकून. ३ रजोगुणांत—प्रपंचांत.

स्वागता. अंतरीं धरुनि[१] पूर्ण-निरीक्षा[१] । पाहतोसि निज-भृत्य-परीक्षा[१] ॥
अन्यथा[२] स्व-जन-भावच नाशी । कां वदे करुण या वचनाशी[२] ॥८६॥

इं० व०. स्वामीस जो वेंचिल-काम्य-वाणी । वाणिज्य तें भक्तिहि दीनवाणी ॥
वाणीच कीं सेवक वेतनाचा । निष्काम तो पंथ पुरातनांचा ॥८७॥

द्रु० वि०. म्हणसि मागचि जी कमला-वरा । त्वरित दे तरि या अमला वरा ॥
किमपिही उपजेच न कामना । करिं असें विधिच्या जनका मना ॥८८॥

इं० व०. प्रऱ्हाद-शब्दा हरि तुष्टला हो । व्यावा म्हणे आजि यथेष्ट लाहो ॥
लक्ष्मी-पतीचें मन मोहरीतो । बोलीं अशा, त्यास वदे हरी तो ॥८९॥

व० ति०. ऐसें तथापि जिस सिंधुचियाच पाळी[३] ।
पाळीं स्व-भूमि फळ हें तुझिया कपाळीं ॥
पाळी तुझी म्हणुनि सर्व वसुंधरा या ।
राया तुझ्या इतर योग्य नसे धराया ॥ ९० ॥

शा० वि०. एकाहत्तर चौकड्या कलि-कृत-त्रेता-युग-द्वापरीं ।
हें मन्वंतर[४] एक काळ इतुका जों होय याऊपरी ॥
प्रऱ्हादा इतुकीं युगें अधिकही कांहीं तुझ्या शासनीं ।
पृथ्वी सर्व असो, म्हणे नर-हरी, ये बैस सिंहासनीं ॥ ९१ ॥

इं० व०. त्यामाजि माझी स्मर हे कृपा कीं । या पूर्विल्या पातक-पुण्य-पाकीं ॥
उद्विग्न दुःखीं न सुखीं स्पृहाही । ऐसें असावें अति-निस्पृहाहीं ॥९२॥
दे मुक्तिही भुक्तिहि भक्त-राया । दे भक्तिही अन्य जना तराया ॥
प्रऱ्हाद माथां धरि शासनातें । अंगीकरी तात-नृपासनातें ॥९३॥

द्रु० वि०. स्व-पितयास न हो अधमा गती । म्हणवुनी विनवी शिशु मागती ॥
हरि म्हणे सुत ज्यांस असा असे । सु-गति पावति पातकिही असे ॥९४॥

स्वागता. एकवीस निज-पूर्वज सारे । उद्धरी सुत वितां तुजसा रे ॥
सत्क्रिया करिं तथापि तयाची । म्यां तनू चिरिलि ज्या पितयाची ॥९५॥
ये रिती निज-कृपा अवलोका । दावुनी नर-हरी निज-लोका ॥
जाय, हे चरित लोक तराया । ठेविलें भव-नदी उतराया ॥९६॥

---

१ पक्की चौकशी करण्याच्या हेतूनें. २ नाहीं तर करुण ( करुणाकर ) जो परमेश्वर तो आपल्या भक्ताची भक्ति नाहींशी करणारें हें ( वर माग असें ) वचन कां बोलेल ? ३ मर्यादा, घेर, कडा. ४ देवांची एकाहत्तर युगें म्हणजे एक मन्वंतर होतें.

## स्फुट श्लोक[1]

भु० प्र०. करूं ये समाधान जो मूर्ख त्याचें। धरूं ये सुखें चित्त पैं जाणत्याचें ॥
न जाणे न नेणे अशा पामराला। बुझावूं शकेना विधाता तयाला ॥ १ ॥

शिख०. बळानें काढूं ये मणि मकर-दाढेंत दडला।
महा-सिंधू-लाटा-तरण करुं येई भुज-बळा ॥
महा-सर्पातेंही सुम-सम[2] धरूं ये निज शिरीं।
परंतु क्षुद्राचें हृदय[3] धरवेना[3] क्षणभरी ॥ २ ॥

शा० वि०. सर्पातें बिस-तंतुनें सु-दृढ तो बांधावया इच्छितो।
किंवा वज्र-मणी शिरीष-कुसुमें[4] भेदावया धांवतों ॥
किंवा तो मधुबिंदुनें मधुरता क्षाराब्धिला आणितो।
जो मूर्खास सु-भाषितें वश करूं ऐसें ह्मणी बोलतो ॥ ३ ॥

उ० जा०. विनिर्मिलें झांकण अज्ञतेचें। स्वाधीन हे पद्म-भवें फुकाचें ॥
मूर्खासि जें मौनचि फार साजे। सभेसि त्याच्या बहु जाणते जे ॥ ४ ॥

शिख०. जधीं कांहीं कांहीं 'हरि कवि'[5] असे शब्द शिकलों।
तधीं[6] मी सर्वज्ञ द्विप-सम मदें याच भरलों[6] ॥
जधीं कांहीं नेणे म्हणुनि वदले पंडित मला।
तदा माझा गर्व-ज्वर सकळही हा उतरला ॥ ५ ॥

शा० वि०. चंद्राला दिवसा प्रकाश नसणें, ये कामिनीला जरा।
पद्मावीण तळें[7], निरक्षर मुखीं जो साजिरा गोजिरा ॥
दात्याला धन-लोभ, नित्य वसतें दारिद्र्य विद्वज्जनीं।
दुष्टाचा पगडा मही-पति-गृहीं, हीं सात शल्यें मनीं ॥ ६ ॥

शिख० विपत्काळीं धैर्य, प्रभुपणिं[8] सहिष्णुत्व बरवें।
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य मिरवे ॥
स्व-कीर्तीच्या ठायीं प्रचुर रति, विद्या-व्यसन[9] जें।
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे ॥ ७ ॥

---

१ भर्तृहरीचें संस्कृत नीतिशतक व वैराग्यशतक ह्यांचें वामनाच्या नांवावर मराठी पद्यरूप भाषांतर आहे; त्यांतील वेंचे. २ फुलासारखें. ३ मूर्खांची मनधरणी करितां येत नाही. ४ शिरीष (म्हणून एक झाड आहे) त्याच्या फुलानें. (हें फुल नाजूक असतें.) ५ शतकत्रयाच्या या भाषांतराचा कर्ता वामनाहून निराळा (कदाचित् त्याचा शिष्य) 'हरि कवि' या नांवाचा असावा, असेंही मत आहे. ६ अन्वय-तधीं मी सर्वज्ञ याच मदें द्विपसम भरलों—त्या वेळेस मला सर्व कांहीं समजतें अशा मदानें (गर्वानें) हत्तीसारखा भरून गेलों. ७ 'जलें' असें पाठांतर आहे. ८ ऐश्वर्य आलें असतां. ९ विद्येचा नाद.

उ० जा. वानोत निंदोत सु-नीतिमंत। चळो असो वा कमला गृहांत ॥
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं। सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥ ८ ॥

शिख०. न चोराला लाधे, प्रगट न दिसे, दे सुख सदा।
दुणावे कीं देतां किमपि नं सरे लेशहि कदा ॥
न कल्पांतीं पावे निधन, धन विद्याभिध[1] असें।
असे ज्याचें त्याशीं प्रतिभटति[2] जे पामर पिसे ॥ ९ ॥

शालिनी. जे कां ज्ञानें लाधले सद्विचारा। संपत्तीचा त्यांपुढें काय तोरा ॥
पद्माचा जो ततु तो वारणाला। वारायाला पैं म्हणे सिद्ध झाला ॥ १० ॥

शा० वि०. झाला क्षीण बहू क्षुधेस्तव जरी, कीं व्यापिला वार्धकें।
आली कष्ट-दशा, घडो मरणही, कीं तेज गेलें निकें ॥
ऐसाही मृग-राज जीर्ण तृण तो खाईल कीं काय हा।
शौर्यें भेदुनि हस्ति-मस्तक शुभ-ग्रासींच[3] ज्याला स्पृहा ॥ ११ ॥

पृथ्वी. सु-नीति-पथ सेवणें मलिन कर्म मानेच ना।
घडो मरण नावडे खल-जनांप्रति प्रार्थना ॥
विपत्ति-समयींहि जो प्रगटवीच ना दीनता।
भल्याविण असें असि-व्रत[4] करूं शके कोणता ॥ १२ ॥

शा० वि०. ज्यांचीं देह-मनें तशींच वचनें पुण्यामृतें[5] ओतिलीं[6]।
कीं ज्यांहीं स्व-कृतोपकार-विभवें सर्वत्र विस्तारिलीं ॥
लोकांचे परमाणु-तुल्य गुण जे मेरूपरी वानिती।
चित्तीं तोषहि पावती सु-जन ते नेणों किती नांदती ॥ १३ ॥

शिख०. मही-पृष्ठीं केव्हां अवचट पलंगीं पहुडतो।
क्षुधेतें शाकान्नें अवचट सदन्नें निवारितो[7] ॥
कधीं कंथा-धारी अवचट सु-वस्त्रीं मिरवतो।
मनस्वी[8] कार्यार्थी किमपि सुखदुःखें न गणितो ॥ १४ ॥

शा० वि०. दुर्मंत्रें नृप, संगतीस्तव यती, कीं पुत्रही लालनें।
वेदानध्ययनें द्वि-जाति, कुल दुष्पुत्रें, खलाराधनें ॥

---

१ ( विद्या + अभिधा ) विद्या ह्या नांवाचें. २ स्पर्धा करितात. ३ ( हत्तीच्या मांसाचे ) सुग्रासाविषयीं. ४ तरवारीच्या धारेसारखा तीव्र नियम. ५ शुद्ध अमृतरसच. ६ ओतून केलीं आहेत अशीं. ७ दूर करितो. ८ निग्रही–शाहणा.

नासे शील, न पाहतां कृषि, मदें मा, लाज मद्यें फुका ।
शाठ्यें मित्रपण, प्रवास-गमनें स्नेह, प्रमादें रुका[1] ॥ १५ ॥
लज्जेनें जड, दांभिक व्रतिपणें, कापट्य शौचें गणी ।
शौर्यें निर्दय, आर्जवें लुडबुड्या, कीं दीन सद्भाषणीं ॥
मानेच्छा तरि मूर्ख, कीं बडबड्या वक्ता, निकामी[2] भला ।
ऐसा तो गुण कोणता खल-जनीं, नाहींच जो निंदिला ॥ १६ ॥
राहो जाति रसातळीं, सु-गुण हे राहोत कीं खालते ।
शैलाग्राहुनि शील सत्वर पडो, सौजन्य अग्नींत तें ॥
शूरत्वावरि आदळो अशनि का, हें सर्वही नावडे !
अर्थ-प्राप्ति असो निरंतर मला, त्यावीण हें बापुडें ॥ १७ ॥
पेटीमाजि निरोधिला न सुटका ज्याला भुकेला फणी ।
तों केलें बिळ मूषकें अवचितां तो आंत गेला क्षणीं ॥
त्यातें भक्षुनि सर्प तत्कृत-पथें निश्चित गेला पहा ।
ऐसें कर्म अ-तर्क्य यास्तव तुम्हीं कीं स्वस्थ-चित्तें रहा ॥ १८ ॥

व० ति०.

जो तोषवी स्व-जनकास सु-पुत्र तोच ।
जें दे पतीस सुख फार कलत्र[3] तेंच ॥
जो एकरूप सुख-दुःखपणीं गडी तो ।
हा लाभ पूर्व सु-कृताविण काय होतो ॥ १९ ॥

शालिनी.

संपत्कालीं कोंवळें सज्जनाचें । होतें[4] चित्त ज्ञाति[4] पंकेरुहाचें[4] ॥
आपत्कालीं शैलही आदळो कां । धाकेना जें गाजवी धैर्य-डंका ॥२०॥

व० ति०.

विद्या-समन्वितहि दुष्ट परित्यजावा ।
त्याशीं बुधें न सहवास कधीं करावा ॥
ज्याच्या असे विमलही मणि उत्तमांगीं ।
तो सर्प काय न डसे खल अंतरंगीं ॥ २१ ॥

मालिनी.

मलिन रुधिर-मांसावेगळें हाड दैवें ।
अवचट मिळतां तें श्वान संतोष पावे ॥
क्षुधितहि गज-हंता जंबुकातें न मारी ।
अवसरीं समजावी क्षुद्रता आणि थोरी ॥ २२ ॥

---

१ पैका. २ निरुपयोगी. ३ बायको, स्त्री. हा शब्द नेहमीं नपुंसकलिंगीं असतो. ४ ( पंकेरुहाचें ) कमळाचें ( ज्ञाति ) नातेवाईक होते, म्हणजे कमळासारखें मृदु होतें.

व० ति०. योजी हिताप्रति निवारुनि पाप-कर्में ।
वर्णी बरेच गुण झांकुनियां कु-कर्में ॥
दे आपणास, असतां व्यसनीं त्यजीना ।
सन्मित्र-लक्षण असें वदतात जाणा ॥ २३ ॥

उ० जा०. तृणें मृगाला, सलिलें झषाला[१] । संतोष हे वृत्ति महा-जनाला ॥
तयांस निष्कारण तीन वैरी । किरात, कैवर्तक, दुष्ट भारी ॥२४॥

शा० वि०. तोयाचें परि नांवही न उरतें संतप्त-लोहांतरीं ।
तें भासे नलिनी-दलावरि पहा सन्मौक्तिकाचे परी ॥
तें स्वातीस्तत्र अब्धि-शुक्ति-पुटकीं[२] मोतीं घडे नेटकें ।
जाणा उत्तम-मध्यमाधम दशा संसर्ग-योगें टिके ॥ २५ ॥

उ० जा०. पुष्पापरी दों परिचीच साची । हे वृत्ति संभावित जे तयांची ॥
लोकांचिये एक[३] शिरीं सजावें । वनींच कीं एक सुकोनि जावें ॥२६॥

शा० वि०. मौनें मूक दिसे, वदे तरि महा-वाचा, स्व-पार्श्वी फिरे ।
तेव्हां धीट, तसा विवेकचि नसे जैं चालतां अंतरें ॥
शांतीनें तरि भ्याड, शांति न धरी तैं गांवढा यापरी ।
सेवा-धर्म असा अगाध कथिला हा जाण योगीश्वरीं ॥२७॥

मदिरा. नम्रपणेंच सभेंत महोन्नत, जे गुण वर्णुनियां परक्याचे ।
सांगितल्याविण दाविति कौशल सर्व जनांप्रति जे स्व-गुणाचें ॥
स्वार्थ परार्थहि साधिति जिंकिति शांति-बळें मुखर-त्व[४] खलांचें ।
संत महाद्भुत-भाजन[५] यापरि सेवन कोण करी न तयांचें ॥२८॥

शा० वि०. तैं कां दुर्गुण, लोभ जैं, पिशुनता जैं, कां महा-पातकें ।
काशाला तप, सत्य जैं ; मन सुरे जैं, कां सु-तीर्थादिकें ॥
काशाला जन, जैं भलेपण असे ; कां भूषणें, कीर्ति जैं ।
सद्विद्या जरि, कां धनें ; मरण कां, दुष्कीर्ति लोकींच जैं ॥ २९ ॥

---

१ माशाला. २ समुद्रांतील शिंपल्यांतील पुडांत. ३ लोकांत प्रतिष्ठेनें रहावें हें तात्पर्य (संभावित पक्षीं). ४ वाचालता. ५ अत्यंत आश्चर्यकारक गुणांनीं भरलेले.

व० ति०. खल्वाट[1] चंड-किरणें अति तप्त झाला ।
छायार्थ ताल-तरु-मूल-समीप गेला ॥
तत्काल थोर पडलें फल, तो निमाला[2] ।
ये जेथ दैव-हत येइल तेथ घाला ॥ ३० ॥

शा० वि०. भाग्याला सु-जनत्व भूषण असे, कीं मौन शौर्यास तें ।
ज्ञानाला शम, त्या श्रुतास विनय, द्रव्यास दातृत्व तें ॥
अ-क्रोधत्व तपा, क्षमा प्रभुपणा, धर्मास निर्दंभता ।
या सर्वांसहि मुख्य भूषण पहा सच्छील हें तत्वतां ॥ ३१ ॥

हे तों सत्पुरुष स्व-कार्य त्यजिती अन्यार्थही साधिती ।
हे तों मध्यम जे निजार्थ करुनी अन्यार्थ संपादिती ॥
हे तों राक्षस जे स्व-कार्यविषयीं अन्यार्थ विध्वंसिती ।
जे कां व्यर्थ परार्थहानि करिती ते कोण कीं दुर्मती ॥ ३२ ॥

वांछा सज्जन-संगमीं, गुरु-कुळीं वंदारुता[3], नम्रता ।
निंदेचें भय, तुष्टता पर-गुणीं, स्व-स्त्री-सुखीं लुब्धता ॥
विद्याभ्यास, महेश-भक्ति, खल-संसर्गीं अनासक्तता ।
चित्ताचा जय, या गुणांस निधि जे त्यां वंदिजे तत्त्वतां ॥ ३३ ॥

उ० जा०. होतीं अरण्येंच पुरें तयाला । समस्तही होतिल आप्त त्याला ॥
मही तया होइल पूर्ण-रत्न । ज्याला असे संचित पूर्व पुण्य ॥ ३४ ॥

वंशस्थ.[4] वनीं रणीं शत्रु-जलाग्नि-संकटीं । महार्णवीं पर्वत-वास-दुर्घटीं ॥
निजो बसो आणि फिरो अरण्यें । तया स्थलीं रक्षिति पूर्व-पुण्यें ॥ ३५ ॥

उ० जा०. आलस्य जें कार्य-विघात-कारी । असूं नये तो रिपु या शरीरीं ॥
उद्योग सद्बंधु तया न टाकीं । त्या सेवितां पावसि सौख्य लोकीं ॥ ३६ ॥

द्रु० वि०. वन-चरांसह शैल-वनांतरें । निज सुखें फिरणें तरि तें बरें ॥
जरि घडे सहवासचि पामरीं । तरि जळो असणें सुर-मंदिरीं ॥ ३७ ॥

---

१ टक्कल पडलेला. २ मेला. ३ स्तुति करण्याचें शील. ४ येथें दोन वृत्तांचें ( पहिले दोन चरण ‘वंशस्थ’ व दुसरे दोन ‘उपेंद्रवज्रा’ ) असें मिश्रण झालें आहे तें प्रमादानें झालें असावें.

व० ति०.
द्रव्यास हे गमन-मार्ग यथावकाश ।
कीं दान, भोग अथवा तिसरा विनाश ॥
जो घे न भोग जरि, पात्र-करीं न देही ।
त्याच्या धनास मग केवळ नाश पाहीं ॥ ३८ ॥

वंशस्थ.
असे जयाला धन तोचि पंडित । कुलीन तो तोचि गुणी बहु-श्रुत ॥
सु-पूज्य तो सुंदर तो विचक्षण । धनाश्रयें राहति सर्वही गुण ॥ ३९ ॥

उ० जा०.
श्रुतेंचि कीं श्रोत्र, न कुंडलानें । दानेंचि कीं पाणि, न कंकणानें ॥
साजे तसा देहहि हा न आनें । परोपकारेंचि, न चंदनानें ॥४०॥

शा० वि०.
ब्रह्मयानें लिहिलें ललाट-फलकीं जें द्रव्य ज्याला असे ।
तें लाधे मरु-मंडळीं[1] अधिकही मेरूस गेल्या नसे ॥
सेवीं धैर्य, धनांध त्यांप्रति वृथा दावूं नको दीनता ।
कूपीं कीं जलधींत कुंभ जल घे जें मापिलें तत्त्वतां ॥ ४१ ॥

व० ति०.
तें श्वान एक तुकड्यास्तव चार[2] नाना ।
दावी धन्यास जठरार्थ कसें पहाना ॥
दे आळवूनि जरि हस्ति-प[3] बाप भाई ।
घे तोचि घांस गज-राज कशी बढाई ॥ ४२ ॥

भु० प्र०.
प्रजा हाच कीं वत्स भू-धेनुकेचा ।
नृपा तूं करीं फार सांभाळ त्याचा ॥
स्व-वत्साचिया जाण वात्सल्य-योगें ।
अभीष्टार्थ देईल हे भूमि वेगें ॥ ४३ ॥

शालिनी.
आरंभीं जे फार, शेखीं[4] न कांहीं ।
आधीं थोडी, जे क्रमें फार पाहीं ॥
छाया पूर्वार्धा[5] परार्धा[6] दिनाची ।
तैशी मैत्री दुर्जनाची भल्याची ॥ ४४ ॥

व० ति०.
दे दान गुप्त, उपकार करी न बोले ।
मानी प्रमोद जरि मान्य घरास आले ॥
दावी न गर्व विभवें गुण घे पराचे ।
खड्गाग्र-तुल्य विषम-व्रत हें भल्याचें ॥ ४५ ॥

---

१ मारवाडांत. २ चेष्टा. ३ महात. ४ शेवटीं. ५ सकाळची. ६ उत्तरार्धा.

कीं तोडिला तरु फुटे आणखी भरानें ।
तो क्षीणही विधु महोन्नति घे क्रमानें ॥
जाणोनि हें सुजन ज्या दुबळीक आली ।
त्याशीं कधीं न करिती सहसा टवाळी ॥ ४६ ॥

उ० जा०. आली जरी कष्ट-दशा अपार । न टाकिती धैर्य तथापि थोर ॥
केला जरी पोत[1] बळेंचि खालें । ज्वाला तरी ते वरती उफाळे ॥४७॥

व० ति०. दारिद्य ज्यांजवळि अप्रिय बोलण्याचें ।
भांडार ज्यांजवळि वाग्रस-माधुरीचें[2] ॥
स्व-स्त्री-परायण अ-निंदक जेच त्यांहीं ।
भू-भाग हे विलसती अति-रम्य पाहीं ॥ ४८ ॥

पद्में प्रफुल्ल करितो सविता स्वयें हा ।
रात्रीं विकास कुमुदांप्रति चंद्र दे हा ॥
न प्रार्थितां जल-द दे जल या जनाला ।
मुक्तार्थ[3] कीं पर-हितोत्सव सज्जनाला ॥ ४९ ॥

शिख०. बरें तें या देहीं महिवरि कडेलोट करणें ।
महा-सर्पाच्या कीं वदनिं तरि हा हात धरणें ॥
उडी कीं वन्हींत त्वरित तरि घालून मरणें ।
जळो तें तें लोकीं त्यजुनि निज-सच्छील फिरणें ॥ ५० ॥

व० ति०. क्रोधें जळे मणि अ-चेतन सूर्य-कांत ।
ज्या लागतांच दिन-नायक-पाद-घात[4] ॥
संभावितांत गणना पहिली जयाची ।
साहेल तो पण कशी शठता दुजाची ॥ ५१ ॥

शा० वि०. विद्या हें पुरुषास रूप बरवें, कीं झांकलें द्रव्यही ।
विद्या भोग-सुकीर्ति-दायक पहा ते मान्य मान्यासही ॥
विद्या बंधु असे विदेश-गमनीं विद्या महा-देवता ।
विद्या पूज्य नृपास हा नर-पशू तीवेगळा तत्त्वतां ॥ ५२ ॥

---

१ मशाल. २ (वाक्+रस) गोड भाषणाचें. ३ स्वार्थबुद्धिरहित. ४ सूर्यकिरणांचा तडाखा. श्लेषानें पादताडन.

०. करीं साजे त्याग, श्रवण-युगुळीं सच्छ्रवण जें ।
मुखीं सत्य, स्वच्छाचरण विलसे, शौर्यहि भुजे ॥
स्व-शीर्षी थोराला नमन, विभवावांचुनि पहा ।
भल्याचा कीं स्वाभाविक शुभ अलंकार-विधि[1] हा ॥ ९३ ॥

२०. उपजणें मरणें न चुके नरा । फिरत नित्य असे भव-भोंवरा ॥
उपजला तरि तोच मला गमे । कुल समुन्नति ज्यास्तव घे, रमे[2] ॥ ९४ ॥

ा. वृक्ष फार लवती फल-भारें । लोंबती जल-द वेउनि नीरें ॥
थोर गर्व न धरी विभवाचा । हा स्वभाव उपकार-पराचा ॥ ९५ ॥

०. जें पात्र कां पुरुष-रत्न महा-गुणांचें ।
तें निर्मितो विधि विभूषण भूमिकेचें ॥
कीं त्यासही त्वरित मृत्यु-मुखांत लोटी ।
त्याची गमे मज अ-पंडितता करंटी ॥ ९६ ॥

सद्रत्न-हार मणि ताइत बाहु-दंडीं ।
कीं स्नान चंदन फुलें आणि लांब शेंडी ॥
यांनीं खरी घडतसे पुरुषा न शोभा ।
वाणीच भूषण सु-शिक्षित-शब्द-गर्भा[3] ॥ ९७ ॥

म्यां साहिली खल-जनोक्ति कठोर पाहीं ।
पोटांत दुःख वरिचेवरि हांसलोंही ॥
कीं प्रार्थिलें स्व-जठरार्थ मदांध लोकां ।
आशे अणीक मज नाचविशी किती कां ॥ ९८ ॥

. दिसे ज्या प्राणांची स्थिति जलज-पत्रोदक[4] जसें ।
तयांसाठीं केलें विविध बहु म्यां पातक असें ॥
पुढें द्रव्याढ्यांच्या प्रचुर धन-लोभास्तव वृथा ।
वि-लज्जें म्यां केली बहुतर मृषात्म-स्तुति-कथा[5] ॥ ९९ ॥

वदना रदनावलिनें त्यजिलें । शिर सर्वहि शुभ्रपणें पिकलें ॥
उठतां बसतां अणु शक्ति नसे । परि आस निरंतर माजतसे ॥६०॥

---

ूषणप्रकार. २ आनंद पावतें. ३ मर्यादेचे गोड शब्द जींत आहेत अशी.
ाच्या पानावरील उदकाप्रमाणें म्हणजें चंचल. ५ जींत आपली खोटी स्तुति केली
शी गोष्ट.

उ० जा०. न जाणतां टोळ पडे हुताशीं । नेणोनियां मीन गिळी गळाशी ॥
अभिज्ञ आम्ही विषयांसि जेव्हां । सोडूंच ना मोह बलिष्ठ तेव्हां ॥६१॥

शा० वि०. मोठें मंदिर, पुत्र पंडित बरे, संपत्तिही फारशी ।
भार्या हे गुण-शालिनी, वय नवें, मूढासि माया अशी ॥
मानी शाश्वत विश्व हें, पडतसे संसार-कारा-गृहीं ।
ज्ञानी नश्वर दृश्य मानुनि मनीं संन्यास घे सत्वरीं ॥ ६२ ॥

व० ति०. पोरें सदैव रडती क्षुधितें कृशांगें ।
स्त्री वस्त्र जर्जरित नेसुनि दीन वागे ॥
पाहोनि दुःख घरिंचें जठरार्थ कैसें ।
देहीति[1] गद्गद-रवें वदिजे प्रयासें ॥ ६३ ॥

शा० वि०. होती वासर दीर्घ जे धन-पति-द्वारीं[2] तयां प्रार्थितां ।
नाना-सौख्य-भरें क्षणोपम मला जे लोटले नेणतां ॥
निःसंगत्वपणें धरोनि बसलों हे पर्वताची गुहा ।
आतां त्या दिवसांसि हांसत असें ध्यानावसानीं[3] पहा ॥ ६४ ॥

मृत्यूनें जननास, वार्धकपणें कीं यौवना रोखिलें ।
लोभें आक्रमिली स्व-तुष्टि, वनिता-मोहें शमा व्यापिलें ॥
मात्सर्यें सु-गुणा, वना फणि-कुलें, पृथ्वी-पतीला खलें ।
अ-स्थैर्यें विभवास, सांग कवणें कोणास न ग्रासिलें ॥ ६५ ॥

व० ति०. व्याघ्रीपरी भय करीत उभी जरा रे ।
देहासि रोग करिती रिपुतुल्य मारे ॥
आयुष्य भिन्न-घट-नीर[4] सरे तसें हें ।
पापें तथापि जन आचरतात पाहें ॥ ६६ ॥

शा० वि०. येतो वासर तोच तेच रजनी व्यापार नाना-परी ।
प्राणी हे करितात आयु सरतें हें नेणवे अंतरीं ॥
तुच्छें चर्वित-चर्वणोपम सुखें जीं तीच तीं भोगितां ।
संसारीं न तिरस्कृती उपजते हे कोण निर्लज्जता ॥ ६७ ॥

---

१ (देहि+इति) दे असें. २ श्रीमंताच्या दारांत. ३ (ध्यान+अवसानीं) ध्यान संपल्यानंतर. ४ फुटक्या भांड्यांतील पाणी.

उ० जा. झालों जयांपासुनि ते निमाले । ते आमुचे तुल्य-वयस्क गेले ॥
आम्ही असों संप्रति जाण तैसे । नदी-तटीं जर्जर-वृक्ष जैसे ॥६८॥

व० ति०. आयुष्य वर्ष-शत त्यांत निमें निजेलें[1] ।
त्याही निमेंतहि निमे दिन बाद झाले ॥
वार्धक्य शैशवपणें, उरलें, वियोगें ।
दुःखामयेंचि सरलें, सुख काय सांगें ॥ ६९ ॥

रथोद्धता. एकदां तरुण बाल एकदां । भाग्यवंतहि अ-भाग्य एकदां ॥
एकदां जरठ जाय सत्वरीं । धर्म-राज-सदना[2] नटापरी ॥ ७० ॥

शा० वि०. तूं राजा जरि, मी श्रुति-स्मृति-महा-विद्याभिमानी असें ।
भाग्यें विश्रुत तूं, मदीय कविता-सत्कीर्ति लोकीं वसे ॥
आहे अंतर फार तूज मज रे तूं गर्व जैं दाविशी ।
मीही निस्पृह, भाग्यवंत-गणना नाहीं मला फारशी ॥ ७१ ॥

मालिनी. धन-पति जरि तूं रे, मी असें शास्त्र-वेत्ता ।
भट समरिं जरी तूं, मी महा-वादि-जेता ॥
अनुचर जरि तूतें सेविती, छात्र मातें ।
न गणिशि मज, जातों तुच्छ मानूनि तूतें ॥ ७२ ॥

शा० वि०. भेटावें तरि हा नसे समय तो, अंतःपुरीं तो वसे ।
आहे निद्रित, अश्व पाहत असे, स्वारीस गेला असे ॥
आतां क्रुद्ध म्हणूनि भृत्य वदती टाकी तया दुर्जना ।
मुक्त-द्वार महेश-मंदिर सुखें जाऊनि सेवीं मना ॥ ७३ ॥

लक्ष्मीनें जरि तुष्ट तूं, बहुसुखी मी वल्कलानें असें ।
दोघांचा परि-तोष तुल्य असतां आधिक्य कांहीं नसे ॥
आशा ज्यास दरिद्र तोचि समजें, नैराश्य पैं बाणतां ।
भाग्याचा नर कोणता मग बरें निर्भाग्य तो कोणता ॥ ७४ ॥

---

१ झोपेंत गेलें. २ यमसदनास.

ज्यांचें पात्र पवित्र पाणि-युग हें, भिक्षान्न जे भक्षिती।
ज्यांचें वस्त्र दिशा, जयां मल नसे, शय्या जयांची क्षिति ॥
ज्यांला दैन्य नसे, विरक्ति-वनिता जे तीसवें नांदती।
ज्यांला कर्म-कलाप[१] बाधित[१] नसे, ते धन्य येणें रिती ॥ ७५ ॥

उ० जा०. चांडाळ कीं, ब्राह्मण शूद्र कीं हा। योगीश कीं यापरि लोक पाहा ॥
वदे, जया हर्षविषाद नाहीं। निःसंग तो धन्य जनांत देही ॥७६॥

पुरे पुराणें, स्मृति, वेद, शास्त्रें। आमुष्मिकें[२] वैदिककर्मतंत्रें ॥
जेणें सरे हा भव तें विचारीं। यावेगळी सर्व दुकानदारी ॥७७॥

व० ति०. स्वेच्छा-विहार गत-संग महा-तपस्वी।
भिक्षान्न-भक्षक विरक्त असा मनस्वी[३] ॥
कंथैक वस्त्र निरहंकृति जो सुखी तो।
टाकूनि भोग शम-सौख्य मनीं वरीतो ॥ ७८ ॥

शा० वि०. जों हे स्वस्थ तनू, जरा वसतसे जों दूर, जों इंद्रियें।
शक्तें कीं सरलें न आयु पुरतें जों, पंडितानें स्वयें ॥
आत्म-प्राप्ति-सुखार्थ यत्न करणें कीं तोंच हा फारसा।
होतां मंदिर दीप्त, कूप-खननीं उद्योग तो कायसा ॥ ७९ ॥

झाले जीर्ण मनीं मनोरथ पहा मी वंचलों यौवना।
होते जे गुण सर्वही विफल ते झाले गुणज्ञा-विना ॥
युक्तायुक्त-विचार काल न करी निःशंक सर्वात्मना[४]।
आतां हें सुचलें दुजी गति नसे गौरीश-पायां-विना ॥ ८० ॥

---

१ कर्मसमुदाय–देहाहंभाव ज्यांचा गळल्यामुळें बरीं वाईट कर्में हातून घडलीं तरी त्यांचा वास्तविकदृष्ट्या ज्यांना भोग घडत नाहीं हा भाव. २ परलोक प्राप्त करून देणारीं. ३ ज्यानें मनाचा जय केला आहे असा. ४ सर्वभावेंकरून.

# रामदास

**गो**दातिरीं राक्षसभुवनापासून २० कोशांवर जांब म्हणून एक गांव आहे. तेथें सूर्योपंत म्हणून एक कुळकरणी रहात असे. हा जातीचा जामदग्न्यगोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण असून सूर्योपासक असे. त्याचा पुत्र रामदास. ह्याच्या आईचें नांव राणूबाई. ह्याचें पहिलें नांव नारायण होतें; परंतु पुढें तो रामाची भक्ति करूं लागला, म्हणून त्याचें नांव रामदास असें पडलें. ह्यालाच समर्थ असें म्हणतात. ह्याचा वडील भाऊ गंगाधर म्हणून होता, त्यास रामीरामदास म्हणत. ह्याचा जन्म शके १५२७ त झाला. ह्यानें भक्तिरहस्य नामें ग्रंथ केला आहे; शिवाय अध्यात्मपर पदें केलीं आहेत. हा शके १५९९ त फाल्गुन वद्य १३ स निजधामास गेला.

रामदास लहानपणापासून विरक्त होता. तो मारुतीचा अवतार असें म्हणतात. त्याच्या आईबापांनीं त्याचें लग्न करण्याची सर्व तयारी केली होती; पण त्याच्या मनांत लग्न करून घेण्याचें नव्हतें, म्हणून तो पळून गेला. तो कांहीं दिवस नाशिकक्षेत्रीं पंचवटींत राहून पुढें साताऱ्याजवळ चांफळ येथें जाऊन राहिला. तो बहुतकरून तीर्थयात्रा करीत फिरत असे. हा आजन्म ब्रह्मचारी होता. त्याच्या शिष्यमंडळींत शिवाजीराजा होता. शिवाजीनें आपलें सगळें राज्य रामदासास दिलें, तेव्हां त्यानें त्याचा स्वीकार करून तें पुनः शिवाजीच्या स्वाधीन केलें, आणि तो म्हणाला कीं, माझ्या स्वामित्वाची इतकीच खूण असावी कीं, तुझ्या फौजेचा झेंडा भगवा असावा. तेव्हांपासून शिवाजीनें आपल्या फौजेंत भगव्या झेंड्याची चाल पाडली असें म्हणतात. शूद्र वगैरे खालच्या जातीच्या हिंदूंत जोहार म्हणण्याच्या ठिकाणीं रामराम म्हणण्याची जी चाल पडली आहे तीही शिवाजीनें ह्याच्या सांगण्यावरून नवी पाडिली.

रामदास निवांतपणें राहाण्याकरितां साताऱ्याजवळ परळी नांवाचा किल्ला आहे तेथें जाऊन रहात असे. तेथें शिवाजीराजा त्याची बरदास्त ठेवी. रामदास तेथें राहिल्यामुळें त्या ठिकाणीं संतमंडळी जाऊं येऊं लागली, म्हणून त्या किल्ल्यास सज्जनगड असें नांव पडलें. त्या वेळच्या ह्या साधुसंतांकडून रामदासाला विशेष मान मिळत असे. येथेंच रामदास वृद्ध होऊन आपल्या वयाच्या ७३ व्या वर्षी समाधिस्थ झाला. त्याचे संप्रदायी पुष्कळ आहेत, त्यांस रामदासी असें म्हणतात.

रामदासाच्या ओव्या, श्लोक व अभंग पुष्कळ आहेत. त्याची कविता सुलभ भक्तिरसप्रधान आहे. ह्याची भाषा साधी व जोरदार आहे.

रामदासाचा जन्मशक १५३० ( चैत्र शुद्ध ९ ). समाधिशक १६०३ ( माघ वद्य ८ ).

ह्यानें केलेले प्रसिद्ध ग्रंथ :—(१) स्फुट अभंग, (२) दासबोध, (३) मनाचे श्लोक, (४) समासआत्माराम. दासबोध व इतर रामदासी वाङ्मय अनेकांनीं प्रसिद्ध केलें आहे, परंतु श्री. शंकर श्रीकृष्ण देव ( सत्कार्योत्तेजकसभा ) यांनीं संपादून प्रसिद्ध केलेलें जास्त अधिकृत आहे.

विशेष माहितीकरितां पहा :—श्रीसमर्थचरित्र—स. खं. आळतेकर; श्रीसमर्थचरित्र ( तीन खंड )—शं. श्री. देव ; श्रीरामदास—न. र. फाटक ; Ramdas and Ramdasis—W. S. Deming.

---

## स्फुट अभंग.

### वेंचे, रामदासाच्या अभंगांतील.

(१)

सुखाचे सांगाती सर्वही मीळती । दुःख होतां जाती निघोनीयां ॥ १ ॥
निघोनीयां जाती संकटाचे वेळे । सुख होतां मीळे समुदाव ॥ २ ॥
समुदाव सर्व देहाचे संबंधी । तुटली उपाधी रामदासीं ॥ ३ ॥

(२)

मूर्ख तो संसारीं माझें माझें करी । मृत्यु बरोबरी हिंडतसे ॥ १ ॥
हिंडतसे काळ सांगातीं सरीसा । धरी भरंवसा नेणोनीयां ॥ २ ॥
नेणोनीयां प्राणी संसाराशी आला । आला तैसा गेला दैन्यवाणा ॥ ३ ॥
दैन्यवाणा गेला सर्वहि सोडोनी । ठेवीलें जोडोनी जनालागीं ॥ ४ ॥
लागलेली मळी दोषाची सुटेना । आसक्ती तुटेना अंतरींची ॥ ५ ॥
अंतरींची मूर्ति अंतरली दूरी । कदाकाळीं हरी आठवेना ॥ ६ ॥
आठवेना अंत-काळीं रामावीण । धन्य तें मरण दास म्हणे ॥ ७ ॥

(३)

सुख पाहों जातां कोठेंचि न दिसे । संसार हा असे दुःख-मूळ ॥ १ ॥
दुःख-मूळ जन्म नर आणि नारी । पाहतां संसारीं सुख नाहीं ॥ २ ॥
सुख नाहीं कदा शाश्वतावांचूनी । जाणती सुज्ञानी दास म्हणे ॥ ३ ॥

(४)

साधू-संगें साधू भोंदू-संगें भोंदू । वादा-संगें वादू होत असे ॥ १ ॥
होत असे भला भल्याच्या संगतीं । जाय अधोगती दुष्ट-संगें ॥ २ ॥
दुष्ट-संगें दुष्ट जाला महा-पापी । होतसे निष्पापी साधू-संगें ॥ ३ ॥
संग जया जैसा लाभ तया तैसा । होतसे आपैसा[1] अनायासें ॥ ४ ॥
अनायासें गती चुके अधोगती । धरीतां संगतीं सज्जनांची ॥ ५ ॥
सज्जनांची कृपा जयालागीं होय । तयालागीं सोय परत्रांची ॥ ६ ॥
परत्रांची सोय भक्तीच्या उपायें । चुकती अपाय दास म्हणे ॥ ७ ॥

(५)

तोंवरी तोंवरी डगमगीना कदा । देहाची आपदा झाली नाहीं ॥ १ ॥
तोंवरी तोंवरी परमार्थ स्वयंभ । जंव पोटीं लोभ आला नाहीं ॥ २ ॥
तोंवरी तोंवरी अत्यंत सद्भाव । विशेष वैभव आलें नाहीं ॥ ३ ॥
तोंवरी तोंवरी सांगे निराभिमान । देहासी अभि-मान आला नाहीं ॥ ४ ॥
तोंवरी तोंवरी धीरत्वाची मात । प्रपंची आघात जाला नाहीं ॥ ५ ॥
रामदास म्हणे अवघेची गाबाळी[2] । ऐसा विरळा बळी धैर्यवंत ॥ ६ ॥

(६)

कर्ता एक देव तेणें केलें सर्व । तयापाशीं गर्व कामा नये ॥ १ ॥
देह हें देवाचें वित्त कुबेराचें । तेथें या जीवाचें काय आहे ॥ २ ॥
देता देवविता नेता नेवविता । कर्ता करविता देव एक ॥ ३ ॥
निमित्ताचा धनी केला असे प्राणी । पाहतां निर्वाणीं देव एक ॥ ४ ॥
लक्ष्मी ही देवाची सर्व सत्ता त्याची । त्यावीण जीवाची ऊर्मी नाहीं ॥ ५ ॥
दास म्हणे मना सावध असावें । दुश्चित नसावें कदाकाळ ॥ ६ ॥

(७)

ऐसा कोण आहे मुकीयाचा जाण[3] । कळे लक्षण न सांगतां ॥ १ ॥
न सांगतां जाणे अंतरींचा हेत । पुरवी मनोरथ सर्व कांहीं ॥ २ ॥
सर्व कांहीं जाणे चतुरांचा राणा । धन्य नारायणा लीला तुझी ॥ ३ ॥
तुझी लीला जाणे ऐसा कोण आहे । विरिंची तो पाहे चाकाटला[4] ॥ ४ ॥
चाकाटला[4] मनु देवासी पाहतां । दास म्हणे आतां सीमा जाली ॥ ५ ॥

१ आपोआप. २ अजागळ-अप्रयोजक. ३ जाणता. ४ चकित झाला.

(८)

शौच केलें तेणें शुचिर्भूत जाला । जळस्नानें केला मल-त्याग ॥ १ ॥
मल-त्यागें जालें शरीर निर्मळ । अंतरींचा मळ कैसा जातो ॥ २ ॥
कैसा जातो काम क्रोध लोभ दंभ । नांदती स्वयंभ अंतर्यामीं ॥ ३ ॥
अंतर्यामीं आधीं होईजे निर्मळ । तेणें तुटे मूळ संसारींचें ॥ ४ ॥
संसारींचें मूळ सूक्ष्मीं गुंतलें । मन विगुंतलें विभ्रमासी ॥ ५ ॥
वि-भ्रमासी बरें शोधुनी पहावें । अंतरीं राहावें निष्ठावंत ॥ ६ ॥
निष्ठावंत ज्ञान पूर्ण समाधान । मग संध्या-स्नान सफळित ॥ ७ ॥
सफळित संध्या संदेह नसतां । निःसंदेह होतां समाधान ॥ ८ ॥
समाधान नाहीं स्नान-संध्या काई । लौकिकाचे ठायीं लोक-लाज ॥ ९ ॥
लोकलाजे सर्व लौकीकचि केला । देव दूरावला वरपंगें ॥१०॥
वरपंगें देव कदा सांपडेना । निष्टेचा घडेना भक्ति-भाव ॥११॥
भक्ति ते भावेची भाव तो जायाचा । कर्म लौकिकाचा खटाटोप ॥१२॥
खटाटोपें देव कदा पाविजेना । निश्चय घडेना शाश्वताचा ॥१३॥
शाश्वताचा शोध अंतरीं असतां । सर्वहि पाहतां निरर्थक ॥१४॥
निरर्थक तीर्थें निरर्थक व्रतें । दास म्हणे जेथें ज्ञान नाहीं ॥१५॥

(९)

बाळक जाणेना मातेसी । तिचें मन बाळापासीं ॥ १ ॥
तैसा देव हा कृपाळू । करी भक्ताचा सांभाळू ॥ २ ॥
धेनु वत्साचेनि लागें । धांवे त्याच्या मागेंमागें ॥ ३ ॥
पक्षी वेंचतसे गगन । पिलांपाशीं त्याचें मन ॥ ४ ॥
मत्स्य आठवितां पाळी । कूर्म दृष्टीनें सांभाळी ॥ ५ ॥
रामीरामदास म्हणे । माया-जाळाचीं लक्षणें ॥ ६ ॥

(१०)

ऐसें कैसें रे सोंवळें । शिवतां होतसे ओंवळें ॥ १ ॥
स्नान संध्या टिळे माळा । पोटीं क्रोधाचा उमाळा ॥ २ ॥
नित्य दंडीतोसी देह । परी फिटेना संदेह ॥ ३ ॥
नित्य नेम खटाटोप । मनीं विषयाचा जप ॥ ४ ॥
बाह्य केली झळफळ । देह-बुद्धीचा विटाळ ॥ ५ ॥
रामदास दृढ-भाव । तयावीण सर्व वाव ॥ ६ ॥

(११)

देह विटाळाचा गोळा । कैसा होतोसी सोंवळा ॥ १ ॥
तुज कळेना विचारू । ऐसीयासी काय करूं ॥ २ ॥
दृढ केला अभिमान । तेणें जाहलें बंधन ॥ ३ ॥
रामदास स्वामीविण । केला तितुकाही शीण ॥ ४ ॥

(१२)

काळ जातो क्षणक्षणा । मूळ येईल मरणा ॥ १ ॥
कांहीं धांवाधांव करीं । जंव तो आहे मृत्यु दुरी ॥ २ ॥
देह आहे जाईजणें[1] । भूललासी कोण्या गुणें ॥ ३ ॥
माया-जाळीं गुंतलें मन । परि हें दुःखासी कारण ॥ ४ ॥
सत्य वाटतें सकळ । परि हें जातां नाहीं वेळ ॥ ५ ॥
रामीरामदास म्हणे । आतां सावधान होणें ॥ ६ ॥

(१३)

अंत-काळ येतो येतां । तेथें न ये चुकवीतां ॥ १ ॥
अकस्मात लागे जावें । कांहीं पुण्य आचरावें ॥ २ ॥
पुण्येंविण जातां प्राणी । घडे यमाची जाचणी ॥ ३ ॥
रामदास म्हणे जना । कठिण यमाच्या यातना ॥ ४ ॥

(१४)

ज्याच्या उदरासी आला । त्यासि फिरोनी पडला ॥ १ ॥
तोचि जाणावा चांडाळ । देव-ब्राह्मणांचा काळ ॥ २ ॥
जाला स्त्रियेचा लंपट । माय-बापांसी उद्धट ॥ ३ ॥
भय पापाचें न धरी । सज्जनांची निंदा करी ॥ ४ ॥
नेणे माय कीं मावसी । कोणें सांगावें तयासी ॥ ५ ॥
रामीरामदास म्हणे । यम केला त्याकारणें ॥ ६ ॥

(१५)

कोणी पुत्र कामा न ये । मित्र करी तो उपाये ॥ १ ॥
कैचें आपूलें परावें । अवघें ऋणानुबंधें घ्यावें ॥ २ ॥
जिवलग जीव घेती । त्यासी परावे रक्षिती ॥ ३ ॥
जिवलगाचिये परी । मातेहुनी लोभ करी ॥ ४ ॥
रामीरामदास म्हणे । न कळे देवाचें करणें ॥ ५ ॥

---

1 जाणारा—नश्वर.

(१६)

घात करूनी आपुला । काय रडवीसी पूढिलां ॥ १ ॥
बहुत मोलाचें आयुष्य । विषय-लोभें केला नाश ॥ २ ॥
नाहीं वोळखिलें सत्या । तेणें केली आत्म-हत्या ॥ ३ ॥
नर-देहाची संगती । गेली गेली हातोहातीं ॥ ४ ॥
नाहीं देहाचा भरंवसा । गेली गेली रे वयसा ॥ ५ ॥
रामीरामदास म्हणे । भुलों नको मूर्खपणें ॥ ६ ॥

(१७)

कोणें कोणासी रडावें । एकामागें एकीं जावें ॥ १ ॥
एक वेळ गेली माता । एक वेळ गेला पिता ॥ २ ॥
द्रव्य दारा जाती पुत्र । जिवलग आणि मित्र ॥ ३ ॥
प्राणी संसारासी आला । तितुका मृत्यु-पंथें गेला ॥ ४ ॥
पूर्वज गेले देवापासीं । तेची वाट आपणासी ॥ ५ ॥
रामदास म्हणे लोक । करिती गेलीयाचा शोक ॥ ६ ॥

(१८)

ज्याचें होतें तेणें नेलें । येथें तुझें काय गेलें ॥ १ ॥
वेगीं होई सावधान । करीं देवाचें भजन ॥ २ ॥
गति न कळे होणाराची । हे तों इच्छा भगवंताची ॥ ३ ॥
पूर्व संचिताचें फळ । होती दुःखाचे कल्लोळ ॥ ४ ॥
पूर्वीं केलें जें संचित । तें तें भोगावें निश्चित ॥ ५ ॥
दास म्हणे पूर्व-रेखा । प्राप्त न टळे ब्रह्मादिकां ॥ ६ ॥

(१९)

आतां कोठें धरूं भाव । बहुसाल जाले देव ॥ १ ॥
एकाहुनी एक थोर । मुख्य पूजा पारंपर ॥ २ ॥
माझे कुळींचीं दैवतें । सांगों जातां असंख्यातें ॥ ३ ॥
रामदासा देव एक । येर सर्वही मायिक ॥ ४ ॥

(२०)

आतां शरण कोणा जावें । सत्य कोणातें मानावें ॥ १ ॥
नाना-पंथ नाना-मतें । भू-मंडळीं असंख्यातें ॥ २ ॥
एक मानिती स-गुण । एक म्हणती निर्गुण ॥ ३ ॥
एकीं केला सर्व-त्याग । एक म्हणती राज-योग ॥ ४ ॥
रामदास सांगे खूण । भक्तिवीण सर्व शीण ॥ ५ ॥

(२१)

शरण जावें संत-जनां । सत्य मानावें निर्गुणा ॥ १ ॥
नाना मतीं काय चाड । करणें सत्याचा नीवाड ॥ २ ॥
ज्ञानें भक्तीस जाणावें । भक्ति तयेसी म्हणावें ॥ ३ ॥
रामीरामदास सांगे । सर्व-काळ संत-संगें ॥ ४ ॥

(२२)

एक देव आहे खरा । मायें नाथिला[१] पसारा ॥ १ ॥
हेंचि विचारें जाणावें । ज्ञाता तयासी म्हणावें ॥ २ ॥
रामदासाचें बोलणें । स्वप्नापरी जाईजणें[२] ॥ ३ ॥

(२३)

गेला प्रपंच हातींचा । लेश नाहीं परमार्थाचा ॥ १ ॥
दोहींकडे अंतरला । थोरपणें भांबावला ॥ २ ॥
गेली अवघी निस्पृहता । नाहीं स्वार्थही पूरता ॥ ३ ॥
क्रोधें गेला संत-संग । लोभें जाहला विरंग[३] ॥ ४ ॥
पूर्ण जाली नाहीं आशा । इकडे बुडाला अभ्यासा[४] ॥ ५ ॥
दास म्हणे क्रोधें केलें । अवघें लाजिरवाणें जालें ॥ ६ ॥

(२४)

संग स्वार्थाचा धरिला । तेणें काम बळावला ॥ १ ॥
थोरपण हें मातलें । तेणें अव्हाटीं घातलें ॥ २ ॥
कामामागें आला क्रोध । क्रोधें केला बहु खेद ॥ ३ ॥
लोभ दंभाचें कारण । मोहें केलें विस्मरण ॥ ४ ॥
कामीं लांचावलें मन । जालें बुद्धीचें पतन ॥ ५ ॥
दास म्हणे हें सकळ । अवघें अनर्थाचें मूळ ॥ ६ ॥

(२५)

काम क्रोध खवळला । तोचि सान्निपात जाला ॥ १ ॥
यासी औषध करावें । पोटीं वैराग्य धरावें ॥ २ ॥
कु-पथ्य अवघें जें जालें । मग तें पुढें उफाळलें ॥ ३ ॥
रामदास सांगे भलें । लोक म्हणती पीसाळलें ॥ ४ ॥

---

१ व्यापिला. २ नाशवंत. ३ तेजोहीन. ४ आत्मानुसंधानाला, ईश्वरचिंतनाला.

(२६)

व्यर्थ माया-जाळीं गुंतोनि राहासी । हित गमावीसी आपुलें तें ॥ १ ॥
गृह दारा सुत नव्हेत अंतींचीं । मग इतरांची काय आशा ॥ २ ॥
सर्व हें सांडोनी जाशील बा झणी । काळ तो बांधोनी नेई तुज ॥ ३ ॥
तेथें सोडवीता नसे तूज कोणी । एका चक्रपाणीवांचोनियां ॥ ४ ॥
नको गुंतुं गळीं[1] मायिकासि टाळीं । स्व-हित सांभाळीं भिक्षु म्हणे ॥ ५ ॥

(२७)

वाजे पाऊल आपुलें । म्हणे मागें कोण आलें ॥ १ ॥
कोण धांवतसे आड । पाहों जातां जालें झाड ॥ २ ॥
भावीतसे अभ्यंतरीं । कोण चाले बरोबरी ॥ ३ ॥
शब्द-पडसाद ऊठला । म्हणे कोण रे बोलिला ॥ ४ ॥
रामीरामदास म्हणे । संशयाचीं हीं लक्षणें ॥ ५ ॥

(२८)

कांहीं दिसे अकस्मात । तेथें वाटे आलें भूत ॥ १ ॥
वायां पडावें संदेहीं । मुळीं तेथें कांहीं नाहीं ॥ २ ॥
झाड-झुडूप देखिलें । जिवीं वाटे कोणी आलें ॥ ३ ॥
रामदास सांगे खूण । भितो आपणा आपण ॥ ४ ॥

(२९)

छाया देखुनी आपली । शंका अंतरीं वाटली ॥ १ ॥
ऐसें भ्रमाचें लक्षण । भुले आपणा आपण ॥ २ ॥
मुखें बोलतां उत्तर । तेथें जालें प्रत्युत्तर ॥ ३ ॥
डोळां घालितां आंगोळी । एकाचीं तीं दोन जालीं ॥ ४ ॥
पोटीं आपण कल्पिलें । तेंचि आलेंसें वाटलें ॥ ५ ॥
दास म्हणे हा उपाधी । शंका धरितां अधिक बाधी ॥ ६ ॥

(३०)

नाहीं एक उपासना । कैंची भक्तीची वासना ॥ १ ॥
नाहीं निश्चय अंतरीं । मन फिरे दारोदारीं ॥ २ ॥
ज्यासी नाहीं एक देव । सातांपांचा ठायीं भाव ॥ ३ ॥
नानाकार जालें मन । कैंचें निष्ठेचें भजन ॥ ४ ॥
रामीरामदास म्हणे । निष्ठेवीण सर्व सुनें ॥ ५ ॥

---

[1] मायापाशांत.

(३१)

जया ज्ञान हें नेणवे । पशु तयासी म्हणावें ॥ १ ॥

कोणें केलें चराचर । कोण विश्वाचा आधार ॥ २ ॥

ब्रह्मादिकांचा निर्मिता । कोण आहे व्यापरता ॥ ३ ॥

अनंत ब्रह्मांडाच्या माळा । हे तों भगवंताची लीळा ॥ ४ ॥

रामदासाचा विवेक । सर्व-कर्ता देव एक ॥ ५ ॥

(३२)

ज्ञानाविणें जे जे कळा । ते ते जाणावी अव-कळा ॥ १ ॥

ऐसें भगवंत बोलिला । चित्त द्यावें त्याच्या बोला ॥ २ ॥

एकें ज्ञानेंची सार्थक । सर्व कर्म निरर्थक ॥ ३ ॥

दास म्हणे ज्ञानाविण । प्राणी जन्मला पाषाण ॥ ४ ॥

(३३)

अस्थीचा विटाळ होतां स्नान केलें । चुडे दांतवले[1] कासयासी ॥ १ ॥

आचमन करावें शूद्राच्या विटाळें । हात्यांचे चोंढाळें[2] कोण आणे ॥ २ ॥

नदीचे प्रवाहीं आंत पाहों नये । स्नान-संध्या होय अर्घोदकीं ॥ ३ ॥

ओलें चर्मी शुद्ध होत आहे लिंग । स्वयंपाकीं सांग रांधिताती ॥ ४ ॥

रामदास म्हणे हें कोणा न पाहे । देह मूळीं आहे विटाळाचा ॥ ५ ॥

(३४)

चित्त आहे कैसें मळिण तें कैसें । शुद्ध होतें कैसें विचारावें ॥ १ ॥

वैद्य ओळखीतां रोगाहि कळेना । औषध मिळेना प्रचीतीचें ॥ २ ॥

अनुमानें देव अनुमानें भक्त । अनुमानें मुक्त अनुमानी ॥ ३ ॥

अनुमानें केलें अनुमानें कल्पिलें । निष्फळ जाहलें सर्व कांहीं ॥ ४ ॥

सर्व कांहीं बरें प्रचीति आलिया । दास म्हणे वायां अ-प्रचीति ॥ ५ ॥

(३५)

प्रत्ययाचें ज्ञान तेंचि तें प्रमाण । येर अ-प्रमाण सर्व कांहीं ॥ १ ॥

सर्व कांहीं धर्म आणि कर्माडकर्म । चुकलिया वर्म व्यर्थ जातो ॥ २ ॥

व्यर्थ जातो जन्म ज्ञानावांचुनियां । केले कष्ट वायां निरर्थक ॥ ३ ॥

निरर्थक जन्म पशुचिया परी । जंव तें अंतरीं ज्ञान नव्हे ॥ ४ ॥

ज्ञान नव्हे सोपें तें आधीं पहावें । शाश्वत शोधावें दास म्हणे ॥ ५ ॥

---

१ हस्तिदंताचें भूषण. २ जातिधर्मविरहित आचरण.

(३६)

प्रपंचीं तें भाग्य परमार्थीं वैराग्य। दोन्ही यथासांग दोहींकडे ॥ १ ।
दोहींकडे सांग होतां ते समर्थ। नाहीं तरी व्यर्थ तारांबळी[१] ॥ २ ।
तारांबळी होते विचार नसतां। दास म्हणे आतां सावधान ॥ ३ ।

(३७)

पतित हे जन करावे पावन। तेथें अनुमान करूं नये ॥ १ ॥
करूं नये गुण-दोष-उठाठेवी। विवेकें लावावी बुद्धि जना ॥ २ ॥
बुद्धि सांगे जना त्या नांव सज्जन। पतित-पावन दास म्हणे ॥ ३ ॥

(३८)

माता पिता जन स्वजन कांचन। प्रिया-पुत्रीं मन गोवूं नको ॥ १ ॥
गोवूं नको मन राघवावांचूनि। लोक-लाज जनीं लागलीसे ॥ २ ॥
लागलीसे परी तूवां न धरावी। स्व-हितें करावी राम-भक्ति ॥ ३ ॥
राम-भक्तिविण होसील हिंपुटी। एकलें शेवटीं जाणें लागे ॥ ४ ॥
जाणें लागे आतां बाळा सु-लक्षणा। ध्याईं राम-राणा दास म्हणे ॥ ५ ॥

(३९)

काया हे काळाची घेवोनि जाणार। तुझेनि होणार काय बापा ॥ १ ॥
काय बापा ऐसें जाणोनि नेणसी। मी मी म्हणसी वायांवीण ॥ २ ॥
वायांवीण शीण केला जन्मवरी। दंभ लोकाचारी नागवण ॥ ३ ॥
नागवण आली पर-लोका जातां। स्व-हिताची चिंता केली नाहीं ॥ ४ ॥
केली नाहीं चिंता नामीं कानकोडें[२]। अंतीं कोण्या तोंडें जात असे ॥ ५ ॥
जात असे सर्व सोडोनि करंटा। जन्मवरी ताठा धरूनियां ॥ ६ ॥
धरूनियां ताठा कासया मरावें। भजन करावें दास म्हणे ॥ ७ ॥

(४०)

रावणासारखी कोणाची संपत्ति। तोही गेला अंतीं एकलाची ॥ १ ॥
एकलाचि गेला वाळी तो वानर। कपि थोर थोर तेही गेले ॥ २ ॥
गेले चक्रवर्ती थोर वैभवाचे। फार आयुष्याचे ऋषीश्वर ॥ ३ ॥
ऋषीश्वर गेले मार्कंडासारिखे। इतरांचे लेखे कोण करी ॥ ४ ॥
कोण करी सर्व शाश्वत आपुलें। सर्व राज्य गेलें कौरवांचें ॥ ५ ॥
कौरव निमाले, पांडव गळाले। यादवहि गेले एकसरें ॥ ६ ॥

---

१ त्रेधा-ओढाताण. २ चोरटे, साशंक.

एकसरें गेले राजे थोर थोर । आणिक श्रीधर भाग्यवंत ॥ ७ ॥
भाग्यवंत गेले एकामागें एक । हरिश्चंद्रादिक पुण्य-शीळ ॥ ८ ॥
पुण्य-शीळ गेले कीर्ति ठेवुनीयां । पापी गेले वायां अधोगती ॥ ९ ॥
अधोगती गेले देवा न भजतां । संसारीं म्हणतां माझें माझें ॥ १० ॥
माझें माझें करी साचाचिये परी । अंतीं दुराचारी एकलाचि ॥ ११ ॥
एकलाचि येतां एकलाचि जातां । मध्येंचि दुश्चिता माया-जाळ ॥ १२ ॥
माया-जाळीं पापी जन गुंडाळले । पुण्य-शीळ गेले सुटोनियां ॥ १३ ॥
सुटोनियां गेले सायुज्य-पदासी । गर्भारामदास चिरंजीव ॥ १४ ॥

(४१)

वासनेचि झाडा कु-बुद्धि वांकुडा । वाजे हुडहुडा ममतेचा ॥ १ ॥
वैराग्याचा वन्हि विझोनियां गेला । संचित त्यायाला पुण्य नाहीं ॥ २ ॥
भक्ति पांघरूण तें माझें सांडलें । मज वोसंडिलें संत-जनीं ॥ ३ ॥
नाम-संजीवनी मुखीं नाहीं पाणी । निंदेचि पोहणी[1] प्रबळली ॥ ४ ॥
रामदास म्हणे ऐसीयाचें जिणें । सदा दैन्यवाणें रामेंवीण ॥ ५ ॥

(४२)

देऊळाचे मिसें द्रव्य तें जोडावें । गांठीचें मोडावें पुण्य-धन ॥ १ ॥
ऐसी तें काय न घडे प्राण्याला । व्यय करण्याला आग लागो ॥ २ ॥
राजाई हे याचे कथन करावें । धन्य म्हणवावें लोकांहातीं ॥ ३ ॥
राजसा तामसा राघवाची भेटी । गेल्या जन्म-कोटी तरी नाहीं ॥ ४ ॥
रामदास म्हणे करितां निवाड । सोडवितां खोड मान तुझा ॥ ५ ॥

(४३)

करोनी कीर्तन योग्यता मिरवणें । देशोदेशीं जाणें द्रव्यासाठीं ॥ १ ॥
द्रव्य येतां पुढें प्रेमानें कीर्तन । सुचविता मान-धन इच्छा ॥ २ ॥
राजा देऊं जातां देऊळ बांधणें । एवढिया धनें काय होतें ॥ ३ ॥
दाल्यांनीं त्रासावें सर्वांनीं हांसावें । त्या मानवा पावे देव कैसा ॥ ४ ॥
रामदास म्हणे देव तो समीप । गांठीं ऐसें पाप जोडा परी ॥ ५ ॥

(४४)

त्याचे पाय हो नमावे । त्याचें कीर्तन हो एकावें ॥ १ ॥
दुजीयासी सांगे कथा । आपण वर्ते त्याची पथा ॥ २ ॥

1 पाण्याचा खोल प्रवाह.

कीर्तनाचें न करी मोल । जैसे अमृताचे बोल ॥ ३ ॥
सन्मानितां नाहीं सुख । अपमानितां नाहीं दुःख ॥ ४ ॥
किंचित दिलें दातयानें । तेंही घेत आनंदानें ॥ ५ ॥
ऐसा असे हरी-दास । लटकें न वदे रामदास ॥ ६ ॥

(४५)

दीनाचा दयाळु कीर्ति ऐकियेली । म्हणूनी पाहिली वाट तुझी ॥ १ ॥
अनाथाचा नाथ होशील कैवारी । म्हणोनियां हरी बोभाईलें[1] ॥ २ ॥
तुजविण कोण जाणे हें अंतर । कोणासि जौंजार[2] घालूं माझा ॥ ३ ॥
दास म्हणे आम्ही दीनाहुनि दीन । करावें पालन दुर्बळाचें ॥ ४ ॥

(४६)

आम्हा पतितांची सांड केली जरी । आमचा कैवारी कोण आहे ॥ १ ॥
आम्हीं भरंवसा कोणाचा धरावा । सांगावें केशवा दया-निधि ॥ २ ॥
तुजविण आम्हां नाहीं त्रि-भुवनीं । धांवें चक्र-पाणी दीन-बंधु ॥ ३ ॥
पतित-पावन ब्रीद हें बांधिलें । तारावें वहिलें[3] दासालागीं ॥ ४ ॥

(४७)

पळशी तूं तरी नाम कोठें नेशी । आम्ही अहर्निशीं नाम घोकूं ॥ १ ॥
आम्हांपासोनियां जातां न ये तुज । तें हें वर्म बीज नाम जपूं ॥ २ ॥
देवा आम्हां तुझें नाम हो पाहीजे । मग भेटी सहजें देणें लागे ॥ ३ ॥
भोळे भक्त आम्ही चुकलेंचि कर्म । सांपडलें वर्म रामदासा ॥ ४ ॥

(४८)

तुजविण देवा मज कोणी नाहीं । माझी चिंता कांहीं असों द्यावी ॥ १ ॥
वैराग्यें कनिष्ठ अभावें वरिष्ट । माझे मनीं नष्ट संदेहता ॥ २ ॥
विवेकें सांडिलें ज्ञानें ओसंडिलें । चित्त हें लागलें तुझे पायीं ॥ ३ ॥
तुझें नाम वाचे उच्चारीत असें । अंतरीं विश्वास धरियेला ॥ ४ ॥
रामदास म्हणे मी तुझें अज्ञान । माझें समाधान करीं देवा ॥ ५ ॥

(४९)

जाणावा तो नर देवचि साचार । वाचे निरंतर राम राम ॥ १ ॥
सगुणीं सद्भाव नाहीं ज्ञान-गर्व । तयालागीं सर्व सारीखेची ॥ २ ॥

---

१ हाक मारली, बोलाविलें. २ भार, ओझें. ३ सत्वर, लौकर.

निंदका वंदका संकटीं सांभाळी । मन सर्वकाळीं पालटेना ॥ ३ ॥
पुढिल्यासि[1] सदा सुख देत आहे । उपकारीं देह लावीतसे ॥ ४ ॥
लावीतसे देह राम-भजनास । रामीरामदास हरि-भक्त ॥ ५ ॥

(९०)

मी खरा पतित तूं खरा पावन । आतां अनमान करूं नको ॥ १ ॥
आतां कांहीं मज चिंता तीही नसे । तुझें नाम कैसें वाचे येई ॥ २ ॥
समर्थें घेतला नामासाठीं भार । मज उपकार कासयाचा ॥ ३ ॥
रामदास म्हणे तुझें तुज ऊणें । सोयरे पिशून हांसतील ॥ ४ ॥

(९१)

पतित-पावना जानकी-जीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ १ ॥
मिथ्या शब्द-ज्ञानें तुज अंतरलों । संदेहीं पडलों मीपणाच्या ॥ २ ॥
सदा खळखळ[2] निर्गुणाची घडे । सगुण नातुडे ज्ञानी गर्वें ॥ ३ ॥
रामदास म्हणे ऐसा मी पतित । मीपणें अनंत आतुडेना[3] ॥ ४ ॥

(९२)

राम-भक्तिवीण आन नाहीं सार । साराचें हें सार रामनाम ॥ १ ॥
कल्पना-विस्तारू होत असे सत्वरू । आम्हां कल्पतरू चाड नाहीं ॥ २ ॥
कामनेलागोन विटलेंसे मन । तेथें चाड कोण काम-धेनू ॥ ३ ॥
चिंता नाहीं मनीं राम गातां गुणीं । तेथें चिंतामणी कोण पुसे ॥ ४ ॥
कदा नाहीं नाश स्वरूप सुंदरें । तेथें आम्हां हिरे चाड नाहीं ॥ ५ ॥
रामदास म्हणे राम-भक्तिवीणें । जाणावें तें उणें सर्व कांहीं ॥ ६ ॥

(९३)

जीवन्मुक्त प्राणी होऊनियां गेले । तेणें पंथें चाले तोची धन्य ॥ १ ॥
जाणावा तो ज्ञानी पूर्ण समाधानी । निःसंदेह मनीं सर्व काळ ॥ २ ॥
मिथ्या देह-भान प्रारब्धा आधीन । राखे पूर्णपण समाधानीं ॥ ३ ॥
आवडीनें करी कर्म उपासना । सर्व काळ ध्यानारूढ मन ॥ ४ ॥
धन्य पैं ते दास संसार उदास । तयां रामदास नमस्कारी ॥ ५ ॥

---

१ दुसऱ्याला, परक्याला. २ वाग्युद्ध—वाक्-कलह. ३ सांपडत नाहीं.

## भक्तिपर अभंग

(१)

भक्ति नलगे भाव नलगे । देव नलगे आम्हांशी ॥ १ ॥
आम्ही पोटाचे पाईक[१] । आम्हां नलगे आणीक ॥ २ ॥
आम्ही खाऊं ज्यांची रोटी । त्यांची कीर्ति करूं मोठी ॥ ३ ॥
रामीरामदास म्हणे । ऐशीं मूर्खाचीं लक्षणें ॥ ४ ॥

(२)

अन्न व्हावें पोटभरी । मग तें ज्ञान-चर्चा करी ॥ १ ॥
ऐसें बोलती अज्ञान । ज्यांसि नाहीं समाधान ॥ २ ॥
आधीं अन्न तों पाहिजे । मग ध्यानस्थ राहिजे ॥ ३ ॥
अन्नावीण तळमळ । अन्न करी तें सकळ ॥ ४ ॥
कैंचा राम कैंचा दास । अवघे पोटाचे सायास ॥ ५ ॥

(३)

देव एका भाग्य देतो । एका भीकेसि लावितो ॥ १ ॥
न कळे भगवंताचें करणें । राव रंक तत्क्षणें ॥ २ ॥
तयासि चुकलीं बापुडीं । अन्न अन्न करिती वेडीं ॥ ३ ॥
रामदास म्हणे पाहीं । देवावीण कांहीं नाहीं ॥ ४ ॥

(४)

क्षुधा लागतांचि अन्न । तृषा लागतां जीवन ॥ १ ॥
निद्रा लागतां शयन । आळस येतां चुके मन ॥ २ ॥
मळ-मूत्र संपादणें । शौच आचमन करणें ॥ ३ ॥
खाणें लागे नानापरी । सर्व काळ भरोवरी ॥ ४ ॥
अवघा धंदाची लागला । दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
रामीरामदास म्हणे । देह सुखवाडा[२] करणें ॥ ६ ॥

(५)

सीत-काळींच हुताश । उष्ण-काळीं वारा वास ॥ १ ॥
आले पर्जन्याचे दिवस । केले घराचे सायास ॥ २ ॥
नाना व्याधींचीं औषधें । पथ्य करावें निरोधें[३] ॥ ३ ॥
विषयी-जनासी आदर । करणें लागे निरंतर ॥ ४ ॥

---

१ चाकर. २ सुखाचें आगर. ३ प्रतिबंधानें.

अवघा धंदाची लागला। दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
दास म्हणे सांगों किती । ऐसी देहाची संगती ॥ ६ ॥

(६)

पोट-धंदा जन्मवरी । करूं जातां नाहीं पुरी ॥ १ ॥
करितां संसारीं सायास । नाहीं क्षणाचा अवकाश ॥ २ ॥
अन्न निर्माण कराया । सर्वकाळ पीडी काया ॥ ३ ॥
काम करितां दिवस थोडा । ऐशा कष्टा नाहीं जोडा ॥ ४ ॥
अवघा धंदाची लागला। दिवसें-दिवस काळ गेला ॥ ५ ॥
दास म्हणे सावधान । जालें सदृढ बंधन ॥ ६ ॥

(७)

शिंक जांभई खोकला । तितुका काळ व्यर्थ गेला ॥ १ ॥
आतां ऐसें न करावें । नाम जीवीं तें धरावें ॥ २ ॥
श्वास उच्छ्वास निघतो । तितुका काळ व्यर्थ जातो ॥ ३ ॥
पात्या[1] पातें न लागत । तितुकें वय व्यर्थ जात ॥ ४ ॥
लागे अवचित उचकी । तितुकें वय काळ लेखी ॥ ५ ॥
म्हणे रामीरामदास । होतो आयुष्याचा नाश ॥ ६ ॥

---

## कलियुगपंचक

(१)

आलें भगवंताच्या मना । तेथें कोणाचें चालेना ॥ १ ॥
जैसा कली राजा जाला । धर्म अवघाची बूडाला ॥ २ ॥
नीति मर्यादा उडाली । भक्ति देवाची बुडाली ॥ ३ ॥
दास म्हणे पाप जालें । पुण्य अवघेंचि बुडालें ॥ ४ ॥

(२)

विप्रीं सांडिला आचार । क्षेत्रीं सांडिला विचार ॥ १ ॥
मेघ-वृष्टी मंदावली । पिकें भूमीनें सांडीलीं ॥ २ ॥
बहु-वृष्टी अनावृष्टी । दास म्हणे गेली सृष्टी ॥ ३ ॥

(३)

लोक दोष आचरती । तेणें दोषें भस्म होती ॥ १ ॥
जनीं दोष जाहले फार । तेणें होतसे संहार ॥ २ ॥
रामदास म्हणे बळी । दिसें दिसें पापें कळीं ॥ ३ ॥

---

१ डोळ्याच्या पात्यास.

(४)

नाहीं पापाचा कंटाळा । येतो हव्यास आगळा ॥ १ ॥
जना सु-बुद्धि नावडे । मन धांवे पापाकडे ॥ २ ॥
रामीरामदास म्हणे । पुण्य उणें पाप दुणें ॥ ३ ॥

(५)

पुण्यक्षेत्रें तीं मोडावीं । आणि ब्राह्मण्यें[1] पीडावीं ॥ १ ॥
पुण्यवंत ते मरावे । पापी चिरंजीव व्हावे ॥ २ ॥
रामदास म्हणे वाड[2] । विघ्नें येती धर्माआड ॥ ३ ॥

---

## मूर्खपणपंचक

(१)

येथें काय रे वाजतें । कोठें काय गजबजितें ॥ १ ॥
उगा करीती कोल्हाळ । माझें ऊठलें कपाळ ॥ २ ॥
हांका मारूनि वरडती । टाळ अववेचि कूटिती ॥ ३ ॥
कोठें कैचे आले लुटे । वायां जाले टाळकुटे ॥ ४ ॥
वेडिं संसार सांडिला । व्यर्थ गलबला मांडिला ॥ ५ ॥
दास म्हणे या मूर्खाला । हरि-कथेचा कंटाळा ॥ ६ ॥

(२)

हरि-कथेचा आला राग । खेळ होतां घाली त्याग[3] ॥१॥
ऐसे प्रकारचे जन । नाहीं देवाचें भजन ॥ २ ॥
कळावंतांचें जें गाणें । ऐकतांची जीव माने[4] ॥ ३ ॥
करिती लग्नाचा उत्साव । नाहीं देव-महोत्साव[5] ॥ ४ ॥
भूत-दया नाहीं पोटीं । खाती लोभाचीं चोरटीं ॥ ५ ॥
रामीरामदास म्हणे । देवधर्म कोण जाणे ॥ ६ ॥

(३)

स्वार्थ केला जन्मवरी । लोभें राहीला श्री-हरी ॥ १ ॥
धन धान्य अहर्निशीं । गाई महिषी घोडे दासी ॥ २ ॥
शेत वाडे घर ठावो । प्राणी जीवीं धरी हावो ॥ ३ ॥
माता पिता बहिणी भ्राता । कन्या पुत्र आणि कांता ॥४॥

---

१ ब्राह्मणांचे समुदाय. २ मोठीं. ३ उडी. ४ हर्षे. ५ महा+उत्साव–मोठा उत्साह.

व्याही जांवई आपुले । इष्ट मित्र सुखी केले ॥ ५ ॥
दास म्हणे वो शेवटीं । प्राप्त जाली मसणवटी ॥ ६ ॥

(४)

जन्मवरी शीण केला । अंत-काळीं व्यर्थ गेला ॥ १ ॥
काया स्मशानीं घातली । कन्या-पुत्र मुरडलीं[1] ॥ २ ॥
घर वाडा तो राहिला । प्राणी जातसे एकला ॥ ३ ॥
धन धान्य तें राहिलें । प्राणी चरफडित गेले ॥ ४ ॥
इष्ट मित्र आणि सांगाती । आपुलाले घरा जाती ॥ ५ ॥
दास म्हणे प्राणी मेले । कांहीं पुण्य नाहीं केलें ॥ ६ ॥

(५)

दैन्यवाणा जाला प्राणी । चंद्री लागली नयनीं ॥ १ ॥
म्हणती ऊचला ऊचला । आतां भूमी-भार जाला ॥ २ ॥
घोर लागला अमूप । प्राणी जाला प्रेत-रूप ॥ ३ ॥
दांतखिळी बसली वदनीं । ताठा भरला कर-चरणीं ॥ ४ ॥
डोळे विक्राळ दीसती । झांका झांका मुलें भीती ॥ ५ ॥
रामीरामदास म्हणे । अवघीं सुखाचीं सुणें[2] ॥ ६ ॥

---

## वेंचे, दासबोधांतील.[3]

### ओव्या—कविवर्णन ( दशक १, समास ७ ).

आतां वंदूं कवीश्वर[4] । जे शब्द-सृष्टीचे ईश्वर ॥ नातरी हे परमेश्वर[5] ।

---

१ परतलीं. २ कुत्रीं. ३ हा ग्रंथ अति विस्तृत असून समर्थांनीं ह्यांत केलेला उपदेश समाजांतील सर्व स्थितींतील लोकांस उपयुक्त असा आहे ; म्हणजे राजे, श्रीमंत व गरीब ह्या सर्वांसही तो उपदेश घेण्यासारखा आहे. प्रपंच उत्तम प्रकारें साधून परमार्थसाधनही कसें करावें, ह्याचा ह्या ग्रंथांत चांगला उलगडा केला आहे. ४ येथें कवि-शब्दानें केवळ कविता करणारेच विवक्षित नाहींत. निरनिराळ्या विषयांवरचे जें ग्रंथ लिहिणारे आहेत तेही विवक्षित आहेत. ५ सर्वशक्तिमान्. ह्याच ओवींत मागें कवींस 'शब्दसृष्टीचे ईश्वर,' असें म्हटलें आहे. पण ह्यांत ब्रह्मदेवाप्रमाणें कवींस नियमित सृष्टिकर्तृत्व येतें, तसें न यावें म्हणून त्यांस परमेश्वर म्हणजे ईश्वरापेक्षां ( ब्रह्मदेवापेक्षां ) मोठे ईश्वर असें म्हटलें. ह्याचें कारण कीं, ब्रह्मदेवाच्या सृष्टींत मुख तें मुखच ; कमल तें कमलच असा नियम आहे. पण कविसृष्टींत मुखाचें कमल, कमलाचें मुख, असें पाहिजे तसें होतें. ह्यावरून ब्रह्मदेवापेक्षांही कवीचें सामर्थ्य अधिक आहे असें सुचविलें.

वेदावतारी ॥ १ ॥ कीं हे सरस्वतीचें निजस्थान । कीं हे नाना-कळांचें[१] जीवन[१] ॥ नाना शब्दांचें भुवन । यथार्थ होय ॥ २ ॥ कीं हे पुरुषार्थाचें[२] वैभव[२] । कीं हे जगदीश्वराचें महत्त्व ॥ नाना-लाघवें सत्कीर्तीस्तव । निर्माण कवी ॥ ३ ॥ कीं हे शब्द-रत्नांचे सागर । कीं हे मुक्तांचे मुक्त-सरोवर[३] ॥ नाना-बुद्धीचे[४] वैरागर[४] । निर्माण जाले ॥ ४ ॥ कवी मुमुक्षूचें[५] अंजन[५] । कवी साधकाचें[६] साधन[६] ॥ कवी सिद्धाचें[७] समाधान[७] । निश्चयात्मक ॥ ५ ॥ कवी स्वधर्माचा आश्रयो । कवी मनाचा[८] मनोजयो[८] ॥ कवी धार्मिकाचा विनयो । विनय-कर्ते ॥ ६ ॥ कवी वैराग्याचें संरक्षण । कवी भक्ताचें भूषण ॥ नाना स्वधर्म-संरक्षण । ते हे कवी ॥ ७ ॥ कवी प्रेमळांची प्रेमळ स्थिति । कवी ध्यानस्थांची ध्यानमूर्ती ॥ कवी उपासकांची वाढ-कीर्ती । विस्तारली ॥ ८ ॥ नाना साधनांचें मूळ । कवी नाना प्रयत्नांचें फळ ॥ नाना कार्य-सिद्धि केवळ । कवींचेनि प्रसादें ॥ ९ ॥ आधीं कवींचा वाग्विलास । तरी मग श्रवणीं तुंबळे रस ॥ कवींचेनि मति-प्रकाश । कवित्वासि होय ॥ १० ॥ कवी व्युत्पन्नाची[९] योग्यता[९] । कवी

---

१ कवि नानाप्रकारच्या कलांवर ग्रंथ लिहितात म्हणून त्या कला राहतात ( जगतात ); म्हणून त्यांस कलांचें ' जीवन ' असें म्हटलें. २ महत्त्व. चतुर्विध पुरुषार्थांचें वर्णन करून त्यांचें वैभव म्हणजे महत्त्व प्रसिद्धीस आणतात, म्हणून त्यांस पुरुषार्थांचें वैभव असें म्हटलें. पुढें जीं कवींवर रूपकें केलीं आहेत तीं बहुतकरून अशाच वर्णनाच्या संबंधानें आहेत, असें समजावें. ३ मुक्त म्हणजें मोत्यें सरोवरापासून होतात, त्याप्रमाणें ह्यांपासून म्हणजें ह्यांचे ग्रंथ वाचून मुक्त ( संसारांतून सुटलेले ) होतात, म्हणून ह्यास ' मुक्तसरोवर ' असें म्हटलें. ४ रत्नांची खाण, जशीं रत्नांच्या खाणींत हवीं तीं रत्नें मिळतात, तशा बुद्धि ह्यांच्याकडे मिळतात. ५ डोळ्यांत अंजन घातलें म्हणजें डोळ्यांतला मळ जाऊन दिसूं लागतें, त्याप्रमाणें मुमुक्षूंस कवींचे ग्रंथ अंजनच होतात ; म्हणजें ते वाचल्यानें मुमुक्षूंस दिसूं लागतें, म्हणजें आत्मज्ञान होतें. ६ ज्ञानसंपादक ह्यास ज्ञानप्राप्ति करून घेण्यास कवींचे ग्रंथ साधनभूत होतात. ७ ज्ञानसंपन्न ह्यास कवींचे ग्रंथ मनाचें समाधान करणारे होतात. ह्यास ज्ञान तर झालेलेंच असतें म्हणून ह्यास नुसतेंच मनाचें समाधान म्हणजें संतोष होतो. ८ मनास जिंकणारा. कवींचे ग्रंथांस असें म्हणण्याचें कारण, ते मनोरंजक असल्यामुळें ते मनास इकडे तिकडे जाऊं देत नाहींत, आपल्या अटकेंत ठेवतात. ९ व्युत्पन्नाची योग्यता म्हणजे योग्य उत्पन्न. तात्पर्य कीं, माहितगार किंवा ज्ञानी म्हणून जें आहेत ते हे आहेत.

सामर्थ्यवंताची[१] सत्ता[१] ॥ कवी विचक्षणाची[२] कुशलता[२] । नाना प्रकारीं ॥ ११ ॥ कवी कवित्वाचा प्रबंध[३] । कवी नाना-धाटी-मुद्रा-छंद[४] ॥ कवी गद्य-पद्य-भेदाभेद[५] । पद-प्रकार[६] कर्तें ॥ १२ ॥ कवी सृष्टीचा अळंकार । कवी लक्ष्मीचा शृंगार ॥ सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवी ॥ १३ ॥ कवी सभेचें मंडण । कवी भाग्याचें भूषण ॥ नाना सुखांचें संरक्षण । ते हे कवी ॥ १४ ॥ कवी देवांचें रूप-कर्ते । कवी ऋषींचें महत्त्व-वर्णिते ॥ नाना-शास्त्रांचें सामर्थ्य ते । कवी वाखाणिती ॥ १५ ॥ नसता कवींचा व्यापार । तरी कैंचा असता जगदो (द्धु) द्धार ॥ म्हणोनि कवी हे आधार । सकळ सृष्टीसी ॥ १६ ॥ नाना विद्या-ज्ञातृत्व कांहीं । कवीश्वरांवीण तों नाहीं ॥ कवींपासून सर्वही । सर्वज्ञता ॥ १७ ॥ मागें वाल्मीकि-व्यासादिक । जाले कवीश्वर अनेक ॥ तयांपासूनि विवेक । सकळ जनासी ॥ १८ ॥ पूर्वीं काव्यें होतीं केलीं । तरीच वित्पत्ति प्राप्त जाली ॥ तेणें पंडिता अंगीं बाणली । परम योग्यता ॥ १९ ॥ ऐसे पूर्वीं थोर थोर । जाले कवीश्वर अपार ॥ आतां आहेति पुढें होणार । नमन त्यांसि ॥ २० ॥ नाना-चातुर्यांच्या मूर्ती । कीं हे साक्षात् बृहस्पती ॥ वेद-श्रुति बोलों म्हणती । ज्यांच्या मुखें ॥ २१ ॥ परोपकाराकारणें । नाना-निश्चय[७] अनुवादणें ॥ शेखीं बोलिले पूर्णपणें । संशयातीत ॥ २२ ॥ कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नव-रसांचे वोघ लोटले ॥ नाना-सुखांचें उचंबळलें । सरोवर हें ॥ २३ ॥ कीं हे विवेक-निधीचीं भांडारें । प्रकट जालीं मनुष्याकारें ॥ नाना-वस्तूंचेनि विचारें । कोंदाटले हे ॥ २४ ॥ कीं हे आदि-शक्तीचें ठेवणें । नाना-पदार्थांसि आणी उणें[८] ॥ लाधलें पूर्व-संचिताच्या गुणें । विश्व-जनासी ॥ २५ ॥ कीं हीं सुखाचीं तारुवें लोटलीं । अक्षयीं आनंदें उतटलीं ॥ विश्व-जनासी[९] उपेगा[१०] आलीं । नाना-प्रयोगांकारणें ॥ २६ ॥ कीं हा ईश्वराचा पवाड[११] । पाहतां गगनाहूनि वाड ॥ ब्रह्मांड-रचनेहूनि जाड । कवि-प्रबंध-रचना ॥ २७ ॥ आतां असो हा विस्तार । जगासि आधार कवीश्वर ॥ तयासि माझा नमस्कार । साष्टांग भावें ॥ २८ ॥

१ सामर्थ्यवंताची सत्ता म्हणजे सामर्थ्यवंत म्हणून ज्यांस म्हणावें ते हे आहेत. ब्रह्मदेवा-पेक्षां ह्यांचे सामर्थ्य अधिक हें वरतीं दर्शविलेंच आहे. २ विचक्षणाची कुशलता म्हणजे मोठे कुशल शोधक जें ते हे आहेत. ३ रचना म्हणजे कविता. ४ धाटी म्हणजे रीति (शब्दरचनेचा प्रकार), मुद्रा म्हणजे चिन्ह म्हणजे व्यंजक शब्द, छंद म्हणजे वृत्त. ५ गद्यपद्यभेदाभेद म्हणजे गद्यपद्यांचा भेद म्हणजे गद्य कविता आणि पद्य कविता हा भेद. भेदाभेद हा शब्द प्राकृतांत केवळ भेद ह्या अर्थीं येतो. ६ निरनिराळीं पदें म्हणजे पदरूप कविता. ह्या ओवींत मागील प्रबंधादिक पदांचा शेवटील कर्तें ह्या पदाशीं अन्वय आहे. येथें कवि निरनिराळ्या प्रकारांची कविता करतात ते प्रकार सांगितले. ७ नाना मतें. ८ उणेपणा. ९ सर्व लोकांना. १० उपयोगाला. ११ स्तव.

## वेंचे, मनाचे श्लोकांतील.

### भुजंगप्रयात वृत्त.

मना सज्जना भक्ति-पंथेंचि जावें। तरी श्री-हरी पाविजे तो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडून द्यावें। जनीं वंद्य तें सर्व-भावें करावें ॥ १ ॥
मना वासना दुष्ट कामा नये रे। मना सर्वथा पाप-बुद्धी नको रे ॥
मना सर्वथा नीति सोडूं नको हो। मना अंतरीं सार-वीचार राहो ॥ २ ॥
मना पाप-संकल्प सोडोनि द्यावा। मना सत्य-संकल्प जीवीं धरावा ॥
मना कल्पना ते नको वीषयाची। विकारें घडे हो जनीं सर्व छी छी ॥ ३ ॥
नको रे मना क्रोध हा खेद-कारी। नको रे मना काम नाना विकारी ॥
नको रे मना गर्व हा अंगिकारूं। नको रे मना मत्सरू दंभ-भारू ॥ ४ ॥
मना श्रेष्ठ धारिष्ट[1] जीवीं धरावें। मना बोलणें नीच सोसीत जावें ॥
स्वयें सर्वदा नम्र-वाचे वदावें। मना सर्व-लोकांसि रे नीववावें ॥ ५ ॥
तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी। मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥
मना चंदनाचेपरी त्वां झिजावें। परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ६ ॥
नको रे मना द्रव्य तें पूढिलांचें। अति स्वार्थ-बुद्धी नको पाप सांचे ॥
घडे भोगणें पाप तें कर्म खोटें। न होतां मनासारिखें दुःख मोठें ॥ ७ ॥
जगीं सर्व-सुखी असा कोण आहे। विचारें मना तूंचि शोधोनि पाहें ॥
मना त्वांचि रे पूर्व-संचीत केलें। तयासारिखें भोगणें प्राप्त जालें ॥ ८ ॥
जिवा कर्म-योगें जगीं जन्म जाला। परी शेवटीं काळ घेवोनि गेला ॥
महा-थोर ते मृत्यु-पंथेंचि गेले। कितीएक ते जन्मले आणि मेले ॥ ९ ॥
मना पाहतां सत्य हे मृत्यु-भूमी। जितां बोलती सर्वही जीव मी मी ॥
चिरं-जीव हे सर्वही मानिताती। अकस्मात सोडोनियां सर्व जाती ॥ १० ॥
मरे एक त्याचा दुजा शोक वाहे। अकस्मात तोही पुढें जात आहे ॥
पुरेना जनीं लोभ, रे क्षोभ[2] होतो। म्हणोनी जनीं मागुती जन्म घेतो ॥ ११ ॥
मना मानसीं व्यर्थ चिंता वहातें। अकस्मात होणार होवोनि जातें ॥
घडे भोगणें सर्वही कर्मयोगें। मती-मंद तो खेद मानी वियोगें ॥ १२ ॥
मना सर्वथा सत्य सोडूं नको रे। मना सर्वथा मिथ्य मांडूं नको रे ॥
मना सत्य तें सत्य वाचे वदावें। मना मिथ्य तें मिथ्य सोडोनि द्यावें ॥ १३ ॥

---

१ धैर्य. २ संताप. ऐहिक विषयांवर जो लोभ म्हणजे आसक्ति असते ती पुरेशी होत नाहीं; त्यामुळें चित्ताचा संताप होतो; पण ह्या संतापामुळें ऐहिक विषयांवरचा लोभ निदिध्यासानें दृढ होतो; तोच फिरून जन्म घेण्यास कारण होतो; असा भाव.

समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व-भूमंडळीं कोण आहे ॥
जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ १४ ॥
अहल्या-शिळा राघवें मुक्त केली । पदीं लागतां दिव्य होवोनि गेली ॥
जया वर्णितां शीणली वेद-वाणी । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ १५ ॥
असे हो जया अंतरीं भाव जैसा । वसे हो तया अंतरीं देव तैसा ॥
अनन्यास[1] रक्षीतसे चाप-पाणी । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ १६ ॥
सदा चक्रवाकासि[2] मार्तंड जैसा । उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ॥
हरी-भक्तिचा घाव घालीं निशाणीं[3] । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ १७ ॥
जयाचेनि संगें समाधान भंगे । अहंता अकस्मात येऊनि लागे ॥
तये संगतीची जनीं कोण गोडी । जिये संगतीनें मती राम सोडी ॥ १८ ॥
सदा बोलण्यासारिखें चालताहे । अनेकीं सदा एक देवासि पाहे ॥
स-गूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १९ ॥
मदें[4] मत्सरें[4] सांडिली स्वार्थ-बुद्धि । प्रपंचिक नाहीं जयातें उपाधी ॥
सदा बोलणें नम्र-वाचा सु-वाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ २० ॥
सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं । सदा सर्वदा सत्य-वादी विवेकी ॥
न बोले कदा मिथ्य वाचा त्रि-वाचा[5] । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ २१ ॥
मना कल्पना कल्पितां कल्प-कोटी । न हो रे न हो सर्वथा राम-भेटी ॥
मनीं कामना, राम नाहीं जयाला । अती आदरें प्रेम नाहीं तयाला ॥ २२ ॥
अती मूढ त्या दृढ[6] बुद्धी असेना । अती-काम त्या राम चित्तीं वसेना ॥
अती-लोभ त्या क्षोभ होईल जाणा । अती-वीषयी सर्वदा दैन्यवाणा ॥ २३ ॥
सुखानंद-कारी निवारी भयातें । जनीं भक्ति-भावें भजावें तयातें ॥
विवेकें त्यजावा अनाचार हेवा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ २४ ॥
जयाचेनि नामें महा-दोष जाती । जयाचेनि नामें गती पाविजेती ॥
जयाचेनि नामें घडे पुण्य-ठेवा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ २५ ॥

---

१ अनन्य भावानें शरण आलेल्यास. २ चक्रवाकपक्ष्यांचा जोडा (नरमादी) रात्रीं वियुक्त असतो आणि सूर्योदय झाल्यावर संयुक्त होतो; तेव्हां ह्यांच्या संकटाला जसा सूर्य तसा लोकांच्या संकटाला राम असा दृष्टांत घेतला आहे. ३ षड्रिपूंच्या निशाणावर. ४ मदासह आणि मत्सरासह. ५ सत्य सत्य सत्य असें त्रिवार सत्याचें उच्चारण, म्हणजे खरोखरच कधींही खोटें बोलत नाहीं असा भाव. ६ गण जमण्यासाठीं, 'दृ' चें 'दॄ' असें दीर्घ अक्षर घातलें आहे.

न वेंचे कदा ग्रंथिंचा अर्थ कांहीं । मुखें नाम उच्चारितां कष्ट नाहीं ॥
महा-घोर संसार-शत्रू जिणावा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ २६ ॥
न हो कर्म ना धर्म ना योग कांहीं । न हो भोग ना त्याग ना सांग[१] पाहीं ॥
म्हणे दास विश्वास नामीं धरावा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ २७ ॥
भजा राम विश्राम योगेश्वरांचा । जपा[२] नेमिला नेम गौरी-हराचा ॥
निवाला[३] स्वयें तापसी चंद्र-मौळी । तुम्हां सोडवी राम हा अंत-काळीं ॥ २८ ॥
मुखीं नाम नाहीं तया मुक्ति कैंची । अहंता-गुणें यातना ते फुकाची ॥
पुढें अंत येईल तो दैन्यवाणा । म्हणोनी म्हणा रे म्हणा देव-राणा ॥ २९ ॥
यथासांग रे कर्म तेंही घडेना । घडे कर्म तें पुण्य गांठीं पडेना ॥
दया पाहतां सर्व-भूतीं असेना । फुकाचें मुखीं नाम तेंही वसेना ॥ ३० ॥
अतीलीनता सर्वभावें स्व-भावें । सदा सज्जनांलागिं संतोषवावें ॥
तयांकारणीं सर्व लावीत जावें । स-गूणा अती आदरेंशीं भजावें ॥ ३१ ॥
क्रियेवीण नानापरी बोलिजेतें । परी चित्त दुश्चित्त तें लाजवीतें ॥
मना कल्पना धीट सैराट धांवे । तया मानवा देव कैसेनि पावे ॥ ३२ ॥
विवेकें क्रिया आपुली पालटावी । अती आदरें शुद्ध-बुद्धी धरावी ॥
जनीं बोलण्यासारखें चाल बापा । मनीं कल्पना सोड संसार-तापा ॥ ३३ ॥
वरीं स्नान-संध्या, धरीं एक-निष्ठा । विवेकें मना आंवरीं स्थान-भ्रष्टा[४] ॥
दया सर्व-भूतीं जया मानवाला । सदा प्रेमळू भक्ति-भावें निवाला ॥ ३४ ॥
सदा सर्वदा सज्जनाचेनि योगें । क्रिया पालटे भक्ति-भावार्थ लागे ॥
क्रियेवीण वाचाळता ते निवारीं । तुटे[५] वाद, संवाद तो हीत-कारी ॥ ३५ ॥
जनीं सांगतां ऐकतां जन्म गेला । परी वाद-वीवाद तैसाच ठेला ॥
उठे संशयो वाद हा दंभ-धारी । तुटे वाद, संवाद तो हीत-कारी ॥ ३६ ॥
जनीं हीत पंडीत सांगूनि गेले । अहंता-गुणें राक्षस[६] ब्रह्म जाले ॥
तयांहून व्युत्पन्न तो कोण आहे । मना सर्व जाणीव सांडून राहें ॥ ३७ ॥

---

१ यथासांग, पूर्ण, (म्हणजे कोणतेंच पूर्णपणें होत नाहीं असें तात्पर्य.) २ जो "जपा गौरीहराचा नेम नेमिला" असा अन्वय. म्हणजे ज्याला (रामाला) गौरीहरानें (शिवानें) जपण्याचा नेम केला. ३ शिवानें विषप्राशन केल्यावर त्याच्या अंगाचा फार दाह होऊं लागला, त्यावेळीं त्यानें रामस्मरण केलें आणि त्याच्या योगानें त्याचा दाह शांत झाला अशी कथा आहे तिचा संबंध येथें दर्शविला आहे. ४ स्थानभ्रष्ट येथें पुढील 'भ्र' हें जोडाक्षर असल्यांमुळें मागील नकारास गुरुता येते, ह्यामुळें छंदोभंग होतो, पण असले छंदोभंग प्राकृत कवितेंत कोठें कोठें येतात. ५ ज्या संवादानें वाद तुटे तो संवाद हितकारी असा अर्थ. ६ राक्षस ब्रह्म म्हणजे ब्रह्मराक्षस.

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे । दिसं-दीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे । विचारें तुझा तूंचि शोधून पाहें ॥ ३८ ॥
जनाकारणें देव लीलावतारी । बहूतांपरी आदरें वेष-धारी ॥
तया नेणती ते जनीं पाप-रूपी । दुरात्मे महा-नष्ट चांडाळ पापी ॥ ३९ ॥
मना वासना वासुदेवीं वसों दे । मना कामना काम-संगीं नसों दे ॥
मना कल्पना वाउगी ते न कीजे । मना सज्जना सज्जनीं वस्ति कीजे ॥ ४० ॥
नसे गर्व अंगीं सदा वीत-रागी । क्षमा क्षांति भोगी दया-दक्ष योगी ॥
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा । अशा लक्षणीं जाणिजे योगि-राणा ॥ ४१ ॥
धरीं रे मना संगती सज्जनाची । जिणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची ॥
वळे भाव हा वृत्ति सन्मार्गिं लागे । महा-क्रूर तो काळ विक्राळ भंगे ॥ ४२ ॥
जिवां श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले । परी जीव अज्ञान तैसेच ठेले ॥
देहे-बुद्धिचा[1] निश्चयो त्या टळेना । जुनें ठेवणें मीपणें आकळेना ॥ ४३ ॥
जगीं पाहतां साच तें काय आहे । अतीं आदरें सर्व शोधोनि पाहें ॥
पुढें पाहतां पाहतां देव जोडे । भ्रमें भ्रांति अ-ज्ञान हें सर्व मोडे ॥ ४४ ॥
दिसेना जनीं तेंचि शोधूनि पाहें । बरें पाहतां गूज तेथेंचि आहे ॥
करें वेडं जातां कदा आडळेना । जनीं सर्व कोंदाटलें तें कळेना ॥ ४५ ॥
म्हणे जाणतों तो जनीं मूर्ख पाहे । अ-तर्क्यासि तर्की असा कोण आहे ॥
जनीं मीपणें पाहतां पाहवेना । तया लक्षितां वेगळें राहवेना ॥ ४६ ॥
जयें मक्षिका भाक्षिली जाणिवेची । तया भोजनाची[2] रुची प्राप्त कैंची ॥
अहं-भाव ज्या मानसींचा विरेना । तया ज्ञान हें अन्न पोटीं जिरेना ॥ ४७ ॥
अहंता-गुणें सर्वही दुःख होतें । मुखें बोलिलें ज्ञान तें व्यर्थ जातें ॥
सुखें राहतां सर्वही सूख आहे । अहंता तुझी तूंचि शोधोनि पाहें ॥ ४८ ॥
फुटेना तुटेना कदा देव-राणा । चळेना ढळेना कदा दैन्यवाणा ॥
कळेना, वळेना[3] कदा लोचनासी । असेना[4] दिसेना[5] जना मीपणासी[5] ॥ ४९ ॥

---

१ येथें मूळचा शब्द 'देह' असा असतांही गण जमण्यासाठीं कवीनें 'दे' हें अक्षर लघु मानिलें आहे, व 'ह' ह्यावर मात्रा देऊन हें गुरु केलें आहे. २ जेंवणाची, पक्षीं ईश्वर-सुखाची. ३ कदा लोचनासी वळेना, म्हणजे डोळ्यांनीं दिसणारा नव्हे. ४ अमुक प्रकारानें आहे असें सांगतां येत नाहीं असा. ५ जना मीपणासी दिसेना म्हणजे लोकांत अहंपणा असल्यामुळें त्यांस जो दिसत नाहीं. अहंपणा नसेल तर ज्ञानदृष्टीनें दिसेल असा भाव.

जया मानला देव तो पूजिताहे । परी देव शोधून कोणी न पाहे ॥
जगीं पाहतां देव कोट्यानुकोटी । जया मानली भक्ति जे तेचि मोठी ॥ ९० ॥

तिन्ही लोक जेथूनि निर्माण जाले । तया देव-रायासि कोणी न बोले ॥
जगीं थोरला देव तो चोरिलासे । गुरूवीण तो सर्वथाही न दीसे ॥ ९१ ॥

गुरू पाहतां पाहतां लक्ष कोटी । बहूसाल मंत्रावळी शक्ति मोठी ॥
मना कल्पना चेटकें घात-पाता । जनीं व्यर्थ रे तो नव्हे मुक्ति-दाता ॥ ९२ ॥

नव्हे चेटकू चाळकू द्रव्य-भोंदू । नव्हे निंदकू मत्सरू[1] भक्ति-मंदू[2] ॥
नव्हे उन्मतू वेसनीं[3] संग-बाधू[3] । जनीं[3] ज्ञानिया[3] तोचि साधू अ-गाधू ॥ ९३ ॥

नव्हे वाउगी चावटी काम पोटीं । क्रियेवीण वाचाळता तेचि मोठी ॥
मुखें बोलिल्यासारिखें चालताहे । मना सद्गुरू तोचि शोधून पाहें ॥ ९४ ॥

न जायें जपासी न जायें तपासी । न जायेंचि काशी न जायें गयेसी ॥
हरी-चिंतनेंवीण कोठें न जायें । त्रि-काळीं सदा पाय तूं तेचि पाहें ॥ ९५ ॥

मना गूज रे तूजला प्राप्त जालें । परी पाहिजे अंतरीं यत्न केले ॥
सदा ऐकतां पाविजे निश्चयासी । धरीं सज्जनीं संगती धन्य होसी ॥ ९६ ॥

मना संग हा सर्व सोडूनि द्यावा । अती आदरें सज्जनाचा धरावा ॥
जयाचेनि संगें महा-दुःख भंगे । जनीं साधनेंवीण सन्मार्ग लागे ॥ ९७ ॥

मना संग हा सर्व-संगांसि तोडी । मना संग हा मोक्ष तात्काळ जोडी ॥
मना संग हा साधना शीघ्र जोडी । मना संग हा द्वैत निःशेष मोडी ॥ ९८ ॥

मनाचीं[4] शतें[4] ऐकतां दोष जाती । मती-मंद ते साधना योग्य होती ॥
चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगीं । म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी ॥ ९९ ॥

---

१ मत्सरी. २ भक्तिशून्य. ३ ज्या "ज्ञानिया जनीं वेसनीं संगबाधू न" असा अन्वय. ज्या ज्ञान्याला लोकांमध्यें संगतीच्या योगानें वेसन म्हणजे दुःख नाहीं म्हणजे कोणतीहि संगति असली तरी ह्याला बाधत नाहीं. इतरांला कुसंगति असली तर ती बाधते, तशी ह्याला बाधत नाहीं असा भाव, असा असेल तोच मोठा साधु. ४ मनाचे शंभर श्लोक.

## अभंग, वेंचे, सत्संगतिशतकांतील.

संतांचे संगती काय प्राप्त होतें । तें तुम्हां निरूतें सांगईन ॥ १ ॥
संसारींचें सार जया नाश नाहीं । तेंची पडे ठायीं संत-संगें ॥ २ ॥
संत-संगें कळे सर्व शास्त्र-भाग । आणि ज्ञान-योग अ-प्रयासें ॥ ३ ॥
प्रयासें साधीतां कधीं न ये हाता । तें लाभे तत्वतां साधू-संगें ॥ ४ ॥
झालीयानें कृपा संत-सज्जनांची । मग विवेकाची वाट फूटे ॥ ५ ॥
पावीजेना देव संत-संगावीण । मार्ग हा कठीण विवेकाचा ॥ ६ ॥
विवेकाचा मार्ग विवेकें चालावा । मनाचा त्यागावा संग सर्व ॥ ७ ॥
सर्व-त्याग करीं पावसी श्री-हरी । परी एक धरीं संत-संग ॥ ८ ॥
संत-संगावीण त्याग हा घडेना । श्री-हरी पडेना कदा ठायीं ॥ ९ ॥
ठाव सज्जनाचा सज्जन जाणती । तेथें नाहीं गती मीपणाची ॥ १० ॥
संत जन परी कोण ओळखावे । कैसे ते जाणावे साधू जन ॥ ११ ॥
सांगीतलें आहे मागें थोरथोरीं । तेंची अवधारीं आलीया रे ॥ १२ ॥
आलीया रे साधू जाणावा कवणें । तयाचिं लक्षणें अ-संख्यात ॥ १३ ॥
अ-संख्यात परी वोळखीकारणें । साधू पूर्णपणें सारीखाची ॥ १४ ॥
सारीखाची दीसे जनाचीया परी । परी तो अंतरीं वेगळाची ॥ १५ ॥
वेगळाचि ज्ञानें पूर्ण समाधानें । स्व-स्वरूपीं[1] मनें वस्ती केली ॥ १६ ॥
वस्ती केली मनें निर्गुणीं सर्वदा । मीपणें आपदा तया नाहीं ॥ १७ ॥
तया नाहीं काम तया नाहीं क्रोध । तया नाहीं खेद स्वार्थ-बुद्धी ॥ १८ ॥
दंभ हा लौकीक विवेकें सांडीला । दुरी वोसंडीला अहंकार ॥ १९ ॥
अहंकार नाहीं दुराशा[2] अंतरीं । ममता ही दोरी मोकळली ॥ २० ॥
लोलंगता[3] नसे ज्ञानें धालेपणें[4] । ऐसीं हीं लक्षणें सज्जनाचीं ॥ २१ ॥
जयाचेनी ज्ञानें तरती अज्ञानें । साधू-संगतीनें समाधान ॥ २२ ॥
हरी-भक्ति करी जन तारावया । स्व-धर्म विलया जाऊं नेदी ॥ २३ ॥
जाऊं नेदी भक्ती जाऊं नेदी ज्ञान । अनु-तापीं मन निरंतर ॥ २४ ॥

---

१ आत्मास्वरूपीं. २ दुष्ट इच्छा. ३ चांचल्य. ४ तृप्तपणें.

निरंतर भाव स-गुणीं भजन । येणें बहु जन उद्धरती ॥ २५ ॥
उद्धरती जन करितां साधन । क्रियेचें बंधन आचरतां ॥ २६ ॥
आचरतां साधू जना होय बोधू । लागतसे वेधू भक्ती-भावें ॥ २७ ॥
भक्ती-भावें देव-प्रतिष्ठा पूजन । कथा-निरूपण महोत्साव ॥ २८ ॥
महोत्साव साधू भक्तीचें लक्षण । करी तीर्थाटन आदरेंसीं ॥ २९ ॥
आदरेंसीं विधी करणें उपाधी । लोकांतें सद्बुद्धी लागावया ॥ ३० ॥
लोकाचार करी तो जना उद्धरी । ज्ञाना अनाचारी कामा न ये ॥ ३१ ॥
क्रियावंत साधू विरक्त विवेकी । तोचि तो लोकिकीं मान्य आहे ॥ ३२ ॥
उपेगासीं येणें जना पूर्णपणें । तयाचीं लक्षणें निरूपीलीं ॥ ३३ ॥
निरूपीलीं येणें लक्षणें जाणावा । साधू वोळखावा मुमुक्षूनें ॥ ३४ ॥

---

## अभंग, वेंचे, वैराग्यशतकांतील.

थोर जालें कष्ट मातेच्या उदरीं । शीणलों श्री-हरी दास तुझा ॥ १ ॥
फोडियला टाहो पडतां भूमीवरी । दिवसें-दिवस हरी विसरलों ॥ २ ॥
दुःख होय देहीं माता नेणें कांहीं । मज वाचा नाहीं काय करूं ॥ ३ ॥
काय करूं दुःखें पोळे अभ्यंतर । मानसी अंतर जाणवेना ॥ ४ ॥
जाणवेना माझें दुःख मी अज्ञान । मग मी रुदन करीं दीना ॥ ५ ॥
माया-जाळीं जालें दृढ माझें मन । रामा तुझें नाम आठवेना ॥ ६ ॥
आठवेना चित्तीं स्व-हिताचें ज्ञान । माय-बापें लग्न केलें त्यांनीं ॥ ७ ॥
त्यांनीं लग्न केलें मानिली आवडी । पायीं घातली बेडी बंधनाची ॥ ८ ॥
बंधनाची बेडी प्रबळला काम । मग कैंचा राम आठवेल ॥ ९ ॥
आठवेना राम स्वामी त्रैलोक्याचा । जालों कुटुंबाचा भारवाही ॥ १० ॥
उगवेना मन आठवे कांचन । सर्व काळ ध्यान प्रपंचाचें ॥ ११ ॥
प्रपंचाचें ध्यान लागलें मानसीं । चिंता अहर्निशीं दुःखानळ ॥ १२ ॥
चंचळ मानस संसार-उद्वेगें । क्षणक्षणीं भंगे चित्त-वृत्ति ॥ १३ ॥
वृत्ति कांता धन पाहे जन-मान । इच्छेनें बंधन दृढावलें ॥ १४ ॥

आवरेना क्रोध तेणें होय खेद । वृत्तीचा उच्छेद करूं पाहे ॥ १५ ॥
अंतरलों भक्ति ठाकेना विरक्ति । देवा तुझी प्राप्ति केवीं घडे ॥ १६ ॥
केवीं घडे प्राप्ति मज पतितासी । जाल्या पाप-राशि सांगूं किती ॥ १७ ॥
सांगूं किती दोष जाले लक्ष कोटी । पुण्य माझे गांठी आढळेना ॥ १८ ॥
आढळेना पुण्य पापाचे डोंगर । करितां संसार माझें माझें ॥ १९ ॥
माझी माता पिता माझे बंधु-जन । कन्या पुत्र धन सर्व माझें ॥ २० ॥
सर्व माझें ऐसा मानिला भरंवसा । तुज जगदीशा विसरलों ॥ २१ ॥
विसरलों तुज वैभवाकरितां । शेखीं माता पिता राम जालीं ॥ २२ ॥
राम जाली माता देखत देखतां । तरी म्हणे कांता पुत्र माझे ॥ २३ ॥
माझे पुत्र माझे स्व-जन सोयरे । दृढ देहीं भरे अहं-भाव ॥ २४ ॥
अहं-भाव मनीं दुःख आच्छादुनी । वर्ततसें जनीं अभिमानें ॥ २५ ॥
अभिमान माथां वाहे कुटुंबाचा । अंतरीं सुखाचा लेश नाहीं ॥ २६ ॥
नाहीं नाहीं सुख संसारीं पहातां । पुरे देवा आतां जन्म नको ॥ २७ ॥
नको नको आतां घालूं या संसारीं । पोळलों अंतरीं काय करूं ॥ २८ ॥
काय करूं माझें नेणती स्व-हित । आपुलालें हित पाहातात ॥ २९ ॥
पाहतातीं सुख वैभवाचीं सखीं । कोणी मज शेखीं कामा नये ॥ ३० ॥
कामा नये कोणी तुजवीण रामा । नेईं निज-धामा माहियेरा ॥ ३१ ॥
जिवलगीं मज मोकलीलें देवा । काय करूं हेवा प्रारब्धाचा ॥ ३२ ॥
प्रारब्धाचा ठेवां प्रपंचीं रंगला । देहही खंगला वृद्धपणीं ॥ ३३ ॥
वृद्धपणीं माझें चळलें शरीर । श्रवण बधीर नेत्र गेले ॥ ३४ ॥
नेत्र गेले मज पाहतां दिसेना । स्वयें उठवेना पाय गेले ॥ ३५ ॥
पाय गेले तेणें दुःख होय भारी । तेथेंचि बाहेरी जाववेना ॥ ३६ ॥
जाववेना तेणें जालें अ-मंगळ । अत्यंत कुश्चीळ वांती पित्त ॥ ३७ ॥
वांती पित्त जन देखोनि पळती । दुर्गंधी गळती नव[1] नाळीं[1] ॥ ३८ ॥
नव नाळीं वाहे दुर्गंधी न साहे । वांती होऊं पाहे देखतांची ॥ ३९ ॥

---

१ शरीराच्या नऊ द्वारांनीं.

देखती सकळ सुटले पाझर । मळमूत्र धीर धरवेना ॥ ४० ॥
नेदी कोणी कांहीं क्षीण जालों देहीं । जीवलगीं तेंहीं वोसंडीलें ॥ ४१ ॥
वोसंडीलें मज वैभव गेलिया । देह खंगलिया दुःख जालें ॥ ४२ ॥
दुःख जालें थोर क्षुधा आवरेना । अन्नही जिरेना वांती होय ॥ ४३ ॥
वांती होय तेणें निर्बुजे[1] वासना । स्वादिष्ट चाववेना दांत गेले ॥ ४४ ॥
दांत गेले तेणें जिव्हेसी बोबडी । कंठ गडगडी बोलवेना ॥ ४५ ॥
बोलवेना अंत-काळींच्या विपत्ती । सर्वही म्हणती मरेना कां ॥ ४६ ॥
आला थोर त्रास जिवलग बोलती । देवा याची माती उचलावी ॥ ४७ ॥
उचलावी माती सर्वांचे अंतरीं । सुखाचीं सोयरीं दुरी ठेलीं ॥ ४८ ॥
दुरी ठेलीं सर्व दुःखाचीं चोरटीं । कोणीच शेवटीं सोडवीना ॥ ४९ ॥
सोडवीना कोणी श्री-रामावांचुनी । संकटीं धांवणी राम करी ॥ ५० ॥
राम करीतसे दासांचा संभाळ । भक्तांचा स्नेहाळ राम माझा ॥ ५१ ॥

---

## करुणाष्टकें

### अष्टक पहिलें

मालिनीवृत्त

अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ।
परम दिन-दयाळा नीरसीं मोह-माया ॥
अचपळ मन माझें नावरे आवरीतां ।
तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥

भजन-रहित रामा सर्वही जन्म गेला ।
स्वजन-जनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ॥
रघुपति मति माझी आपुलीशी करावी ।
सकळ त्यजुनि भावें कांस तूझी धरावी ॥ २ ॥

---

[1] कंटाळे.

विषय-जनित-सूखें सौख्य होणार नाहीं ।
तुजविण रघुनाथा ओखटें सर्व कांहीं ॥
रघु-कुळ-टिळका रे हीत माझें करावें ।
दुरित दुरि रहावें म्यां स्व-रूपीं भरावें ॥ ३ ॥

तन-मन-धन माझें राघवा रूप तूझें ।
तुजविण मज वाटे सर्व संसार वोझें ॥
प्रचळित न करावी सर्वथा बुद्धि माझी ।
अचल भजन लीला लागली आस तूझी ॥ ४ ॥

चपलपण मनाचें मोडितां मोडवेना ।
सकळ स्वजन-माया तोडितां तोडवेना ॥
घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरींचा ।
म्हणवुनि करुणा हे बोलतों दीन वाचा ॥ ५ ॥

जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी ।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटीं ॥
तळमळ निववीं रे राम कारुण्य-सिंधू ।
षड-रिपु-कुळ माझें तोडिं यांचा विरोधू ॥ ६ ॥

तुजविण करुणा हे कोण जाणेल माझी ।
शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तूझी ॥
झडकरि झड घालीं धांव पंचानना रे ।
तुजविण मज नेती जंबुकी वासना रे ॥ ७ ॥

स्वजन-जन-धनाचा कोण संतोष आहे ।
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ॥
जिवलग जिव घेती प्रेत सांडोनि देती ।
विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥ ८ ॥

---

## अष्टक दुसरें

भुजंगप्रयात

समाधान साधू-जनाचेनि योगें। परी मागुतें दुःख होतें वियोगें ॥
घडीनें घडी शीण अत्यंत वाटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १ ॥

घरें सुंदरें सौख्य नाना-परींचें। परी कोण जाणेल हें अंतरींचें ॥
मनीं आठवीतांचि तो कंठ दाटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ २ ॥

बळें लावितां चित्त कोठें जडेना। समाधान तें कांहिं केल्या पडेना ॥
नये धीर, नेत्रीं सदा नीर लोटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ३ ॥

अवस्था मनीं लागली काय सांगों। गुणीं गुंतला हेत, कोणासि सांगों ॥
बहूसाल भेटावया प्राण फूटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ४ ॥

कृपाळूपणें भेटि दे राम-राया। वियोगें तुझ्या सर्व व्याकूळ काया ॥
जनामाजि लौकीक हाही न सूटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ५ ॥

अहा रे विधी त्वां असें काय केलें। पराधीनता पाप माझें उदेलें ॥
घडेना तुझा योग हा प्राप्त खोटें। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ६ ॥

अखंडीत हे सांग सेवा घडावी। न होतां तुझी भेटि काया पडावी ॥
दिसंदीस आयुष्य हें व्यर्थ आटे। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ७ ॥

म्हणे दास मी वाट पाहें दयाळा। सदा सर्वदा भक्त-पाळा भु-पाळा ॥
पहावें तुला हें जिवीं आर्त मोठें। उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ८ ॥

# मुक्तेश्वर

एकनाथास गोदावरी नांवाची मुलगी होती. तिचा मुक्तेश्वर हा मुलगा. त्याच्या बापाचें नांव चिंतामणि. गोत्र अत्रि. पाळण्यांतलें नांव मुद्गल ; पण पुढें महाभारत लिहिण्यास सुरुवात करतेवेळीं त्यानें आपल्या आराध्यदेवतेच्या आदेशावरून तिचें ' मुक्तेश्वर ' हें नवें नांव धारण केलें, असें आदिपर्वांतील आरंभींच्या निर्देशावरून दिसतें. (" मुक्तेश्वर जो मी अवधूत । माझेनि नामें मुद्रांकित । कथा विस्तारीं भारत । महाराष्ट्रपदबंधीं ॥ ") मुक्तेश्वर किंवा लीलाविश्वंभर म्हणजेच दत्तात्रेय. मूळ 'मुद्गल चिंतामणि' या नांवाखालीलही मुक्तेश्वराची कविता उपलब्ध झाली आहे. त्याचें श्लोकरामायण व आदि, सभा, वन व विराट हीं भारतीय पर्वें 'सर्वसंग्रह' (वन वगळून) व 'काव्यसंग्रह' यांमध्यें प्रसिद्ध झालीं आहेत. अलीकडे त्याच्या नांवावर सौप्तिक पर्वही सांपडलें आहे. ' काव्यसंग्रहांत ' त्याचीं जीं स्फुट काव्यें प्रसिद्ध झालीं आहेत, तीं सर्वच महाभारतकार मुक्तेश्वराचीं असतील असें वाटत नाहीं.

मुक्तेश्वर हा जन्मतः मुका होता ; परंतु एकनाथाच्या कृपेनें त्याला वाचा फुटली, अशी कथा आहे. मुक्तेश्वराच्या अंगीं कविताशक्ति चांगली होती. त्याची वर्णनाची शैली प्रौढ असून त्याच्या वाणींत माधुर्य हा गुण विशेष आहे. " महाराष्ट्रकवींत कवि ही संज्ञा एका मुक्तेश्वराला मात्र बरोबर रीतीनें लागेल, " असें कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणत. याचा जन्म श० १५३१ सालीं झाला, असें नवनीताच्या जुन्या आवृत्तींत नमूद आहे. नरसोबावाडी जवळील तेरवाड गांवीं त्यानें देह ठेवला.

विशेष माहितीकरितां मराठी संशोधन-मंडळानें ( मुंबई ) प्रसिद्ध केलेल्या मुक्तेश्वरी आदिपर्वाच्या खंडांना जोडलेली प्रस्तावना व मुक्तेश्वरी वाङ्मयाची यादी पहा.

## नारदनीति[1]

ओव्या

धर्मराज मयासुरानें निर्मिलेल्या सभेंत बसला असतां नारदानें प्रश्नरूपानें जी त्यास राजनीति सुचविली ती येथें वर्णिली आहे :—

---

१ हीस ' किंचित्प्रश्न ' असेंही म्हणतात, पण मूळ शब्द ' कच्चित्प्रश्न ' असा आहे. भारतांत ( सभापर्व अ. ५ ) नारदानें प्रत्येक प्रश्न ' कच्चित् ' ह्या प्रश्नार्थक संस्कृत अव्ययानें केला आहे. त्यावरून कच्चित्प्रश्न असें नांव पडून पुढें त्याचा किंचित्प्रश्न असा अपभ्रंश झाला आहे.

नारद म्हणे महाराजा। धर्म-स्वरूप धर्मात्मजा[1]। नामासारखी सु-तेजा। करणी निर्मळ असे कीं ॥ १ ॥ ऐश्वर्य लाधल्या संपूर्ण। धर्मीं वर्तत असे कीं मन। राज्य-मदें दुरभिमान। तुज संचरला नाहीं कीं ॥ २ ॥ न्यायें अर्जिला जो अर्थु। व्यय करिसी कीं धर्मार्थु। विषय-काम-लोभानें तुझें चित्तु। विटाळलें नाहीं कीं ॥ ३ ॥ वडील आचरले जो धर्म। तोच चालविसी कीं नेम। विहितभंगाचा कर्दम। तुज लेपला नाहीं कीं ॥ ४ ॥ धर्में अर्थ अर्थें धर्म। धर्ममात्रीं पुरुषोत्तम। चढता वाढता सुखोद्यम। नित्यानित्य करिसी कीं ॥ ५ ॥ नित्यनैमित्तिकीं कर्मीं। वर्तत आहेसि कीं निष्कामी। काम्य-निषिद्धांची ऊर्मी। लोटिसी कीं आलिया ॥ ६ ॥ अनायासीं हो कीं सायासीं। भाग्यें जोडिल्या संपत्तीसि। विभागूनि समस्तांसी। सेविसी कीं सुजाणा ॥ ७ ॥ अनुकूळ[2] अथवा प्रतिकूळ[2]। अदृष्ट जालियाही विकळ[2]। धर्मापासूनि बुद्धी अचळ। भ्रंश कांहीं न पवे कीं ॥ ८ ॥ अहोरात्रीं साठ घडी। लोटितां पाप-पुण्याची जोडी। किती जाली हें घडी घडी। विचारीत अससी कीं ॥ ९ ॥ अखंडैक-नाम-स्मरणीं। देव केला असे कीं ऋणी। जो पावोनि देह-मरणीं। दास्य करी निजांगें ॥ १० ॥ मोक्ष-द्वारींच्या द्वार-पाळां। आर्जवें भजसी कीं नृपाळा। जे कां हात धरूनि डोळां। सायुज्य-धाम दाविती ॥ ११ ॥ समता संतोष सद्विवेक। चौथा साधु-संग देख। यांसीं करूनियां सख्य। मित्रभावें अससी कीं ॥ १२ ॥ काम-क्रोध-लोभ-त्रया। मोह मद मत्सर यया। वर्जिल्या नियोजिल्या ठाया। जाणसी कीं जाणत्या ॥ १३ ॥ काम असावा ईश्वर-भजनीं। क्रोध असावा इंद्रिय-दमनीं। तीर्थ[3]-प्रसाद-शेष-ग्रहणीं। लोभ अपार असावा ॥ १४ ॥ मोह असावा सज्जनासीं। मद असावा दुर्जनासीं। मत्सर सदा संसारासीं। असावा तो असे कीं ॥ १५ ॥ राज-चिन्हीं षड्विध[4] गुण। सप्त[5] उपाय परम गहन। बळाबळाचें[6] लक्षण। जाणसी कीं चौदाही ॥ १६ ॥ आज्ञा कीर्ती द्विज-पालन। दान भोग मित्र-संरक्षण। साही गुणीं तव प्रधान। सालंकार असती कीं ॥ १७ ॥ जाणती नाना व्यूह-रचना। थोडेनि जिंकिती बहुत सेना। ऐसे तुझे विचक्षणा। सेनापति असती कीं ॥ १८ ॥ निर्लोभिये विश्वासिक।

---

१ धर्मराजा (यमधर्माच्या पुत्रा; धर्म म्ह० यमधर्म.) २ अन्वय—अदृष्ट अनुकूळ अथवा प्रतिकूळ झालियाही (तूं) विकळ (न होशी कीं); अदृष्ट म्ह० दैव; विकळ म्ह० भ्रमिष्ट. ३ पूज्य. ४ हे पुढें ३८ व्या ओवींत सांगितले आहेत. ५ हे पुढें ३९ व्या ओवींत सांगितले आहेत. ६ हें पुढें ४० व्या ओवींत सांगितलें आहे.

वंशज असती कीं सेवक । स्वामिकाजीं देख । देह देती सोडून ॥ १९ ॥ वेतन भक्षिती पवित्र । राज-द्रव्य ज्यां अपवित्र । ऐसेनि योगें स्वतंत्र । स्व-व्यापारीं असती कीं ॥ २० ॥ उत्तम-मध्यम-कनिष्ठ पदीं । योग्यायोग्य-विचार-निधि । परीक्षूनि विशाळ-बुद्धी । योजिशी कीं नरेंद्रा ॥ २१ ॥ अमात्य-पदीं दासी-पुत्र । अधम-स्थळीं परमपवित्र । अपूज्या पूजोनि सत्पात्र । अवमानीत नाहींस कीं ॥ २२ ॥ अचाट कार्य साधी भृत्य । वेतनाहूनि कोटि-गुणित । द्रव्य देऊनि त्याचें चित्त । तोषवीत आहेस कीं ॥ २३ ॥ आपुले काजीं पावले मरण । त्यांचीं कुटुंबें आश्वासून । आपल्या कुटुंबासमान । पाळिसी कीं दयाळा ॥ २४ ॥ दरिद्र-काळींचीं बाळ-मित्रें । भेटों आलिया स्नेहपात्रें । वोळखी देऊनि दर्शनमात्रें । श्रियावंत करिसी कीं ॥ २५ ॥ पर-गुण-परीक्षा जाणणें । चित्त कळवळे पर-वेदनें । हीं मुख्य प्रभूचीं लक्षणें । तुझ्या ठायीं असती कीं ॥ २६ ॥ मंत्रियांच्या राहटी कैशा । देती यशा कीं अपेशा । चारमुखें नित्य नरेशा । विचारीत असशी कीं ॥ २७ ॥ नेमाहूनि आगळें धन । घेऊन प्रजांतें पीडण । करिती जे अयोग्य प्रधान । ते पदातीत करिसी कीं ॥ २८ ॥ राज-द्रव्य देऊनि भाग । भूमी-सेवा करिती सांग । न करितां राजाज्ञेचा भंग । प्रजा नेमें असती कीं ॥ २९ ॥ वन-चर-दूतांचिया गोष्टी । राष्ट्र अवलोकिशी कीं दृष्टी । नष्टां तस्करांचिया राहटी । भंगिसी कीं ऐकतां ॥ ३० ॥ तीर्थयात्रे जाती जन । त्यांतें कोंडूनि घेती धन । त्यांचें करूनियां हनन । मार्ग मुक्त करिसी कीं ॥ ३१ ॥ सांगावया क्लेश-गोष्टी । दुर्बळ येऊं इच्छिती भेटी । तयां येतयां आडकाठी । तुझ्या द्वारीं नाहीं कीं ॥ ३२ ॥ पर-राष्ट्र घ्यावया धाडिसी सैन्य । झुंजती त्यांचें करूनि कंदन । त्यांवांचून प्रजांतें नागवण । तुझेनें होत नाहीं कीं ॥ ३३ ॥ पिपीलिका लागे जेथें । तात्काळ हात पावे तेथें । दीनें पावतां दुःखातें । क्लेशातीत करिसी कीं ॥ ३४ ॥ अंगींचें एक रोम उपडे । तें जैसें हृदयांत ठाउकें पडे । तवीं प्रजा पावतां पीडे । जाणसी कीं तात्काळ ॥ ३५ ॥ तुझिया राज्यामाजीं प्राज्ञा । पुत्र पाळिती पितृ-आज्ञा । न करितां पुरुषांची अवज्ञा । स्त्रिया स्वधर्मी असती कीं ॥ ३६ ॥ शरीर-संपत्ती

मनोभावा। अर्पून करिती सद्गुरु-सेवा। ऐसे शिष्य नर-पार्थिवा। शिष्य-धर्मे असती कीं ॥ ३७ ॥ संधी[1] विग्रह[2] यान[3] आसन[4]। द्वैधीभाव[5] आश्रय[6] जाण। हेचि साही राज-गुण। विचक्षण बोलती ॥ ३८ ॥ साम दान दंड भेद। इंद्र-जाळ मंत्रौषध[7]। सतोपाय ऐसे सुबुद्ध। पंडितवर्य बोलती ॥ ३९ ॥ आप-पराचें बळाबळ[8]। इहींसीं चौदा[9] भेद कुशाळ। बोलती हें गूढ प्रांजळ। करूनि तूतें दाविलें ॥ ४० ॥ अथवा आणिक एक प्रकार। चौदा भेद ग्रंथ-प्रकार। बोलती ते सविस्तर। मागुतेनी परियेसीं ॥ ४१ ॥ अंग-बळ सेना-बळ। कोश-बळ दुर्ग-बळ। शस्त्र-बळ मंत्र-प्रधान-बळ। सुहृद्बळ आठवें ॥ ४२ ॥ वेद-त्रय[10]-बुद्धि-बळ। ब्राह्मण-शेष-सुकृत-बळ। अन्य-रायाचें साह्य-बळ। ऐसीं चौदा जाणावीं ॥ ४३ ॥ भृगु विशाळ अंगिरा मुनी। ऐसे प्रगट वदले वाणी। यावेगळे काय ते गुणी। द्वैपायन स्वयें जाणे ॥ ४४ ॥ वर्षकार्य एक मास। मासाचें तें एक दिवस। दिवस-कार्य एक निमिष। संपादीत अससी कीं ॥ ४५ ॥ व्यास बोलिला गुढार्थू। म्यांही न बोलतां प्रगटार्थु। चतुर श्रोतियांचें चित्तु। संतोषेल कैसेनी ॥ ४६ ॥ श्रोत्रिय[11] कुटुंबी निर्धन। साधु सात्त्विक-वृत्ति क्षीण। त्यांचें परिहरूनि दैन्य। सदा पाळण करिसी कीं ॥ ४७ ॥ दरिद्रब्राह्मणाची जाया। तारुण्य-काळीं अंतरे राया। ऐकोनि त्याचिया विवाह-कार्या। साह्य संपूर्ण करिसी कीं ॥ ४८ ॥ रोगें प्रवासीं पडिले। कारा-गृहीं जे का अटकले। ते ते सांभाळूनि भले। क्लेशातीत करिसी कीं ॥ ४९ ॥ गृहा पावलिया क्षुधा-पीडितें[12]। ते तृप्त होऊनि पंचामृतें। आशीर्वचनीं स्व-स्थळातें। तूजपासूनि जाती कीं ॥ ५० ॥ लोक-लाजे त्यजिती प्राण। अधनां धन-लुब्धाचें ऋण। त्या उत्तमांचें ऋण-मोचन। अतिसाक्षेपें

---

१ तह. २ वैर. ३ शत्रूवर स्वारी करणें. ४ अनुकूल काल येईतोंपर्यंत किल्ला वगैरे सुरक्षित ठिकाणीं राहणें. ५ फितूर. ६ बलिष्ठाचा आश्रय. ७ मंत्रोपाय आणि औषधोपाय. ८ शत्रूची आणि आपली बरोबरी आहे किंवा कांहीं न्यूनाधिक आहे हें बळाबळ पहाणें. ९ बळाबळ पाहाण्याचे चौदा विषय म्हणजे स्थानें आहेत. तीं हीं:—

(१) देश, (२) किल्ला, (३) रथ, (४) हत्ती, (५) घोडे, (६) योद्धे, (७) अधिकारी, (८) अंतःपुर, (९) अन्नाचा पुरवठा, (१०) अश्वरथादिकांची संख्या, (११) नीति, (१२) जमाखर्चाचा हिशेब, (१३) द्रव्याचा पुरवठा आणि (१४) गुप्त शत्रु.

१० आयुर्वेद, धनुर्वेद आणि गांधर्ववेद. ११ वैदिक. १२ क्षुधापीडित. 'पीडितें' हें पीडित ह्या अर्थी पुढील प्रासासाठीं घातलें आहे. प्राकृत कवितेंत प्रासासाठीं पुष्कळ शब्द फिरविलेले आढळतात.

करिसी कीं ॥ ५१ ॥ आवडीचे निज आप्तु । गुणी जामात श्रियावंतु । तयां ऐसे परम आर्तु । याचकातें करिसी कीं ॥ ५२ ॥ तुझे ऋत्विज श्रुति-पारग । सांग संपादिती याग । तूतें नेणतां कर्म व्यंग । कदां होत नाहीं कीं ॥ ५३ ॥ वाजपेयादि[१] पुंडरीक[१] । अनेक क्रतु क्रिया याज्ञिक । घृतावदानीं यज्ञ-पुरुष । सदा-तृप्त करिती कीं ॥ ५४ ॥ ब्राह्मण स्थापिले वृत्ति-क्षेत्रीं । ते ते अक्षयीं राज-पत्रीं[२] । भातें भक्षूनि पुत्र-पौत्रीं । विहित-धर्में असती कीं ॥ ५५ ॥ दुष्ट-ग्रहीं उघडितां मुख । शांतिक करिसी कीं तात्काळिक । त्रिकाळ-ज्ञानी ज्योतिषी गणक । शुभ-सूचक असती कीं ॥ ५६ ॥ विषम देशाचिया संधीं । अविचार शूर ठेविले युद्धीं । दुर्ग पर्वतीं स्थिर बुद्धी । धैर्यवंत असती कीं ॥ ५७ ॥ बोलों जाणती समयोचित । चतुर जे कां शास्त्र-पंडित । ते ते इष्ट-साधनार्थ । योजिसी कीं नरेंद्रा ॥ ५८ ॥ जितेंद्रिय ज्ञानवंत । परम-पवित्र साधुसंत । सभा-चारी सभे आंत । निकट-वर्ती असती कीं ॥ ५९ ॥ दुष्ट दुर्जन क्षुद्र कोपी । वाक्-निष्ठुर परम-संतापी । पैशुन्य-वादी महा-पापी । सभा-स्थानीं त्यजिलें कीं ॥ ६० ॥ अपमानिती संत साधू । द्विजा देवा दोष-शब्दु । बोलती त्यांचा जिव्हा-छेदु । तात्काळिक करिसी कीं ॥ ६१ ॥ नरक-मोक्ष-पाप-चिन्ह । जितांचि जाणशी स-ज्ञान । जनाचे मुखीं निंदा स्तवन । हें तंव जाणत अससी कीं ॥ ६२ ॥ जागा होवोनि अपर-रातीं । सारासार-विचार नीति । मोक्ष-उपायें भव-निवृत्ति । विचारीत अससी कीं ॥ ६३ ॥ अजिंक्य-शत्रूतें जिंकावें । जिंकिल्यातें प्रतिपाळावें । शरणागतातें रक्षावें । ऐसें करीत अससी कीं ॥ ६४ ॥ वर्ष पालटूनियां जीर्ण । दुर्ग-पर्वतीं नूतन धान्य । यंत्र[३] औषधीं अक्षयीं जीवन । संग्रहीत अससी कीं ॥ ६५ ॥ पडलें खचलें जेथें जेथें । तात्काळ सरिसें करिती तेथें । ऐसे शिल्पकार भृत्य । वेतन-भोक्ते असती कीं ॥ ६६ ॥ पशु पीडती पर्जन्यें । गळती गाईचीं गोठणें । वोढाळ चरती शाली-वनें । ऐसें होत नाहीं कीं ॥ ६७ ॥ मठ-वापिका देवागार । भंगल्या करोनि जीर्णोद्धार । दीप नैवेद्य निरंतर । चालवीत अससी कीं ॥ ६८ ॥ क्षुधित-वृद्ध-दरिद्र-मेळीं । पीडोनि रोड दीन दुर्बळीं । कर्दमपंथें वर्षाकाळीं । मार्ग चालत नाहीं कीं ॥ ६९ ॥ आपलें महत्त्व होईल शून्य । म्हणोनि पुरोहित

---

१ वाजपेय आणि पुंडरीक हे यज्ञाचे भेद आहेत. २ सनदांप्रमाणें. ३ लढण्याच्या प्रसंगीं उपयोगीं पडणारीं यंत्रें.

प्रधान । श्रेष्ठ पातलिया दर्शना विघ्न । करिती ऐसें नाहीं कीं ॥ ७० ॥ आप्त-सुहृदां देती त्रास । संत साधू पावती क्लेश । ऐसिया दुर्गुणीयांचा त्रास । तुज तंव जाला नाहीं कीं ॥ ७१ ॥ चहूंवर्णीं आपुले पुत्र । विहित-विद्ये अति-पवित्र । अनलस अहोरात्र । अभ्यासवीत असती कीं ॥ ७२ ॥ याचक त्यागिती पतितातें । कुळें वाळिती[१] जाति-भ्रष्टातें । तेवीं सर्व लोकीं तूंतें । उपेक्षिलें नाहीं कीं ॥ ७३ ॥ सहस्र मूर्खांतें दवडून । एक पंडित ज्ञान-संपन्न । संग्रहूनि त्याचें मन । स्वस्थ ऐसें करिसी कीं ॥ ७४ ॥ एका दुष्टाची संगती । यश-लाभ सुख-संपत्ती । नासूनि भोगवी अप-कीर्ती । ऐसें जाणत अससी कीं ॥ ७५ ॥ आढ्य व्यसनी अनुरक्त । मित्र उदासीन शत्रु-अमात्य । या सातांचें चित्ता-कार्षित[२] । जाणसी कीं सुजाणा ॥ ७६ ॥ तुवां अथवा तव प्रधानीं । रहस्य बोलिजे एकांत-स्थानीं । तें बाहेर लोकांचे कर्णीं । प्रगट होत नाहीं कीं ॥७७॥ दुष्ट बलिष्ठ आज्ञारहित । तदर्थीं अपाय-विचार गुप्त । प्रगटल्या नाश करिती बहुत । हें तंव जाणत अससी कीं ॥ ७८ ॥ एक उघड बोलिजे जनीं । एक प्रेरिजे महंत-कर्णीं । एक ठेविजे मनींचे मनीं । हें जाणत आहेस कीं ॥ ७९ ॥ वैरि-वर्गाचें वर्तन । क्षणक्षणा व्हावया ज्ञान । गुप्त ठेवून चार-गण[३] । विचारीत अससी कीं ॥ ८० ॥ तुजसी दाऊनि आप्तता । शत्रुसी पाववितो वार्ता । ऐसे कोण ते तत्वतां । वोळखोनि अससी कीं ॥ ८१ ॥ वार्ता आणिती वार्तिक । ते नेणती एका एक । नित्यनित्य अनोळख । प्रेरिसी कीं सुजाणा ॥ ८२ ॥ बहुत लाधे स्वल्प-यत्नीं । तेथें आलस्य नसे कीं मनीं । स्वल्प लाभ बहुत हानी । तेथें उद्योग नसे कीं ॥ ८३ ॥ राज्य रक्षिती झुंझार बळी । संपूर्ण अथवा नियमकाळीं । वेतन पावोनि तुझ्या दळीं । एक चित्तें असती कीं ॥ ८४ ॥ ज्याचेनि कार्य-साधन पुढें । ते पावतां वेतन-पीडे । समयीं महा-अनर्थ घडे । हें जाणसी कीं नरेंद्रा ॥ ८५ ॥ अर्थ-संग्रह पाहोनि-जोडी । चतुर्थांश वेतनें दवडी । सकळ वेंचूनि हस्त झाडी । हे तुज खोडी नाहीं कीं ॥ ८६ ॥ आय-व्ययाचे अधिकारी । गणक लेखक प्रथम-प्रहरीं । सिद्ध-पत्रें धरूनि करीं । उभे सन्मुख असती कीं ॥८७॥ आरूढलीया भद्रासनीं । राज-दर्शना येईजे जनीं । टिळा-माळा-वस्त्राभरणीं । देखसी कीं साजिरें ॥ ८८ ॥ रक्तांबरी खड्ग-धार । किरीट-कुंडलीं साळंकार । सुहृद-क्षत्रियांचे भार । उभय-भागीं असती कीं ॥ ८९ ॥ श्रेष्ठ-सत्पात्रीं वोपितां

---

१ वाळींत टाकतात. २ चित्तांत आणलेलें (गुप्त विचार). ३ गुप्त बातमीदारांचे समुदाय.

दान । योगियां विशेष अर्पितां धन । दुष्ट पुरोहित प्रधान । विघ्न-कर्ते नसती कीं ॥ ९० ॥ नगर रक्षावयाकारणें । कीजेत ग्रामाचीं पट्टणें । घोष घोष ग्राम-तुल्य करणें । ऐसें करीत अससी कीं ॥ ९१ ॥ पर्वत-संधी घाट बेटा । वोस रानें पाहोनि चोखटा । तेथें वसवूनियां पेटा । मार्ग मुक्त करिसी कीं ॥ ९२ ॥ नापेक्षितां मेघ-जळें । सर्वदा पिकें पिकती सकळें । अभंग तडागें पाट-स्थळें । पैं निर्मळ असती कीं ॥ ९३ ॥ कृषिवलें खंगलीं भंगें । धन-धान्य ओपूनि अंगें । शेताचेनि राज-भागें । पाळिसी कीं नरेंद्रा ॥ ९४ ॥ लुब्ध तस्कर लेखन-कारी । राज-स्त्रिया राज-कुमरी । प्रजांलागीं बळात्कारीं । पीडित नाहींत कीं ॥ ९५ ॥ हिंसक आततायी[1] सिद्ध[2] । त्यांचा श्रवणीं पडतां शब्द । आधीं करूनियां वध । मग विचार करिसी कीं ॥ ९६ ॥ उदर-पीडेचिया महा-मारी । उत्तमेंही करितां चोरी । धरूनि आणितां राज-हेरीं । मानें मुक्त करिसी कीं ॥ ९७ ॥ उगाणितां[3] पर-राजातें । जे जे वस्तु लाधली ज्यातें । ते ते मुक्त[4] करोनि त्यातें । तोषवीत अससी कीं ॥ ९८ ॥ औषध-नेम शरीरातें । वृद्ध-सेवन मानसातें । दों-प्रकारें आपणातें । राखिसी कीं सुजाणा ॥ ९९ ॥ पराच्या पक्षीं अष्टादश[5] । आपुले पक्षीं पंच-दश[5] । गुण बोलिले ते विशेष । जाणसी कीं नरेंद्रा ॥ १०० ॥ अष्टांग[6] चतुर्विध[7] बळें ।

---

१ अविचारानें दुसऱ्याचा प्राण घेण्यास तयार होणारा किंवा प्राण घेणारा. २ चेटकी. ३ जिंकितां. ४ बक्षीस, माफ. ५ शत्रूकडील अठरा अधिकारी आणि आपणाकडील पंधरा अधिकारी ह्यांच्या वर्तनाची बातमी राजानें नेहमीं ठेवावी, असें राजनीतीमध्यें सांगितलें आहे. ह्यांस येथें गुण म्हटलें आहे, परंतु नीतिशास्त्रांत ह्यांस तीर्थ असें म्हणतात. असें म्हणण्याचें कारण हे राज्यांत सर्व अधिकाऱ्यांमध्यें मोठे मान्य अथवा उपयुक्त असतात. त्यांचीं नांवें:—

(१) मंत्री, (२) पुरोहित, (३) युवराज, (४) सेनापति, (५) द्वारपाल, (६) अंतर्वेशिक (राजाची भेट करून देणारे), (७) कारागाराधिकारी (तुरुंगा-वरचा अधिकारी), (८) द्रव्यसंचयकृत् (जामदार), (९) योग्यायोग्य पाहून द्रव्य खरचणारा, (१०) प्रदेष्टा (मसलत देणारा), (११) नगराध्यक्ष (कोतवाल), (१२) कार्यनिर्माणकृत् (घरें, रस्ते वगैरे बांधणारे), (१३) धर्माध्यक्ष, (१४) सभाध्यक्ष, (१५) दंडपाल (न्यायाधीश), (१६) दुर्गपाल (किल्लेदार), (१७) राष्ट्रांतपालक (हद्दीवरचा संरक्षक) आणि (१८) अटवीपालक (अरण्यसंरक्षक). ह्या अठरांमध्यें आपणा-कडील मंत्री, युवराज आणि पुरोहित हे तीन कमी करून आपणाकडे १५ सांगितले आहेत.

६ रथ, हत्ती, घोडे, योद्धे, पायदळ, कर्मकार (रस्ता साफ करणें वगैरे काम करणारे), चार आणि दैशिकमुख्य (राज्यांतील ठिकठिकाणचे मुख्य मुख्य लोक) हीं सैन्याचीं आठ अंगें. ७ मौल (मुळापासूनचे म्हणजे पिढीजादे शिपाई), मैत्र (स्नेहामुळें शिपाईगिरी पतकरलेले), भृत्य (दरमहा देऊन नवे ठेवलेले), आणि आटविक (रानटी) हे सैन्याचे चार प्रकार.

शत्रु जिंकिजे बुद्धि-कुशळें । व्यसनीं क्षीणले आगळे । आदरें वश्य करिसी कीं ॥ १०१ ॥ पर-हितार्थ संत साधु । जे सांगती बुद्धि-वादु । ते मानूनि परम बंधु । वर्तसी कीं तदाज्ञा ॥ १०२ ॥ अंतःकरण आणि शरीर । नियमीं न पावे विकार । शब्द तो सजीव गिरि-वर । न चळे न ढळे नुखळे कीं ॥ १०३ ॥ ज्ञाता गुरु देव-प्रतिमा । यज्ञ-मंडप चैत्य-द्रुमा[1] । देखतांक्षणीं राजोत्तमा । नमस्कार करिसी कीं ॥ १०४ ॥ वृद्ध तापस ब्राह्मण-पंक्ती । अश्व भांडार भद्रजाती[2] । ध्वजा प्रासाद पवित्रक्षिती । देखतां वंदन करिसी कीं ॥ १०५ ॥ दंडियातें प्रत्यक्ष यमु । पूज्याप्रती परम सौम्यु । परीक्षोनि अधमोत्तमु । वर्तसी कीं शाहाणिया ॥ १०६ ॥ कार्यसाधनीं अति नेटकें । त्याचें स्तवन करिसी मुखें । सभा-मंडपीं नानाविक्यें । गौरवीत अससी कीं ॥ १०७ ॥ अग्नि सर्प चोर व्याघ्र । रोग राक्षस कां परचक्र । यांपासाव आपुलें राष्ट्र । रक्षिसी कीं बळिष्ठा ॥ १०८ ॥ अंध मुके पंगु व्यंग । आतुर संन्यासी अध्वां( ध्वं )ग[3] । पितयाऐसें सांगोपांग । पाळण त्यांचें करिसी कीं ॥ १०९ ॥ नास्तिक्य अनृत स-क्रोधता । प्रमाद[4] आणि दीर्घ-सूत्रता[5] । कार्यीं आलस्य क्षिप्रवक्ता[6] । निश्चिताचा नारंभु ॥ ११० ॥ ज्ञानीयाचें अ-दर्शन । अज्ञानाचें दृढ चिंतन । अनर्थीं एकनिष्ट[7] मन । अ-रक्षण[8] मंत्राचें[8] ॥ १११ ॥ मंगळाचा[9] अ-प्रयोग । विषयाचा अतिप्रयोग । चौदा[10] दोषीं तुझें अंग । सांग स्पर्शलें नाहीं कीं ॥ ११२ ॥ निद्रा आलस्य भय क्रोधता । अ-मार्दव आणि दीर्घ-सूत्रता । साही अनर्थांचिया माथां । पाय देऊनि अससी कीं ॥ ११३ ॥ सफळ दारा सफळ वित्त । सफळ वेद सफळ श्रुत । तुझें असे कीं निश्चित । हें प्रगटार्थ परिसें पां ॥ ११४ ॥ श्रुत्यर्थ बोधला जो अर्थ । त्या नांव श्रुत-ज्ञान म्हणत । याचें फळ शीलव्रत । त्या आचारें अससी कीं ॥ ११५ ॥ परद्वीपींच्या अमोल्य वस्तु । वाणिक आणिती इच्छूनि अर्थू । त्यांचा पुरवूनि मनोरथु । लाभ चौगुणीं देसी कीं ॥ ११६ ॥ देशावरा पातले अर्थी । द्रव्य देऊनि त्यांचे आर्ती[11] । जगीं जोडावी सत्कीर्ति । हे तुज इच्छा असे कीं ॥ ११७ ॥ विषम-काळास्तव पातले । कलत्र-पुत्र वंशज भले । ते ते मानूनि आपुले । आपणा ऐसे करिसी कीं ॥ ११८ ॥ निर्दोषियां

---

१ पवित्र स्थळीं उगवलेला किंवा पार बांधलेला उंबर. २ हत्तींमध्यें ही एक जात आहे. ३ मार्गस्थ. ४ दुर्लक्ष. ५ चेंगटपणा. ६ घाई, त्वरा. ७ एकाग्र अथवा तल्लीन. ८ जो मंत्र म्हणजे युक्ति सांगितली त्याप्रमाणें न करणें. ९ देवाचा उत्सव वगैरे मंगल कार्य न करणें. १० दहाव्या ओवीच्या आरंभापासून येथपर्यंत सांगितलेले. ११ इच्छेप्रमाणें.

दोषारोपु । निर्धनियां धन-संकल्पु । दुर्गुणीयांचा दुर्गुण-लोपू । तुझ्या नगरीं नाहीं कीं ॥ ११९ ॥ आचार दावूनि लोक-दृष्टी । अंतरीं अनाचार राहटी । ऐसे दांभिक तुझ्या निकटीं । वर्तणारे नसती कीं ॥ १२० ॥ तोंडें बोलोनियां ब्रह्म । भंगिती सदाचार धर्म । प्रशंसिती अविचारकर्म । ते संसर्गी त्यजिले कीं ॥ १२१ ॥ दावूनि योगियाचें चिन्ह । पोसिती उदर आणि तन । त्यांच्या ठायीं तुझें मन । विश्रामत नाहीं कीं ॥ १२२ ॥ धनिक वेंची धनातें । दरिद्री नाचरे तपातें । शास्त्रज्ञ चालतां कु-पंथें । दंडिसी कीं निजाज्ञे ॥ १२३ ॥ माता पिता दवडुनि दुरी । श्वशुर-वर्ग सांठवी वरीं । ऐसा कुश्चिताचार परी । तुझे देशीं नाहीं कीं ॥ १२४ ॥ सुना छळिती सासुवांतें । पुत्र अव्हेरिती पित्यांतें । सेवक अवगणिती स्वामीतें । ऐसें होत नाहीं कीं ॥ १२५ ॥ एवं सर्वांपरी जाण । राजा असावा सावधान । हेंचि विस्तारें निरोपण । पुण्यश्लोकीं बोधिलें ॥ १२६ ॥ जो कां राजा ऐसियापरी । चहूं वर्णांचें पालन करी । पृथ्वी भोगूनि लोकांतरीं । शक्र-सायुज्य स्वयें पावे ॥ १२७ ॥ ऐसे परींचे उत्तम गुण । तुझे ठायीं असावे पूर्ण । ऐसें आमचें इच्छी मन । किंचित्-प्रश्न या नांवें ॥ १२८ ॥ किंचित्[1] काम-पर-वेदने । ऐसें बोलती पंडित शहाणे । तेंचि विस्तारूनि मनें । तुज कारणें बोलिलों ॥ १२९ ॥ ऐकोनि नारदाचें वचन । आश्चर्य करी कुरु-नंदन । म्हणे केवढा विलक्षण । होय सर्वज्ञ देव-ऋषी ॥ १३० ॥ पुढती पार्थिवाचेनि प्रश्नें । होय लोक-पाळ-सभा-सदनें । व्यासगुरु वर्णील वदनें । तें सज्जनीं परिसावें ॥ १३१ ॥ सभा-पर्वीं नारद-नीती । उद्योग-पर्वीं विदुरनीती । भीष्म-पर्वीं कृष्ण-नीती । भगवद्गीता ज्या नांव ॥ १३२ ॥ भारत-कथा-संक्रमणीं[2] । निरोपण-रूपें तीळवणी[3] । वांटितां म्हणतसे अवदानीं । लहाणें[4] असो श्रोतयां ॥ १३३ ॥ लीळाविश्वंभर-पादाब्जीं । मुक्तेश्वर षट्पद सहजीं । गुंजारव करितां रंजी । भारतकथा प्रगटली ॥ १३४ ॥ इति श्री-सभापर्व भारतीं । पुढें अवधान द्यावें श्रोतीं । किंचित्-प्रश्नाची समाप्ती । तृतीयाध्यायीं बोलिलों ॥ १३५ ॥

—सभापर्व, अ. ३.

---

१ हें वाक्य मूळच्या संस्कृत ‘ कच्चित् कामप्रवेदने ’ ह्या वाक्याचा अपभ्रंश होऊन झालें आहे. ह्याचा अर्थ “ अमुक गोष्ट अशा प्रकारची असावी अशी आपली इच्छा असून ती तशी आहेना असा दुसऱ्यास प्रश्न करावयाचा असतां ‘ कच्चित् ’ ह्या प्रश्नार्थक अव्ययाची योजना करावी ” असा आहे. कवीनेंही हा अर्थ मागच्या ओवींत सांगून त्यास आधार अमरसिंहाचें वाक्य दिलें आहे, असें दिसतें. २ संक्रातीच्या पर्वाच्या वेळीं. ३ तीळगूळ. ४ लाभ होतो.

## हरिश्चंद्राख्यान[१]

पूर्वी अयोध्या नांवाच्या नगरींत त्रिशंकु राजाचा मुलगा हरिश्चंद्र हा राज्य करीत होता. त्याच्या घरीं एकदां नारद येऊन पूजाविधीनें संतुष्ट होऊन स्वर्गास गेला. तेथें इंद्राच्या सभेंत वसिष्ठ, विश्वामित्र आदिकरून तपोनिष्ठ लोक बसलेले असतां नारदानें हरिश्चंद्राच्या महिम्याचें वर्णन केलें. हरिश्चंद्र हा वसिष्ठाचा शिष्य होता त्यास तें वर्णन ऐकून फार आनंद झाला व तो म्हणाला कीं सृष्टींत ( भूलोकीं ) त्याची उपमा त्यासच आहे. विश्वामित्रास हें भाषण ऐकून राग आला व तो नारदास म्हणाला, 'या देवसभेंत तुम्हीं हरिश्चंद्राचें वर्णन केलें परंतु हें अयोग्य झालें.' त्यावरून वसिष्ठ व विश्वामित्र यांची हरिश्चंद्राच्या थोरपणाविषयीं चुरस लागून विश्वामित्र त्याचा छळ करण्यास तयार झाला. त्यानें हरिश्चंद्राच्या स्वप्नीं येऊन त्याजकडून सर्वराज्यदानाचें उदक सोडविलें व त्याची बायको तारामती व पुत्र रोहिदास यांसहवर्तमान त्यास राज्यांतून घालवून दिलें. पुढेंही विश्वामित्रानें त्यांचा अनेक रीतींनीं छळ केला. शेवटीं काशीक्षेत्रीं हरिश्चंद्र हा वीरबाहु नांवाच्या डोंबाकडे चाकरीस राहिला व तारामती काळकौशिक नांवाच्या ब्राह्मणाकडे चाकरीस राहिली. तेथें असतांना त्याचा पुत्र रोहिदास सर्पदंश होऊन मरण पावला. त्याच्या प्रेताचें दहनही विश्वामित्रानें करूं दिलें नाहीं. इकडे तारामती आपल्या पुत्राचें शव आपणापुढें घेऊन शोक करीत असतां ही लांव म्हणजे प्रेतें भक्षण करणारी आहे, असें दूतांकडून तेथल्या राजास सांगवून तिचा शिरच्छेद करावयास लाविलें. इतका छळ केला तथापि उभयतांनीं आपलें सत्याचरण सोडिलें नाहीं. हें पाहून विश्वामित्र संतुष्ट झाला व त्यानें आपल्या तपश्चरणाचें पुण्य त्यांस दिलें अशी कथा या आख्यानांत आहे.

ओव्या

मोक्ष-सिंहासनाची पायरी । प्रथम-नाम अयोध्यापुरी[२] । ज्ञान-स्वरूप

१ हें आख्यान श्रीधरानें आपल्या पांडवप्रतापांत ( अ० ३० ) अंतर्भूत केल्यामुळें तें महाभारतांतीलच एक उपाख्यान असावें, अशी लोकांची चुकीची समजूत होण्यास जागा झाली आहे. ऐतरेय ब्राह्मण, देवी भागवत, मार्कंडेय पुराण या ग्रंथांमध्यें तें कांहीं फरकानें सांपडतें. विष्णुदास नामा यानें तें प्रथम मराठींत आणलें व त्याच्या आधारें मुक्तेश्वरानें व पुढें श्रीधरानें आपली रचना केलेली दिसते. विष्णुदास नामाच्या महाभारतांत तें आढळत नाहीं. स्वतंत्र आहे. 'काव्येतिहाससंग्रहा' च्या मुक्तेश्वरी वनपर्वांतीलही हें आख्यान मागाहून घुसडलेलें दिसतें. २ 'अयोध्या मथुरा माया ( गया ) काशी कांची अवंतिका ॥ पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः' ॥१॥ अशा मोक्ष देणाऱ्या सात पुरी सांगितल्या आहेत त्यांत हिचें नांव पहिलें आहे.

जीमाझारी । राज्य करी हरिश्चंद्र ॥ १ ॥ शत्रु-करीलागीं[1] हरी । साधु सज्जना सुधाकारी[2] । बळी त्रासी[3] यालागीं हरि- । श्चंद्र नाम तयाचें ॥ २ ॥ सत्य-सत्वाचा[4] शिरोमणी । परोपकारी परम-ज्ञानी । दुःख, दारिद्य, इच्छा करणी । एकी नेदी जगातें ॥ ३ ॥ धीर-सत्वाचा महा-मेरु । दानीं मेघ जैसा उदारु । प्रजा-पालनीं कमळावरु[5] । शक्रा-तुल्य प्रतापी ॥ ४ ॥ ऐसा राजा चक्रवर्ती । सिंहासनीं विराज-मूर्ती । जैसा इंद्र अमरावती । शोभे तैसा शोभला ॥ ५ ॥ बैसला वेष्टित वीरप्रधानीं । उभय भागीं वेत्र-पाणी । मंगळ वाद्यांचिया ध्वनी । नाद गगनीं न समाये[6] ॥ ६ ॥ तों अकस्मात गगन-पंथें । नारद-मुनी पातला तेथें । वीणा वाजवी मधुर हस्तें । वदनीं गात हरि-कथा ॥ ७ ॥ जो ज्ञानारविंद-मकरंदु[7] । वैराग्य-वल्लींचा मूळ-कंदु । विवेक-सागरींचा पूर्णेंदु । तो नारदु पातला ॥ ८ ॥ रायें देखतांचि नयनीं । धांवोनि मस्तक ठेविला चरणीं । जयजयकारें महा-मुनी । सिंहासनीं बैसविला ॥ ९ ॥ कनक-पात्रीं शुद्ध जळें । रायें चरण प्रक्षाळिले । कस्तूरी, चंदन, चर्चिलें । भाळीं रेखिलें केशर ॥ १० ॥ नाना पुष्प-जाती माळा । गणित नाहीं परिमळा । नैवेद्य तांबूलादि सोहळा । करूनी पूजिला नारद ॥ ११ ॥ देखोनि रायाची विनय-भक्ती । नारद सुखावला चित्तीं । आज्ञा मागुनी गगन-पंथीं । गमन केलें मुनींद्रें ॥ १२ ॥ आला शक्राचिया भुवना । सवेग पातला मंडप-स्थाना । इंद्रें नमूनियां चरणा । केलें पूजन विधि-युक्त ॥ १३ ॥ सभा मिनली[8] घनदाट । बैसले विश्वामित्र वसिष्ठ । आणीकही श्रेष्ठ श्रेष्ठ । तपोनिष्ठ पैं आले ॥ १४ ॥ त्याहूनि शक्राचा बहुमान । नारदें आरंभिलें कीर्तन । पढत जाला महिमान[9]। तया अयोध्या-पुराचें ॥ १५ ॥ भू-मंडळीं शरयू-तटीं[10] । अयोध्यापुरी अति गोमटी । मज पाहतां सकळ सृष्टी । न दिसे दृष्टी आणीक ॥ १६ ॥ एक-आज्ञा एक-छत्री । नव-खंड[11] सर्व धरित्री- । वरी विराजे वीर क्षत्री[12] । हरिश्चंद्र नृपनाथ ॥ १७ ॥ परिसोनी नारदाची गोष्टी । वसिष्ठ सुखावला पोटीं । सभे गर्जोनी म्हणे सृष्टीं । उपमा त्यासी तो एक ॥ १८ ॥ नारद-वचनाचिया वातें । गाधिज-कुंडीं क्रोधाग्नि चेतें । धीर वसिष्ठ-वाक्याचिया घृतें । शिखा

१ शत्रूरूप हत्तीस. २ अमृतमय शरीर ज्याचें आहे अशा चंद्रासारिखा म्हणजे आनंद देणारा. ३ बलवान मनुष्याला त्रास देतो ( शिक्षा करितो ). ४ सत्यस्वभावाचा. ५ लक्ष्मीचा पति विष्णु. ६ मावे. ७ ज्ञानरूपकमलांतील मध म्हणजे पूर्ण तत्त्वज्ञानी. ८ जमली. ९ माहात्म्य. १० शरयू नदीच्या तीरीं. ११ पृष्ठ २३१ टीप ७ पहा. १२ क्षत्रिय.

गगनातें कवळिती ॥ १९ ॥ खदिरांगारा-तुल्य[1] नयन । करूनी वदन-चापींहून[2] । सोडिता[3] जाला अति तीक्ष्ण । वाग्बाण सु-तेज ॥ २० ॥ वसिष्ठ-पादपाआडून । वधूं इच्छी भूप-हरिण । परि त्यासी मारील कवण । कृपा पूर्ण गुरूची ॥ २१ ॥ तयावरि सत्त्वाची पाखर । जडोनि ठेली स-बाह्य-अभ्यंतर । तेथें ऋषीचे वाक्‌शर । केवीं शरीरीं स्पर्शती ॥ २२ ॥ "निर्जर-सभेसी भूपाळ-कीर्ती । वर्णितां शंका नाहीं चित्तीं । हें अयोग्य वाटे मजप्रती । सत्य जाण नारदा ॥ २३ ॥ समर्थापुढें रंक-महिमा । मेरूसि योजिली वल्मिक-उपमा । कण्हेर आणि कल्प-द्रुमा । समान कैसें म्हणावें" ॥ २४ ॥ वसिष्ठ म्हणे "जी ऋषि-राया । वृथा कोप कासया । धैर्य, सत्त्व, शांति, दया । असे जया तो श्रेष्ठ ॥ २५ ॥ तो धीर-सत्त्वाचा महा-मेरु । अढळ पदीं जैसा ध्रुरू[4] । सूर्य-वंशींचा शृंगारु । हरिश्चंद्र नृपनाथ" ॥ २६ ॥ परिसोनि वसिष्ठाची गोष्टी । विश्वामित्र क्रोध-दृष्टी । म्हणे "मी या छळितां सृष्टीं । रक्षिता पाठी कोण असे ॥ २७ ॥ मज विश्वामित्रापुढें । भूपाळ-सत्त्व कायसें बापुडें । क्षणामाजी करीन वेडें । वचन धडफुडें[5] बोलिला" ॥ २८ ॥ येरु म्हणे "हें तैंच घडे । जैं यवन-मुखीं वेद पडे । माझे पूर्वज रौरव-कुंडें । भोगिजेति सर्वही ॥ २९ ॥ नातरी मी या शिखा-सूत्र[6] । वेगळें होणें, कुरु क्षेत्र-। माजी दान-कर पात्र । स्पर्श करीन अधमाचें ॥ ३० ॥ आणीक एक प्रतिज्ञावचन । नर-करोटीं सुरा-पान । आणि गोत्रजाचें हनन । हे दोष गहन मज घडोत ॥ ३१ ॥ ऐसिया दोषांचे पर्वत । सत्त्व टाकितां नृपनाथ । मस्तकीं घेऊनि नरकांत । पूर्वजांसहित बुडेन" ॥ ३२ ॥ परिसोनी वसिष्ठाचिया वचना । विश्वामित्र करी प्रतिज्ञा । "नृप-सत्त्व टाळीन नाना । यत्नें करुनी सर्वथा ॥ ३३ ॥ जरी उतरेल माझ्या कसीं । तरी देईन जोडल्या सुकृतासी" । 'तथास्तु[7]' शब्दें पल्लवासी[7] । येरें ग्रंथी[7] दीधली ॥ ३४ ॥ "माझिया[8] तपाच्या असंख्य कोटी । न समाती ब्रह्मांड-घटीं । कोणतीं म्हणाल तरि कर्णपुटीं । श्रवण केलें पाहिजे ॥ ३५ ॥

---

१ खैराच्या निखाऱ्यासारिखें. २ मुखरूपी धनुष्यापासून. ३ ह्याचा कर्ता विश्वामित्र (अध्याहृत) ४ ध्रुव (उत्तानपादराजाचा पुत्र). ५ कठोर. ६ शेंडी व जानवें. ७ वसिष्ठानें 'तसें असो' असें म्हणून पदराला गांठ दिली—म्हणजे तुझी प्रतिज्ञा कशी शेवटास जाते ती पाहातों—मी ती शेवटास निश्चयानें जाऊं देणार नाहीं; हा भाव. ८ हें विश्वामित्राचें म्हणणें आहे.

जेणें तपें म्यां अपर-सृष्टी[१] । निर्मिली आणि चर्मदृष्टी । रवि-बिंब अवलोकितां कष्टीं । गळोनी पडलीं बुबुळें ॥ ३६ ॥ माजी[२] निघाले ज्ञान-नयन । घेतलें सूर्याचें दर्शन । आणि वातांबु-पर्णाशन[३] । केलें वर्षें कोटी दहा ॥ ३७ ॥ लोह-चूर्ण सेवूनी वनीं । तपलों पंचाग्नि[४] साधुनी । प्रेत-कुंड-पद्मासनीं[५] । जपलों अब्दें कोटी दहा ॥ ३८ ॥ ऐसिया तपाचेनि बळें । मृत्यु जिंकिला तये वेळे । नृपातें वोपीन तात्काळें । जरी माझिये तुळे उतरेल" ॥ ३९ ॥ असा दोघांचा संवाद । होतां उठिला मुनि नारद । इंद्र म्हणे कायसा वाद । शब्दें शब्द वाढेल ॥ ४० ॥ हटीं पेटूनियां दोघे । प्रतिज्ञा करूं निघाले वेगें । विश्वामित्र परम रागें । सिद्धाश्रमा[६] तो गेला ॥ ४१ ॥ सूर्य-वंशींचा अभिमानी । अयोध्ये गेला वसिष्ठमुनी । विश्वामित्रें शिष्य दोन्ही । गुप्त पाठीं पाठविले ॥ ४२ ॥ तुम्हीं जाऊनियां गुप्त । पाहोनि यावें सकळ वृत्तांत । येरीं जाऊनि पाहतां तेथ । मुनी नेमस्त[७] न सांगे ॥ ४३ ॥ इंद्रसभेमाजी वाद । दोघां जाला प्रतिज्ञा-शब्द । ह्यालागीं राजा सावध । करावया बोध तो गेला ॥ ४४ ॥ वसिष्ठ आला ऐसी वाणी । ऐकतां राजा धांवला चरणीं । नमस्कारुनी शिबिकायानीं । बैसवूनी चालिला ॥ ४५ ॥ गुढ्या उभविल्या नगरीं । मखरें तोरणें घरोघरीं । जय-जयकारें मंगळ-तुरीं[८] । वसिष्ठ नगरीं प्रवेशे ॥ ४६ ॥ रायें आणुनी महींद्रालया[९] । कनक-पीठीं बैसवी तया । सहकुमार नरेंद्र-जाया । येती जाली दर्शना ॥ ४७ ॥ ऋषि-चरणीं ठेवूनी माथें । येरें स्पर्शिलें अमृत-हस्तें । हृदयीं आलिंगुनी तयातें । मंगल-शब्दें गौरवी ॥ ४८ ॥ षोडषोपचारीं[१०] पूजापात्रें । कनककुंभीं जलें पवित्रें ।

---

१ ब्रह्मदेवाच्या सृष्टीहून निराळी सृष्टि. त्रिशंकुराजानें सशरीर स्वर्गास जाण्याच्या हेतूनें यज्ञ करण्यास वसिष्ठास विनंती केली ती त्यानें नाकारिली. तेव्हां विश्वामित्रानें त्याचें म्हणणें कबूल करून यज्ञास आरंभ केला; पण शेवटीं इंद्र त्या राजास स्वर्गांत घेईना. म्हणून विश्वामित्रानें आपल्या तपोबलानें नवीं नक्षत्रें वगैरे उत्पन्न केलीं अशी कथा आहे. (अन्वय-रवि-बिंब-चर्मदृष्टी (नें) कष्टीं अवलोकितां बुबुळें गळोनि पडलीं.) २ मागून, पुनः. ३ वायु, उदक व झाडाचीं पानें हीं खाणें. ४ चार दिशांस चार आगट्या व डोक्यावर सूर्य मिळून पांच अग्नि. ५ चितेच्या जाग्यावर किंवा स्मशानांत पद्मासन घालून. ६ ऋषीच्या आश्रमाला (पर्णकुटीला). ७ ध्यानस्थ. ८ मंगलवाद्यें वाजवून. ९ (मही + इंद्र + आलया) राजवाड्यांत. १० षोडषोपचार—आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, दक्षिणा, प्रदक्षिणा, मंत्रपुष्प.

पूजा करोनि सांग मंत्रें । धरी छत्रें आवडी ॥ ४९ ॥ अर्घ्य पाद्य दिव्य सुमनें । सुगंध-माला हरि-चंदनें । नैवेद्य तांबूल नीरांजनें । कनक-तबकीं वोपिलीं ॥ ५० ॥ ऐसिया उपचारें पूजोनि मुनी । राजा उभा जोडोनि पाणी । विश्वामित्रवचन मनीं । स्मरोनी बोले वसिष्ठ ॥ ५१ ॥ सविता-चळापासून[१] निर्मळ । इहपर्यंत कीर्ति-जल । भरुनी वाहे तुंबळ । आरि-अचळ भंगोनी ॥ ५२ ॥ ऐसी वसे गंगा पवित्र । तियेसी जन्हु[२] विश्वामित्र । शोषावया पवित्र वक्त्र । पसरुनी बैसे यज्ञासी ॥ ५३ ॥ मुळींच पवित्र स्वर्ग-भुवनीं । वरी विराजे ऋषि-वदनीं । पुढें मिरवे अभिधानीं । जान्हवी[२] ऐसी प्रसिद्ध ॥ ५४ ॥ नृप-सत्त्व शुद्ध-हाटक । वरी ऋषि-कोपाग्नीचे चोख[३] । मोला चढे अधिक । हें जाणिजे सुजाणा ॥ ५५ ॥ असो ऋषि म्हणे गा राया । सांगितलें धरीं हृदया । भलें सत्त्व शांति, दया । असे जयातें तो श्रेष्ठ ॥ ५६ ॥ सूर्य-वंशींचिया राया । आणिक परिसें गुणालया । वना नवजावें[४] ऋषीचिया[५] । सदना गमन करावें ॥ ५७ ॥ संकेत दाउनी रायासी । वसिष्ठ गेला तपासी । राजा सावध अहर्निशीं । अयोध्येसी वर्तत ॥ ५८ ॥ येरीकडे[६] सिद्धाश्रमीं । विश्वामित्र अभिचार-कर्मी[७] । मातंग-याग[८] सकामी[९] । कारिता जाला साक्षेपें ॥५९॥ सहस्र अवदानें पुर्णाहुती । होतां प्रगटली आदि-शक्ति[१०] । "कोण कामना तुझ्या चित्तीं । सांग निगुती मुनिवर्या" ॥ ६० ॥ ऋषि म्हणे "हेंचि मागणें । क्रूर श्वापदें भरीं काननें" । "निकें" म्हणोनि उदार वचनें । देती जाली जगदंबा ॥ ६१ ॥ विश्वामित्र तये वेळे । देवी-वर-दानाचेनि बळें । निर्मिता जाला श्वापद-कुळें । भयानक काननीं ॥ ६२ ॥ कानन व्यापिलें श्वापदें । मातलीं भक्षुनि मांस मेदें । गर्जती भयानक शब्दें । त्रास देती जगातें ॥ ६३ ॥ कृषिक नवजाती कृषिके । तीर्थ-यात्रेसी पांथिकें । व्यवहार सांडिला व्यावसायिकें[११] । धेनु वना नवजाती ॥६४॥ भयें वनीं न

---

१ सूर्यरूपी पर्वतापासून. २ सोमवंशांतील एक राजा–भगीरथानें स्वर्गाहून गंगा आणिली, ती हिमालयावरून खालीं येत असतां मध्यें जन्हूचा आश्रम लागला, तेथें जन्हु यज्ञ करीत होता त्याची यज्ञसामग्री वाहूं लागली तेव्हां त्याला राग येऊन त्यानें ती पिऊन टाकिली. तेव्हां भगीरथानें त्याची प्रार्थना केल्यावर तिला त्यानें कानाच्या वाटेनें सोडून दिलें. तेव्हांपासून तिला जान्हवी हें नांव मिळालें. ३ आंच देऊन आणलेली झिलई. ४ न जावें. ५ विश्वामित्राच्या. ६ इकडे. ७ जारणमारणादि घातक कर्म करणारा. ८ देवी प्रसन्न व्हावी म्हणून केलेला तंत्रोक्त यज्ञ. ९ फलेच्छा धरणारा. १० देवी. ११ व्यापाऱ्यांनीं.

रिघे कोणी । कल्पांत भाविती सकळ प्राणी । म्हणतां घाल्लें राज-कर्णीं । जाऊनी सदनीं रायाचे ॥ ६५ ॥ प्रजा येउनी राज-सभे । जोहार[1] करुनी राहिले उभे । "तुझीये शौर्य-सूर्य-प्रभे- । माजी पशु-तम दाटलें ॥ ६६ ॥ सांगावया योग्य नव्हे मात । न सांगतां आमचा प्राणांत । श्वापदें मातलीं वनांत । करिती घात जगाचा " ॥ ६७ ॥ ऐकोनी पौरजांची वाणी । राजा विचारी अंतःकरणीं । गुरु-वचन तें मानुनी मनीं । राहतां जनीं अपकीर्ति ॥ ६८ ॥ वनीं निवटुनी श्वापद-गणां । सुखी करावें सकळ जनां । वसिष्ठ कोपेल तरी चरणां । नमन करीन साष्टांगीं[2] ॥ ६९ ॥ ऐसें विचारुनी चित्तीं । पाचारिला वाहिनी-पति[3] । म्हणे जाणें वनाप्रति । सेना सिद्ध करावी ॥ ७० ॥ तेणें त्राहाटिल्या भेरी । वाजती रण-तुरें मोहरी[4] । वीर-वसनें महा-वीरीं । परिधान केलीं तात्काळ ॥७१॥ अश्व-गज-रथादि वहनीं । वळघल्या[5] वीरांच्या श्रेणी[6] । त्यांमाजी राजा प्रताप-गुणी । वीरश्रिया शोभला ॥ ७२ ॥ साजिले असंख्य रहंवर[7] । पाठी चालती अश्व-भार । मत्त कुंजरांचे भार । ऊर्ध्व-शुंडें धांवती ॥७३॥ राजा प्रवेशला महा-वनीं । श्वापद-कळप देखिले नयनीं । शस्त्रीं शरीं पाशबंधनीं । वधुनी धरणी पाडीत ॥ ७४ ॥ ऐसे रायें मारिलें कळप । एका अंगीं भरला कंप । उरलीं श्वापदें लंघिती[8] नृप । प्राण-धाकें पळताती ॥ ७५ ॥ येरीकडे गाधिज मुनी । परम संतोष मानुनी मनीं । पुरी त्यागूनियां वनीं । राजा आला म्हणोनि ॥ ७६ ॥ आश्रमा आणावया राव । कपटानें केलें लाघव । कुरंग निर्मिला अपूर्व । कनक-कांति साजिरा ॥ ७७ ॥ तुझें स्वरूप-रज्जु गळां । बांधुनी आणावें नृपाळा । निकें म्हणोनी चरण-कमळां । वंदुनी गेला वनासी ॥ ७८ ॥ मृग-राज आला समीपु । राजा पाहे सेव कनक-वपू । नर-नाथ-हृदयीं कामना-सर्पु । फुंफाट करीत उठिला ॥ ७९ ॥ गुणीं लावुनियां बाण । धरूं पाहे कुरंग-प्राण । येरें फाडिलें[9] की रान[9] । भूमी चरण न थारे ॥ ८० ॥ राजा लागला तयापाठीं । धांवतां जाला परम

१ मुजरा. २ दोन पाय, दोन गुडघे, दोन हात, छाती व मस्तक असे शरीराचे आठ भाग जमिनीस लावून केलेल्या नमस्कारास साधारणपणें साष्टांग नमस्कार समजतात. तथापि ह्या संबंधानें मूळ संस्कृत श्लोक असा आहे—जानुभ्यां च तथा पद्भ्यां पाणिभ्यामुरसा धिया ॥ शिरसा वचसा दृष्ट्या प्रणामोऽष्टांग ईरितः ॥ ह्यावरून गुडघे, पाय, हात, छाती, मन, मस्तक, शब्द व दृष्टी अशा आठ साधनांनीं केलेल्या नमस्कारास साष्टांग नमस्कार म्हणणें योग्य होय. ३ सेनापति. ४ पुढें, आघाडीस. ५ स्वार झाल्या. ६ रांगा. ७ रथश्रेष्ठ. ८ चुकवून जातात. ९ रानभर तो फिरला.

कष्टी । पळत पातला आश्रमानिकटीं । विश्वामित्र-ऋषीच्या ॥ ८१ ॥ अंतरें राहुनियां उभा । पहात ठेला वनश्रीशोभा । वनसरोजीं नेत्रारंभा । स्वादामोदा लोभले ॥ ८२ ॥ वनश्री वर्णावी कवणें । उपमे नंदनवन उणें । नाना-वृक्षीं फळें सुमनें । रस-सुवासें दाटलीं ॥ ८३ ॥ ऐसी सिद्धाश्रमाची वाटिका । देखोनी रायें वारिलें कटका । आपण प्रधान पट्ट-नायिका- । वांचुनि आणिकां येऊं नेदी ॥ ८४ ॥ प्रवेश करितां तया वनीं । राजा आश्चर्य देखे नयनीं । धेनु व्याघ्र एके स्थानीं । एकमेकां चाटिती ॥ ८५ ॥ नकुळ सर्प क्रीडती सुखें । मार्जारी-स्तना लागती मूषकें । सिंह करी करीत कौतुकें । वनामाजी विचरती ॥ ८६ ॥ उलूका निरवूनी पिलियांसी । वायस जाती चरावयासी । विश्वामित्र माया ऐसी । सहसा न कळे मानवा ॥ ८७ ॥ निर्वैर श्वापदांचे गण । देखोनि विस्मित रायाचें मन । पुढें जातां सुगंध जीवन । तडागीं पूर्ण देखिलें ॥ ८८ ॥ तया कासार-जीवनें । स्नानें विश्रांति लाहिजे मनें । परिधान करुनी दिव्य वसनें । देवालया निघाला ॥ ८९ ॥ कर्दळी-द्रोणीं हेम-कमळें । नाना पुष्पें सुपरिमळें । कनक-पात्रीं भरुनी जळें । शिवागारीं प्रवेशे ॥ ९० ॥ सोमकांत-श्वेत-शिखर[1] । माजी शोभला कर्पूर-गौर । द्वारीं ढवळा नंदिकेश्वर । मनोहर विराजे ॥ ९१ ॥ भावें पूजुनी गिरिजावर । नमन केलें जोडोनी कर । भार्येसहित राजेश्वर । स्वस्थानीं बैसला ॥ ९२ ॥ कीं (तंव) मदन-दहनालागीं शंकर । तृतीय-नेत्रींचा वैश्वानर । पसरी तैसा ऋषीश्वर । रायासमीप पातला ॥ ९३ ॥ म्हणे "रायांमाजी अधमा । नेणसी माझा प्रताप-महिमा । आतांचि बोळवीन धामा । वैवस्वताच्या[2] अ-विलंबें ॥ ९४ ॥ वसिष्ठ-गुरूच्या पडिभरें[3] । मातलासि राज्याधिकारें । ह्यालागीं मदाचें काविरें[4] । नयनीं आलें तूझिया ॥ ९५ ॥ अरे तुझिया गुरूसी । प्रचीत असेल निज-मानसीं । म्यां एक-शत-पुत्रांसी । यम-लोकासी पाठविलें" ॥ ९६ ॥ ऐसे ऋषीचे वाक्-शर । वर्षती जैसे सौदामिनी-वर । नृपा अंगीं क्षमा-पंजर । शांति-भूषणें मिरवला ॥ ९७ ॥ राजा म्हणे "प्रति-सृष्टि-जनका । विनापराधें कोप कां । करितां तुम्ही ऋषि-नायका । हें मज कळलें पाहिजे" ॥ ९८ ॥ ऋषि म्हणे "कृत-घ्ना । माझिया बाळकां श्वापद-गणा । वधुनी कां येणें सदना । तापसाच्या निर्लज्जा" ॥ ९९ ॥ रायें मस्तक ठेविला चरणीं ।

---

१ चंद्रकांत मण्याचें किंवा चंद्रकांताप्रमाणें पांढरें. २ सूर्यपुत्र यम ह्याच्या. ३ पाठबळानें. ४ पटल, धुंदी.

बोलता जाला मधुर-वचनीं । "मम अपराध न धरुनी मनीं । क्षमा केली पाहिजे ॥ १०० ॥ एका देहाचीं करणें[1] । तेथें रसना खंडिली दशनें । तर्जनी-नखें[2] फुटतां नयनें । द्वेष न धरिजे मानसीं ॥ १०१ ॥ म्हणतां श्वापदें आपलीं बाळें । सांगा आम्ही कवणाचीं सकळें । क्रोध सांडोनि स्नेहाळें । क्षमा केली पाहिजे" ॥ १०२ ॥ तापस-कोपाग्नीच्या शिखा । नृपें केल्या मृगांबुका[3] । ऋषि-आश्रमा त्यागुनी पादुका । वंदूनि आला स्वस्थाना ॥१०३॥ श्रमें श्रांतला कुंभिनी-वर[4] । सुषुप्तीनें[5] व्यापिलें अंतर । तारामती-अंक सुकुमार । उशी करूनि पहूडला ॥ १०४ ॥ अंगना-अंकीं वाम कर्ण । ठेवूनी पहुडला नर-भूषण । देउळा-द्वारीं प्रधान । सावधान बैसला ॥ १०५ ॥ ऐसी निद्रा लागतां राया । विश्वामित्राची विचित्र माया । आपण स्वप्नीं प्रकटोनियां । रायापासीं द्विज-रूपें ॥ १०६ ॥ स्वप्नीं देखोनि द्विजातें । रायें नमिलें जोडोनि हस्तें । येरू गौरवी तयातें । मनोरथावाप्तिरस्तु[6] ॥ १०७ ॥ राजा बोले उदार-वचनीं । "कोण कामना इच्छा मनीं । येथें आलेति तें श्रवणीं । श्रुत केलें पाहिजे" ॥ १०८ ॥ ब्राह्मण म्हणे "राया समर्था । संसार-विपिनामाजी वसतां । दारिद्र्य-व्याघ्र अवचिता । आतुर कंठीं झोंबला ॥ १०९ ॥ तूं दया-शील धर्म-मूर्ति । बहु-वक्त्रीं ऐकिली कीर्ति । ह्यालागीं शरण नृपति । तुज आलों गृहस्था ॥ ११० ॥ ऐशिया परी दारिद्र्य-व्याघ्रा । वधावया हेतु नृपवरा । धरूनी आलों मी पवित्रा । तुजपासीं याचक" ॥१११॥ राजा म्हणे "याहून परता । लाभ तो कोण असे आतां" । रायें संकल्प घालितां । जाला बोलता द्विजवर ॥ ११२ ॥ "अंकुश[7] कडपाळें[7] लेखणी[7] । इतुकें वोपीं माझ्या पाणी" । येरें "दिधलें" म्हणोनि । उदक हातीं सूदलें ॥ ११३ ॥ सवेंचि आणिक देखे दृष्टी । काळ-पुरुष उभा निकटीं । लोहार्गळा[8] धरूनी हातीं । हाणी मस्तकीं निघातें ॥ ११४ ॥ तेणें घायें भयाभीत । राजा स्वप्नामाजी बरळत । तारामतीनें त्वरित । जागृत केला स्वहस्तें ॥ ११५ ॥ उठोनि बैसला सावधान । करिता जाला

---

१ इंद्रियें. २ आंगठ्याजवळील बोटाच्या नखानें. ३ मृगजलासारख्या केल्या म्हणजे ऋषीला कोप आला तरी राजानें आपल्या मनाची शांति ढळूं दिली नाहीं. ४ पृथ्वी-पति, राजा. ५ झोंपेनें. ६ मनोरथ + अवाप्तिः + अस्तु = मनोरथाची प्राप्ति होवो. ७ अंकुश शब्दानें हत्ती, कडपाळें ( लगाम ) शब्दानें घोडे, व लेखणी शब्दानें दप्तर असें समजावें, व तिहींचा एकंदर अर्थ राज्य असा असावा, असा ग्रंथकाराचा आशय असेल असें वाटतें. ८ लोखंडाचा दांडा.

हरिस्मरण । तारामति म्हणे "कोण । अवस्था जाली मानसीं" ॥११६॥ राजा म्हणे "सुकृत-कोटी । राज्य-दानें जोडिल्या शेवटीं । एक काळ-पुरुष निकटीं । लोह-दंडेसीं देखिला ॥ ११७ ॥ तेणें दंड हाणितां शिरीं । भयें बरळलों स्वप्नांतरीं । तुवां उठवितां सुंदरी । क्लेशातीत मी जालों" ॥ ११८ ॥ येरी म्हणे "जी प्राण-जीवना । यया तीर्थी करावें स्नाना । घालुनी अग्नि-मुखीं अवदाना । स्वप्न-दोष नासेल" ॥११९॥ प्रधान म्हणे "जी महाराजा ! । कांहीं दान वोपिजे द्विजा" । तव अकस्मात तपो-तेजा । विश्वामित्रा देखिलें ॥१२०॥ राजा नमुनी बोले वचन । "स्वामी आजी शयनीं स्वप्न । देखिलें त्याचें ज्ञान । प्रकट केलें पाहिजे ॥१२१॥ तुमच्या[1] प्रतिमेचें[1] रूपडें । ऐसा ब्राह्मण देखिला पुढें । आशीर्वाद करूनी तोंडें । इच्छा करी दानाची" ॥ १२२ ॥ सिंहासना-सह मेदिनी । राया ! दे मज लागुनी" । ऐसें बोलतां ते क्षणीं । उदक हातीं सूदलें ॥ १२३ ॥ ऐसिया दानें सुकृत-राशी । लाहतां उदेली[2] माजी[2] विवशी[2] । काळ-पुरुष लोहो-दंडेसीं । देख हाणी मस्तकीं" ॥१२४॥ ऋषि म्हणे "राया समर्था । असो स्वप्नींची मायिक वार्ता । दर्पणीं प्रतिबिंब हाता । न ये सर्वथा तेविं स्वप्न ॥ १२५ ॥ प्रस्तुत मागावया तूतें । इच्छा धरूनी आलों येथें । औट[3] तुक[3] कनकातें । मज दिधलें पाहिजे ॥ १२६ ॥ उदारपणें देसी जरी । उदक घालीं माझे करीं" । राजा म्हणे "आपुले नगरीं । आलें पाहिजे स्वामिया" ॥ १२७ ॥ ऋषि म्हणे "संकल्पाविणें । किंनिमित्त नगरा येणें" । रायें घेऊनियां जीवन । तया हातीं सूदलें ॥ १२८ ॥ रायें स्नान कासार-जीवनीं । सारूनी गिरिजावर[4] पूजूनी । विश्वामित्र शिबिका-यानीं । बैसवूनी चालिला ॥ १२९ ॥ प्रधान आणि तारामती । सरिसीं चरण-चाली चालती । सिद्धाश्रम सांडुनी पुढती । आत्म-नगरा पातलीं ॥ १३० ॥ वहनीं वेष्टित रावो । चालतां वाद्यां लागला घावो । वीर-श्रियेसीं धरा-नाहो[5] । अयोध्येसी पातला ॥ १३१ ॥ राजा आला म्हणोनी नगरी । शृंगारिली नाना परी । अनेक वहनीं वळघोनि पुरी- । बाहेर थवे दाटले ॥ १३२ ॥ राजा प्रवेशला मंदिरीं । तों विश्वामित्र बैसला द्वारीं । दंड पडताळूनी[6] करीं । तारामती लक्षिली ॥ १३३ ॥ दंड हाणोनी मोडिली शिबिका । वेणिये

---

१ तुमच्या आकारासारखा. २ मध्यें (इतक्यांत) आकाबाईचा फेरा आला. ३ साडेतीन तुक (भार) म्हणजे २८ हजार तोळे (तोळा ८० गुंजांचा घ्यावयाचा). ४ पार्वतीपति—महादेव. ५ पृथ्वीपति—हरिश्चंद्र. ६ घेऊन.

कवळोनी नृप-नायिका । देईं म्हणे माझिया कनका । म्हणोनि तीतें मारीत ॥ १३४ ॥ येरी थरथरां कांपत । हा हा शब्दें रुदन करीत । राया जाणविली मात । आला धांवत ऋषीपासीं ॥ १३५ ॥ राजा म्हणे "दया-सागरा ! । कोणा अपराधें स्त्रीये मारा । तो दोष ठेवूनि माझे शरीरा । खंडण कीजे तिळ-तुल्य" ॥ १३६ ॥ "संकल्प करूनी आणिलें येथें । शेखीं द्वारीं टाकुनी मातें । दान न देतां सदनातें । प्रवेश केला हा दोष" ॥ १३७ ॥ रायें पाचारुनी भांडारी[1] । म्हणे "कनक आणा झडकरी" । धनाधीशें कोटीवरी । हेम-मांदुसा[2] आणविल्या ॥ १३८ ॥ तुळे[3] उभवुनि धडा[4] । कनक भारितां पारडां । ऋषि म्हणे "राया मूढा । सुवर्ण देशी कवणाचें ॥ १३९ ॥ माझेंची मज देशी धन । ह्या धर्माचें कोण लक्षण । मज दिधलें राज्य-दान । तें काय हिरोन घेतलें ॥ १४० ॥ वोपिलें दान हिरोनी घेती । ते पूर्वजांसहित नरकीं पचती । सविता-सुताचिया[5] दूतीं । त्रासिजेती सर्वदा" ॥ १४१ ॥ राजा म्हणे "जी दयार्णवा ! । बरवें सुचलें देवाधिदेवा । राज्य-दान-भवार्णवा- । माजी बुडतां तारिलें ॥ १४२ ॥ संत भवार्णवीं तारक । मोह-तमाचे विदारक । सारूनि जीवत्व-कळंक[6] । शिव-रूपीं मिळविती" ॥ १४३ ॥ मग म्हणे अमात्य-प्रधाना । "छत्र मुद्रा सिंहासना । ऋषि-करीं वोपोनी नमना । करूनी बोले सेवकां ॥ १४४ ॥ नव-खंड-धरेची[7] आज्ञा । सुमनें पूजिलें प्राज्ञा । तुम्हीं न करूनी अवज्ञा । ऋषिमतें वर्तावें" ॥ १४५ ॥ अंकुश कडपाळें लेखणी । नृपें वोपिलीं ऋषि-चरणीं । "हें पावलें" म्हणे मुनी । "दान देईं कनकाचें" ॥ १४६ ॥ स्तंभीं बांधोनी राया । कठोर दंडें मारी तया । दुःखें समस्त जन-जाया । शोक करिती आक्रोशें ॥ १४७ ॥ तंव पातला रोहिदास । ऋषि-चरणीं मस्तकास । ठेवूनि म्हणे "स्वामी, दोष । कवण घडला रायातें" ॥ १४८ ॥ येरू पावका-तुल्य नयन । करूनी म्हणे "हा कवण" । राजा म्हणे "कुल-भूषण । होय नंदन पैं माझा" ॥ १४९ ॥ तया देखतां पिता जननी । अधिक मारी गाधिज-मुनी । हें देखोनी नगरजनीं । हा-हा-कारें वर्तिजे ॥ १५० ॥ धनाढ्य पुरींचे सौदागर[8] ।

---

१ खजिनदार. २ सोन्यानें भरलेल्या पेट्या. ३ तागडींत. ४ वजन. ५ सूर्य-पुत्राच्या म्हणजे यमाच्या. ६ मी जीव ( देहधारी ) अशी बुद्धि हाच दोष. ७ नऊ खंडांचीं नांवें:—ऐंद्र, कसेरु, ताम्रपर्ण, गभस्तिमत्, कुमारिका, नाग, सौम्य, वारुण आणि गांधर्व. ८ व्यापारी.

करुणा करिती ऋषीसमोर । आम्ही धन देऊं नृपवर । सोडिला पाहिजे स्वामिया ॥ १९१ ॥ विश्वामित्र म्हणे तयांप्रति । "मातें वोपिली सर्व जगती । राज्य आणि संपत्ति । ह्यावेगळी दक्षिणा ॥ १९२ ॥ पृथ्वीवरील जितुकें धन । तितुकें माझेंची प्रमाण । ह्यावेगळें कोठील कोण । देईल धन मजलागीं" ॥ १९३ ॥ रोहिदास म्हणे "जी ऋषि ! । मी गहाण राहीन तुम्हांपाशीं । पितृ-वचन-ऋणासी । उत्तीर्ण होईन सर्वथा ॥ १९४ ॥ ऋण हत्या आणि वैर । मेलिया न चुके हा निर्धार । ह्यालागीं धरूनी शरीर । जन्मोजन्मीं फेडिजे" ॥ १९५ ॥ परिसोनी बाळकाचीं वचनें । ऋषि चमत्कारूनी म्हणे । एक-चित्तें हीं तिघेंजणें । जालिया न चले श्रेष्ठाचें ॥ १९६ ॥ कीं ज्ञान वैराग्य एकमेळें । असतां भवाचें भय पळे । तेविं भार्यासुतभूपाळें । एक-चित्त जालिया ॥ १९७ ॥ आमुच्या तपाचिया राशी । वेंचल्या ऐसें निज-मानसीं । भावूनि म्हणे नृपासी । "आमुच्या देशीं न राहें" ॥ १९८ ॥ राजा म्हणे "करुणा-मूर्ती । काशी नव-खंडांपरती । तेथें जाऊनि भलत्या रीती । ऋण तुमचें फेडीन ॥ १९९ ॥ एक मासाची अवधी । दिधली पाहिजे कृपा-निधी" । ऋषि म्हणे "नेमसंधी[1] । टळतां शापूनि जाळीन" ॥ १६० ॥ "निकें[2]" म्हणोनि नमूनि चरणां । सव्य घालोनि प्रदक्षिणा । सह-कुमर-स्त्रीयेशीं विपिना । निघतां जाला आकान्त ॥ १६१ ॥ लोटला पौरजांचा पाळा[3] । नेत्रीं उदकें ढळढळां । करें पिटोनी कपाळा । सद्गदीत बोलती ॥ १६२ ॥ म्हणती "कैसा ब्राह्मण-ग्रहो । नृप-चंद्रा लागला राहो[4] । राजा दवडुनी पुरी-नाहो । होऊं पाहे दुरात्मा" ॥ १६३ ॥ वनिता सद्गदीत कंठीं । ऋषि-वदन पाहोनी दृष्टी । व्यंकटा[5] करूनि भृकुटी[6] । रोषें मोडिती आंगोळिया ॥ १६४ ॥ राय अवलोकुनी जना । म्हणे "स्नेह असों द्या आम्ही वना । जातों तुम्ही तपोधना-। मतें वर्तलें पाहिजे" ॥ १६५ ॥ राजा अवलोकी सदनाकडे । पशु पक्षी तितुका रडे । आहार विसरोनी तोंडें । शब्द करूं लागले ॥ १६६ ॥ वाजी वारण उष्ट्रें[7] । पयोधर-पशूंचीं[8] खिल्लारें[8] । शिकारी श्वापदें अपारें । तींही गहिंवरें दाटलीं ॥ १६७ ॥ कनक-पंजरीं सारिका रावे । हंस तित्तिर मयूर लावे । त्यांतें सोडोनि म्हणे जावें । निज-स्थाना आपुलिया ॥ १६८ ॥ तयां

---

१ नेमलेली मुदत. २ बरें. ३ समूह. ४ राहु. ५ वांकड्या. ६ भिंवया. ७ उंट. ८ दूध देणाऱ्या जनावरांचे कळप.

सोडितां गगनोदरीं । पक्षी बोलती मंजुळ-स्वरीं । "आम्हां निरवूनि कवणा करीं । केउता जासी स्नेहाळा" ॥ १६९ ॥ नर-नाथ सांडोनि ममता । तयां संबोखोनि[1] म्हणे "आतां । तुम्हांसी रक्षो अपर-धाता[2] । प्रति-सृष्टीचा कौशिक" ॥ १७० ॥ ऐसें बोलोनियां वेगें । बाहेर निघालीं त्रि-वर्गें । सालंकार देखोनि रागें । विश्वामित्र धाविन्नला ॥ १७१ ॥ तारामती धरूनि हातीं । "माझिया राज्यांतील संपत्ती । भूषणें काढोनि मजप्रति । देऊनि जावें वन-वासा" ॥ १७२ ॥ राजा, रोहिदास, तारामती । नगर सांडूनि वनाप्रति । गेलिया पुढें कैसी गती । वर्तली ते परियेसा ॥ १७३ ॥ येरीकडे नगरवासी । दुःख-शोकें अधोवदनेंसी । वियोग-दुःखें कासाविसी । निज-सदनासी पातले ॥ १७४ ॥ घोर वनांतरीं नृपति । सकुमार तारामती । रोहिदास धरूनि हातीं । जातां कैसें वर्तलें ॥ १७५ ॥ विश्वामित्रें तये वेळे । कृतांत-जनका[3] आज्ञापिलें । म्हणे "आजी द्वादश-कळे । तापलें पाहिजे ममाज्ञा" ॥ १७६ ॥ कौशिक-दर्पें सहस्त्र-रश्मी । तपों लागला तीव्र व्योमीं । तेणें तेजें पर्वत भूमी । उलों पाहे ते काळीं ॥ १७७ ॥ सर्वेंचि वरुणा-लागीं कोपें । म्हणे "येणें पंथें चालतां नृपें । सरिता-सरोवरांचीं आपें । नेऊनि शुष्क करावीं" ॥ १७८ ॥ केवढें ऋषीचें सामर्थ्य । वरुणें केला निर्वारि[4] पंथ । कूप, सरिता, तडाग, समस्त । आर्द्रता लोपली ॥ १७९ ॥ कांता कुमर चालतां पंथीं । उष्णें करपली सुकुमार-कांती । कडिये कुमर तारामती । घेऊनी चाले नृपसंगें ॥ १८० ॥ अंतर शोषलें तृषेनें । तनु करपली उष्ण-किरणें । तेणें कोमेजलीं वदनें । देह घामें थबथबीत ॥ १८१ ॥ रोहिदास म्हणे "जी ! ताता । तृषेनें प्राण जाईल आतां" । म्हणोनी कडेहुनी खालता । पडोनी लोळे गडबडां ॥ १८२ ॥ माता म्हणे रे "तान्हया ! । पैल वृक्षातळीं दिसे छाया । तेथें बैसोनियां तोया । आणूनी पाजूं तुजलागीं" ॥ १८३ ॥ म्हणोनि गेली तरुतळीं । तंव सूर्य-बिंब आलें मध्यमंडळीं । स्वल्प छाया दिसे मुळीं । जाऊनि तेथें बैसली ॥ १८४ ॥ राजा पाहे वनांतरीं । कूप-सरिता-सरोवरीं । बिंदुमात्र न दिसे वारी । हृदय जैसें अधमाचें ॥ १८५ ॥ रायें शोधिलें सकळ वन । कोठें न मिळे जीवन । परतोनि आला, नंदन । होता जेथें मातेशीं[5] ॥ १८६ ॥ भार्या पाहे राजाकडे ।

---

१ हांक मारून. २ प्रतिब्रह्मदेव. ३ यम-पिता सूर्य ह्याला. ४ निर्जल.
५ आईजवळ.

मुख-सरोवर दिसे कोरडें । उदक न देखोनि घडें[1] । पृथ्वीवरी टाकिलीं ॥१८७॥ राजा अवलोकी तयांतें । तव धुळीमाजी जैसीं प्रेतें । पल्लवें वारा घालुनी हातें । स्पर्शोनि केलीं सावध ॥ १८८ ॥ कुमर म्हणे "द्यावें जीवन"। ऐकोनि रायें उभय नयन । भरूनि म्हणे सखेद वचन । "पुढें येईं डोळसा[2]" ॥ १८९ ॥ ऐसें बोलोनि उभय करीं । कवळोनि चालतां पुढारीं । विश्वामित्र वनांतरीं । प्रगट जाला द्विज-रूपें ॥ १९० ॥ जरे-करूनि व्यापिली वपू । तेणें कंधरा प्रात-कंपू । संहनन[3] लवोनि जाला चापू[4] । आला खोकत टेंकित ॥ १९१ ॥ रायें देखोनि केलें नमन । येरें दिधलें आशीर्वचन । म्हणे "तुझी कीर्ती परिसोन । आलों येथें सकाम" ॥ १९२ ॥ राजा म्हणे "बोलिजे स्वामी" । येरु म्हणे "तीर्थवासी आम्ही । भार्या सुत समागमीं । चालतां चरण पोळती ॥ १९३ ॥ जो देईल पादत्राणें[5] । त्यासी कल्याण नारायणें । कीजे" म्हणतां नरभूषणें । वसनें वोपिलीं चरणींचीं ॥ १९४ ॥ तिघेंजणें चालतां चरणीं । तळीं तापली धरणी । माथां पोळती उष्ण किरणीं । अंतर तृषेनें करपलें ॥ १९५ ॥ ऐशिया दुःखें चालतां पंथीं । सुकुमार पाउलें पोळती । फोड उठोनि उले कांती[6] । नखें निघती बोटींचीं ॥ १९६ ॥ यापरी तिघें चालतां कष्टें । तापस घाली अव्हाटे[7] । पायीं रिघती पूर्ण कांटे । आणि सराटे लागती ॥ १९७ ॥ सुकुमार बाळ म्हणे "जी ताता ! । आकांत प्रळय मांडिला आतां । ऋषि-ऋण न फेडितां । सर्व जाऊं नरकासी" ॥ १९८ ॥ ऐसीं लंघितां वनोपवनें । पुढें विश्वामित्रें वाटिका, जीवनें । अति रमणीय प्रपा-स्थानें[8] । मायामय निर्मिलीं ॥ १९९ ॥ विश्वामित्रें रमणीय धाम । पुढें निर्मिलें मनोरम । जें देखतां जाय श्रम । दोष जैसे हरि-नामें ॥ २०० ॥ सुवर्ण-पात्रीं भरूनि चंदन । सुवास वाळ्याचें जीवन । पाक-शाळेमाजी अन्न । नानाविध षड्रस ॥ २०१ ॥ ऐसिया स्थानीं हेम-मंचकीं । मालती मोगरे चंपकी । आरळ[9] घातले हस्तकीं । पथिकांतें पहुडावया ॥ २०२ ॥ पुराण गीत धर्म-चर्चा[10] । महिमा वर्णिती ईश्वराचा । वारा न लगे श्रमाचा । जया श्रवणीं पांथिका ॥ २०३ ॥ ऐसी ऋषी निर्मी पोहे । नृपवर दुरोनि पाहे । जीवनालागीं लवलाहें । जाता जाला पुढारां ॥ २०४ ॥ सुत, कांता सांडुनी

---

१ शरीरें. २ हे सुरूपा. ३ शरीर. ४ धनुष्य. ५ जोडे. ६ (काती ?) कातडें, त्वचा. ७ आडवाटेला. ८ पाणपोईचीं स्थलें. ९ मऊ बिछायत. १० धर्माचा विचार.

मागें । माया-वनीं[१] पातला वेगें । पोहे जाणुनियां नेघे । राजा फिरे माघारा ॥ २०५ ॥ ऐशिया परी प्रपा-मंदिर[२] । सांडोनि जातां राजेश्वर । तोय-पात्र ऋषीश्वर । घेऊनि धांवे पाठीशीं ॥ २०६ ॥ म्हणे "उभा राहें पांथिका । श्रमें श्रांतलासी[३] घे उदका" । राजा म्हणे "हें धार्मिका । सेव्य नव्हे सर्वथा ॥ २०७ ॥ अन्न-सत्रींचें भोजन । धर्म-पोईचें उदक जाण । सेवी त्याचें सुकृत-धन । जाऊनि होय महा-दोषी" ॥ २०८ ॥ ऋषी म्हणे "तनु-भांडवल[४] । रक्षितां सुकृत-धन जोडेल । यालागीं बोलती वडील । शरीर रक्षी तो धर्म" ॥ २०९ ॥ ऐसें बोलोनि धरिला करीं । म्हणे "चाल मम मंदिरीं । स्नान सारूनि भोजन करीं । नावेक[५] शयनीं पहुडावें ॥ २१० ॥ शीतळ चंदनी घेईजे उटी । सुमनमाळा घालिजे कंठीं । परिमळ-द्रव्यें तुम्हांसाठीं । ठेविलीं तीं सेविजे ॥ २११ ॥ विश्रांति पावल्या चित्तीं । सुखें जाईजे आपल्या पंथीं" । हें परिसोनियां नृपति । बोले उदास मानसें ॥ २१२ ॥ "विश्रांति पावलों समस्त । तुमच्या दर्शनें कृत-कृत्य" । ऐसें बोलोनि नृपनाथ । शीघ्र चामके[६] पुढारां ॥ २१३ ॥ तारामती तया पाठीं । चालतां जाली परम कष्टी । पोई जाणोनियां दृष्टी । मुरडोनियां चालिली ॥ २१४ ॥ पोहे सोडुनियां सुंदरी । जातां देखिली ऋषीश्वरीं । तोय-पात्र धरूनि करीं । पुढां येउनी ठाकला ॥ २१५ ॥ म्हणे "माये श्रमलीस पंथीं । उष्णें करपली सुकुमार कांती । चरण-कमळीं फोड दिसती । अधर तृषेनें शोषला" ॥ २१६ ॥ ऐसें बोलोनियां तोंडें । उदक-पात्र वोडवी पुढें । येरी नघेोनियां मुरडे । आपुल्या पंथें जावया ॥ २१७ ॥ येरीकडे आश्रमांत । ऋषीनें केलें अत्यद्भुत । माया-मय नृपनाथ । करूनि बैसवी मंचकीं ॥ २१८ ॥ ऋषी म्हणे "वो पतिव्रते । तुझा पती पाचारी तूतें । पैल पालवीतसे[७] हातें । मंचकीं बैसूनी मंदिरीं" ॥ २१९ ॥ येरी अवलोकी भीतरीं । रायासि देखे मंचकावरी । चरणसेवा सुंदरी । सुकुमार करीं करिताती ॥ २२० ॥ ऐसें अवलोकितां सती । म्हणे "हें काय घडलें श्रीपति । अंधकारामाजी गभस्ती[८] । अडखळोनि पडियेला ॥ २२१ ॥ दश-द्वय-शताक्षें[९] शिरीं । वसुधा वाहिली सुमनापरी । तो भार मानुनी सांडी जरी । तरी हें ऐसें घडों

१ इंद्रजालानें (गारुडीविद्येनें) निर्मिलेल्या अरण्यांत. २ पाणपोईचें स्थान. ३ भागलास. ४ शरीर हेंच भांडवल. ५ क्षणभर. ६ जाई. ७ हाताच्या खुणेनें बोलवीत आहे. ८ सूर्य. ९ ज्यास दोन हजार डोळे आहेत अशा शेषानें.

ये ॥ २२२ ॥ दुष्ट-दंडना कमळा-पती । अवतार धरितां भागे चित्तीं । अस्तमान होतां फिरे[1] गभस्ती । तरी हें ऐसें घडों ये ॥ २२३ ॥ कीं पर्वत-मस्तकींचें जळ । अधो-पंथें धांवे तुंबळ । तें परतोनि पावे मूळ । तरी हें ऐसें घडों ये ॥ २२४ ॥ कीं वेदमर्यादा ब्राह्मण । लंघुनी करी अनाचरण । कीं पतिव्रता पति-वचन । न मानी तरी हें घडों ये ॥ २२५ ॥ कीं परम श्रोत्रिय संकटीं । क्षुधेकरूनी होतां कष्टी । अवर्ण-घरीं[2] दाटो-दाटी[3] । भोजन करी तरी हें घडों ये ॥ २२६ ॥ तैसा राजा सूर्य-वंशीं । धर्मशील सत्त्व-राशी । क्लेश पावतां पोईशीं । विश्रामेल हें घडेना ॥ २२७ ॥ असो मी तंव न घें जीवन" । म्हणोनि केलें पुढारां गमन । विश्वामित्र म्हणे "कोण । सत्त्व इये सतीचें" ॥ २२८ ॥ मागें पाहे जंव कौशिक । तंव येतां देखिलें बालक । श्रमें शोषलें वदनांबुजक[4] । अंतर तृषेनें करपलें ॥२२९॥ धांवोनि कडिये घेतलें । करतळें मुख कुरवाळिलें । सुंदर सुकुमार पाउलें ॥ पाहतां फोड दीसती ॥ २३० ॥ म्हणे "श्रमलासी चालतां पंथीं । या पोहेसी करीं विश्रांती । उदक प्राशूनियां पुढती । गमन करीं बाळका" ॥२३१॥ रोहिदास म्हणे "स्वामिया । आम्ही न शिवों ऐशिया तोया । कलंक लागेल आमुचिया । सूर्य-वंशालागुनी" ॥ २३२ ॥ म्हणोनि घातलें दंडवता । "दुरी अंतरलीं माता-पिता । तरी कृपा करूनि आतां । आज्ञा दिधली पाहिजे" ॥ २३३ ॥ ऋषीप्रती बोलोनी ऐसें । गमन केलें रोहिदासें । विश्वामित्र निज-मानसें । वोवाळीत बाळका ॥ २३४ ॥ ऐशिया सत्त्व-सवित्यापुढें । आमुचें तप खद्योत बापुडें । वृथा सुकृत हारविलें तोंडें । प्रतिज्ञा करूनि सर्वथा ॥ २३५ ॥ असाध्य जाणूनि भूपाळ-सत्त्व । कौशिक कोपला अत्यद्भुत । भू-तळीं सृष्टी करावया हुत । जाणो शंकर कोपला ॥ २३६ ॥ येरीकडे वसुधा-पति । पोहे लंघुनी जातां पंथीं । तयामागें तारामती । कवळोनि चाले पुत्रातें ॥२३७॥ महा-घोर-वनांतरीं । चालतां जाली कैशी परी । चित्त देऊनियां चतुरीं । श्रवण केलें पाहिजे ॥ २३८ ॥ विश्वामित्रें जाऊनि पुढें । वणवा लाविला चहूंकडे । जळों लागलीं उभीं झाडें । श्वापद-पक्ष्यां आकांत ॥ २३९ ॥ धूम्रें दाटलें अंबर । भडके उठती भयंकर । तयामाजी राजेश्वर । सह-परिवारें सांपडला ॥ २४० ॥ ज्वाळां लागती शरीरा । तेणें पोळती चरचरा । नेत्र आणि घ्राण-द्वारां । धूम लागे तीक्ष्ण ॥ २४१ ॥ विश्वामित्रें काय केलें । राया

---

१ परत फिरेल. २ नीच जातीच्या घरीं. ३ लगट करून, मुद्दाम. ४ मुखकमल.

रोहिदासा चुकविलें । तारामतीतें सावाइलें[1] । तया वणवियामाझारीं ॥ २४२ ॥ मागें पाहे तारामती । पुत्र न देखोनी पडली क्षितीं । पुढें पाहे तंव नृपती । तोही तीतें दिसेना ॥२४३॥ म्हणूनि लोळे भू-तळवटीं । आक्रंदोनी कपाळ पिटी । म्हणे "कटकटा ल्लाटीं । काय लिहिलें कळेना" ॥२४४॥ वणवियामाजी जळोनि मेले । ऐसें ह्रदयामाजी भाविलें । ल्लाट पिटोनी कर-तळें । शंखस्फुरणें[2] करीतसे ॥२४५॥ म्हणे "बाळा रोहिदासा । भेटी देईं बा पाडसा । तुजवेगळ्या दाही दिशा । वोस वाटती मजलागीं ॥ २४६ ॥ अहा सूर्य-वंश-चूडा-रत्ना[3] । माझिया प्राण-पती निधाना । मजवेगळे सायुज्य-सदना[4] । भोगावया गेलेती ॥ २४७ ॥ मज सांडूनी भव-पुरीं । पेणें[5] केलें दुरीच्या दुरी । कवण अपराध माझिये शिरीं । भेटी देउनी सांगिजे ॥ २४८ ॥ नातरी वैधव्य-दोषाचा मळ । स्पर्शों नेदीं मी अळुमाळ । युगासमान वाटे पळ । म्हणोनी अनळ प्रार्थिला ॥ २४९ ॥ जया अनळें दाहिला पती । तया वोपीन वपु आहुती" । मनेंची सौभाग्य-संपत्ती । वर्षती जाली पावकीं ॥ २५० ॥ ब्रह्म-रूप भाविला वन्ही । धर्म-शिळे उभी राहुनी । उडी टाकावी तंव ते क्षणीं । प्रगट जाला कौशिक ॥ २५१ ॥ वणवा विझवुनी अंगें । सतीसमीप पावला वेगें । म्हणे "तूं कवण कवणाची सांगें । किमर्थ आलीस काननीं" ॥ २५२ ॥ येरी म्हणे "आम्ही पथिक । माझा पति आणि बाळक । या वणवियामाजी देख । जळोनि मेले कळेना ॥ २५३ ॥ तुम्हीं देखिले असती जरी । कृपेनें सांगिजे उत्तरीं" । ऋषी म्हणे "वो वनांतरीं । जळोनि पडलीं दोन शवें ॥ २५४ ॥ एक पुरुष एक कुमर । जळोनी पडिले लोध[6] शरीर" । ऐसें परिसतां अंतर । कर्पोनि गेलें तियेचें ॥ २५५ ॥ ऋषि म्हणे "माझियासवें । येशील तरी दावीन शवें" । ऐसें बोलोनि लघुलाघवें । प्रेतें निर्मिलीं वनांतरीं ॥२५६॥ तारामतीस नेऊनी तेथें । दाविता झाला उभय प्रेतें । त्वचा जळोनि पडलीं व्यस्तें । हस्त पाद पसरूनी ॥२५७॥ ओळखुनि पति-पुत्रांचीं मडीं[7] । उभय हस्तें ह्रदय ताडी । शंख-स्फुरण करी तोंडीं । लोळे क्षितीं गडबडा ॥ २५८ ॥ अवलोकुनी पतीचें मडें । म्हणे "वल्लभा ! पाहें मजकडे । रुसणें सांडोनि बोलिजे तोंडें । गुज-गोष्टी मजसवें ॥ २५९ ॥ मज-वेगळें[8] उदक-पान । तुम्हांसी लागे विषासमान । जीवींचें गुह्य वचन । अखंड

---

१ साह्य केलें. २ शंखध्वनि. ३ सूर्यवंशाचा शिरोमणि म्हणजे त्यांत श्रेष्ठ. ४ मुक्तीच्या घराला. ५ मुक्काम. ६ प्रेत. ७ प्रेतें. ८ मजशिवाय.

सांगा मजलागीं ॥ २६० ॥ ते तुम्हीं आजी कवणा गुणें । क्रोध धरिला अंतःकरणें । मौन धरूनियां वचनें । कां न बोलां मजसवें" ॥२६१॥ रोहिदास-तनु कवळोनि पोटीं । लल्लाट मेळवीं लल्लाटीं । शोक करितां श्वापदें दृष्टीं । देखोनि गहिंवरें दाटलीं ॥ २६२ ॥ "कवणा घालूं मी भोजन । कवणा वोपूं स्तन-पान । काडिये घेऊनी वचन । बोलों आतां कवणाशीं" ॥ २६३ ॥ ऐसा विलाप करितां सती । अस्तमाना गेला गभस्ती । ऋषि म्हणे "आतां किती । शोक करिशी शवांचा ॥२६४॥ प्रेतें कवळूनी काय फळ । निघोनी[१] गेला हंस[१] नीळ[१] । वृथा पिटिशी कपाळ । शीण वाटे ऐकतां ॥ २६५ ॥ आम्हीं परिशिली एक मात । तुम्हांस ऋण असे किंचित" । येरु म्हणे "जी ! सत्य सत्य । देणें असे ऋषीचें" ॥ २६६ ॥ येरु म्हणे "पतीचें ऋण । फेडिते पतिव्रता जाण । तेणें अक्षय स्वर्ग-भुवन । भोगावया जोडेल ॥२६७॥ आतां प्राप्त जाली निशी[२] । श्वापदें भक्षिती तुजसी । शेखीं भोगाल नरकाशी । घडे दोषें ऋणाच्या ॥ २६८ ॥ आमच्या गृहीं क्रमुनी निशी । प्रभातीं अग्नि देणें शवांसी । भलतियापरि पति-ऋणाशी । हरुनी स्वर्गा धाव्जिे ॥२६९॥ तारामती म्हणे "दयाळा । केवीं सांडुनी पती आणि बाळा । धणीवरी[३] पाहेन डोळां । मुखकमळें दोघांचीं" ॥ २७० ॥ ऐसें ऐकुनियां वचन । अदृश्य जाला तपोधन । कौशिक ऋषीनें विंदाण[४] । काय केलें वनांत ॥ २७१ ॥ घोर दाटली इंदु-वल्लभा[५] । माजी उडु-गणें[६] दाविती शोभा । पिशाच-श्वापदांची सभा । प्रेतें देखोनी पातली ॥ २७२ ॥ तयांमाजी विश्वामित्र । व्याघ्र-रूप धरूनी क्रूर । महा-भयानक पसरोनि वक्त्र । झेंप घाली अवचितीं ॥ २७३ ॥ सतीपुढोनि उभय प्रेतें । वोढूनि नेलीं परौतें[७] । उदर फाडोनि आंतें[८] । काढूनी टाकी बीभत्स[९] ॥ २७४ ॥ दृष्टी लावुनी सतीकडे । मांस भक्षीतसे तोंडें । रागें गुरगुरत पुढें । भय दावी क्षण क्षणा ॥ २७५ ॥ तारामती म्हणे "गा ! श्रीपती । धांव धांव या आकांतीं । कैशी प्राप्त जाली गती । ऐशी वैरिया होऊं नये ॥ २७६ ॥ अनळें दाहिलें उभय रत्नां । शेखीं प्राप्त व्याघ्र-वदना । आतां माझियाही प्राणा । न सोडी हा सर्वथा ॥ २७७ ॥ जन्मल्या देहासी मरण ।

---

१ आत्मरूपी हंस पक्षी, शरीर हेंच घरटें (नीळ = नीड) सोडून गेला. २ रात्र. ३ तृप्ति होईपर्यंत. ४ कपट. ५ चंद्रप्रिया (रात्र). ६ तारा-गण. ७ पलीकडे, दूर. ८ आंतडीं. ९ किळस येईल अशा रीतीनें.

कदां न चुके ब्रह्म-वचन । परी त्या ब्राह्मणाचें ऋण । फिटलें नाहीं आमुतें ॥ २७८ ॥ असो पुढें जन्म घेतां । ऋषि-ऋण फेडूं सर्वथा । मी पतिसवें पतिव्रता । गमन करीन अविलंबें" ॥ २७९ ॥ म्हणवुनी नयन झांकिले । पंचप्राणांतें आकर्षिलें । प्राण द्यावा तंव सुचलें । ज्ञान-दृष्टी कौशिका ॥ २८० ॥ तारामती सांडील प्राण । आमुचें जाईल प्रतिज्ञा-वचन । म्हणोनि आणी दोघेजण । पति पुत्र तीपुढें ॥ २८१ ॥ कैंचा व्याघ्र कैंचा वणवा । जैसा मृगाब्धीचा[1] हेलावा[2] । कीं दुष्ट स्वप्न भोगितां जीवा । वोडंभरी[3]सारिखें ॥ २८२ ॥ राजा म्हणे "हो ! अंगने ! । तुजलागीं हिंडलें वनें । बहुत श्रमलीस तृषेनें । म्हणोनी येथें बैसलीस" ॥ २८३ ॥ तारामतीनें लोचन । उघडितां देखिले दोघे जण । धावुनी दिधलें आलिंगन । शोक करी आक्रोशें ॥ २८४ ॥ राजा म्हणे "सौभाग्य-सरिते । किमर्थ शोक सांग मातें" । येरी म्हणे "तुम्हातें । पुनर्जन्म देखिलें ॥ २८५ ॥ तुम्ही जळोनी मेलेति वणवां । कवळोनी बैसल्यें उभय शवां । परम दुःख वाटलें जीवा । शंका वाटे सांगतां ॥ २८६ ॥ अकस्मात् व्याघ्रें झेंपू । घालोनी नेल्या दोन्ही वपू । भयें मातें भरला कंपू । मृत्यु-समयो वाटला ॥ २८७ ॥ यालागीं झांकले नयन । हृदयीं स्मरला नारायण । परिसोनी तुमचें वचन । नेत्र उघडोनी पाहिलें" ॥ २८८ ॥ राजा म्हणे वैकुंठ-पाळ । ऐशींच विघ्नें भंगुनी सकळ । मोक्ष-पदीं स्थापील अढळ । सत्त्व देखोनी आमुचें" ॥२८९॥ असो तिघें मिळोनी पंथीं । चालतां कष्ट पावलीं रातीं । भयानक वनें लंघिती । नद नदिया भयासुर ॥२९०॥ यापरी चालतां मध्य-रात्रीं । पुढें देखिली वोस नगरी । जे कां पिशाचादि खेचरीं[4] । आणि श्वापदीं वसविली ॥ २९१ ॥ ऐसेपरी वोस नगर । लंघूनि जातां पद्मिनी-वर । मुख दावितां दिनकर । पळत गेली तम-शोभा ॥२९२॥ यापरी लोटला एक मास । राजा न लभे सुखाचा लेश । दुःखावेगळें निमिष । जाऊं नेदी कौशिक ॥२९३॥ भूपाळ-सत्त्व शुद्ध-रत्न । कौशिक-कोप न गणी घन[5] । मशक-नाशकाच्या[6] प्रभंजनें[6] । मेरु जैसा न हाले ॥ २९४ ॥ असो सह-कुमर-कांता नृपती । परम कष्टें चालतां पंथीं । मोक्ष-दायक पुरी अवचितीं । वाराणशी देखिली ॥ २९५ ॥ जिये नगरीं अमर-गण । जन्म इच्छिती पावोनी मरण । मग इतरांचा पाड कोण । निधनें

---

१ मृगजलसागराचा. २ लाट. ३ राक्षसी माया, गारुडी विद्या. ४ आकाशांत फिरणाऱ्यांनीं. ५ घण (लोहाराचा). ६ चिलटाला उडविणाऱ्या वाऱ्यानें.

लाहिजे मोक्षातें ॥२९६॥ जे कां नवखंडांवेगळी । पंच-क्रोशी[1] वसुधा-तळीं । जेथें वसे चंद्रमौळी । द्यावया मोक्ष जगातें ॥ २९७ ॥ लक्ष चौऱ्यासी जन्मभ्रमणा । चक्रीं घातले जीव नाना । जन्म न चुके चतुरानना । पंचवदना-वांचूनी ॥ २९८ ॥ ते पुरी देखोनी भूपाळें । साष्टांग लोटांगण घातलें । पुढें चालतां देखिलें । तीर भागीरथीचें ॥ २९९ ॥ तया सुरसेव्य गंगा-जळीं । स्नान करूनी चंद्रमौळी । पूजा बांधूनी कमळीं । बद्धांजली स्तवितसे ॥३००॥ "जय जय कैलास-गिरि-नायका ! । कर्पूर-गौरा ! कामांतका[2] ! । त्रिगुण त्रिपुर-भेदका ! । वृषभ-ध्वजा ! महेशा ! ॥ ३०१ ॥ जय जय भक्तकाम-कल्प-द्रुमा ! । रमा-रमण-विश्राम-धामा[3] । वैराग्य-मुकुटींच्या ललामा[4] ! । नील-ग्रीवा ! जटाधरा !" ॥ ३०२ ॥ स्तवूनि पूजूनि विश्वनाथा । विनयें चरणीं ठेविला माथा । देउळाबाहेरी नृपनाथा । निघतां कैसें वर्तलें ॥ ३०३ ॥ कौशिकें प्रकटोनी देउळीं । नृप वोढिला धरुनी अंचळीं । "तुतें शोधितां मही-तळीं । आजी येथें देखिलें ॥ ३०४ ॥ जरी द्यावया नव्हतें धन । तरी कां केलें वाग्बंधन[5] । याचक शिणवूनि दान । केलियाचें फळ काय ॥३०५॥ मी तों न सोडीं एक कवडी । तुतें घालीन बांदवडीं[6] । काय नेणशी माझी प्रौढी । करीन वेडीं सुरासुरें" ॥३०६॥ राजा म्हणे "दया-सागरा । आंवरा क्रोध-हय-वाग्दोरा। आजी अस्त न होतां भास्करा । देईन शरीरा विकूनी ॥३०७॥ अस्ताचळा वासरमणी । न जातां फेडीन ऋण । जरी नव्हे सत्य वचन । तरी शापूनी भस्म करीं" ॥ ३०८ ॥ ऐशिया परी तपो-तेजा । शांतवूनी बैसवी राजा । करींची मुद्रिका काढिली वोजा । जे त्रिशंकु-राय[7] बोटींची ॥ ३०९ ॥ ते देऊनी घेतलें तृण[8] । आपणासहित जाया नंदन । माथां बांधुनीयां वचन । खालावूनी चालिला ॥ ३१० ॥ छाया-पती-वंश-मंडण[9] । चाले माथां बांधोनी तृण । सरिसीं पवित्र जाया नंदन । फिरे पाटणीं[10] ग्राहिकार्थ ॥ ३११ ॥ पुरी फिरवूनी शेवटीं । कौशिकें आणिलीं हाटवटीं[11] । राज-लक्षणें देखोनी दृष्टी । विस्मय पोटीं जगाच्या ॥ ३१२ ॥ म्हणती हा हरिश्चंद्र नृपती ।

---

१ पांच कोसांचें क्षेत्र. २ मदनाचा नाश करणाऱ्या. ३ लक्ष्मीपतीस विश्रांति-स्थान अशा. ४ भूषणरूपा. ५ वचन देऊन बांधून घेणें. ६ बंदींत. ७ हरिश्चंद्राच्या बापाचें नांव. ८ प्राचीनकालीं इतर मालाप्रमाणें मनुष्याच्या विक्रीची चाल असे व तदनुरूप हरिश्चंद्राच्या वेळीं डोक्यावर गवताची पेंढी घेऊन बाजारांत उभें राहण्याची वहिवाट होती असें दिसतें. ९ छाया म्हणजे सूर्याची बायको, तिचा पति सूर्य, त्याच्या वंशाचें भूषण. १० शहरांत. ११ बाजारांत.

दुजी सुकुमार तारामती । पुत्र तिचा उत्तमकीर्ती । रोहिदासासारिखा ॥३१३॥ एक म्हणती " यथार्थ वचन । रायें ओपिलें राज्य-दान । दक्षिणेलागीं ब्राह्मण । चौथा दिसे कौशिक " ॥ ३१४ ॥ ऐशी परस्परें मात । प्रकट जाली नगरांत । ऐकोनि धाविन्नले समस्त । धनवंत धनेंशीं ॥ ३१५ ॥ तारामती म्हणे " प्राणेश्वरा ! । प्रथम विकूनि मम शरीरा । उरलिया धनालागीं कुमरा । वोपोनि शांतवीं ऋषीतें " ॥ ३१६ ॥ तंव रोहिदास पितृ-चरणीं । मस्तक ठेवूनि, उभय पाणी । जोडोनि बोले विनय-वाणी । ते तूं ऐकें कुरुवर्या ॥ ३१७ ॥ " प्रथम माझिया धनारविंदें[1] । कौशिक-मौळीं पूजा बांधें । जेणें पुत्रपणाचीं बिरुदें । वदनीं विबुधें[2] वानिजे " ॥ ३१८ ॥ ऐकोनी दोघांचीं उत्तरें । आश्चर्य मानिलें ऋषीश्वरें । मग म्हणे " तुमच्या शरीरें । ऋण कैसें फिटेल ॥ ३१९ ॥ नृपांगीं दोन तुकें[3] । एक तुक नृप-नायिके[4] । अर्ध उरलिया बाळकें । विकूनि द्यावें देहासी " ॥ ३२० ॥ कर्मरेखा करूनी मान्य । अंगना-मस्तकीं बांधी तृण । रूप यौवन लावण्य । देखोनि आलीं ग्राहकें ॥ ३२१ ॥ ***तंव काळकौशिक तया क्षणा । ग्राहक आला सुंदरी ॥ ३२२ ॥ तो परम पवित्र श्रोत्रि । सदाचारी अग्नि-होत्री । धर्मशाळे अन्न-सत्रीं । पाकालागीं घेतसे ॥ ३२३ ॥ पवित्र तारामतीचें तुक । तुकोनि दिधलें शुद्ध कनक । राजांगनेसी काळकौशिक । घेऊनी जातां आश्रमा ॥ ३२४ ॥ रोहिदास म्हणे " जी ताता । मातृ-स्नेहें कळवळ चित्ता । भेटोनि येईन मागुता । वेळ न लागतां क्षणमात्रें " ॥ ३२५ ॥ राजा म्हणे सद्गद वचनें । " भेटोनि मागुती शीघ्र येणें " । मातृ-पाठीं धांवतां तेणें । आलें देखे बाळक ॥ ३२६ ॥ उभी राहुनी वेल्हाळा । पोटेशीं कवळूनी बाळा । स्तन घालोनि मुख-कमळा । कुरवाळोनी बुझावी ॥ ३२७ ॥ म्हणे " बाळका कुळ-भूषणा । तुझा वियोग न साहवे प्राणा । परी तापस-दक्षिणेचिया ऋणा । नेदूं कैशी तुजवीण " ॥ ३२८ ॥ आंसवें भरुनी नयन । " हा हा " शब्दें करी रुदन । परताप-क्लेशें सज्जन । नवनीत तैसे वितुळती ॥ ३२९ ॥ काळकौशिक म्हणे " माते । स्नेह सांडूनि चालिजे चित्तें । कृपा केलिया कमळा-कांतें[5] । योग

---

१ द्रव्यरूप कमळानें. २ शाहण्यानें. ३ भार, वजन. ४ राजस्त्री तारामती तिला. ५ लक्ष्मीपतीनें.

होईल दोघांचा " ॥ ३३० ॥ येरी ऋषीचे पाद-पद्मीं । नमुनि म्हणे. "तात स्वामी । माझें बाळक घ्यावें तुम्हीं । सेवा करील चरणाची " ॥ ३३१ ॥ करुणा येतां ब्राह्मणोत्तमा । अर्ध तुक वोपिलें हेमा[1] । कुमारासहित राज-भामा[2] । स्वकीय धामा आणिली ॥ ३३२ ॥ तुकें दोन उरलें ऋण । यालागीं रायें घेतलें तृण । माथां बांधोनी आपण । उभा ठेला हाटवटीं ॥ ३३३ ॥ नगरवासी नारी नर । देखतां नयनीं ढाळिती नीर ॥ म्हणती "चंडाळ ऋषीश्वर । विकाया नृप घातला " ॥ ३३४ ॥ मात फांकली नगरीं । वीरबाहो दुराचारी । श्वपच[3] यातीचा प्रेतपुरी- । नाथ[4] जाणा प्रत्यक्ष ॥ ३३५ ॥ तामस तनूची दुर्गंधी । विशाळ रूप ताल-स्कंधी । तया देखोनी सज्जन-मांदी । दुरी ठेली पहात ॥ ३३६ ॥ होम-शाळेमाजी श्वान । कीं ग्रहणीं सिंहिकानंदन[5] । धन-कुंभीं पिशाच-गण । प्रकटे तैसा पातला ॥ ३३७ ॥ तया डोंबाचिये गृहीं । धनालागीं मर्यादा नाहीं । गंगातटीं प्रेत-दाहीं । द्रव्य वोपिती तयातें ॥ ३३८ ॥ डोंब म्हणे "गा ! साचें । काय मोल सांग याचें " । येरु म्हणे "देहाचें । दोन तुकें सुवर्ण " ॥ ३३९ ॥ ऐसें बोले तो कौशिक । डोंबें तुकोनी दिधलें कनक । नृपा नेतां सकळ लोक । शोक करिती आक्रोशें ॥ ३४० ॥ हरिश्चंद्र पवित्र परम । त्यासही प्राप्त कर्म । भोगणें घडे धाम । अंत्यजाचें अपवित्र ॥ ३४१ ॥ श्वपच-गृहा पवित्र नृपति । चालतां मार्गीं पसरल्या अस्थी । गळत-रक्त चर्में वाळती । दुर्गंधी घ्राणीं बैसली ॥ ३४२ ॥ अस्थी चुकवुनी ठेवी पाय । तंव देखिलें डोंबालय । रत्न-खचित हाटकमय । अति रमणीय साजिरें ॥ ३४३ ॥ ऐशियापरी श्वपच-धाम । ऐश्वर्य मनोरम । जेवीं कां पशुघ्नाचें[6] नाम । दयाळ ऐसें बोलिजे ॥ ३४४ ॥ तया धामासी खरी पद्मिनी । रूप-लावण्य-चातुर्य-खाणी । उभी वल्लभा लक्षित नयनीं । वेष्टित दासी-दशकेंशीं[7] ॥ ३४५ ॥ वल्लभापाठीं राज-चिन्हीं । पुरुष देखोनी भाविलें मनीं । प्रेत-दहनालागीं कोणी । धन घेउनी पातला ॥ ३४६ ॥ हर्षें उतरोनी लवलाहें । बाहेर येऊनी जंव पाहे । तंव राजा कवळोनी बाहे[8] । वीरबाहु आणित ॥ ३४७ ॥ आदरें बोलावूनि कांतें । नृप वोपिला धरूनि हातें । म्हणे "काज सांगिजे यातें । बाह्यवर्तीचें[9] सर्वदा " ॥ ३४८ ॥ ते म्हणे "हा रोड रोगी ।

---

१ सोनें. २ राजस्त्री. ३ चांडाळ (कुत्रीं शिजवून खाणारा). ४ यम = प्रेत + पुरी + नाथ. ५ राहु (सिंहिका-पुत्र). ६ खाटिकाचें. ७ दाहा (दशक). ८ हात. ९ बाहेरचें.

याच्या कामा लागो आगी । शक्ती कैंची याचे अंगीं । स-जीव प्रेता आणिलें" ॥ ३४९ ॥ रागें आणूनि घागरी । ठेविली नृपवराचे शिरीं । म्हणे "उदक आणीं झडकरी । भागीरथी गंगेचें" ॥ ३५० ॥ कुंभ घेऊनि भूपाळ । भरी भागीरथीचें जळ । कौशिकें येऊनि मांडिला छळ । तयावेळीं रायाचा ॥ ३५१ ॥ कुंभ घेवोनि जातां पुढें । हाणोनि फोडियला दंडें । हातें लोटोनि देतां पडे । तोंडघशीं पालथा ॥ ३५२ ॥ शरीर थरथरां कांपत । अंत्यजें देखिला येत । कोपा चढला अत्यद्भुत । धांवोनि मारी चडकाणा[1] ॥ ३५३ ॥ "वृथा पोशिलासी पुष्ट । प्रथम मुहूर्तीं फोडिला घट । तुझेनी न होती कष्ट । तरीं कां आम्हां नागविलें" ॥ ३५४ ॥ राजा म्हणे "विशाळ घागरी । भरूनि गेलों जी ! चांचरी[2] । कोप सांडोनि मजवरी । क्षमा केली पाहिजे" ॥ ३५५ ॥ मग दुजी घागरी लहान । देऊनि म्हणे "भरीं रांजण । हे फोडिशी तरी प्राण । घेईन तुझा तात्काळीं" ॥ ३५६ ॥ दुजा कुंभ घेउनी माथां । शीघ्र पाणी भरूनी आणितां । रांजणीं जाउनी गुप्तता । फोडी तत्वतां बुडुखीं ॥ ३५७ ॥ उदयापासोनी अस्तवरी । राजा कष्टें उदक भरी । बिंदुमात्र न थारे वारी । अभिषेक-पात्रासारिखें ॥ ३५८ ॥ ऐसेपरी तो नृप-राज । क्लेश पावे करितां काज । अस्ताचळा मित्र-पंकज[3] । जातां विनवी अंत्यजा ॥ ३५९ ॥ "वर्णाश्रमांचा[4] सेतु[5] न ढळे । स्वामि-सेवेचा पंथ चाले । ऐसें पाहिजे केलें । अन्न-दानें स्वामिया" ॥ ३६० ॥ अंत्यजें जाउनी आपण । नृपा वोपिलें शुष्कान्न । भार्गव[6]-शाळेचें भाजन[7] । आणि इंधनें[8] आज्यादि ॥ ३६१ ॥ नृपें बांधोनि पदरीं । घेऊनी गेला गंगा-तीरीं । स्नान सारुनी सामुग्री । घेउनी पाक सारिला ॥ ३६२ ॥ हृदयस्थ-देवार्चन । करूनी पात्रीं वोगरिलें[9] अन्न । ग्रास काढुनी वदन । तृप्त केलें अग्नीचें ॥ ३६३ ॥ ग्रास घालावा जंव वदनीं । तंव ब्राह्मण-वेशें कौशिक मुनी । तेथें पातला भोजनीं । इच्छा धरुनी क्षुधार्थी ॥ ३६४ ॥ उदर-पृष्ठीची घडी । करूनी चरणांची वेंगडी[10] । झोंक सांवरितां दंडीं । शब्द तोंडीं न बोलवे ॥ ३६५ ॥ कर-संकेत

---

१ तोंडांत मारणें. २ अडखळत. ३ पंकजमित्र (सूर्य). ४ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण आणि ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास हे चार आश्रम. ५ मर्यादा. ६ कुंभार. ७ पात्र. ८ सर्पण, जळण. ९ वाढिलें. १० वांकडेतिकडेपणाची स्थिति.

देउनी मुखा । देखोनि दया नृप-नायका । म्हणे "त्रैलोक्य-नायका । स्नान कीजे सत्वर" ॥ ३६६ ॥ स्नान सारितांच ब्राह्मण । नृपें द्विभागिलें अन्न । एक वोपी मुनीलागुन । एक ठेवी आपणा ॥३६७॥ ब्राह्मण देखोनि क्षुधार्ती । राजा म्हणे "इतुकेन तृप्ती । कैशी पावेल हे मूर्ती" । म्हणोनि मागें राहिला ॥ ३६८ ॥ ब्राह्मण बैसोनी पात्रीं । जेवितां मिटक्या मारी वक्त्रीं । म्हणे "बहुतां दिवशीं नेत्रीं । आजी अन्न देखीलें" ॥ ३६९ ॥ स्वकीय भाग तो भक्षिला । दुजीयाशीं नेत्र लाविला । नृपें जाणूनी पात्र गोळा । करूनि वोपिला स्व-भाग ॥ ३७० ॥ तृप्ति पावोनि ऋषीश्वर । उठिला देवोनि ढेंकर । उदक-आहार नृपवरें । चार अंजली सेविल्या ॥ ३७१ ॥ पटका कसोनि कासेशीं । सदा सादर सेवेसी । भोजन-काळीं कौशिक ऋषी । येउनी अन्न भक्षित ॥ ३७२ ॥ निराहार शक्ति-हीन । दिसे जैसा रंक दीन । काज न होतां धांवोन । बळें दासी धुमसिती[१] ॥३७३॥ ऐशा परी तारारंगक[२] । सेवा करितां अब्द एक । भरी डोंबावरीं गंगोदक । करी भोजन अर्कांतीं[३] ॥ ३७४ ॥ दासी पाहती रांजणीं । बिंदुमात्र न दिसे पाणी । नृप ताडूनियां मूर्ध्नी । कुंभ देउनी धाडिला ॥ ३७५ ॥ निबिड तमाचिया पोटीं । चालतां पंथ न दिसे दृष्टी । कुंभ भरूनी परम कष्टी । आणुनी पाजी स्वामिया ॥ ३७६ ॥ तंव वीरबाहूची अंगना । म्हणे "त्यासी ठेवावें स्मशाना । काज न करितां सदना । योग्य नव्हे आमुच्या" ॥ ३७७ ॥ अयोध्या-पाळ पवित्र नृपति । डोंबें रक्षणा ठेविला प्रेतीं ॥ मसण-खांब ऐसें म्हणती । नाम त्याचें प्रसिद्ध ॥ ३७८ ॥ "माझिया आज्ञेविना सर्वथा । तुवां जाळूं न द्यावें प्रेता" । ऐसें सांगोनि नृपनाथा । नेउनी ठेविलें स्मशानीं ॥३७९॥ गंगा-तीरीं अटोळा[४] । घालुनी बैसविला नृपाळा । पुढें वर्तलें तें भूपाळा । श्रवण करीं कुरुवर्या ॥ ३८० ॥ प्रेत-पाळें प्रेत-रक्षणा । राजा ठेविला स्मशाना । तारामती नृप-नंदना । कोण[५] वोढवलें[५] ॥ ३८१ ॥ काळकौशिक गृहीं सती । पाक-शाळे तारामती । रोहिदास शिष्य-पंक्तीं । सेवा करी सर्वदा ॥ ३८२ ॥ ऐसा क्रमिला किंचित काळ । कौशिकें येउनी

---

१ बडविती, ठोकती. २ तारामतीचा पति (हरिश्चंद्र). ३ सूर्यास्तीं. ४ शेत राखण्याकरितां बसण्याचे उपयोगीं पडावी म्हणून जी उंच जागा तयार करितात ती. ५ काय संकट आलें.

मांडिला छळ । कुसुमवाटिकेमाजी बाळ । बडवियांसंगें[1] पातला ॥ ३८३ ॥ तंव विश्वामित्र म्हणे "तक्षका । दशनें दंशीं नृप-बाळका" । आज्ञा वंदुनी बारिका[2] । टाकुनी आला गुप्तत्वें ॥ ३८४ ॥ सुमन-गर्भीं वसे भोगी[3] । जेवीं कां विजनीं वसे योगी । येथें नृप-नंदन अति वेगीं । आला समीप त्या ठायां ॥ ३८५ ॥ परिमळ-करंडा वाम-हस्तीं । सवेग सुमनें वेंचिती । जाळी वृक्ष वल्ली किती । एक पाहती जळीं स्थळीं ॥ ३८६ ॥ मालती मोगरे शेवंती । कमळ पारिजात केतकी । मंदार कांचन चंपक जाती । तुळशी दवणें बिल्वादि ॥ ३८७ ॥ भूपाळ-बाळें बडवियांसंगीं । सुमनें वेंचितां लक्षिला भोगी । दैवें प्रेरिला असतां वेगीं । त्याचि सुमना पातला ॥३८८ ॥ तक्षक जयामाजी वसत । रोहिदास तेथें ये त्वरित । दंश केला रोंवूनी दांत । उलथोनि पडे माघारा ॥३८९॥ तक्षक-विषाचा अनळ । स्पर्शतां अवरुधे[4] आयुष्य-मूळ । तनु-यंत्रींचा प्राण-गोळ । जातां पात्र रितें पडे ॥ ३९० ॥ ऐशियापरी मागिलेकडे । दशन-स्पर्शें उलथोनि पडे । पंच प्राणांचें बिरडें । मोकळें जालें क्षणार्धें ॥ ३९१ ॥ बडवे पहाती जंव दृष्टी । तंव जाळीये व्याळ[3] धुंधुटी[5] । देखतां भयाभीत पोटीं । पळोनि गेले आश्रमा ॥ ३९२ ॥ मातेसी सांगावया सवडी । न दिसे गुंतली पात्रें वाढी । पाक-शाळे जाउनी तांतडी । वृत्तांत कर्णीं सुचविला ॥३९३॥ परिसोनि पुत्र-निधन-वार्ता । माता हृदयीं शोक-सरिता-। पूर उचंबळोनि गर्ता[6] । पूर्ण होती नेत्रांच्या ॥ ३९४ ॥ गिळोनि पुत्र-शोकार्णव । धैर्यें जाली कुंभोद्भव[7] । म्हणे "कळतांचि भू-देव । अतृप्तीनें उठतील" ॥ ३९५ ॥ आंचळें पुसोनि नेत्र-कमळें । करें कवळोनि पंच-पाळें । अन्नें करूनि ब्राह्मण-कुळें । तृप्त केलीं षड्रसें ॥ ३९६ ॥ भोजनें होतां सर्वांचीं । दीप्ति लोपली दिनकराची । पाउलें वंदुनी ऋषीचीं । सद्गदित अनुवादे ॥ ३९७ ॥ "रोहिदास पूजेचीं कमळें । आणूं गेला प्रारब्ध-काळें । तेथें अवचित काळव्याळें । दंशिला ऐसें ऐकिलें ॥ ३९८ ॥ आतां जाईन कुसुम-वना । शोधूनि पाहेन निज-नंदना" । ऐसें बोलोनि स-जल-नयना । वात-वेगें निघाली ॥ ३९९ ॥ मोह-तमाच्या सागरीं । कवळीत शोकार्णवाच्या लहरी । कुसुम-वाटिके माता-मगरी ।

१ पुजाऱ्यांच्या. २ राहण्याचें ठिकाण. ३ सर्प. ४ बंद पडे. ५ फुत्कार टाकीत होता. ६ खांचा. ७ अगस्त्य.

अंचळ-त्यागें[1] जातसे ॥४००॥ म्हणे "बाळा ! कुल-भूषणा । हृदय-स्थानीं प्रेम-पान्हा । भेटोनियां करीं पाना । अहो नंदना वेगेंसी" ॥ ४०१ ॥ ऐशी विलापें भ्रमतां वनीं । तंव शवा उचलूनि कौशिक-मुनी । पुढें ठेवितां चरणीं । लागुनी पडे अवचित ॥ ४०२ ॥ अवचट लागतां हात । वोळखिलें निज-तनय-प्रेत । भूमी माथां हाणित । पिटोनियां कपाळा ॥ ४०३ ॥ मुखें करितसे शोक । हृदय पिटोनी मारी हाक । दुःखें रडतां कौशिक । प्रगट जाला काननीं ॥ ४०४ ॥ म्हणे "तूं कवण कवणाची येथें । यक्ष राक्षस भूतप्रेतें" । येरी म्हणे "बाळकातें । काळ-सर्पें डंखिलें" ॥ ४०५ ॥ ऋषि म्हणे "आहे कीं प्राण" । माता म्हणे "निमाला नंदन" । येरु बोले "कीजे दहन । मोक्षपंथा मेळवीं ॥४०६॥ उदयो केलीया पद्मिनी-नाथें[2] । धन वोपिल्यावीण येथें । जाळूं नेदिती शवातें । दाहितां दंड पावशी ॥ ४०७ ॥ आतां जाईं स्मशान-भूमी । धर्मार्थ काष्ठें वोपूं आम्ही । शोक करितां निरय-धामीं[3] । पुत्र तुझा जाईल" ॥ ४०८ ॥ येरी म्हणे "निशा दाट । चालतां मातें न दिसे वाट" । ऋषि म्हणे "आम्ही तट । दाऊं तूतें गंगेचें" ॥ ४०९ ॥ ऐशी बोधुनी तारामती । शवासहित धरूनी हातीं । नेली जेथें रक्षण पती । होता तिचा स्मशानीं ॥ ४१० ॥ चिताबिताचीं लांकडें । आणूनी सरणीं[4] घातलें मडें । मुनि-हस्तें उभय तोंडें । लागतां शिखा[5] दाटल्या ॥ ४११ ॥ पुत्र-शोकाचा उमाळा[6] । धडके धडकतां चितानळ । ऋषि म्हणे "प्रेत-पाळा । कळतां देह दंडील" ॥ ४१२ ॥ ऐसें बोलोनी आपण । गुप्त जाला तपोधन । प्रदीप्त देखोनी हुताशन । मसण-खांब धांविन्नला ॥ ४१३ ॥ जळें विझवूनी सरण । शवा वोढिलें धरुनी चरण । मातेपुढें टाकून । ताडण करी तियेसी ॥ ४१४ ॥ आतां कळतां प्रेत-नाथा । मातें दंडील सर्वथा । ऐसें बोलोनी लाथा । ताडोनि गेला तियेसी ॥ ४१५ ॥ तंव अर्ध-दाहित प्रेत पोटीं । कवळोनि माता हृदय पिटी । म्हणे "कटाकटा अदृष्टीं[7] । काय लिहिलें विधात्या ॥ ४१६ ॥ व्याळ-दशनें मृत्यु ज्यासी । मोक्ष म्हणती नाहीं त्यासी । तें आजी घडलें यासी । बालकासी माझिया ॥ ४१७ ॥ सूर्य-वंशीं विजय-केतु । हरिश्चंद्र-नृपाचा सुतु । त्याचा मरण-काळ-पंथु ।

---

१ पदर न सांवरतां. २ सूर्यानें. ३ नरकांत. ४ चितेवर. ५ ज्वाळा. ६ लोट, हुंदका. ७ नशिबीं.

केवढा वडला प्रारब्धें ॥ ४१८ ॥ सर्पें दंशिलें म्हणोनि वन्ही । प्राप्त नव्हे तुजलागुनी । शेखीं अंत्यजाचा पाणी- । स्पर्श[1] जाला तुजलागीं" ॥४१९॥ ऐशीं तियेचीं विलाप-वचनें । मसणखांबा ऐकोनि श्रवणें । येऊनी म्हणे "तूं कवण । शोक करिशी कवणाचा" ॥४२०॥ येरी म्हणे "प्रेत-नाथा । हरिश्चंद्र-नृपाची मी कांता । काळ-सर्पें डंखिलें सुता । रोहिदासा माझिया ॥४२१॥ धर्मार्थ एकें दाविलें स्थळ । काष्ठें आणूनी वोपितां अनळ । तुवां धांवोनि उतावेळ । सुकृत-वांटा साधिला" ॥ ४२२ ॥ ऐकुनी अंगनेच्या वचना । अश्रु आले उभयनयनां । म्हणे "कर्मा निज-नंदना । कष्टविलें कृतघ्नें ॥४२३॥ केवढें कर्माचें बळ । कर्में व्यापिला ब्रह्म-गोळ । भेदुनी मायेचें पडळ[2] । ऐसें दुर्घट करविलें" ॥ ४२४ ॥ येरी म्हणे "स्मशानवासी । मम दुःखें दुःखित होसी । तूं कोण हें मज मानसीं । कळलें पाहिजे दयाळा" ॥ ४२५ ॥ येरु सांगतां पूर्व कथन । दोघां पडिलें आलिंगन । शोक कारितां अश्रु-जीवनें । स्नान शवा घातलें ॥ ४२६ ॥ "मी येंई तंववरी स्मशाना । राहोनि रक्षावें नंदना । आतांचि पुसोनियां वचना । येथें येईन अविलंबें" ॥ ४२७ ॥ ऐसें सांगुनी नर-भूषण । जातांची पातला तपोधन । म्हणे "माये हें प्रेत जाण । धरुनी राहाणें किमर्थ ॥४२८॥ निशीमाजी तूं एकटी । शवासहित स्मशान-वाटीं । श्वापद-पिशाचांचीं घरटीं । मांस भक्षूं येतील ॥ ४२९ ॥ शेखीं तुझिया जिवा नाशु । राहतां वडेल निःशेषु । पैल देवालयीं चंडांशू[3] । उदया ये तों बैसावें" ॥ ४३० ॥ करें दाविलें देवालय । शवा घेउनी गेली माय । विश्वामित्रें नवल काय । येउनी केलें तें ऐका ॥ ४३१ ॥ घोर निद्रा लाविली तीतें । प्रेत फाडूनी काढिलीं आंतें[4] । रक्तें थबथबित हातें । मातृ-वदनीं घातलीं ॥ ४३२ ॥ मांस-रक्ताचा सडा । विखरोनि सांडिला चहुंकडां । चूर्ण[5] कज्जल तोंडा । चर्चुनी केली बीभत्स[6] ॥ ४३३ ॥ आपण जाउनी नगर-मुखा । शंख करुनी मारी हाका । "कपाटें उघडी नर-नायका । लांव[7] पाठी लागली" ॥ ४३४ ॥ क्षुद्र-कपाटें[8] घेतला आंत । वृत्तांत पुसती राज-दूत । येरु म्हणे "माझा मृत्यु । होत होतां वांचलों ॥ ४३५ ॥ या नगरांतूनि राक्षसी । भक्षीत आली बाळकांसी । माझे लागली पाठीशी ।

---

१ हस्तस्पर्श. २ पडदा ( पडळ=पटल ). ३ सूर्य. ४ आंतडीं. ५ चुना. ६ भयंकर, किळस येण्यासारखी. ७ हडळ. ८ दिंडी ( क्षुद्रकपाट ).

पळोन आलों लगबगां ॥ ४३६ ॥ बाळक भक्षीत देउळीं । जातां प्रत्यक्ष देखाल डोळीं "। तंव राज-दूत दीपिका[1]-जाळीं । पाहों आले सत्वर ॥४३७॥ दुरूनि टाकिती पाषाणा । मुखें करिती गड-गर्जना । शस्त्रें परजुनी नाना । भाव दाविती शौर्याचे ॥ ४३८ ॥ तैल-दीपिका धरुनी हातीं । देउळीं रिघोनी धीर सुभटीं । वेणी धरुनी फरफरांटीं । वोढूनि बाहेर आणिती ॥ ४३९ ॥ देउळाभीतरीं मांस-खंडें । पसरलीं दिसती चहुंकडे । गळत रक्तेंशीं आंतडें । मुखामाजी लांवेच्या ॥ ४४० ॥ उभय दंडें कर्षुनी हातीं । दंडें दंडीत नगर-पंथीं । आणिली तंव मार्तंड-दीप्ती[2] । प्रकाशली नभातें ॥४४१॥ मात जाणविली रायासी । "आम्हीं बळें धरिली राक्षसी । आतां इची आज्ञा कायशी । ते आम्हांसी निवेदा" ॥ ४४२ ॥ राजा अविचार-बुद्धि मंद । म्हणे "करूनी दृढ बंध । नगरा भोंवंडूनि शिरच्छेद । करा इचा अविलंबें" ॥ ४४३ ॥ दूतीं मस्तकीं शेंदूर । भरुनी फिरविली नगर । पाहों आले नारी नर । बाळ-तरुण-वृद्धादि ॥ ४४४ ॥ एक म्हणती "हे खे-चरी[3] । आम्ही देखिली कौशिक-घरीं । अन्न-सत्रीं पाक करी । हे ते होय निर्धारें ॥ ४४५ ॥ इचे करींचें अन्न जेविलों । मरत मरत मी वांचलों" । एक म्हणे "मी पडिलों । दुखाणियां षण्मास" ॥४४६॥ एक म्हणे "माझें बाळ । इणेंचि भक्षिलें वेल्हाळ[4]" । एक म्हणे "हे आळोआळ । भक्षित फिरे बाळकां" ॥ ४४७ ॥ असो जनाची चाउटी[5] । फिरवुनी आणिली गंगा-तटीं । वीरबाहू शस्त्रमुष्टी । देउनी धाडी सेवका ॥ ४४८ ॥ स्नान घालूनि गंगा-जळें । उभी केली अधो-मौळें[6] । निज-वल्लभें शस्त्र तेजाळें । काढुनी आंचळें पुशिलें ॥ ४४९ ॥ सत्त्व पहावया गगनीं । गण गंधर्व, निर्जर, मुनी । सर्वांसहित विमानीं । कौतुक पाहों पातले ॥ ४५० ॥ तंव दूत म्हणती "खे-चरी । आतां कुल-देवता-स्मरण करीं । जयाची इच्छा पूर्ण अंतरीं । चिंतन करीं तयाचें" ॥४५१॥ सुकुमार बैसुनी पद्मासनीं । स्वरूप-मुद्रा[7] लाविली ध्यानीं । हृदयीं स्मरोनी चक्रपाणी । काय बोले कुरुवर्या ॥ ४५२ ॥ म्हणे "आतां जन्मची नसावा । प्रारब्ध भोगवी जरी जीवा । तरी मागणें हेंचि देवा । जन्मोजन्मीं इच्छित ॥४५३॥ हरिश्चंद्रासारिखा कांत । रोहिदासासारिखा सुत । कुळ-गुरु अरुंधतीनाथ[8] ।

---

१ मशाल; दिवटी. २ सूर्याचें तेज. ३ आकाशांत फिरणारी राक्षसी. ४ प्रिय. ५ कंटाळवाणी वटवट. ६ खालीं डोकें करून. ७ ऊर्ध्व किंवा अर्धोन्मीलित दृष्टि. ८ अरुंधती-पति ( वसिष्ठ).

जन्मोजन्मीं असावा ॥ ४५४ ॥ प्रतिसृष्टीचा अपर-धाता[1] । तपो-तेजें तीव्र सविता । तोचि जन्मोजन्मीं मागता । याचक असो कौशिक" ॥ ४५४ ॥ ऐसें बोलोनि नृप-भामिनी । हनना वोढवी मूर्ध्नी । शस्त्र पडावें तंव तें क्षणीं । विश्वामित्र धाविन्नला ॥ ४५६ ॥ वल्कलवसनें जटा-धारी । विभूति चर्चूनी शरीरीं । हुताशन नेत्रीं मिरवे करीं- । दंड कमंडलू साजिरा ॥ ४५७ ॥ शुद्ध-सत्त्व-कळा-षोडशीं । पूर्ण देखोनि नृप-शशी । कौशिक-हृदय-पूर्ण-सिंधूसी । प्रेमभरतें दाटलें ॥ ४५८ ॥ प्रतिज्ञा लंघूनी वल्लरी[2] । नयनीं लोटल्या अश्रु-लहरी[3] । उदित हातें वरिच्यावरी । शस्त्र जाऊनी वारिलें ॥४५९॥ कौशिककृपेचा वरद-वात । डोलतां विबुध[4]-पारिजात[5] । सुकृत-सुमनें पराग-भरित । राजमुकुटीं वर्षती ॥ ४६० ॥ हरिश्चंद्र-तारामती । आवडी कौशिक धरूनी हातीं । मातृ-जनकाचिये पंक्तीं । रोहिदास बैसविला ॥४६१॥ त्रिवर्ग बैसवूनी निकटीं । मूर्ध्नी कवळोनी धरिलें पोटीं । शुद्धा करें थापटी पाठी । धरूनी हनुवटी स-प्रेमें ॥ ४६२ ॥ निज तपाच्या मौक्तिकें । तिघां शेस[6] भरी कौतुकें । जय-जय-कारें सृष्टि-जनकें । हर्षें टाळी पीटिली ॥ ४६३ ॥ राजा कुमर कांता तिन्ही । विबुध म्हणती स्वर्ग-भुवनीं । विमानीं वाहुनी नेऊं म्हणतां मुनी । म्हणे "ऐका देव हो ॥४६४॥ स्वर्ग-सुखाचीं अचळ फळें । आंचळीं बांधिलीं तपो-बळें । परी शरीर-दुःखाच्या अनळें । देह जालें जर्जर ॥४६५॥ राज-हानीची काळिमा । लागलीसे मज उत्तमा । ते सारूनी स्वकीय धामा । आरूढवीन ययांतें" ॥ ४६६ ॥ उमा रमा सावित्री सती । लोपामुद्रा अरुंधती । आपुल्या पुण्यें तारामती- । प्रति वोपिती चोळिया ॥४६७॥ विमानीं आरूढोनी सुरवर । गेले करुनी जय-जय-कार । तिघां घेऊनि ऋषीश्वर । निवता जाला अयोध्ये ॥ ४६८ ॥ वीरबाहू येउनी पुढें । नृपा हांकी तोलोनि दंडें । माझा दूत नेतां तोंड । हाणोनि फोडीन सर्वथा ॥ ४६९ ॥ जाणोनि अंत्यजाची अटक । ऋषी विचारी नावेक[7] । म्हणे "हा सवित्याचा बाळक । ऋषि-शापें अंत्यज" ॥ ४७० ॥ पातली शाप-परिहार-वेळा । यालागीं धाविन्नला उतावळा । मुक्त करुनी

---

१ प्रतिब्रह्मदेव. २ वेला ( मर्यादा ). ३ लाटा. ४ देव, विद्वान्. ५ वृक्षविशेष. ६ लग्नादि शुभकार्याचे समयीं दहीं आदि करून द्रवपदार्थ कपाळास लावून त्यावर तांदूळ लावितात ती. ७ अंमळ, क्षणभर.

प्रेतपाळा । बोळवावें स्वधामा ॥ ४७१ ॥ नारद-वचनानें गाधिज मुनी । दिव्य-देही दंड-पाणी । करूनि बैसवी विमानीं । तपाचिया सामर्थ्यें ॥ ४७२ ॥ निमिष न लागतां सत्वर । नृप-कांतासहित कुमर । तिघां घेउनी ऋषीवर । अयोध्यापुरा पातला ॥ ४७३ ॥ प्रजां जाणविली मात । ऐकूनि सकळां आल्हाद बहुत । जेवीं कां मृतालागीं अमृत- । पान घडलें प्रारब्धें ॥ ४७४ ॥ नगर शृंगारिलें मनोहर । वाद्य-नादें गर्जे अंबर । नाना वहनीं नारी नर । वळघोनी येती सामोरे ॥ ४७५ ॥ शरत्काळींच्या निशा-रमणें[1] । शोभा दाविजे उडु-गणें[2] । तेवीं तारा-नाथ[3] पुर-जनें । वेष्टित आला मंदिरा ॥ ४७६ ॥ छपन्न देशींचे राजेश्वर । शाण्णव कुळींचे राज-कुमर । आले आणि ऋषीश्वर । विश्वामित्रें आणिले ॥ ४७७ ॥ वर्षा-काळीं सरिता-ओघ । सागरा येती करित वेग । तेवीं संपदा घेउनी जग । भेटों आलें गुणाब्धी ॥ ४७८ ॥ रथ-कुंजरांचे थाट । पुढें वाद्यांचे बोभाट । उंच स्वरें गर्जती भाट । वर्णिती यश रायाचें ॥ ४७९ ॥ ऐशियापरी राज-नृपती । देखोनि आल्हाद सर्वां चित्तीं । राजा कुमर तारामती । दिव्य-पीठीं स्थापिलीं ॥ ४८० ॥ राज्यीं स्थापुनी तारा-रमणा । कौशिक गेला स्वर्ग-भुवना । ऐसे क्लेश कुरुनंदना[4] । कोणें भोगिले सांग पां ॥ ४८१ ॥

---

१ चंद्र. २ तारा-गण. ३ तारामतीचा पति हरिश्चंद्र. ४ धर्मराजा.

## उद्धवचिद्धन

ध्रुवाख्यान हें दिंडी[1] वृत्तांतील लहानसें काव्य जुन्या नवनीतांत चिंतामणि या कवीच्या नांवावर आढळेल. आरंभींच्या नवनीताच्या आवृत्त्यांमध्यें तें नव्हतें. १८६३ सालीं परशुरामपंत गोडबोले यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'नवनीत, भा. २—कवितासारसंग्रह' या पुस्तकांत चिंतामणीचें म्हणून तें प्रथम मुद्रित झालें आणि पुढें तें मूळ नवनीतांत अन्तर्भूत करण्यांत आलें. वास्तविक हें काव्य चिंतामणीचें नसून उद्धवचिद्धन या कवीचें आहे. उद्धवचिद्धनाच्या नांवाखालीं या काव्याचीं पुष्कळ हस्तलिखितें सांपडतात. १८७१ सालीं पुणें येथें उद्धवचिद्धनाचें म्हणून तें प्रसिद्धही झालें आहे. उद्धवचिद्धनाचीं शुकरंभासंवाद व श्रियाळचरित्र हीं दिंडीबद्ध काव्यें पाहिलीं म्हणजे ध्रुवाख्यानाचें कर्तृत्वही त्याचेंच आहे ह्याबद्दल खात्री पटते. जुन्या संतांचीं कांहीं चरित्रें व सवाई वृत्तांत भगवद्गीता या कवीनें लिहिलेली आहे. हा कवि धारूर (मराठवाडा) येथील असून तो शिवकालीन दिसतो. भक्तविजयांत (अ. ५६) महीपतीनें याचें चरित्र वर्णन केलें आहे.

विशेष माहितीकरितां पाहा :—महाराष्ट्रकवि उद्धवचिद्धनकृत कवितासंग्रह —सं. ना. चिं. केळकर. ध्रुवाख्यानाचा खरा कर्ता उद्धवचिद्धन—अ. का. प्रियोळकर.

### ध्रुवाख्यान.

स्वायंभू मनूचा पुत्र उत्तानपाद राजा ह्यास दोन बायका होत्या. थोरलीचें नांव सुनीति व धाकटीचें नांव सुरुचि. सुरुचि ही राजास फार प्रिय होती. थोरलीचा मुलगा ध्रुव एकदां बापाच्या मांडीवर जाऊन बसला तें धाकटीस सहन न होऊन, तिनें त्यास लाथेनें मांडीवरून खालीं लोटलें. तेव्हां ध्रुवास फार वाईट वाटून तो परमेश्वरास शरण गेला. तेव्हां त्यानें प्रसन्न होऊन ध्रुवास अढळ पद दिलें, अशी कथा या आख्यानांत आहे.

---

१ दिंडी हें जरी स्वभावतः मात्रावृत्त असलें तरी तें ओवी किंवा अभंग यांच्यासारखें अनिर्बंध आहे असें मानून जुने कवि त्याची रचना करीत आले आहेत. म्हणजे सोयी-प्रमाणें ऱ्हस्वाचें दीर्घ व दीर्घाचें ऱ्हस्व करून तें गावयाचें असतें. अलिकडे संपादकांनीं तें मात्रावृत्तांत बसविण्याकरितां त्यांत बदल केले आहेत हें मागच्या नवनीतांतील ध्रुवाख्यान व दमयंती-स्वयंवराख्यान या काव्यांतील कांहीं दिंड्या पाहिल्यास कळून येईल.

## दिंड्या.

सूर्य-वंशीं[१] उत्तानपाद राया । रूपवंती तयास दोन जाया ॥
कनिष्ठेशी अत्यंत प्रीति-माया । पट्टराणीची पडों न दे छाया ॥ १ ॥

वरिष्ठेसी जाहला एक पुत्र । भक्त-राज वैकुंठ-पाळ-मित्र[२] ॥
सु-कुमार आ-कर्ण-पद्म-नेत्र[३] । ठाण-माण[४] रेखिलें जेविं चित्र ॥ २ ॥

पांच वर्षें लोटलीं ध्रुवा आंगीं । पिता ठाऊका नाहिं तयालागीं ॥
पुसे मातेसी भक्त-राज-योगी । 'तात कोठें तो सांग मज वेगीं' ॥ ३ ॥

म्हणे माता, 'तान्हया तोचि तूझा । धराधीश बोलती ज्यास प्रजा' ॥
येरु[५] बोले, 'पाहीन पिता माझा' ।'नको जाऊं मारील राज-भाजा' ॥ ४ ॥

पूर्व-पुण्यें शुभ दिवस ऊगवला । मुलांसंगें तो राज-गृहा गेला ॥
राज-दृष्टी-सन्मूख उभा ठेला । पिता पाहे तों मोह झळंबला ॥ ५ ॥

अनिवार मोहासि पूर आला । ऊचलोनी मांडिये बैसवीला ॥
बाळ-शब्दें खेळवी तनूजाला । न साहे तें राणीस कोप आला ॥ ६ ॥

उचंबळे क्रोधाग्नि-शिखा टाकी । म्हणे, 'कवण बैसला राज-अंकीं ॥
राव कैसा खेळवी कवतूकीं । ध्रुव राजा होईल निश्चयें कीं' ॥ ७ ॥

धरोनीयां सापत्न-भाव चित्तीं । पदें लोटोनी पाडियला क्षीतीं ॥
रडत गेला माउली जेथ होती । न खंडेच तैं नेत्र अश्रुपातीं ॥ ८ ॥

म्हणे माता, 'तान्हया काय झालें । कोणें पापीयें तूज गांजियेलें' ॥
'मज रायें मांडिये बैसवीलें । राज-भाजेनें पदें लोटियेलें' ॥ ९ ॥

बुझावीतां माउली काय बोले । 'स्वामि जैसें मांडीस बसवीलें ॥
अम्हीं देवासी नाहिं पूजियेलें । रमारंगें स्थापितां काय चाले' ॥ १० ॥

---

१ 'सूर्यवंशीं' हा कवीचा प्रमाद असावा असें वाटतें; कारण "उत्तानपाद" हा ज्या स्वायंभू मनूचा मुलगा होता तो सूर्यवंशांतील वैवस्वत मनूहून निराळा असून त्याच्या पूर्वीचा होता. २ वैकुंठाचा पालक जो विष्णु त्याचा मित्र (भक्त). ३ कानांपर्यंत गेले असून कमलासारखे आहेत नेत्र ज्याचे. ४ स्थान आणि मान म्हणजे ज्या स्थानीं ज्या प्रमाणाचे अवयव असावयाचे त्या स्थानीं त्या प्रमाणाचे ते होते. ५ तो ध्रुव.

ध्रुव बोले, 'तो देव कसा आहे । वसे कोठें तो सांग लवलाहे ॥
तया मागों अविनाश एक ठाय । पद मागों नूठवी दुजी माय' ॥ ११ ॥

माय बोले, 'सर्वत्र देव आहे । चराचरही व्यापूनि विश्व राहे ॥
तयालागीं धुंडिती महा-योगी । पूर्व पुण्यें दरूषण[१] तयांलागीं ॥ १२ ॥

तुझी बुद्धी काय बा वय सान । तुज काय होईल दरूषण' ॥
ध्रुव बोले, 'त्यागीन तरी प्राण । हरी देईना जरी दरूषण' ॥ १३ ॥

उभा जैसा तैसाचि निघे वेगें । रडत पाठी लागली माय मागें ॥
'पुत्र गेला' रायासि दूत सांगे । राय झाला घाबरा मोह-संगें[२] ॥ १४ ॥

'सर्व सौख्याचें मूळ बाळ माझें । ध्रुव गेला घेणार राज्य-ओझें ॥
वनीं प्राण त्यागील लोक-लाजे । नेणों काय मारिलें दुष्ट भाजें' ॥ १५ ॥

लवलाहीं लागला ध्रुवा-पाठी । म्हणे, 'बाळा ऐक बा एक गोष्टी ॥
बुझावीतों तुज धरुनि हनूवटी । तूजवीणं दाटला प्राण कंठीं ॥ १६ ॥

नको जाऊं देईन एक गांव' । ध्रुव बोले, 'देईल देव-राव' ॥
'पांच गांव दीधले फीर आतां' । ध्रुव बोले, 'मागेन जगन्नाथा' ॥ १७ ॥

राय बोले, 'देईन एक देश' । ध्रुव बोले, 'देईल जगदीश' ॥
'अर्ध राज्य दीधलें आण तूझी' । ध्रुव बोले, 'देवासि लाज माझी' ॥ १८ ॥

'सर्व राज्य दीधलें फीर मागें' । ध्रुव बोले 'देइजे रमा-रंगें[३]' ॥
'स्नेह कां रे सांडिला ध्रुवा आजी । काळ-तोंडा जाहलों जगामाजी' ॥ १९ ॥

ध्रुव बोले, पितयास 'तात देवा । आतां येतों मी लोभ असों द्यावा' ॥
हरी-भक्तीचा डौल कसा देहीं । अनू-तापें कोंदल्या दिशा दाही ॥ २० ॥

निरंजनीं जावोनि उभा राहे । नाम घोषें तें मुख गर्जताहे ॥
दुरूनीयां अष्टाक्ष-सुता[४] पाहे । तया[५] दृष्टी[५] सायुज्य-पद[६] लाहे ॥ २१ ॥

---

१ दर्शन. २ ममतेच्या योगानें. ३ लक्ष्मीला रंजविणारा विष्णु त्यानें. ४ आठ आहेत अक्ष (डोळे) ज्याला असा जो ब्रह्मदेव त्याच्या सुताला म्हणजे नारदाला. ५ नारदाच्या दर्शनानें. ६ मोक्षाला.

जवळ येऊनी पुसे बाळकासी । 'वय सान तूं कोण वनवासी' ॥
पूर्व वृत्त सांगतां नारदासी । आयकोनी तोषला देव-ऋषी ॥ २२ ॥

'गुरू-मंत्रावांचोनि देव कैंचा' । श्रुती साऱ्या बोलती अशी वाचा ॥
अभय हस्त ठेवोनि शिरीं साचा । मंत्र सांगे तैं द्वादशाक्षरांचा[1] ॥ २३ ॥

ध्रुवा कानीं सांगूनि मुनी गेला । जपतांची हृदयीं प्रकाशला ॥
लोकलीला वैकुंठपाळ आला । तया दृष्टी सन्मूख उभा ठेला ॥ २४ ॥

सर्व तेजाची एक मूस झाली । दिव्य कांतीची दीप्ति प्रकाशली ॥
चतुर्भुज सायुध घननीळी । दिव्य मूर्ती त्या ध्रुवें देखियेली ॥ २५ ॥

नमस्कारें पूजिला हृषीकेशी । म्हणे देव, 'तूं माग इच्छितासी ॥
धराधीश कीं स्वर्ग भोगवासी । करूं इंद्र कीं सांग आपणासी' ॥ २६ ॥

ध्रुव बोले, 'मज भक्ति सदा देईं । पद दीजे नुठवी दुजी आई' ॥
देवयानी वाहोनि ध्रुवा नेला । अढळ सुपदीं नेवोनि बैसवीला ॥ २७ ॥

चंद्रसूर्यादि ग्रहगण तारा । मुनी सर्व घालिती ज्यास फेरा ॥
बालशक्तीची बहुत धन्य झाली । शिरीं सुरवरीं सुमनवृष्टि केली ॥ २८ ॥

ध्रुवाख्यान ऐकती गाति वाचे । ध्रुवलोकीं अक्षयी वास त्यांचे ॥
औदार्यची क्षीराब्धिशयनाचें । उद्धवचिद्घन गुण गाय त्याचे ॥ २९ ॥

---

१ 'ॐ नमो भगवते वासुदेवाय' हा बारा अक्षरी मंत्र.

# रघुनाथपंडित

**ह्या** कवीनें केलेला नलदमयंती-स्वयंवराख्यान हा लहानसा ग्रंथ प्रसिद्ध आहे. संस्कृत भाषेंतील नैषधकाव्याच्या आधारानें तो केलेला आहे. हा ग्रंथ फार सुरस असून ह्यांत यमकादि शब्दालंकार व उपमादि अर्थालंकार चांगले साधलेले आहेत ; आणि वृत्तेंही नाना प्रकारचीं योजिलेलीं आहेत. रघुनाथपंडिताच्या कवितेंत श्लेषरचना बरीच आढळते ; व तेणेकरून स्थलविशेषीं कवितेस दुर्बोधत्व आलें आहे ; तथापि एकंदरींत पाहातां ह्याची कविता हृदयंगम आहे. अलिकडे ‘ रामदासवर्णन ’ व ‘ गजेंद्रमोक्ष ’ अशीं याचीं दोन काव्यें उपलब्ध झालीं आहेत.

‘ ह्या कवीचें वृत्त कांहींच माहीत नाहीं ’ असें जुन्या ‘ नवनीतां ’त नमूद आहे. परंतु अलीकडे याच्यासंबंधीं इतकी माहिती पुढें आली आहे कीं त्यांतील कोणती खरी मानावी, हाच प्रश्न आहे ! ‘ दमयंतीस्वयंवरा ’च्या कारवारकडे सांपडलेल्या एका हस्तलिखित प्रतीच्या शेवटीं, “ चंदावरकर रघुनाथ, ” असा निर्देश आढळला. त्यावरून या काव्याचा कर्ता उत्तर कानडांतील चंदावर गांवचा सारस्वत ब्राह्मण असावा, असा समज रूढ व दृढ झाला ; परंतु तंजावरला जुन्या काळीं ‘ चंदावर ’ असें म्हणत ; तंजावरकडे रघुनाथपंडितासंबंधीं आख्यायिका प्रसिद्ध आहेत ; ‘ रामदासवर्णन ’ व ‘ गजेंद्र-मोक्ष ’ हीं त्याचीं इतर काव्यें राजवाड्यांना याच भागांत सांपडलीं ; आणि दमयंतीस्वयंवराचीं पुष्कळशीं उपलब्ध हस्तलिखितें तंजावराकडील आहेत. यावरून रघुनाथपंडित हा तंजावराकडील देशस्थ ब्राह्मण असावा, असें स्पष्ट दिसतें. तो शिवाजीचा अष्टप्रधानांपैकीं पंडितराव किंवा कोंकणांतील मनोहर उपनामक पंडित अशासारखेही कांहीं शोध पुढें आले आहेत. त्याच्या वैयक्तिक माहितीसंबंधीं जरी असा मतभेद असला तरी, “ या काव्यांत इतकें माधुर्य व इतका रस आहे कीं, तें आरंभापासून शेवटापर्यंत वाचल्यावांचून मनाची तृप्ति होत नाहीं व एकदां वाचलें म्हणजे पुनः पुनः वाचावेसें वाटतें, ” अशा जुन्या नवनीतांत व्यक्त केल्या गेलेल्या विधानासंबंधीं दुमत होईल असें वाटत नाहीं. या काव्याची रचना १७ व्या शतकाच्या अखेरीस झाली असावी.

१८५४ सालीं नवनीतांत प्रसिद्ध होण्यापूर्वीं हें काव्य ‘ ज्ञानचंद्रोदय ’ मासिकांत मुद्रित झालें होतें. १८६३ सालीं ‘ सर्वसंग्रहांत ’ तें प्रसिद्ध

करण्यांत आलें. १९२१ सालीं लेवोनार्ड सेज्विक, I. C. S. यांनीं तें संपादून इंग्लंडमध्यें प्रसिद्ध केलें.

विशेष माहितीकरितां पहा :—रघुनाथपंडितविरचित दमयंतीस्वयंवर—सं० अ. का. प्रियोळकर.

## नल-दमयंती-स्वयंवराख्यान.

शा० वि०. पुण्य-श्लोक-नृपावळींत[१] पहिला होवोनि जो राहिला ।
तो राजा असतां समस्त महिला विश्रांति[२] शेषाहिला[२] ॥
व्यासोक्तें अवगाहिला बुध-जनीं नाना-गुणीं गायिला ।
जो नामें नळ तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला ॥ १ ॥

गीति. इंद्रादिक वर असतां, कशी नल-सतीच होय दमयंती ॥
सुंदर-सकल-वधूंतें कशी न लसतीच होय दम-यंती ॥ २ ॥

दिंडी. कथा बोलूं हे मधुर सुधा-धारा । होय शृंगारा करुण-रसा थारा ॥
निषध-राजा नळ-नामधेय होता । वीर-सेनाचा तनय महा-होता ॥ ३ ॥
चौगुणीही[३] जरि पूर्ण शीत-भानु । नळाऐसा तरि कला-निधी[४] वानूं ॥
प्रतापाचा जो[५] न मालवे भानू । तयासमान कोण दुजा मानूं ॥ ४ ॥

व० ति०. चंद्रासि लागति कळा[६] उप-राग येतो ।
गंगेशि भंग[७] बहु पाण-उतार होतो ।
जें होय चूर्ण तीर मौक्तिक तें कशाला ॥
नाहीं समान नळराज-महायशाला ॥ ५ ॥

---

१ पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोको च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥ २ राजा व प्रजा हीं दुराचरणी असलीं म्हणजे पृथ्वीला भार होतो, व त्यामुळें तिला मस्तकावर धारण करणारा जो शेष त्यालाही भार होतो असें मानिलें आहे. ह्या गोष्टीस लक्षून नलराजा मोठा सदाचरणी होता, व प्रजाही तशीच होती, हें दाखविण्याकरितां 'विश्रांति शेषाहिला' इत्यादि वर्णन केलें आहे. ३ चौपटीनें म्हणजे पौर्णिमेचा पूर्ण चंद्र १६ कळांचा असतो, तो ६४ कळांचा होईल तर. ४ चंद्रकला म्हणजे चंद्रबिंबाचा १६ वा अंश—श्लेषानें लेखनगायनादि ६४ कलांपैकीं प्रत्येक तात्पर्य कीं, चंद्राला कला आहेत पण १६ आहेत; आणि नळराजाला तर ६४ कला आहेत, म्हणून त्यांची बरोबरी नाहीं. ५ नळराजा. ६ क्षयवृद्धि ७ लाटा. "भंग बहु" येणेंकरून पावसाळ्यांत पूर येतो तो सुचविला; आणि "पाणउतार" येणेंकरून उन्हाळ्यांत पाणी आटतें तें सुचविलें. तात्पर्य कीं, गंगेचें पाणी कमजास्त होतें आणि नळाचें यश सर्वदा एकसारखें असतें; तेव्हां चंद्र, गंगा व मौक्तिक हीं शुभ्र आहेत, तरी त्यांची नळयशाला उपमा देतां येत नाहीं. ह्या पद्यांत 'कळा', 'उपराग', 'भंग' व 'पाणउतार' ह्या शब्दांचे जे अनुक्रमें आंगास लागणाऱ्या कळा, निंदा, पीडा किंवा मोड व अप्रतिष्ठा हे व्यावहारिक अर्थ आहेत, त्यांस लक्षून कवीनें हे शब्द योजिलेले आहेत.

शा० वि०. वाजीचें मन जाणता, सकळही राजी शिपाई जया ।
याजी होउनियां द्विजांसि म्हणतो, 'या जी धनें घ्यावया' ॥
त्याजी जो धनदापरी, सुकृत[१] जें त्या जीव[१] ऐसें गणी[१] ।
गाजी तो नळभूप हूप धरुनी गा जी गुणींच्या गणीं ॥ ६ ॥

दिंडी. लोक-बंधू[२] जो होय रवी-ऐसा । कुवलयाचा[३] जो सुखद चंद्र जैसा ॥
सांग[४] नोहे तो कुसुम-चाप तैसा । निषध-रायाशीं तुल्य-रूप कैसा ॥ ७ ॥

गीति. नाडी-ज्ञान जयाचें, स-रोग-बंधू[५] चतुष्पद गणावे ।
सुत तेजी-तुरगींचे[६]; नळ-सम सुंदर कदापि न म्हणावे ॥ ८ ॥

शिख०. कदा नेणों वोढी शरधितुनि काढी शर कदा ।
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ॥
विपक्षाच्या वक्षावरि विवर-लक्षास्तव[७] रणीं ।
कळे राजेंद्राची त्वरित शर-संधान-करणी ॥ ९ ॥

---

१ पुण्य ज्याला प्राणाप्रमाणें आवडे; म्हणजे प्राणरक्षणाविषयीं जसें जपावें तसें सद्धर्म व न्याय ह्यांच्या रक्षणाविषयीं तो जपत असे. २ लोकबंधू = लोकांचें हित करणारा, पक्षीं, प्रकाशानें लोकांच्या कर्मांचें नियमन करणारा. ३ कुवलय म्हणजे चंद्रविकासी कमल. हीं कमलें चंद्रोदयीं विकासतात म्हणून ह्यांस चंद्र हा सुखद म्हणजे सुख देणारा आहे. तसा नळही कुवलयाचा म्हणजे कूच्या (पृथ्वीच्या) वलयाचा म्हणजे सर्व पृथ्वीवरच्या लोकांचा सुख देणारा आहे. ४ अंगारहित. कुसुम-चाप म्हणजे मदन हा अनंग (अंगरहित) आहे. ५ 'सरोगबंधू' ह्याचा अवयवार्थ—सरोग म्हणजे रोगी आहे बंधू म्हणजे भाऊ ज्याचा, असा आहे. येथें ह्या शब्दाचा अर्थ धन्वंतरी (देवांचा वैद्य) असा घ्यावयाचा. त्याला सरोगबंधू म्हणण्याचें कारण असें कीं, धन्वंतरी आणि चंद्र हे दोघेही समुद्रमंथनाच्या वेळीं एकाच क्षीरसागरापासून उत्पन्न झाले. म्हणून चंद्र हा धन्वंतरीचा भाऊ मानिला आहे आणि तो सरोग (क्षयी) आहे, म्हणून धन्वंतरी सरोगबंधू झाला. ६ तेजी (घोडा), तुरगी (घोडी) चे सुत म्हणजे अश्विनीकुमार हे सूर्याचे पुत्र होते. त्वष्ट्याची संज्ञानामक कन्या सूर्यास दिली होती, तिला सूर्याचें तेज सहन होईना म्हणून तिनें घोडीचें रूप धरिलें आणि सूर्यानें घोड्याचें रूप धरिलें. तेव्हां पुढें त्या उभयतांपासून हे उत्पन्न झाले, अशी कथा आहे. हे स्वर्गींचे वैद्य असून रूपानें सुंदर होते. ह्याचा अन्वय जयाचें नाडीज्ञान (इतकें होतें कीं, त्यापुढें) सरोगबंधू (व) तेजी—तुरगीचे सुत (हे) चतुष्पद गणावे; तेजी-तुरगीचे सुत नल-सम सुंदर कदापि न म्हणावे. ७ विवर म्हणजे व्रण व लक्ष म्हणजे पाहणें. शत्रूच्या वक्षःस्थलावर व्रण दृष्टीस पडल्यामुळेंच त्यानें बाण जोडिला व सोडिला, असें लोक अनुमान करीत. (तो बाण जोडी केव्हां व सोडी केव्हां हें कोणाच्या दृष्टीस पडत नसे; इतकी त्यानी चलाखी होती, हा भाव).

व० ति०. धाले धनी पुढिल याचक या नळाचे ।
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे ॥
मागावयास धन मागिल देखियेले ।
त्यांहींच ते सकळ पूरित-काम केले ॥ १० ॥

दिंडी. अशी अगणित गुण-कीर्ति नैषधाची ।
फिरे भुवन-त्रयिं जान्हवीच साची ॥
असें असतां द्विज पांचसात याची ।
भेटि घेती वैदर्भ-राजयाची[१] ॥ ११ ॥

(बहू) आशीर्वादासि तिहीं केलें । भीम-भूपें मग तयां बोलिजेलें ॥
'तुम्ही आलां कोठूनि' अशा बोलें । द्विजीं 'निषधापासाव' म्हणीजेलें ॥ १२ ॥
भीम भूपाळ गिरा वदे ऐसी । निषध-देशीं नळ-राज-रीति कैसी ॥
असें ऐकोनी वदति विप्र यासी । विप्रयासीं[२] वक्तृत्व ये जयांसी ॥ १३ ॥

व० ति०. "हे वामनैक-पद[३] भूमि, नसोनि जंघी ।
एके दिशींच दिन-राज[४] नभास लंघी ॥
वारीशि[५] वानर-विलंघित होय तो कीं ।
लोकीं नसे नल-यशस्तुलना विलोकीं[६] ॥ १४ ॥

शा० वि०. जो पाहे सदसद्विचार हृदयीं, जोपा जनाची करी ।
जो[७] पावे समयीं, विशेष गणिला जो पावनांभीतरीं[८] ॥
सोपा जो सकळां द्विजां, सु-मतिचा[९] सोपा, सदा लाभतो[१०] ।
कोपातें न धरीच तो नळ मही-गोपायिता शोभतो ॥ १५ ॥

---

१ भीमराजाची. २ (१) विशेष प्रयासानें, किंवा (२) विनाप्रयास. येथें, सर्वगुणसंपन्न नळराजाचें वर्णन करतांना विप्रांच्या वक्तृत्वाला अनायासें भरतें आलें, हा दुसरा अर्थ सरस वाटतो. ३ वामनैक-पद=वामन म्हणजे लहान मुलगा ह्याच्या एका पावलाइतकी, तेव्हां ती नळाच्या विस्तीर्ण यशाला उपमा देण्याला योग्य नाहीं. वामनावतारीं विष्णूनें बलिराजापाशीं त्रिपाद भूमि मागितली, पण त्याच्या एका पावलांत सर्व पृथ्वी आटली, अशी कथा आहे, तिकडे ह्या वर्णनाचें धोरण आहे. (पृष्ठ १५० श्लोक २६ पहा). ४ दिनराज म्हणजे सूर्य हा जंघी म्हणजे वेगाने चालणारा नसूनही (म्हणजे लोकदृष्टीला तो संथ चालतोसा दिसतो) एका दिवसांत आकाश ओलांडितो, तेव्हां नळराजाच्या यशाला अशा लहानशा आकाशाची उपमा देतां येत नाहीं. ५ वारीशि म्हणजे समुद्र, हा तर वानरांनीं (मर्कटांनीं) ओलांडला आहे; तेव्हां नळाच्या यशास समुद्राचीही उपमा देववत नाहीं. ६ 'पाहण्यांत' अथवा 'समज' असे दोनही अर्थ येथें शोभतात. ७ जो समयीं पावे म्हणजे प्रसंगीं कार्य करी म्हणजे उपयोगीं पडे. ८ पवित्र करणारांमध्यें; ह्याच्या नामाच्या स्मरणानें स्मरणकर्ता पवित्र होतो अशाविषयीं पुराण प्रमाण आहे. ९ सद्-बुद्धीचा सोपा म्हणजे घर. १० ज्यापासून नेहमीं लाभ होतो.

शा० वि०. जो धैर्ये[1] धरसा, सहस्र-कर-सा तेजें, तमा[2] दूर-सा।
जो रत्नाकर-सा[3] गभीर, शिर-सा[4] भूपां, यशोहार-सा[5] ॥
ज्ञाता जो सरसावला[6] नव-रसांमाझारि[7] शृंगार-सा।
शोभे तामरसाक्ष तो नळ रसा-नाथ स्तवूं फार-सा" ॥ १६ ॥

दिंडी. अशी होतां नळ-चरित-कथा कांहीं। भीम-नामा भूपाळ परिसतां ही।
जवळि[8] होती लडिवाळ जे सदाही[8]। सुता दमयंती नाम जीस पाहीं ॥१७॥

मालिनी. निषध-पति-कथा हे जे सुधेतें जयंती।
परिसुनि दमयंती रंजली रंजयंती ॥
नवल मज न भासे चंद्र-वंशैक-शाली[9]।
नल तरि वनमाळी[10] भीमकी[11] हेचि झाली ॥ १८ ॥

मा० भा०. नळ-राज-कथा सुधाचि[12] साजे। दमयंती वर-वर्णिनी[13] विराजे ॥
मिळणी[14] उभयांशि होय जेथें[15]। अधिकारी[16] अधिकानुराग[17] तेथें॥ १९॥

---

१ पर्वतासारखा—पर्वताला अचळ असें नांव आहे म्हणजे कांहीं झालें तरी तो हालत नाहीं, त्याप्रमाणें हा कसाही प्रसंग आला तरी डगत नव्हता, म्हणून धैर्यानें तसा. २ तमा दूरसा—अज्ञानापासून दूर म्हणजे अज्ञानरहित. ३ समुद्राप्रमाणें—समुद्र फार खोल असतो त्याप्रमाणें—हा मनानें खोल; अर्थात् गंभीर. ४ राजांमध्यें श्रेष्ठ. ५ यशच आहे हार ज्याचा असा—म्हणजे सत्कीर्ति हेंच ज्याचें भूषण होतें; त्याच्या शरिराला शोभा आणण्याला इतर भूषणांची गरज नव्हती. ६ पुढें आला—पहिली पदवी पावला; नऊ रसांत शृंगार जसा पहिला तसा सर्व ज्ञानीजनांत हा पहिला. ७ नवरस—शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत आणि शांत. ८ ब्राह्मण नलाचें वर्णन करीत असतां तें वर्णन संपे तोंपर्यंत एकसारखी. ९ चंद्रवंशांत एकटाच शोभणारा. १० कृष्ण. ११ कृष्णाकडे भीमकी म्हणजे रुक्मिणी आणि नळाकडे भीमकी म्हणजें भीमकन्या दमयंती. १२ अमृत. १३ उत्कृष्ट स्त्री. १४ एकत्र होणें. १५ दमयंतीमध्यें. १६ हक्कदार. १७ अधिक प्रीति. ह्या श्लोकाचें तात्पर्य—अमृत हा उत्तम पदार्थ पडला आणि दमयंती ही उत्तम पदार्थाचें वर्णन करणारी म्हणजे गुण घेणारी पडली; म्हणून या दोघांचा मिलाफ झाल्यावर अधिक अनुराग म्हणजे प्रीतिच हक्कदार म्हणजे हक्काची आहे म्हणजे खचीत होणारी आहे. गुणी आणि गुणज्ञ ह्यांची गांठ पडल्यावर गुणवानाविषयीं गुणज्ञाचे चित्तांत प्रीति उत्पन्न होते, तद्वत्. येथें श्लेषानेंही एक दृष्टांत सुचविला आहे, तो असा—सुधा म्हणजे चुना आणि वरवर्णिनी म्हणजे हळद हीं एकत्र मिळाली असतां अधिकच अनुराग म्हणजे रक्तिमा येतो, तद्वत्. एकंदर तात्पर्य कीं दमयंती ही नळाची कथा ऐकून रिझली म्हणून वरच्या श्लोकांत जें सांगितलें तें योग्यच आहे. कारण तें तसेंच व्हावयाचें.

दिंडी. कथा तेथील होय असो ऐशी । आले जासूद वदति नैषधासी ॥
"तुझ्या कथनीं विदर्भ-राजयासी । प्रीति होती तनयाहि तयापासी ॥२०॥

शा० वि०. बापाच्या उजवे कडेसि बसली म्यां पाहिली नोवरी ।
व्यापारांतर टाकुनी तव कथालापासि जे आदरी ॥
तापातें हरिते करोनि मधुरालापासि जे सुंदरी ।
ज्या पावे जगदीश, सांग-सुमनश्चापा[1] नृपा त्या वरी ॥२१॥

व० ति०. जें अंतरंग पिवळें सरसीरुहाचें । भासे मनांत मज अंग तसें तियेचें ॥
गोरोचनापरिस गौर असें गणावें । सोनेंच बावनकसी न कसें म्हणावें" ॥२२॥

दिंडी. असें बोलतां चार समाचारा । करी दमयंती नल-मनीं विहारा ॥
'नोवरी ते मज होय कशी दारा' । करूं लागला भूप या विचारा ॥ २३ ॥
विभूतीनें झांकला अनळ-सा तो । गुप्त दमयंती-विरह नृपा होतो ॥
नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो । सागरानें तो काय सांगिजेतो ॥ २४ ॥

आर्या. रजनी दिवस गमेना नृपतिस संगीतही सुख[2] गमेना ॥
मन कोठेंहि रमेना म्हणोनि करि वन-विहार सहसेना ॥ २५ ॥

व० ति०. गंगा-तरंग-सम जो निज-देह-वर्णी ।
भृंगापरी रुचिर कांति जयाशि कर्णी ॥
जंघाल जो पवन-संगतिची[3] सवे[3] घे ।
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ २६ ॥

जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे ।
तो चंद्रमा निज-तनूवरि डाग लाहे ॥
जो या यशास्तव कसें धवलत्व नेघे ।
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ २७ ॥

दिंडी. सवें सेना भूपाळ निघालाहे । शींव लंघी उद्यान एक पाहे ॥
रिघे तेथें मित सेवेकांसि बाहे । फौज सारी बाहेर उभी राहे ॥ २८ ॥
पनस जंबू जंबीर त्रिविध निंबें । कुंद चंदन माकंद सु-दाडिंबें ॥
तुंग नारिंगें विकसलीं कदंबें । वसति तेथें शुक-सारिका कदंबें ॥ २९ ॥

---

१ अंग धारण करणारा मदन. हें "नृपा" ह्याचें विशेषण. २ सुख देणारें. ३ वायूच्या अत्यंत वेगाची संवय घेई. "सवें" असा पाठ घेतल्यास तो आपणाबरोबर वारा मात्र सोबत घेई, असा अर्थ. तात्पर्य कीं वायुप्रमाणें जलद चालणारा.

## नृसिंहावतार

हिरण्यकशिपूचा मुलगा प्रऱ्हाद हा बाळपणापासून भगवद्भक्त होता. ज्यानें आपला सख्खा भाऊ हिरण्याक्ष ह्यास मारिलें त्या नारायणाचें भजन करूं नको असें बापानें त्यास पुष्कळ वेळां सांगितलें; तरी तो तें सोडीना, म्हणून त्यास नानाप्रकारचे जाचही केले; परंतु तें सर्व फुकट गेलें. शेवटीं ज्या देवाचें तूं नामस्मरण करतोस तो आहे तरी कोठें, असें प्रऱ्हादास विचारतां त्यानें सर्व ठिकाणीं देव आहे असें सांगितलें. यावर आपल्या सभेंतील एका स्तंभाकडे बोट दाखवून यांतही तुझा देव आहे काय, असा बापानें त्यास प्रश्न केला. प्रऱ्हादानें होय म्हणून म्हणतांच हिरण्यकशिपूनें हातांत तरवार घेऊन त्या खांबावर मारिली; तत्क्षणींच जिचें तोंड सिंहाचें व बाकीचें शरीर मनुष्याचें अशी नृसिंहमूर्ति प्रगट होऊन तिनें त्याचा वध केला; ही कथा या आख्यानांत आहे.

मालिनी.

हरि नरहरि-रूपें क्रूर दैत्यां समस्तां[१] ।
परम सु-लभ शांत श्री-कर स्वात्म-भक्तां ॥
स्व-चरण-शरणातें सौम्यही शीघ्र तो कीं ।
जननि-भय मनीं कां मानिजे व्याघ्र-तोकीं[२] ॥ १ ॥

जय-विजय असे ते जावळे दो दितीचे[३] ।
असुर इतर जाले पुत्र-पौत्रादि तीचे ॥
प्रथमचि उपजे तो धाकुटा बंधु होतो ।
धरणि-धर-वराहें मारिला दैत्य हो तो ॥ २ ॥

भु० प्र०. बुडे क्ष्मा[४] तयीं उद्धरी जो क्षमेला[४] । तया क्रोड-रूपें[५] हिरण्याक्ष मेला ॥
तया दूसरा ज्येष्ठ त्या अग्रजाला । मनीं क्रोध अत्युग्र उत्पन्न जाला ॥ ३ ॥

---

१ पाठभेद—विभक्ता. २ वाघाच्या मुलांनीं. ३ (जसे) दितीचे इतर पुत्रपौत्रादि असुर जाले; असे जयविजय (ही) तीचे दो (दोन) जावळे (असुर जाले). एकदा ब्रह्मदेवाचे पुत्र सनकादिक वैकुंठास गेले असतां विष्णूचे द्वारपाळ जयविजय ह्यांनीं त्यांस आंत जाण्यास अटकाव केला. त्यामुळें त्यांस कोप येऊन त्यांनीं तुमचें देवत्व जाऊन तुम्हांस असुरयोनि प्राप्त होऊन तुमच्या हातून अतिनिंद्य कर्में घडतील, असा जयविजयांस शाप दिला; पण पुन्हा त्यांस दया येऊन ते म्हणाले कीं, तुम्ही तीन वेळ असुरयोनि पावून नंतर पुन: पूर्वपदाप्रत याल. त्याप्रमाणें जयविजय हे अनुक्रमानें हिरण्यकशिपु व हिरण्याक्ष; रावण व कुंभकर्ण; आणि शिशुपाळ व दंतवक्र असे तीन जन्म राक्षस झाले, अशी कथा आहे. (भागवत स्कं० ७, अ० १). ४ पृथ्वी. ५ वराहरूपानें.

व० ति.
टाकी उपानह पदें अति-मंद ठेवी ।
केली विजार वरि डौरहि मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं ।
भूपें हळूच धरिला[1] कल-हंस पायीं[1] ॥ ३८ ॥

मालिनी.
कलकल कल-हंसें फार केला सुटाया ।
फडफड निज-पक्षीं दाविलें कीं उडाया ॥
नृपतिस मणि-बंधीं टोंचिता होय चंचू ।
धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू ॥ ३९ ॥

तदितर खग भेणें वेगळाले पळाले ।
उपवन-जल-केली जे कराया मिळाले ॥
स्व-जन गवसला जो त्याजपाशीं[2] नसे तो ।
कठिण समय येतां कोण कामास येतो ॥ ४० ॥

दिंडी. न सोडी हा नळ भूमि-पाळ मातें । असें जाणोनी हंस वदे त्यातें ॥
"हंस-हिंसा नच घडो तुझ्या हातें । स्व-स्थळातें पावेन पक्ष-पातें[3] ॥ ४१ ॥
पदोपदीं आहेत वीर कोटी । भले झुंझार शक्ति जयां मोठी ॥
तयां माराया धैर्य धरीं पोटीं । पांखरूं हें मारणें बुद्धि खोटी ॥ ४२ ॥
वधुनि माझी हे कनक-रूप काया । कटक-मुकुटादी भूषणें कराया ॥
कशी आशा उपजली तूज राया । बहुत औदार्य थोर दया माया ! ॥ ४३ ॥

शा० वि. म्हातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया अशी ।
कांता काय वदों नव-प्रसव[4] ते सातां दिसांची तशी ॥
पाता त्या उभयांस मी, मज विधी घातास योजीतसे ।
हातामाजि नृपा तुझ्या गवसलों आतां करावें कसें ॥ ४४ ॥

---

१ कलहंसाचा पाय धरून त्याला पकडिलें. कोणाला धरावयाचें असतां त्याचा जो अवयव धरावयाचा तद्वाचक शब्दाची सप्तमी योजण्याचा संप्रदाय संस्कृतांतही आहे. जसें वाल्मीकिरामायण—

स तं रुचिरमाक्रम्य देशमाश्रमकर्मणि ।
हस्ते गृहीत्वा हस्तेन रामः सौमित्रिमब्रवीत् ॥

२ अन्वय—जो गवसला त्याजपाशीं तो स्वजन नसे. ३ उडून. ४ नुक्ती बाळंतीण झालेली.

पद. हर हर सांपडलों, सांपडलों । कैसा फांशीं पडलों ॥ ध्रु० ॥
इतर नदी जळ-टांकीं । टाकुनि आलों याच तटाकीं ॥ १ ॥
सोडुनि मानस-केली[1] । कापुनि घ्याया आलों शेली ॥ २ ॥
ठेविन तव पदिं माथा । आतां सोडविं मज रघुनाथा ॥ ३ ॥४५॥

दिंडी. सखे माझे परतोनि घरा येतां । तुवां सजणे हा समाचार घेतां ॥
तया शोकें घायाळ हृदय होतां । कशी होशिल तें आठवितों आतां ॥४६॥

थोर होतिल बाळकें तुझीं बाळे[2] । तुला कामा येतील वेल्हाळे ॥
माय माझी बैसेल शोक-शाळे । मला आठवितां हृदय तिचें पोळे ॥४७॥

मालिनी. स-दय हृदय याचें भूप हा ताप-हारी ।
म्हणुनि परिसतों मी होय येथें विहारी ॥
मजहि वध कराया पातकी पातला जो ।
करुनि पति तसा ही भूमि कैसी न लाजो " ॥ ४८ ॥

व० ति०. येणेंपरी परिसतां अति दीन वाचा ।
हेलावला नळ पयोधि दया-रसाचा ॥
सोडी, म्हणे, " विहर जा अथवा फिराया ।
राहें यथा-निज-मनोरथ हंस-राया " ॥ ४९ ॥

मालिनी. सुटुनि खग पळाला बैसला शाल-शाखे ।
क्षणभरि निज-देहीं मुक्ति-विश्रांति चाखे ॥
स्व-जन तंव तयाचे भोंवताले मिळाले ।
कवळिति निज-बंधू बाष्प-बिंदू गळाले ॥ ५० ॥

शिखरिणी. विसावा घे कांहीं उडुनि लवलाहीं परतला ।
नृपाळाचे स्कंधीं बसुनि मणि-बंधीं उतरला ॥
म्हणे हंस क्षोणी-पतिस, " तुज कोणी सम नसे ।
दयेचाही ठेवा तुजजवळि देवा बहु वसे ॥ ५१ ॥

दिंडी. ऐक राया तूं थोर दया-सिंधू । नीति-सागरही तूंचि दीन-बंधू ॥
निखंदूनी बोलिलों नको निंदूं । सकल[3] वदसी जरि पाय तुझे वंदूं ॥५२॥

पारधीमाजी खगा मृगा राजे । करिति हिंसा जी तीचि बरी साजे ॥
तुवां दिधली मज मोकळीक गा जे । दया केली ही कीर्ति तुझी गाजे ॥५३॥

---

१ मानससरोवरांतील क्रीडा. २ हे प्रिये. ३ अन्वय—वदसी जरि (आम्ही) सकल तुझे **पाय** वंदूं. म्हणजे तूं सांगशील तर, आम्ही सारे तुझ्या पायां पडून क्षमा मागूं.

दिंडी. हंस मिळणें हें कठिण मही-लोकीं । सोनियाचा तो नवल हें विलोकीं ॥
तशा मजलाही सोडिलें तुवां कीं । तुझा ऐसा उपकार मी न झांकीं ॥५४॥
तुझा कर-पंजर होय मला थारा । तुझा वचनौघ तोचि दुग्ध-धारा ॥
तुझें मानस[1] बहु थोर गा उदारा । सत्य-लोकेश[1] तूंचि गुणागारा ॥५५॥
किती रावे असतील तुझे धामीं । किती कोकीळा सारिका तसा मी ॥
चित्त लागलें हें तूझिया लगामीं । नृपा स्वामी मज योजिं तुझ्या कामीं॥५६॥

व० ति. हें पांखरूं मजसि येइल काय कामा ।
ऐसें नृपा न वद पूरित-लोक-कामा ॥
मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारी ।
छाया करी तपन-दीप्तिसही निवारी ॥ ५७ ॥

मालिनी. वर-नृपति[2] विराजे भीम हें नाम ज्याला ।
वर[3] दमन-ऋषीनें दीधला कीं तयाला ॥
वर-सुत[4] दम-नामा, दांतनाम द्वितीया ।
वर-तनु[5] दमयंती नंदिनी ते तृतीया ॥ ५८ ॥

व० ति. तेजो-निधीस तनया यमुना जसी ते ।
सीतेपरी सु-जनका[6] जनका[7] तसी ते ॥
ते आवडे सुतहि ते न तसे तयाला ।
ते नोवरी करवितों तुज मी दयाला ॥ ५९ ॥
राया तिचें मुख सुधाकर या द्वयाला ।
नाहींच वेगळिक हें गमतें[8] मनाला ॥
संपूर्ण नित्य असता नसता कलंकी ।
हा चंद्र हें मुख असें मग कोण शंकी ॥ ६० ॥
चांपेकळीपरिसही सरलत्व नाकीं ।
जीचा धरी अधर विद्रुम-भावना[9] कीं ॥
भासे मनांत मज बिंब-फळ-भ्रमानें[10] ।
कीं सत्य चंचु-पुट वोढविलें शुकानें[11] ॥ ६१ ॥

---

१ येथें मानससरोवर व ब्रह्मदेव हे अर्थ श्लेषानें सुचविले आहेत. २ श्रेष्ठ. ३ प्रसाद, देणगी. ४ ज्येष्ठ म्हणजे पहिला मुलगा. ५ उत्तम शरिराची. ६ जनक राजाला. ७ बापाला. ८ वाटलें असतें. ९ पोंवळ्याशीं सारखेपणा. १० अधरोष्ठ पोंवळ्यासारखा लाल असल्यामुळें त्यावर तोंडल्याची भ्रांति होऊन. ११ राघूनें अधरोष्ठास तोंडलें समजून तें खाण्यासाठीं आपली चोंचच जणूं काय पुढें केली. येथें दमयंतीच्या नासिकेवर राघूच्या चोंचीची उत्प्रेक्षा केली आहे, म्हणजे तिचें नाक राघूच्या चोंचीसारखें लांब होतें हें तात्पर्य.

पद. रूपवती ते भूप-सुता अपरूप नसे दुसरी वनिता ।
रूप धरूनि वरीं तिजला अनुरूप पयोधि जशी सरिता ॥ ध्रु० ॥
वीज अ-चंचळ शीतळ जे तजवीज कशी तुज हे नुमजे ।
नीज जशी तुझिया नयना सुख-बीज[1] सपल्लव[2] भाव लता ॥ १ ॥

सुंदरता तव तीजविणें अति मंद[3] गमे तरि काय जिणें ॥
कुंद-रदा तर मंदर-धीरा सुंदरिला हो वश करिता ॥ २ ॥

नूतन-नीरज-नूत-मुखी[4] पुरुहूत-वधूसि सखी निरखी ॥
दूत तुझा परि मीच सुखी करवीन म्हणे रघुनाथमता[5] ॥ ३ ॥ ६२ ॥

व० ति०. धाता करींच करिता मृदु हे न होती ।
या कारणास्तव मनोमय मूस ओती ॥
तेथें भरोनि पहिला[6] रस[6] पूर्ण केली ।
ओतीव हे न घटिताकृति[7] बोलिजेली" ॥ ६३ ॥

ऐसीं खगेंद्र वचनें वदतां तयाला ।
विश्रांतिही विरह-खेदहि फार झाला ॥
'आधार हा मज' म्हणोनि[8] गणोनि डोले ।
झाला सर्वेचि विरहीं नळ-राज बोले ॥ ६४ ॥

"वेल्हाळ ते न दिसतां विरहांधकारीं ।
चाचून मी हळुच चांचपतां पुढारीं ॥
चक्रापरीच[9] सजलों असतां फिराया ।
हंसा[10] तुझा उदय होय सुखी कराया ॥ ६५ ॥

---

१ सुखबीज म्हणजे सुखाचें मूळ आहे. २ जशी निज सुखबीज ( किंवा ), सपल्लव लता ( सुखबीज ) ( तशी ) ( ही ) तुझीया नयना भाव. म्हणजे निद्रेनें जसें सुख होतें, किंवा पल्लवांनीं भरलेली वेल पाहून जसें सुख होतें तशी ही तुला सुख देईल असें समज. ३ फार विशोभित. ४ " नुत " याबद्दल छंदाकरितां " नूत " असें घातलें आहे. नवीन कमलानें जिचें मुख नुत म्हणजे स्तुत आहे म्हणजे नवीन कमलापेक्षांही जिचें मुख चांगलें. ५ रघुनाथपंडितास मान्य असा जो नळ त्याला. ६ शृंगार. ७ हे न घटिताकृति (घडलेल्या आकाराची ) ( तर ) ओतीव बोलिजेली. ८ असें मानून. ९ चक्रवाकपक्ष्याप्रमाणें. रात्रीं चक्रवाक नर आणि त्याची मादी यांचा वियोग होत असतो आणि तो तिला अंधारांत धुंडीत फिरत असतो, अशी कविप्रसिद्धि आहे. १० श्लेषानें सूर्य असा अर्थ घ्यावयाचा. सूर्योदय झाला म्हणजे चक्रवाकपक्ष्यांच्या जोड्याचा संयोग होत असतो.

व० ति०.
ध्यानीं धरूनि तिजला मन हें निरीक्षी ।
दृष्टीपुढें दिसतसे मज ते मृगाक्षी ॥
आहे जणों जवळि हे गजराज-गामी ।
ऐसाच भाव तंव बोलतसें तिला मी ॥ ६६ ॥

भृंगें विराजित नवीं अरविंद-पत्रें ।
पाहूनि मानुनि तिचींच विशाल नेत्रें ॥
घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं ।
आहा वृथा उतरलों भिजलों विलोकीं ॥ ६७ ॥

हंसा विलोकुनि सुधाकर अष्टमीचा ।
म्यां मानिला निटिल-देश तिचाच साचा ॥
शंख-द्वयीं[1] धरुनि कुंकुम कीर-वाणी[2] ।
लावावया तिलक लांबविला स्व-पाणी ॥ ६८ ॥

दिंडी. भला माझा तूं गडी हंसराया । विरहदुस्तर-विस्तार निस्तराया ॥
चित्त नेधे मज तूज जा म्हणाया । तेंचि[3] वाहन तारि तूं करीं फिराया" ॥ ६९ ॥
असें बोलोनी नळें रंजवीला । अंजुळीमाजी हंस बैसवीला ॥
गमे चंपक-कुसुमौघ-हार झेला । पाठवाया युवतीस सिद्ध केला ॥ ७० ॥
"त्वरित पुनरागम असो तुझा येथें । झेंप घालीं सुख-रूप गगन-पंथें ॥
नको विसरूं आम्हांसि असों येथें" । वदुनि धरिजे गाहिंवरा मही-नाथें ॥ ७१ ॥
'बरें येतों,' म्हणऊनि हंस बोले । उडुनि जातां बहु शकुन तया झाले ॥
पवन-चंचळ मधु-बिंदु मुखीं आले । वाम-भागीं उभयतां गरुड गेले ॥ ७२ ॥
उडत होते खग-वायसादि जाणा । तयां भासला हंस तो ससाणा ॥
नभा मानूनी निकष-पाऽषाणा । स्वर्ण-रेखा तें तेज मनीं आणा ॥ ७३ ॥
असा तो हंस नभामाजि धांवे । तया विदर्भदेशिं झेंऽपावे ॥
तेथ कुंडिन-नगरासमीप पावे । राज-प्रासादीं गो-पुरीं विसावे ॥ ७४ ॥

मालिनी.
खग मग नगरीचे गो-पुरीं झेंप घाली ।
मृदु-पवन-गवाक्षीं बैसतां झोंप आली ॥
तदुपरि जव-शाली[4] वेंघला चंद्र-शाला ।
निरखि वितत-शाला[5] राजधानी विशाला ॥ ७५ ॥

---

१ कानशिलाच्या दोन हाडांमध्यें. २ खरोखर. ३ चित्त. ४ वेगवान्.
५ विस्तीर्ण आहेत वाडे जीमध्यें अशी.

चूर्णिका. सकल-भुवन-ललामायमाना ।
मानाधिक-विभव-धनिक-सदन-शत-विराजमाना[1] ।
कलश-जनित-मुनि-चकित-जलधि-शरणाति—[2] ।
विस्तृत-परिखांतरीपायमाना[3] ।
चंद्रशाला-विजित-सुर-विमाना[4] ।
जिचे सौध गगन-मंडपाधार-स्तंभाचि माना ।
लाविति ते जलदा निज माना ।
वासव-चाप जयांस कमाना ।
ऐसी कुंडिन-नामधेय-नगरी राजहंसें पाहिली ॥ ७६ ॥

व० ति०. कोणी वणिग् जन विकी तुळितां तराजे ।
कस्तूरिका तिजसवें अलिनी विराजे ॥
दोन्ही समान निरखी विकणार देतो ।
घेणार तो न समजोनि उगाच घेतो ॥ ७७ ॥
तेणें तसें नगर तें धरितां निडारीं ।
तेथें विलास-वन एक दिसे पुढारीं ॥
जेथें सु-शीतळ मही-तळ सांद्र साई ।
जाई जुई फुल-मयी बहु आंबराई ॥७८॥

पद. तया वनीं खेळे भूप-सुता ॥ ध्रु० ॥
खेळविता बहु मेळविला सखि-मेळ तया सहिता ॥ १ ॥
राजस ते द्विजराज-मुखी गजराज-गती ललिता ॥ २ ॥
ध्यात असे नळराज-कथा रघुनाथ-कवींद्र-नुता ॥ ३ ॥७९॥

व० ति०. तो मंडळाकृति फिरे उतरावयाला ।
भैमी-मुखेंदु-परिवेष म्हणों तयाला ॥
तेथें महीवरि असा खग बैसताहे ।
ते सुंदरी निज कुतूहल जेविं पाहे ॥ ८० ॥

---

१ मानाधिक म्हणजे गणती होत नाहीं असें. २ अगस्तिऋषि. अगस्तिऋषीनें समुद्र-जल प्राशन केलें अशी कथा आहे; तेव्हां त्याला भ्यालेला जो समुद्र त्याचें रक्षण करणाऱ्या अशा अतिविस्तृत ज्या परिखा म्हणजे खंदक त्यांच्यामध्यें अंतरीपायमान म्हणजे बेटाप्रमाणें असणारी. तात्पर्य कीं, कुंडिन-नगरीस सभोंवतीं खंदक असून ते इतके मोठे होते कीं, त्यांत समुद्रसुद्धां सामावला असता. ३ अंतरीप=बेट. ४ देवांचीं विमानें फार सुंदर असून तीं पृथ्वीपासून फार उंचावर चालतात, त्यापेक्षांही कुंडिन-नगरींतल्या चंद्रशाला म्हणजे वरच्या माड्या सुंदर आणि उंच होत्या ; असें तात्पर्य.

व० ति०.

जो बैसतां चपळ पक्ष-पुटीं धरेला[१] ।
हाणितसे फडफडा ध्वनि हो उदेला ॥
पाहे तया खग-वरासि वरानना हे ।
मानी मनीं नवलही मग बोलताहे ॥ ८१ ॥

शिखरिणी.

"असा पक्षी लक्षी बहु-विहग-लक्षीं न मिळता ।
सु-वर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता ॥
अगाई, हा बाई त्वरित वरि जाईल पळुनी ।
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी" ॥ ८२ ॥

व० ति०.

ऐसें वदे मग तयास धरावया हे ।
ते होय हंस-गमना पहिलीच[२] आहे ॥
वाजेच ना वलय नूपुर-नाद नोहे ।
तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे ॥ ८३ ॥

हे मंद-मंद-पद सुंदर कुंद-दंती ।
चाले जसा मद-धुरंधर इंद्र-दंती ॥
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते ।
निष्कंप-कंकण-करासि[३] पुढें करीते ॥ ८४ ॥

द्रु० वि०. गवसलाच तसा खग भासला । तरि तदीय सखी-जन हांसला ॥
मग सर्वेच बुझावुनि हांकिला । उडविलाचि पिटाळुनि टाकिला ॥ ८५ ॥

व० ति०.

कांहीं उडोनि गगनीं मग नीट येतो ।
नाहींच दूर न समीप बसे तसा तो ॥
पाहे सुधाकर-मुखी कलहंस-राया ।
लाहे मनोरथ तयास पुन्हा धराया ॥ ८६ ॥

सवाई.

"हंस धरीन म्हणोनि मनोरथ हा मज होय विनोद तुम्हांला ।
हा कलहंस पिटाळवितांहि, पुन्हा उडवाल तया विहगाला ॥
जा परत्याच, तुम्ही नलगेच," असें वदुनी नृपराज-सुता ते ।
राहविला सखिचा जन आपण-मात्र तयास धरूं मग जाते ॥ ८७ ॥

---

१ पृथ्वीला. २ दमयंती पहिलीच हंसगमना (हंसाप्रमाणें हळू चालणारी) होती ती पुनः हंस धरण्याकरितां तशी झाली, म्हणजे श्लेषानें, हंसाकडे गमन करणारी झाली. ३ हातांत कांकणें होतीं तीं न वाजावीं म्हणून हात न हालवितां.

व० ति०.

रागेजली अरुण-कांति विराजवीते ।
हे एकली सु-तनु चंद्रकला तसी ते ॥
गेली हळूच कलहंस समीप केला ।
कांहीं पुढें फडकला अवलोकिजेला ॥ ८८ ॥

आणीकही पद न वाजत मंद चाले ।
जो चालतां पदर सांवरिला न हाले ॥
हेही करी निज-करीं खग सांपडेसा ।
तोही हळू हळुच होय पलीकडेसा ॥ ८९ ॥

मालिनी.

मद-गज-गमनेनें मागुती चाल केली ।
विनत-तनु-लता हे तत्समीपास गेली ॥
पुनरपि फडके हा फारसा दूर नाहीं ।
जवळि जवळि ऐसा भासला हंस कांहीं ॥ ९० ॥

व० ति०.

हंसें तसी चतुर-संमत युक्ति केली ।
ते चालवीत सु-तनू बहु दूर नेली ॥
छाया[१] तियेशि दुसरी तिसरी वनाळी ।
जे सांवळी युवति-तुल्य दिसे निराळी ॥ ९१ ॥

प्रमाणिका.

तया वनांत एकली । विलासिनी विलोकिली ॥
मदें भरोनि डोलतो । तियेस हंस बोलतो ॥ ९२ ॥

दिंडी.

"भूमि-भागीं फिरणार तूं तुला मी । कसा सांपडेन सांग गगन-गामी ॥
बाळ बाळे जरि होय चंद्र-कामी । हस्त त्याचा लागेल काय सोमीं ॥९३॥
असो, सांपडतों तुझ्या करामाजी । पुन्हा सुटका करितेस काय माझी ॥
कसा पातेजूं बाळ-बुद्धि तूझी । स्त्री-स्वभावें बहु आणशील बाजी" ॥९४॥

मालिनी.

चतुर नर जसा हा बोलतो हंस तैसा ।
तरि न धरि मृगाक्षी विस्मयीं भाव कैसा ॥
'पळुनि मज निखंदी', तीस तो खेद नाहीं ।
शिणहि विसरली ते बोलती होय कांहीं ॥९५ ॥

दिंडी.

"कोण तूं गा कोठील कवणियाचा । कसा झाला तव देह सोनियाचा ॥
कशी आली ही तूज मनुज-वाचा । काय भाग्योदय तूंचि या वनाचा ॥९६॥

---

१ तिला दुसरी सोबतीला तिचीच छाया होती आणि तिसरी वनपंक्ति होती. तात्पर्य कीं, तेथें तिच्याशिवाय दुसरें कोणी मनुष्य नव्हतें.

दिंडी. धरिल पाहिल सोडील असा पाहीं । मजवरता विश्वास तुझा नाहीं ॥
असो, पुसतें[१] ते सांग कथा कांहीं । जाइं अथवा मग याच वनीं राहीं"॥९७॥
असें बोलोनी मौन धरुनि राहे । काय बोलतो हंस असें पाहे ॥
तदा त्याचा वचनौघ असा वाहे । "राज-कन्ये तूं आयकें गिरा हे ॥९८॥
ब्रह्मदेवाचे बहु विमान-वाही । हंस आहेती ऐकिलें तुवांही ॥
तया वंशीं सौवर्ण-देह हाही । ज्यासमान सखि सर्व-मान्य नाहीं ॥९९॥

व० ति०. मंदाकिनीमधिल जीं कनकारविंदें ।
तीं जेवितों मृदुल-नाल-मृणाल-कंदें ॥
आम्ही असों नृप-सुते तरि[२] कांचनाचे ।
जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे ॥ १०० ॥
जो मानसीं[३] विहरतो विहरो परी तो ।
कां आमुची कुल-सती[४] अ-सती[५] करीतो ॥
राखीं नळा निज-यशोमय-हंस[६] राया ।
आलों महीवर फिराद अशी कराया ॥ १०१ ॥
मी गुंतलों नळ-महींद्र-गुणौघ-पाशीं ।
सेवेसही मग करोनि तयाच पाशीं ॥
आलोकुनी कवण या चतुरा न नाचे ।
लोकेशता विभवही चतुराननाचें ॥ १०२ ॥
एकांत लेखनहि वाचनही करी तो ।
माझी तनु-द्युति समीप तदा धरीतों ॥
याकारणें नळ मला बहु आप्त मानी ।
तो सांगता निज-मनोरथ होय कानीं"॥ १०३ ॥
आधींच नैषध-कथा नवनीत-भेळा[७] ॥
होता अलंकरण-रूप इच्या जिभेला ॥
हंसोदयें[८] विघरतां अधरीं धरी ते ।
स्वीकारितां वचन तें मग आदरीते ॥ १०४ ॥

---

१ मी विचारितें ती (गोष्ट). २ म्हणून. ३ मानस-सरोवरीं. ४ कुलाची कीर्ति. ५. खोटी. ६ नळाचा यशोमय हंस हा मानससरोवरीं येऊन विहार करतो तो खुशाल करो, पण "आम्ही सुवर्ण-कांति हंस" ही जी आमच्या कुळाची कीर्ति आहे ती नाहींशी करतो. कारण तो शुभ्र असल्यामुळें आम्ही शुभ्र होतों. ह्याकरितां हे नळा, आपला यशोमय हंस आपणाजवळ राखून ठेव अशी फिर्याद करण्याकरितां पृथ्वीवर आलों आहें. तात्पर्य कीं, नळाची निष्कलंक कीर्ति मानससरोवरापर्यंत गेली होती. ७ गोळा. ८ सूर्योदयें, पक्षीं, हंसागमनानें.

दिंडी. "नळें तुजशीं एकांत काय केला । तोचि ऐकाया जीव हा भुकेला ॥
तया बोलोनी निवर्त्रि या भुकेला । ऐकवावें मज म्हणुनि नायिकेला[१] ॥१०५॥
नळाशीं जो एकांत तुझा तो कां । प्रकट कीजे म्यां सांग इतर लोकां ॥
धन्य डोळे न करोनि तदालोका । नळ-कथेनें हे कर्ण धन्य हो का[२]" ॥१०६॥
निषध-राजीं हे फार दिसे राजी । असें हंसें जाणोनि मनामाजी ॥
बोलिजेली नळराज-कथा हे जी । भला हेजीब त्याशि म्हणे हे 'जी' ॥१०७॥
"नळ म्हणाला मज सरळ धरुनि बाहीं । तुला कोठेंही बंक अटक नाहीं ॥
सकळ भुवनें तरि फिरुनि राज-गेहीं । एक नवरी मज योग्य बरी पाहीं ॥१०८॥

व० ति०. एकांत हाच वदला मज जाण बाळे ।
तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे" ॥
येणेंपरी परिसतांच तया अनन्या[३] ।
ते बोलते चतुर सुंदर राजकन्या ॥ १०९ ॥
"मी[४] जाण देवनळही स्व-करीं धराया ।
सांगेन काय चतुरा मज लाज जाया ॥
काळें करूनि सुख जोंवरि होय लेखीं" ।
हें बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी ॥ ११० ॥

---

१ न ऐकलेला म्हणून. २ होईनात कां. ३ जवळ कोणी दुसरें नव्हतें अशाला म्हणजे एकट्याला. ४ (अन्वय–१)–काळें करूनि जोंवरि लेखीं सुख होय (तोंवरि) देवनळही स्वकरीं धराया (योग्य आहे असें) मज लाज जाया (मला) निर्लज्जता प्राप्त होण्याला चतुरा मी सांगेन काय ! हें जाण. अर्थ–कांहीं काळानें जोंपर्यंत नळ मला वरील तोंपर्यंत देवनळही हातीं धरण्याला म्हणजे लेखद्वारा परस्परांचें मनोगत परस्परांस कळविण्यामध्यें सुख करून घेतलें पाहिजे. मला जास्त बोलण्याला लाज वाटते. तूं चतुर आहेस. तुला आणखी सांगणें नको. अथवा (अन्वय–२) (हे) देवनळ (नळराजा) या (व) ही (मी) स्वकरीं धरा. मी जाण (जाणती) मज जाया (आपण होऊन जाण्याला) लाज न काय ? काळें करूनि इत्यादि (पूर्ववत्) (असें) चतुरा सांग. अथवा (अन्वय–३)–चतुरा मला लाज काय ? (हे) देवनळ या (व) ही जाया (स्वस्त्री म्हणून) स्व-करीं धरा, (असें) मी काळें करूनि सांगेन जाण. (जोंपर्यंत तो मला वरी) (वरील) तोंवरि लेखीं सुख होय. अथवा– (४) नळ हा देवही म्हणजे देव असला तरी दैवीं लिहिलें असेल त्याप्रमाणें कांहीं काळानें त्याचें प्राप्तिरूप सुख होईपर्यंत मला निर्लज्जता येण्याला मी तो पाणिग्रहण करण्यास योग्य आहे असें सांगेन काय ? तात्पर्य कीं, तुला नळ हा वर आवडला कीं नाहीं म्हणून तूं पूर्व श्लोकांत विचारिलें, तर स्त्रिया अमुक वर आवडला असें कधीं सांगत असतात काय ? असें सांगण्यास त्यांला लाज नाहीं काय ? देव असले तरी सांगणार नाहींत ; असें उत्तर दिलें. ह्यांत लाजेमुळें सांगत नाहींत पण मनांतून तसें असतें असें सुचविलें ह्यावरून नळच इष्ट आहे असें दर्शविलें.

स्रग्विणी. श्लेष-शब्दें इणें भाव सांगीतला।
नैषधाधीश तो नाथ मागीतला॥
होय[१] जाणीयली[१] घे त्रपा-कंचुला।
हंस बोलावया हालवी चंचुला॥ १११॥

व० ति०. "गांठ्याळ जें हृदय सांद्र[२] न होय ज्याचें।
नामेंचि देवनळ कार्य नसे तयाचें॥
धत्तूरही कनक-नाम सदा धरीतो।
होईल काय रसिका कनकापरी तो" ॥ ११२॥
ती बोलते युवति, "लाज मनीं दडाली।
होती, तुवां विघरतां मन ते उडाली॥
आतां वरूं नळवरासि तुला नवाजूं।
गाऊं तुझी स्तुति करूनि कशास लाजूं" ॥ ११३॥

मालिनी. परिसुनि वच ऐसें जें इणें बोलिजेलें।
पतग-कुल-वतंसें अंतरीं ध्याइजेलें॥
पर-वश हृदया हे नैषधें राज-हंसें॥
म्हणुनि समजतां हें बोलिजे राजहंसें॥ ११४॥

दिंडी. "जशी रंजलीसि तूं निषध-भूपीं। तसा तोही रंजला तुझ्या रूपीं॥
दैव-घटनें अन्योन्य व्हाल सोपीं। तुम्ही नांदाल सत्य हें निरोपीं॥११५
कोण योजावी नोवरी नळाला। ब्रह्मदेवानें हा विचार केला॥
तुझा नामाक्षर-संघ घेइजेला। असें भासतसे माझिया मनाला॥११६

मालिनी. नळ-रहित वराशीं तूज योजूनि पाहे[३]।
तरि मग विधि ऐसा कोण तो मूढ आहे॥
अ-चतुर नर तोही जाहल्या[४] जेविता कीं।
सळमिसळ करीना सर्वथा क्षीर ताकीं॥ ११७॥

दिंडी. कशाला हें बोलणें काय येणें। तुवां वरिला नळ-राज तूंहि तेणें॥
सफळ माझें हें येथवरी येणें। राज-कन्ये नीरोप मला देणें॥११८॥
चतुर सुंदर तो तरुण निषध-राजा। तुवां राजी केलाच तूं वरा जा॥
धन्य वैदर्भी दैवयोग तूझा। बोल मानीं यथार्थ मनीं माझा॥११९॥

---

१ ओळखिली गेली—म्हणजे तिचा भाव हंसानें जाणिला. २ स्निग्ध, मृदु, कोमल.
३ योजूं पाहील. ४ जेविता जाहला तर—जेवूं लागला तर.

मालिनी. करुनि मज रवाना राजसे तूजसाठीं।
नृपति निरखि माझी वाट आराम-वाटीं[1] ॥
बसवुनि निज-पाठीं तूज नेईन तेथें।
परि चुकुर तुझे हे लोक होतील येथें" ॥१२०॥

दिंडी. जनक-तनयेशीं पवन-तनयसा तो। वदुनि वेगीं उड्डाण नभीं घेतो ॥
नळापाशीं वृत्तांत निवेदीतो। स्व-धामातें पावोनि सुखी होतो ॥१२१॥

असो आल्या इजजवळि सख्या ऐशा। बोलती त्या मग तीस सकळ कैशा ॥
"हंस धरुनि परिपूर्ण तुझी आशा। काय गेला तो उडुनि गगन-देशा" ॥१२२॥

मालिनी. धरुनि कर सखींनीं सौध-शालेंत नेली।
खगवचन-मधूनें जे मनीं मोहिजेली ॥
नळ-विरहभरानें पोळली गुप्तरूपें।
नवल कनकशी ते गौरही[2] तप्त-रूपें ॥ १२३ ॥

शिख०. न रंजे कारंजें निरखुनि फणीतें[3] फणफणी[4]।
मुदेनें[5] मोदेना नल-गुण-गणीं जे गुणगुणी[6] ॥
न बैसे जे सेजेवरि न परिसे जे शुक-गिरा।
न[7] नाहे[7], माना[8] हे न धरि ललना हेतु दुसरा ॥ १२४ ॥

मालिनी. गजबज बहु झाली माय धांवोनि आली।
धरुनि हृदय-देशीं तींजला सेज केली ॥
करिति विझण-वारे त्या सख्या वेगळाल्या।
वडिल वडिल दाया जाणत्याही मिळाल्या ॥ १२५ ॥

गीति. ते शीतळोपचारीं जागी झाली हळूच मग बोले।
"औषध नलगे[9] मजला" परिसुनि जननी 'बरें' म्हणुनि डोले ॥१२६॥

दिंडी. "मूल उपवर हे जाहली इयेला। पाहिजे कीं वर योग्य पाहिजेला" ॥
असें ऐकोनी वधूचिया[10] बोला[10]। सैंवराचा मग यत्न नृपें केला ॥१२७॥

---

१ बागेच्या वाडग्यांत-बागेंत. २ अन्वय=कनकशी ते तप्तरूपें ही गौर-सुवर्णासारख्या कांतीची ती तप्त झाली असतां ही गौर राहिली, हें नवल होय. ३ केंस विंचरण्याच्या फणीला. ४ त्रासे. ५ डोकींत घालण्याच्या मुदेनें. ६ गुणगुण करी. ७ स्नान न करी. ८ समजा. ९ नलगे म्हणजे नको. श्लेषानें—नल गे म्हणजे मजला गे नल हेंच औषध. १० भीम-राजानें आपल्या बायकोचें बोलणें.

नगर सारें शृंगारविलें तैसें । भूमि-लोकीं वैकुंठ दिसे जैसें ॥
लिखित पाठविलें सकळ नृपां कैसें । 'तुम्हीं यावें जी सैंवरासि' ऐसें ॥१२८॥

निषध-राजासी लिखित पाठवी तो । प्रति-द्वीपीं भूपतिसही लिहीतो ॥
अशा यत्नीं लागला नृप अहो तो । पुढें परिसा वृत्तांत कसा होतो ॥१२९॥

ऋषी नारद असतां नभो-विहारीं । दिसे वैजयंत[1] जया मनोहारी ॥
मणी रमणीय कनक-कलश भारी । सुर-पतीचा जो सौध महा भारी॥१३०॥

तया प्रासादीं जाय ऋषी पाहे । सभा केली देवेंद्र बैसलाहे ॥
फार आदरिलें तया देव-रायें । अर्घ्य-पाद्यादिक करुनि विनत-कार्ये ॥१३१॥

भु० प्र.

"समुद्रोद्भवा अप्सरा साठि कोटी ।
जयांची द्युती ते रतीलाहि लोटी ॥
विधीनें तशा त्या तुळूं पाहिजेल्या ।
जियेशीं हळू[2] जाहल्या उंच गेल्या ॥ १३२ ॥

मालिनी.

उपवर दमयंती जाहली नोवरी ते ।
कवण वर कळेना हे जयातें वरीते ॥
दृढतर-निज-लज्जा-गव्हरीं सिंह केला ।
जिवलगहि सखीला जो नसे सांगिजेला ॥ १३३ ॥

दिंडी. नवे तरणे नृप-वर तीजसाठीं । मोहिले ते करिताति यत्न कोटी ॥
कलह-वार्ता ही मानिताति पोटीं । तया युवतीची आस तयां मोठी"॥१३४॥

असें नारद बोलोनि तो निघाला । जाय हृदयासी मानल्या स्थळाला ॥
थोर चिंता मग होय सुरेंद्राला । म्हणे कैसी ते वरिल आपणाला ॥१३५॥

वरुण पावक यम इंद्र हे मिळाले । असे चौघेही रथारूढ झाले ॥
मही-लोकासी यावया निघाले । तया कुंडिन-नगरासमीप आले ॥१३६॥

द्रु० वि०. तंव तया चवघांस तया पथीं । निषध-नायक येत दिसे रथीं ॥
तरुण सुंदर जो चतुराग्रणी । अतुल वैभव राज-शिरोमणी ॥ १३७ ॥

---

१ इंद्राच्या राजवाड्याचें नांव. २ हलक्या ;—हें नारदाचें बोलणें.

मालिनी.

निरखुनि निषधेंद्रा इंद्र तो बोलताहे ।
"युवति उभयताही लभ्य आम्हांसि नोहे ॥
वरिल जरि नळाला ते तया लाभली जे ।
न वरि तरि अम्हांसी मूढ[1] ते काय कीजे" ॥ १३८ ॥

शिखरिणी.

नळातें पाचारी सुर-पति विचारी कुशल तो ।
म्हणे, "आम्हांपाशीं तव गुरु[2] विलासी निवसतो ॥
खुणा त्याच्या ज्या ज्या तुजजवळि राजा निरखितों ।
हिरा तूं तद्वंशीं म्हणउनि तदंशी समजतों ॥ १३९ ॥

व० ति०.

तो वन्हि तो वरुण तो यम, इंद्र गा मी ।
झालों तुला सकळ हे विदित स्व-नामीं" ॥
बोले मही-रमण, "हा नल चंद्र-वंशी ।
वंदी पदास तुमच्या तुमचाच[3] अंशी[3]" ॥ १४० ॥

दिंडी.

"नळा कोठें जातोसि" असें बोले । नळें "इंद्रासी" असें बोलिजेलें ॥
"भीम-भूपें हें लिखित पाठवीलें । सैंवरालागीं येइजे वहीलें" ॥ १४१ ॥
बोलताहे देवेंद्र नृपवराला । "नैषधा तूं आलासि सैंवराला ॥
समज आम्ही तुजजवळि याचनेला । करूं आलों मनिं धरुनि कामनेला ॥ १४२ ॥

व० ति०.

जे हे दिशा-पति[4] विशाल-यशा तशांला ।
आशा-वशा कु-वलयांत दशा कशाला ॥
हा बोल तूं न वद[4] तूजसमीप येतों ।
आम्ही मखीं निज-मुखीं अवदान घेतों" ॥ १४३ ॥

केला विचार हृदयीं नळ-राजयानें ।
"हा जीवही धनहि देइन निश्चयानें ॥
देवेंद्र दे जरि म्हणेल कदापि भैमी ।
ते देववेल मज काय ? करीं न गै[5] मी" ॥ १४४ ॥

---

१ मूर्ख. जर नळाला तिनें वरलें नाहीं तर अशी मूर्ख आम्हांला काय करावयाची आहे. २ पिता वीरसेन. ३ राजा हा अष्टलोकपालांचा अंश असतो—" अष्टानां लोकपालानां वपुर्धारयते नृपः" असें मनूचें वचन आहे. ४ अन्वय—" ( हे ) विशालयशा ( नळा ) जे हे दिशापति अशांला कुवलयांत आशावशा दशा कशाला, हा बोल तूं न वद." अर्थ—हे विशालकीर्ते नला, हे सारे दिक्पाळ असून ह्यांची दृष्टि पृथ्वीवरील पदार्थांच्या आशेनें बद्ध कां? असें तूं म्हणूं नको; कां कीं. ५ कानाडोळा.

दिंडी. म्हणे राजेंद्र तया देव-देवा । "काय आज्ञा जी काय करूं सेवा ॥
वीरसेनाचा थोर पुण्य-ठेवा । मज मिळाला तो दर्शनाख्य मेवा" ॥१४५॥

व० ति०. बोले सुराधिप नराधिपतीस, "राया ।
भैमी जसी मज वरील तसें कराया ॥
बोलावयास तिजशीं तिचिया घरा जा ।
तूं बोलका चतुर केवळ काय राजा" ॥१४६॥

मालिनी. मग हळुच सुरेंद्रा बोलिजे[1] भूपतीनें ।
"मज निज-सुमनाची[2] घातली माळ तीनें ॥
हृदय तरि तियेचें सांद्र झालें सु-वासें[2] ।
चलित न करवे तें कोणत्याही प्रयासें" ॥१४७॥

दिंडी. पुन्हा बोले देवेंद्र नृप-वरा या । "तुला झालें वश हृदय तिचें राया ॥
तरिच आलों हे याचना कराया । तुझ्या वाक्यें आम्हांसि ते वराया ॥१४८॥

व० ति०. दातव्यही[3] स्व-वश आपण जाणताही ।
पर्याय उत्तर वदेच न देच कांहीं ॥
दाता असा शठ कसा ठक-सा कदापी ।
जो याचकावरि दया न करीच पापी ॥१४९॥

मालिनी. गहिंवरत गळाही चावळे जीभ वाळे ।
विकळपण शरीरीं कंपही या निराळे ॥
धनिक विमुख होतां अंतरीं शोक राहे ।
हर हर मज भासे यातना याचना हे ॥१५०॥

व० ति०. भांबावला[4] धन-मदें भलतेंच बोले ।
तो बोलही स-रस मानुनि लोक डोले ॥
मासेंकरूनि फुगला गळ-साच[5] भावे ।
ज्या दीन मीन धरितां वळसाच पावे" ॥ १५१ ॥

---

१ बोलिजेलें (म्हटलें). २ पुष्पाची; तरी तिचें हृदय सुवासानें (चांगल्या वासानें) भरलें आहे. आतां मजकडे पुष्पांची माळ आली असतां तिजकडे सुवास राहील कसा ? तर सुमनाची म्हणजे आपल्या चांगल्या मनाची आणि सुवास म्हणजे माझा तिच्या मनांत चांगला वास म्हणजे वसति. तात्पर्य कीं, तिचें मन मजवर पक्कें बसलें आहे. ३ जें द्यावयाचें तें. ४ ह्या क्रियेचा कर्ता "धनिक" अध्याहृत आहे. ५ मासे धरण्याच्या गळाप्रमाणेंच भावे म्हणजे वाटतो. हा गळ मांसानें फुगलेला असतो म्हणजे ह्यास मांस लावलेलें असतें. धनिक तर मांसानें पुष्ट असतोच. ह्या गळाला मीनानें म्हणजे माशानें धरलें म्हणजे तो वळसा पावतो म्हणजे गरक्यांत येतो. तसें दीनानें धनिकास धरिलें असतां त्याला गोता बसतो म्हणजे तो फसतो.

दिंडी.
असे परिसोनी बोल वासवाचे ।
तया नळ-राजा काय वदे वाचे ॥
"तुम्ही जाणंते थोर थोर साचे ।
असां साक्षी तुम्हि माझिया मनाचे ॥१५२॥
ज्याशि जेथें सामर्थ्य नसे त्यातें । कसें तें कार्य तुम्हीं सांगिजेतें ॥
बाळ तान्हें उचलील काय जातें । बोलणाराचें मोल[1] फोल[1]जातें ॥१५३॥
सात बंकांही पलीकडे हो ते । राजकन्येची भेट कशी होते ॥
त्यजुनि राज्य त्वद्गतता कशी ते । धरावी म्यां हृदयासि जे कशीते[2]" ॥१५४॥

व० ति०.
बोले सुरेंद्र, "नृप-सौध सुखें फिराया ।
आकार-गुप्त वर देइन देव-राया ॥
जाईं विदर्भ-वसुधेस[3] सुतेस शोधीं ।
आम्हांसि ते तरि वरील तुझ्याच बोधीं" ॥१५५॥

ओव्या.
इंद्र त्रैलोक्य-नायक । तोही झालासे याचक ॥
दाक्षिण्यानें भू-पाळक । यांच्या वाक्यें गुंतला ॥ १५६ ॥
'बरें' म्हणोनी उत्तरें । रथावरोनि ऊतरे ॥
तया राज-पुरीं भरें । शोभा तेथील पाहतो ॥ १५७ ॥

व० ति०.
प्राणापरीच हृदयीं नगरांतरीं तो ।
गुप्त स्वरूप नल-भूप तदा धरीतो ॥
बंकीं रिघे तंव तया दिसताति बंके ।
पंकेरुहास्य[4] न दिसेचि तया[5] न शंके[5] ॥ १५८ ॥

ओव्या.
तया राज-सौधांतरीं । शोभा पाहे परोपरी ॥
कोठें आहे ते सुंदरी । धुंडावया लागला ॥ १५९ ॥
कोणीएक दोघी दूती । तेथें अन्योन्य बोलती ॥
"येथें आहे दमयंती । जाईं बोलोनि येईं" ॥ १६० ॥
तिजसवें सौधांतरीं । राजा जाय अंतःपुरीं ।
तेथें देखिली सुंदरी । जैसा पूर्ण चंद्रमा ॥ १६१ ॥
सुमन-सेजेच्या पलंगीं । बैसलीसे तन्वंगी ॥
सख्या खेळताती संगीं । बहु अप्सरा त्या जैशा ॥ १६२ ॥

---

१ बोलण्याची मातबरी (योग्यता) राहत नाहीं. २ पीडा देते. ३ कुंडिननगरीस.
४ कमलमुख-नल. ५ कोणाला त्याविषयीं शंका आली नाहीं.

मालिनी.

प्रगट तिजपुढारां जाहला राजमौळी।
पदर वरि न घेतां हार तैसा झळाळी॥
निज-हृदय-निवासी काय बाहीर आला।
निरखुनि दमयंती तेविं मानी तयाला॥ १६३ ॥

द्रु० वि०.

गजबजोनि समस्त तिच्या सख्या।
गज-गमा उठल्या तिजसारख्या॥
पदर सांवरितां नृप-बाळिका।
झळकती हृदयीं मणि-माळिका॥१६४॥

शा० वि०.

रामातें जनक-क्षमा-पति-सुता, रामा[1] जशी रेवती।
कामारीस[2] नगाधिराज-तनया, कामासि जैशी रती॥
या मानूनि तसी विदर्भ-दुहिता रामा मनीं भाविते।
'हा माझा हृदयाब्ज-सूर्य' म्हणुनी त्या मानिनी बोलते॥१६५॥

साकी.

"कोण तुम्ही कवणाचे कोठुनि येथें कां आलां हो।
काय निमित्तें दिधला मजला हा निज-दर्शन-लाहो॥१६६॥

अटक न केली तुम्हांसि येतां त्या सातांही बंकीं।
हीं माझ्या नयनांचीं सुकृतें विशेष मी हें शंकीं॥ १६७॥

संभवलां कवणाचे वंशीं सांगा हो अ-कलंकीं।
उभे असां कां, भागतसां हो या बैसा पर्यंकीं॥ १६८॥

व० ति०.

राजे असाल तरि धन्य वसुंधरा हे।
शोभाल देव तरि नाक यथार्थ आहे॥
भोगी तुम्ही उपजलां जरि नाग-लोकीं।
खालीं असोनि सकळांवरि होय तो कीं॥ १६९॥

साकी.

दुग्ध-पूर नसतां निजरूपीं क्षीरसिंधु तो जैसा।
वसंत आला नाहीं तरि तो उद्यान-भाग जैसा॥ १७०॥

अमृत-कराचा उदय न होतां रजनी-समय जैसा।
तुमच्या विरहें आजि जाहला कवण देश तो ऐसा॥१७१॥

---

१ बलरामास. २ शिवास.

व० ति०. भूपाळ जो मम मनो-मुकुरीं उभासे ।
तो नैषधेंद्र तुमचा अनुबिंब भासे ॥
रूपें तरीच दिसताति दिगंतराळीं ।
तीं हीं करीं म्हणवतील तुम्हांनिराळीं ॥ १७२ ॥

साकी. सरस-द्युति-पद फुल शिरसाचें मृदु फुललें स्वभावें ।
चालवाल किंति दूर तयातें अ-दय हृदयभावें ॥ १७३ ॥

कर्ण-युगल हें धन्य करावें सांगुनि निज नांवें" ।
स्तवन करी रघुनाथ तयाचें कवन आदरावें ॥ १७४ ॥

(दमयंतीचें हें बोलणें ऐकून नलराजा तिला म्हणतो :—)

व० ति०. "आहेस कीं सुखवती कमनीय-लीळे ।
निश्चित कीं हृदय होय तुझें सु-शीळे ॥
आतां नकोच अवलंब विलंबनाचा[1] ।
हेजीब मी समज मुख्य सुराधिपाचा ॥ १७५ ॥

स्वागता. जो धरी निज-करीं शत-कोटी । ज्याशि नम्र सुमनःशत-कोटी ॥
तो सुरेंद्रहि तुला नत याची[2] । हा असो वर, तुला[3] न तयाची ॥ १७६ ॥

धनाक्षरी. तया इंद्रा करीं धरीं । अथवा तयाचे शेजारीं ॥
नांदे जो तेजो-निधी[4] भारी । तया वरीं राजसे ॥
तोही येईना जरी मना । तरी वरावें शमना[5] ॥
अथवा करूनि करुणा । त्या वरुणा वरीं कीं" ॥
ऐसें बोलतां भूपाळ । काय बोले ते वेल्हाळ ॥
"कां हो बोलतां पाल्हाळ । नाम कुळ सांगावें" ॥ १७७ ॥

व० ति०. बोले नृपाळ, "पुससी मज वंश-नामें ।
यावीण सांग तटलीं तुझिं काय कामें ॥
आलों सुधांशु-मुखि जे घटना कराया ।
तीतें विचारुनि वरीं सुर-लोक-राया" ॥ १७८ ॥

---

१ उशिराचा. २ याचना करतो. ३ बरोबरी. ४ अग्नि. ५ यमाला.

घनाक्षरी.

बोले सुंदरी तयासी । "स्व-वंश-नाम न सांगसी ॥
तरी आम्ही पर-पुरुषासीं । वदणें मर्यादा नोहे" ॥
तिचा पाहुनियां कोप । काय बोले नळ-भूप ॥
"चंद्र-वंशाचें हें रोप । माझें जाण राजसे ॥
महाजनाचा आचार । निज-नामाचा उच्चार ॥
करूं नये हें साचार । शास्त्राधार[1] आहे कीं" ॥
पुन्हा बोलते सुंदरी । "चंद्रवंशी महीवरी ॥
बहु आहेत ते परी । नामें घेतां जाणवे ॥ १७९

गीति.

'मी वासुदेव' ऐसें स्व-नाम मुर-हर वदे सकळ-वेदी[2] ॥
आधार तोचि मानुनि निजाभिधानासि कवण न निवेदी" ॥ १८०

घनाक्षरी.

बोले नैषधेंद्र वाचा । "नाम हेजीब[3] इंद्राचा ॥
किती साक्षेप नामाचा । काय तेणें करिसी तूं ॥१८१॥

केला काय अंगीकार । बोलूं इंद्रासी निर्धार" ॥
तंव ते बोले सुकुमार । चंद्राकार-वदनातें ॥१८२॥

व० ति०.

"ऐरावतावरि बसोनि विमान-देशीं[4] ।
जो संचरे सुर-पती सुख-संपदेशीं ॥
मी भूमिकेवरि असोनि तयास कांहीं ।
मागावया तरि कशी मज लाज नाहीं ॥१८३॥

घनाक्षरी.

नळावेगळा भ्रतार । नलगे स्वप्नीं हें साचार ।
ऐसा निश्चय विचार" । तंव राजेंद्र बोलतो ॥
"टाकुनि इंद्राचा संभ्रम । धरिशी कां तूं नळ-भ्रम ॥
जाईल विश्राम विभ्रम । नसता श्रम होईल ॥
तुझें सौंदर्य पहावया । धरी सहस्राक्ष काया ॥
तया वरीं देव-राया । नळ-माया टाकुनी ॥
अथवा तुज तो मोहला । होऊं[5] नेदी नैषधाला ॥
यास्तव त्याच इंद्राला । माळ गळां घालावी" ॥ १८४ ॥

---

१ आत्मनाम गुरोर्नाम नामातिकृपणस्यच ॥ श्रेयस्कामो न गृह्णीयाज्ज्येष्ठापत्यकलत्रयोः अशी स्मृति आहे. २ जाणणारा. ३ दूत. ४ विमानें फिरतात तेथें म्हणजे आकाश ५ वरूं.

व० ति०. येणेंपरीच " अनळासि यमाधिपासी ।
पाशीसही तरि वरीं " म्हणतां नृपासी ॥
आधार लेश न वदे नव-सारसाक्षी ।
होते तयासि सुर-नायक गुप्तसाक्षी ॥ १८५ ॥

ऐसा अ-वंचक वदोनि नृपाळ आला ।
इंद्रादिकांसहि निवेदित वृत्त जाला ॥
पाचारिलें मग महींद्र विदर्भ-भूपें ।
आले समस्तहि सभेसि सहर्ष-रूपें ॥ १८६ ॥

ओव्या. इंद्रादिक तेही अधिप । धरूनि आले नळ-रूप ॥
सभे बैसले अमूप । जेथें भूप शोभती ॥ १८७ ॥

आला नळही भूपाळ । कीर्ति-रूपें जो विशाळ ॥
तदा दमयंती वेल्हाळ । सखियांसीं बोलते ॥ १८८ ॥

" नळ-राज-हिरा वरिला । तोचि मनीं म्यां धरिला ॥
सुर किंवा नर भला । न वरीं अन्यातें निश्चयें[1] " ॥ १८९ ॥

ऐसें बोलोनी सुंदरी । बैसे शिबिकेभीतरीं ॥
आली राज-सभांतरीं । बरोबरी शारदा[2] ॥ १९० ॥

बोले शारदा तियेला । " ऐकें राजांच्या नामांला ॥
मना येईल तयाला । माळ गळां घालीं तूं ॥ १९१ ॥

शा० वि०. हा राजा ऋतुपर्ण नाम धरिता हारावली कंधरीं ।
हा राहे शरयूसमीप नगरीं हा राजसे आदरीं ॥
हा राजीव-दलाक्ष सद्गुण-निधी, फारा जनांचा महा ।
धारा, हाच वरीं, रिपूंशि परते[3] सारावयाचा[3] पाहा " ॥ १९२ ॥

---

१ हें मूळ पद असून त्याची संक्षिप्त ओवी केली आहे असें हस्तलिखितांवरून दिसतें. २ स्वयंवराच्या वेळीं वधू ( नवरी ) राजसभेमध्यें वर निवडण्याकरितां जाऊं लागली म्हणजे जिला तेथें जमलेल्या राजांची चांगली माहिती असून जी मोठी चतुर आहे अशा प्रकारची एक स्त्री तिच्याबरोबर असते, अशी प्रसिद्धि आहे. तशी ही येथें शारदा आहे. ३ पराजय करून परत फिरविणारा.

व० ति०. येणेंपरीच बहु भूप निवेदिजेले ।
हीच्या मनासचि न येति उगेचि ठेले ॥
जेथें वळी[1] धरुनि पंच-नळी[2] बसे ते ।
तेथें विरिंचि-तनयेसमवेत येते ॥ १९३ ॥

घनाक्षरी. बोले शारदा वचन । " येथें बाई सावधान ॥
बरें घालूनियां मन । वर-लाभें सुखी हो ॥ १९४ ॥

व० ति०. ज्याचीं पदें धरिति देव शिरो-ललामीं ।
स्वाराज्य[3] तो मिरवितो गजराज-गामी ॥
जो वज्र-पाणि बहु-लोचन कांति भारी ।
हा[4] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ १९५ ॥

साहील कोण सजणे बहु तेज याचें ।
मध्य-स्थ[5] रूप धरितो हरिचें यमाचें ॥
स्नेहा धरी अधिक होय तमासि वारी ।
हा[6] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ १९६ ॥

संपूर्ण ते समज यास्तव दक्षिणाशा ।
पाप्यांस दंड धरितो करितो विनाशा ॥
देहीं जया मिरवते घन-कांति भारी ।
हा[7] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ १९७ ॥

---

१ ओळ, रांग. २ पांच नळ. ३ स्वर्गाचें राज्य. ४ इंद्र ह्या श्लोकांत " बहुलोचन " ह्या विशेषणानें इंद्र हजार डोळ्यांचा आहे तेव्हां तो कुरूप असल्यामुळें वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ५ पूर्व व दक्षिण ह्या दिशांचे स्वामी अनुक्रमें इंद्र व यम हे आहेत; व ह्या दोन दिशांच्या मधील जी आग्नेयी दिशा तिचा स्वामी अग्नि आहे, म्हणून व विदर्भ-राजसभेंतही तो इंद्र व यम ह्यांच्यामध्यें बसला होता; म्हणून त्यास " मध्यस्थ रूप धरितो " इत्यादि म्हटलें आहे. ६ अग्नि. ह्या श्लोकांत आरंभींच अग्नीच्या तापाची असह्यता सुचवून तो वरण्यास अयोग्य असें सुचविलें. ७ यम. ह्या श्लोकांत " घन-कांति " ह्या शब्दांनीं यम काळा आहे, असें सुचवून तो वरण्यास अयोग्य असें सुचविलें.

आधार हाच सजणे बहु जीवनाचा।
रक्षी दयेंकरुनि मान ऋषीश्वरांचा[1] ॥
यादांस[2] फार म्हणती जन सौख्य-कारी।
हा[3] पाहिजे तरि वरीं नळ-रूप-धारी ॥ १९८ ॥

होतील नंदन-विलास जयास तो हा।
आहे धनंजयहि धर्महि जाणतो हा ॥
रत्नाकरीं तुज विराजविता विहारी।
हा[4] पाहिजे तरि वरीं नळ रूप-धारी" ॥ १९९ ॥

स्वागता. शारदेस मग राज-सुता हे। शारदेंदु-वदना वदताहे ॥
"शेवटील नळ हा मज बाई। मानला बहु मनीं सुख-दाई" ॥२००॥

---

१ पूर्वी एकदां वरुणानें यज्ञ केला, तेव्हां त्याला ऋत्विज् पाहिजे होते, म्हणून वरुणाच्या ळगा बंदी ह्यानें वादांत कहोड वगैरे ऋषींचा पराजय करून त्यांस समुद्रांत बुडविलें. आणि शा रीतीनें आपले बापास ऋत्विज् पाहिजे होते ते दिले. पुढें यज्ञ संपल्यावर वरुणानें ांच्या मोठा आदरसत्कार करून त्यांस परत पाठविलें अशी कथा आहे. (भारत, वनपर्व, ० १३२) तिला अनुलक्षून हें लिहिलें असावें. २ नळपक्षीं (या दास = नोकर), वरुणपक्षीं यादांस = जलचरांस). ३ वरुण. ह्या श्लोकांत जीं विशेषणें आहेत तीं सर्व, वरुण इतरांचें ं करण्यांत सर्वदा गुंतलेला असतो, त्यास स्वस्त्रीशीं बोलण्याचालण्यालाही वेळ होत नाहीं, सें सुचवितात. त्यावरून तो वरण्यास अयोग्य हें उघड आहे. ४ नळ. ह्या श्लोकांत च्या चारही देवांचे गुण नळामध्यें आहेत असें सुचविलें आहे. "नंदनविलास" ब्दानें इंद्रता सुचविली. इंद्राकडे नंदनवनांतले विलास आणि नळाकडे आनंदकारक विलास. धनंजय" शब्दानें अग्निता सुचविली. धनंजय असें अग्नीचें नांव आहे; तसा नळही आहे. ळपक्षीं धनातें जिंकणारा असा अर्थ म्हणजे पुष्कळ द्रव्य मिळविणारा. "धर्म" हें यमाचें ांव आहे. नळही धर्म आहे म्हणजे नीतिमान् आहे. "रत्नाकरीं विहारी" म्हणजे मुद्रांत राहणारा वरुण आहे, तसा नळही आहे. नळपक्षीं रत्नाकरीं म्हणजे रत्नांच्या ार्णीत (रत्नसमुदायांत) विहारी म्हणजे खेळणारा, म्हणजे ज्यापाशीं पुष्कळ रत्नें ाहेत, असें सुचवून नळाकडे वरुणता सुचविली. पण वरुणाला स्वस्त्रीशीं बोलण्याचालण्याला वत नाहीं असा त्याकडे वरती दोष सांगितला आहे. तो दोष न यावा म्हणून तुज विराजविता" असें विशेषण दिलें आहे. म्हणजें ह्यावरून तुला रत्नांच्या दागिन्यांनीं रून खुश ठेवील असें सुचविलें. "नळरूपधारी" म्हणजे नळाचें रूप धारण करणारा सा वरती चार श्लोकांत अर्थ आणि येथें "रूपधारी" म्हणजे सुरूप नळ असा अर्थ.

घनाक्षरी.

तेव्हां दमयंती सुंदरी । इंद्रादिकां नमस्कारी ॥
तयां बोलली उत्तरीं । अमृतापरीस मधुर ॥ २०१ ॥
" माझा भीम जैसा पिता । तैसे तुम्ही जी तत्त्वतां ॥
करा कन्या-दान आतां । नळ-नाथाचे करीं " ॥ २०२ ॥

द्रु० वि०.

सुर समस्त इच्या वर-निश्चयें ।
सु-रस[१] मस्त[२] वदले स्वयें ॥
'नळ-वराशि वरोनि सुखी असें ।
तुज नको जन कोण म्हणे असें' ॥ २०३ ॥

व. ति०.

मावेचना सुख मनीं कमनीय बाला ।
मायेसहि विसरली न पुसेचि बाला[३] ॥
दूर्वा-दळीं[४] कदलि-बंध-मधूक-माळा[५] ।
तीनें अलंकृत करी नळ-कंठ-नाळा ॥ २०४ ॥

ओवी.

चौघे[६] श्रेष्ठ सुरेश्वर । देते झाले अष्ट वर ॥
मस्तकीं ठेवोनी कर । दोन दोन एकेकें ॥ २०५ ॥
देऊनियां तया वर । स्वर्ग-भुवना गेले सुर ॥
निराश होऊनि नरेश्वर । जाते झाले स्व-स्थाना ॥ २०६ ॥

शिखरिणी.

नृपाळाचे मांडीवरि बसुनि मांडी[७] हरिख[८] ते ।
तया पाहों आले जन सकळ झाले हरिखते[९] ॥
महा-वाद्यें नाना निनदहि तनाना मग घडे ।
पिता तीचा पांटीभर धनहि वांटी बहु विडे ॥ २०७ ॥

ओवी.

नाना-परींचें मिष्टान्न । चारी दिवस भोजन ॥
वधूवरें मिरवून । घर-भरणी करविली ॥ २०८ ॥
राजा निरोपातें घेत । मग दमयंतीसमवेत ।
आपुल्या नगरातें जात । नांदे आनंद-भरें ॥ २०९ ॥

---

१ सुरस म्हणजे मधुर. २ पुष्कळ. ३ बापाला. ४ दूर्वांनीं युक्त. ५ केळीच्या सोपटाच्या दोरांत गुंफलेली मधूक ( दुपारी ) पुष्पांची माळ. ६ इंद्र, अग्नि, यम आणि वरुण. ७ करी. ८ आनंद. ९ हरिखते झाले—आनंद पावते झाले.

# शाहीर तुळशीदास

‘**पो**वाडा’ या मराठींतील वाङ्मयप्रकाराचा एक नमुना म्हणून तुळशीदास शाहिराचा पोवाडा किंचित् संक्षेप करून खालीं देण्यांत येत आहे. याच कथानकावर हरिभाऊ आपटे यांनीं आपली ‘गड आला पण सिंह गेला’ ही लघु कादंबरी लिहिली. तुळशीदास हा पुण्यांतील मंडईत राहाणारा होता. या पोवाड्याच्या शेवटीं दिलेल्या माहितीपलीकडे त्याची वैयक्तिक माहिती उपलब्ध नाहीं. तानाजी मालुसरे रणांत पडल्यावर लगेच हा पोवाडा रचल्याचेंही त्यानें दर्शविलें आहे. अशा प्रकारच्या वीररसप्रधान काव्याला ‘नवनीतां’त स्थान मिळणें स्वातंत्र्यप्राप्तीमुळें शक्य झालें, हें विसरतां येत नाहीं.

विशेष माहितीकरितां पहा :—इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे पोवाडे—सं. आक्वर्थ व शालिग्राम ; ऐतिहासिक पोवाडे—य. न. केळकर.

## शूर मर्दाचा पोवाडा

राजगड राजाचा । प्रतापगड जिजाबाईचा ॥ सिंहगड पन्हाळा । पहा त्या मोंगलाचा ॥ सरजा शिवाजी शिवभजन । काबिज केलें तळकोंकण ॥ गड माहुली घेतली । कल्याण भिवंडी काबिज केली ॥ खबर त्या विजापुराला गेली । ठाणें राजाचें बसलें ॥ शिवाजी महाराज । राजगड किल्ल्यावर बसले ॥ जिजाबाई माता । आहे प्रतापगडावरी ॥ सोमवाराच्या दिवशीं । हातीं हस्तनाची[1] फणी ॥ उगवते बाजुला नजर केली । नजर सिंहगडावर गेली ॥ १ ॥

बारा मावळ पुण्याखालीं । बारा मावळ जुनराखालीं । पुण्याच्या तोंडाला जेजुरीच्या बारीला[2] । किल्ला सिंहगड पाहिला ॥ नवें कोंबडीचें अंडें । ऐसा किल्ला झळकला ॥ ऐसा पंतोजी तो काका[3] । त्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ “जावें राजगड किल्ल्याला । सांगा शिवाजी महाराजाला ॥ जेवावें राजगड किल्ल्याला । अंचवावें प्रतापगडाला” ॥ २ ॥

शिवाजी महाराज पांच पोषाख नटला । आला प्रतापगड किल्ल्याला । सलाम जिजाबाईला केला ॥ “धाडला तुम्हीं हुजराचा जासूद । काम सांगावें आम्हाला” । “शिवाजीमहाराज । डाव फांशाचा खेळावा” ॥ “डाव खेळावा

---

१ हस्तीदंती. २ डोंगराळ अडचणीच्या वाटेवर. ३ पंताजी गोपिनाथ बोकील.

उमाजी यानें । तूं माता मी तुझा पुत्र ॥ डाव खेळावा मातेसंगें । हें आमचें महत्त्व नव्हे " ॥ " मायलेकरांचा डाव । ह्यामधिं कांहीं गुंता[१] नाहीं " । येवढ्या जाबावरून । ज्यानें तिवड[२] मांडिली[२] ॥ हातीं फांसा ह्यानें घ्यावा । " डाव पहिला येऊं दे तुला ॥ मी बायकोची जात । पहिला डाव येऊं दे तुझा " ॥ ३ ॥

हातीं फांसा जों घेतला । बारा बारा तो बोलला ॥ फांसा जमिनीवर फेंकला । त्याचा तिरपगडा[३] पडला ॥ तिरपगडा बोलला । त्याची बेती[३] हो पडली ॥ तिन डाव गेले ज्याचे । त्या शिवाजीमहाराजाचे ॥ " जिजाबाई ग माते । आतां डाव येऊं दे तुझा " ॥ येवढ्या जाबावरून । बाईनें हातीं फांसा घेतला ॥ " प्रतापगडची भवानी देवी । तूं पाव माझ्या नवसाला " ॥ बारा रे बोलली बाई । बाईचे बारा रे पडले ॥ बाई बेतीन[३] बोलली । बाईचे बेतीन पडले ॥ तिरपगडें बोलली । बाईचें तिरपगडें पडलें ॥ जिजाबाईचे डाव पुरे झाले । बाईचे डाव पुरे रे झाले ॥ ४ ॥

" ऐक जिजाबाई । सत्तावीस किल्ल्यांचा मी राजा ॥ माग माग जिजाबाई । जें मागाल तें देतों तुज ॥ नाशकाची वारी सांवताची वाडी । ह्यांतून किल्ला मागून घ्यावा " ॥ " ह्यांतून नको मला बाळा । पुण्याचे तोंडाला ॥ आहे सिंहगड किल्ला । घेऊन द्यावा मला " ॥ नांव घेतां सिंहगडाचें । राजा थरथरां कांपला ॥ " हा किल्ला उदेभान मोगलाचा । बाई उदेभान मोगलाचा ॥ जे उमराव गेले सिंहगडाला । त्यांच्या पाठी ग पाहिल्या ॥ नाहीं पुढे पाहिले । किल्ला आहे वाघाचा जबडा । सत्तावीस किल्ल्यांची बारी[४] । ह्यांतून मागावा बाईनें " ॥ " नाहीं सिंहगड किल्ला दिल्या । मी शाप देईन ॥ राज्य जाळून टाकीन उभे । नको बाई चल माझ्या राजगड किल्ल्याला " ॥ ५ ॥

बारा भोयांची पालखी । आंत बाईला बसविली ॥ राजगड किल्ल्याला । शिवाजी महाराज जाऊन तक्तावर बसले ॥ ज्यानें वात लावूनी । जात शोधाया लागले ॥ " सिंहगड किल्ला घेणें । मला कोणी उमराव दिसेना " ॥ प्रहर रात्रीपासूनि । बाराचा अंमल झाला ॥ प्रतापगडाखालीं । उमराठ्या गांवाला ॥ ज्यानें उमराव शोधिला । माझा तान्या मालुसरा ॥ तानाजी सुभेदार । पन्नास माणसांचा सरदार ॥ शिवाजी राजाचे राज्यास । ऐसा उमराव होणें नाहीं ॥

---

१ नड, अडचण. २ तीनही फांसे जोडले. ३ फांशाच्या खेळांतील एक दान. ४ रांग.

किल्ला घेईल सुभेदार । तानाजी सुभेदार ॥ खरखर लखोटा लिहीला । ज्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ " जावें उमराठ्या गांवाला । तानाजी सुभेदाराला ॥ तीन दिवसांचा वायदा जो केला । बारा हजार फौज ती घेऊन भेटावें तिसऱ्या दिवसाला " ॥ ६ ॥

पंतोजी तो काका । ज्यानें लखोटा घेतला । गेला उमराठ्या गांवाला ॥ सवा प्रहर दिवस आला । तानाजी सुभेदार राजा सदरेला[1] बैसला ॥ जासूद महाराजांचा पाहिला । तानाजी सुभेदार सुखी झाला ॥ पोटीं रायाबा तो बेटा । स्वयंवर बाळाचें मांडिलें ॥ काढल्या पंचमीच्या हळदी । काढलें षष्ठीचें लगिन ॥ लगिन बाळाचें मांडिलें । आली सिंहगडची कामगिरी ॥ मामा बोलाया तो लागला । ऐशीं वर्षांचा म्हातारा ॥ " लगिन राहिलें रायाबाचें । तोड मजला सांगावी ॥ माझ्या तानाजी सुभेदारा । जे गेले सिंहगडाला ॥ त्याचे पाठिरे पाहिले । नाहीं पुढारे पाहिले ॥ ज्यानें आंबा रे खाईला । बाठा[2] बुरजा[2] लाविला[2] ॥ त्याचें झाड होऊनि आंबे बांधले । किल्ला हातीं नाहीं आला ॥ सिंहगड किल्ल्याची वार्ता । काढूं नको तानाजी सुभेदारा ॥ जे गेले सिंहगडाला । ते मरूनशानी गेले ॥ तुमचा सपाटा[3] होईल " । " असें बोलूं नको रे मामा ॥ आम्ही सूरमर्द क्षत्री । नाहीं भिणार मरणाला " ॥ ७ ॥

" अरे फलाणाचे[4] फलाणा[4] । घाव घाला निशाणा " ॥ बारा हजार लोक बिनहत्यारी । हा तें सैन्य बोलाया लागलें ॥ " बिनहत्यारी लोक । कसे जाऊं महाराजांचे भेटिला " ॥ बारा हजार लोक बिनहत्यारी आले ॥ आंकड्या कोयत्या त्या कमरेला । टापसीच्या[5] खोळा डोईवर घेतल्या ॥ हातीं सोटा घेऊन । सलाम त्यांनीं केला सुभेदाराला ॥ माझे तानाजीची हिम्मत । म्हणून मिळाली जमात[6] ॥ ज्यानें पेटारा उघाडिला । बारा हजार रुपया बाहेर काढिला ॥ बारा हजार मनुष्यें । त्यांचे हातांमधिं दिला ॥ " दाढी डोई रे करावी । चिरी मिरी रे घ्यावी ॥ चला महाराजांचे भेटिला । राजगड किल्ल्याला " ॥ ८ ॥

---

१ सभेंत. २ कोय रुजत घातली. ३ नाश. ४ अमक्याच्या अमक्या. ५ डोईस बांधावयाच्या फडक्याच्या. ६ जमाव.

हिरव्या बुरजावरून । जिजाबाईनें पाहिला ।। "माझ्या शिवाजी महाराजा । गलीम वैरियाचा आला ।। तोफांला आग घाला । गलीम[1] मारावा किल्ल्या-खाला" ।। शिवाजी महाराजानें । गलिम नजरेनें पाहिला ।। तो शिवाजी महाराजाचा । भगवा झेंडा ओळखिला ।। "माझे जिजाबाई माते । आमचा तानाजी सुभेदार आला" ।। नांव घेतलें सुभेदाराचें । बाई गदगदां हांसली ।। सेना तानाजीची पाहिली । मनांत संतोषित झाली ।। ९ ।।

बारा हजार फौज घेऊन । सुभेदार दरवाजाला आला ।। पांचव्या सदरेमधीं । महाराज शिवाजी बैसले ।। सुभेदार सलामाला गेला । महाराजावर धुसा केला ।। "माझ्या बेट्याचें लगीन तुम्हीं जासूद धाडिला । तुमचा काय वाद केला" ।। "ऐक तानाजी सुभेदारा । आमची कामगिरी नव्हे तुम्हाला ।। जिजामातेनें बोलाविलें" । दोघांचा जबाब जिजाबाईनें ऐकिला ।। जिजाबाई बोलाया लागली । "मी जातीनें बाईल ।। आतां सुभेदार येईल । माझी अबरू घेईल" ।। १० ।।

सर्व शृंगार नटली । धांवा अंबाबाईचा मांडिला ।। "भले भले अंबाबाई । तानाजी सुभेदार आला ।। इच्छेप्रमाणें होऊं दे" । सिंहगड किल्ल्याची पंचारती केली ।। गेली सुभेदाराला ओंवाळायाला । "तुझे जाऊं, अलाबला[2] ।। तानाजी सुभेदारा । चढत्या दवलतीचें राज्य येऊं दे तुला" । सुभेदाराला ओंवाळितां । त्याचा राग निघून गेला ।। "माग माग जिजाबाई । जें मागशील देतों तुला" ।। "काय मागूं सुभेदाराला । ह्या म्हातारपणीं सिंहगड किल्ला ।। घेऊन द्यावा मला । आयुष्य मागेन तुझ्या राजाला ।। माझा शिवाजी थोरला माझा तानाजी धाकटा । लेकाचें वाण दिलें त्याला" ।। ११ ।।

तानाजी सुभेदार गेला । शिवाजीच्या मुजऱ्याला ।। "आम्ही जातों सिंहगडाला । आमचा रायाबा संभाळा ।। जर आलों सिंहगडाहून । लगीन करीन रायाबाचें ।। जर गेलों तिकडे मेलों । लगीन करा रायाबाचें" ।। सुभेदार तेथून निघाला । आला बाईचे भेटीला । "माझे जिजाबाई माते । माझ्या बाळाला सांभाळा" ।। तानाजी सुभेदार । बारा भोयांचे पालखीमधिं बसला ।। गेला खामगांवाला । पांचकर्णाचा बाजा[3] केला ।। गेला सिंहगडच्या पोटाला । तेथुनि कर्णा बंद केला ।। १२ ।।

---

१ लुटारू. २ इडापिडा, संकट. ३ वाद्यध्वनि, गजर.

गलीम आनंदी बारीला । दबा दिला भला । माझ्या शेलार मामानें । काळी घोंगडी हांतरिली । विडे पैजेचे मांडले । "ज्यानें विडा उचलावा । त्यानें जावें सिंहगडच्या माहितीला । माहिती काढून येईल त्याला । छत्री घोडा इनाम त्याला । बारा गांव इनाम देईन त्याला" । ज्या वीरांच्या वरती माना । त्यांनीं खालती घातल्या । हात कोणी लाविना विड्याला । तानाजी सुभेदार भला । त्यानें हात विड्याला घातला । विडा मंदिलीं[1] खोंविला ॥ १३ ॥

तानाजी सुभेदार त्यानें पोषाख काढिला । पाटलाचा थाट केला । जंगल लागलें दारुण । वेळु करकरां वाजती । लागलें चिंबारीचें रान । लागलें आळवीचें रान । आरीबोरीचें दारुण । वाट नाहीं रे जावयाला । काळोखी रात्र । वाट नाहीं रे जावयाला । वन धुंडाया लागला । वाट मिळेना जावयाला । सुमार पाहाया लागला । वा॑रे बोर्डीवर चढला । गेला कोळ्याचे ग्याटाला[2] । बाराजण कोळी होते पहिल्या ग्याटाला । त्यानें सुभेदार पाहिला । "मारा मारा ह्या चोराला" । सुभेदार बोलाया लागला । "चोर असलों ठार मारा । साव असलों तर काय मारतां । जरा बत्ती तुम्हीं लावा । यावें मला पाहावयाला" ॥ १४ ॥

पहिल्यानें सरदार पाहिला । "धन्य याची नारायणा । कोण तुमचें नांव गांव । येवढें सांगावें आम्हांला" । "मी साखरेचा पाटील । गेलों होतों पुण्याला । मंडईच्या वाड्यांत । गेलों होतों पट्टी लावायाला । जात होतों घराला । तेथें वाघानें आडविला । तुमच्या आलों आश्रयाला । भले भले रे दादांनो । घाईनें निघालों । पान खायाला विसरलों । पान द्यावें खायाला" । "ऐक ऐक दादा । ह्या बारा वर्षांमधीं पान खाल्लें नाहीं" । बटवा खाकेचा सोडिला । यानें विडे जे काढिले । बारा त्या कोळ्यांला । यानें बारा विडे दिले । अफु माजुमाचे[3] विडे कोळ्यांला दिले । कोळी झिंगूनशानी गेले ॥ १५ ॥

बारा बाराजण कोळी । पहिल्या दरवाज्याचे गेटकरी[5] । "बारा असामींचा कोण सरदार सांगावा" । "आहे मी खंडोजी नाईक बारांचा सरदार" । "ऐक खंडोजी नाईक । तुमची तैनात[4] सांगावी" । "तीन रुपयांची तैनात । मला सरदाराला मिळती" । ह्यानें कंठी जी काढिली । दिली

---

१ फेट्यांत. २ पहाऱ्याला. ३ भांगेच्या वड्या घातलेले. ४ पगार. ५ पहारेकरी.

खंडोजी नायकाला । ज्यानें तोडा जो काढिला । दिला विठोजी कोळ्याला । चौकडा काढिला । दिला मालोजी कोळ्याला । बारा कोळ्यांला बारा । ऐशा वस्ता त्यानें दिल्या । कोळी फितूर ते केले । ऐक ऐक पाटीलबोवा । मोठ्या वस्तू आम्हांला जिरतील कशा । काम सांगा आम्हांला" । "काम तुम्हांला सांगेन । भाक द्यावी रे मजला । इमान ज्यानें दिलें" । कोळ्यांनीं इमान दिलें । "मी आहें कोणाचा कोण । नांव सांगतों रे तुम्हाला । राजा शिवाजीचा उंबराव । आहें मी तानाजी सुभेदार । पन्नास माणसांचा सरदार । आहें मी एकला । आलों सिंहगडच्या माहितीला । लांबी रुंदी सांगा मला" ॥ १६ ॥

नांव घेतां शिवाजीचें । कोळी घालती बसले । "ऐक ऐक तानाजी सुभेदारा । शिवाजीचें कुत्रें नाहीं येत सिंहगडाला" । ज्यानें वस्ता घेतल्या । त्यानें सुभेदाराच्या पुढें ठेविल्या । "घे रे सुभेदारा । आल्या वाटेनें जावें राजगड किल्ल्याला" । "ऐक खंडोजी नाईका । इमान तूं रे मला दिलें । द्यावी सेजेची बाइल । पण इमान देऊं नये" । येवढ्या जबाबावरून । कोळी सांगायाला लागला । "ऐका सिंहगडची माहितीं । तिन कोसांचा आहे बा घेरा । दिडकोसाची आहे बा रुंदी । आहे अठराशें पठाण सिंहगडाला । उगवत्या बाजूला । कडा आहे दोणागिरी । तेथें आहे सोलाची[१] जागा । दोणागिरीच्या कड्याला ॥ १७ ॥

बसावें सरदारांनो । जातों आपल्या गोटाला[२] । बाराजण कोळी चरण धरुन । तुम्हीं काय सांगतां आम्हांला । त्या मर्दाला पाहून । कोळी रडाया लागले । "शिवाजीच्या राज्यांत कोणी । तुज सारखा सरदार नाहीं पाहिला" । "भिऊं नकोरे दादांनो । हा किल्ला हातीं आला तर ह्या किल्ल्याची सरदारी देईन तुम्हांला । हजाराची तैनात देईन । बारा आसामींला" । तानाजी सुभेदारानें दिला हातचा लखोटा । त्या खंडोजी कोळ्याला ॥ १८ ॥

सुभेदार तेथुनि निघाला । आला आपल्या फौजेला । ज्याचा शेलार तो मामा । त्याच्या पुढें धांवत आला । "तुम्हीं गेला सिंहगडला । नवस केला बहिरोबाला । माझा सुभेदार येऊं दे । बारा बकरे देईन तुला । तुम्हीं चला हो किल्ल्याला । जातों नवस फेडायाला" ॥ "ऐक ऐक शेलारमामा बारा

१ सांखळी लावण्याची. २ तळाला.

द्यावयाचे ते चोवीस देऊं । पण किल्ला येऊं दे हाताला " । " बहिरोबा आहे ओंगळ[1] । त्याचा नवस पाहिजे फेडला " । " ऐक ऐक शेलारमामा माझ्या महाराजाचें देणें । अढळ पदीं सोनें । नाहीं आह्मी बहिरोबा जाणित । साडेतिनशें देव पाणी रांजणांत भरतात । ऐसा शिवाजी महाराजा । आहे तळ कोंकणचा राजा " ॥ १९ ॥

" चला माझे दादांनो " । हुकूम सैन्याला केला । बारा हजार फौज गेली । कल्याण दरवाजाला । ज्यानें पेटारा उघडिला । काढिली यशवंत घोरपड । सात शेर शेंदुर । तिच्या मस्तकीं थापिला । भांग मोत्यांचा भरला । चरणीं मस्तक ठेविलें । सांखळी कमरेला बांधिली । यशवंत घोरपड ज्यानें किल्ल्याला लाविली । अर्ध्या किल्ल्याला गेली । घोरपड माघारी परतली । आउक्ष[2] तानाजीचें समजली । घोरपड फिरली ती सुभेदारानें पाहिली । " सत्तावीस किल्ले मीं घेतले । घोरपड कधीं मागें नाहीं फिरली " । राग आला त्या मर्दाला । " मी आहें मराठ्याचा पोर नाहीं भिणार मरणाला । एक हात टाकीन । अठरा खांडोळीं पाडीन शिळ्या भाकरीसंगें खाईन " । त्या मरणाचे धास्तीनें । सात वेढे जी फिरली नखें रोंवून बसली ॥ २० ॥

अरे फलाणाचा फलाणा । घाव घाला निशाणा । घस्त आली मोगलाची । त्यानें कानोसा घेतला । हांक मारिली गेटाला । खंडोजी नायकाला । " किस्का गलबला मेरे भाई । एवढा सांगावा आम्हांला " । खालून कोळ्यानें जबाब दिला । " जंगलमें धनगराचा वाडा । त्यामध्यें बडा वाघ शिऱ्या । गाईकी बचडी[3] खाते । रांड पोर किचाड[4] करते । वरती सुखी राज्य करा " ॥ २१ ॥

सुभेदार बोलतो सेनेला । " पहिली सोल शिवाजीमहाराजांची । दुसरी सोल[5] अंबाबाईची । तिसरी सोल तानाजी सुभेदाराची " । पट्टे घेतले तोंडामधीं । सोल धरली हातांमधीं । आपल्या बेताचे माणुस पन्नास मोजीले । सुभेदार गडावर चढले । पन्नास कमी बारा हजार फौज खालीं होती त्यानें एकच गर्दी केली । सूर्याबा जो बंधु । त्यानें एकच गर्दी केली । " दादा वरती गेला " । बारा हजार फौजेनें हात सोलाला घातला । तीन पुरुष वरती गेले । सोल मधींच तुटली । पन्नास कमी बारा हजार । फौज धरणीवर पडली ॥ २२ ॥

---

१ रागीट. २ आयुष्य. ३ वासरूं. ४ ओरड. ५ जाड दोरी.

"काय सांगू सुभेदारा। सोल ते तुटली आली मरणाची वेळा"। सुभेदार बोलाया लागला। "नाहीं सोल रे तुटली माझें आयुष्य तुटलें। ऐक ऐक शेलार मामा। माझ्या रायाबा बेट्याला रामराम सांगा"। शेलार मामा बोलतो। "ऐक ऐक मी तुला एक तोड सांगतों। आहे अठराशें फौज। किल्ल्याला अठराशें पठाण। आहे उदेभान मोंगल। आहे सिद्दी तो हिलाल। आहे चंद्रावळी हत्ती। उडी टाका किल्ल्याखालीं। म्हणजे पहायाला नको"। "भला भला शेलारमामा। उडी टाकिली तरी प्राण जायाचा। पन्नास माणसाचा सरदार। सत्तावीस किल्ल्यांचा मी सरदार, नाहीं भिणार मरणाला ॥ २३ ॥

गेले पहिले दरवाजाला। ज्यानें दिंडीनें पाहिला। होती आरबाची जात। होती मोगलाची जात। होती मुसलमानाची जात। अफु माजुम खाल्ली। मदनमस्त झाली। ज्यानें डाव जे मांडिले। कोण बारा बारा बोलती। कोण ग्यारा ते बोलती। ह्यानें एकच गर्दी केली। खणाखण वाजिती। व्हाळ[1] आसुदाचे[2] वाहती। रक्त अंगाला लागलें खुन डोळ्याला चढला। कोण करितो खुदा खुदा। बुधा[3] धरणीला पडला। कोण करितो अल्ला अल्ला। खालीं काला[4] तो पडला ॥ २४ ॥

पहिला दरवाजा मारिला[5]। गेला दुसऱ्या दरवाजाला। काळोखी रात्र पार[6]। रात्रीचा अम्मल झाला। दुसऱ्या दरवाजाला होता। तिनशें पठाण ज्यानें दीन[7] दीन वाहिला[7]। मुसलमानी लोक दादा। बिनफिकीर होते। नाहीं गलीमाची माहित। तानाजी सुभेदार जैसा ठाणांत। वाघ लोटला सेनांत। पांच पट्ट्याचा मारा केला। सवा घटकेमधिं तिनशें पठाण कापिला। गेला तिसऱ्या दरवाजाला। होता चारशें पठाण। दीन दीन ज्यानें वाहिला। चारशें पठाण कापिला। एकंदर हिशेब नऊशें मनुष्यांचा झाला ॥ २५ ॥

"ऐक शेलार मामा। गलीमाचा हिशेब घ्यावा। एक ह्यानें कमी। नउशें पठाण झाला"। त्यांत बोंब्या[8] निघून गेला। उदेभान मोंगलापाशीं गेला। "मेरे उदेभानभाई आग लागो तुझ्या चोऱ्याला[9]। सिंहगड किल्ला डुब[10] होया"। "हम चोन नाहीं सोडताई। जा पिराच्या दरग्याला। सांगा

---

१ ओहळ. २ रक्ताचें. ३ वीर-पुढारी. ४ रक्तमांसांचें मिश्रण. ५ जिंकला. ६ प्रहर, वेळ. ७ युद्धगर्जना केली. ८ हेर. ९ चैनीला. १० नष्ट.

सिद्दी हिलालाला। पांच हत्यारें घेऊन जावें। कल्याण दरवाजाला"। सिद्दी हिलाल भला। ज्याच्या नऊजणी बिब्या पलंगा निजायाला। चोन कराया लागला। लाखोटा मोगलाचा दिला। सिद्दी हिलालानें। त्यानें वाचून पाहिला। "सिंहगड किल्ल्याला गलीम बहुत आला। तुम्हीं जावें लढायाला"। सिद्दी तो हिलाल पांच पोषाग नटला। दोहीं हातांत दोन पट्टे नऊजण बिब्या हारोहारींनें उभ्या केल्या। ज्यानें पहिला हात टाकिला। अठरा खांडोळीं पाडिलीं। आसुदाचा टिळा त्याला। उमराव तेथून निघाला सुभेदारापाशीं आला ॥ २६ ॥

"सलाम सलाम मेरे भाई। किस्का तूं उमराव ऐसा सांगावा मजला"। "उमराव आहे शिवाजीचा। मी तानाजी सुभेदार"। "ऐक कुळंब्याच्या पोरा। पागोट्याच वेढे घाल गळ्यामधीं शरण यावें सरदाराला"। सुभेदार त्याला बोलता झाला। "ज्यावें तोंडांत तृण, ज्यावी डोईवर वाहण, शरण यावें सुभेदाराला। पहिला हात येऊं दे तुझा सिद्दी तूं हिलाला"। पहिला हात जो टाकिला सात हात जमीन उडाला। हातांमधीं हात त्यानें अठरा टाकिला। सुभेदार गुंजभर नाहीं ढळला। "अरे सिद्दी तूं हिलाला। दुसरा हात येऊं दे तुझा"। सुभेदार बोलला "संभाळ संभाळ मेरे भाई। आतां हात येतो सुभेदाराचा"। नऊ हात जमीन उडाला। मारा सुभेदारानें केला। बत्तीस वेढे पागोट्याचे। बत्तीस वेढे मंदिलाचे। बेंबीपावेतों चिरित नेला। खुदा खुदा रे बोलला। बुब्या धरणीवर पाडिला ॥ २७ ॥

तेथून बोंब्या निघून गेला। उदेभानाच्या जवळ आला। "मेरे उदेभान भाई आग लागो ह्या चोन्याला। सिंहगड किल्ला डुब होया। नउशें पठाण काट्या। बाच्छाईचा हत्ती काट्या। सिद्दी हिलाल काट्या। तुम्हारे बारा लडके काटया"। लडक्याचा तो जाब ह्याच्या कानावरतीं गेला। उदेभान तेथुन निघाला। आला पिराच्या दरग्याला। फोडल्या कापसाच्या उदी[1]। ओतले तेलाचे बुधले। ज्यानें आग जी लावली। ज्यानें उजेड तो केला। गलीम किती मोजून पाहिला। पन्नास माणूस ह्याच्या आले हिशोबाला। उदेभान माणूस पाहून। त्याच्या भुजा ज्या थरारल्या। पन्नास माणूस माझी आंबाडाची भाजी। मोगल मागें परतला। गेला आखाडखान्यामधीं[2]। पायीं तुमानी सुरवारा घातल्या। अठरा खंडीचे किनखाप[3] त्यानें आंगांत घातलें। बारा आतवडीचा[4] जोडा। त्यानें पायांमधीं घातला। ज्यानें

१ उदवी, गंजी. २ शस्त्रागारांत. ३ जरीच्या वेलबुट्टीचें रेशमी कापड. ४ कातड्याचा.

वाघनखें चढविलीं । जिरेटोप डोईस घातला । अठरा जागीं बिब्या । हारोहारीनें उभ्या केल्या । सळ[1] पटयाचा सोडिला । अठरा बिब्यांचीं खांडें केलीं । आसुदाचा टिळा ल्याला । गाभणीगाई जो काटली । गेला पिराच्या दरग्याला । सवामण उद जाळिला । एका हातीं गुरदा[2] एका हातीं घेतला पट्टा । दोपट्टयाचा मारा केला । आला कल्याणदरवाज्याला । ज्यानें सलाम वाहिला । दादा नउशें पठाण । ज्यानें दिमतीला घेतला ॥ २८ ॥

"सलाम सलाम मेरे भाई । उंबराव किस्का सांगावा मजला" । "उंबराव शिवाजीमहाराजाचा । आहें मी तानाजी सुभेदार" । उंबराव मोंगलानें पाहिला । ऐसा भला आहेस रे दादा । तुझ्यासारखा भाई पाठीला असावा । खाणें घालावें वजिराला वजीर पाळावा बाजूला । सोड महाराजांची चाकरी । कर माझी मोगलाची चाकरी । हवाला देतों सिंहगडाचा । हजार रुपयांची तैनात देतों बसून खायाला" । सुभेदार बोले मोगलाला । "सोड सिंहगडाची गादी । चल माझ्या राजगड किल्ल्याला । चलावें महाराजाचे भेटीला । राजगड किल्ल्याचा हवाला । उदेभाना देतों तुला" । एवढ्या जाबावरून । घुस्सा आला मोगलाला । "पहिला हात येऊं दे तुझा" । "उदेभान हात येऊं दे तुझा" । तानाजी सुभेदार धांवा अंबेचा मांडिला । "धांव धांव अंबाबाई" । अंबा त्या बाईनें घोस[3] गाईचा पाहिला । देवी मागें जी सरली । मोगलासमोर उभारिला । गर्भगाळ कोसळला । नऊ हात जमीन उडाला । मोगलाला माराया गेला । हातामधीं हात ज्यानें अठरा टाकिले । गुंजभर नाहीं जो सरला । "ऐका उदेभान मोगला । पहिला हात माझा झाला । दुसरा हात येऊं दे तुझा" । सुभेदार बोलतो, "मामा ऐक निर्वाणाची वेळा । लग्न करा रायाबाचें । दोहों हातांचा मुजरा सांगा शिवाजी महाराजाला" । उदेभान मोगल बारा हात जमीन उडाला । वचक सुरबाईचा[4] दाविला मारा कैफाचा केला । पन्नास वेढे पागोट्याचे पन्नास वेढे मंदिलाचे बेंबीपावेतों चिरित नेला । सुभेदार धरणीला लोटिला ॥२९॥

पन्नास माणूस त्यानें रोजन्या[5] । मांडिल्या, "आमच्या सुभेदार धन्या । आम्हाला संभाळील कोण । आणलेंस वाघाच्या रानाला" । मग तो शेलार मामानें । मुर्दा मांडिवर घेतला । उदेभान बोलायाला लागला । "दादा आपल्या सेनेला । हातमी[6] नउशें पठाण । पन्नास माणूस घेऊन जावें । कल्याण

---

१ बंद. २ गदा. ३ मांस. ४ सुराबाईचा. ५ विलाप. ६ (हो तुह्मी ? हत मी ?).

दरवाजाला । आहुति द्यावी ह्यांची बुरजाला" । लोक खळखळा रडती "कैसें झालें नारायणा" । दीन दीन पठ्यानें वाहिला मारायला लागला । सुभेदार मेलेला मुरदा इरयानें[1] झाला । ऐंशी वर्षांचा तो मामा त्याच्या आंगांत संचारला । यश आलें मोगलाला । मोगल मागें जात होता । मग तो सुभेदाराचा पट्टा । शेलारमामानें घेतला । "फीर ग मर्दाचे लंडे फीर ग मर्दाचे लंडे[2] । मोगल मागें पहात होता । दोहों हातांनीं कचका[3] दिला । बेंबीपावता चिरित नेला । खुदा खुदा बोलला । बुधा धरणीला पाडिला ॥ ३० ॥

नऊशें पठाण बोलाया लागला । "चला कल्याण दरवाजाला । आहुत देऊं पंचवीस माणसांची" । संकट पडलें अंबाबाईला । प्रतापगडची भवानी । उभी राहिली सांकड्याला । पिवळें पातळ नेसली । गळीं कवड्यांची माळा । संकट पडलें देवीला । यश जातें शिवाजी महाराजाचें । देवीनें आपल्या हातून दरवाजा उघडिला । पन्नास कमी बारा हजार फौज किल्ल्याला घेतली । ज्याचा सूर्याबा तो बंधु । मामाला पुसाया लागला । "शेलार रे मामा । माझा दादा रे कुठें आहे" । शेलार मामा रे बोलला । जरी मेलासे बोललों तर सारी फौज बसेल । "सुभेदार आहे बाले[4] सद्रेमधीं । मी आहें कल्याण दरवाजाला" । नऊशें पठाण मारावा । मग जाऊं दादाच्या भेटीला" । मग त्या बारा हजार फौजेनें । ज्यानें हर हर वाहिला । एका एकाच्या मागें तिघे तिघे लागले । नऊशें पठाण कापिला । पांढरें निशाण उपटलें । भगवा झेंडा शिवाजीचा । पांच तोफा जों मारिल्या । यशाच्या तोफा जों मारिल्या । त्या तोफांचा आवाज । गेला राजगड किल्ल्याला । शिवाजी महाराज बोलला । "माझ्या सुभेदारानें सिंहगड सही केला" । शिवाजी महाराजानें । यशाच्या दहा तोफा सोडल्या ॥ ३१ ॥

ज्याचा सूर्याबा तो बंधु । शेलारमामाला बोलला । "चला जाऊं दादाच्या भेटीला । चला जाऊं दादाच्या भेटीला" । शेलार मामानें सूर्याबा बंधूचे । पटे घेतले आपल्या हातामधीं । गेले मुर्दाचे जवळ । वरून शेला उघडिला । मुर्दा दादाचा पाहिला । मुर्दा सुभेदाराचा पाहिला । "माझ्या सुभेदार दादा, लग्न रायाबाचें राहिलं । ह्याचें लग्न करील कोण" । बारा गेटांचे कोळी निघाले । आले सुभेदाराजवळ । "आमचा सुभेदार धनी । आम्हांला तैनात देईल कोण । आम्हाला हवाला देईल कोण" । सुभेदार बोलायाला लागला । भिऊं नका रे दादांनो ह्या दादाचें वचन पुरें करीन । जातों राजगड

---

१ वीर्यानें. २ भ्याड. ३ वार, घाव. ४ बाले किल्ल्यांतील.

किल्ल्याला । सांगतो शिवाजी महाराजाला । सिंहगडचा हवाला देतों तुम्हाला " । अबिर गुलाल । ज्याचे मुर्द्यांत भरला । दोरा रेशमाचा घातला । मुर्दा पालखींत ठेविला । पंचवीस कमी बारा हजार लोक सगळे घेतले । वाजत गाजत मुर्दा गेला राजगड किल्ल्याला ॥ ३२ ॥

आले किल्ल्याचे पोटाला । पांचकर्णांचा बाजा केला । अवाज महाराजानें घेतला । सुभेदार किल्ला घेऊन आला । सुभेदाराची पालखी । नेली राजाचे सदरेला । शिवाजी महाराजानें । मुर्दा पाहिला सुभेदाराचा । शिवाजीचे राज्यांत ऐसा । उंबराव होणे नाहीं सुभेदारासारखा । जिजाबाई धांवत आली । पालखी पाहिली । गर्व आला सुभेदाराला । नाहीं आला भेटायाला । बाई पालखीपाशीं आली । बाईनें शेला उघडिला । मुर्दा सुभेदाराचा पाहिला । आंग धरणीला टाकिलें । सुभेदारासारखा । ऐसा क्षत्री होणार नाहीं ॥ ३३ ॥

बारा भोयांचे पालखींत । सुभेदाराचा मुर्दा जो घातला । वाजतगाजत आणला उमराठ्या गांवाला । ह्याचे लेकाचे भेटीला । पांचकर्णांचा आवाज । रायाबा बेट्यानें केला । रायाबा बोलतो । "बाबा आले माझे लग्नाला" । पालखीपाशीं धांवत आला । मुर्दा बाबाचा पाहिला । "साता दिवसांची मुदत । केली माझे लगनाला । बाबा माझें लगीन करील कोण । यजमान होईल बाबा कोण । मंडपांत मिरवेल कोण । आग लागो ह्यां लग्नाला । कां माझा बाबा निघून गेला" । शिवाजी राजानें । मुलगा पोटासंगें धरिला । "भिऊं नको माझे बेटा । शिवाजी महाराज तो गेला तान्हाजी सुभेदार आहे तुला" ॥ ३४ ॥

मग त्या तेराव्या दिवसांत । स्वयंवर बाळाचें तें मांडिलें । ज्यानें मंडप घातला । मंडपाला तोरण बांधिलें ॥ पहिली नवरी रद्द केली । कडाशींचे दरकाराची केली रायाला बेट्याला । पन्नास माणसांची सरदारी । दिली रायाबा बेट्याला । डोणचं तें गांव । दिलें पानसुपारीला । मालुसऱ्याचा दंड दिला इनाम खायाला ॥ ३५ ॥

तुळशीदास शाहिर । त्यानें सदरेला आणिला । डफ तुणतुणें घेऊन । मग त्या तान्हाजी सुभेदाराला । शिवाजी महाराजांचा । पोवाडा कटिबंध केला । त्या रे तुळशीदास शाहीराच्या । शूर मर्दाचा पोवाडा । शूर मर्दानें ऐकावा । शिवाजीचे राज्यांत । ऐसा उमराव होणें नाहीं । पोवाडा गात्याला उद्धाण[1] ऐक त्याला घडो पुण्य । सत्ययुगींचा पोवाडा कलयुगीं वर्तला । सत्तावीस किल्ल्यांचा सरदार निघूनशानी गेला । ऐसा पुनः होणें नाहीं ॥ ३६ ॥

---

१ मुक्ती.

# सामराज

**सा**मराजाचें रुक्मिणीहरण हें काव्य चालू शतकाच्या आरंभीं पहिल्यानेंच उपलब्ध झालें. अलीकडे मुद्गलाख्यान नांवाचें त्याचें दुसरें काव्यही सांपडलें आहे. भोसल्याच्या कुलपुरोहिताच्या वंशांत सामराजाचा जन्म झाला. गोत्र शाकल्य. बापाचें नांव लक्ष्मण व आईचें काशीबाई. कुलदैवत मुद्गल. या कवीचा जन्ममरणाचा काल मिळत नाहीं. सतराव्या शतकाच्या अखेरीला हा कवी झाला असावा. संस्कृत पद्धतीचें महाकाव्य लिहिण्याचा उद्देश पुढें ठेवून सामराजानें रुक्मिणीहरण रचिलें आहे. हें काव्य प्रथम वि. ल. भावे यांनीं १९०९ सालीं प्रसिद्ध केलें.

विशेष माहितीकरितां पहा :—रुक्मिणीहरण—सं. गो. वि. तुळपुळे; मुद्गलाख्यान—सं. गो. राजोपाध्ये ; रुक्मिणीहरणनिरीक्षण—प्र. धों. कानिटकर; सामराज—द. सी. पंगु.

## रुक्मिणी-हरण

इं० व०. संभार[१] देवी-पद-पूजनाचे । आणीत अध्यक्ष[२] वधूजनाचे ॥
आरंभिजे अर्चन अंबिकेचें । सौभाग्य[३] मोठें नृप-कन्यकेचें ॥ १ ॥

उ० जा०. कर्पूर-नीरांजन होय जेव्हां । सहस्र-घंटा-ध्वनि होति तेव्हां ॥
सुवर्ण-पुष्पांजळि वाहियेला । प्रणाम साष्टांग तयेस केला ॥ २ ॥

प्रदक्षिणा तीस करून आली । पुढें उभी सन्मुख राहियेली ॥
पुनः प्रणामांजळि जोडियेला । संपूर्ण पूजाविधि अर्पियेला ॥ ३ ॥

इं० व०. होऊन हा संभ्रम[४] जाय जेव्हां । बाहेर कोलाहळ होय तेव्हां ॥
तेणें तिचें व्याकुळ चित्त जालें । संदेह-सोपान चढों निघालें ॥ ४ ॥

उ० जा०. उठे त्यव्हां[५] तेथुन ते शहाणी । शिकेत जीच्या हरिणी पहाणी ॥
पुसोन सर्वांस असे निवाली । देवालयाबाहिर चालियेली ॥ ५ ॥

तों घाबरा होय भरोनि धापे । महाभयें ब्राह्मण फार कांपे ॥
तो तांतडी धांवत वृद्ध आला । म्हणे, "मुली, काय विलंब केला ! ॥ ६ ॥

---

१ साहित्य. २ मुख्य. ३ नशीब. ४ सन्मान. ५ तेव्हां.

व० ति०. पूर्वेकडील अणि दक्षिण पश्चिमेचे ।
राजे कितेक अति उद्धत[१] उत्तरेचे ॥
सन्नद्ध[२] शस्त्र-बळ-वाहन-युक्त होती ।
अंबालयाप्रति मिळोनि समस्त येती ॥ ७ ॥

ते आपले विविधभार रचीत राजे ।
जे भीमकी, तुजनिमित्त पडेत लाजे ॥
अत्याहित[३] प्रकट उत्कट मांडियेले ।
हें अंबिकानिलय येउनि वेढियेलें ॥ ८ ॥
हा द्वारका-रमण कृष्ण सहाय जेथें ।
कोणापसून उपजे भय तूज तेथें ॥
बाहेर तूं त्वरित येथुन जाय बाई ।
हे त्यापुढें नृपति केवळ जाण गाई ॥ ९ ॥

मालिनी. नरपति-समुदायीं नेणसी श्रीपतीला ।
त्वरित करुनि जासी आपुले व्युत्पतीला[४] ॥
सहज नृपसमाजामाजि जो देखणा गे ।
तदपि तुज तयाच्या सांगतों या खुणा गे ॥ १० ॥

मुर-रिपु[५] वळखें जो कंद नीळ्या नभाचा ।
उदय हृदय-देशीं होय तो कौस्तुभाचा ॥
परम विमळ जेथें वैजयंती विराजे ।
त्वरित वरिं तयातें सर्व टाकूनि राजे ॥ ११ ॥

शिखरिणी. ध्वजस्तंभीं ज्याचे खगपति[६] सदा राहत असे ।
भुजद्वंद्वीं तैसें अविरत गदा चक्र विलसे ॥
शिरीं पिच्छें वाहे, कटितटिस पीतांबर धरी ।
असा हा लक्षावा यदुपति जगन्नायक हरी ॥ १२ ॥

व० ति०. बोलोनि हें वचन विप्र सुदेवनामा ।
"स्वस्त्यस्तु ते" म्हणुन जात असे स्वधामा ॥
तेथेंच राहति उभ्या नरनाथनारी ।
रक्षीत जाति तिजला बहु वेत्रधारी ॥ १३ ॥

---

१ गर्विष्ठ, मस्त. २ तयार, सिद्ध. ३ दांडगाई, अत्याचार. ४ शहाणपण
५ कृष्ण. ६ गरूड.

व० ति०. माता म्हणे, "नृपसुते, परतोन पाहें ।
लोकांत हा विधि पुरातन उक्त[1] आहे ॥
धाडीन मी मुळ[2] दिवाळिस तूज बाई ।
हा प्राण होय मजला तुचवीण कायी ॥ १४ ॥

तो तों करील तुजला तळहातछाया ।
माझी कसी मज सुटे परि आजि माया ॥
वृत्तांत दूरिल कसा मजला कळे गे ।
या कारणें परम हा जिव जाकळे[3] गे ॥ १५ ॥

तूं आत्मजे, मज मनांतुन मोकलीसी[4] ।
जाऊं कसी स्वसदना परि एकलीसी ॥
ये कातरींत जिव आजि पडोन राहे ।
'माते' ह्मणोन तुजवांचुन कोण बाहे ॥ १६ ॥

हें आयकोन पृथिवी-पुरुहूत-पुत्री[5] ।
कोमेजली विकच-पद्म-पलाश-नेत्री[6] ॥
बाहेर ये तदपि धीर धरून बाळा ।
टाकी पदें हळुच कोमळ चारुशीला ॥ १७ ॥

दोहीं करीं सहचरींस धरून चाले ।
चालेत वीर अतिदूर धरून भाले ॥
दाटेत त्या निजसमीप अनेक दासी ।
ज्या सर्वदा वसति केवळ तीजपासीं ॥ १८ ॥

ते भीमकी सकळ-लोक-मनोभिरामा ।
वैकुंठनाथ-पद-पंकज-बद्ध-कामा ॥
सौंदर्यसार-रस-निर्मित मूर्ति जीची ।
उत्कृष्टता परम याहुन काय तीची ॥ १९ ॥

वक्त्रेंदु हा सहज सिंधु सुधारसाचा ।
याचा धरी नियत इंदु उधार साचा ॥
आहे असाच बहुधा अपवाद लोकीं ।
हा अन्यथा हरिण-लांछन कां कलंकी ॥ २० ॥

---

१ सांगितलेला. २ बोलावणें. ३ पोळे. ४ सोडिसी. ५ राजकन्या. ६ फुलल्या कमळाच्या पाकळ्यांसारखें डोळे असलेली.

व० ति०. अत्यंत निर्मळ अमोलिक ज्या अभुक्ता ।
सीमंत-सीम-पदवीस बसेत मुक्ता[१] ॥
साजे बरा बिजवरा तिजला ललाटीं ।
येकावळीयुत मनोहर हार कंठीं ॥ २१ ॥

शोभे तिचें मृदु भुजद्वय बाजुबंदीं ।
तें नीळ तेज झळके हृदयारविंदीं ॥
हातीं तिचे सहज रत्नजडीत चूडा ।
त्या मुद्रिका सकळ अंगुळिकाधिरूढा ॥ २२ ॥

आकर्ण विस्तृत तिच्या विलसेत दृष्टी ।
तन्मध्य हा सहज सुंदर माय मुष्टीं ॥
तीचा महा रुचिर नाभि गभीर शोभे ।
वक्त्रांबुजीं परम षट्पदवृंद लोभे ॥ २३ ॥

ते भीमकीस सिसफूल शिरीं विराजे ।
नाकीं तिचे अति मनोहर मोर साजे ॥
पायीं तिचे जडित-नूपुर-युग्म वाजे ।
तीचे गतीस गगनीं गजराज लाजे ॥ २४ ॥

इंद्रवंशा. जे देवमाया वर-वीर-मोहिनी । व्यंजत्स्तनी जे कलहंस-गामिनी ॥
श्यामा नितंबार्पित-रत्न-मेखळा । पायीं जिचे शोभति हेमशृंखळा ॥२५॥

उ० जा०. कृशोदरी कुंडलमंडितेक्षणा । शुचिस्मिता सुंदरि जे सुलक्षणा ॥
जे पक्व-बिंबीफळ-सोदराधरा । ते होय वीरां मग दृष्टिगोचरा ॥ २६ ॥

व० ति०. व्रीडावलोकन[२]-विमिश्र तदीय हासा ।
देखोन ते पडति वीर मनोज[३]-फांसां ॥
उत्साह जे बहुत थोर धरून आले ।
राजन्य[४] ते परम मूर्च्छित सर्व जाले ॥ २७ ॥

हस्तांबुजींहुन गळोन पडेत शस्त्रें ।
चित्रांपरी धरिति भूषण आणि वस्त्रें ॥
यानांवरून कितियेक पडेत खालें ।
येकायकीं नृपतिमंडळ मुग्ध झालें ॥ २८ ॥

---

१ मोतीं. २ सलज्ज पहाणें. ३ मदन. ४ राजे.

व० ति०. जों पावलें सकळ राजक[१] हे अवस्था ।
तों चालिली सहज तेथुन पद्महस्ता ॥
कृष्णार्पण प्रकट देह करूनि राहे ।
ते भीमकी भगवदाप्तिस[२] इच्छिताहे ॥ २९ ॥

वारून वामकरजीं अलकांस बाळा ।
तैसें अपांगविशिखीं अपरां नृपाळां ॥
आलोकिते सादर अच्युतातें ।
सव्रीड[३] साचिवदना[४] पुरुषोत्तमातें ॥ ३० ॥

तें सांवळें सगुण ब्रह्म कृपाकटाक्षीं ।
सस्मेर[५] तन्मुखसरोरुह हें अवेक्षी ॥
दृष्टीस दृष्टि जंव नीट मिळोन गेली ।
ते भीमकी हळुच त्याजसमीप आली ॥ ३१ ॥

कीं चक्रवाक-रमणीच वियुक्त जाली ।
ते चक्रवाक उमगीतच काय आली ॥
कीं मानसा[६] त्यजुन मानस-राजहंसी ।
आसक्त हे परमहंस-कुळावतंसीं ॥ ३२ ॥

कल्पद्रुमाजवळि जंगम[७] कल्पवल्ली ।
कीं येइ हे हळुच चालत पायचाली ॥
कीं चातक-प्रणयिनीच निदाघ-तप्ता[८] ।
धांवोनि ये नव-घनाभिमुख तृषार्ता ॥ ३३ ॥

किंवा त्यजून विषयांकुर-मात्र-चारा ।
मेध्या[९] मृगी अनुसरे निज कृष्णसारा ॥
किंवा महोदधि गवेषित येइ गंगा ।
कीं भेटली रतिच येउनि या अनंगा ॥ ३४ ॥

---

१ राजांचा समुदाय. २ ईश्वरप्राप्तीस. ३ विनययुक्त. ४ अधोमुख. ५ सहास्य. ६ मानससरोवर. ७ फिरणारी. ८ उष्णानें तापलेली. ९ यज्ञांतील.

व० ति०. हे भीमकी सहचरींसहित त्रिवेणी ।
प्रत्यक्ष हा वटमही-रुह[१] चक्रपाणी ॥
जेणें सुटे सहज हा भवबंध राया ।
तो तीर्थराज प्रकटे जग उद्धराया ॥ ३५ ॥

तत्काळ इंद्रिय-पराङ्मुख वृत्ति जाली ।
श्रीकृष्णमूर्ति हृदयीं विवरों निवाली ॥
हारोन जाय मकरध्वज-कोटिशोभा ।
पाहे न्यहाळुन तया मग पद्मनाभा ॥ ३६ ॥

उ०जा०. चतुर्भुज श्यामळ-रूपधारी । जो शंखचक्राब्ज गदा उभारी ॥
उभा असे जो रण-भूमि-भागीं । घेऊनियां चंदनऊटि अंगीं ॥ ३७ ॥

कंठस्थळीं कौस्तुभ दिव्य भासे । मुखेंदु सानुग्रह मंद हासे ॥
उत्फुल्ल-कंजोपम[२] नेत्र दोन्ही । ते कुंडलें हो झळकेति कानीं ॥ ३८ ॥

ते साजिरी उन्नत नींट नासा । शोभा महा भ्रू-लतिकां विलासां ॥
टिळा ललाटीं निट केशराचा । तो बिंदु शोभे वरि कस्तुरीचा ॥ ३९ ॥

धम्मिल्ल[३] शोभे मृदु कुंतलांचा । संवेष्टिला हार असे फुलांचा ॥
किरीट माथां जडित प्रकासे । रत्नावतंस-द्युति हे विकासे ॥ ४० ॥

हीरांगदें शोभति बाहु-दंडीं । रत्नीं कडीं हे खचितें उदंडीं ॥
उद्योत[४] तो उत्कट ऊर्मिकांचा[५] । प्रकाश जेथें पडला नखांचा ॥ ४१ ॥

पाहातसे विश्वमनोभिरामा । कदा न पावेच विराम रामा ॥
जो हारि हा दुर्लभ योगियांला । प्रत्यक्ष तो दर्शन-लाभ जाला ॥ ४२ ॥

मिळे शशांकास[६] अहो विशाखा[७] । किंवा अशोका सहकार-शाखा ॥
हे साधकासन्निध सिद्धि आली । किंवा विरक्तान्वित शांति जाली ॥ ४३ ॥

व० ति०. जाला इला चरण-दर्शन-लाभ जेव्हां । प्रेमार्द्र-लोचन यदूद्वह होय तेव्हां ॥
तिर्यङ्मुखी सभय लज्जित फार जाली । कृष्णास ते नमनपूर्वक माळ घाली ॥ ४४ ॥

---

१ वृक्ष. प्रयागतीर्थावर जेथें त्रिवेणीसंगम आहे तेथें वटवृक्षावर पिंड दिला असतां मुक्ति मिळते अशी कल्पना आहे. २ फुललेल्या कमलासारखे. ३ केशसंभार. ४ प्रकाश. ५ आंगठ्यांचा. ६ चंद्रास. ७ एका नक्षत्राचें नांव.

शिखरिणी.

सख्या दोघी तीच्या सहज मग मागें परतती ।
निजा सौजन्याचा निरवधिक निर्वाह करिती ॥
अहो, जन्मा आल्या उचित बहुधा हेंच इतुकें ।
करावें हें तेणें नियत उरके ज्यास जितुकें ॥ ४५ ॥

न देखे वैदर्भी जवळिं सखियांतें सुनयना ।
नवोढत्वें[१] लाजे, किमपि परते हंसगमना ॥
जयाचें हें ईणें सहज फिरतां चित्त हरिलें ।
तया या श्रीरंगें त्वरित पदरीं तीस धरिलें ॥ ४६ ॥

पृथु-श्रोणि-श्रांता[२] उदित-मदना स्विन्नवदना[३] ।
महाभाग्यें जाली सफळनयना कुंद-रदना ॥
सुशीळा तन्वंगी पदरिं धरितां जे दचकली ।
कृपाळें गोपाळें त्वरित चहुं हातीं उचलिली ॥ ४७ ॥

रथीं वाहे बाहे धरुन जगदाधार जिजला ।
तयेचीही लज्जा तदपि न विसंबेच तिजला ॥
रथारूढें कृष्णें शिथिल भुजबंधें कवळिली ।
कृशांगी सत्कारेंकरुन निज-अंकीं बसविली ॥ ४८ ॥

पतिप्रेमाचें ये हृदय-कमळीं थोर भरतें ।
तयाचें हें देहीं प्रकट उमटे चिन्ह वरतें ॥
प्रकर्षें हर्षाच्या कृश-तनु अकस्मातच फुगे ।
त्यव्हां त्या सत्वाचे अनुभव कसे राहति उगे ॥ ४९ ॥

कपोलीं बाळेच्या अपरिचित रोमांच उठती ।
तयेचे चोळीचे सकळ नवदाणे[४] उतटती[५] ॥
गळा दाटे भारी, सहज सलिलें नेत्र भरले ।
महर्घाचे घर्मोदक-कण मुखचंद्रीं[६] उमटले ॥ ५० ॥

---

१ नुकतेंच लग्न झालें असल्यामुळें. २ स्थूल जघनामुळें श्रमलेली. ३ घाम आलेल्या मुखाची. ४ शिवण. ५ ताणल्यामुळें उसवतात. ६ येथें 'मुखाब्जीं' असा शब्द योजल्यास छंदोभंग टळतो.

शिखरिणी. जनाच्या सौभाग्यें प्रकृति-पुरुषां योग घडला ।
अनेकां वीरांचा प्रबळतम उन्माद झडला ॥
समस्तां भक्तांचा नयनगत हा पांग फिटला ।
प्रपंचाविष्टांचा सहज हृदय-ग्रंथि सुटला ॥ ९१ ॥

दमाम्याची[1] घाई तदुपरि उठे हे चहुंकडे ।
प्रसादें वाजेत त्रिदश-नगरींचे चवघडे ॥
विमोक्ता बंधाचा यदुपति इणें कृष्ण वरिला ।
फुलांचा हा माथा सुरतरु फुलांनींच भरला ॥ ९२ ॥

प्रतापें श्रीकृष्णें त्वरित हरिली प्राणदयिता ।
मिळाल्या तेथेंही सकल सुरदिग्पालवनिता ॥
तयां त्या दोघांतें विविध कुरवंडींस करिती ।
प्रणामांतीं ज्यांला घडति निज नीरांजन रिती ॥ ९३ ॥

विनीतत्वें ब्रह्मादिक सकळ बद्धांजळि उभे ।
प्रभावें गर्जेत प्रमुदित महा यादव शुभें ॥
पहाया हे येती अगणित वसिष्ठादिक मुनी ।
जयांची हे जाली अतिशयित दाटी प्रणमनीं ॥ ९४ ॥

न पाहे वैदर्भी अतिशयित वित्फुल्लवदना ।
निघाली दैवाची नृपकुमरि लावण्यसदना ॥
मुखश्रीनें जीचे सकळहि दिशा या उजळती ।
धरित्रीचे राजे निखिल हृदयामाजि जळती ॥ ९५ ॥

भुकेला भक्तीचा हरुन तिजला होय विजयी ।
धरावी हे त्याची त्वरित बरवी मूर्ति हृदयीं ॥
निजां भक्तांसाठीं यदुपति कसा धांवत असे ।
त्रिलोकीमध्यें ये सदय दुसरा याहुन नसे ॥ ९६ ॥

(रुक्मिणी-हरण—सर्ग ८)

---

१ मोठा नगारा.

# श्रीधर

श्रीधर हा पंढरपुराजवळ नाझरें म्हणून गांव आहे तेथील एका कुळकरण्याचा मुलगा. हा जातीचा देशस्थ ब्राह्मण. ह्याच्या बापाचें नांव ब्रह्मानंद आणि आईचें नांव सावित्रीबाई. ह्याचें लग्न होऊन ह्याला मुलें झालीं होतीं. ह्यानें गृहस्थाश्रमांत बरींच वर्षें घालविलीं; परंतु ह्याची चित्तवृत्ति नेहमीं उदासीन असे. ह्यानें उत्तर वयांत संन्यास घेतला. हा बहुधा तीर्थयात्रा करीत हिंडत असे; तथापि ह्याचें रहाण्याचें ठिकाण पंढरपूर होतें.

श्रीधराचें ग्रंथ ओवीबद्ध आहेत, व ते संस्कृतांतील पौराणिक ग्रंथांच्या आधारानें रचिले असल्यामुळें सामान्य लोकांस ते फार प्रिय होऊन त्यांमध्यें ह्या ग्रंथांचा प्रसार फार झालेला आहे. त्याची कविता रसभरित आहे; व भाषा सरळ असून शब्दही सोपे आहेत, म्हणून अर्थबोध सहज होतो. शिवाय स्थलविशेषीं वर्णनेंही हृदयंगम आहेत. हा पंढरपूर येथें समाधिस्थ झाला. श्रीधराचा जन्म शक १६०० असा 'नवनीता'च्या मागील आवृत्तींत देण्यांत आला आहे; परंतु अलीकडील संशोधनानें तो सुमारें १५८० ठरत आहे. निर्याण शके १६५१ (माघ वद्य ३).

### ह्यानें केलेले ग्रंथ

हरिविजय (शके १६२४), रामविजय (शके १६२९), वेदांतसूर्य (श. १६२९), पांडवप्रताप (शके १६३४), जैमिनीअश्वमेध, (श. १६३७) शिवलीलामृत (शके १६४०), पांडुरंगमाहात्म्य इत्यादि.

विशेष माहितीकरितां पहा:—महाराष्ट्र-सारस्वत (भा. २)—भावे; श्रीधर, चरित्र आणि काव्यविवेचन—चिं. नी. जोशी.

## वेंचे: राम-विजयांतील

ओव्या

### ग्रंथारंभ

जय जय गज-वदना निरुपमा। अगाध न वर्णवे तुझा महिमा। तुझिया गुणांची पावावया सीमा। कैसा सरता होईन मी ॥ १ ॥ काखेसी मेरू घेऊनि देखा। कैसें नृत्य करील पिपीलिका। कैसें ब्रह्मांड उचलेल मशका।

भू-गोळ मक्षिका केविं हालवी ॥ २ ॥ चंद्रासी कर्पूराचें उटणें । वासरमणीसी दर्पण दाखवणें । हिम-नगासी वारा घालणें । मेघासी समर्पण उदकांजुळी ॥ ३ ॥ सुर-तरूपुढें ठेविलें बदरी-फळ । मलयानिळासी सुगंध परिमळ । काम-धेनूसी शुष्क-तृण-कवळ । आणोनियां समर्पिलें ॥ ४ ॥ क्षीर-सिंधूसी समर्पिलें अजा-क्षीर । कनकाद्रीपुढें ठेविली गार । तैसें प्राकृत बोलें अ-पार । तुझें महत्त्व केविं वर्णूं ॥ ५ ॥ परी जो छंद घेत बाळक । स्नेहेंकरून पुरवी जनक । तरी हा राम-विजय ग्रंथ सुरेख । सिद्धी पावो तव कृपें ॥ ६ ॥ आतां नमूं सरसिजोद्भव-कुमारी । जे विलसे सदा कविजिव्हाग्रीं । जीचे वरदें[1] मूकही करी । वाचस्पतीसीं विवाद ॥ ७ ॥ जे आनंद-सरोवर-मराळिका । जे चातुर्य-चंपक-कळिका । जी निज कृपेची करून नौका । कवि-बाळका नेत पर-तीरा ॥ ८ ॥ कृपें तुझे विरिंची-कुमारी । जन्मांध होती महा जोहारी । अति-मूढ तो वेदार्थ करी । शक्र-पदीं बैसे रंक ॥९॥ अंबे तूं कवि-हृदयाब्ज-भ्रमरी । कीं निजानंद-सागरींची लहरी । वाग्वल्ली तूं बैसें जिव्हाग्रीं । विरूढें सफळ सर्वदा ॥ १० ॥ विवेक-हंस शुद्ध धवळ । त्यावरी तुझें आसन अचळ । तप्त-कांचन जैसें सुढाळ । तैसें निर्मळ निजांग तुझें ॥ ११ ॥ शुभ्र कंचुकी शुभ्र अंबर । दिव्य मुक्तलग[2] अलंकार । निज-बोध-वीणा घेऊनि सु-स्वर । गायन करिसी स्वानंदें ॥ १२ ॥ ऐकतां शारदेचें गायन । तन्मय विधी विष्णु ईशान । अंबे तुझें सौंदर्य पाहून । मीन-केतन[3] तटस्थ ॥ १३ ॥ रंभा उर्वशी तिलोत्तमा । सावित्री आणि मुख्य रमा । तुझ्या चातुर्य-समुद्राची सीमा । त्याही कदा न पावती ॥ १४ ॥ अंबे तुझे गुण केविं वर्णावे । केविं अर्कासी अर्की-सुमनें पूजावें । अंबर कैसें मुष्टींत सांठवे । पालवीं बांधवे वायु कैसा ॥ १५ ॥ न करवे उर्वीचें वजन । न गणवे सिंधूचें जीवन । सप्तावरणें[4] भेदून । मशाक केवीं जाऊं शके ॥ १६ ॥ ऐकोनि बाळकाचीं वचनें । जननी हृदयीं धरी प्रीतीनें । तैसें सरस्वतीनें निजकृपेनें । घातलें ठाणें जिव्हाग्रीं ॥ १७ ॥ माझें मन मूढ चकोर । कुहूमाजी[5] इच्छी रोहिणी-वर । परी सरस्वती कृपाळू थोर । शुद्ध बीज प्रगटली ॥ १८ ॥ बिजेपासून चढत्या कला । तों तों चकोरासी

---

१ (वरें) वरदानानें. २ ज्यांस मोत्यें लाविलीं आहेत असे. ३ मदन. ४ पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, अहंकार, आणि महातत्त्व हीं सात. ५ चंद्राची कला अगदीं दिसत नाहीं अशा प्रतिपदायुक्त अमावास्येचे दिवशीं.

अर्धांक सोहळा। तैसीच येथें रघुनाथ-लीला। चढे आगळा रस पुढें ॥ १९ ॥ ज्ञानाचे अनंत डोळे। उघडिले एकेचि वेळे। आतां वंदूं सद्गुरूचीं पाउलें। ज्याचेनि प्रगटे दिव्य ज्ञान ॥ २० ॥ जो अज्ञान-तिमिर-छेदक। जो प्रगट वेदांत-ज्ञानार्क। तो ब्रह्मानंद महा-राज देख। परमाद्भुत महिमा ज्याचा ॥२१॥ जो कां पांडुरंग-नगर-विख्यात। जो भक्त भीमा-तटीं समाधि-स्थ। तो यति-राज महिमा अद्भुत। कवण वर्णू शके पैं ॥ २२ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति तुर्या पूर्ण। चहूं अवस्थांवरी ज्याचें आसन। उन्मनीही निरसून। स्व-सुखीं पूर्ण समाधि-स्थ ॥ २३ ॥ चांदणें कैचें नसतां मृगांक। कीं किरणें कैंचीं नुगवतां अर्क। जीवनावांचोनि बीजां देख। सहसा अंकुर फुटेना ॥ २४ ॥ जैसा नेत्रेंवीण न दिसे पदार्थ। मंथनेंवीण न निवडे नवनीत। तैसा सद्गुरू-वांचोनि परमार्थ। ठायीं न पडे जीवांसी ॥ २५ ॥ वर नसतां व्यर्थ वऱ्हाड। शीर नसतां कायसें धड। तैसें गुरु-कृपेवीण व्यर्थ काबाड। व्रतें तपें साधनें ॥ २६ ॥ अंजनेंवीण न सांपडे निधान। सीमा कैंची ग्रामावीण। कीं गायत्रीवीण ब्राह्मणपण। तैसें गुरूवीण ज्ञान न घडे ॥ २७ ॥ म्हणोनी तनु-मन-धनेंसी अनन्य। ब्रह्मानंद-स्वामीस शरण। आरंभीं श्रीराम-कथा गहन। ग्रंथ संपूर्ण सिद्धी पावो ॥ २८ ॥ ऐसे ऐकतां स-प्रेम बोल। बोलिला श्रीगुरू दयाळ। चकोराकारणें उतावेळ। मृगांक जैसा उगवे ॥ २९ ॥ कीं चातकालागीं धांवे जल-धर। कीं क्षुधितापुढें क्षीर-सागर। कीं कल्प-वृक्ष शोधित आला घर। दरिद्रियाचें साक्षेपें ॥ ३० ॥ तैसा श्रीगुरू दया-सागर। तेणें दीधला अ-क्षय्य वर। म्हणे सिद्धी पावेल साचार। राम-विजय ग्रंथ हा ॥ ३१ ॥ आतां वंदूं संत-सज्जन। जे वैराग्य-वनींचे पंचानन। जे ज्ञानांबरींचे चंड-किरण[1]। उदय अस्त नसे जयां ॥३२॥ जे भक्ति-सरोवरींचे राजहंस। जे कां अविद्यारण्य-हुताश। कीं ते पद्म-हस्ती विशेष। भव-रोग-वैद्य होती ॥ ३३ ॥ कीं जीव पावे स्व-पदासी। ऐसे मुहूर्त देणार जोशी। कीं ते पंचाक्षरी निश्चयेंसीं। पंच-भूतांसी पळविती जे ॥ ३४ ॥ कीं ते दैवी-संपत्तीचे[2] भाग्यवंत। मुमुक्षूंसी करिती दरिद्र-रहित। कीं सद्विद्येचीं अद्भुत। गोपुरें काय उंचावलीं ॥ ३५ ॥ संत श्रोते चतुर पंडित। माझें बोलणें आर्ष अत्यंत। जैसा सरस्वतीपुढें मूढ बहुत। वाग्विलास दावितसे ॥३६॥ सूर्यापुढें जैसा दीप देख। जान्हवीस न्हाणी थिल्लरोदक। कीं कनकाद्री

---

१ सूर्य. २ श्रीमद्भगवद्गीता, अध्याय १६ ; श्लोक १—३ पहा.

अति सुरेख । त्यासी अलंकार पितळेचे ॥ ३७ ॥ कामधेनूस समर्पिलें अजा-क्षीर । चंद्रासी सीतळ उपचार । कल्प-तरू कल्पिलें देणार । त्यासि निंबोळ्या समर्पिल्या ॥ ३८ ॥ रत्नाकारा काचवटी समर्पिली । तैसी माझी आर्ष बोली । परी तुम्हीं प्रीती ठेविली । प्राकृत शब्दीं नवल हें ॥ ३९ ॥ विष्णूसि भूषणें अ-पार । परी तुळसीवरी आवडी थोर । कीं अपर्णा-पतीसी बिल्व-पत्र । भक्तीं वाहतां आवडे ॥ ४० ॥ रायें पाठिसीं दासी घालितां । तिची सर्वांवरी चाले सत्ता । प्रभु अल्प मोलाचे अलंकार लेतां । जनां समस्तां थोर दिसे ॥४१॥ म्हणोनि तुम्ही संत प्रभु थोर । महिमा न वर्णवे अ-पार । मोटेंत बांधवेल समीर । चरणीं अंबर क्रमवेल पैं ॥ ४२ ॥ गणवतील पृथ्वीचे रज:कण । मोजवेल सागरींचें जीवन । कनकाद्रीचा चेंडू करून । उडविजेल सर्वथा ॥ ४३ ॥ भोगींद्र-मस्तकींचा मणी । आणवेल एकादे क्षणीं । सूर्य जातां धरवेल गगनीं । नक्षत्रें गुणीं ओंविजे ॥ ४४ ॥ काढवेल शशि-मंडळींचें अमृत । मोडवतील ऐरावताचे दंत । दिग्गज आणोनि समस्त । एके ठायीं बांधिजेती ॥ ४५ ॥ तुरग करुनि प्रभंजन । सर्वांठायीं करवेल गमन । परि तें संतांचें माहिमान । ब्रह्मानंदें पूर्ण न वर्णवे ॥ ४६ ॥ तों संत बोलती आनंद-घन । मन निवालें तुझे बोल ऐकोन । आम्ही करूं इच्छितों राम-कथा-श्रवण । वरी दृष्टांत गोड तुझे ॥ ४७ ॥ मेरू सुंदर रत्नेंकरून । कीं नक्षत्रीं मंडित गगन । कीं वृक्ष फळीं परिपूर्ण । तैसी दृष्टांतीं संपूर्ण ग्रंथ-शोभा ॥ ४८ ॥ कीं शांति-क्षमा-दया विशेष । तेणें मंडित सत्पुरुष । कीं परिवारासमवेत नरेश । दृष्टांत सु-रस ग्रंथीं तैसे ॥ ४९ ॥ आधींच भूक लागली बहुत । त्याहिवरी वाढिलें पंचामृत । कीं दुर्बळासी अकस्मात । कल्पतरू भेटला ॥ ५० ॥ कन्यार्थी हिंडतां भू-मंडळ । त्यासी राज-कन्या घाली माळ । कीं रोगिया रसायण निर्मळ । अकस्मात जोडलें ॥ ५१ ॥ आतां बहुत टाकुनि शब्द-जाळ । बोलें राम-कथा रसाळ । जैसी सिकता[१] सांडोनि मराळ[२] । मुक्ताफळें सेविती ॥ ५२ ॥ कीं कोश-गृहीं प्रवेशोनी । भांडारी रत्नें काढी निवडोनी । कीं दोष टाकोनि सज्जनीं । उत्तम गुण स्वीकारिजे ॥ ५३ ॥ ऐसे संतांचे बोल परिकर । ऐकोनि ब्रह्मानंदें श्रीधर । साष्टांग घालोनि नमस्कार । म्हणे सादर परिसीजे ॥ ५४ ॥ अ-संभाव्य श्रीराम-चरित्र । शत-कोटी-

---

१ वाळू. २ हंस.

ग्रंथ-विस्तार । वाल्मीकि बोलिला अ-पार । कथा-समुद्र अ-गम्य ॥ ५५ ॥ मूळापासोन इतुक्या कथा । कैशा वर्णवतील तत्त्वतां । त्यामाजि वाल्मीकी-रामायण नाटक-ग्रंथा । श्रीराम-विजयालागीं कथूं ॥ ५६ ॥ समस्त कवींसी नमस्कार । जो जगद्गुरु आचार्य शंकर । जेणें मतें उच्छेदूनि समग्र । शुद्ध मार्ग वाढविला ॥ ५७ ॥ श्रीधराचार्य टीका-कार । त्यासी नमस्कारीत श्रीधर । मधुसूदनादिक नरेंद्र । ग्रंथ अ-पार जयांचे ॥ ५८ ॥ जो शृंगार-वनींचा विहंगम जाण । तो जयदेव पद्मावती-रमण । ज्याची काव्य-कळा पाहोन । पंडितजन तटस्थ ॥ ५९ ॥ जो वेदांत-क्षीरार्णवींचा मीन । जेणें विवेक-सिंधू निर्मिला पूर्ण । तो मुकुंदराज गुण-निधान । तयाचे चरण वंदिले ॥ ६० ॥ तारावया जग समग्र । पुन्हा अवतरला रमा-वर । गीतार्थ केला साचार । तो ज्ञानेश्वर जगद्गुरू ॥ ६१ ॥ जो भानुदास कुल-भूषण । प्रतिष्ठान-वासी परिपूर्ण । त्या एकनाथें ग्रंथ संपूर्ण । बहु रसाळ कथियेले ॥ ६२ ॥ जे चातुर्य-राजधानीचे कळस । मुक्तेश्वर, मुद्गलदास । ज्यांचे ग्रंथ पाहतां सु-रस । ब्रह्मानंद उचंबळे ॥ ६३ ॥ जैसा चंडांशु स-तेज व्योमीं । तैसाचि केवळ वामनस्वामी । ज्याची श्लोक-रचना ये भूमी । भू-मंडळावरी अ-पूर्व ॥ ६४ ॥ कृष्णदास जयराम । जें शांति दयेचें निज-धाम । ज्याचे ग्रंथ ज्ञान-भरित परम । जो निःसीम ब्रह्मचारी ॥ ६५ ॥ श्रीराम-उपासक निर्मळ । जो भजन-सरोवरींचा मराळ । तो रामदास महाराज केवळ । भक्ती प्रबळवी[1] जना ॥ ६६ ॥ ब्रह्मानंदस्वामीचा बंधू सत्य । नाम तयाचें श्री-रंगनाथ । ज्याची कविता समस्त । ऐकतां जन उद्धरिले ॥ ६७ ॥ आतां असो समस्त कवि-वर । अवघे ब्रह्मानंद-रूप साचार । त्यांसी अनन्य-शरण श्रीधर । द्यावा वर ग्रंथासी ॥६८॥ रवि-कुळीं अवतरला श्रीधर । कैसें केलें लीला-चरित्र । धन्य त्या वाल्मीकाचें वक्त्र । कथा अ-पार बोलिला ॥ ६९ ॥ हें वर्णितां श्रीराम-चरित्र । तरला वाल्मीकि साचार । पाप आचरला अ-पार । ऐका सादर गोष्टी ते ॥ ७० ॥ वाल्मीकि पूर्वी द्विज-सुत । त्यजोनि आचार यज्ञोपवीत । किरात-संगें वाट पाडित । अति उन्मत्त विषयांध ॥७१॥ महा-दुर्धर कानन । देखतां भयाभीत होय मन । पर्वत-दरीमाजी स्थळ करोन । सहपरिवारें वसे तेथें ॥ ७२ ॥ भोंवतें द्वादश गांवेंपर्यंत । पाळती राखोनि वाट पाडित । केल्या ब्रह्म-हत्या असंख्यात । नाहीं गणती इतर जीवां ॥ ७३ ॥ मत्स्य धरावयालागीं बक ।

---

१ वाढवी किंवा 'प्रबळ वी' असे निराळे शब्द केल्यास, प्रबळ भक्ती वी (उत्पन्न करी).

जैसा होऊनि बसे सात्विक । कीं मूषकालागीं बिडालक । बैसे टपत तयापरी ॥ ७४ ॥ कीं अंग संकोचें पारधी । जाणोनि तत्काळ मृग साधी । तैसा वाल्ह्या जीव वधी । पाप-बुद्धि निर्दय ॥ ७५ ॥ अ-पार जीव मारिले । पापाचे पर्वत सांचले । जैसे अंत्यज-गृहाभोंवते पडिले । ढीग बहुत अस्थींचे ॥ ७६ ॥ ऐसें करितां पापाचरण । तयासी आलें वृद्धपण । पुत्र झाले अति दारुण । परी आंगवण[१] न सांडी ॥ ७७ ॥ हातीं शस्त्र घेऊनि वाल्ह्या । मार्ग लक्षीत जों बैसला । तों अकस्मात नारद प्रकटला । पूर्व-पुण्यें-करोनी ॥ ७८ ॥ चंद्र वेष्टिती नक्षत्रें जैसीं । भोंवतीं ऋषींची मांदी तैसी । तों पाळती सांगती वाल्हियासी । जाती तापसी बहु-साल ॥ ७९ ॥ वाटेसी धावून आडवा आला । शस्त्र उभारूनी ते वेळां । दाटावूनि ऋषींचा मेळा । उभा केला क्षणभरी ॥ ८० ॥ कीं स्वर्ग-पंथें जातां नेटें । जसी यम-पुरी लागे वाटे । कीं पुण्यें आचरितां उद्भटें । काम-क्रोध आडविती ॥८१॥ असा वाल्ह्या म्हणे तयांसी । यात्रा[२] आणा रे मजपासीं । नाहींतर मुकाल प्राणासी । माझे हस्तेंकरोनी ॥८२॥ मग पुढें होऊन ब्रह्म-नंदन । म्हणे ऐक एक माझें वचन । तुज आलें वृद्धपण । पापें अ-पार घडलीं कीं ॥ ८३ ॥ द्रव्य जोडिलें तुवां अ-पार । झाले दुष्कृताचे संभार । तुझ्या पापासी वांटेकर । कोणी आहेत कीं विचारीं ॥ ८४ ॥ आलें तुज जवळी मरण । यम जेव्हां गांजील दारुण । तेव्हां तुज सोडवील कोण । पाहें विचारोनि अंतरीं ॥ ८५ ॥ दारा पुत्र धन यौवन । बंधु सेवक आप्त-जन । शस्त्रें अस्त्रें चतुरंग सैन्य । न ये कामा ते वेळे ॥ ८६ ॥ जीं जीं कर्में प्राणी करिती । तितुकीं देव विलोकिती । सकल तत्त्वें व्यापून वर्तती । मग साक्ष देती परत्रीं ते ॥ ८७ ॥ यम-पुरीस चित्रगुप्त । पत्रें काढोनि वाचित । मग त्यासारिखा दंड करित । कोण तेथें सोडवील ॥ ८८ ॥ जो पुण्य-पंथें न चाले नर । निंदी तीर्थ-यात्रा समग्र । त्यास ताम्र-भूमी तप्त अ-पार । चालविती त्यावरी हळू हळू ॥ ८९ ॥ जे परोपकार न करिती । त्यांसी असि-पत्रावरी[३] हिंडविती । इकडून तिकडे शस्त्रें फुटती । कोण सोडवील ते स्थानीं ॥९०॥ तप्त-लोह-स्तंभ दारुण । त्यासी भेटविती नेऊन । देव-द्विजां न करी जो नमन । त्यासही जाण तेची गति ॥ ९१ ॥ जो संतांस देखों न शके अ-पवित्र । त्याचे गीध फोडिती नेत्र । जो कीर्तन स्मरण न करी अणुमात्र । जिव्हा तोडिती तयाची ॥९२॥ गुरु देव

---

१ सवय. २ यात्रेकरू-लोकांजवळील सामानसुमान. ३ तरवारीवर.

ब्राह्मण सांडोनी । जो षड्रस सेवी पाप-खाणी । महा-नरकींचें पाणी । त्याचे वदनीं ओतिती ॥९३॥ जो तीर्थ-स्नानें निंदी खळ । त्यासी तप्त कढईमाजी जें तेल । त्यांत तळविती तात्काळ । कोण सोडवी तेथें पां ॥ ९४ ॥ जे साधु-संतांसी पीडिती । त्यांचे अंगींचीं सालें काढिती । जे द्विज गुरु तीर्थें अव्हेरिती । तोंडीं घालिती विष्ठामूत्र ॥९५॥ धर्म-वाट धरोनि हरिती धन । त्यांसी कुंभीपाकामाजी घालून । खालीं चेतविती कृशान । त्यामाजी आक्रंदोनि चरफडती ॥ ९६ ॥ लोह-दंड करोनि तप्त । कानीं खोंविती यम-दूत । जो नायके हरि-कथामृत । गति निश्चित त्यासि हे ॥ ९७ ॥ ऐसें बोलतां नारद-ऋषि । अनु-ताप झाला त्याचे मानसीं । वेगें आला निज-सदनासी । स्त्री-सुतादिकांसी पुसत ॥ ९८ ॥ जीं जीं पापें घडलीं मजलागीं । कोणी होतां काय विभागी । तंव ते म्हणती आमुचे अंगीं । न लागती पापें सर्वथा ॥९९॥ आम्हीं भाग्याचे वांटेकरी समस्त । पापें तुझीं तूं भोगीं यथार्थ । वाल्ह्या झाला सद्गदित । म्हणे कैसा अनर्थ टाळूं आतां ॥ १०० ॥ हा नर-देह उत्तम पूर्ण । केवळ भगवत्प्राप्तीचें स्थान । म्यां आत्म-हित न करून । बुडालों कीं अंध-तमीं ॥१०१॥ यत्नें पुण्य-क्षेत्र सरसावलें । तेथें कनक-बीज[१] पेरिलें । कनकामृताचें ताट घडलें । त्यांत वाढिलें तृण-बीज ॥१०२॥ सुधा-रस-कुंभ दैवें जोडला । तो नेऊन उकरड्यांत ओतिला । चिंतामणी फोडोनि घातला । पायरीस अ-भाग्यें ॥१०३॥ सुरभी[२] शोधीत आली घर । तिसी करूनि काष्ठप्रहार । अ-भाग्यें घातली बाहेर । तोचि प्रकार मज झाला ॥१०४॥ बळें कल्प-वृक्ष तोडोन । वाढविलें कंटकी-वन । राजहंस दवडोन । दिवा-भीतें[३] पाळिलीं ॥१०५॥ रंभा तोडोनि महा-मूर्खें । अर्की वाढविल्या स-कौतुकें । ओसंडोनि स-तेज मुक्तें । सिकता हरळ भरियेल्या ॥१०६॥ असो ऐसा अनुतापें वाल्ह्या । नारदापासीं परतोनि आला । सद्गद-कंठ अश्रु डोळां । साष्टांग घातला नमस्कार ॥ १०७ ॥ तनु-मन-धनेंसीं अनन्य । स्वामी तुज मी आलों शरण । कृपेची नौका करोन । तारीं मज भव-सागरीं ॥ १०८॥ महाराज तूं धन्वंतरी । माझा भव-रोग दूर करीं । जळतों पाहोन विषयांभीतरीं । मेघ झडकरी वर्षें तूं ॥ १०९ ॥ पडिलों मायेचिये मेळीं । पंचभूतें मज झोंबलीं । वासनाविवशी गळां पडली । कदाकाळीं सोडीना ॥ ११०॥ अहं-देह-बुद्धि डांकीण[४] । ममता सटवी दारुण । लोभ झोटिंग एक क्षण । उमज वेऊं नेदीच ॥ १११ ॥

---

१ धोत्र्याचें बीं. २ कामधेनु. ३ घुबडें. ४ डंखीण.

क्रोध महिषासुर दारुण । कामवेताळें झडपिलें पूर्ण । तृष्णा माया-राणी अनु-दिन । सर्वदाही न सोडी ॥ ११२ ॥ झालों मी अत्यंत क्षीण । पंचाक्षरी तूं ब्रह्म-नंदन । सकळ भूतें टाकीं झाडोन । म्हणोनि चरण धरियेले ॥११३॥ अष्ट-भावें[1] झाला सद्गदित । मग मनीं विचारी ब्रह्म-सुत । रोग पाहूनि वैद्य निश्चित । दिव्य मात्रा काढी जेविं ॥ ११४ ॥ म्हणे हा अनधिकारी परम । राम ऐसें सांगे नाम । म्हणे हेंचि तुवा जपावें स-प्रेम । मुख्य वर्म जाण पां ॥ ११५ ॥ तें जीवन-नाम जपत । तेथेंचि बैसला ध्यान-स्थ । अंगावरी वारूळ वाढत । ध्वनी उमटत आंतूनी ॥ ११६ ॥ टोणपियाचा वृक्ष झाला । तो नारद बहु-काळें पातला । त्या तरूवराखालीं उभा राहिला । श्रवणीं ऐकला नाम-घोष ॥ ११७ ॥ वारुळ-छिद्रामधूनी । राम-नामाचा मधुर ध्वनी । चातुर्य-समुद्र नारद-मुनी । जाणिला मनीं सर्व वृत्तांत ॥ ११८ ॥ मग उकरोनियां वारुळ । बाहेर काढिला तो पुण्य-शीळ ॥ दिव्यौषधी मस्तकीं मर्दूनि सकळ । सावध केला तेधवां ॥ ११९ ॥ जैसा भूमीवरी अर्क उतरला । तैसा श्री-गुरू-नारदें देखिला । धांवोनि लागे चरणकमळां । पापा झाला संहारू ॥ १२० ॥ नाम जपतां श्री-रामाचें । दोष गेले अनंत-जन्मींचे । जैसे पर्वत तृणाचे । अग्नि-संगें भस्म होती ॥ १२१ ॥ पापें जळावया समस्त । नामामाजी प्रताप बहुत । नामाचेनी न जळे निश्चित । ऐसें पाप नसेचि कीं ॥ १२२ ॥ वाल्मीकें केलीं जीं पापें । तीं भस्म झालीं नाम-प्रतापें । नामापुढें आणीक तपें । तुच्छ ऐसीं जाणिजे ॥ १२३ ॥ जैसा पर्वत होतां प्रदीप्त । मग झाडेंझुडपें न राहती तेथ । नामाग्नीपुढें तैसीं समस्त । पापारण्यें भस्म होती ॥ १२४ ॥ जैसीं स्वप्नीं घडतीं दुष्कृतें बहुत । जागृतींत तीं मिथ्याभूत । तैसीं राम-नामें समस्त । पापें समूळ भस्म होती ॥ १२५ ॥ तोंवरीच तमाची दाटणी । जोंवरी नुगवे वासर-मणी । तोंवरीच मद कीजे वारणीं । जोंवरी सिंह देखिला नाहीं ॥ १२६ ॥ सिंधूचें गर्जन तोंवरीच पाहीं । जोंवरी कलशोद्भव देखिला नाहीं । तोंवरी भूतांची परम घाई । जोंवरी मंत्र-वादी नाहीं पावला ॥ १२७ ॥ तोंवरी पापांचे संभार । जों नामीं न धरिला आदर । नाम-प्रताप अद्भुत थोर । तरला साचार वाल्मीकी ॥१२८॥

---

१ सात्त्विक अष्टभाव ते येणेंप्रमाणें :—

(१) स्तंभ (स्तब्धता), (२) प्रलय (बेशुद्धि), (३) रोमांच (अंगावर कांटा येणें), (४) स्वेद (घर्म), (५) वैवर्ण्य (तोंडावरचा वर्ण फिरणें), (६) वेपथु (कंप), (७) अश्रु (डोळ्यांतून पाणी येणें) आणि (८) वैस्वर्य (स्वर पालटणें).

असो वाल्मीकी म्हणे श्री-गुरू-नाथा । मी कसा काळ क्रमूं आतां । नारद म्हणे श्रीराम-कथा । सविस्तर करावी ॥ १२९ ॥ मग वाल्मिकें रचिला ग्रंथ । तो भारद्वाजमुखें समस्त । असंख्य ऋषी श्रवण करित । ब्रह्मानंदें करोनि ॥१३०॥ नारदा-प्रती सरसिजोद्भव । सांगे राम-कथा अभिनव । बदरिकाश्रमीं ऋषी सर्व । व्यास-मुखें ऐकती ॥ १३१ ॥ ते प्राकृत भाषेंत निवाडे । श्रीधर वर्णी संतांपुढें । जैसें बाळ चाळे करी लाडें । परी आवडे जननीये ॥ १३२ ॥ प्राकृत भाषा म्हणोनी । अव्हेर न करावा पंडित-जनीं । जैसीं कृष्णा-वेणेचीं तीरें दोन्ही । परी उदक जाण एकचि ॥ १३३ ॥ तैसें प्राकृत आणि संस्कृत । दोहींत एकचि अर्थ । जैशा दोघी स्त्रिया एकचि कांत । कीं दोन्ही हस्त एकाचेचि ॥ १३४ ॥ दोन्ही दाढा एकचि स्वर । एक पाहणें दोन नेत्र । कीं दों पात्रांत पवित्र । एकचि दुग्ध घातिलें ॥१३५॥ दोन्हीमाजी गोडी एक । जैसें त्रिवेणीस भरलें उदक । एक सुवर्ण-कूपिका अ-मोलिक । ताम्र-धातूची एक घडली ॥ १३६ ॥ दोन्ही कुप्या नेऊनि देख । श्रीरामेश्वरासी केला अभिषेक । दोन धातु एक उदक । देवास समाचि आवडे ॥ १३७ ॥ अबळांस न कळे संस्कृत वाणी । जैसें आडांतील गोड पाणी । परी तें दोर-पात्रा-वांचोनी । अ-शक्त जना केविं निवे ॥ १३८ ॥ तोचि तडागासी येतां त्वरें । तात्काळचि तृषा हरे । अ-बळा जना तारावया ईश्वरें । प्राकृत ग्रंथ निर्मिले ॥ १३९ ॥ मुख्य संस्कृत बघावें । परी तें अबलांसी नेणवे । महा-गज कैसा बांधवे । कमळ-तंतू घेउनी ॥ १४० ॥ सर्वांस मान्य गीर्वाण । जरी असेल पूर्व पुण्य । तरीच तेथींचें होईल ज्ञान । तरी आबाल जन केविं तरती ॥ १४१ ॥ उत्तम वस्त्रें लेती नृपती । तीं दुर्बळांसी केविं प्राप्त होती । मग ते घोंगडीच पांघरती । शीत-निवारणा ॥ १४२ ॥ जैसें दधि मंथितां बहुत । त्यांतून निघे नवनीत । कीं स्वाती-जळापासोन अद्भुत । मुक्ता-फळें निपजती ॥ १४३ ॥ कीं इक्षु-दंडापोटीं शर्करा । रसनेचि गोडी तोचि विचारा । कीं राजियापासून राज-पुत्रा । मान्यता होय बहुतचि ॥ १४४ ॥ मऱ्हाठी वचनें निश्चित । परी अत्यंत रस-भरीत । मधु-मक्षिकांचे मुखींहूनी स्त्रवत । अती सु-रस जैसा कां ॥ १४५ ॥ गीर्वाण हें शशि-मंडळ अद्भुत । त्याची प्रभा हे प्राकृत । संस्कृत ग्रंथ वर्णिती पंडित । अर्थ प्राकृत करिती पैं ॥ १४६ ॥ सिकतेमाजी दिव्य रत्न । जरी सांपडे न करितां प्रयत्न । तरी चतुरीं करावें जतन । किंवा अव्हेर करावा ॥ १४७ ॥ कष्टेंवीण राज्य आलें हातां । तरी कां वोसंडावें तत्त्वतां । प्राकृत-भाषीं ऐकोनि कथालाभ ।

श्रोतीं घेईजे तेवीं ॥ १४८ ॥ मुक्ता-फळांचिया माळा । वरी सु-वास सुटला आगळा । तरी चतुरीं कां न घालाव्या गळां । अति आवडी करूनी ॥ १४९ ॥ आधींच इक्षु-दंड गोड । त्यावरी आले शर्करेचे घड । तैसी रघुनाथ-कथा सुरवाड[1] । त्यावरी साहित्य पुरविलें ॥ १५० ॥

अध्याय पहिला.

---

## वेंचे; हरि-विजयांतील

ओव्या

### अक्रूरागमन

बलराम आणि कृष्ण ह्यांस फसवून मारण्याकारितां धनुर्याग पाहाण्याच्या निमित्तानें मथुरेस बोलावून आणावें, म्हणून कंसानें अक्रूराला गोकुळास पाठविलें. ही कथा या प्रकरणांत सांगितली आहे.

ऐकोनि हरि-प्रताप उदंड । कंस चिंताक्रांत अ-खंड । म्हणे कृष्णें दैत्य मारिले प्रचंड । देवसमस्त भीती जयां ॥ १ ॥ पंचाननाचा प्रताप ऐकोन । भयाभीत जेविं वारण । कीं यशवंत विनता-नंदन । दंदशूक[2] ऐकोन तटस्थ ॥ २ ॥ तैसा भयें व्यापिला कंस । गोड कांहीं न वाटे जिवास । नाठवे विलास रात्रं-दिवस । परम-पुरुष दृष्टी पडे ॥ ३ ॥ देखिला नसतां चक्र-पाणी । दुरूनि ऐकतां प्रताप श्रवणीं । तैसीच मूर्ती ध्यानीं मनीं । ठसावूनियां बैसली ॥ ४ ॥ मेळवूनियां प्रधान चतुर । विचारीं बैसला कंस नृपवर । म्हणे आम्हांसी नाटोपे नंद-कुमर । कैसा प्रकार करावा ॥ ५ ॥ प्रधान म्हणती धनुर्याग । आरंभावा आतां स-वेग । बळराम आणि श्रीरंग । आदरेंकरूनि आणावे ॥६॥ नंद गौळीयांसमवेतें । मान देऊनियां आणावा येथें । नम्र वचन बोलून त्यातें । शेवटीं घात करावा ॥ ७ ॥ दिवा-भीताचे घरीं जाण । काग गेलिया नम्रता धरून । तैसा गौळियांसमवेत कृष्ण । येथें कोंडोनि वधावा ॥८॥ विष-वल्ली जों वाढ नेघे । तों खंडूनियां टाकावी वेगें । तरीच आपणांस सुख भोगे[3] । चिर-काळ नृप-वरा ॥ ९ ॥ पुढें अनर्थ बहु दिसताहे । म्हणऊनि सुख-निद्रा करूं नये । सत्वर शोधावा उपाये । तरीच कुशळ आपुलें ॥ १० ॥ नयनीं हरळ खुपतां । सत्वर काढावें तत्त्वतां ।

---

१ सुखदायक. २ सर्प. ३ भोगावयास सांपडेल.

कंटक पदीं भेदितां । आधीं काढिजे कोरोनि ॥ ११ ॥ तैसा नाना उपाय करूनि । राम-कृष्णांसी आणूनी । विश्वासें घ्यावा प्राण येच क्षणीं । तरीच हें कार्य साधेल ॥ १२ ॥ दाऊनियां आंग-पतन[1] । पाषाण[2] फोडील लोहघन[2] । कीं कांटे चरणीं लागून । जैसे जिव्हार भेदिती ॥ १३ ॥ मस्तक करूनियां खालतें । पारधी जैसा विंधी मृगातें । सरांटे जेविं महा-गजातें । कळ लाउनि उभे करिती ॥१४॥ कीं बचनाग मुखीं घालितां । जिव्हेसी गोड लागे तत्त्वतां । मग सर्वेची मृत्यु-व्यथा । प्राप्त करी तात्काळ ॥१५॥ वरी आमिष लाऊनि साचार । क्षणमात्रें गळ भेदी जिव्हार । कीं चणे टाकूनि वानर । विश्वासवूनि धरिती पैं ॥१६॥ कीं वरवर बोले गोड मैंद[3] । परी आपुल्या कार्यासी सावध । तैसा बळदेव आणि गोविंद । विश्वासवूनि वधावे ॥ १७ ॥ ऐकूनि प्रधानांची युक्ती । कंसासी हर्ष न समाये चित्तीं । म्हणे तुमचे बुद्धीपुढें बृहस्पती । उणा वाटे मजलागीं ॥ १८ ॥ तरी आतां पाठवावा कोण । नम्र बोलका विचक्षण । नाना-युक्ती करून । रामकृष्णा आणी जो ॥ १९ ॥ प्रधान म्हणती पाठवावा अक्रूर । स्थिर-बुद्धी परम चतुर । त्याचिया बोलें क्षणमात्र । न लगतां येथें येतील ते ॥ २० ॥ मग बोलावूनि अक्रूर । त्यास सांगे मनींचा विचार । गोकुळा जाऊनि सत्वर । राम-कृष्णांसि आणावें ॥ २१ ॥ धनुर्याग मांडिला येथें । सांगावें नंदादि गौळियांतें । महोत्सव पाहोनि मागुतें । गोकुळासी जाइजे ॥ २२ ॥ आमुचा दिव्य रथ जावा घेऊनी । त्यावर बैसवीं राम-चक्रपाणी । उदयीक सत्वर दोघांसि आणोनी । महोत्सव दाखवावा ॥२३॥ आज्ञा वंदुनि अक्रूर । रथ घेऊन निघाला सत्वर । म्हणे माझिया सुकृत-तरुवरें । वाढ आजी घेतली ॥ २४ ॥ मनांत चिंता वाटे थोर । म्हणे कंस चांडाळ दुराचार । बळराम आणि यदुवीर । दोघे सुकुमार कैसे आणूं ॥ २५ ॥ मागुती श्रीकृष्ण-चरित्र । अद्भुत आठवी मनांत । संहारिले दारुण दैत्य । केशी[4] अघ[5] बकादिक[6] ॥२६॥ कृष्ण-प्रताप प्रचंड देख । काय करील कंस मशक । जगद्वंद्यासी आवश्यक । नेईन आतां निर्धारें ॥ २७ ॥ आणीक एक

---

१ नम्र होणें. २ पाषाण कठीण असतो, तरी लोखंडाचा घण पतन पावून त्याचा नाश करील. ३ लबाड. ४ केशी दैत्य हा कंसाकडून कृष्णाला मारण्याकरितां घोडा होऊन गोकुळांत गेला होता, तो कृष्णानें मारला. ५ अघासुर हा कृष्णाला मारण्याकरितां मोठा अजगर होऊन गेला होता तोही कृष्णानें मारला. ६ बकासुर हा कृष्णाला मारण्याकरितां बगळा होऊन गेला होता, त्यालाही कृष्णानें मारलें.

चिंता अंतरीं । मद्विश्वास धरी कीं न धरी । हा कंस-सेवक म्हणोनि मजवरी । कोपेल काय जगदात्मा ॥ २८ ॥ तो तरी सर्वात्मा सर्व-साक्षी । जो अनंत ब्रह्मांडें चित्तीं परीक्षी । भक्ताभक्तांचीं लक्षणें लक्षी । संकटीं रक्षी निज-दासां ॥ २९ ॥ म्हणे आजि धन्य नयन । देखेन वैकुंठींचें निधान । पूर्ण-ब्रह्म सनातन । मी पाहेन डोळेभरी ॥ ३० ॥ जो दश-शत-मुखांग-शयन[1] । मी त्याचे पदीं भाळ ठेवीन । जो नील-ग्रीवाचें[2] हृदयध्यान । चतुरानन बाळ ज्याचें ॥ ३१ ॥ जो क्षीराब्धि-वासी पूर्णब्रह्म । ज्याचें वेदशास्त्रांसि न कळे वर्म । त्या हरीसी आजी क्षेम । मी देईन प्रेमावडी ॥ ३२ ॥ जो निर्गुण निर्विकार । जो देश-कालातीत अपार । तो गोकुळीं यादवेश्वर । डोळेभरी पाहीन मी ॥३३॥ दुरूनी गोकुळ अक्रूरें देखतां । साष्टांग घातलें दंडवता । म्हणे धन्य व्रज-वासी समस्ता । नित्य मुख पाहती हरीचें ॥३४ ॥ तों गोखुरांमागें चांगलीं । पावलें हरिचीं उमटलीं । अक्रूरें घेऊनियां धुळी । लाविली भाळीं आपुले ॥३५॥ जोडोनियां दोन्ही हात । चरण-चाली अक्रूर चालत । कंठ झाला सद्गदित । अश्रु-पात वाहती ॥ ३६ ॥ पद-मुद्रा उमटल्या जेथें । मागुती प्रणिपात करी तेथें । तों वृक्ष देखिले निज-भक्तें[3] । काय त्यांतें बोलत ॥ ३७ ॥ म्हणे धन्य धन्य तुम्ही वृक्ष । तुमचे छायेसी बैसला कमलाक्ष । जो भूतांतरात्मा कर्माध्यक्ष । सहस्राक्ष शरण जया ॥ ३८ ॥ तों सायं-काळीं परतला गो-भार । गोपांसहीत यादवेश्वर । सवें ज्येष्ठ बंधु बळभद्र वीर । वाद्य-गजर बहु होती ॥ ३९ ॥ गो-रज-धुळी दाटली बहुत । तेणें झांकोळला अक्रूर-रथ । नंद-मंदिराजवळि अकस्मात । अक्रूर तेधवां पातला ॥४०॥ अक्रूर नंदें देखोन । धांवोनि दिधलें क्षेमालिंगन[4] । तों पातले दोघे जण । शेष-नारायण[5] ते काळीं ॥४१॥ देखिला त्रि-भुवन-नाथ डोळां । नीळजीमूत-वर्ण घन सांवळा । रुळती आ-पाद वनमाळा । गो-रजें डौरला वदन-चंद्र ॥४२॥ उदार श्री-मुख आकर्ण-नयन । कुंडलें शोभविती कर्ण । हरि-तनूच्या आश्रयें पूर्ण । अलंकार धवधविती ॥४३॥ अक्रूर यादवांचा वडील बहुत । देखूनियां श्रीकृष्णनाथ । चरण वंदावया धांवत । तों अक्रूरें दंडवत घातलें ॥ ४४ ॥ नेत्रीं चालल्या प्रेमांबुधारा । ऐसें देखोनि

---

१ हजार मुखें आहेत ज्याला अशा शेषाच्या अंगावर निजणारा. २ शंकराचें. ३ निज (अनाद्यंत कृष्ण) त्याच्या भक्तानें. ४ भेटणें. ५ बलराम व कृष्ण.

परात्पर[१]-सोइरा । अक्रूराचा कर धरोनि सत्वरा । उठवूनियां क्षेम[२] दीधलें ॥४५॥ अक्रूराचे गळां मिठी । दृढ घालीत जगजेठी । रेवती-रमण परमेष्ठी । त्यांस ही भेटी नोहेची ॥४६॥ निज-भक्त जाणती ते गोडी । समाधी कायसी बापुडी । तीर्थव्रतांचिया कोडी । वरूनियां वोंवाळिजे ॥४७॥ क्षणाक्षणां तो अक्रूर । कृष्ण-मुख न्याहाळोनि सुंदर । धरी हरि-चरण वारंवार । तृप्ति नोहे सर्वथा ॥ ४८ ॥ बळरामासी नमून । अक्रूरें दीधलें आलिंगन । साक्षात् शेषनारायण । अवतार-पुरुष देखिले ॥ ४९ ॥ अक्रूराचे दोन्हीं हात । बळदेव आणि अनंत । धरूनि प्रवेशले मंदिरांत । नंदासहित तेधवां ॥ ५० ॥ यशोदेसी नमस्कारी अक्रूर । आसनीं बैसला सादर । सांगे मथुरेचा समाचार । सविस्तर साद्यंत ॥ ५१ ॥ नंदासि म्हणे अक्रूर । कंसें बलाविलें तुम्हांसि सत्वर । बळ-देव आणि यादवेश्वर । याग पाहावया चलावें ॥ ५२ ॥ धनुर्याग पाहोनियां मागुती । सर्वेंचि यावें गोकुळाप्रती । उदया येतां गभस्ती । अति-सत्वर निघावें ॥ ५३ ॥ तों नंद-यशोदा बोलत । मथुरेसि नेतां श्रीकृष्णनाथ । तेचि क्षणीं आमुचा प्राणांत । होईल जाण अक्रूरा ॥ ५४ ॥ कृष्णाचा करावया घात । कंस अहोरात्र जपत । अक्रूरा तूं आमुचा परम आप्त । पाहें विचारूनि मानसीं ॥ ५५ ॥ अक्रूर हांसोनियां बोलत । तुमचे दृष्टीस हा बाळ दिसत । परी कृतांतासी शिक्षा करीत । कृष्णनाथ निर्धारें ॥ ५६ ॥ हरी बोले तेचि समयीं । अंतरीं भय धरूं नका कांहीं । चला मथुरेसि लवलाहीं । गौळी समागमें घेऊनी ॥ ५७ ॥ अक्रूर बोले न लागतां एक क्षण । कंसासी मारील श्रीकृष्ण । मुष्टीक[३] चाणूर[३] यांचें मरण । जवळि बहुधा पातलें ॥ ५८ ॥ कृष्णें पूर्वीं फार पराक्रम केले । ते नंद-यशोदेशी आठवले । थोर दैत्य संहारिले । अघ[४] बक केशी प्रलंब ॥ ५९ ॥ गोवर्धन-पर्वत उचलिला ।

---

१ सर्वांहून पर जी माया तीहून पर म्हणजे उत्कृष्ट किंवा पलीकडला कृष्ण. २ आलिंगन. ३ मुष्टिक आणि चाणूर हे दैत्य मोठे पहिलवान होते. त्यांनीं कृष्णाला आणि बलरामाला कुस्ती करून मारावें म्हणून कंसानें कृष्ण व बलराम मथुरेस आल्यावर त्यांची ह्यांची कुस्ती लाविली. त्यावेळीं मुष्टिकास बलरामानें मारलें आणि चाणुरास कृष्णानें मारलें. ४ अघ, बक आणि केशी ह्यांच्या कथांच्या टिपा ह्याच अध्यायांत मागें दिल्या आहेत त्या पहाव्या. प्रलंबासुर हा गौळ्याचें सोंग घेऊन कृष्ण व बलराम वृन्दावनांत गोपांसहवर्तमान खेळत होते तेथें त्यांस मारण्याकरितां गेला होता त्यास बलरामानें मारिलें.

काळिया मर्दोनि अग्नी[१] प्राशिला। आखंडल[२] शरण आला। तोही देखिला सकाळिकीं ॥६०॥ हा सर्वदा असे निर्भय। यासी काळि-काळाचें नाहीं भय। बुद्धि-बळाचा समुद्र यादव-राय। ते गोष्टी मानवली समस्तांसी ॥६१॥ कर्ता हर्ता भुवन-गोप्ता। सरी सर्वत्र जयाची सत्ता। त्या ह्या यशोदेच्या सुता। नाहीं भय कंसाचें ॥ ६२ ॥ अक्रूर म्हणे, प्रातःकाळीं। निघावे नंदादि सर्व गौळी। गोकुळीं मात प्रगटली। कीं वनमाळी उद्यां जातो ॥ ६३ ॥ तों उगवला वासर-मणी। स्नान-संध्यादि भोजन सारूनी। बळदेव आणि चक्रपाणी। सिद्ध झाले तेधवां ॥ ६४ ॥ दिव्य रथ अक्रूरें सजिला। गौळियांचा मेळा निघाला। गोरस-कावडी ते वेळां। भरोनि घेतल्या कंसभेटी ॥ ६५ ॥ यशोदा आणि रोहिणी यांतें। नमस्कारिलें बळराम-कृष्ण-नाथें। हात जोडोनियां म्हणती, माते। जाऊनि येतों पुढतीं ॥ ६६ ॥ यशोदा म्हणे, हे जगजेठी। आतां कैंची तुझी भेटी। स्नेहाचे उमाळे उठती पोटीं। स्तनीं पान्हा फूटला ॥ ६७ ॥ तूं जातोसि मन-मोहना। मी आतां न ठेवीं आपुल्या प्राणा। माझिया विसाव्या राजीव-नयना। मनरंजना श्रीहरी ॥ ६८ ॥ मम सांवळे कान्हाई। जगन्मोहने कृष्णाबाई। तुझे गुण आठवूं कितीकाई। मिती नाहीं तयांतें ॥ ६९ ॥ विश्व-रूप[३] दाविलें वदनीं। गोवर्धन उचलिला चक्रपाणी। द्वादश[४] गांवें महा अग्नी[४]। गिळोनि तुवां रक्षिलें ॥ ७० ॥ नंद बुडाला यमुना-जीवनीं।

---

१ कृष्णानें कालियामर्दन केल्यावर यमुनातीरीं एकाएकीं मोठा वणवा लागला, तो अग्नि कृष्ण प्याला अशी कथा आहे. २ इंद्र--इंद्रानें वर्षास वृष्टि चांगली करावी म्हणून त्यास प्रसन्न करून घेण्याकरितां तदुद्देशानें नंद वर्षास यज्ञ करीत असे तो न करितां ब्राह्मण, गाई, गोवर्धनपर्वत ह्यांच्या उद्देशानें यज्ञ करावा म्हणजे पर्जन्यवृष्टि चांगली होऊन धान्यतृणाची समृद्धि होईल, असें सांगून इंद्रोद्देशक यज्ञ कृष्णानें मोडिला. त्यावरून इंद्रास मोठा राग येऊन गोकूळ सर्व वाहवून नेण्याकरितां त्यानें मनस्वीच वृष्टि करविली. त्यावेळीं कृष्णानें गोवर्धनपर्वत बोटावर उचलून धरून त्याच्याखालीं सर्व गोकुळाचें संरक्षण केलें. हें इंद्रानें पाहिलें, तेव्हां इंद्र हतगर्व होऊन कृष्णास शरण आला; अशी कथा आहे. ३ कृष्णानें मृत्तिका खाल्ली म्हणून बळरामानें एकदां यशोदेस सांगितलें; तेव्हां यशोदा कृष्णास मारूं लागली, त्यावेळीं आपण मृत्तिका खाल्ली नाहीं म्हणून दाखविण्याकरितां कृष्णानें आपलें तोंड उघडून यशोदेस दाखविलें, त्या वेळीं त्यानें तोंडाच्या आंत सर्व विश्व दाखविलें. ४ कंसानें एकदां कृष्णास मारण्याकरितां गोकुळांत दूत पाठवून गोवर्धनपर्वत आणि आजूबाजूचें बारा कोस अरण्य ह्यांस आग लावविली ती कृष्णानें गिळली, अशी कथा आहे.

घेऊनि आलासि सारंगपाणी। सर्पें गिळिलें शक्ति-स्थानीं[1]। तेथें रक्षिलें पाडसा ॥ ७१ ॥ ब्रह्मांड-नायका मी तव जननी। म्हणतां लज्जा वाटे मनीं। माता पिता बंधु भगिनी। तूंचि माझी श्रीरंगा ॥७२॥ मातेचिया चरणांवरी। मस्तक ठेवी श्री-मुरारी। माता म्हणे, पूतनारी। उपेक्षा कां केली तुवां माझी ॥ ७३ ॥ तंव गोपिका आल्या धांवत। दोहीं हातीं हृदय पिटित। कितीएक पडती मूर्च्छागत। थोर प्राणांत वोढवला ॥ ७४ ॥ एक धरणीवरी लोळती। एक दीर्घ-स्वरें हाका देती। एक अवनीवरी कपाळ पिटिती। प्राणांत गती वोढवली ॥ ७५ ॥ एक म्हणती, गेला सांवळा। आतां अग्नी लावा गोकुळा। गोकुळींचा प्राण चालिला। प्रेत-कळा आली पैं ॥ ७६ ॥ हा चांडाळ अक्रूरा परियेसीं। अकस्मात कोठोनि आलासी। आहा गोकुळींचा प्राण नेतोसी। निर्दय होसी तूं साच ॥ ७७ ॥ सकळ गौळणींचिया हत्या। अक्रूरा पडतील तुझीया माथां। नेऊं नको श्री-कृष्णनाथा। इतुकें आतां आह्मांसि देईं ॥७८॥ तुझें ठेविलें नाम अक्रूर। परि तुजसारिखा नसे निर्दय थोर। बहुत झालासी कां क्रूर। परम निष्ठूर तूं होसी ॥ ७९ ॥ तंव राम-कृष्ण रथावरी। बैसोनियां चालिले सत्वरी। रथापुढें येऊनि व्रज-नारी। धरणी आडव्या पडताती ॥ ८० ॥ एक अक्रूरापुढें पदर पसरोन। म्हणती, आम्ही अ-नाथ दीन। करीं आजि कृष्ण-दान। कीर्ति त्रि-भुवनीं भरों दे ॥ ८१ ॥ अक्रूरा देखतां घेऊनियां माती। गोपी आपुल्या मुखीं घालिती। म्हणती, मन-मोहना यदु-पती। भेटसी आतां कधीं तूं ॥८२॥ ऐसें देखोनि त्या अवसरा। अष्ट-भाव[2] नावरती अक्रूरा। नयनीं चालिल्या अश्रु-धारा। प्रेम देखोनि गोपिकांचें ॥८३॥ म्हणे धन्य धन्य यांचें प्रेम। यांनीं वश्य केला पुरुषोत्तम। जो निर्विकार पर-ब्रह्म। नाम-रूपातीत जो ॥ ८४ ॥ गोपींचिया शोकासी नाहीं पार। जैसा वनासि जातां रघुवीर। पाठी लागे अयोध्या-नगर। तैसेंचि येथें जाहलें ॥ ८५ ॥ जीवनावीण मीन जैसे। गोकुळींचे लोक तळमळती तैसे। यशोदेशीं मूर्च्छा येतसे। धांवतसे रथापाठीं ॥ ८६ ॥ माझे विसाविया जग-जीवना। तुझें मुख पाहों दे मन-मोहना। येई मज प्रेमाचा पान्हा। पाजूं कोणा सांग पां ॥ ८७ ॥ माझे सांवळे कान्हाई। उभी राहें

---

१ देवीच्या जत्रेंत—एकदां नंद हा अंबिकेच्या जत्रेस गेला असतां तेथें सर्पानें (अजगरानें) त्यास गिळिलें; तेव्हां तेथें कृष्णानें त्यापासून त्यास (नंदास) सोडविलें. अशी कथा भागवत, दशमस्कंध पूर्वार्ध ह्यांत आहे. २ सात्त्विक अष्टभाव; (मागें पृष्ट ३१२ टीप १ पहा.)

कृष्णा-बाई । तुजवेगळ्या दिशा दाही । वोस झाल्या मज आतां ॥ ८८ ॥ व्रज-स्त्रियांचा आकांत भारी । ऐकोनि श्री-कृष्ण रथावरी । हातानें दुरूनि खुणा करी । येईन लौकरी म्हणोनी ॥ ८९ ॥ हरी म्हणे अक्रूरा । आतां रथ चालों द्या सत्वरा । तरीच ह्या गोपिका सुंदरा । दूरी मागें राहतील ॥ ९० ॥ रथ घडघडां समीर-गती । क्रमूनि मागें टाकिली जगती । तेधवां गोपिका मूर्च्छागत पडती । हांका फोडिती कृष्ण-नामें ॥ ९१ ॥ म्हणती सखया वनमाळी । तुझा वियोगानळ आम्हां जाळी । एक म्हणती रथाजवळी । धांवोनि जाऊं चला गे ॥ ९२ ॥ अक्रूरासि घालोनि कृष्णाची आण । रथ वेगें आणावा परतोन । नेदी तरी बळें हिरोन । आणूं मन-मोहन आतांची ॥ ९३ ॥ आम्ही आहोंत इतक्या सुंदरी । अक्रूर एकला काय करी । तों रथ गेला बहुत दूरी । विकळ नारी पडियेल्या ॥ ९४ ॥ रथ उतरला खोल भूमिस । न दिसे ध्वज आणि कलश[१] । मग होऊनियां निराश । गोपी समस्त परतल्या ॥ ९५ ॥ अवघ्या गोपी आकांत करीत । गोकुळा चालिल्या समस्त । एक म्हणती आग त्वरीत । लावा आतां गोकुळा ॥ ९६ ॥ ऐसा शोक करीत सुंदरी । प्रवेशल्या यशोदेच्या मंदिरीं ॥ यशोदा म्हणे ते अवसरीं । माझा श्री-हरी दावा गे ॥ ९७ ॥ सकळ गोपी यशोदेचे कंठीं । घालिती तेधवां दृढ मिठी । शोक केला तो न माय सृष्टीं । न वर्णवेचि कोणातें ॥९८॥ श्रीकृष्णाचीं बाळ-लेणीं । टाकिलीं गोपींपुढें आणोनी । हरीचीं खेळणीं पोटीं धरूनी । माय रडे तेधवां ॥ ९९ ॥ असो तें, खेद करीत गौळिणी । प्रवेशल्या आपुल्या सदनीं । गृह-कृत्य करितां चक्रपाणी । गीत गाती सर्वदा ॥ १०० ॥

अध्याय अठरावा.

---

## वेंचे ; पांडव-प्रतापांतील

ओव्या

### अभिमन्यु-वध

जो सच्चिदानंद कमळा-पती । तो झाला पार्थाचा सारथी । जो भक्ताचे मनो-रथीं । बैसोनि सूत्र हालवी । युद्धास गोविंला अर्जुन । इकडे काय झालें वर्तमान । चक्र-व्यूह[२] गुरुद्रोण । रचिता झाला अद्भुत ॥ २ ॥ सुपर्ण-व्यूह[३]

१ कळस. २ चक्राकार सैन्याची रचना. ३ गरुडाकार सैन्याची रचना.

पांडव रचित । धर्मासि अवघेचि रक्षित । युद्ध मांडलें अद्भुत । द्रोणें आणि भीमसेनें ॥ ३ ॥ नकुळ सहदेव पांचाळ । अवघे युद्ध करिती सबळ । परी चक्र-व्यूह भेदावया बळ । कोणासही दिसेना ॥ ४ ॥ धर्म म्हणे, असता पार्थ । तरी हा व्यूह भेदिता निश्चित । तों पुढें येऊन सुभद्रा-सुत । धर्म-राजास विनवीतसे ॥ ५ ॥ तुम्हीं मज आज्ञा द्याल जरी । तरी हा व्यूह भेदीन निर्धारीं । धर्म म्हणे ते अवसरीं । तूं बाळक सु-कुमार ॥ ६ ॥ मग बोले पार्थ-नंदन । आम्हां क्षत्रियां रण हेंचि धन । ताता तुमचे दयेकरून । व्यूह भेदून जाईन मी ॥ ७ ॥ परम सुंदर सुभद्रा-सुत । रूपासीं तुळितां उणा मन्मथ । दुसरा श्रीकृष्णचि मूर्तिमंत । विराट-जामात जो होय ॥ ८ ॥ घन-श्याम-वर्ण राजीव-नयन । आ-जानु-बाहु सुहास्य-वदन । जो पांडवांसी प्राणांहून । आवडता पांचांसही ॥ ९ ॥ ऐसा तो उत्तरा-वर । रथावरी चढला सत्वर । उदयाद्रीवरी दिनकर । तैसा सुंदर दिसतसे ॥ १० ॥ केला धर्मास नमस्कार । युद्धा निघाला पार्थ-कुमर । तों सहस्रावधी राज-पुत्र । व्यूहाप्रती रक्षिती ॥ ११ ॥ व्यूह भेदीत जाय सौभद्र । दहा सहस्र मारिले कुंजर । एक अयुत[१] महा-वीर । अश्वांसहित पाडिले ॥ १२ ॥ एक अयुत महा-रथी । तात्काळ पाडी उत्तरा-पती । जेथें शंभर राज-पुत्र रक्षिती । त्या स्थळासी पातला ॥ १३ ॥ दळासहित राज-कुमर । एकल्यावरी सोडिती शर । परि तो आनकदुंदुभी-कन्या-कुमर[२] । तितुके तोडी क्षण-मात्रें ॥ १४ ॥ तितुक्यांचें बाण-जाळ । एकसरें भेदी सुभद्राबाळ । जैसें उगवतां सूर्य-मंडळ । भ-गणें[३] सर्व लोपती ॥१५॥ एक उठतां विनायक । असंख्य संहारती दंदशूक । कीं सुटतां चंड-वात देख । जलद-जाळ वितुळत ॥ १६ ॥ एक-विष्णु-नामेंकरून । असंख्य दुरितें जाती जळून । कीं चेततां कृशान । असंख्य वनें दग्धती ॥ १७ ॥ कीं मूढाचें वाग्जाळ समस्त । एका शब्दें उडवी पंडित । कीं एक सिंह नाग बहुत । पडती गत-प्राण होऊनी ॥ १८ ॥ हृदयीं प्रगटतां बोध । सहपरिवारें पळती काम-क्रोध । कीं प्रत्यया येतां ब्रह्मानंद । क्षुद्रानंद विरमती ॥ १९ ॥ तैसा एकलाच धनंजय-कुमर । परी सैन्यें केलीं अवघीं जर्जर । कोणी उचलितां कर । शस्त्रासहित भुजा छेदी ॥ २० ॥ दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण । त्यासीं युद्ध केलें निर्वाण । घेतला तात्काळ त्याचा प्राण । शीर उडवूनी पाडिलें ॥ २१ ॥

---

१ दहा हजार. २ वसुदेवाची कन्या ( सुभद्रा ) तिचा मुलगा अभिमन्यु. ३ नक्षत्रगण.

बाण सोडीत धांवला कर्ण । तों दो बाणीं छेदिले त्याचे कर्ण । आंग काढून भानु-नंदन । पळता झाला एकीकडे ॥ २२ ॥ दश बाणीं सुयोधन खिळिला । द्रोण पांच बाणीं विंधिला । जयद्रथ तात्काळ पळविला । एका बाणें-करोनी ॥ २३ ॥ अश्वत्थामा कृपाचार्य । हेही पळती गत-वीर्य । देखोनी अभिमन्यूचें शौर्य । द्रोण मस्तक डोलवी ॥ २४ ॥ व्यूहामाजी सांपडला पार्थ-कुमर । साहा जण महा-वीर । सोडिते झाले निर्वाण शर । एकलिया बाळावरी ॥ २५ ॥ सुकुमार तो सौभद्र । एकल्यासि हाणिती महा-वीर । चहूंकडे पाहे सुंदर । आपुलें कोणी दिसेना ॥ २६ ॥ असता पिता अर्जुन । तरी साह्य करिता येथें पूर्ण ॥ जयद्रथ व्यूह-द्वार धरून । शिव-वरदें[1] नाटोपे ॥ २७ ॥ आक्रांत भोंवे पांडव-दळीं । जवळी नाहीं पार्थ-वनमाळी ॥ व्यूह फोडी ऐसा बळी । कोणी नाहीं पांडवांत ॥२८॥ युद्ध करित अभिमन्य । कर्णें सोडिले निर्वाण बाण । हातींचें धनु तोडून । बाणभाता छेदिला ॥२९॥ सारथी घोडे ते वेळे । द्रोणाचार्यें मारिले । मग अभिमन्यें खड्ग घेतलें । रथाखालीं उतरला ॥ ३० ॥ जैसी वीज लवोनि जाये । तैसा अभिमन्य तळपताहे । तों दुर्योधनें खड्ग लवलाहें । एके बाणें छेदिलें ॥ ३१ ॥ मग गदा घेऊन पार्थ-सुत । अमित वीरांतें पाडित । तों दुःशासनें त्वरित । गदा छेदिली हातींची ॥ ३२ ॥ मग घेतलें रथ-चक्र । रणीं तळपे सुभद्रा-कुमर । जैसा कृष्ण चक्र-धर । तैसा वीर दिसतसे ॥ ३३ ॥ कर्ण द्रोण दुर्योधन । सोडिती बाणापाठीं बाण । हातींचें रथ-चक्र जाण । अश्वत्थामियानें छेदिलें ॥ ३४ ॥ तों दुःशासनाचा पुत्र दौःशासनी । वेगें आला गदा घेउनी । अभिमन्यें तेच क्षणीं । गदा दुसरी घेतली ॥ ३५ ॥ दोघीं गदा-युद्ध मांडिलें । सकळीं बाण-जाळ घातलें । दौःशासनीस केलें । अभिमन्यें मूर्छित ॥ ३६ ॥ सर्वेंच दुःशासन-सुतें । हाणीतलें अभिमन्यातें । दोघे पावले मूर्छेतें । गदा-घातें एकमेक ॥ ३७ ॥ मूर्छा सांवरोनि दौःशासनी । वेगें आला गदा घेउनी । विकळ सौभद्र पडलिया रणीं । त्याचे मस्तकीं घातली ॥ ३८ ॥ तेणें चूर्ण झालें शीर । पडला पार्थाचा कुमर । तों अ-शरीरिणी वदली उत्तर । 'धर्म-युद्ध नव्हे हें' ॥ ३९ ॥ सकळ दळ-भार एकवटला । भोंवता पहावया पाळा[2] पडला । त्यांत जयद्रथें हाणीतला । अभिमन्यु लातेनें ॥ ४० ॥ द्रोणें धिक्कारिलें जयद्रथा ।

---

१ शंकराच्या वरदानानें. २ गर्दी.

दुर्जना, वीरा हाणिशी लत्ता । त्या अभिमन्यें बाणावारीं झोडितां । पळालासी सत्वर ॥ ४१ ॥ कौरव गेले समस्त । अभिमन्य घायें विलपत । श्रीहरीचें स्मरण करीत । वाट पहात पार्थाची ॥ ४२ ॥ पांडव-दळीं आकांत दारुण । धर्मराज करी रुदन । आतां येईल अर्जुन । त्यासि काय वदन दाखवूं ॥ ४३ ॥ दिवस गेला अस्तमानासी । वधून येतां समसप्तकांसी[1] । अप-शकुन पार्थासी । मार्गीं येतां होतसे ॥ ४४ ॥ धर्माजवळी आला अर्जुन । अवघे देखिले अधो-वदन । पार्थ पुसे कोठें अभिमन्य । कां उत्साह मंदिरीं न दिसे ॥ ४५ ॥ धर्म बैसला अधोवदन । कां मौन धरी, भीमसेन । म्हणे, संसार-माया अभिमन्य । त्यजुनी गेला स्वर्गातें ॥ ४६ ॥ रथाखालीं पडला अर्जुन । पुत्र-शोकें करी रुदन । मग श्रीकृष्णें संबोखून । सावध केलें पार्थासी ॥४७॥ अर्जुन अवघ्यांसी धिक्कारित । जळो जळो तुमचा पुरुषार्थ । इतुके असतां माझा सुत । कां पाठविला संग्रामा ॥ ४८ ॥ उपलव्य[2] नगरीहुनी । उत्तरा, सुभद्रा द्रौपदी धांऊनी । त्वरें आल्या बसोनि वहनीं । हृदय पिटीत अति-दुःखें ॥४९॥ सुभद्रेतें न धरवे धीर । शरीर टाकिलें पृथ्वीवर । माझा अभिमन्य सुकुमार । दावा एकदां पाहीन मी ॥ ५० ॥ हे अभिमन्या कमळ-लोचना । हे सौभद्रा चंद्र-वदना । हे कोमलांगा मधुर-भाषणा । ये धांऊनि मज भेटें ॥ ५१ ॥ हे घनश्याम-वर्णा । हे अभिमन्या प्रति-अर्जुना । हे महा-वीरा सुहास्य-वदना । ये धांवूनि मज भेटें ॥ ५२ ॥ द्रौपदी म्हणे, अभिमन्या । हे वत्सा सद्गुण-निधाना । हे तरुणा तुझी अंगना । उत्तरा आतां करील काय ॥ ५३ ॥ हे किशोर-वया परम उदारा । समर-धीरा प्रताप-शूरा । पांडव-कुल-दीपका सुंदरा । केली त्वरा सर्वां आधीं ॥ ५४ ॥ उत्तरेच्या गळां मिठी घालिती । सुभद्रा द्रौपदी शोक करिती । तें देखोनि पार्थ श्रीपती । शोकार्णवीं बुडाले ॥ ५५ ॥ बोले सुभद्रा वेल्हाळ । इतुके वीर असतां सबळ । सांपडला व्यूहामाजी बाळ । पाठी कोणी न राखेची ॥ ५६ ॥ विकळ पडतां माझें किशोर । जयद्रथें दिधला लत्ता-प्रहार । धिक् गांडीव धिक् तूणीर । धिक् यदु-वीर पार्थ पैं ॥ ५७ ॥ यावेगळा अपारमित । धर्माच्या शोकासि नाहीं अंत । तों व्यास आणि ब्रह्म-सुत । नारद-स्वामी प्रगटले ॥५८॥ सर्वांचेंही समाधान । करी सत्यवती-हृदय-रत्न । म्हणती, सुभद्रे तूं सुजाण । भगिनी होसी सर्वोत्तमाची ॥ ५९ ॥ वीर-पत्नी वीर-जननी । वीर-कुमरी यदुवीरभगिनी । अभिमन्यु पडला समरांगणीं । शोक न करी तयाचा ॥६०॥ ऐकें धर्मा भीमार्जुना । शोक करितां कोण्या कारणा । हे अवघी ब्रह्मांड-रचना ।

१ समसप्तकांस. २ उपलव्य म्हणून विराटनगराजवळ एक खेडें होतें.

लया जाणार कल्पांतीं ॥ ६१ ॥ संसार हें दीर्घ स्वप्न । जाजावती मी माझें म्हणोन । सावध व्हा उघडा नयन । निज-मानसीं विचारा ॥ ६२ ॥ असो, व्यासें सांगोनि बहुत कथा । सावधान केलें कुंती-सुतां । नारद आणि श्री-शुक-पिता । अंतर्धान पावले ॥६३॥ सुभद्रेसी म्हणे पार्थ । उद्यां वधीन जयद्रथ ॥ कौरव-दळ समस्त । तृणवत् जाळीन पैं ॥६४॥ हें जरी नव्हे माझेनी । तरी वृथा प्रसवली पृथाजननी । लाज लागली कुरु-वंशालागुनी । कृष्ण-दास्य व्यर्थ गेलें ॥ ६५ ॥ कोठें पडला रणीं बाळ । तो पहावया पार्थ घन-नीळ । निघते झाले तात्काळ । निशीमाजी तेधवां ॥ ६६ ॥ रथ वेगें चालविला । चंद्र-ज्योतीचा प्रकाश केला । रण शोधावया निघाला । पार्थ-वीर तेधवां ॥६७॥ देखती सौभद्रें पाडिलें रण । आश्चर्य करिती कृष्ण-अर्जुन । बहुत केलें रण-शोधन । परी बाळ कोठें न सांपडे ॥ ६८ ॥ तों मंजुळ हरीचें स्मरण । ऐकता होय अर्जुन । 'हे जगन्निवास मन-मोहन । मधु-सूदन श्रीहरी' ॥ ६९ ॥ अभिमन्याचे शब्द कोमळ । अर्जुनें वोळखिलें तात्काळ । रथारूढ पार्थ घन-नीळ । आले जवळ धांवोनी ॥ ७० ॥ सौभद्रें नेत्र उघाडिले । पार्थें आंग धरणीसी टाकिलें । अभिमन्यासी पोटीं धरिलें । पार्थें मांडिलें शोकातें ॥ ७१ ॥ अरे माझीया सुकुमारा । बाळा अभिमन्या सुंदरा । मजवांचुनि राज-कुमारा । कां आलासी ये स्थळीं ॥ ७२ ॥ तैं पार्थाचिये कानीं । हळूच अभिमन्य बोले वाणी । मी पडलों घोर धरणीं । याचा खेद मज न वाटे ॥ ७३ ॥ मी निचेष्टित पडलों येथें । मज लत्ता-प्रहार केला जयद्रथें । तेणें सर्वांग तिडकतें । हें मज दुःख अति भारी ॥ ७४ ॥ ऐसें ऐकोन वचन । मग संबोखी वीर अर्जुन । तुझें उसणें वेईन । कांहीं खेद न करावा ॥७५॥ बा रे सुकुमारा परियेसीं । उद्यां जरी न मारीन जयद्रथासी । तरी अग्निकाष्ट भक्षीन निश्चयेंसी । तुझीच आण अभिमन्या ॥ ७६ ॥ तों न्याहाळीत कृष्ण-वदन । मुखीं करीत हरि-स्मरण । अभिमन्यें सोडिला प्राण । श्रीकृष्ण आपण पाहातसे ॥ ७७ ॥ असो पार्थ कृष्णें सबोखिला । रथीं बैसवूनि शिबिरा नेला । निद्रा नाहीं अवघ्यांला । चिंताग्नींत पडियेले ॥ ७८ ॥ पार्थें प्रतिज्ञा केली दुस्तर । सिद्धीस पाववो सर्वेश्वर । ऐसें बोलोनि यादवेंद्र । जाता झाला स्वशिबिरा ॥ ७९ ॥ केशवासी म्हणे पार्थ । म्यां जे केली दृढ शपथ । ते तुजवीण कोण समर्थ । सिद्धीप्रती पाववी ॥ ८० ॥ भक्तकैवारिया माधवा । पण आतां सिद्धी न्यावा । दीन-बंधो करुणार्णवा । ब्रीद आपुलें सांभाळीं ॥ ८१ ॥ काष्टा न बुडवी जीवन ।

आपण वाढविलें म्हणोन । पांडव-प्रतिपाळक हें ब्रीद पूर्ण । ब्रह्मांडोदरीं गाजतसे ॥ ८२ ॥ मागील उपकार आठवतां । पृथ्वी न पुरे यश लिहितां । विश्व-व्यापका अच्युता । ऋणाईत आमुचा तूं ॥ ८३ ॥ पार्थाच्या मनीं चिंता देखा । हें जाणोनी विश्व-व्यापका । रात्रीं निद्रा न ये वैकुंठ-नायका । मग दारुकाप्रति बोलत ॥ ८४ ॥ उदईक असे निर्वाण-पण । कसा पुरवील अर्जुन । धनंजय केवळ माझा प्राण । मज त्यावीण न गमेची ॥ ८५ ॥ दारुका ऐक वचन । उद्यां सिद्ध करीं माझा स्यंदन । चारी घोडे जुंपून । शैब्य-सुग्रीवादि शृंगारीं[1] ॥ ८६ ॥ सतेज आयुधें परम । शंख-चक्र-गदा-पद्म । वरी ठेवूनि उत्तम । सिद्ध स्यंदन असों दे ॥ ८७ ॥ पार्थासी घडलिया विपरित । मी तुज दावीन संकेत । मनोवेगें आणीं रथ । बैसावया मज तेव्हां ॥ ८८ ॥ सोडोनियां सुदर्शन । संहारीन कौरव दुर्जन । ऐसें सांगोन जगन्मोहन । शयनावरी पहुडला ॥ ८९ ॥

अध्याय पंचेचाळिसावा.

---

## वेंचे ; शिव-लीलामृतांतील

## श्रियाळचारित्र

करीं वीणा घेवोनि ब्रह्मसुत[2] । शिवाजवळी आला अकस्मात । म्हणे हे विश्वंभर विश्वनाथ । तुझे भक्त देखिले बहु ॥ १ ॥ परी कांती-नगरीं श्रियाळ । धीर गंभीर उदार सु-शीळ । कीर्तीनें भरलें दिग्मंडळ । सात्त्विक केवळ क्षमावंत ॥ २ ॥ तेणें घातलें अन्न-सत्र । झालीं वर्षें दहा सहस्त्र । इच्छा-भोजन-दान पवित्र । अतीतांप्रती देतसे ॥ ३ ॥ अवनीवरी जे अ-गम्य वस्त । भोजनीं मागीतली अकस्मात । ती प्रयत्नें आणोनि पुरवीत । शिव-भक्त थोर तो ॥ ४ ॥ ऐसें नारद सांगतां वर्तमान । त्याच्या गृहाप्रती पंच-वदन । कुश्चळ अतीत-वेष धरून । येता झाला ते समयीं ॥ ५ ॥ आंगणीं उभा ठाकला येऊन । परम-कोपी जेविं दावाग्न । दुष्ट वचन बोले कठीण । रूपहीं संपूर्ण कुश्चळची ॥ ६ ॥ म्हणे मज दे इच्छा-भोजन । नातरी जातों सत्त्व

---

१ शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प आणि बलाहक ह्या नांवांचे कृष्णाचे चार घोडे होते.

२ नारद.

घेवोन । श्रियाळ-चांगुणा येऊन । पाय धरिती सद्भावें ॥ ७ ॥ आणोनि बैसविला आसनीं । त्याचीं क्रोध-वचनें सोसुनी । षोडशोपचारें पूजा करोनी । कर जोडोनी ठाकती पुढें ॥ ८ ॥ मागा स्वामी इच्छा-भोजन । येरू म्हणे, नर-मांस देईं आणोन । तूं चोर हेर आणिसी धरून । त्याचें मांस न घें मी ॥ ९ ॥ धरूनि माझा उद्देश । विकत आणिसील मनुष्य । तें न घें मी निःशेष । सत्य सत्य त्रि-वाचा ॥ १० ॥ चांगुणा म्हणे कर जोडून । मी आपुलें मांस देत्यें, करीं भोजन । श्रियाळ म्हणे, मानेल पूर्ण । माझें मांस देतों मी ॥ ११ ॥ येरू म्हणे, तुम्ही पवित्र तत्त्वतां । परी सर्व याचकांचे माता-पिता । तुम्हां दोघांसि भक्षितां । अन्न-सत्र खंडेल ॥ १२ ॥ तरी तुमचा एकुलता एक स्नेहाळ । पांचवर्षांचा चिलया बाळ । बत्तीस लक्षणीं वल्हाळ । तो मज देईं भोजना ॥ १३ ॥ ऐसें ऐकतां वचन । माया-मोह-जाळ दूर करून । म्हणती अवश्य जा घेवोन । मग सदाशिव बोलत ॥ १४ ॥ मी काय आहें वृक, व्याघ्र, रीस । भक्षूं तव पुत्राचें मांस । उबग न मानूनि विशेष । पचवूनि घालीं मज आतां ॥ १५ ॥ माया-मोह धरून । कोणी कराल जरी रुदन । तरी मी जाईन उठोन । सत्त्व घेऊनि तूमचें ॥ १६ ॥ 'अवश्य' म्हणोनि पतिव्रता । उभी ठाकोनि बाहे निजसुता । म्हणे, बाळा चिलया गुणवंता । खेळाया कोठें गेलासी ॥ १७ ॥ तुजलागीं खोळंबला अतीत । बाळा माझ्या येईं धांवत । ऐसें ऐकतां अकस्मात । बाळ आला धांवोनी ॥ १८ ॥ अतीतासी करूनि नमन । माता-पितयांचे धरी चरण । माता म्हणे, तुझें पिशित-दान[1] । अतीत मागतो राजसा ॥ १९ ॥ बाळ बोले स्नेहेंकरून । हा देह म्यां केला शिवार्पण । अतीत होतां तृप्त पूर्ण । उमा-रमण संतोषेल ॥ २० ॥ ऐसें ऐकतां झडकरी । बाळ घेतला कडियेवरी । पाक-शाळेभीतरीं । घेऊनि गेली वधावया ॥ २१ ॥ चिलयासी चुंबन देऊन । हृदयीं धरिला प्रीतीकरून । बाळ म्हणे, पुढती येईन । तुझ्या उदरा जननीये ॥ २२ ॥ माया-जाळ सर्व सोडून । मन केलें वज्राहूनि कठीण । चिलयाचें शिर छेदून । काढिलें मांस अंगींचें ॥ २३ ॥ आपणासी पुत्र नाहीं म्हणोनियां । शिर-कमळ ठेविलें पहावया ॥ शरीराचा पाक करूनियां । उठवी भोजना अतीतातें ॥ २४ ॥ अतींद्रिय-द्रष्टा श्री-शंकर । अनंत ब्रह्मांडींचा समाचार । सर्व ठाऊका सूत्रधार । कळलें शिर ठेविलें

---

१ मांसदान.

तें ॥ २५ ॥ उठोनि चालिला तात्काळ । धांवती चांगुणा-श्रियाळ । येरू म्हणे, कळलें सकळ । शिर-कमळ ठेविलें ॥ २६ ॥ सर्व गात्रांत शिर प्रधान । तेंच कैसें ठेविलें वंचून । तंव तीं दोघें धरिती चरण । तेंही पचवूनी घालितों ॥ २७ ॥ क्षोभ न धरावा अंतरीं । नेणतपणें चुकलों जरी । सर्वज्ञा तूं क्षमा करीं । सत्त्व आमुचें राखावें ॥ २८ ॥ मग बैसला आसनीं येऊन । म्हणे, शिर येई बाहेर घेऊन । उखळांत घालूनि कंडण । मज देखतां करीं आतां ॥ २९ ॥ अश्रु आलिया तुझे नयनीं । कीं कष्टी झालिया अंतःकरणीं । तरी पुत्र गेला, सत्त्वास हानी । करून जाईन तूमच्या ॥ ३० ॥ अवश्य म्हणे नृप-ललना । शिर आणोनि करी कंडणा । सत्त्व पाहे कैलासराणा । अंतरीं सद्गद होउनी ॥ ३१ ॥ निज-सत्त्वाचें उखळ । धरिलें धैर्याचें करीं मुसळ । कांडीत बसली वेल्हाळ । निर्धार अचळ धरूनियां ॥ ३२ ॥ अतीत म्हणे, परम मंगळ । गीत गाय रसिक सुढाळ । खंती करितां पयः-फेन-धवल । दुरावेल जाण पां ॥ ३३ ॥ ते सद्भाव-सरोवर-विलासिनी । कोमलहृदय नृप-कामिनी । कीं निश्चय-गंगा भरूनी । जात मर्यादा धरूनियां ॥ ३४ ॥ तिचें पाहतां मग वदन । काळवंडला रोहिणी-रमण । मृग-शावाक्षी गुण-निधान । उपमा नाहीं स्वरूपातें ॥ ३५ ॥ म्हणे, कोमलांगा बाळा सुकुमारा । सु-लक्षणा सु-शीला नृप-किशोरा ॥ सु-हास्य-वक्त्रा राजीव-नेत्रा । येवोनी उदरा धन्य केलें ॥३६॥ तूं सु-कुमार परम-गुणवंता । माझे निष्ठुर घाव लागती माथां ॥ तुजवीण परदेशी आतां । दुबळी भणंग झालें मी ॥ ३७ ॥ कुच-कमंडलीं अतिसुंदरा । कंचुकीबाहेर फुटल्या दुग्ध-धारा । कीं भू-लिंगासी एकसरां । गळत्या लाविल्या तियेनें ॥३८॥ म्हणे अतीत जेवोनि अवधारीं । जाऊं दे राज-द्वाराबाहेरी । देह त्यागीन ये अवसरीं । यावरी धीर न धरवे पैं ॥३९॥ कैलास-पंथ सखया लक्षून । एकला जातोसी मज टाकून । तुझे संगतीं मी येईन । उभा राहें क्षणभरीं ॥४०॥ तूं मोक्ष-द्वीपाचें केणें भरून । जासी कैलास-राज-पेठ लक्षून । तुजसंगतीं मी उद्धरेन । मज टाकूनि जाऊं नको ॥ ४१ ॥ उदकावीण जैसा मीन । तैसी मी तान्हया तुजवीण ॥ माझें हृदय निर्दय कठीण । लोकांत वदन केविं दावूं ॥ ४२ ॥ तुझी माउली मी म्हणतां । लाज वाटे रे गुणवंता । तुवां आपुली सार्थकता । करूनि गेलासी शिव-पदा ॥ ४३ ॥ हें त्रि-भुवन शोधितां सकळ । तुज ऐसा न दिसे बाळ । मग तें पचवूनि तात्काळ । 'उठा' म्हणे अतीतातें ॥ ४४ ॥ अतीत म्हणे,

अवनी-पती । उठा तुम्हीं यजमान माझे पंक्ती । ऐसें ऐकतां श्रियाळ-नृपती । झाला चित्तीं संकोचित ॥ ४५ ॥ चांगुणा म्हणे, नृप-नाथा । सत्त्व राखावें सत्वर आतां । विन्मुख जाऊं न द्यावें अतीता । मनीं चिंता न धरावी ॥४६॥ नव-मास वाहिला ज्यां उदरांत । तुम्हांस जड नव्हे चौप्रहरांत । पोटींचा पोटीं घालितां सुत । चिंता काय नृप-श्रेष्ठा ॥ ४७ ॥ राव बैसला पंक्तीसी । ताट वाढोनि आणिलें वेगेंसीं । अतीत म्हणे चांगुणेसी । तूंही येई सवेगें ॥४८॥ अवश्य म्हणोनि झडकरी । येवोनि बैसली नृप-सुंदरी । यावरी अतीत म्हणे, तुमच्या मंदिरीं । अन्न न खावें सर्वथा ॥ ४९ ॥ निपुत्रिकाचें न पहावें वदन । मग तेथें कोण घेईल अन्न । दीपेंवीण शून्य सदन । पुत्रावीण तेविं तुम्ही ॥ ५० ॥ नासिकेवांचोनि वदन । कीं वृक्ष जैसा फळावीण । कीं बुबुळांवीण जैसे नयन । शून्य सदन तुमचें तेवीं ॥ ५१ ॥ तंव तीं दोघें बोलती सद्गदित । एक होता तो अर्पिला सुत । चांगुणा म्हणे, गेलें सत्त्व । अतीत विन्मुख जाईल आतां ॥ ५२ ॥ एक बाळ तो दिधला भोजनासी । आतां महाराजा सत्त्व किती पाहसी । ऐसें बोलतां चांगुणेसी । अद्भुत गहिंवर दाटला ॥ ५३ ॥ म्हणे सत्त्वही बुडालें सकळ । वृथा गेलें माझें बाळ ॥ मग कंठ मोकळा करूनि ते स्नेहाळ । हाक फोडी चांगुणा ॥ ५४ ॥ नयनीं चालिल्या प्रेमाश्रु-धारा । म्हणे, अहा शिव कर्पूर-गौरा ॥ दीर्घ-स्वरें बाहे उमावरा । पाव सत्वरीं या आकांतीं ॥५५॥ अहा झालें वंश-खंडन । न देखों पुढती पुत्र-वदन ॥ ऐसें ऐकतां अतीताचे नयन । स्रवों लागले प्रेम-भरें ॥ ५६ ॥ बाहेर फुटली मात । वळसा थोर होत नगरांत । लोक दुःखें वक्षःस्थळ पिटीत । राज-किशोर आठवुनी ॥५७॥ विमानीं दाटले सुरवर । म्हणती धन्य पतिव्रता सत्त्व-धीर । ईस प्रसन्न होऊनि श्रीशंकर । काय देईल तें न कळेची ॥ ५८ ॥ अतीत म्हणे चांगुणेसी । जें प्रिय असेल तुझे मानसीं । तें मज माग सद्गुणराशी । यावरी सती काय बोले ॥ ५९ ॥ मज निपुत्रिक म्हणतील लोक । हा धुवोनि काढीं कलंक । ऐसें ऐकतां कैलास-नायक । बोलावी म्हणे पुत्रासीं ॥ ६० ॥ सत्य मानूनि अतीत-वचना । दीर्घ हाका फोडीत चांगुणा । म्हणे, चिलया गुण-निधाना । येईं स्नेहाळा धांवोनी ॥ ६१ ॥ अतीत तुजवीण न घे ग्रास । कोठें गुंतलास खेळावयास । माझें तान्हें तूं पाडस । सत्त्व राखी येवोनियां ॥ ६२ ॥ तूं न येसी जरी धांवोन । तरी माझा जाऊं पाहे प्राण । दश-दिशा विलोकून । चांगुणा पाहे तेधवां ॥ ६३ ॥ मागुती हाक फोडी वेल्हाळ । तों जैसें उगवे मित्र-मंडळ । तैसा धांवतचि

आला बाळ । पाहे श्रियाळ स्नेह-भरें ॥ ६४ ॥ अतीत-स्वरूप टाकून । शिव प्रगटला निज-रूप पूर्ण । दश-हस्त पंच-वदन । दीनोद्धारण जगद्गुरू ॥ ६५ ॥ चिलया शिवें हृदयीं धरिला । निज अंकावरी बैसविला । श्रियाळ-चांगुणा ते वेळां । पायांवरी लोळती ॥ ६६ ॥ सुर-वर सुमनें वर्षती अपार । दुंदुभि-नादें कोंदलें अंबर । आनंद-मय झालें नगर । धांवती लोक पाहावया ॥ ६७ ॥ शिवें आणविलें दिव्य विमान । श्रियाळ चांगुणा दिव्य-रूप होऊन । चिलयासी सिंहासनीं स्थापून । छत्र धरिलें तयावरी ॥६८॥ सचिवांस निरवोनी राज्य-भार । विमानीं बैसलीं सत्वर । निज-पदीं जगदोद्धार । श्रीशंकर स्थापी तयां ॥ ६९ ॥ कांती-नगरीं सौख्य अगाध । त्रि-भुवनीं न माये आनंद । श्रीधर-स्वामी तो ब्रह्मानंद । अभंग न विटे काल-त्रयीं ॥ ७० ॥

अध्याय चवदावा.

---

# अमृतराय

**हा** गृहस्थ औरंगाबादेस राहत असे. हा जातीचा देशस्थ ब्राह्मण. आपल्या आईचें नांव उमा व बापाचें नांव शंकर असें त्यानें आपल्या ध्रुवचरित्रामध्यें नमूद केलें आहे. याचा जन्म श. १६२० बहुधान्य संवत्सरीं झाला.

औरंगाबादेस विसा मोरो म्हणून एक मोंगल सरकारचा मुत्सद्दी होता, त्याच्या पदरीं अमृतराय होता. हा स्वभावानें थट्टेखोर असे. असें सांगतात कीं, एके दिवशीं ह्यानें मध्वमुनीश्वर म्हणून एक साधु होता त्याची थट्टा केली, त्यावरून त्यानें त्यास बोलावून नेऊन बोध केला तो असा :—

"ईश्वरानें तुला अमृततुल्य वाचा दिली आहे व तुझ्या आईबापांनीं तुझें नांवही तसेंच ठेवलें आहे, तर तूं आपल्या वाणीचा असा व्यय करून ती विफळ करितोस, त्यापेक्षां तिची जर ईश्वरस्तवनाकडे, किंवा लोकोपयोगाकडे योजना करशील तर फार चांगलें होईल." हा बोध ऐकून अमृतरायास पश्चात्ताप झाला. तेव्हांपासून त्यानें मध्वमुनीश्वर यांस गुरु करून आपलें लक्ष्य परमार्थसाधनाकडे लाविलें.

अमृतरायानें पदें व कटिबंध पुष्कळ केले आहेत. तो शीघ्रकवि होता. तो पद्यरचना इतकी जलद करी कीं, लेखकास ती लिहिण्यास अवकाश

सांपडत नसे. त्याची कांहीं कविता पुराणांतील कितीएक प्रकरणांवर आहे व कांहीं बोधप्रद आहे. त्याची कविता मनोरंजक असून तींत प्रास, यमकें फार आहेत. ह्यानें कांहीं कविता हिंदुस्तानी भाषेंतही केलेली आहे.

अमृतराय कथा करीत असे. असें सांगतात कीं, नानासाहेब पेशवे ह्यांनीं त्याची एक कथा करविली होती, ती ऐकून त्यांस संतोष झाला आणि त्यांनीं त्याची फार प्रशंसा केली. मृत्यु श. १६७५ मध्यें श्रीमुखनाम संवत्सर चैत्र शुद्ध प्रतिपदेस ( षष्ठी ? ) झाला.

### ह्यानें केलेले ग्रंथ.

दामाजीपंताची रसद, द्रौपदी-वस्त्र-हरण, शुक-चरित्र, ध्रुव-चरित्र, सुदाम-चरित्र, जीव-दशा, रामचंद्र-वर्णन, गणपति-वर्णन, दुर्वास-यात्रा, इत्यादि. ह्यांवर प्रायः ह्यानें कटाव रचले आहेत.

विशेष माहितीकरितां पाहा :—महाराष्ट्र-सारस्वत, (भाग २)–भावे; महाराष्ट्रकवि अमृतरायकृत कवितासंग्रह-सं० वा. दा. ओक.

## कटिबंध किंवा कटाव

### जीव-दशा

सज्जन हो, निज गुज आपुलें उमजाना, हरिलागिं भजाना ॥ ध्रु० ॥ नऊ मास गर्भांत[1] सांपडे, मूत्र-मलादिक फार सांकडें, तनुसि तोडिति जंतू-कीडे, बहु श्रमानें बाहेर पडे, स्मरण मुळींचें सर्व विसरला, सोहं[1] कोहं[1] रडूं लागला, दिवसां मासां वृद्धि पावला, क्षण-क्षणा अपघात चूकला, धन-मद-गर्वें फार दाटला, अहं-पणाचा पूर लोटला, पांचां[2] विषयांमाजि बाटला, पापाचरणें मनीं काटला, भला थाटला, संसार अ-पार, थोर करितो कारभार, महाल मुलुख जागीर इजारा, कमाविसदारी, भारि पसार सावकारी, हत्ती घोडे सैन्य शिबीका, बा पोषाख कानिं चौकडा, सुंदर वनिता प्रिया

---

१ प्राणी गर्भांत असतो तोंपर्यंत 'सोहं' (सः अहम्) म्हणजे मी ईश्वर आहें असें म्हणतो, जन्मास आला म्हणजें 'कोहं' (कः अहम्) म्हणजे मी कोण आहें असें म्हणतो आणि पुढें मोठा होऊन त्यास समजूं लागलें म्हणजे 'अहं' म्हणजे 'मीच काय तो आहें,' असें म्हणतो, म्हणजे ईश्वरास विसरतो. २ शब्द, स्पर्श, रूप, रस गंध हे पांच विषय.

नवोढा, शहाणपणाचा गर्व गाढा, मनसोब्याचा करी निवाडा, वाडा रंगीत रंगमहाल, सोनेरी बैठका, जरी भर्जरी, तमाम ऐने, काम मुलायम[1], फिरंगाणी बिल्लोरि फाणसें, मिनेगारि किनखापी पडदे, खणोखणीं रेशमी गालिचे, बागबगीचे, राग-रंगामधिं गुंग बेटा, निसंग मोठा, अभिमानाचा चढला ताठा, उन्मत्त खोटा, धर्माविषयीं फार करंटा, त्याच्या बंधुंनिं धरल्या वाटा, अग्नि तस्कर करिति चपेटा, आटापीटा, राज-दंड ऊदंड उदेले, भंड निघालें, लंडपणें प्रचंड भोगिलें, परोपरीची छी थू अवघी, मारामारी, जेरबंद कडाकड सोटे मारी, कमचा पाठीं उडती भारी, या या परिचे जाच शरीरीं, हृदयीं मस्तकिं शिळा भारी, वोढितां जड खोडा बेडी, पायिं रोकडी, प्राप्त देहुडी, तरी येइना कबूल कवडी, अधिकारी घरदार सांवडी, सर्वहि नेलीं घोडींपाडीं, उरली नाहीं एकहि कवडी, पहिली होती बिनी वांकडी, शालजोडिला शेला जोडी, देव द्विज गुरु तडीतापडी, त्यांसि क्रोधें फार झडाडी, ईश्वर त्याची मस्ती मोडी, आतां कैंची उप्पर माडी, दशधडीवर गुढी लाविली, दुष्कर्मींचीं अभ्रें दाटलीं, पहा पहा रे डोळे उघडुनि, पुढें यातना यम-लोकींच्या, नानापरिंच्या, जाणोनि येथेंचि कां सावध व्हाना, हरिलागिं भजाना ॥ १ ॥

---

## कटिबंध; दुर्वास-यात्रा

दुर्योधन दुर्वास-ऋषीला, प्रार्थुनि म्हणतो ' जाय निशीला, अन्नें नेदी द्रौपदी शीला, तुम्हीं पाहिजे धर्म दूषिला,' ऐसें उत्तर ऐकुनि कानीं, ऋषी सर्वहि सवें घेउनी, आला पांडव-वसते-स्थानीं, दीर्घ-स्वरानें हाक मारुनी, तंव ते धर्म-भीमार्जुन येउनी, माद्रि-तनयसह पाय नमोनी, स्तविते झाले ते मृदुवचनीं, 'धन्यधन्य हे आजचि रजनी,' म्हणे तयांतें दुर्वास-मुनी, 'पुजनस्तवन नको मजलागुनी, इच्छा एकचि भोजन-पानीं,' ऐकुनि उत्तर, द्रौपदिमुख पहात युधिष्ठिर, हरि करुणाकर, असतां श्रीवर अंतर्यामीं, 'स्नानें स्वामी, करोनि यावें,' बोले धामीं, तंव ते सर्व ऋषीश्वर गेले, पांडव ते स्थळिं स्तब्धचि ठेले, धर्मराज बंधुंप्रति बोले, 'कैसें संकट आजि उदेलें,' तंव ते द्रौपदि, * * * * * * * *
वृंदावनिं ज्या वास निरंतर, प्रार्थिति सुंदर, दनुज भयंकर, रूप मनोहर, नामचि

---

१ मऊ, नाजुक.

मुरहर, तोंचि ब्रह्म निर्गुण निरामय, निर्विकल्प निःसंग निरन्वय, निर्भय, चिन्मय, व्यक्ताव्यक्तचि येउनि राहे, त्याप्रति बाहे, 'धांव धांव तूं श्रीरंगा, अद्वयरंगा, भवभयभंगा, तूं निःसंगा, तव पदिं गंगा, उद्धवली तापत्रयभंगा, पवित्र चांगा धांव उणिव जो न पवे अंगा, ऋषी सर्वेही करिती दंगा, ये अव्यंगा, श्रीकर तूं मुनिमानसभृंगा, तुज न म्हणो लघु अथवा तुंगा, संगातीत तूं अनंगताता[१], लागसि संतां, हरिसी अहंता, योगी सेविति तुज एकांता, योगी तन्मय सांडुनि कांता, स्वरूपशांता, दाता, त्रिभुवनि लक्ष्मीकांता, युगायुगीं अवतारचरित्रें, चाळुनि ऐसीं लीलामात्रें, मत्स्य कूर्म वराह नृसिंहा, वामन भार्गव रामा धैर्या, कैटभकदना, तूं रघुवर्या षड्रिपुनाशन महाशौर्या, उत्पत्ति-स्थिति-संहारकार्या, साक्षी तूं या पर्याय पाहतां निजनिपुणा, एक वेळ दावि तूं आपणा, करिं कीं करुणा, कैवारी तूं पांडवप्राणा,' ऐशी स्तुती ऐकुनि श्रीहरी, भोजन सांडुनि लवलाहेंशीं खग पाचारी, नयेचि सत्वर, तांतड झाली लगबग मोठी, तो जगजेठी, आला धांउनि, द्रौपदिसाठीं, कृष्णा पाहुनि आनंद पोटीं, तें सुख, सहसा न वदे होंटीं, जिवाशिवाशीं पडली गांठी, बाहुनि बोलत 'कां हो भगिनी, धांवा केला, सांगा पहिला,' द्रौपदि म्हणे 'ऋषि स्नाना गेला, साठि सहस्र खंड्या त्याला, अन्न पाहिजे त्या अशनाला, याविरहित-समग्र ऋषीला, यास्तव तुज मी प्रार्थि अजाला, धर्मराज तो विस्मित झाला, कांहीं विवेक न सुचे त्याला,' वचन ऐकुनि श्रीहरि बोले, 'माझे आधीं प्राण भुकेले, कृष्णे जेऊं घालीं वहिलें,' तंव ते बोले 'सत्व घेतलें, सर्व-साक्षी असतां कां छळसी, थाली पालथी घातलि पाहीं, अन्नचि नाहीं मागासि काई,' कृष्ण म्हणे 'तूं पहा हो बाई,' तंव ते पाहे, स्थालीमाजी, स्वल्पचि भाजी, कृष्ण म्हणे 'मी बहूत राजी,' करीं घेउनी मुखीं घालितां, त्रि-भुवन धालें, भाव-भक्ति-संतुष्ट-अंतरीं, मम भजकाला हें पावे, श्री-कृष्ण कृष्णेलागीं अति संकट-समयीं पावे ॥ १ ॥

---

१ सांबानें मदन जाळल्यावर त्याची स्त्री रति हिनें सांबाची प्रार्थना केल्यावर तुझा पति कृष्णाच्या पोटीं जन्मास येईल असें सांगितलें. त्यावरून कृष्णापासून रुक्मिणीच्या पोटीं प्रद्युम्न ( मदन ) झाला, यावरून अनंगाचा म्हणजे मदनाचा तात म्हणजे बाप असें म्हटलें.

# महीपति

अहमदनगरापासून अठरा कोसांवर राहुरी तालुक्यांत ताहराबाद ह्या गांवीं दादोपंत नामें कुळकरणी असे. हा जातीचा ऋग्वेदी वासिष्ठगोत्री देशस्थ ब्राह्मण; ह्याचा पुत्र महीपति, ह्याच्या आईचें नांव गंगाबाई. दादोपंत ह्यास मुली होत्या; पुत्रसंतान नव्हतें तें, त्याच्या साठाव्या वर्षी झालें. महीपति रूपानें सुंदर असे. हा सोळा वर्षांचा असतांच कुळकरणाचें काम करूं लागला.

एके दिवशीं कचेरींतून येऊन पूजा करीत असतां सरकाराकडील शिपाई बोलवायास आला. तेव्हां, 'पूजा झाल्यावर येईन' असें त्यानें सांगितलें. त्या वेळेस तो यवनशिपाई कांहीं अपशब्द बोलला, तेणेंकरून त्यास फार त्रास झाला; परंतु त्या वेळीं सरकारांत जाऊन काम होतें तें केलें. इतकें झाल्यावर त्यानें घरीं येऊन कानांत खोवलेली लेखणी होती ती श्रीपांडुरंगापुढें ठेवली आणि 'आजपासून मी गांवकृत्यासंबंधीं लेखणी हातीं धरणार नाहीं, व पुढेंही सात पिढ्यांपर्यंत कोणीं धरूं नये,' असें म्हणून त्यानें पांडुरंगाची शपथ वाहिली. त्याप्रमाणें आतां त्याचे वंशांतील लोक गांवकृत्यासंबंधीं लिहीत नाहींत. पुढें वडील थकलेच होते, तेव्हां त्यांच्याबद्दल तो आपण पंढरीच्या वाऱ्या करूं लागला.

नंतर असें सांगतात कीं, कांहीं दिवसांनीं तुकोबानें स्वप्नांत येऊन, 'नामदेवाचा शतकोटि अभंगांचा संकल्प माझे मुखें परिपूर्ण झाला, आतां संतचरित्रांचें वर्णन तुझे मुखें व्हावें,' असें त्यास सांगितलें व त्याच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून आपण गुप्त झाला. तेव्हांपासून महीपतीस कविता करण्याची शक्ति आली.

ह्याची कविता सरळ आणि सुलभ आहे. ह्याची ज्ञानेश्वरासारखी दृष्टांत देण्याची चाल फार आहे. ह्याची कविता सर्व ओवीबद्ध आहे. त्यानें ताहराबाद येथें पांडुरंगाचें देवालय अयाचित वृत्तीनें बांधून श्रीपांडुरंगाची स्वयंभू वालुकेची मूर्ति स्थापिलेली आहे.

मागें एकदां दुष्काळ पडला होता, त्यास 'करंड्याचें साल' असें म्हणत. त्या दुष्काळांत लोक उपाशीं मरूं लागले, म्हणून महीपतीनें आपलें घर लोकांकडून लुटविलें. हें वर्तमान गांवांतील जहागीरदारास समजलें, तेव्हां त्यानें पुष्कळ गाड्या भरून साहित्य पाठविलें; परंतु महीपतीनें त्यांतलें कांहीं एक न घेतां आपण गांवांत भिक्षा मागून तिजवर निर्वाह केला. नंतर प्रति तीन वर्षांनीं ब्राह्मणांकडून घर लुटवावें, असें त्यानें तीन वेळ केलें. पुढें, 'आपण घर लुटवितां, परंतु आपल्यापुढें असा क्रम चालणें कठीण आहे. ह्याकरितां जें सतत चालेल तें करावें', असें त्यास लोकांनीं सांगितलें. तेव्हां महीपतीनें ब्राह्मणभोजनाकरितां पांडुरंगाचा प्रतिवर्षीं आषाढ वद्य १० पासून ३० पर्यंत उत्सव करण्याची योजना केली. तो उत्सव अद्याप चालू आहे. महीपति समाधिस्थ झाला तेव्हां त्याचें वय ७५ वर्षांचें होतें. जन्मशक १६३७—समाधिशक १७१२ श्रावण वद्य १२.

महीपतीनें केलेले प्रसिद्ध ग्रंथ :—भक्त-विजय, भक्त-लीलामृत, संत-विजय (?), संत-लीलामृत, कथा-सारामृत, तुळशी-माहात्म्य, पंढरी-माहात्म्य, गणेश-पुराण, हरितालिका-व्रत, ऋषिपंचमी-व्रत, अनंत-व्रत, दत्तात्रेय-जन्म. हे ग्रंथ अनेकांनीं प्रसिद्ध केले आहेत.

विशेष माहितीकरितां पाहा :—महाराष्ट्र-सारस्वत, भा. २—भावे.

## वेंचे, संत-लीलामृतांतील

ओव्या

## गोपीचंदाख्यान

गोपीचंद हा बंगालचा राजा होता. ह्याच्या आईचें नांव मैनावती असें होतें; हिनें जालंधरनाथ हा गुरु केला होता म्हणून गोपीचंदानें त्यास कूपांत टाकून दिलें. परंतु पुढें त्याच्याच कृपेनें गोपीचंद विरक्त झाला; ही कथा ह्या आख्यानांत सांगितली आहे.

कूपांतोनि जालंधर। कानिफा काढीतसे सत्वर॥ दृष्टीं पहाती नारीनर। जैसा भास्कर उगवला॥ १॥ दिव्य रत्नाच्या सभोंवतीं। जोहरी परीक्षवंत जैसे मिळती॥ तैसे सात शत शिष्य निश्चितीं। दर्शन घेती सद्गुरूचें॥ २॥ पूर्णिमेचा निशा-कर। त्यासी आवडी लक्षिती चकोर॥ तेविं नगर-वासी नारी-नर। जालंधर पाहत॥ ३॥ मैनावती प्रेमेंकरोनी। मस्तक ठेवोनि

सद्गुरु-चरणीं । प्रेमें अश्रु वाहती नयनीं । तेणें चरण दोन्ही धुतले ।। ४ ।। जालंधर सिद्धमहाराज देख । कानिफा तयाचा साधक । त्यानें युक्ति करोनि अमोलिक । भू-पतीसी जीवविलें ।। ५ ।। भस्म न करितां त्याची काया । अमर केलें सत्वर राया । निरसोनि सकळ माया । केली छाया कृपेची ।। ६ ।। रायासि अनुताप जाला पूर्ण । म्हणे सद्गुरूचें धन्य महिमान । आतां संसारमाया त्यजुन । वैराग्य घेणें निश्चित ।। ७ ।। मग प्रधानासि विचारोनि । पुत्र बैसविला भद्रासनीं ।। जालंधरासी नमस्कार करोनी । कर जोडोनी विनवीत ।। ८ ।। म्हणे, मी शरणागत पूर्ण । जोग द्यावा जी मजकारण । कांहीं न करावा अनमान । म्हणोनि चरण धरियेले ।। ९ ।। यावरी सद्गुरु बोलती वचन । वैराग्य नव्हेचि तुजलागून । नको टाकूं संसार-भान । शेवट होणें अघटित ।। १० ।। विष खेववेल ग्रासोग्रासीं । पायीं चालवेल आकाशीं । बाहीं पोहोनि सागरासी । पैल तीरासि पाववेल ।। ११ ।। मुठींत धरवेल कृशान । कुडी सांडितां धरवेल प्राण । आकाशाची मोट जाण । वस्त्रांत बांधोन आणवेल ।। १२ ।। पृथ्वीचें वजन होईल कोडें । करवेल ब्रह्मांडाची घडामोड । परि वैराग्य बहुत अवघड । जाण रोकडें नृप-नाथा ।। १३ ।। आम्हीं आशीर्वाद दिधला राया । तेव्हां अमर जाली तुझी काया । आतां वैराग्य घेवोनियां । व्यर्थ कासया शिणतोसि ।।१४।। गोपीचंद देत प्रत्युत्तर । स्वामीची कृपा मजवर । असतां माया अनिवार । बाधूं न शके सर्वथा ।। १५ ।। पूर्ण अनुतापी वोळखोनि चिन्ह । वैराग्य दिधलें त्याजकारण । सैली मुद्रा कंथा लेवोन । विभूती-चर्चन सर्वांगीं ।।१६।। सद्गुरु म्हणती ते अवसरीं । भिक्षा मागें घरोघरीं । रायाची पट्टराणी सुंदरी । गेला मंदिरीं तियेच्या ।।१७।। आलेख म्हणोनियां तेथें । म्हणे, भिक्षा लौकरी आणीं माते। ग्रामवासी लोक बहुत । आश्चर्य करित तेधवां ।। १८ ।। वैराग्य-शील देखोनि भर्ता । आक्रोशें रुदन करी कांता । म्हणे, कैसी विपरीत जाली वार्ता । काय नृप-नाथा हें केलें ।। १९ ।। म्यां किंचित अन्याय केला राया । यास्तव टाकिली प्रपंच-माया । नख न लगे तया ठाया । कुठार कासया पाहिजे ।।२०।। परम सकुमार तुमची कांती । यावरी चर्चिली शुभ्र विभूती । नाना उपचार भोग संपत्ती । टाकोनि अनुतापी कां जालां ।। २१ ।। तुमचे चरण नृप-नाथा । कोणती येवोनि धुईल कांता । हेचि बहुत वाटे चिंता । सांगा तत्त्वतां मजपासीं ।। २२ ।। गोपीचंद देत उत्तर । गंगा यमुना सरिता थोर ।

माझे चरण निरंतर । धुतील माते सर्वथा ॥ २३ ॥ गोपीचंदासि पुसे गोरटी । कोण बोलेल तुम्हांसि गोष्टी । म्हणोनि चिंता वाटते मोठी । उठाउठी सांगा तें ॥ २४ ॥ यावरी म्हणे वैराग्यशील । किनरी सांगेल गोष्टी प्रांजल । तुम्हीं टाकोनि माया-जाळ । व्यर्थ हळहळ न करावी ॥ २५ ॥ यावरि बोले कुरंग-नयनी । कोण तुम्हांस बैसवील भोजनीं । हेचि चिंता अपार मनीं । मजलागोनि वाटते ॥ २६ ॥ गोपीचंद बोले प्रत्युत्तरीं । तुज ऐशा माता घरोघरीं । कर-तळ भिक्षा निर्धारीं । निरंतर घालतील ॥ २७ ॥ कांतेसि बोलोनि ऐशापरी । तेथोनि निघाला झडकरी । सोळाशें राण्या ते अवसरीं । शोक करिती आक्रोशें ॥ २८ ॥ ते सविस्तर सांगतां वार्ता । तरी ग्रंथा विशेष वाढेल कथा । गोपीचंद त्यजोनि माया ममता । निघे तत्त्वतां वेगेंसीं ॥ २९ ॥ सद्गुरु-कृपा होतांचि पूर्ण । मन तें होवोनि गेलें उन्मन । स्वरूपीं लागलें अनुसंधान । नाठवे मी कोण सर्वथा ॥ ३० ॥ भिक्षा मागतां नगरांतरीं । गेला मैनावतीच्या घरीं । म्हणे, माते दुध-भात निर्धारीं । भोजन सत्वरीं घालावें ॥ ३१ ॥ पुत्र देखोनि वैराग्य-शीळ । जननी हर्षली ते वेळ । म्हणे, माझे उदरीं येवोनि सकळ । उद्धरिलें कुळ सुपुत्रा ॥ ३२ ॥ जैसें होतें मातेच्या मनांत । तैसेंच तुज घडलें सत्य । धन्य सद्गुरु जालंधरनाथ । महिमा अद्भुत तयाचा ॥ ३३ ॥ निरसोनि सकळ ममता माया । अमर केली तुझी काया । पूर्ण कृपेची केली छाया । त्याचिया पायां चिंतावें ॥ ३४ ॥ मातेसी नमस्कार करोनि । गोपीचंद निघाला तेथुनि । म्हणे, द्वादश वर्षें फिरोनि । दर्शनालागीं येईन ॥ ३५ ॥ माता सिकवी तये क्षणीं । छप्पन्न देश पाहें नयनीं । परी चंपावती तुझी भगिनी । तिच्या दर्शना न जावें ॥ ३६ ॥ परम लाघवी ते वेल्हाळी । तुज पाडील माया-जाळीं । म्हणोनि तीस नेत्र-कमळीं । पाहूं नको सर्वथा ॥ ३७ ॥ ऐकोनि मातेचें वचन । मौनेंचि केलें गमन । गोपीचंद त्वरेंकरोन । करीत गमन तेधवां ॥ ३८ ॥ नाना-परींचीं तीर्थें अनेगें । दृष्टीसि पाहे मनोवेगें । तो ग्रंथीं विस्तार लिहितां सांग । कथा विशेष वाढे कीं ॥ ३९ ॥ असो पाहिले देश बहुत । गोपीचंद महा-विरक्त । उदास स्थानें पहात पहात । पर-देशासि पातला ॥ ४० ॥ त्याची भगिनी चंपावती । भद्रावती-नगरीं होती । तिचिया घरासी अवचितीं । गोपीचंद पातला ॥ ४१ ॥ आदेश म्हणोनि अंगणांत । म्हणे, भिक्षा घालीं

माते ॥ चंपावती बाहेर येत । तों देखिला अतीत दृष्टीसी ॥ ४२ ॥ दासी म्हणती तिजलागोनी । आम्हांसि विपरीत दिसे स्वामिनी । गोपीचंदा ऐसा नयनीं । जोगी आम्हांसि भासतो ॥ ४३ ॥ चंपावती न्याहाळोनि पाहे । तों आपला सहोदर होय । हृदय दाटलें परम मोहें । सद्गदित होय तेधवां ॥४४॥ दासी पुसती जोगियाप्रती । तुमची जन्म-भूमि कोणती । कवणे देशीं पूर्व-स्थिती । आम्हांप्रती सांगावें ॥ ४५ ॥ ऐकोनि जालंधराचा सुत । तयांसी काय उत्तर देत । गौडबंगाल-देशीं निश्चित । कांचन-नगर असे कीं ॥ ४६ ॥ तेथें त्रैलोक्यचंदाचा सुत । गोपीचंद मी राजा निश्चित । गुरु-कृपेनें अकस्मात । जालों विरक्त संसारीं ॥ ४७ ॥ ऐसें ऐकोनियां वचन । चंपावती करी रुदन । म्हणे, बंधु ! वैराग्य पूर्ण । काय निमित्त घेतलें ॥ ४८ ॥ सोळा शतें राण्या लावण्य-खाणी । त्यांविरहित पट्टराणी । दिव्य मंदिरें हेमवर्णी । रत्नें कोंदणीं बैसविलीं ॥ ४९ ॥ इंद्र-पदा ऐसें निश्चितीं । तुझें राज्य होतें भूपती । ते विलास टाकोनियां प्रीती । उदास-वृत्ती धरिली कां ॥ ५० ॥ आतां रत्न-खचित मठ जाण । तुजलागीं देतें बांधोन । ये स्थळीं निरंतर राहोन । उदास न होणें सर्वथा ॥ ५१ ॥ रत्न-खचित मेखळा । करोनि देतें मी भूपाळा । चंपावतीचिया डोळां । अश्रु-पात वहाती ॥ ५२ ॥ यापरी भगिनी ते वेळ । घालूं पहातसे माया-जाळ । परी गोपीचंदासि वैराग्य-बळ । निश्चय न ढळे सर्वथा ॥ ५३ ॥ सद्गुरुकृपा जालिया पूर्ण । प्रपंचीं न वळे त्याचें मन । चंपावतीच्या मंदिरांतून । अति त्वरेनें निघाला ॥ ५४ ॥ छप्पन्न देश हिंडोनि जाण । घेत सिद्धपुरुषांचें दर्शन । ऐसीं द्वादश वर्षें पूर्ण । लोटोनि गेलीं अनायासें ॥ ५५ ॥ * * * * * । मागुती आला कांचन-पुरा । आपुल्या मंदिरीं बैसली दारा । भिक्षा सत्वरा तिसीं मागे ॥ ५६ ॥ गोपीचंद विचार करी चित्तीं । जन्म-भूमीस जावें मागुती । एकदां भेटोनी मातेप्रती । मग तीर्थासि निघावें ॥ ५७ ॥ जावोनी मैनावतीच्या घरीं । दर्शन घेतलें ते अवसरीं । मातेनें दुध-भात झडकरी । भोजन घातलें तेधवां ॥ ५८ ॥ सकळ सिद्धांचा मेळा । ते देशा गोपीचंद चालिला । गुरु-कृपेनें जिंकोनि काळा । अमर झाला अनायासें ॥ ५९ ॥

अध्याय तिसरा.

---

# वेंचे, भक्तविजयांतील

ओव्या

## देव-गुरूंना वंदन

जय-जय भीमा-तीर-विहारा । भक्त-वत्सला कृपा-सागरा । व्यापूनियां चराचरा । आससी निराळा सर्वातीत ॥ १ ॥ गणेश-सरस्वती-रूप । तूंचि नटलासि अनेक । म्हणउनि सारजा-विनायक । ग्रंथारंभीं नमियेला ॥ २ ॥ आतां नमूं महा-कवी । व्यास वाल्मिक-मुनि भार्गवी । शुक नारद उशना कवी । जैमिनीआदि नमिले ॥ ३ ॥ आतां नमूं संत-सज्जन । जे हरिसी आवडती जीवाहून । कलि-युगीं अवतार धरून । जड अज्ञान तारिले ॥ ४ ॥ नमूं सद्गुरु तुकाराम । जेणें निरसिला भव-भ्रम । आपुले नामीं देउनि प्रेम । भव-बंधन निवारिलें ॥ ५ ॥ आरंभिला भक्तविजय ग्रंथ । हा सिद्धि पाववा तुम्ही समस्त । जेविं दुर्बळा घरीं मांडतां कृत्य । साहित्य श्रीमंत करिताती ॥६॥ कीं डोळस असतां कृपाघन । अंधासी हिंडवी तीर्थाटन । तेविं तुम्ही कृपा-दान । सरतीं वचनें करावीं ॥ ७ ॥ मंद-मती मी अज्ञान । नाहीं केलें काव्य-पठण । नाहीं पाहिलीं ग्रंथ-पुराणें । नेणें भाषा गीर्वाणी ॥ ८ ॥ परंतु येथें असे परी । जे भक्त-चरित्रें आवडती हरी । ऐसें बोलिला त्रिपुरारी । भविष्योत्तरीं पुराणीं ॥ ९ ॥ म्हणउनि धिंवसा चित्तीं । मज उपजली अति प्रीती । चंचूनें टिटवी अपां-पती । कोरडा करीन म्हणतसे ॥ १० ॥ ज्या हरीचे वर्णितां गुण । श्रुतीसि पडलें अति मौन । शेषाच्या जिव्हा चिरल्या जाण । केलें अंथरुण अंगाचें ॥ ११ ॥ ब्रह्मा इंद्र आणि हर । हेही नेणती ज्याचा पार । तेथें मी काय पामर । गुण वर्णावया तयाचे ॥१२॥ बाळकें अघटित घेतली आळ । माता पुरवी तात्काळ । तैसा तो दीन-दयाळ । आळ माझी पुरवील कीं ॥ १३ ॥ मागें संत-वर-दानीं । एकनाथ बोलिले रामायणीं । तैशीं माझीं प्रसाद-बोलणीं । वरद-वाणी नसे कीं ॥ १४ ॥ नामदेवमुक्तेश्वरांनीं । भारतीं वर्णिला चक्र-पाणी । तैसीं माझीं प्रसाद-बोलणीं । वरद-वाणी नसे कीं ॥ १५ ॥ श्री-भागवतीं टीका वामनी । हरि-विजय केला श्रीधरांनीं ॥ तैसीं माझीं प्रसाद-बोलणीं । वरद-वाणी नसे कीं ॥ १६ ॥ बोध-राज रामदासांनीं । गीतीं आळविला कैवल्य-दानी । तैसीं माझीं प्रसाद-बोलणीं । वरद-वाणी नसे कीं ॥ १७ ॥ मी मति-मंद असतां जाण । निज-भक्तांचे वर्णितां गुण ॥ कृपा करील रुक्मिणी-रमण । भक्त-भूषण

कृपाळू ॥ १८ ॥ उपजलों जयाच्या गोत्रीं जाण । तया वसिष्ठासी साष्टांग नमन । तेही आपले कृपेंकरून । ग्रंथ सिद्धीस पाववितील ॥ १९ ॥ आतां नमूं मातापिता । जे सकळ तीर्थांसी वरिष्ठता । ज्याचेनि नर-देह तत्त्वतां । लाधला अवचितां निज-भाग्यें ॥ २० ॥ आमचे कुळींचें दैवत । उभय-पक्षीं श्रीरुक्मिणी-कांत । तयास नमितां देवता समस्त । तृप्त होती निर्धारें ॥ २१ ॥ तो बुद्धि-दाता चक्र-पाणी । जैशी वदवील कवित्व-वाणी । तें सादर होऊनि संत-सज्जनीं । परिसावें श्रवणीं निज-प्रेमें ॥ २२ ॥ म्हणाल निज-बुद्धीनें त्वरित । आपुलेची मतें रचिला ग्रंथ । तरी तैसें नव्हे निश्चित । विकल्प चित्तांत न धरावा ॥२३॥ तरी उत्तर देशीं साचार । नाभाजी[1] विरिंचीचा अवतार । त्यानें संत-चरित्र ग्रंथ थोर । ग्वालेर भाषेंत लिहिला असे ॥ २४ ॥ मान-देशीं उद्धवचिद्घन[2] । त्यांनीं भक्त-चरित्रें वर्णिलीं जाण । दोहींचें संमत एक करून । हा भक्त-विजय-ग्रंथ आरंभिला ॥२५॥ श्रीभीमा-तीर-वासी रुक्मिणी-रमण । त्यानें दिधलें आश्वासन । ग्रंथ प्राकृत वदविला गहन । तो परिसा सज्जन निज-प्रीती ॥ २६ ॥ बाळक बोबडें बोले वचन । परी माता चोज करी ऐकोन । तैसें माझें आरुष भाषण । अंगीकाराल वाटतें ॥ २७ ॥ कीं गंगेसी ओहळ गेला जाण । तिनें केला आपुल्या समान ॥ तेविं तुमचे कृपेनें सरतीं वचनें । होतील ऐसें वाटतें ॥ २८ ॥ कीं कस्तुरींत मृत्तिका गेली मिळोन । मोला चढवी तिजसमान । तैसेंच माझें प्राकृत भाषण । कराल मान्य वाटतें ॥ २९ ॥ कीं दुग्धांत पडलें किंचित् जीवन । पयें केलें आपुल्या-समान । तेविं तुम्हांसीं सलगी करितां जाण । सरतीं वचनें होतील कीं ॥३०॥ तुम्ही संत ईश्वर-मूर्ती । ऐसा निश्चय दृढ चित्तीं । म्हणोनियां महीपति । नमन करी सद्भावें ॥ ३१ ॥

अध्याय पहिला.

---

१ हा जातीचा डोंब असून मोठा परमेश्वरभक्त होता असें म्हणतात. २ ह्या कवीच्या कालासंबंधानें एकमत नाहीं. मागें पृ० २५१ पहा.

## भक्तविजयांतील

ओव्या

## एकनाथ-चरित्र

त्या भानुदासास पुत्र सद्गुणी । त्याचें नांव ठेविलें चक्र-पाणी । तो परम भाविक वैष्णव ज्ञानी । श्रीहरि-भजनीं निमग्न ॥ १ ॥ त्याचा पुत्र सूर्यनारायण । जो ज्ञान-प्रकाशें देदीप्यमान । त्याची कांता सु-लक्षण । नांव रुक्मिणी तियेचें ॥ २ ॥ ते निज-उदरीं प्रसवली सुत । नाम तयाचें एकनाथ । तो जगद्गुरु अवतरला साक्षात । परिसा चरित्र तयाचें ॥ ३ ॥ तो दिवसेंदिवस जाहला थोर । व्रत-बंध लग्न केलें सत्वर । माय-बापें तयावर । कृपा अपार करिताती ॥ ४ ॥ तेथें जनार्दनपंत सु-ज्ञान-रासी । दत्तात्रेय-दर्शन होतसे त्यासी । एकनाथ उठोनी एके दिवशीं । गेला दर्शनासी तयाच्या ॥ ५ ॥ आंगडें टाकोनि मस्तकावरी । सद्भावें तयासी नमस्कार करी । जनार्दनें देखोनि ते अवसरीं । विस्मित अंतरीं होतसे ॥ ६ ॥ म्हणे, तूं कोणाचा सांग त्वरितें । कशास्तव आलासी येथें । जनार्दन संबोखून होते । वृत्तांत पुसत तेधवां ॥ ७ ॥ कीं टाकोनि माता-पितयांसी । रुसोनि आलासि आम्हांपाशीं । हें यथार्थ सांगावें मजपासीं । संकोच मानसीं न धरितां ॥ ८ ॥ मग जोडोनियां दोन्ही कर । एकनाथ बोले मधुरोत्तर । म्हणे, ऋग्वेदी ब्राह्मण-कुमार । दर्शना साचार पातलों ॥ ९ ॥ माय-बापांवरी न रुसतां । उगाचि अनुताप वाटला चित्ता । कीं देहीं जडली प्रपंच-ममता । काम-क्रोधें चित्त गांजिलें ॥ १० ॥ लोभ माया दंभ अहंकार । हे देहीं दिसती अनिवार । म्हणोनि स्वामि-दर्शनासी सत्वर । आलों साचार निज-प्रेमें ॥ ११ ॥ आतां हेचि इच्छा आहे मानसीं । निरंतर रहावें तुम्हांपासीं । सेवा करावी अहर्निसीं । निज-भावेंसीं आवडी ॥ १२ ॥ मी पतित शरण आलों पाहें । अंगीकार करीं सद्गुरु-माये । ऐसें बोलोनि लवलाहें । धरिले पाय सद्भावें ॥ १३ ॥ एकनाथाचें ऐकोनि वचन । आश्चर्य करिती जनार्दन । म्हणे वय तों दिसताहे लहान । परि विशाळ ज्ञान अनुपम्य ॥ १४ ॥ मग जनार्दनें अभय देऊनि त्यासी । म्हणितलें सुखें असावें आम्हांपासीं । हें वचन ऐकोनि मानसीं । उल्हास

चित्तासी वाटला ॥ १५ ॥ जैसा[1] द्वैपायन पडतां[1] संशय-वनीं । तयासी भेटला नारद-मुनी[1] । तेविं जनार्दनाचे अभय-वचनीं । एकनाथ मनीं संतोषले ॥ १६ ॥ स्वामी-सेवेसी निरंतर । अहो-रात्र असे तत्पर । कोणे दिवशीं न पडे अंतर । भावार्थ थोर धरियेला ॥ १७ ॥ रात्रीं निजतां जनार्दन । स्व-करें चुरीत बैसे चरण । निद्रा लागतां त्याजकारणें । परी नाहीं उठणें सर्वथा ॥ १८ ॥ विडा करूनि निज-हस्तें । सर्व साहित्य घालोनि त्यांत । जनार्दनासी होऊनि वि-नत । मुखांत घाली निज-प्रेमें ॥ १९ ॥ मुख प्रक्षाळावयासी तस्त । निज-करें पुढें आणोनि ठेवित । स्नान घालोनि आपल्या हातें । साहित्य देत पूजेचें ॥ २० ॥ जेवित शेष उच्छिष्ट राहत । तें प्रीतीनें भक्षी एकनाथ । ऐसी सेवा दिवस बहुत । असे करीत निज-प्रेमें ॥२१॥ हें जनार्दन दृष्टीस देखतां । मग आश्चर्य करिती निज-चित्ता । म्हणे, मनुष्य म्हणों नये एकनाथा । सकळ गुरु-भक्तां वरिष्ठ कीं ॥ २२ ॥ एकांत पाहोनि एके दिवशीं । जनार्दन कृपेनें पुसती तयासी । तूं सेवा करिसी आम्हांपासीं ॥ माय-बापांसी न कळतां ॥ २३ ॥ तुम्ही तों विरक्त दिसतां जाण । घरीं पाहिजे वस्त्रअन्न । वडील वृद्ध दोघेंजण । चिंता दारुण करतील कीं ॥ २४ ॥ ऐसें जाणोनि जनार्दन । घरीं पाठवीत वस्त्रअन्न । वडिलांसि कळतां वर्तमान । समाधान वाटलें ॥ २५ ॥ जनार्दन विचारूनि अंतरीं । म्हणे यासि सांगावी कांहीं चाकरी । मग एकनाथासि आज्ञा करी । हिशोब दप्तरीं राखावा ॥ २६ ॥ तूं तेथें असशील जरी प्रवीण । तरी कळों येईल अवघें ज्ञान । मग अवश्य म्हणोनि केलें नमन । आज्ञा प्रमाण स्वामींची ॥ २७ ॥ गुरु-सेवेसि न पडतां अंतर । हिशेब राखी निरंतर । जनार्दन म्हणती, हा परम चतुर । कळला विचार मजलागीं ॥ २८ ॥ तरी कांहीं निमित्त करून जाण । स्व-रूपीं लावावें त्याचें मन । एकनाथासी जवळ बोलावून । म्हणे, हिशेब दाखवणें आम्हांसी ॥ २९ ॥ पाहोनि खर्डा खतावणी । हिशेब दाखवीं आम्हांलागोनि । अवश्य म्हणोनि तये क्षणीं । पुढती चरणीं लागले ॥ ३० ॥ सेवेचा सारोनि नित्य नेम ।

---

१ व्यासानें आपल्या वैशंपायनादि शिष्यांस जरी वेद-शास्त्रें पढविलीं व महाभारतही रचलें तरी त्यास समाधान होईना; तेव्हां नारदानें येऊन त्यास बोध केला कीं, तूं धर्मादिकांचें विवरण केलें, परंतु वासुदेवाचा महिमा वर्णिला नाहीं म्हणून तुझा आत्मा सुप्रसन्न होत नाहीं. हें नारदाचें म्हणणें ऐकून व्यासानें भागवत रचलें आणि तेणेंकरून त्याचें समाधान झालें अशी कथा आहे ( भाग० स्कं० १ अ० ४ ).

रात्रीं दीपकासी वातलें भरण । एकनाथ, आडका राहिला चुकोन । तोचि धुंडोनि पहातसे ॥ ३१ ॥ तो कोठें न सांपडे तयास । ताळा न पडेचि हिशोबास । मग एकाग्र करोनि चित्तास । हिशोब पहात बैसला ॥३२॥ क्षणभरी कांहींच न करी शयन । न मानुनी निजदेहाचा शीण । तृषा लागली अति दारुण । परी उदक-पान करीना ॥ ३३ ॥ म्हणे, उप-हार करून उदकास घेतां । तरी निद्रा आळस येईल आतां । मग काय सांगावें गुरु-नाथा । विवेक चित्ता करितसे ॥ ३४ ॥ जनार्दन जागृत होऊन त्वरित । सभोंवतें विलोकून जों पहात । तों एकनाथ न दिसे तेथ । म्हणऊनी विस्मित जाहले ॥३५॥ अंतर-गृहीं धुंडितांचि देखा । तों हिशोब पहात बैसला एका । भरण घालोनियां दीपका । धुंडीत आडका निश्चळत्वें ॥ ३६ ॥ तों अकस्मात ताळा पडतां । हरुष वाटला एकनाथा । मग आपुल्याचि हातें टाळी पिटितां । दुसरा नसतां सन्निध ॥ ३७ ॥ मागें उभें राहोनि तेथ । जनार्दन कौतुक पहात । मग सन्मुख होऊनि त्वरित । स्व-मुखें पुसती तयासी ॥३८॥ सद्गुरु म्हणती एकनाथा । काय आश्चर्य वाटलें आतां । म्हणउनि हर्ष मानुनी चित्ता । हांसलासि तूं ये क्षणीं ॥ ३९ ॥ ऐसें ऐकोनियां वचन । वरतें पाहे विलोकून । मग स-त्वर उभा राहोन । केलें नमन सद्भावें ॥ ४० ॥ म्हणे, सर्व हिशोब शोधून पाहतां । त्यांत एक आडका चुकला होता । त्याचा अकस्मात ताळा पडतां । उल्हास चित्ता वाटला ॥ ४१ ॥ म्हणउनी संतोष पावोनि मनें । हांसें आलें मजकारणें । ऐसें ऐकोनि वचन । जनार्दन विस्मित जाहला ॥ ४२ ॥ मग एकनाथासी सद्गुरु बोलत । तुझें आडक्याकडे लागलें चित्त । तैसें श्रीकृष्ण-चरणीं होतां रत । तरी पावसी निज-हित आपुलें ॥४३॥ ऐशीं अक्षरें पडतां कानीं । अनु-ताप जाहला तये क्षणीं । म्हणे, हे इच्छा होती मनीं । जे आज्ञा स्वामिनीं मज द्यावी ॥ ४४ ॥ धन्य दिवस सुदिन आजिचा । अनुग्रह जाहला निज-कृपेचा । विकार तुटोनि मायेचा । ठाव प्रपंचाचा पुसिला पैं ॥ ४५ ॥ हें वचन ऐकतांचि श्रवणीं । जनार्दन विस्मित झाले मनीं । म्हणती यास उपदेश द्यावयालागोनि । अधिकार दिसोनी येतसे ॥ ४६ ॥ मग उठवूनि एकनाथाप्रती । जनार्दन

कृपेनें आलिंगिती । राम-कृष्ण मंत्र तारक निश्चितीं । सद्गुरु सांगत तेधवां ॥ ४७ ॥ तेथेंच विश्वास ठेवूनी दृढ । परमार्थ योग साधिला पुढें । कीर्तनीं श्रीहरीचे पवाडे । गातसे कोडें निज-प्रीति ॥ ४८ ॥ इतुकी कृपा झालियावर । परि सद्गुरु-सेवेसी न पडे अंतर ॥ दिवसेंदिवस अधिकोत्तर । सद्भाव साचार बैसला ॥ ४९ ॥ हा निश्चय देखोनि जनार्दन । म्हणे, यासी मनुष्य म्हणेल कोण । विश्वोद्धार करावया-लागोन । अवतार पूर्ण विष्णूचा ॥ ५० ॥ आतां यावरी करूनी कृपा-दृष्टी । श्रीदत्तात्रेयाची करावी भेटी । ऐसें विचारोनी पोटीं । जीविंची गोष्ट सांगतसे ॥ ५१ ॥ एकानाथासि म्हणे जनार्दन । तुज दत्तात्रेयाची भेटी करवीन । परी निर्भय असोनिया मन । चित्तीं न भिणें सर्वथा ॥ ५२ ॥ ते आपुलीं स्व-रूपें कडोविकडी । पालट करित घडोघडी । अज्ञान जन निंदिती रोकडी । काया चोखडी तेचि धरिती ॥ ५३ ॥ मी जयासी बोलेन गोष्टी । तूं त्याचे चरणीं घालीं मिठी । आलिंगन देऊनि उठाउठी । सद्गुरुशीं पोटीं धरावें ॥ ५४ ॥ प्रसाद देतील तुजकारणें । तरी तेथेंच भक्षीं निज-प्रीतीनें । ऐशी जनार्दन देतां शिकवण । एकनाथ चरण धरीतसे ॥ ५५ ॥ म्हणे, हेचि इच्छा बहुत दिनीं । वाढत असे माझिये मनीं । परी स्वामींची मर्यादा उल्लंघोनी । सर्वथा माझेनी न बोलवे ॥ ५६ ॥ ते आज आपल्या स्व-मुखेंकरून । मज दिधलें अभय-वचन ॥ तें आणि मनोरथ पूर्ण करून । करवावें दर्शन दत्ताचें ॥ ५७ ॥ ऐसा पूर्ण जाणोनियां हेत । एकनाथासीं नेलें अरण्यांत । तंव तेथें अनसूया-सुत । आले अकस्मात भेटावया ॥ ५८ ॥ विशाळ डोळे आरक्त नयन । हातीं शस्त्रें अश्व-वाहन । सन्निध येऊन उतरला जाण । मग केलें नमन जनार्दनें ॥ ५९ ॥ यवन-भाषेनें अनसूया-सुत । जनार्दनाशीं गोष्टी बोलत । हें दृष्टीशीं देखतां एकनाथ । आश्चर्य करिती मानसीं ॥ ६० ॥ मग एकनाथ बोलाउनी लवलाहीं । उचलोनि स्वामीच्या घातला पायीं । त्यांनीं आश्वासन देऊनी पाहीं । वर-दान काय बोलत ॥ ६१ ॥ श्रुति-शास्त्राचें जें मथित । व्यासें काढिलें श्री-भागवत । त्याचा अर्थ स-खोल गुप्त । वदेल प्राकृत

प्रसिद्ध हा ॥ ६२ ॥ आणीक भावार्थ-रामायण । वदेल रसाळ निरोपण । तें निजप्रीतीनें करित श्रवण । तरतील जन सकळिक ॥ ६३ ॥ आणीक पद-पदांतरें बहुत । श्री हरि-चरित्र अति अद्भुत । कीर्तनीं गावोनि सप्रेम-युक्त । उद्धरील पतित श्रवण-मात्रें ॥ ६४ ॥ ऐसा वर देऊन स-त्वर । मस्तकीं ठेविला अभयकर । निमिष न सोडतां साचार । अदृश्य झाले तेधवां ॥६५॥ एकनाथासी धरोनि हातीं । मंदिरा आले सत्वर गती । एकएकासीं न विसंबिती । जेविं लेंकुराप्रती निज-माय ॥ ६६ ॥ तान्हयास न पडे मातेचा विसर । हें परस्परें साक्ष देतसे अंतर । तेवीं एकनाथ जनार्दनें निरंतर । असती साचार एक-चित्तें ॥ ६७ ॥ तंव कोणे एके दिवशीं । जनार्दन विचारिती मानसीं । आतां सेवा घेणें याजपाशीं । अनुचित मज दिसताहे ॥६८॥ मग एकनाथासी बोलती वचन । माझी आज्ञा तुज प्रमाण । प्रतिष्ठानासि जाऊन । गृहस्थाश्रम चालवीं ॥ ६९ ॥ हें प्रमाण वचन करितां त्वरित । तुज प्रसन्न होईल रुक्मिणी-कांत । जनार्दनें मस्तकीं ठेविला हात । प्रतिष्ठानासी त्वरित चालिला ॥ ७० ॥ सद्गुरुवचन हेंचि प्रमाण । त्याहूनि वरिष्ठ नाहीं साधन । हे गुरु-भक्तीची जाण खूण । इतरांकारणें न घडेची ॥ ७१ ॥

अध्याय पंचेचाळिसावा.

---

# मोरोपंत

पुण्याहून सुमारें ३० कोसांवर बारामती म्हणून गांव आहे. तेथें बाळाजी विश्वनाथ पेशव्यांचा व्याही बाबूजी नाईक जोशी म्हणून कोणी जहागीरदार गृहस्थ राहात असे. त्याच्या पदरीं बापूजीपंत ऊर्फ रामचंद्रपंत पराडकर म्हणून कारकून होता. हा जातीचा कऱ्हाडा ब्राह्मण, त्याचा पुत्र मोरोपंत. हा कोल्हापुरानजीक पन्हाळा म्हणून गांव आहे तेथील राहणारा. कारकुनाचा मुलगा असतां मोरोपंत संस्कृत शिकून मोठा विद्वान् झाला. तो पुराण सांगत असे. असें सांगतात कीं, बाबूजी नाईक मोरोपंताचें पुराण ऐकून खुश झाला, व त्यानें त्यास सालीना १०० रुपये वेतन देऊन आपणाजवळ पुराण सांगण्यास ठेविलें. मोरोपंत जसा संस्कृतभाषेंत निपुण होता, तसा देशभाषेंतही निपुण होता. त्याला लहानपणापासून कविता करण्याचा छंद असे. त्यानें पुष्कळ कविता केली; कांहीं संस्कृत व बाकी सर्व प्राकृत. त्याच्या आर्या फार आहेत; श्लोक थोडे आहेत. त्यानें कांहीं साक्या आणि कांहीं पदेंही केलीं आहेत. मोरोपंताची वाणी प्रौढ, शुद्ध, आणि स्थलविशेषीं फार रसाळ आहे. व्याकरणशुद्धतेकडे ह्याच्या इतकें लक्ष इतर महाराष्ट्रकवींत कोणाचेंही आढळत नाहीं. ह्यांच्या कवितेंत प्रासयमकादि शब्दालंकार आणि उपमा, रूपक, उत्प्रेक्षा इत्यादिक अर्थालंकार फार आहेत. ह्याच्या कवितेंत संस्कृत शब्द फार आहेत आणि रचनाही कित्येक ठिकाणीं कठीण आहे.

मोरोपंत शके १७१० त काशीस गेला, तेव्हां त्यानें आपली कविता बरोबर नेली होती. ती काशींतल्या पंडितांनीं पसंत केली असें म्हणतात.

मोरोपंत आपल्या वयाच्या ६९ व्या वर्षीं वारला. त्याचे वंशज हल्लीं पंढरपुरास आहेत. जन्म शके १६५१. मरण शके १७१६ (चैत्र शुद्ध १९).

ह्यानें केलेले ग्रंथ.—(१) भारत (१८ ही पर्वें), (२) भागवत (दशमस्कंध व इतर स्कंधांतील फुटकळ आख्यानें), (३) रामायणें (हीं १०८ आहेत असें म्हणतात). ह्यांवर व इतर पुराणांतील कांहीं आख्यानांवर (मुख्यत्वेंकरून) आर्या व क्वचित् श्लोक असे आहेत. ह्यांशिवाय ह्यानें केलेलीं पदें, साक्या हींही प्रसिद्ध आहेत. ह्यावरून ह्याचा ग्रंथविस्तार फार मोठा होता, हें दिसून येईल.

मोरोपंतांचे ग्रंथ माधवचंद्रोबा (सर्वसंग्रह), निर्णयसागर (काव्यसंग्रह) व (स्फुट काव्यें सोडून) रा. द. पराडकर यांनीं प्रसिद्ध केले आहेत.

विशेष माहितीकरितां पाहा:—मोरोपंत—चरित्रकाव्यविवेचन—ल. रा. पांगारकर, महाराष्ट्र-सारस्वत—भा. २—भावे; मयूरकाव्यविवेचन—श्री. ना. बनहट्टी.

## स्फुट आर्या, गीतिछंद

आर्या[1] आर्यांसि रुचे, ईच्या ठायीं जशी असे गोडी ।
आहे इतरां छंदीं गोडी, परि यापरीस ती थोडी ॥ १ ॥

काव्य करावें म्यां, नच वचकावें दूषितो[2] परि लघूस ।
कां न सदन बांधावें कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस ॥ २ ॥

आर्य-कथा-छंदानें[3] आर्या छंदेंचि जन्मलीं सरलें[4] ।
यांहीं माझें तनु-वाक्कर्म-मनः-पाप[5] सर्वथा सरलें ॥ ३ ॥

गीर्वाण-शब्द[6] पुष्कळ जन-पद-भाषाचि[7] देखतां थोडी ।
यास्तव गुण-ज्ञ लोकीं याची घ्यावी हळू हळू गोडी ॥ ४ ॥

प्राकृत-संस्कृत-मिश्रित यास्तव कोणी म्हणेल ही कंथा ।
भव-शीत-भीति-भीत-स्वांताला[8] दाविला बरा पंथा ॥ ५ ॥

भगवद्भक्तानुज्ञा कीं गाव्या सत्कथा यथा-मति तें ।
स्वीकारिलें स्व-हित म्यां नमुनि स्व-सुर-द्रुमा[9] रमा-पतितें ॥ ६ ॥

नमिला गज-मुख ज्याचे सेवुनि मृदु मधुर-बोल कानांहीं ।
चुंबुनि शंभु म्हणे बा, 'तुज-सम आम्नाय[10] बोलका नाहीं' ॥ ७ ॥

ज्यांच्या हृत्कासारीं[11] होय गुण-स्नेह-बिंदुही[12] फार ।
सार-ज्ञ असूयोज्झित[14] त्यांला माझा असो नमस्कार ॥ ८ ॥

---

१ आर्याछंद. २ हें क्रियापद आहे याचा कर्ता लघु हा अध्याहृत घ्यावा. ३ श्रेष्ठ लोकांच्या कथांचा (लिहिण्यावाचण्याचा) छंद असल्यामुळें. ४ सोपीं—सरळ (हें आर्या-छंदाचें विशेषण). ५ शरीर व वाणी ह्यांचें कर्म आणि मन ह्यांपासून झालेलें पाप. ६ संस्कृत शब्द. ७ देशभाषा. ८ संसार हीच थंडी तीपासून उत्पन्न होणाऱ्या भीतीनें भ्यालेल्या अशा अंतःकरणाच्या पुरुषास. ९ आपल्या भक्तांस कल्पवृक्षासमान. १० वेद. ११ हृदयरूप सरोवरांत. १२ गुणरूपी स्नेह (तेल) त्याचा बिंदु (थेंब) दुसऱ्याचा अत्यल्पही गुण ज्यांस मोठा वाटतो, असें तात्पर्य. १३ कोणत्याही गोष्टीचे मर्मज्ञ-मार्मिक-तत्त्व समजणारे. १४ ज्यांनीं मत्सर सोडिला आहे असे—म्हणजे ज्यांच्या मनांत हेवा नाहीं.

श्रीकृष्णाचें चित्तीं चिंतावें सु-चिर चारु पद-कमळ ।
प्रक्षाळी हृदयींचा जें श्री-वक्षस्थळैक-पदक[१] मळ ॥ ९ ॥
सेवुनि संतत पाळा संत तपाला यदर्थ[२] करितात ।
तो प्रिय या स्तवना कीं यास्तव नाकींहि तेंचि[३] वरितात ॥ १० ॥
भक्तीनें मन ज्याच्या पद-पद्मीं मधुप करुनियां योगी ।
ज्याचें गाता नाम त्यजुनि तनु-भ्रमहि[४] मुक्ति-पद भोगी[५] ॥ ११ ॥
जरि बोबडें पित्याचें मोहावें मन तथापि तोकानें ।
प्रभु साळ्या-भोळ्यांची बहु वात्सल्यें कथा पितो कानें ॥ १२ ॥
दूर असो दीन असो दासाची विठ्ठलासि आठवण ।
नामचि पुरे, न घ्यावे अष्टांगीं नमन करूनि आठ वण ॥ १३ ॥
गुरु-भक्ति ते स्व-माता, भाऊ सत्संग, विषय ते बाऊ ।
भाऊ[६] माझें मानस-बाळ श्रीराम-कीर्तितें खाऊ ॥ १४ ॥
मातेतें त्यजुनि पळहि जाय न भलतीकडे जसें बाळ ।
सत्संगति सोडुनि मन नच जाउ तसेंच घेउ हें आळ ॥ १५ ॥
हळु हळु झडो अहंता सन्मनीं, वार्धकीं जशी शेंडी ।
केंडू[७] विवेक विषया, निस्पृह-जन वस्तुतें जसा केंडी[७] ॥ १६ ॥
भगवन्नामा अपयश होऊं देऊं नको, पतित सारे ।
तरले, एकचि उरतां कोपेना काय तो पति[८] तसा रे ॥ १७ ॥
श्री-हरि-हर-नामें हो जरि बहु दोषी असा धुवा[९] दास ।
दीनीं एकींच अदय-पण तें पोषी असाधु-वादास[१०] ॥ १८ ॥
चिंतामणिच्या धामा विसरविसी स्वर्ग-तरु-कुसुम-दामा[११]।
आम्हां बाळां आमा[१२] रामाचा प्रतिनिधीच तूं नामा ॥ १९ ॥

---

१ लक्ष्मीच्या वक्षःस्थलींचें अद्वितीय पदकच. ( भगवान् शेषावर शयन करीत असतां लक्ष्मी त्याचा एक पाय आपल्या वक्षःस्थलीं धरून सेवा करीत असते, म्हणून तो पाय कवीनें 'पदक' कल्पिला आहे. ). २ ज्या परमेश्वरासाठीं. ३ स्तवन. ४ 'देह हाच मी' असा भ्रम. ५ ह्याचा कर्ता "योगी". ६ मानो. ७ केंडणें = तुच्छ मानणें. ८ भगवान. ९ शुद्ध करा. १० दुष्टांच्या निंदेला. ११ कल्पवृक्षाच्या फुलांच्या माळेला. येथें 'कुसुमदामा' हा शब्द केवळ प्रासाकरितां योजिला आहे; अद्भुत औदार्याच्या संबंधानें नामास कल्पतरूची उपमा द्यावयाची आहे, म्हणून ह्या शब्दाचें स्वारस्य येथें दिसत नाहीं. १२ थान.

नामा बा माता तों वात्सल्यें त्वां उदंड लाजविली ।
उद्धरुनि पतित राम-प्रभु-कीर्तिहुनी स्व-कीर्ति साजविली ॥ २० ॥
वसलेंसि[1] पिंगलेच्या[2] जैसें श्री-नारदादि-धीरांच्या ।
राम-सुत-मयूर-मुखीं[3] वस नामा वससि जेविं कीरांच्या ॥ २१ ॥

## अभंग, सीता-गीत

राम वनवासांतून आल्यावर सीतेच्या जावा तिला चौदा वर्षांत घडलेली हकीकत विचारूं लागल्या. तेव्हां सीतेनें त्यांस अयोध्येस परत येईपर्यंत झालेलें सर्व वर्तमान सांगितलें; तें ह्यांत वर्णिलें आहे :—

यज्ञासाठीं भूमी नांगरीतां धन्या[4] । सांपडली कन्या सीतादेवी ॥ १ ॥
जनकाची पुत्री दुर्जना दुर्मिळा । ती भार्या उर्मिळा लक्ष्मणाची ॥ २ ॥
जनकाचा बंधु होता एक-निष्ठ । वयानें कनिष्ठ, श्रेष्ठ गुणें ॥ ३ ॥
तेणें भरतासी मांडवी दुहिता । दिली जी सु-हिता[5] दोहीं कुळीं ॥ ४ ॥
शत्रुघ्नाला दिली दुजी श्रुतकीर्ती । जीची गाती कीर्ती पतिव्रता ॥ ५ ॥
चवघी बहिणी भाग्यें झाल्या जावा । त्यांचा गीतीं[6] गावा सुसंवाद ॥ ६ ॥
वन-वास-वृत्त सीतेसी पुसती । प्रेमें त्या सु-सती तिघीजणी ॥ ७ ॥
सीता म्हणे, 'ऐका वन-वास-कथा । परी मनीं व्यथा न धरावी ॥ ८ ॥
चित्रकूटाहूनी पादुका घेऊनी । वि-योग[7] देऊनी तुम्ही आलां ॥ ९ ॥
आम्हीही तेथूनी तशींच निघालों । वनांत रिघालों तिघें जणें ॥ १० ॥
लक्ष्मण भावोजी मागें, पुढें स्वामी । मज आहें धामीं ऐसें वाटे ॥ ११ ॥
न बाधेची मज उष्ण क्षुधा तृषा । तुम्हांपाशीं मृषा[8] न बोलावें ॥ १२ ॥
जेव्हां कांहीं वाटे चालतां मी मागें । मुरडोनि मागें विलोकीती ॥ १३ ॥
बाई काय सांगों स्वामीची ती दृष्टी । अमृताची वृष्टी मज होय ॥ १४ ॥
अत्रीच्या आश्रमीं नेलें मज वाटे । माहेरची वाटे खरेंखुरें ॥ १५ ॥
अनुसूया सती करी वेणीफणी । आनंदाची धणी[9] दिली मज ॥ १६ ॥
आजवरी ओली चंदनाची ऊटी । आली नाहीं तुटी माळा-गुणीं ॥ १७ ॥

---

१ अन्वय—नामा, (तूं) जैसें पिंगलेच्या (व) श्री-नारदादि-धीरांच्या (मुखीं) वसलेंसि (व) जेविं कीरांच्या (मुखीं) वससि (तेविं) रामसुतमयूरमुखीं वस. २ ही एक मूळची वेश्या होती, तथापि ईश्वरभक्ति आणि सदाचरण ह्यांविषयीं तिची फार प्रसिद्धि होती. संसारयातनांतून हिची मुक्तता कशी झाली, ह्याविषयीं भागवतांत वर्णन आहे. ३ रामाजीपंताचा मुलगा मोरोपंत त्याच्या तोंडांत. ४ धन्य जो जनकराजा त्यास. ५ फार हितकारक. ६ गीतांत. ७ आम्हांला वियोगदुःख उत्पन्न करून. ८ खोटें. ९ तृप्ती.

ऋषींतें वंदीत गेलों गोदा-तटीं । जेथें पंचवटी पुण्य-स्थान ॥ १८ ॥
भावोजींनीं केली माझा बहु सेवा । ती त्या महा-देवा ठावी असे ॥ १९ ॥
तेथें शूर्पणखी भार्या व्हाया आली । तिला माझी भ्याली चित्त-वृत्ती ॥ २० ॥
भावोजींनीं तिचा कर्ण-नासा-छेद[१] । केला, कीं ते वेद-शास्त्रार्थ-ज्ञ[२] ॥ २१ ॥
तिचा भाऊ खर होऊनीयां क्रुद्ध । करावया युद्ध आला बाई ॥ २२ ॥
चवदा सहस्र राक्षस पापिष्ट । रणीं केले पिष्ट स्वामींनीं ते ॥ २३ ॥
तिणें घ्राण-रक्तें मुख मळवीलें । वृत्त कळविलें रावणासी ॥ २४ ॥
छळाचा उपाय मनीं आठवीला । दुष्टें पाठवीला माया-मृग[३] ॥ २५ ॥
स्वर्ण-रत्न-मय मृग म्यां देखीला । तो सत्य[४] लेखिला[४] मनामध्यें ॥ २६ ॥
गृहा आणावया मागें हरीणा मी । दुःख परिणामीं नेणोनीयां ॥ २७ ॥
मज रक्षावया लक्ष्मणा ठेवूनी । निघाले घेऊनी धनुर्बाण ॥ २८ ॥
माया-मृगामागें जगदेक-शूर[५] । गेले बहू दूर अरण्यांत ॥ २९ ॥
कपटी राक्षस जाणोनीयां प्राण- । घ्यावयासी बाण मोकलीला ॥ ३० ॥
तो बाण लागतां हृदय विदारी । दुष्ट हाक मारी स्वामी-वाणी[६] ॥ ३१ ॥
'हा सीते हा बंधो लक्ष्मणा ये धांवें । अंत-काळीं पावें, भेटावया' ॥ ३२ ॥
मज वाटे माझ्या स्वामींचीच हाक । शिरं कंप धाक हृदयांत ॥ ३३ ॥
मी म्हणे, 'भावोजी धांवा रक्षा प्राण । हे घ्या चाप-बाण उठा वेगीं' ॥ ३४ ॥
भावोजी म्हणती, 'राक्षसाची माया । कोण राम-राया पाहों शके' ॥ ३५ ॥
वाटलें तें वाक्य सत्य परी खोटें । झालें दुःख मोटें माझ्या मनीं ॥ ३६ ॥
न वदावें तेंची बोलीलें मी कोपें । चित्त शब्द-रोपें[७] विदारिलें ॥ ३७ ॥
'वांछितोसी दुष्टा अग्रजाचा[८] घात । माझ्या आंगा हात लावावया ॥ ३८ ॥
हात लावीतांची सोडीन मी प्राण । शिरीं पाद-त्राण[९] कोण वाहे ॥ ३९ ॥
माझ्या दृष्टीपुढें नको राहों साच । नरकीचा जाच मूर्त तूंची' ॥ ४० ॥
ऐशी बाई माझी ऐकतांची वाणी । डोळां आलें पाणी भावोजींच्या ॥ ४१ ॥
मातेनें दापीतां वत्स पित्याकडे । जाय तैसें घडे लक्ष्मणासी ॥ ४२ ॥
साधूसी गांजीतां झालें सद्या[१०] फळ । सज्जनाचा छळ करूं नये ॥ ४३ ॥
वाटेंत धनुष्यें ओढोनियां रेघ । गेले दया-मेघ[११] स्वामीकडे ॥ ४४ ॥
तों आला रावण होवोनी संन्यासी । न कळे अन्यासी छद्म[१२] त्याचें ॥ ४५ ॥

१ कान व नाक ह्यांचा छेद. २ वेद आणि शास्त्र ह्यांचा अर्थ जाणणारे. ३ कपटानें झालेला मृग. ४ खरा मानिला. ५ जगतामध्यें अद्वितीय शूर. ६ रामचंद्राच्या सारखी. ७ शब्दरूप बाणानें. ८ वडील भावाचा. ९ पाय राखणारा—जोडा. १० तात्काळ. ११ दयेचे मेघ (लक्ष्मण). १२ कपट.

भिक्षा द्याया गेल्यें रेघेच्या बाहेर । सासूर माहेर बुडवाया ॥ ४६ ॥
न लंघीतें जरी धनुष्याची रेखा । तरी त्याचा[1] लेखा[1] काय होता ॥ ४७ ॥
रेघेच्या बाहेरी जसा दिला पाय । झाला महा-काय[2] दश-मुख ॥ ४८ ॥
जसा हरीणीतें हरीतो लांडगा । तसा तो दांडगा हरी मातें ॥ ४९ ॥
त्या पाप्याच्या स्पर्शें देह हा कोमेला । आकाशीं तो मेला रथीं चढे ॥ ५० ॥
'हा राम लक्ष्मण,' ऐशी हाक माजी । जटायु-मामाजी[3] आयकती ॥ ५१ ॥
सखे दशरथ-मामाजींचे आप्त । सोडवाया प्राप्त झाले दैवें ॥ ५२ ॥
जातीचे ते गृध्र वृद्ध मोठे शूर । रथ केला चूर रावणाचा ॥ ५३ ॥
चंचू-नखायुध[4] गृध्र युद्ध-दक्ष । रावणाचें वक्ष विदारीती ॥ ५४ ॥
अन्यायें रावण छेदी त्यांचे पक्ष । मज वाटे लक्ष-बंधु-घात ॥ ५५ ॥
मूर्छीत मामाजी पडले भू-वरी । स्कंधीं वाहे अरी मला बाई ॥ ५६ ॥
रडतां काढिले पांच सात नग । वस्त्र-खंडीं मग बांधीले म्यां ॥ ५७ ॥
पर्वतीं वानर देखिले म्यां मग । त्यांमध्यें ते नग सोडियेले ॥ ५८ ॥
शत-गांवें[5] सिंधू त्यांत एक लंका । तेथें ने कलंका लावावया ॥ ५९ ॥
नेऊनीयां ठेवी अशोक-वनांत । न शोक मनांत माये[6] माझ्या ॥ ६० ॥
सहस्र राक्षसी करीती रक्षण । चिंता-तीर[7] क्षण न सांपडे ॥ ६१ ॥
दिव्यान्नांचा[8] ज्यांत नानापरी थाट । धाडी नित्य ताट शक्र-भार्या[9] ॥ ६२ ॥
दिव्यान्नाचें ताट ये मज जवळ । भक्षी मी कवळ[10] एक दोन ॥ ६३ ॥
फिरले घेऊनी मारीचाचे[11] प्राण । दिव्य धनुर्बाण-पाणी[12] मागें ॥ ६४ ॥
मार्गीं लक्ष्मणजी करीती वंदन । श्री-रघुनंदन-चरणांतें ॥ ६५ ॥
म्हणती, 'वत्सा त्वां कां आज्ञा मोडिली । एकटी सोडिली कां ती वनीं'॥ ६६ ॥
भावोजींनीं सर्व वृत्त कळवीलें । मुख मळवीलें अश्रु-पातें ॥ ६७ ॥
ऐकोनी बोलीले स्वामी 'झालें खोटें[13] । राक्षसांनीं मोठें विघ्न केलें' ॥ ६८ ॥
दोघांच्या हृदयीं धडधड करी । आले झडकरी धांवोनियां ॥ ६९ ॥
पर्ण-शाळेमध्यें देखीले कावळे । स्वामींचा मावळे धैर्य-सूर्य ॥ ७० ॥
केला आधीं फार शोध मग शोक । धन जातां लोक करी जैसा ॥ ७१ ॥

---

१ रावणाचा पाड. २ मोठें आहे शरीर ज्याचें असा. ३ एका गिधाड पक्ष्याचें नांव, तो दशरथराजाचा मित्र होता म्हणून त्यास सीतेनें मामाजी असें म्हटलें आहे. ४ चोंच आणि नखें हींच आहेत आयुधें ज्याचीं. ५ सुमारें चारशें कोस. ६ मावे. ७ काळजीचा शेवट, मी नेहमीं चिंताग्रस्त असें हा भाव. ८ स्वर्गांतील अन्न. ९ इंद्राणी. १० घास. ११ मारीच हा मृग झालेला राक्षस. १२ धनुष्य आणि बाण ज्यांच्या हातीं आहेत असे. १३ वाईट.

शोधीतां वनांत मामाजी पाहीले । धरूनी राहिले कंठीं प्राण ॥ ७२ ॥
पुसती, 'बापाजी झाली हे कां गती' । मामाजी सांगती अर्ध-शब्दें[१] ॥ ७३ ॥
स्वामीपाशीं माझें सांगतां हरण । पावले मरण शोक-भरें ॥ ७४ ॥
'हा तात हा तात', म्हणुनी रडले । मूर्च्छीत पडले घडीभरी ॥ ७५ ॥
मामाजीची सांग संपादिली क्रिया[२] । त्या काळीं हे प्रिया[३] नाठवीली ॥ ७६ ॥
पुन्हा वनीं मातें रडत शोधीती । लक्ष्मण बोधीती नाना-यत्नें ॥ ७७ ॥
आलिंगिल्या वल्लीं वियोगें भ्रमले । शोधितां श्रमले रात्रंदिस ॥ ७८ ॥
वनीं कबंधानें[४] केला होता घात । चार कोस हात लांब त्याचे ॥ ७९ ॥
धरीतां खड्‌गांनीं केला भुज-च्छेद । शाप-ताप[५] देख निवारीला ॥ ८० ॥
मतंग-मुनीच्या आश्रमीं शबरी । व्हाया यश बरी युक्ति[६] सांगे ॥ ८१ ॥
हनुमंतावरी केली अनुकंपा । या प्रभूंनीं पंपा-सरोवरीं ॥ ८२ ॥
सुग्रीवासीं भेटी ऋष्यमूकीं[७] झाली । त्याची दृष्टी धाली पाहतांची ॥ ८३ ॥
त्याच्या मुखें वृत्त आयकीलें मग । आणूनी ते नग दाखवीले ॥ ८४ ॥
सुग्रीव वानर सूर्याचा तनय । ज्या स्वप्नीं अ-नय नाहीं ठावा ॥ ८५ ॥
दोषावीणें रागें सुग्रीवासी जाची । त्याच्या अग्रजाची[८] बुद्धी खोटी ॥ ८६ ॥
एके बाणें वाळी स्वामींनीं मारीला । सुग्रीव तारीला संकटांत ॥ ८७ ॥
वानरांचें राज्य दिलें सुग्रीवाला । तो फार निवाला ऊपकारें ॥ ८८ ॥
माझी वार्ता कोणा न कळे किमपी । पाठवीले कपी शोधावया ॥ ८९ ॥
न लागतां माझा शोध कपी सारे । म्हणती ते 'हा रे दुरदृष्टा[९] ॥ ९० ॥
मारील सुग्रीव लंघीला आवधी । मरावें नव-धी[१०] करूं नये' ॥ ९१ ॥
समुद्राच्या तीरीं पर्वतीं रडले । मराया पडले उपोषीत ॥ ९२ ॥
'धिक्कार आम्हांला झालों सेवा-चोर[११] । व्यर्थ मृत्यु थोर खेद वाटे ॥ ९३ ॥
श्रीरामाची भार्या सोडवीतां मेला । जटायू तो गेला सद्गतीसी[१२]' ॥ ९४ ॥
ऐसी जी बोलीले वाणी दे कंपा ती । विचारी संपाती[१३] गृध्र-राज ॥ ९५ ॥

---

१ प्राण व्याकुळ झाल्यामुळें शब्दोच्चार पूर्ण होत नव्हता, म्हणून अस्पष्ट शब्दांनीं. २ मेलेल्याचे उत्तर संस्कार. ३ मी (सीता). ४ राक्षसविशेष; ह्यास डोकें नव्हतें. ५ कबंध हा मूळचा एक गंधर्व असून ऋषीच्या शापानें राक्षस झाला होता; सांप्रत रामानें त्याचा वध केल्यामुळें तो शापमुक्त झाला; हें तात्पर्य. ६. ऋष्यमूकपर्वतावर सुग्रीव वानर आहे, त्याचें साहाय्य घे म्हणजे तुला सीतेचा शोध लागून तुझें कार्य होईल अशी युक्ति शबरीनें रामास सांगितली. ७ पर्वतविशेष. ८ वाळीची. ९ हा रे (दुर+अदृष्टा)=दुष्टा दैवा. १० दुसरा विचार करूं नये. ११ सेवेंत कुचराई करणारे. १२ मुक्तीस. १३ जटायूचा वडील भाऊ.

वार्ता वाटे कानीं पडतां शंपा[१] ती । रडला संपाती बंधू-शोकें ॥ ९६ ॥
त्याणें सांगितली त्यांला माझी शुद्धी[२] । त्या कवीची बुद्धी सम-दृष्टी ॥ ९७ ॥
शत-गांवें बाई मारूती उडाला । पुण्यें न बुडाला सागरांत ॥ ९८ ॥
पुरीं[३] शोधी, होय स-शोक मनांत । अशोक-वनांत मग आला ॥ ९९ ॥
तो रात्रीं रावण प्रार्थी,[४] बडबडे । बुद्धी गडबडे मारुतीची ॥ १०० ॥
पाण्यापरीस मीं पातळ तो केला । मग रागें मेला असें म्हणे ॥ १०१ ॥
'दो मासांत मान्य न होतां हे[५] मारा । राक्षसी हो चारा मांस मज' ॥ १०२ ॥
ऐसें राक्षसींला सांगोनी तो जाय । म्हणे, 'हाय हाय' हनुमंत ॥ १०३ ॥
हळुच मारुती सद्गुण-समुद्रा[६] । वर्णी मग मुद्रा[७] मज दावी ॥ १०४ ॥
निववी हृदय प्रिय-सखी मुद्रा । काय सुधा क्षुद्रा नीववील ॥ १०५ ॥
मज म्हणे, 'चाल बैस माझे स्कंधीं । तूं दुर्गा मी नंदी दास तूझा' ॥ १०६ ॥
तेव्हां मी बोलिलें, 'नेशील बा खरें । परि नव्हे बरें असें जाणें ॥ १०७ ॥
युद्धीं मारितील या मेल्याशी स्वामी । तेव्हां मुख बा मी दाखवीन' ॥ १०८ ॥
मग तें अशोक-वन कपि मोडी । राक्षसांचें झोडी बळें सैन्य ॥ १०९ ॥
मारीला समरीं रावणाचा अक्ष । कुमार जो दक्ष रण-रंगीं ॥ ११० ॥
इंद्रजिताला तो दाटूनी सांपडे । हनुमंत पडे ब्रह्म-पाशीं[८] ॥ १११ ॥
रावणें वानर मानुनीयां तुच्छ । पेटवीलें पुच्छ जाळावया ॥ ११२ ॥
पुच्छ पेटतांच हनुमंत ऊडे । लंकेमध्यें हुडे[९] वाडे जाळी ॥ ११३ ॥
देवांनीं वदनीं घातली आंगोळी । लंकेची रांगोळी पाहोनीयां ॥ ११४ ॥
विचारोनी मज जाय स्वामींकडे । पायांवरी पडे हनुमंत ॥ ११५ ॥
माझा समाचार ऐकोनी हर्षले । प्रेमाश्रू वर्षले स्वामी माझे ॥ ११६ ॥
स्वामींस मद्वृत्त करी सु-प्रसन्न । जैसें दिव्य अन्न क्षुधार्ताला ॥ ११७ ॥
हनूमंतावरी झाली दया मोठी । उपकार कोटी मानीयेले ॥ ११८ ॥
निघाले घेवोनी वानरांची सेना । धरणीं[१०] दिसेना सूर्य-प्रभा ॥ ११९ ॥
रावण धर्माच्या वाटे न लागला । सांगोनी भागला बिभीषण ॥ १२० ॥
नायके रावण क्रोधानळें पेटे । श्रीमंतासी[११] भेटे सिंधू-तटीं ॥ १२१ ॥
म्हणे, 'गुण-कल्प-वृक्षांच्या अरण्या । दयाळा शरण्या रक्षीं मज ॥ १२२ ॥

---

१ वीज. २ शोध. ३ लंकापुरांत. ४ मीं त्यास वश व्हावें म्हणून माझें आर्जव करीत होता व बडबडत होता. ५ सीता. ६ चांगल्या गुणांचा सागर जो राम त्याला. ७ नामाक्षरयुक्त आंगठी. ८ ब्रह्मास्त्राच्या पाशांत. ९ बुरूज. १० धरणीवर. ११ लक्ष्मीपति जो राम त्याला.

स्वामींचें शरणागतीं प्रेम प्राज्य[1] । दिलें लंका-राज्य वंदितांची ॥ १२३ ॥
भेटला सागर जोडोनीयां करा (रां) । म्हणे, 'सेतु करा तारा मज' ॥ १२४ ॥
शत-गांवें सेतु समुद्रीं रचीला । पर्वतीं खर्चीला मार्ग मोठा ॥ १२५ ॥
सेतु-पंथें सिंधू लंघूनीयां आले । वार्तामृतें धाले कर्ण माझे ॥ १२६ ॥
दूत पाठविला दुर्जन-भंग-द[2] । तेजस्वी अंगद वालि-पुत्र ॥ १२७ ॥
स्वामींचा निरोप दोहीं[3] लोकीं[3] पथ्य । सांगीतला तथ्य अंगदानें ॥ १२८ ॥
खळ नेघे वाक्य स्वामींचें तोख-द[4] । न सेवी ओखद गतायुष्य[5] ॥ १२९ ॥
म्हणे, 'आम्हांपुढें बोलतें वांकडें । मर्यादा माकडें टाकीली कीं ॥ १३० ॥
राक्षस हो धरा मारा धांवा चावा । पळ न वांचवा मर्कट हा' ॥ १३१ ॥
अंगासी राक्षस झोंबले चवघे । झाडोनी अवघे पिष्ट केले ॥ १३२ ॥
उडतां मोडिली स्वर्ण-वज्र-सभा[6] । मळविली प्रभा रावणाची ॥ १३३ ॥
धर्म-मर्यादेच्या संकोचें[7] थोपले । अधर्में कोपले राक्षसांच्या ॥ १३४ ॥
ज्यांला चावावया वज्राहुनी गाढा । काळाच्याही दाढा न शकल्या ॥ १३५ ॥
ते राक्षस लक्ष-कोटी बळ-पूर्ण । वानरांनीं चूर्ण नखीं केले ॥ १३६ ॥
रक्त-नद्या तेथें शतशा वाहिल्या । देवांनीं पाहिल्या डोळेभर ॥ १३७ ॥
मारीले प्रधान रावणाचे पोर । त्यांत बळी थोर इंद्र-जित ॥ १३८ ॥
रावणाचा भ्राता कुंभकर्ण काळ । तेणें कपी-पाळ[8] धरीयेला ॥ १३९ ॥
बहिणीची[9] तैशी त्याची करी गति[9] । स्वयें कपी-पति सुटोनियां ॥ १४० ॥
जसे बरे गरे बहु कपी-भट । तेणें गटगट गिळीयेले ॥ १४१ ॥
पळाया त्यां वाट मिळे कर्णी नाकीं । मिथ्या वर्णीना कीं, जानकी मी ॥ १४२ ॥
प्रभूंनीं हरीलें तत्तेज सर्व तें । नुरावें पर्वतें वज्रापुढें ॥ १४३ ॥
माझे स्वामी झाले त्या तमा तरणी । त्यांची मात रणीं काय सांगों ॥ १४४ ॥
इंद्रासी अ-सह्य इंद्रजित परी । मारीला तो अरी भावोजींनीं ॥ १४५ ॥
वाहूनी मस्तकें तोषवीला भर्ग[10] । कांपवीला स्वर्ग कैलासही ॥ १४६ ॥
तो काय सामान्य परी झाला गर्व । त्याचें तेज सर्व वायां गेलें ॥ १४७ ॥
मारीला प्रभूंनीं सह-परीवार । उतरीला भार धरणीचा ॥ १४८ ॥

---

१ पुष्कळ. २ दुर्जनांस भंग ( पराभव ) देणारा. ३ इहलोकीं व परलोकीं. ४ संतोष करणारें. ५ ज्याचें आयुष्य सरलें आहे तो म्हणजे मरणोन्मुख झालेला. ६ सोनें व हिरे ह्यांनीं बनविलेलें सभास्थान. ७ प्रतिबंधानें. ८ वानरांचा नायक ( सुग्रीव ). ९ कुंभकर्णाची बहीण शूर्पणखा तिचें नाक व कान जसे लक्ष्मणानें कापिले तसे सुग्रीवानें कुंभकर्णाचे कापिले हें तात्पर्य. १० शिव.

ऊर्मिळे, मूर्छित तुझे माझे धणी । झाले होते रणीं सेनेसह ॥ १४९ ॥
वांचवीले सर्व हनूमंतें बाई । सांगों याचे काई उपकार ॥ १५० ॥
ओषधी-पर्वत[1] स-मूळ खाणिला । घडींत आणीला, जैसा चेंडू ॥ १५१ ॥
हनूमंतें आम्हां दिलें चुडे-दान । ऐसा नाहीं आन आप्त कोणी ॥ १५२ ॥
उठले वानर, अमृत वृष्टीनें ॥ स्वामींच्या दृष्टीनें हेंचि सत्य ॥ १५३ ॥
शिबिकेंत मज घालोनी आणिलें । देह म्यां न्हाणिलें अग्नि-कुंडीं ॥ १५४ ॥
त्या काळीं देवांनीं केली पुष्प-वृष्टी । आनंदानें सृष्टी कोंदाटली ॥ १५५ ॥
आले दशरथ मामाजी विमानीं । धन्या जीवीं मानीं आपणा मी ॥ १५६ ॥
देवांची प्रार्थना मामाजींची आज्ञा । केली सर्व प्राज्ञा सुखवाया ॥ १५७ ॥
मांडीवरी मज घेतलें स्वामींनीं । घनीं सौदामिनी जना वाटे ॥ १५८ ॥
भृंग-युक्त[2] पति पुष्पक-विमानीं । पुष्प[2] कवि मानी जैं बैसले ॥ १५९ ॥
स्वामींनीं समुद्रीं दाखवीला सेतू । भवाब्धींत हेतू तराया जो ॥ १६० ॥
रुंद दहा गांवें लांब शत गांवें । पाप न तगावें जो देखतां ॥ १६१ ॥
दाविली किष्किंधा भेटविली तारा । सुग्रीवाची दारा जाऊबाई ॥ १६२ ॥
ऐसा भरतासीं शत्रुघ्नाशीं बोल । प्रभूंनीं तो फोल केला नाहीं ॥ १६३ ॥
संतती संपत्ती वाढे होय हित । प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६४ ॥
न बाधे पर्जन्य वात उष्ण शीत । प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६५ ॥
धन्य धन्य होय संसारीं जीवित । प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६६ ॥
काळापासूनीही नव्हे चित्त भीत । प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६७ ॥
अंतीं वसे स्वर्गीं अमृतातें पीत । प्रेमें गातां गीत श्रीरामाचें ॥ १६८ ॥
श्रीरामातें ध्यावें, श्रीरामातें गावें । श्रीरामातें भावें आठवावें ॥ १६९ ॥
श्रीराम दयेचा मेघ त्यासमोर । प्रेमें दास मोर नाचताती ॥ १७० ॥

---

## आर्या; दाम-रामायणांतील[3]

श्री-पति झाला दशरथ-सुत राम दशाननासि **माराया** ॥
**मा[4] राया** जनकाची होय सुता त्रिजगदाधि[5] **साराया** ॥ १ ॥

---

१ द्रोणाचल, २ पति जैं पुष्पक-विमानीं बैसले (तैं) कवि (तें विमान) भृंगयुक्त पुष्प मानी असा अन्वय. ३ 'दाम' ह्याचा अर्थ हार असा आहे. फुलें एकांत एक गुंतवून ज्याप्रमाणें त्यांचा हार करितात, त्याप्रमाणें ह्या आर्यांपैकीं प्रत्येक अर्धाचीं शेवटील तीन अक्षरें दुसऱ्या अर्धाच्या आरंभीं आणिलीं आहेत; म्हणून त्या आर्या एकांत एक गुंतल्या जाऊन त्यांचा हारच बनून गेला आहे, ह्यावरून कवीनें ह्या रामायणास दाम-रामायण हें नांव दिलें आहे. ४ लक्ष्मी. ५ स्वर्ग, मृत्यु व पाताल ह्यांतील लोकांचें दुःख.

**सारा**[1] **या** प्रभुची हे लीला गाती सदैवही **सु कवी** ॥
**सुकवी** भव-जल-निधितें, निरुपम सुख रसिक-जन-मनीं **पिकवी** ॥ २ ॥
**पिक वी**त-बाध[2] कवि या चरिताम्र-वनांत[3] कूजती[4]; **सु-रस**[5] ॥
**सुर-स**द्मींचा[5] लाजे, यश हें श्री-शिव म्हणे शिव[6] **परिस** ॥ ३ ॥
**परिस** सुवर्ण करितसे लोहा, जीवास शिवचि हा **महिमा**[7] ॥
**महि मा**न्या[8] स्वर्गाही; स्व-कुळ म्हणे धन्य यत्प्रभा[8] **अ-हिमा**[8] ॥ ४ ॥

---

## आर्या ; परंतु-रामायणांतील[9]

श्रीराम-चरित करितें मुक्त सकृत् किमपि[10] सेवितां भावें ॥
पार न लागे दश-शत-वदनाहि[11] **परंतु** वाटतें गावें ॥ १ ॥
संकल्पोंच सुर-द्विज-पीडक-रक्षः-क्षयें[12] स्व-भजन-रसा ॥
देता; **परंतु** झाला दशरथ-भक्त-प्रियार्थ[13] अ-ज नरसा[14] ॥ २ ॥
एकेचि मूर्तिनें प्रभु करिता त्रैलोक्य-कामना-पूर्ति[15] ॥
क्रीडार्थ **परंतु** धरी चार त्रिजगन्मनोहरा मूर्ति ॥ ३ ॥
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न कुमार सारसाक्ष जना ॥
दिसती बाळ, **परंतु** स्व-गुणांहीं हरिति गुरु-मुनींद्र-मना ॥ ४ ॥
स्त्री-वध निंद्य **परंतु** ब्रह्मोक्तें[16] तूर्ण ताटका मारी ॥
त्या प्रभु-यशासि मानी अमृताचें पूर्ण ताट कामारी ॥ ५ ॥
मुनि मिथिलेशि निघे कीं जनक स्वाध्वर-विलोकना[17] बाहे ॥
नेणार, **परंतु** म्हणे प्रभु शिव-चापेक्षणस्पृहा[18] आहे ॥ ६ ॥

---

१ श्रेष्ठ. २ गेली आहे बाधा ज्यांची म्हणजे निर्भय. ३ (राम) चरित्र हेंच आंब्यांचें वन त्यांत. ४ गातात—शब्द करितात. ५ स्वर्गांतील सु-रस-(अमृतरस). ६ हे पार्वती. ७ हा (रामाचा) महिमा. ८ (रामावतारामुळें) पृथ्वी ही स्वर्गलोकास मान्य झाली; (व) यत्प्रभा (ज्यांची कांति) अहिमा (उष्ण) (तो सूर्य) (आपल्या वंशांत राम जन्मल्यामुळें) स्वकुल धन्य म्हणे. ९ ह्या रामायणांतील प्रत्येक आर्येंत 'परंतु' हा शब्द घालून कवीनें त्यास **परंतु-रामायण** ही संज्ञा दिली आहे. १० थोडेंही. ११ दशशत म्हणजे हजार आहेत वदनें (तोंडें) ज्यास असा जो शेष त्यालाही. १२ देव आणि ब्राह्मण ह्यांस पीडा देणाऱ्या राक्षसांच्या नाशानें. १३ दशरथ हाच भक्त त्याच्या संतोषाकरितां. १४ मनुष्यासारखा. १५ त्रैलोक्याच्या इच्छेची तृप्ति. १६ विश्वामित्राच्या सांगण्यावरून. १७ (स्व + अध्वर + विलोकन) आपला यज्ञ पाहाण्यास. १८ (शिव + चाप + ईक्षण) महादेवाचें धनुष्य पाहाण्याची इच्छा.

जातां गौतम-मुनिचा आश्रम लागे पुसे कथा राम ॥
तात्काळ अहल्येचें[१] चिर-नष्ट, **परंतु** वाढवी धाम ॥ ७ ॥
अति-कठिण भर्ग-धनु अति-सु-कुमार प्रभु, **परंतु** गुण[२] जोडी[२] ॥
ओढी स-लील-लीला-नर-तनु[३] तें; इक्षु जेविं गज मोडी ॥ ८ ॥

---

## आर्या ; सुभद्राहरणप्रकरणीं

( कृष्णविजय उत्तरार्ध अ० ८६. )

धर्म व द्रौपदी हीं उभयतां एकांतीं असतां कांहीं कारणानें त्यांस पाहाण्याचा दोष अर्जुनाच्या हातून घडला ; त्याच्या निवृत्तीकरितां तो तीर्थाटनास गेला. तेव्हां फिरत फिरत पश्चिम दिशेस द्वारकेजवळ प्रभासतीर्थीं आल्यावर, त्यानें, कृष्णाची धाकटी बहीण सुभद्रा ही बळरामानें दुर्योधनास देण्याचा निश्चय केला आहे, हें वर्तमान ऐकिलें. तेव्हां ती आपणास प्राप्त व्हावी म्हणून कृष्णाच्या अनुमतानें त्यानें कपटसंन्यास घेतला, आणि संधि पाहून सुभद्रेचें हरण केलें. मग हा अर्जुन असें समजल्यावर बळरामानें त्यास मोठ्या आदरानें बोलावून आणून सुभद्रा दिली. ही कथा ह्यांत आहे.

तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन प्रभासाला[४] ॥
आप्त-मुखें निज-मातुल-कुल-वृत्तांतासि[५] ऐकता झाला ॥ १ ॥

कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे ॥
तीतें स्व-मतें हल-धर धृतराष्ट्र-सुतासि[६] द्यावया पाहे ॥ २ ॥

तातादिक[७] म्हणति मनीं, 'सु-मति खळाला अ-चक्षुला रत्न ॥
शूद्रास श्रुति देतो राम, न चालेचि यापुढें यत्न' ॥ ३ ॥

ऐकुनि मनीं म्हणे[८], 'मज तीर्थ-स्नायीस[९] जाहली शुद्धि ॥
या सु-कृतें हे व्हावी प्राप्त वि-रक्तास जेविं सद्बुद्धि ॥ ४ ॥

---

१ हल्य म्हणजे निंद्य; अहल्या म्हणजे अनिंद्या—रूपगुणांनीं युक्त. २ दोरी चढवी ( धनुष्य सज्ज करी ). ३ केवळ मौजेनें मानवी तनु धारण करणारा ( राम ). ४ द्वारकेजवळील एका तीर्थाला. ५ आपल्या मामाचें ( वसुदेवाचें ) कुल म्हणजे यादवकुल, त्याच्या वृत्तांतास. ६ दुर्योधनाला. ७ वसुदेव आदिकरून. ८ ह्याचा कर्ता अर्जुन. ९ तीर्थांचीं स्नानें करणारा जो मी त्यास.

निज-सुख-सिद्धि[1] सुभद्रा साधाया होइन त्रिदंडि[2] यती ॥
प्रिय तीहूनि नसे मज; ती[3] कीं ही रीति गति, अहो नियती[3]' ॥ ५ ॥

पार्थ त्रिदंडि-वेष स्वीकारी हलधरासि वंचाया[4] ॥
युक्तीनें स्व-पर-विहित-हित[5] करितां कपट-दोष कंचा[6]या ॥६ ॥

द्वारवतींत वसे तो यति वार्षिक चार[7] मासपर्यंत[7] ॥
हर्यंतः-करणासचि[8] ठावा तद्योग[9] जो सदर्यंत[10] ॥ ७ ॥

मौन, सदा एकांत-स्थिति, साधु-समाधि-योग, सु-विरक्ती[11] ॥
सक्ति न लोक-समाजीं; लागे पौरांसि पार्थ-यति-भक्ति ॥ ८ ॥

रामासहि कळलें कीं योगी मोठा असे म्हणे, 'पाहूं ॥
आहों ब्रह्मण्य तया आणूं भिक्षेसि शिर पदीं वाहूं' ॥ ९ ॥

तो यति एके दिवशीं बळदेवें आणिला स्व-गेहास ॥
पूजुनि सु-श्रद्धेनें जेववितां माधवास ये हास ॥१०॥

यति-दर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजाजवळ ॥
न बळ प्रेक्षी, परि यति-हस्तींचा पाहतां[12] गळे कवळ ॥११॥

कन्या-रत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर ॥
वीर-प्रताप परि भी भीमानुज, कीं अनंत-बळ[13] थोर ॥१२॥

दामोदर[14] दासा दे अनुमोदन ती हरावया नवरी ॥
दादास देव दावी दारक-रीति[15] स्वयें सदैव बरी ॥१३॥

ताताला मातेला एकांतीं गुह्य वृत्त हें कळवी ॥
बळ-वीर-भीति-कोपोपशमोपायासि[16] सांगुनी पळवी ॥१४॥

---

१ आपल्या सुखाची साक्षात् सिद्धिच. २ तीन दंड धारण करणारा संन्यासी. ३ अन्वय-ती (सुभद्रा) कीं ही रीति (संन्यासी राहणें) (हीच) गति (परिणाम), अहो नियति सुभद्रा प्राप्त होईल तर बरें; नाहीं तर संन्यासीच राहणें बरें. काय प्रारब्धीं असेल कोण जाणे. ४ फसवावयास. ५ आपलें व दुसऱ्याचें योग्य मार्गास अनुसरून केलेलें हित. ६ कशाचा—कोणता. ७ चातुर्मास्यभर. ८ फक्त कृष्णाच्या अंतःकरणासच. ९ त्याची संन्यासाची युक्ति. १० प्रचंड शत्रूचा नाशक. ११ तीव्र वैराग्य. १२ ह्याचें कर्म सुभद्रा. १३ अनंत (शेष) बळराम, त्याचें बळ. बळराम हा शेषावतार होता म्हणून त्यास कवीनें अनंत म्हटलें आहे. १४ कृष्ण. १५ लहान मुलांची रीत. १६ राग शांत करण्याची युक्ति.

अनुकूळ ब्रह्म[1] तसें तों झालें तन्मनोरथा पर्व[2] ॥
तीर्थ-स्नान कराया पुर-वासी लोक चालले सर्व ॥१५॥

वर-हय-रथ-गज-शिबिकारूढ सकळ वृष्णि-दार-जन[3] चाले॥
झाले सिद्ध वऱ्हाडी तैसे यदु-भट; धरा बळें हाले ॥१६॥

दिव्य-रथांत सुभद्रा राकारजनी तसी बळीं शोभे ॥
यन्मुख-सुधाकरें[4] नर-वर-पार्थाशय-पयोनिधि[5] क्षोभे ॥१७॥

तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रा-रथीं जसा पाटीं ॥
सु-चिर-क्षुधित ब्राह्मण हां हां म्हणतांहि वाढिल्या ताटीं ॥१८॥

समय-ज्ञ चतुर सेवक, धनु तूण[6] तशांत देति आणोनी ॥
धांवति रक्षक सैनिक कपट-यति-कृतात्यनर्थ[7] जाणोनी ॥१९॥

त्यांतें म्हणे सुभद्रा-मुक्ता-हर[8] वीर अर्जुन मराल[8] ॥
'समरा लक्षहि या परि काक तुम्ही गति[9] विसर्जुन[9] मराल ॥२०॥

धर्मानुज मी अर्जुन सिंह, तुम्ही शश-किशोर, आटोपा ॥
या टोपा कवचाच्या भीना वल्गा[10] उगेची आटोपा' ॥२१॥

ऐसें नीट दटावुनि जाय सुभद्रा हरूनि तो पार्थ ॥
मारिति हाका केवळ, नागविला वनिं जसा वणिक्सार्थ[11] ॥२२॥

सार्थक पार्थ करी, ती कैरविणी[12] तो सुधांशु गौरविता ॥
सविता बिसिनीसि[12] वरी, कीं भेटे तो गुण-ज्ञ ती कविता ॥२३॥

श्रुति सत्क्रिय[13] धर्म-पथा शोभविती दंपती तसे स्व-रथा ॥
अन्योन्य-प्रिय संगम तो प्रेमळ भक्त ती मुकुंद-कथा ॥२४॥

---

१ परब्रह्मकृष्ण. २ ज्याप्रमाणें कृष्ण त्याच्या मनोरथास अनुकूल (साह्यकारी) होता, त्याप्रमाणेंच एक पर्वही त्याला अनुकूल झालें. पर्व असल्यामुळें आपला हेतु सिद्धीस न्यावयास त्यास संधि सांपडली, हें तात्पर्य. ३ यादवांच्या स्त्रिया. ४ जिच्या मुखचंद्राच्या योगानें. ५ नरवर (पुरुषश्रेष्ठ) असा पार्थ (अर्जुन) त्याचा आशय (मन) हाच पयोनिधि (समुद्र). ६ भाता. ७ खोट्या संन्याशानें केलेला मोठा अनर्थ. ८ सुभद्रा हीच मुक्ता (मोती) तिचें हरण करणारा वीर अर्जुन हाच हंस. ९ थकून. १० घोड्यांचे लगाम. ११ व्यापारी लोकांचा तांडा. १२ कमलिनी. १३ सत्कर्मानें वागणारा.

झटिति भट-कटक बहु करि कन्या नेली म्हणोनि बोभाट ॥
वाटे बळासि सांगे[1] जो जो त्या दस्युचाचि तो भाट[1] ॥२५॥

प्र-स्फुरदधर-दल[2] प्रभु बलभद्र म्हणे खरेंचि सांगा रे ॥
कोठें तो कपट-पटू गांठितसे जो पटांत आंगारे ॥२६॥

कोठें रथ, मुसळ पुरे, कवच कशाला, धनुष्य राहों द्या ॥
वत्सेला निज-धर्षण-कर-खळ-दंडोत्सवासि[3] पाहों द्या ॥२७॥

पर्वीं[4] अर्णव तैसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे ॥
संध्या-राग-सु-रंजित-शरदभ्राहूनि[5] फार तो शोभे ॥२८॥

कोप-ज्वर-भर-कंपित-काय[6] प्रभु[7] लोचनें करी शोणें ॥
होणें पुढें सु-दुर्घट[8] वारावें त्या महेश्वरा कोणें ॥२९॥

जाय हळूच विनय-नत-काय चतुर वृष्णि-राय देव हरी ॥
माय सुतार्थ पतीचे काय गुरूचे नमूनि पाय धरी ॥३०॥

नमनीं प्रकटति रुह-भव[9] सद्गुण शांति-क्षमानुकंपादी ॥
कंपा दीन-सख नुरवि अधरीं, प्रणतींहि भव्य संपादी ॥३१॥

हांसे बळभद्र म्हणे कृष्णाक्रूरोद्धवां, ' अहो कळलें ॥
वळलें मन, मत्पदभय[10] सोडा,[10] आदान[11] बंधुचें टळलें ॥३२॥

जा जा उठा मुलीला पाहूं वाहूं[12] वरा घरा आणा ॥
प्राणाधिक तो येना तरि घालाव्या मदंघ्रिच्या[13] आणा ॥३३॥

---

१ जो जो बळासी (बळरामास) (हें वर्तमान) सांगे (तो तो) त्या दस्यूचा (चोराचा–अर्जुनाचा) भाटच (स्तुतिपाठकच) वाटे. प्रत्येक मनुष्य अर्जुनाच्याच पराक्रमाचें वर्णन करूं लागला; हा भाव. २ रागानें कांपत आहे अधरोष्ठ ज्याचा. ३ आपलें बलात्कारानें हरण करणाऱ्या दुष्टाला जो दंड हाच उत्साह, त्यास. ४ अमावास्या व पूर्णिमा ह्या दिवशीं. ५ सायंकालच्या तांबडेपणानें रंगविलेल्या शरत्कालच्या मेघांपेक्षां अधिक शोभे, म्हणजे रागानें फार लाल झाला. ६ अत्यंत कोपानें ज्याचें शरीर कांपत आहे असा. ७ बळराम. ८ अन्वय–(त्याच्या) पुढें होणें (देखील) सुदुर्घट (मग) त्या महेश्वरा कोणें वारावें?— त्यावेळीं बळरामाच्या पुढें जाणें देखील कठीण; मग त्याचें निवारण करण्यास कोण समर्थ? ९ जन्मत: असणारे–स्वाभाविक. १० मत्पद सोडा व भय सोडा. ११ मोठें भय. १२ अर्पण करूं. १३ मत्-अंघ्रि—माझे पाय त्यांच्या.

अथवा कशास शासन-भय धरुनि मनीं पळेल तो दूर ॥
शूर ख्यात पळेना नेऊं द्या पारिबर्ह[1] अक्रूर ॥३४॥
धाडा भूषा वसनें दासी-दासाश्व-हस्ति-रथ-रत्नें ॥
झाला भगीरथाचा[2] पार्थ[2] सखा[2] आजि या महा-यत्नें' ॥३५॥
हें[3] रसिक-कर्ण-तर्णक-शत तर्पायासि[3] काम-धेनु कथा ॥
करिती प्रभु-वर अनुचर-पर-सुख-कर अनुसरोनि लोक-पथा[3]॥३६॥

---

## आदिपर्वातील कचोपाख्यान

(म० भा० अ० ७६–७७. मोरोपंत अ० ९.)

पूर्वी देव आणि दैत्य ह्यांच्या लढाया होत असतां युद्धांत मरण पावलेल्या दैत्यांस त्यांचा गुरु शुक्राचार्य हा संजीवनी-विद्येच्या योगानें पुन्हा जिवंत करी; पण ती विद्या देवांचा गुरु बृहस्पति ह्यास येत नव्हती, म्हणून देवांकडील योद्धे मरत. म्हणून सर्व देवांनीं बृहस्पतीचा मुलगा कच हा शुक्राकडे गुरुसेवेच्या मिषानें ती विद्या शिकण्याकरितां पाठविला. त्याला ती विद्या त्यापासून कशी प्राप्त झाली हें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे.

जनमेजय-नृपति[4] पुसे वैशंपायन[5] कथी स-विस्तर, तें ॥
बहु, मी लेशचि गातों, जग लेशेंही महद्यशें[6] तरतें ॥ १ ॥
झाला ययाति कविचा[7] जामाता, तीच सत्कथा परिसा ॥
या चरितामृत-पानें या लोकीं सर्व रसिक हो हरिसा[8] ॥ २ ॥
सुर-शस्त्रांहीं जे जे भट होती संगरांत असु-रहित ॥
संजीविनी-बळें त्यां उठवि करि काव्य[9] नित्य असुर-हित ॥ ३ ॥
ती विद्या सुर-गुरुला अवगत नव्हती म्हणोनि समरांत ॥
बहु मरती, तें पाहुनि न टिके उत्साह धैर्य अमरांत ॥ ४ ॥

---

१ लवाजमा. २ भगीरथाला गंगा पृथ्वीवर आणण्यास जसा महाप्रयास पडला, तसाच अर्जुनाला सुभद्रा हरण करण्यास पडला, सबब अर्जुन हा भगीरथाचा सखा झाला, म्ह० त्याच्या बरोबरीचा झाला; असा भाव. ३ अन्वय–प्रभुवर (बलराम व कृष्ण) लोकपथा अनुसरोनि रसिककर्ण हें (च) तर्णकशत (वासरांचें शत) तर्पायासि अनुचर-पर-सुखकर–(भक्तांना अत्यंत सुख देणाऱ्या) कथा (लीला) कामधेनु करिती. ४ परीक्षिति राजाचा मुलगा. ५ व्यासाचा शिष्य. ह्यानें जनमेजयास सर्व भारतांतील कथा सांगितल्या. ६ थोरांच्या कीर्तीनें. ७ शुक्राचा. ८ हर्षित म्हणजे आनंदीत व्हा. ९ शुक्र.

ती विद्या साधाया देवांनीं सद्विचार आठविला ॥
शुक्राकडे स्व-गुरु-सुत कच विनवुनि युक्ति कथुनि पाठविला ॥ ५ ॥
शिष्यत्वें जाउनि कच सांगे गुरु-दास्य-काम[1] पद नमुनी ॥
प्रणतीं शत्रु-सुतींही द्रवला तो सु-प्रसन्न-वदन मुनी ॥ ६ ॥
आराधिला कचें गुरु, गुरुची कन्याहि देवयानी ती ॥
झाली प्रसन्न सत्वर शिकविति तैशीच देव या[2] नीती ॥ ७ ॥
असुर म्हणति विद्येनें[3] प्रबळ करायास देव या नीचें ॥
मन मोहिलें गुरूचें गुरु-चित्ताहूनि देवयानीचें ॥ ८ ॥
गुरु-गो-रक्षण[4] करितां देव-द्वेषें हरूनि असु रानीं ॥
कच-मांस वृकांसि[5] दिलें वांटुनि भक्षावयासि असुरांनीं ॥ ९ ॥
गाई गृहासि आल्या, मावळला रविहि, कच न आढळला ॥
तेव्हां सोडुनि धृति-नग[6] शुक्र-सुता-बुद्धि-भूमिला[7] ढळला ॥ १० ॥
शुक्र-सुता गहिंवरली न्हाणी तदुरस्थळासि[8] अश्रु तिचें ॥
कवणाला न प्रिय तें[9] गुण-मणि-मय[10] केलि-मंदिर[10] श्रुतिचें[10] ॥ ११ ॥
तातासि म्हणे, 'आला नाहीं अद्यापि कच, नसे अवधी ॥
लव धीर बुद्धि न धरी माझी, ताता सु-निष्ठुरा तव धी ॥ १२ ॥
येता मघांचि, असता जरि कुशली, करिति खल अघा, बरवी ॥
गति न दिसेची कचाची, कुशलि-जन-विरह असा न घाबरवी ॥ १३ ॥
कच आजि न येतां, मी प्राण त्यागीन न भरतां घटिका ॥
आण तुझी जाण खरें; केला निश्चय नव्हेचि हा लटिका' ॥ १४ ॥
काव्य म्हणे, 'धीर धरीं, आहे संजीविनी सुधा-धारा[11] ॥
उठवूनि आणितों कच, चिंतुनि विश्वंभरा बुधाधारा[12]' ॥ १५ ॥
मंत्र-जप करुनि तो कवि, 'ये रे वत्सा कचा' असें बाहे ॥
भेदुनि वृकोदरें पळ सर्व निघे, त्यांत लेशहि न राहे ॥ १६ ॥
होता तसाचि झाला, उठला, आचार्य-देव तारी; ती ॥
शक्ति तशीच निरुपमा, भिन्ना गुर्वन्य-देवता-रीती ॥ १७ ॥

---

१ गुरूची सेवा करण्याची इच्छा. २ कचाला. ३ संजीविनी-विद्येनें. ४ गुरूच्या गाईंची राखण. ५ वन्य पशूंस. ६ धैर्य हाच पर्वत. ७ देवयानीची बुद्धि हीच पृथ्वी हिला सोडून ढळला म्हणजे देवयानीचें धैर्य सुटलें. ८ तिच्या उराला. ९ कचरूप. १० सद्गुण हींच रत्नें त्यांनीं खचित असें श्रुतींचें (वेदाचें) केलिमंदिर म्हणजे क्रीडास्थान. ११ अमृताची धार. १२ (बुध+आधारा) ज्ञात्यांस आश्रयभूत त्याला.

कच येतां बहु हर्षें, 'धन्य' म्हणे 'मीच कन्यका, मातें ॥
वांचविलें त्वांचि दिला हा[१], देइल कोण अन्य कामातें' ॥ १८ ॥
पुसतां वध-वृत्त, कच स्व-गुरु-सुतेला समस्त आयकवी ॥
प्रार्थुनि म्हणे, 'उगी हा स्वस्ति[२] असो सर्व-विप्र-राय कवी'॥१९॥
त्यावरि गुरु-कन्योक्तें पुष्पें आणावयासि जाय वना ॥
सांपडला त्या असुरां कच जैसा वत्स एकला यवना ॥२०॥
पुनरपि त्या पापांनीं सद्विप्र-कुमार चरचरां चिरिला ॥
भय न धरिलें तिळहि, त्या पापांच्या जोडितां महा-गिरिला ॥२१॥
खंड तिळ-प्राय करुनि, नेउनि केले निमग्न जळ-धींत ॥
नाहींच धर्म करुणा पाप-भय विचार-लेश खळ-धींत[३] ॥२२॥
जो मुनि तयासि कन्या-प्रिय-काम[४], दयाळु काव्य तो तारी ॥
रज गोळा करुनि, घडी शिष्याची मूर्ति जेविं वोतारी[५] ॥२३॥
पुनरपि तो कच वधिला, केला तद्देह दग्ध रुष्टांनीं ॥
शुक्रासि पाजिलें हो तद्भस्म सुरा-रसांत[६] दुष्टांनीं ॥२४॥
कच न दिसतां रडे सुर-यानी[७], तीतें पिता म्हणे, 'कां गे ॥
वत्से रडसी', ऐसें पुसतां तैसेंच ती पुन्हां सांगे ॥२५॥
शुक्र म्हणे, 'वत्से, मी वांचवितों परि पुनः पुन्हां मरतो ॥
आग्रह करूनि म्हणसी, 'प्रेत-गतिं-गतहि[८] कच पुन्हां परतो' ॥२६॥
त्यज शोक, मत्प्रसादें तुज काय उणें असे, नकोचि रडों ॥
दाटुनि माथां वाहुनि दुर्वह दुःखाद्रिला नको चिरडों' ॥२७॥
ती तातासि म्हणे, 'कच गुरु-भक्त कुलीन साधु-कार्य-कर ॥
जरि त्यासि सोडिलें जल तरि जल सोडू मलाहि आर्य-कर[९] ॥२८॥
ब्रह्म-घ्नां शिष्यांची भीड धरुनि साधु शिष्य मोकलिला ॥
म्हणातिल, न ऐकवे तें, न[१०] स्व-हित कवी असें गमो कलिला[१०]॥२९॥
स्व-मनिं म्हणे कवि-सत्तम[११] मळवावें पंडितें न यश, हाणी ॥
प्राणाचीहि बरी परि न यशाची, सांगती नय शहाणी ॥३०॥

---

१ कच. २ सुखरूप. ३ दुष्टांच्या मनांत. ४ मुलीची आवड पुरविण्याची ज्याची इच्छा आहे असा. ५ ओतकाम करणारा. ६ मद्यांत. ७ देवयानी. ८ प्रेताच्या अवस्थेला गेलेला म्हणजे मेलेला. ९ आर्य म्हणजे थोर जो तूं त्याचा हात. १० कवी स्वहित (आपला हित करणारा) असें कलिला (दुष्ट काळाला) न गमो (वाटो). ११ पंडितश्रेष्ठ.

मग मेळवी महात्मा एकत्र समस्त असुर, कोपानें ॥
खवळे प्रिय-शिष्य-भसित-मिश्रित-मधुच्याहि[1] तज्ज्ञ तो पानें[1] ॥३१॥

असुरांसि म्हणे, 'कां रे नेणा अद्यापि मत्तपा[2], मरतो- ॥
कीं वांचतो पतंग न भी जो ज्वलनासि मत्त पामर तो ॥३२॥

विप्र अ-वध्य म्हणे श्रुति हाणोनि तिच्याहि लात हाकेला ॥
कच-हननें सुर-गुरुचा न तुम्हीं माझाचि घात हा केला ॥३३॥

ब्राह्मण कर्णीसे खुपती तुमच्या नेत्रीं नसो सवे[3], काढा[3] ॥
युक्तचि मरणाराला हित-परिणामहि न सोसवे काढा' ॥३४॥

धिक्कारुनि असुरांतें धर्मचि तो अमृतमय-वचा[4] शिकवी ॥
बाहे विद्या-करुणा-दिव्य-तपस्या-बळें कचासि कवी ॥३५॥

जों गुरु 'वत्स कच' म्हणुनि 'एहि[5]' असें तो म्हणावया योजी ॥
तों विद्या-सामर्थ्यें उपजूनि गुरूदरीं[6] म्हणे, 'वो[7] जी' ॥३६॥

उदर-प्रवेश पुसता झाला तो पुण्य-राशी शुक्रमुनी ॥
सांगुनि खळ-कपट म्हणे[8], 'येथ वसो काळ हा शिशु क्रमुनी ॥३७॥

निर्भय वसेन काळ क्रमुनि पवित्रोदरीं असाचि सुखें ॥
न हित गुरूदर-दारण[9] निघतां मज निंदितील साधु-मुखें' ॥३८॥

शुक्र म्हणे, 'वत्से, कच कुक्षि विदारुनि निघेल बाहेर ॥
हा तरलाचि परि तुझें या कु-व्यसनीं[10] बुडेल माहेर[10]' ॥३९॥

सुरयानी त्यासि म्हणे, 'वदतां हें अ-शुभ काय हो तात ॥
व्हावे दोघेहि मला, चिंता-मणि हेचि पाय होतात ॥४०॥

तारुनि शिष्यासि तरो गुरु, म्हणतें पात्र काय कन्या या- ॥
नोहे वरासि वर-दा, जाणसि तूं सुज्ञ-नायक न्याया' ॥४१॥

भीड सुतेची भारी, विद्या संजीविनी कचा शिकवी ॥
गुरुलाहि वांचवाया योग्य करी सज्जना कचासि कवी ॥४२॥

---

१ आवडता शिष्य कच याची राख मिसळली आहे अशा मद्याच्या प्राशनानें. २ माझ्या तपश्चर्येस. ३ लागलीच काढतां. अथवा सवे म्हणजे ही सवय काढा म्हणजे टाकून द्या. ४ अमृतासारख्या गोड वाणीचा. ५ ये. ६ शुक्राच्या पोटांत. ७ ओ. ८ कच म्हणाला. ९ गुरूचें पोट फोडणें. १० ह्या तुझ्या दुष्ट नादानें मी मरेन, असा भाव.

गुरु-कुक्षि विदारुनि कच बाहेर निघे परंतु, बहु तो भी ॥
उठवुनि गुरु संकोचे नमुनि रडे, कुल-ज-कीर्तिचा[१] लोभी ॥४३॥
कच-घातुकासुरांतें[२] सुरयानीचा स्वयें जनक दापी[३] ॥
कीं, 'जो ब्रह्म-द्वेष्टा कुशल न पावेल तो जन कदापी ॥४४॥
समजा बरें, जसा मी विप्र गुरु तसाचि हा कच, पळाला ॥
ब्रह्मांडांतुनि जरि रिपु वधिन न देतांहि हाक चपळाला' ॥४५॥
असुरांसि करुनि शिक्षा बाहु उभारुनि म्हणे, 'अहो कानीं ॥
घ्यावें माझें हित-कर मर्यादा-वचन[४] साधु लोकांनीं ॥४६॥
जो विप्र आजपासुनि मद्य-प्राशन करील तो पापी ॥
ब्रह्म-घ्ना-सम निश्चित,' असि मर्यादा स्वयें कवि स्थापी ॥४७॥
होता सहस्र वर्षें कच गुरु-सेवेंत, मग तया प्राज्ञा ॥
शुक्रें बहु संतोषें दिधली जाया पित्याकडे आज्ञा ॥४८॥
कच सिद्ध होय जों तों शुक्र-सुता त्या मनोहरा उचिता ॥
स्व-कर-ग्रहार्थ[५] विनवी, बहु[६] आवडली सु-विद्यता[६] शुचिता[६] ॥४९॥
जें गुरुचें तेंच तिसीं पूज्यत्वाचें धरूनि कच नातें ॥
ठेवूनि दृष्टि धर्मीं तो न तिच्या मान्य होय वचनातें ॥५०॥
पडतां गळां म्हणे कच, 'भगिनीला वरुनियां न भाउ तरे ॥
करितां अ-धर्म सद्यः स्व-पितृ-सुहृज्जन-मुख-प्रभा[७] उतरे[७] ॥५१॥
सुख व्हावें तरि धर्माप्रति म्हण 'माथां वसें, नसें दूर' ॥
पूजा कैची लोकीं जरि दगड शिरीं धरी न सेंदूर ॥५२॥
धर्म अनंत असो परि तो करितां कीर्तन स्वसे, वेंचे ॥
सांग प्रकार याहुनि दुसरे कांहीं मज स्व-सेवेचे ॥५३॥
ज्या उदरीं वास तुझा तेथें माझाहि हें असे नातें ॥
केविं कर-ग्रहण करूं सं-मत धर्मासि जें असेना तें' ॥५४॥
बहु दिवसांची आशा तत्काळ च्छेदितां कचें, रुष्टा- ॥
शुक्र-सुता त्यासि म्हणे, 'रे कपट-पटो भला भला दुष्टा ॥५५॥

---

१ कच कुलीनाच्या कीर्तीचा लोभी होता म्हणून गुरूचें पोट फोडून निघाला ह्याची त्यास शरम वाटली असा भावार्थ. किंवा कुलज जो असतो तो कीर्तीचा लोभी असतो. २ कचाला मारणाऱ्या दैत्यांतें. ३ रागें भरून सांगे. ४ नियमाचें भाषण. ५ आपल्या पाणिग्रहणाकरितां म्हणजे आपणाशीं लग्न लावण्यासाठीं. ६ कचाची विद्वत्ता व शुद्ध आचरण हीं तिला फार आवडलीं. ७ आपले वडील व इष्टमित्र ह्यांचें तोंड उतरतें.

ऐक कृत-घ्ना जरि मी ‘ उठवाचि मदर्थ या हता शत-दा’ ॥
ऐसें गुरुस न म्हणतें कैसा उठतासि तूं हताश[1] तदा ॥५६॥

मलिन[2] कुटिल[3] नीरस[4] जड[5] अजड[6] पुनर्भवपणेंहि[7] कचसा[8] च ॥
धरिला शिरींहि न स्व-प्रकृति-गुण[9] त्यजिसि नाम कच साच ॥५७॥

न करीं वि-फळ मदाशा, आशा भंगूं नयेचि साधूंनीं ॥
जरि भंगिसीच, विद्या सिद्ध नसो, जीस नेसि साधूनीं ’ ॥५८॥

कचहि म्हणे, ‘ गुरु-वेदानुज्ञा नाहीं म्हणोनि या कर्मा ॥
मान्य नसें मी ; शापीं, कीर्ति-करचि शाप न चुकतां धर्मा ॥५९॥

पढवीन ज्यासि विद्या ही त्यासि फळेल, तूंहि घे शाप ॥
परि कोणींहि ऋषि-सुत[10] न वरिल तुज फळो तुझें तुला पाप’ ॥६०॥

जातां स्वर्गीं मिरविति निज-गुरु-सुत-रत्न[11] देव यानीं तें ॥
वर्णिति दैत्यांतें किति, किति कवितें, कितिक देवयानीतें ॥६१॥

---

## वनपर्वांतील नलोपाख्यान

( म० भा० अ० ५३-५७. मोरोपंत अ० ४. )

सोमवंशांतील वीरसेनाचा मुलगा नळराजा ह्यास स्वयंवरांत विदर्भ देशाच्या भीम नामक राजाची कन्या दमयंती हिनें वरिलें. ही कथा ह्या आख्यानांत आहे.

श्री-वीरसेन-सुत नळ निषधेश्वर[12] सु-गुण-मणि-करंडक[13] हो ॥
ब्रह्मण्य-प्रभु दुर्गतदारिद्र्य-समुद्र-वर-तरंडक[14] हो ॥ १ ॥

---

१ निराश. २ मळकट, पक्षीं पातकी. ३ कुरळे, पक्षीं कपटी. ४ शुष्क, पक्षीं प्रीतिरहित. ५ अचेतन, पक्षीं मूर्ख. ६ सचेतन. ७ वारंवार उत्पन्न होण्यानें, पक्षीं वारंवार मरून जिवंत होण्यानें. ८ केसासारिखा. ९ आपला स्वाभाविक गुण. १० ब्राह्मणाचा मुलगा. ११ आपल्या गुरूचा उत्तम पुत्र ( कच ). १२ निषध देशाचा राजा. १३ सु+गुण+मणि+करंडक—चांगले गुण हेच मणि ( रत्नें ) ह्यांचा करंडा, म्हणजे उत्तम गुण ज्याच्यामध्यें परमेश्वरानें एकत्र सांठविले आहेत असा. १४ दरिद्री लोकांचें दारिद्र्य हाच समुद्र त्यांतील ( तो तरण्यास ) उत्तम नौकारूप. मोठा दानशूर हें तात्पर्य.

तो पुण्य-श्लोक रणीं करिता रिपु-वीर-हानि[१] वासवसा ॥
तत्कीर्ति म्हणे, 'गी-श्री-धी[२] हो या योग्य हा निवास वसा' ॥ २ ॥

वैदर्भ[३] भीम-राजा होता बहु खिन्न हीन[४] संतानें[४] ॥
तो भेटोनि सुखविला दमनानें[५] स्वपद-लीन-संतानें[६] ॥ ३ ॥

नृप-दास्य-तुष्ट[७] मुनिचें मन त्या मुनिला म्हणे, 'सखे दमना ॥
झाला शुद्ध, करावा संतति-सुख-पात्र हा स-खेद-मना[८]' ॥ ४ ॥

ब्रह्मर्षि-वरें[९] दमनें वर दिधला त्या नृपासि संततिचा ॥
झाले तीन सुत, सुता चवथी, गाती गुणौघ[१०] संत तिचा ॥ ५ ॥

ठेवी दम, दांत, दमन, दमयंती हीं अशीं तयां नांवें ॥
ज्यां मुनि-वर-प्रसाद-प्रभवांतें[११] त्रि-भुवनेंहि मानावें ॥ ६ ॥

भीम-नृपति दुग्धोदधि दमयंती श्रीच वपु सु-रुचिर तिचें ॥
त्याहूनि देह दिवसों-दिवस दिसे दीन, जरि सु-रुचि[१२] रतिचें ॥ ७ ॥

ती पाहिल्यावरि गमे कोणासहि न स्व-रूप सुंदरसें ॥
श्री-वनमाळेहि पुढें मिरवील स्व-मद[१३] काय कुंद रसें ॥ ८ ॥

श्रीकृष्ण[१४] रुक्मिणीला, श्री-कृष्णा रुक्मिणी जशी आतां[१४] ॥
दमयंतीस नळ, नळा दमयंती आयकों जनें गातां[१४] ॥ ९ ॥

नळ नृप म्हणे, 'शिवा ती नवरी हो, मन दुजीस न वरी हो' ॥
भैमी म्हणे, 'शिवे[१५] तो नवरा हो[१६], प्रेम नित्य नव राहो' ॥ १० ॥

एका समयीं धरिला हंस नळें तो म्हणे, 'कृपा कर गा ॥
सोड मला जरि व्हावी ती दमयंती वधू नृपा कर-गा[१७]' ॥ ११ ॥

---

१ शत्रुभूत वीरांचा नाश. २ सरस्वती, संपत्ति व विद्या ह्यांचा बहुधा एकत्र वास नसतो; परंतु नलापाशीं त्या होत्या हें तात्पर्य. ३ विदर्भ-देशाचा. ४ संततीनें रहित असल्यामुळें. ५ ऋषिविशेष ह्यानें. ६ आपणाला शरण आलेल्यांस जो कल्पवृक्षासारखा, त्यानें ७ राजाच्या सेवेनें संतुष्ट झालेल्या. ८ खेदयुक्त आहे मन ज्याचें असा. ९ ब्रह्मर्षींमध्यें श्रेष्ठ. १० गुणांचा समुदाय. ११ मुनिश्रेष्ठाच्या वराच्या प्रसादानें उत्पन्न झालेल्यांस. १२ उत्तम आहे कांति ज्याची असें. १३ आपला गर्व. १४ आतां म्हणजे सांप्रत कृष्ण व रुक्मिणी हीं दोघें जशीं एकमेकांस शोभतात असें लोक म्हणतात; तशीं पूर्वीं नल व दमयंती हीं परस्परांस अनुरूप होतीं असें लोक गात होते; हें आम्ही ऐकतों असें कवि म्हणतो. १५ हे पार्वती. १६ होवो. १७ हस्तगत.

करिन तुझें गुण-वर्णन जेणें होइल तुझीच नवरी ती' ॥
सत्य प्रिय हित वदती शुद्धात्मे[१] न धरितीच नव रीती ॥ १२ ॥

नळ-मुक्त[२] राजहंसासह हंसांची नभ:-पथें[३] आली[४]॥
आली प्रमद-वनीं[५] तों भैमी[६] ही घेउनि प्रिया आली[७] ॥ १३ ॥

भैमी म्हणे, 'मराळ-ग्रहणेच्छा[८] मन्मनांत आली हो ॥
एकासि तरि धरूं या विखरा मुक्ता वनांत आली हो' ॥ १४ ॥

इतरा हंसांनीं त्या नेल्या बहु लोभवूनि दूरवर ॥
भैमी त्यासि धरूं ये ज्या दे असु-दान दान-शूर-वर ॥ १५ ॥

एकांतीं तीपाशीं स्तविला निषधेंद्र तो खगानें हो ॥
जाणों राधेला दे खग-भगवद्वेणु[९] तोख[१०] गानें हो ॥ १६ ॥

'पुण्य-श्लोक निषध-पति नळ खळ-बळ-जल-धि-वाडवानल[११] गे ॥
लोकां महोत्सव-प्रद[१२] तोचि सदा[१३], त्यांसि पाडवा[१३] नलगे ॥ १७ ॥

स्मर-बुध-दस्र-रुचिरतर[१४] ऐसें म्हणणार जे न ते लटिके ॥
हैयंगवीन[१५] जैसें सु-रसिक-रसनेपुढें[१६] न तेल टिके ॥ १८ ॥

अनुपम[१७] अनुरूप[१८] अनघ[१९] जरि वरिला त्वां नृपात्मजे न नळ ॥
होइल[२०] केवळ ताप-द[२०], कीं जो नर नळ न होय तो अनळ ॥ १९ ॥

नळ-कस्तूरी टाकुनि कां तूं घेसील अन्यनर माती ॥
जरि वरिती न हरिप्रति घेती म्हणवूनि धन्य न रमा ती ॥ २० ॥

---

१ निर्मल अंत:करणाचे. २ नळानें सोडलेला. ३ आकाशमार्गानें. ४ पंक्ति. ५ क्रीडेच्या बागेंत. ६ भीमराजाची मुलगी दमयंती. ७ सख्या. ८ हंस धरण्याची इच्छा. ९ हंस-रूपी कृष्णाचा वेणू. १० तोष, आनंद. ११ दुष्टांचें सैन्य हाच समुद्र ह्याला वडवाग्नीसारखा. १२ मोठा आनंद देणारा. १३ पाडवा लोकांस एक दिवस मात्र आनंद देतो, परंतु नळ सर्वकाळ आनंद देणारा होता; असा भावार्थ. १४ मदन, बुध व अश्विनीकुमार (हे तिघेही रूपाविषयीं प्रसिद्ध आहेत) ह्यांपेक्षांही हा सुंदर. १५ ताजें तूप. (तत्तु हैयंगवीनं यद्ह्यो गोदोहोद्भवं घृतम्–काल काढिलेल्या गाईच्या दुधापासून केलेलें तूप). १६ रुचि घेण्यांत मार्मिक अशा लोकांच्या जिभेपुढें. १७ ज्याला उपमा नाहीं असा. १८ योग्य. १९ निष्पाप. २० उत्तरार्ध–नळास टाकून तूं जर इतर पुरुष (अनळ) वरशील तर तो तुला संताप देणारा होईल; कारण जो नळ नव्हे तो अनळ म्हणजे अग्नि होय.

नर-रत्न तोचि, तूंचि स्त्री-रत्न, उदड आड-नांवांचीं[१] ॥
न बुडविति न वा तारिति चित्रें बरवींहि आड-नावांचीं[२]' ॥ २१ ॥

ती सु-मति म्हणे, 'आर्या त्वां तिकडेही असेंचि कळवावें ॥
साधो हळुहळु मृदु मधु[३] हित मित बोलोनि चित्त वळवावें' ॥ २२ ॥

'आज्ञा' म्हणोनि येथुनि कळवुनि हें प्रेम तेथुनि[४] उडाला ॥ २३ ॥

इकडे ती उपवर झाली आहे असें भीमराजानें समजून तिच्या स्वयंवराची योजना केली, आणि राजेरजवाड्यांस निमंत्रण केलें. त्यानंतर :—

देवर्षि[५]-मुखें परिसुनि शक्र करी धरुनि हरिख[६] गमनातें ॥
त्याच्या विमान येइल काय न येतांचि हरि-खग[७] मनातें ॥ २४ ॥

जों निकट कुंडिनाच्या[८] आले यम-वरुण-भूभृदर्यनळ[९] ॥
तों तोहि सकळ-सद्गुण-निधि[१०] पुण्य-श्लोक वीर-वर्य[११] नळ[१२]॥ २५ ॥

ते सुर म्हणति, 'अहाहा नळाचि सकळ-पुरुष-मुकुट-हीर-मणी ॥
नवरी न वरील कशी याला पाहोनि सु-मति ही रमणी ॥ २६ ॥

आम्हांलाचि न केवळ लावितसे व्यक्त लाज हा रविला ॥
आम्हीं निज-तेजो-मद याचिपुढें सर्व आज हारविला' ॥ २७ ॥

भेटोनि त्यासि म्हणती, 'कार्य-परें सर्वथा न लाजावें ॥
हो अस्मद्दूत, विमुख[१३] न जनें, सत्य-व्रता नला जावें' ॥ २८ ॥

'होतों दूत', नळ म्हणे, 'कार्य वदा कोण हो तुम्ही चवघे' ॥
ओळख देउनि म्हणती, 'आम्ही भैम्यर्थ पातलों अवघे ॥ २९ ॥

भैमी स्वयें वरू या आम्हां चौघांजणांत अन्य-तमा[१४] ॥
हें कार्य, दूत हो गा जा गा बा तिजकडेचि धन्य-तमा' ॥ ३० ॥

---

१ नररत्न, स्त्रीरत्न अशा नांवांचीं मनुष्यें पुष्कळ आहेत, परंतु त्या नांवांच्या अर्थास अनुसरून तुम्हां दोघांवांचून कोणी सांपडावयाचीं नाहींत असा भाव. २ विहिरी आणि नावा ह्यांचीं. ३ मधासारखें गोड. ४ नळाकडून. ५ नारद. ६ हर्ष. ७ विष्णूचा गरुड उत्तरार्ध दमयंतीकडे येण्याची इंद्राला इतकी उत्कंठा झाली कीं, अतिवेगवान् जो गरुड तोही त्याला वाहनार्थ आवडेना, मग विमानाची कथा कशाला? ८ कुंडिन—हें भीमक राजाच्या राजधानीचें नांव. ९ (यम+वरुण+भूभृदरि+अनळ) = यम, वरुण, (पर्वतांचा शत्रु) इंद्र आणि अग्नि. १० साऱ्या सद्गुणांचा ठेवा. ११ वीरांमध्यें श्रेष्ठ. १२ हा 'आला' ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. १३ प्रतिकूल, पराङ्मुख. १४ कोणाला तरी एकाला.

स-स्मित-वदन नळ म्हणे, 'प्रभुजी जो हेतु सुर-वरागमनीं[1] ॥
माझ्याहि तोचि, सर्वींहि मृगांच्या तुल्य सु-रव-राग[2] मनीं ॥ ३१ ॥

दूत करुनि मज तिकडे कार्यास्तव पाठवूं नको पावा[3] ॥
कोणावरिहि[4] सु-नय न स्वातिक्रम आठवून कोपावा[4]' ॥ ३२ ॥

शक्र म्हणे, 'वदलासि प्रथम तसें वचन मग असें वदसी ॥
अ-चळ करींच असावा व्यवहारीं शब्द संगरीं सदसी[5]' ॥ ३३ ॥

भूप म्हणे, 'या[6] कर्मी[6] पवनहि होईल मज न सांगाती[7] ॥
अंतःपुर-प्रवेशीं, जी प्रभुजी, साधु युक्ति सांगा ती' ॥ ३४ ॥

शक्र म्हणे, 'जा गा तूं चिंता आधींच करिशि कां गा ती ॥
आम्हांसि हें कठिण जरि, तरि, सुज्ञ प्रभु म्हणोनि कां गाती?' ॥ ३५ ॥

शक्र-वरें नळ गेला शिरला अंतः-पुरीं सुखें सुर-सा ॥
भैमीच्या हा, याच्या ती सेवी, रूप-संपदा सुरसा ॥ ३६ ॥

भैमी हर्षे त्याच्या[8] विधुच्या ताशि कुमुदिनी न आगमनीं ॥
सत्कारूनि म्हणे, 'जी यावें मद्भाषणें न आग[9] मनीं ॥ ३७ ॥

सुंदर-वर कोण तुम्ही गुरुच्या[10] वाटो न हें[11] पराग[12] मना ॥
कीं जें जें अंतःपुर तें तेंहि विषय[13] नव्हे परागमना[14] ॥ ३८ ॥

आलां कसे अ-वारित[15], कार्यार्थ[16] प्रगट आयकों दावा[16] ॥
वाटे कर्णीं तुमचा वाङ्मय[17] सौवर्ण-आय[18] कोंदावा' ॥ ३९ ॥

---

१ देवश्रेष्ठांच्या आगमनांत. २ मधुरध्वनीविषयीं आवड. ३ कृपा करा. ४ (सुनय स्वातिक्रम आठवून कोणावरिही न कोपावा, असा अन्वय) तात्पर्य–तुम्ही व मी एकच कार्याकरितां आलों आहों; म्हणून त्याच कामासाठीं तुम्ही मला तिकडे दूत करून पाठवितां हें उचित नाहीं; परंतु तसें न कराल तर कोणाच्याही हातून नीतीचें उल्लंघन होणार नाहीं. ५ (सत्+असी) = उत्तम खड्ग. उत्तरार्ध–व्यवहारीं शब्द अचल असावा; व संगरीं करींच सदसी अचल असावा, असा अन्वय. ६ ह्या (अंतःपुरप्रवेश रूप) कार्यांत वायुही मजबरोबर यावयास भिईल म्हणजे वारा देखील जेथें शिरूं शकत नाहीं. ७ सहाय, सोबती. ८ नलाच्या. ह्याचा संबंध आगमनाकडे. ९ अपराध. मी जें पुढें बोलतें त्याची माफी असावी हें तात्पर्य. १० पित्याच्या. ११ तुमचें अंतःपुरांत येणें. १२ मोठा अपराध. १३ योग्य, पात्र. १४ परक्याच्या येण्याला. १५ कोणीं अटकाव न केलेले असे. १६ (कार्यार्थ प्रगट दावा आयकों)–कोणत्या कामाकरितां आपण आलां हें स्पष्ट सांगा, तें मला ऐकूं द्या. १७ वाणीरूप. १८ सोन्याचा; पक्षीं, उत्तम, (अकारादि) वर्णांनीं युक्त. (आय=आकार).

वाहों लागे गुरु-घन-रस-पूरित[१] वीरसेन-भू-पनळ[१] ॥
'सुंदरि, मी पाशि-पितृप-पावक-पुरुहूत-दूत[२] भूप नळ ॥ ४० ॥

सु-मुखि, प्रार्थिति बहु तुज ऐसें प्रभु लोक-पाळ ते चववे ॥
अवघे उणेचि रस; तूं दिव्य रसाचीच सर्वदा चव घे ॥ ४१ ॥

सुभ्रे, तुवां वरावा आम्हां चवघांजणांत अन्यतम ॥
धन्यतम-त्व[३] तुला यो[४] न शिवो पळ दयित-विरह-जन्य[५] तम[५]' ॥ ४२ ॥

हांसोनि म्हणे भैमी, 'प्रणति-प्रिय देव गुरु, असें म्हणती ॥
त्यांहीं क्षमा करावी, स्वीकारावी यशोर्थ मत्प्रणती ॥ ४३ ॥

वरिले हेचि चरण म्यां, त्यजितां ज्वलनांत काय होमीन ॥
यज्जीवन[६] जीवन तो दुग्धीं वांचेल काय हो मीन' ॥ ४४ ॥

नळ नृप म्हणे, 'सु-बुद्धे या दासावरि तिहीं न कोपावें ॥
मदधिक कोटि-गुणें ते. आग्रह कांहीं धरूं नको, पावें ॥ ४५ ॥

मृत्यु असो, पर-वंचन करुनि सुधेच्या जिणें नको पानें ॥
त्वत्पाणिग्रहणें मी देवांच्या बहु शिणेन कोपानें' ॥ ४६ ॥

विदुषी[७] म्हणे, "म्हणा जा कीं 'म्यां कथिलें परोपरी, पण ती ॥
प्रणति प्रभूंसि करिती, 'अनुकंप्या मी स्वयं-वरा[८]' म्हणती' ॥ ४७ ॥

सत्संमत-स्वयंवर-विधिनें वरितां तुम्ही न अपराधी ॥
काय करूं त्यजुनि तुम्हां माझी पळ अनु-सरे न अपरा[९] धी ॥ ४८ ॥

होईल देह रंगीं सुर-पति-नर-पति-समक्ष नल-गामी[१०] ॥
हा जन तुमच्याचि असे इतरा कोणाचियाहि न लगामीं" ॥ ४९ ॥

होय अ-कृत-कार्यहि[११] नळ सुर-वर-संमत खरें निवेदून ॥
सत्यें जसा तसा न प्राज्येंहि सुधा-रसें निवे दून[१२] ॥ ५० ॥

---

१ मोठा आणि पाण्यानें गच्च भरलेला; हें पनळाचें विशेषण. तात्पर्य कीं, गंभीर व अत्यंत रसाल असें भाषण करण्यास नलानें आरंभ केला. २ वरुण, यम, अग्नि व इंद्र ह्यांचा दूत. ३ अतिशय कृतार्थता. ४ येवो. ५ पतीच्या वियोगापासून उत्पन्न होणारें दुःख. तात्पर्य तूं मनुष्यास वरिलें तर तुला पतिवियोगाचें दुःख सोसावें लागेल ह्याकरितां आम्हां देवांपैकीं एकास वर. ६ ज्याचें वांचण्याचें साधन. ७ शाहणी. ८ स्वतः पति पाहून त्यास वरणारी. ९ दुसऱ्याकडे. १० नळाकडे जाणारा. ११ केलें नाहीं कार्य ज्याणें.

रंगीं सर्व मिळाले तेव्हां आली तयांत दमयंती ॥
जाणो चकोर ते, ती मूर्त-ज्योत्स्नाचि ताप-दमयंती[1] ॥ ९१ ॥

साहे न परोत्कर्षा ज्याची मति सच्छळीं[2] सदानलसा[3] ॥
बैसे तिघांजणांसह हरिहि अधिष्ठूनि त्या सदा[4] नलसा ॥ ९२ ॥

रंगीं पाहों जातां दिसले चौघेहि ते धवासम[5] जे ॥
भैमी देव-कृत-च्छळ ऐसें चित्तांत तेधवां समजे ॥ ९३ ॥

पांचा नळांत जेव्हां काय दिसेनाचि भेद लव[6] तीस ॥
बुद्धि[7] म्हणे, 'कां भीसी गुरु-चरणीं त्यजुनि खेद लवतीस[7]' ॥ ९४ ॥

कर जोडूनि म्हणे ती, 'नळ भर्ता भीम-कन्यकेला हो ॥
प्रभुजी स्वप्नांतहि जरि संकल्प नसेल अन्य केला हो ॥ ९५ ॥

नळ पति, इतर पुरुष पितृ-बंधु जरि मनांत मानिले असती ॥
तरि ताराल इला हो प्रभुजी कैसी तरेल जी अ-सती' ॥ ९६ ॥

तीचा बलवान् निश्चय सुर-हृत[8] नळ-रूप वे हिराऊनी ॥
बहु तेज प्रकट करी शुचि सत्व-गुण[9] च्छळीं हिरा ऊनीं ॥ ९७ ॥

शुद्ध सवांग[10] कुश नळद[11] परि उप-भोगोचितत्व[12] नलदासी ॥
ऐसें मनांत आणुनि दमयंती सु-मति होय नळ-दासी ॥ ९८ ॥

पति-रूप सोडवुनि ती लोकेशांचा[13] प्रसाद साधूनी ॥
घाली नळासि माळा स्तविली प्रेम-प्रसन्न साधूंनीं ॥ ९९ ॥

---

१ ताप शमविणारी. २ साधूचा छळ करण्याविषयीं. ३ (सदा+अनलसा) = सर्वदा आलस्यरहित. ४ सभेला (सदस्=सभा). ५ पति जो नळ त्यासारखे. ६ लेशमात्र. ७ नम्र होत आहेस. म्हणजे गुरुचरणीं (श्रेष्ठ इंद्रादि देव त्यांच्या चरणीं) खेद त्यजुनि (जर) लवतीस म्हणजें शरण जाण्यास सिद्ध आहेस (तर) तूं कां भीसी-भितेस. ८ देवांनीं घेतलेलें. ९ हिरा उन्हांत जसा (जास्त) तेज प्रकट करितो तसा शुद्ध जो सत्त्वगुण तो (त्याचा छळ केला असतां) ज्यास्त सामर्थ्य प्रकट करितो. १० (सव+अंग)--यज्ञाचे अंगभूत. ११ वाला. १२ उपभोगाला योग्य असणें. तात्पर्य कीं जसे देव पवित्र, तसा नलही पवित्र, ते जसे प्रेमार्ह तसा हाही प्रेमार्ह; पण ते गुरु म्हणून प्रेमार्ह, व हा पति म्हणून प्रेमार्ह असें समजून तिनें नलालाच वरिलें. १३ इंद्रादि लोकपालांचा.

नल तीस म्हणे, 'कुल-जे त्वां जरि[१] देवां-समक्ष मज वरिलें ॥
जों सासु[२] तों तुझा मी होतांहि प्रेम ऊन मजवरिलें' ॥ ६० ॥

झाला विवाह गेला स्व-पुरा नळ मग तिशीं सदा रमला ॥
भूमि म्हणे, 'ताराया अवतरला विष्णु हा स-दार[३] मला' ॥ ६१ ॥

---

## वनपर्वांतील जयद्रथ-कृत द्रौपदी-हरण.

(म० भा० अ० २६४-२७२. मोरोपंत अ० ९.)

धर्मादि पांडव काम्यकवनांत असतां एके दिवशीं मृगया करण्याकरितां सर्व वनांत गेले होते. आश्रमांत द्रौपदी एकटीच होती. त्याच दिवशीं जयद्रथ ह्या नांवाचा राजा विवाह करण्याच्या उद्देशानें नवरी पाहाण्याकरितां सैन्यासह चालला असतां त्या आश्रमाजवळ उतरला होता. तेथें द्रौपदी त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां तो तिच्या सौंदर्यानें मोहित झाला, आणि तिला आपल्या रथांत घालून घेऊन चालला. पुढें लागलेंच पांडवांनीं त्यास गांठून त्याचा पराभव करून द्रौपदीस परत आणिलें. हें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे.

राया[४] धृतराष्ट्राचा प्रिय जामाता[५] विवाह-काम[६] वनीं ॥
आला जयद्रथाख्य स्व-बळ-भरें[७] कांपवीत ती अवनी ॥ १ ॥

मृगयार्थ पांडु-नंदन गेले असतां निजाश्रम-द्वारीं- ॥
होती उभी द्रुपद-जा, जैसी शंपा[८] नवांबु-भृद्वारीं[९] ॥ २ ॥

तीतें पाहुनि झाला तो रावणसाचि पात्र अ-न्याया ॥
मित्रासि म्हणे, 'चित्ता हेचि बहु-मता नकोचि अन्या या[१०] ॥ ३ ॥

जा कोटिका सख्या तूं पूस तिचें वृत्त, हो मत्कर-गा[११] ॥
ऐसें आधीं चतुरा, सामचि[१२] निज-कार्य सिद्धिमत्[१३] कर गा'॥ ४ ॥

सांगुनि निज वृत्त तिचें वृत्त पुसे तीस कोटिक विहितसें[१४] ॥
स्वल्पांत तीहि सांगे, बोलों शकती न कोटि-कविहि तसें ॥ ५ ॥

---

१ ज्यापक्षीं. २ (स+असु)-जिवंत. ३ स्त्रीसहित. ४ जनमेजया. ५ धृतराष्ट्राची दुःशला नांवाची मुलगी जयद्रथास (सिंधुदेशाच्या राजास) दिली होती. ६ लग्न करण्याची ज्यास इच्छा आहे असा. ७ आपल्या सैन्याच्या भारानें. ८ वीज. ९ (नव-अंबु-भृत्-वारी) नव्या मेघाच्या पाण्यांत. १० ह्या मला. ११ माझ्या हस्तगत. १२ सामोपचार. १३ घडून येईल असें. १४ पुसण्याला योग्य.

नंतर कोटिकानें सांगितल्यावरून जयद्रथास समजलें कीं, द्रौपदी ही आपली बहीण आहे; तरी तो तिला, तूं मला वर, असें म्हणून आणखी बोलतो :—

'राज्य-च्युत-संगें[1] श्रम-पात्र करिसि दिव्य देह कां गे हें ॥
श्रीमद्देह मिळाल्या सेवावीं निर्धनेंचि कां गेहें ॥ ६ ॥

त्वां फेडिलेंचि त्यांचें तत्संगें कृश करूनि देह रिण ॥
हो मद्दयिता, देइन[2] मन[2] तुज, गानासि जेविं दे हरिण' ॥ ७ ॥

कृष्णा म्हणे, 'कु-बुद्धे खद्योतीं[3] कीटकाधमीं मलिनीं ॥
द्यु-मणि-प्रति[4] सोडूनि प्रिय-भाव[3] धरील काय रे नलिनी[5] ॥ ८ ॥

स्पर्शींच मृति-प्रद[6] हा[7] वीर-परिग्रह[7] महाहिचा[8] मणि[8] कीं ॥
अंड-घटीं[9] द्यु-मणि-द्युति योग्या नांदावयास कीं मणिकीं[10] ॥ ९ ॥

त्यजितिल भट तुज समयीं त्यजिति हरि[11] जसे नगासि नग-दाहें[12]॥
भीम-प्रिया प्रिय-सखी[13] लवहि न साहेल लंघन[14] गदा हें' ॥ १० ॥

धांवोनि बळात्कारें हां हां म्हणतांहि तो शिवे कपिसा[15] ॥ ११ ॥

पावे व्यसन अ-नाथा जाणों वि-जनांत तापसी ते, तें ॥
खळ दे तिला, जसा तो पाप-मति दशास्य ताप सीतेतें ॥ १२ ॥

कृष्णेनें भावि-नरक-पाताच्या प्रत्ययासि जड लाहो ॥
म्हणउनि कृष्ट-निजोत्तर-पट[16] आसुडितांचि[16] दुष्ट पडला हो ॥ १३ ॥

धौम्यासि म्हणे, 'धांवा मजला हें मूर्त-पातक[17] विटाळी ॥
रक्षा मज कीर्तिसही, कीं स्व-पर-व्यसन-पात[18] कवि टाळी' ॥ १५ ॥

पुनरपि कपिसाचि पिसा क्षिप्र धरायास तीवर उगारे[19] ॥
तों धांउनि धौम्य म्हणे, 'न उठ धराया सती-वर उगा रे' ॥ १६ ॥

---

१ राज्यभ्रष्ट (पांडव) ह्यांच्या संगतीनें. २ तुझ्या आज्ञेंत राहीन. ३ काजव्याविषयीं हा आपला आवडता आहे अशी बुद्धि. ४ सूर्यास. ५ कमलिनी. ६ मरणदायक. ७ ही (मी) वीरपत्नी. ८ मोठ्या विषारी सर्पाचा मणिच केवळ. ९ ब्रह्मांडोदरांत १० मडक्यांत. ११ सिंह. १२ वणव्यानें पर्वत पेटला असतां. (नग=वृक्ष. पंत) १३ माझी प्रियसखी. १४ मजशीं दुर्वर्तपणानें वागणें. १५ माकडासारखा. १६ (जयद्रथानें) ओढलेलें आपल्या आंगावरील वस्त्र (द्रौपदीनें) जोरानें ओढतांच. १७ जयद्रथ हेंच मूर्तिमंत पातक. १८ आपलें व दुसऱ्याचें संकटांत पडणें शहाणा टाळतो. १९ उठून धरावयास धांवला.

ती नमुनि म्हणे मुनिला, 'न वदावें व्यर्थ, दुष्ट हा निपट ॥
ओढिल तरि जीवनही पावेल न एक मात्र हानि पट ॥ १७ ॥
भत्रदाज्ञेनें बैसो हे[1] दुष्ट-रथीं वृकोदर-गदासी[2] ॥
न हरि-प्रसाद-कविर्ची[3] आपन्ना खळ-वृकोदर-ग[4] दासी' ॥ १८ ॥
बसतां स्व-रथीं हर्षे तो, जेविं दशास्य जानकी-लाभें ॥
धरि पर-रथासि ती, कीं स्पर्शाया अंत्यजा न कीला[5] भें ॥ १९ ॥
ती बहु त्यासि दटावी कार्पासा काय दापिना कीला[5] ॥
काय बधेल पराला सती त्यजुनि काय-दा[6] पिनाकीला[6] ॥ २० ॥
'जरि तूळ-राशि-मध्य-स्व-बिळीं[7] नेईल आखु वातीतें ॥
तरि वाति आखुतें बा सहसा भक्षील आखु वा तीतें? ॥ २१ ॥
रे तत्काळचि साध्वी-धर्षण-कर[8] जरि महा-तपा मरतो' ॥
धौम्य मुनि असें सांगे हित, परि जोडी न हात पामर तो ॥ २२ ॥
कृष्णाहि म्हणे, 'काय न कापिल गिळितां वृकानना शस्त्री[9] ॥
वधि दश-मुखा मग करिल एक-मुखाचाहि कां न नाश स्त्री' ॥ २३ ॥
अप-शकुन-ज्ञ युधिष्ठिर समजोनि अनिष्ट सानुज परतला ॥
जो मृगयेंत न, चित्तें त्यजुनि दया राम नाम-जप रतला ॥ २४ ॥
तों मार्गीं भृत्याची भार्या धात्रेयिकाचि[10] आढळली ॥
धांवे पडेहि [11]असकृन्नग-शिखराहुनि जशी शिळा ढळली ॥ २५ ॥
वृत्त कथुनि कोपानल दीप्त करायासि पांडु-योध-मनीं ॥
सरला[12] सु-वंश-जा[13] ती झाली धात्रेयिकाचि हो धमनी[14] ॥ २६ ॥

---

१ ही (मी द्रौपदी). २ गदेसारखी. ३ शुक्राचार्याची. ४ खळ+वृक+उदर+ग (दुष्ट जयद्रथरूप) लांडग्याच्या पोटांत गेलेली; (अन्वय—हरिप्रसादकविची खळवृकोदरग दासी आपन्ना न; कृष्णाचा प्रसाद हाच कवि (शुक्राचार्य) त्याची दुष्ट लांडग्याच्या (जयद्रथरूपी वृकाच्या) उदरांत (रथांत) गेलेली अशी मी दासी दुःखित होणार नाहीं. संदर्भाकरितां पृ० ३६१ आर्या १६, कचोपाख्यान पहा.) ५ अग्नीची ज्वाला. ६ आपलें अर्धांग देणाऱ्या महादेवास. ७ (हें धौम्याचें भाषण) कापसाच्या ढिगामधील आपल्या बिळांत. ८ पतिव्रतेची अब्रू घेणारा जरी मोठा तपस्वी असला तरी तो मरतो. ९ शस्त्रधारी. १० ह्या नांवाची. ११ वारंवार. १२ सरळ, पक्षीं, निष्कपट. १३ चांगल्या वेळूची केलेली, पक्षीं, चांगल्या कुळांत झालेली. १४ फुंकणी.

रिपुला गांठाया ते पांडव देती भरों न घटिकेतें ॥
खळ-बळ बहु भी, जाणों न पळहि साधूंपुढें अघ टिके तें ॥ २७ ॥

गांठिति रिपु-कटकातें हरिणांच्या सिंह जेविं कळपातें ॥
रक्षील काय पतिला तें व्यसनीं होय जें[१] विकळ पातें[२] ॥ २८ ॥

स्व-रथावरूनि भूवरि उतरुनि देवीस, जरिहि नाक-द[३] न- ॥
वरिलें पलायन खळें, कीं न पहावेचि लोचना कदन[४] ॥ २९ ॥

धर्म स्व-रथीं स्त्रीतें मुनितें घेउनि म्हणे पुरोध्यातें ॥
'व्हा[५] शांत, असेंचि प्रिय राज्य-श्री-मोचनें[५] पुरो ध्या तें' ॥ ३० ॥

अर्जुन भीमासि म्हणे, 'न करावें व्यर्थ भीत-भट-कदन ॥
गेला पळोनि बहुधा दुष्ट जयद्रथ न दाखवी वदन' ॥ ३१ ॥

भीम म्हणे, 'स-पुरोहित राया तूं आश्रमांत जायेतें- ॥
निववीं, तेंचि करावें तेणें जें स्वच्छ कर्म ज्या[६] येतें ॥ ३२ ॥

जा सहदेवा नकुळा तूंही जा या तिघांसि सांभाळा ॥
लावावा गेलें धन येतां हातासि बोल कां भाळा ॥ ३३ ॥

येतों आतांचि नको साधाया शत्रु-वध मला उशिर ॥
कृष्ण[७] असो[७], जा आर्या[८], त्वच्चरणा तो न अधम लाउ[९] शिर' ॥ ३४ ॥

धर्म म्हणे, 'रे बा त्या निज भगिनीच्या[१०] न उग्र हो तिलकीं ॥
नित्य सुता-सौभाग्य-क्षय-शोकें[११] पितर[१२] साश्रु होतिल कीं' ॥ ३५ ॥

कृष्णा म्हणे, 'अहो जरि मत्प्रिय करणें वधाचि तरि त्यातें ॥
मारावेंचि नय-ज्ञें श्रीतें स्त्रीतें बळेंचि हरित्यातें' ॥ ३६ ॥

---

१ जें कटक. २ पडण्यानें. ३ स्वर्ग देणारें (पलायनाचें विशेषण). ४ संहार. ५ शांत व्हा, राज्यश्रीमोचनें (आपलें राज्य सोडविल्याच्या योगानें) असेंचि प्रिय (इष्ट) पुरो (मिळो) तें ध्या (असें चिंता). ६ ज्याला जें कर्म उत्तम येतें तें, त्यानें करावें. ७ अर्जुनमात्र मजबरोबर असूं द्या. ८ हे धर्मा. ९ तो अधम (जयद्रथ) तुला शरण न येवो; तसें झाल्यानें त्याची तुला दया येईल हा भाव. १० आपल्या बहिणीच्या (दुःशलेच्या) तिलकाविषयीं म्हणजे कुंकवाविषयीं कठोर होऊं नको, म्हणजे जयद्रथास मारून तिला वैधव्य देऊं नको. ११ कन्येच्या वैधव्याच्या दुःखानें. १२ गांधारी व धृतराष्ट्र.

क्रोश-मितांतर[१] असतां बीभत्सु[२] म्हणे शरांस, 'कळवा जी- ॥
आलों असें अरिस,[३] तो दूर न जावा, वधा सकळ वाजी' ॥ ३७ ॥
अर्जुन–नामांकित-शर-हत हय पाहून फार तो भ्याला ॥
कुजनासि कुजीवितही[४] प्रिय; जैसें पाप-वित्त लोभ्याला ॥ ३८ ॥
धांवोनि त्यासि सार्जुन भीम महा-बळ पळांत आटोपी ॥
ज्याचें चित्त म्हणे, 'स्व-क्रोधा-और्वा[५] खलाब्धि आटो पी[५]' ॥ ३९ ॥
अर्जुन म्हणे, 'उभा रे सिंह-त्व त्यजुनियां न कुतरा हो ॥
उत राहो, क्षण[६] पाहों, जा यम-भट हो तळीं न उतरा हो ॥ ४० ॥
रे रे जयद्रथा हें योग्य नव्हे तुज पलायन, परत रे ॥
अभि-मुख[७] मरोनि च तरे पळतां न महा-बलायन[७] पर तरे' ॥ ४१ ॥
भीम रथावरुनि उडी टाकुनि धांवुनि धरी तया अरितें ॥
वाटे प्रभुचें भीमाकृति[८] खल-बल-दलन-लब्ध-यश[८] अरि तें ॥ ४२ ॥
व्यसनीं न पडेल कसा व्याघ्र-बिळीं जो मदांध ओतु[९] निघे ॥
कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विंगळांसि ओतुनि घे ॥ ४३ ॥
बुकली भीम, बुकलिती जैसें यज्ञांत बोकडाला हो ॥
कीं तो साध्वी-धर्षण-दोष-फलानुभव रोकडा लाहो ॥ ४४ ॥
वि-कळ जयद्रथ होतां वारी धर्मानुजा गुडाकेश[१०] ॥
कीं तत्सत्सेव्य-गुणा[११] कोप[१२] न दूषू जसा गुडा[१३] केश ॥ ४५ ॥
भीम म्हणे, 'गुरु-दुःख-द तो[१४] स्त्री-जितसाचि[१४] हा दया-जित[१५] कीं ॥
चालों न देचि कर्में मी करितों तीं हितोदया जितकीं ॥ ४६ ॥

---

१ कोसभर अंतर. २ अर्जुन. ३ जयद्रथास. ४ दुष्टाचारानें घालविलेलें आयुष्य. ५ हे क्रोधरूप वडवानला, हा खल (जयद्रथ) हाच समुद्र पी, हा आटूं दे. ६ उत्तरार्ध—(अर्जुन) उत (=अथवा) राहो (असें यमभटांस म्हणून जयद्रथास मारावयास तयार झाला; परंतु युद्धांत मारून उत्तम गतीस जाण्याची त्याची इच्छा आहे किंवा नाहीं हें पहावें म्हणून तो पुनः त्यांस म्हणतो) क्षण पाहों—क्षणभर वाट पाहूं द्या इ०. ७ पर (शत्रु) जरि महाबलायन (महाबलिष्ठ) तरी पळ पळतां न तरे, अभिमुख मरोनि तरे. ८ भीमाचें स्वरूप घेणारे, दुष्टांच्या सैन्याच्या नाशापासून मिळविली आहे कीर्ति ज्यानें असें प्रभूचें (विष्णुचें) तें अरि (चक्र--सुदर्शन) च वाटे. ९ बोका. १० अर्जुन. ११ त्याच्या (धर्माच्या) सज्जनांनीं सेव्य अशा (दयारूप) गुणास. १२ (तुझा) राग. १३ गुळास. १४ तो दशरथ, बायको (कैकयी) म्हणेल तसें वागणारा. १५ धर्म.

हा धर्म[१] दया-जित तुज योग्य सखा स्त्री-जिता दशरथा[१] रे ॥
शर सह्य पार[२] जाता हृदयींच जनापवाद-शर थारे[२] ॥ ४७ ॥
वत्सा जैसा तो गुरु[३] होतोसि तसाचि तूंहि कां, पावें ॥
या पापातें पाहुनि सन्नयनें न, नरकेंहि कांपावें ॥ ४८ ॥
देऊं दे प्राणांतप्रायश्चित्त स्वकीय हा नर कीं ॥
मूर्खा, सुहृत् वसावा स्वर्गीं चिरकाळ कीं महा-नरकीं' ॥ ४९ ॥
वध-सम विडंबन असें समयींच स्मरण शास्त्र-पाटव दे ॥
अर्धेंदु-शरें त्याच्या माथां काढूनि पांच पाट वदे ॥ ५० ॥
"'मी पांडव-दास' असें स्व-मुखें सर्वत्र बोलशील तरी ॥
देईन जीवित तुला तारी विपदब्धिमाजि शील-तरी" ॥ ५१ ॥
वंदुनि म्हणे जयद्रथ, 'ऐसेंच म्हणेन मी सदा साचें ॥
मारूं नको बुक्यांनीं रक्षावें जीवित स्व-दासाचें' ॥ ५२ ॥
ज्यापासुनी धरावी प्र-बळतरारातिच्याहि[४] भी[५] मानें ॥
बांधुनि केतु-स्तंभीं खळ नेला स्वाश्रमासि भीमानें ॥ ५३ ॥
प्रेषूनि[६] कोटरेतें प्रेम्यानें जेविं बाण राखविला ॥
तैसाचि निजाज्ञेनें जेणें[७] तो त्या प्रभूसि[७] दाखविला[८] ॥ ५४ ॥
धर्म तशासि विलोकुनि भीमासि म्हणे, 'अगा महा-बाहो ॥
सोड, न विलोकवे मज, द्या या असु, मृत्युला न हा बाहो' ॥ ५५ ॥
भीम म्हणे, 'देवीला सांगा ती जरि म्हणेल सोडीन ॥
नाहीं तरि मी याचा सत्यंचल-कर्ष[९] पाणि तोडीन ॥ ५६ ॥

---

१ पहिल्या ओळीचा भाव—बा दशरथा, तुला जसें कैकयीनें पूर्णपणें जिंकलें तसें धर्मराजाला दयेनें जिंकलें आहे; म्ह० तुम्ही दोघे सारखेच आहां. २ दुसऱ्या ओळीचा भाव—बाण शरिरांतून पार निघून जातो (म्हणून) तो सह्य (होय); परंतु लोकनिंदारूप बाण हृदयांत रुतून राहतो (म्हणून तो असह्य). ३ धर्म. ४ ज्या भीमापुढें पराकाष्ठेचा बळकट शत्रुही गर्वहीन होतो; हा भाव (प्रबळतर+अराति). ५ भय. ६ पुत्रप्रेमानें कोटरेला पाठवून जसें बाणासुराचें रक्षण केलें; बाणासुर व कृष्ण ह्यांचें युद्ध चाललें असतां शेवटीं आपल्या पुत्राचा नाश होतो असें पाहून बाणासुराची आई कोटरा नग्न होऊन रणांगणांत कृष्णापुढें येऊन उभी राहिली, तेव्हां कृष्णानें खालीं मान घातली, नंतर बाणासुर युद्धांतून परतला अशी कथा आहे. ७ जेणें (धर्मानें) प्रभूसि (धर्मास). ८ (भीमानें) पुढें उभा केला. ९ (सती+अंचल+कर्ष+पाणी) सतीचा पदर ओढणारा हात.

कां सोडितां असों द्या हा निज दासांत दास राबावा ॥
या काम-हता रक्षा पायांचा द्याचि आसरा बावा' ॥ ५७ ॥
कृष्णा धर्मासि म्हणे, 'देवा सोडावयासि सांगा जी ॥
मज देखवे न शिवती निर्दयतेसह अ-कीर्ति आंगा जी' ॥ ५८ ॥
धर्म म्हणे, 'रे साधो जाऊं दे, सोड, दे मला बा हें ॥
जातें त्यजुनि भलेपण न विटावें सु-यश[1] तें तया[1] बाहें' ॥ ५९ ॥
भीम म्हणे, "'मी पांडव-दास', असें तीन वेळ मोठ्यानें ॥
हा खळ म्हणो, भल्याला विनवावें धरुनि पाय खोट्यानें" ॥ ६० ॥
धर्म म्हणे, 'गा भीमा तुज जरि आम्ही प्रमाण तरि सोडीं ॥
न वदें निष्ठुर कांहीं अ-भय-वितरणें सदीड्य[2] यश जोडीं' ॥ ६१ ॥
भीमें गुरु-मंत्र-वश-व्याघ्रें मृगसाचि सोडितां नमनें- ॥
धर्मासि करि, लवे वरि मात्र शिरें, दुष्ट अंतरीं न मनें ॥ ६२ ॥
नृप त्यासि म्हणे, 'व्याया भुजगीच्या झोंबतां नर मणीतें ॥
वांचेल, परि पराच्या चित्तेंहि स्पर्शतां न रमणीतें ॥ ६३ ॥
जा, यावरि न करावें पाप असें मागतों, मला दे हें ॥
जें कर्म धर्म-शर्म-द[3] त्यासचि संपादितो भला देहें' ॥ ६४ ॥
खळ न खलत्व त्यागी जरि सामें गौरवूनि बोळविला ॥
लकुच[4] कटुचि अमृत-कराकरवींही शर्करेंत घोळविला ॥ ६५ ॥
हर-दर्शनार्थ गंगा-द्वारीं तपतां तया कृपा-पर[5] तो ॥
भेटोनि म्हणे, 'घे वर, कष्टापासोनि मति नृपा[6] परतो' ॥ ६६ ॥
'युद्धांत पंच-पांडव-परिभव हो मत्करें' असेंच वदे ॥
प्रभु-कर्णीं तें बहु कटु वच जाणों गर मुखीं रसें चव दे ॥ ६७ ॥
शंभु म्हणे, 'नारायण-सख नर अर्जुन पुराणऋषि, तातें- ॥
धनसें पाशुपतहि[7] म्यां त्यासि दिलें, जेविं अमृत तृषितातें ॥ ६८ ॥
मजपासीं तुज द्याया तद्भंगावह[8] असा नसेच वर ॥
हो मशक-मक्षिका-हर[9] गरुडा उडवी असें नसे चवर[10] ॥ ६९ ॥

---

१ (अशा कर्मानें आपणापासून जाणाऱ्या) सुयशास बाहें (बोलाव) म्हणजे राख. २ (सत्+ईड्य) साधूंनीं स्तुत्य. ३ पुण्यकारक व सुखकारक. ४ निंबुगीचें फळ. ५ दयाशील शिव. ६ हे जयद्रथा. ७ ह्या नांवाचें अस्त्र. ८ (तत्+भंग+आवाह) अर्जुनाचा पराजय करण्यासारखा. ९ हें चवराचें विशेषण. १० चवरी.

यश एकदांचि अर्जुन-रहितां चवघां रणांत भंगुनि घे ॥
मेरु असो, बहु हेंही जरि लंघुनि कुळ-गिरींशि[1] पंगु निघे' ॥ ७० ॥

झाला गुप्त महेश्वर तो बालिश मनुज-देव वेदा[2] त्या ॥
प्रभुसहि विटवी मागुनि जें तैशाही न देववे दास्या ॥ ७१ ॥

मागावा कामाद्यरि-परिभव-वर[3] वरद-नायका, परि तो ॥
सत्परिभव-वर मागे, खळ न पराहित निजाहितहि करितो ॥ ७२ ॥

स्व-गृहा जाय जयद्रथ विसरुनियां दुःख तें परिभवाचें ॥
दासासमंजसत्वें[4] क्षोभे मन शांतही परि भवाचें[5] ॥ ७३ ॥

---

## वनपर्वांतील सावित्रीचें आख्यान.

(म० भा० अ० २९३-२९९. मोरोपंत अ० १३).

मद्रदेशाच्या अश्वपतिराजाची कन्या सावित्री (सावित्रीदेवीचा अवतार) हिनें शाल्वदेशाच्या द्युमत्सेनराजाचा मुलगा सत्यवान् ह्यास वरिलें. सत्यवान् अल्पायुषी होता. त्याच्या मरणाच्या वेळीं यम जातीनें त्याचा प्राण घेऊन चालला असतां, सावित्रीनें त्याच्या मागून जाऊन यमास आपल्या भाषणानें संतुष्ट केलें आणि सासरा आंधळा व राज्यरहित होता त्यास डोळ्यांची व राज्याची प्राप्ति, आपल्या बापास शंभर पुत्रांची प्राप्ति, व आपणाला शंभर पुत्रांची प्राप्ति, असे वर त्यापासून संपादिले; आणि शेवटीं सत्यवानाचा प्राणही परत आणिला हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे.

धर्म पुन्हां[6] त्यासि म्हणे, 'मार्कंडेया मुनीश्वरा आर्या ॥
आढळली तुज लोकीं सत्त्वाढ्या[7] आमुची जशी भार्या' ॥ १ ॥

मुनि त्यासि म्हणे, 'होती सावित्रीनाम[8] अश्वपति-तनया[9] ॥
तच्चरित श्रवण करीं, ऐकाया योग्य साधु, पतित न या[10] ॥ २ ॥

---

१ कुलपर्वतांस—हे कुलपर्वत सात आहेत त्यांचीं नांवें—महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, ऋक्ष (गंधमादन), विंध्य आणि पारिपुत्र (पारियात्र). येथें ह्याचा (मेरूच्या संबंधानें) लहानसा डोंगर असा इष्ट दिसतो. २ ज्ञानस्वरूप (अशा शिवाला). ३ कामादिक सहा रिपूंचा पराभव व्हावा असा वर. ४ जयद्रथाच्या मूर्खपणामुळें. ५ शंकराचें. ६ रामकथा सांगितल्यानंतर. ७ सत्त्वगुणानें युक्त म्हणजे कसाही प्रसंग गुदरला तरी जी आपलें सद्वर्तन सोडीत नाहीं अशी. ८ नांवानें प्रसिद्ध. ९ अश्वपतिनामक राजाची मुलगी. १० ह्या चरित्रास.

होय प्रात विधि-स्त्री-सावित्रीच्या[१] वरेंचि ती राया[२] ॥
यत्कीर्ति जना म्हणती, 'कर देत्यें रे अघाब्धि-तीरा[३] या' ॥ ३ ॥
झाली भक्त-सुता ती श्री-सावित्रीच उद्धरायाला ॥
श्री[४] क्षीरधिला जन्मुनि जें दे यश तेंच शुद्ध रायाला ॥ ४ ॥
अश्वपति म्हणे, 'वत्से चिंता मज हेचि एक परमा गे ॥
झालीस दान-योग्या[५] परि कोणीही तुला न वर मागे ॥ ५ ॥
जा शोधुनि ये वत्से वरुनि मनें मानिल्या कुलीनातें ॥
कीं[६] तुजकडेचि आहे शत-पुत्रांचेंहि गे मुली नातें[६]' ॥ ६ ॥
'स्व-वर पहा जा,' ऐसें योग्य जनीं तोचि तीसचि वदाया ॥
गुरुच्या वचनें गेली आपण घेऊनि ती सचिव[७] दाया[७] ॥ ७ ॥
अनुरूप वर विलोकुनि आली तों त्या नृपा परम-हर्षी[८]- ॥
सांगत होता सु-कथा श्री-नारद जो कृपा-पर महर्षी ॥ ८ ॥
ती दोघांतें वंदी, तों तीस ब्रह्म-काय-भू[९] पाहे ॥
स-स्मित असें पुसे कीं, 'त्वत्तनया होय काय भूपा हे ॥ ९ ॥
कोठें गेली होती श्वशुर-गृहाहूनि काय आणविली ॥
हा[१०] ! सचिवांनीं आझुनि दानोचितता इची न जाणविली' ॥ १० ॥
भूप म्हणे, 'परिसावें तेंचि तुवां सर्वसाधु-कुल-गीतें[११] ॥
म्यां पाठविलें होतें स्व-वर पहाया स्वयें स्व-मुलगीतें ॥ ११ ॥
वद वत्से, काय कसें? वर बरवा पाहिला? न लाजावें ॥
या गुरुनें 'धन्य' असें म्हणुनि स्व-मुखें तुला मला, जावें' ॥ १२ ॥
सांगे ती सावित्री, 'नृप द्युमत्सेन[१२] शाल्व-पति[१३] आहे ॥
जरि वृद्ध अंध रिपु-हृत-राज्य[१४] वन-स्थहि[१५] न काळजी वाहे ॥ १३ ॥

---

१ ब्रह्मदेवाची बायको. २ हे राजा धर्मा. ३ पातकसमुद्राच्या तीरास. ४ लक्ष्मी. ५ देण्यास योग्य. ६ शंभर पुत्राच्या ठिकाणीं तूं आहेस हें तात्पर्य. ७ मंत्री आणि उपमाता ह्यांस. ८ ब्रह्मानंदांत निमग्न. ९ ब्रह्मदेवाच्या शरिरापासून म्हणजे मांडीपासून झालेला नारद. १० खेदसूचक अव्यय. पूर्वार्धाचें 'नाहीं' असें उत्तर राजानें दिल्यावर नारदाचें भाषण या उत्तरार्धानें सांगितलें आहे. ११ सव साधूंच्या समुदायानें स्तविलेला. १२ द्युमत्सेन नांवाचा. १३ शाल्व देशाचा राजा. १४ शत्रूंनीं हरण केलें आहे राज्य ज्याचें असा. १५ अरण्यांत राहाणारा.

कुल-शील-सत्त्व-गुण-निधि तो पुत्र-कलत्र-मात्र-परिवार[१] ॥
परि वार[२] सर्व सण त्या, कीं मथिला स्वांतर-स्थ[३] अरि-वार[४] ॥ १४ ॥

तो श्वशुर मानला मज, चित्तें त्याचा कुमार म्यां वरिला ॥
जरि लाजविति सख्या, अनुसरली गौरी हरा, न त्या हरिला' ॥ १५ ॥

नारद म्हणे, 'नृपा हे चुकली योजूनि सत्यवान् नवरा ॥
न वरावा जरि गुणवान्, योजू अन्या, असे उणें न वरा.' ॥ १६ ॥

भूप म्हणे, 'सर्व-ज्ञा देवा उमजे असेंचि सांग मला ॥
गुणवान् युवा कुल-ज-वर जरि तरिहि तुला अ-योग्य कां गमला ॥ १७ ॥

काय इणें न धरावें अ-धन-त्वें भूप-जन-वरा[५] जीवीं ॥
कां न प्राशावें मधु मधुपानें कूप-ज-नव-राजीवीं[६]' ॥ १८ ॥

मुनि सांगे, 'वर्षांतीं येइल त्या भूप-पुत्रका व्यसु-ता[७] ॥
अन्य वरू, वृतहि कच त्यजुनि वरी भूप-पुत्र काव्य-सुता[८]' ॥ १९ ॥

भूप म्हणे, 'न वरावा वत्से जरि सु-गुण-सागर ल्वायु[९] ॥
शीतल मंद सु-गंधहि वद सेवावा कसा गरल वायु' ॥ २० ॥

ती सु-मति म्हणे, 'ताता न त्यजुनि पयोधिला नदी परते ॥
न पतंग-चित्त-वृत्ति[१०] क्षणही रत्नीं, त्यजूनि दीप, रते[१०] ॥ २१ ॥

वरिला तो वरिलाचि, स्पर्शावा या न अन्य कायातें ॥
हा दृढ निश्चय माझा, स्तवितील कुलीन कन्यका यातें ॥ २२ ॥

आयुष्य असो कितितरि, मज तादितर[११] पुरुष तुज-समचि राया ॥
मन न चळेलचि येइल जरि चरचर हा गळा यम चिराया' ॥ २३ ॥

देवर्षि म्हणे, 'त्यासचि दे साध्वी-व्रत-परा[१२] सुता राया ॥
शुचिनिश्चयाहुनि अधिक अमृत-रस नसे परासु[१३] ताराया ॥ २४ ॥

---

१ पुत्र आणि कलत्र (स्त्री) एवढाच आहे परिवार ज्याचा. २ परि (तथापि) त्या (द्युमत्सेनाला) सर्व वार (दिवस) सण. ३ आपल्या अंत:करणांत राहणारा. ४ कामक्रोधादिक शत्रूंचा समुदाय. ५ राजश्रेष्ठास. ६ विहीरींत उत्पन्न झालेल्या नव्या कमलांत. ७ (वि+असु+ता) गतप्राणता (मरण). ८ शुक्राचार्यांची मुलगी (देवयानी). ९ अल्पायुषी. १० अन्वय—पतंगचित्तवृत्ति दीप त्यजुनि क्षणही रत्नीं न रते. ११ सत्यवानाहून निराळा. १२ पतिव्रतेच्या आचरणाविषयीं तत्पर. १३ गेले आहेत ज्याचे प्राण असा.

होतें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव हो ॥
येतों, बसा, प्रसन्न प्रभु मृत्युं-जय तुम्हां सदा-शिव हो' ॥ २५ ॥

गेला मुनि जो भगवत्-कीर्ति-महा-काम-धेनुचा[१] दुहिता[१] ॥
नेउनि दिली नृपें ती सद्विधिनें सत्यवत्करीं दुहिता ॥ २६ ॥

झाली तपोवनांत स्वीकारुनि वल्क तापसी ते[२], तें- ॥
अद्भुत सत्त्व तिचें बा, तितका नव्हताचि ताप सीतेतें ॥ २७ ॥

वेद श्वशुर, श्वश्रू स्मृति, ती स्वाचार-पद्धतीच[३] सती ॥
मुनि म्हणति, 'या नृपाच्या उटजीं सिद्धि स्नुषा-मिषें[४] वसती'॥ २८ ॥

तो सत्यवान् म्हणे, 'हे पितृ-राज-श्री[५] तपोवनांत पती- ॥
हो आपन्मुक्त[६] म्हणुनि बहुधा आपणहि या[७] मिषें[७] तपती[८]'॥ २९ ॥

तत्सद्गुणें प्रमुदितें झालीं केवळ मनांत न तिघें तीं ॥
सकळें स-देव-तापस-वृंदेंहि[९] तपोवनांत[१०] नति घेतीं[१०] ॥ ३० ॥

ती स्व-मनांत म्हणे, 'तुज तनु रडविल सर्वकाळ, जीवा हे ॥
सोड इला वेड्या, बुध न कु-संगति धरुनि काळजी वाहे' ॥ ३१ ॥

ऐसें चिंती, वाळे, मोजी उर्वरित[११] दिवस महिने ती ॥
नसतें तसें, तरि सुखें वय, भोगुनि[१२] तदधिक[१२] श्रमहि, नेती ॥ ३२ ॥

उरतां चार दिवस ती करि वांचाया पति व्रतारंभा ॥
तन्नियमीं[१३] प्रिय-वाक्[१४] कीं शुकीं विलोकी न तीव्रता रंभा ॥ ३३ ॥

श्वशुर म्हणे, 'त्रि-दिन-व्रत झालें कीं ? वंश धन्य केला गे ॥
कर पारणा, क्षुधा बहु पूर्व-वया-माजि कन्यके लागे' ॥ ३४ ॥

ती, 'संकल्पीं आहे सूर्यास्तीं पारणा करायाची' ॥
ऐसें श्वशुर-श्वश्रू-चरणांतें जोडुनी करा याची[१५] ॥ ३५ ॥

---

१ भगवंताची कीर्ति हीच कामधेनु तिचें दोहन करणारा ( धार काढणारा ). २ ती सावित्री. ३ सदाचाराचा क्रम. ४ सुनेच्या रूपानें. ५ बापाची राज्यलक्ष्मी. ६ विपत्तीपासून मोकळा झालेला. ७ ह्या सावित्रीच्या रूपानें. ८ तप करिते. ९ देवांसहित ऋषींचे समुदाय. १० त्या पतिव्रतेचा नमस्कार मोठ्या आनंदानें स्वीकारणारीं. ११ बाकी राहिलेले. १२ अन्वय-तदधिक श्रमहि भोगुनि वय नेती. १३ सावित्रीच्या नियमांत. १४ मधुर भाषण करणारी हें रंभेचें विशेषण उत्तरार्धाचा. अन्वय–तन्नियमीं (जी) तीव्रता ( होती ) ती प्रियवाक् रंभा शुकीं ( ही ) न विलोकी. १५ विनंती करी.

फल-मूलार्थ निघे पति, त्यासि म्हणे, ‘मजहि सत्तमा न्या हो ॥
वन पाहेन, तुम्हां हे न प्रथम-प्रार्थना अ-मान्या हो’ ॥ ३६ ॥

चित्राश्व[1] म्हणे, ‘दयिते गमली वन-सरणि[2] काय कोमळ ती ॥
श्रमशिल, शिबिका-स्थाही[3] दुर्ग-वन-पथांत[4] बायको मळती[5] ॥ ३७ ॥

उपवास तीं दिसांचा तूं आधींच प्रिये सु-मृदुला[6] गे ॥
न्यावें कसें चरण-युग नवनीता-परिसही सु-मृदु लागे ॥ ३८ ॥

मज सोसेल कशी, जी न पहावे स्त्री-व्यथा नरा नीचा[7] ॥
श्रम-दा प्रमदा-हृदया कथितीहि कवी कथा न रानींच्या ॥ ३९ ॥

येणारचि तरि साध्वी, श्वश्रू-श्वशुरांसि पूस मग ये, तें- ॥
योग्य तुज मजहि, मानिति गुर्वाज्ञाधिक सु-बुद्धि न गयेतें[8]’ ॥ ४० ॥

सावित्री त्यांच्याही आज्ञेतें तत्प्रसाद साधुनि घे ॥
उटजांतूनि सतीसह वंदुनि तो स्व-पितृ-पाद[9] साधु निघे ॥ ४१ ॥

ती न स्त्री, रक्षाया त्यासि निघे आत्त-मूर्ति[10] जनकाशी[11] ॥
परमशिव जींत[12] नांदे म्हणुनि जिला[13] म्हणति सुज्ञ-जन ‘काशी’॥४२॥

जे पक्षी जे श्वापद-संघ अधिष्ठूनि[14] कानना वसती ॥
त्यांचें तद्वचनामृत-पानार्थ[15] पुसेल कां न नांव सती ॥ ४३ ॥

पात्र भरूनि फळांनीं काष्टें फोडी वनांत, सत्त्व-रतें-[16] ॥
पाहूनि तत्कलत्रें स्मरलें मुनि-वच मनांत सत्वर तें ॥ ४४ ॥

जों साध्वी हळुच म्हणे ‘हा नाथा नियत-मान-दा[17] रुचिरा ॥
मूर्ति श्रमत्ये, भ्रमत्ये मति, कीं जी प्रियतमा न दारु[18] चिरा’ ॥ ४५ ॥

तोंचि म्हणे तो, ‘उठल्या करित्या[19] स्मृति-हानि[19] वेदना, लागे- ॥
शूल-शत शिरीं, जाणों सखि अ-क्षम हा[20] निवेदनाला गे ॥ ४६ ॥

---

१ सत्यवान्. २ वनांतला मार्ग. ३ पालखींत बसलेली. ४ रानांतील खडतर मार्गांत. ५ दुःख पावते. ६ फार नाजूक. ७ निर्दय अशा. ८ गया क्षेत्रास. ९ आपल्या बापाचे पाय. १० मूर्तिमती. ११ (जनक+आशी) बापाचा आशीर्वाद. १२ ज्या आशीमध्यें. १३ ज्या आशीला. १४ आश्रय करून. १५ त्या सत्यवानाचें वचन हेंच अमृत घ्यावें म्हणून. १६ धैर्यशील—हें तत्कलत्रें ह्याचें विशेषण. १७ निश्चयेंकरून मान देणाऱ्या म्हणजे माझें वचन कधीं न मोडणाऱ्या. १८ काष्टें. १९ स्मरण नाहींसें करणाऱ्या—अशा वेदना. २० मी.

तुझिया मृदु-शीतांकीं[१] शिर टेवुनि वाटतें निजावें गे ॥
त्वत्स्पर्श अमृत म्हणवुनि या मत्तापें पळोनि जावें गे' ॥ ४७ ॥
मांडी देउनि पतिचें मस्तक हस्त-कमळें सु-धी रगडी ॥
दे धैर्य सतीस तिचा निज-निश्चय जो खरा सु-धीर गडी ॥ ४८ ॥
सीता दश-कंठा जसि तशि सत्त्वें भी न तीव्र-तापा हे ॥
तों पाश-पाणि-पुरुषा-प्रति[२] पति-पार्श्वीं पति-व्रता पाहे ॥ ४९ ॥
क्षितिवरि पति-शिर उतरुनि स-विनय झडकरि उठोनि कर जोडी॥
नमुनि म्हणे, 'देव तुम्हीं, अशि कैंची अन्य-दर्शनीं गोडी ॥ ५० ॥
केलेंचि धन्य दर्शन-दानें येऊनि कानना मातें ॥
अजि देवेश, निवावे बहु हे सेवूनि कान नामातें' ॥ ५१ ॥
देव म्हणे, 'सति यम मी'; 'कां आलां?' 'न्यावया तुझ्या पतितें'॥
'हें दूत-कार्य कीं जी;' 'जें सेवक-कृत्य वेगळें सति तें ॥ ५२ ॥
हा सत्यवान् सु-कृतवान् गुणवान् न्यावा न सेवकांनीं कीं ॥
ज्या कर्मीं योग्य-त्व स्वामीचें तें न सेवकानीकीं[३]' ॥ ५३ ॥
अंगुष्ठमात्र[४] पुरुषाप्रति यम पाशींकरूनि आकर्षी ॥
तैं 'हाय हाय' म्हणती बहु सद्गद-कंठ साश्रु नाकर्षी[५] ॥ ५४ ॥
त्यातें बांधुनि घेउनि यम-धर्म प्रभु निघे अवाचीतें[६] ॥
भ्याला सतीस बहुधा जें ब्रह्म-लिखित बरें न वाची तें ॥ ५५ ॥
त्यामागें तीहि निघे धर्म म्हणे, 'भागलीस, जा परत ॥
स्नेह-ऋण फेडिलें त्वां, करुनि स्व-पति-क्रिया[७] रहा स्मरत' ॥ ५६ ॥
साध्वी म्हणे, "प्रभो पति जिकडे जावीच मूर्ति हे तिकडे ॥
स्व-गुरु-व्रत-प्रसादें[८] मद्गतिसि[९] न रोधितील हेति[१०] कडे[१०] ॥ ५७ ॥
संत म्हणति, 'सप्त-पदें सह-वासें सख्य साधुशीं घडतें' ॥
सन्मित्रचि[११] न व्यसनीं अन्याखिल-मित्र[११] संकटीं पडतें ॥ ५८ ॥

---

१ मृदु आणि शीतल अशा मांडीवर. २ पाश आहे हातीं ज्याच्या अशा पुरुषाला. ३ (सेवक+अनीकीं) चाकरांच्या मंडळींत. ४ आंगठया एवढ्या. ५ स्वर्गस्थ ऋषि. ६ दक्षिण दिशेस. ७ उत्तरकार्य. ८ माझ्या वडिलांच्या आणि व्रताच्या प्रसादानें. ९ माझ्या गमनाला. १० शस्त्रें व डोंगराचे कडे. ११ साधु ज्याचा मित्र आहे असें कोणीही दु:खांत पडत नाहीं, त्यांवाचून इतर सर्व जरी कोणाचे मित्र असले, तरी संकटांत पडतें.

तुज संत म्हणति, 'पितृ-पति सम-वर्ती[1] धर्म-राज बापा, हें- ॥
सत्य यश म्हणुनि याही कन्येसि दया करूनि बा पाहें' ॥ ५९ ॥
ऐसें सती वदे, ते बोल शशी, देव तोहि सागर-सा- ॥
प्रेमें उचंबळे हो, धरि कारुण्यें द्रवासि साग[2] रसा[3] ॥ ६० ॥
धर्म म्हणे, 'साध्वी बहु श्रमलीस स्वाश्रमासि जा मागें ॥
जो मागशील तो वर देतों, घे, इष्ट तें मला मागें' ॥ ६१ ॥
'देवा व्हावे चक्षुस्तेजस्संपन्न[4] आश्रमा-माजी ॥
मामाजी ऐसें द्या, मति साहेनाचि त्या श्रमा माजी' (ज्ञी) ॥ ६२ ॥
'दिधलें' धर्म म्हणे, परि जाताचि होती तशीच मागूनी ॥
देव म्हणे, पुनरपि, 'जा वत्से, घे वर दुजाहि मागूनी' ॥ ६३ ॥
ती सु-मति म्हणे, 'राज्य-भ्रंशें बहु खिन्न सासुरा होतो ॥
पावुनि भवत्प्रसादें निज-पद बहु काळ सासु[5] राहो तो' ॥ ६४ ॥
'होइल जा', धर्म म्हणे परि करि अनु-गमन स-बहु-मान सती ॥
कीं जी हंसी हंसावांचुनि मानील न बहु मानस[6] ती ॥ ६५ ॥
पुनरपि मार्गीं काढी जें धर्म-रहस्य जेविं नव[7] पुसती[7] ॥
तें होय वशीकरणाचि, कीं [8]भासों दे [8]तयाशि न वपु[8] सती ॥ ६६ ॥
धर्म म्हणे, 'गे बाई करिसी कां व्यर्थ या श्रमास, तिजा- ॥
वर घे, नकोचि मागों, आलीस सु-दूर, आश्रमा सति जा' ॥ ६७ ॥
त्यासि म्हणे सावित्री, 'संपन्न असो पिता सु-तनय-शतें[9]' ॥
हा लक्ष्मी-सुत-कवि[10] किति लिहिल, सतीचें उमा-सुत[11] न यश तें ॥ ६८ ॥
उडुपा[12] उडुसें[13] धर्मौदार्या[14] लाजोनि अभ्र मुरडे हो ॥
सावित्रीच्या सु-यशीं न दिसे पति म्हणुनि अभ्रमु रडे हो ॥ ६९ ॥

---

१ सर्वांशीं समदृष्टीनें वागणारा. २ पर्वतासहित. ३ पृथ्वी; भूतमात्राला करुणा आली हें चौथ्या चरणाचें तात्पर्य. ४ डोळयांच्या (पहाण्याच्या) शक्तीनें युक्त. ५ जिवंत. ६ मानससरोवर. ७ नवीन काढलेली पुस्ती. ८ 'तयाशि सती वपु न भासों दे' म्हणजे त्याचें देहभान नाहींसें करी. ९ उत्तम शंभर पुत्रांनीं. १० लक्ष्मी हें मोरोपंताच्या आईचें नांव. ११ गणपति. १२ चंद्रास. १३ नक्षत्रासारखें. १४ यमाच्या औदार्यास; उत्तरार्ध— सावित्रीच्या अतिशुभ्र यशानें विश्व इतकें भरून गेलें होतें कीं. अभ्रमूचा पति ऐरावत हा अत्यंत शुभ्र असल्यामुळें त्या यशांत बुडून कोठें दिसेनासा झाला, तेव्हां ती रडूं लागली. तात्पर्य, सावित्रीचें यश अगदीं निर्मळ असून साऱ्या त्रैलोक्यांत भरलें होतें. यशाचा वर्ण शुभ्र आहे असें कवि मानितात.

ऐसें शिरोनि चित्तीं घेउनि भारीहि तीन वर देवा- ॥
सोडीना, सोडविल्यावांचुनियां ती सती नवर-देवा ॥ ७० ॥

देव म्हणे, '[१]तूं स्वच्छा स्व-च्छायाशीच मागतीं[१] सति घे ॥
वर घेउनि जा चवथा देतों मागोनि[२] मागतीस तिघे[२]' ॥ ७१ ॥

"व्हा सु-प्रसन्न, 'वत्से तुज हो सुत-शत' असें वदा, न्या हो- ॥
सु-यशो-राशि स्वर्गीं, लज्जा-प्रद सुर-नगा[३] वदान्या[४] हो" ॥ ७२ ॥

भुलला धर्म द्युतिला धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला ॥
न करुनि विचार जावी मागें म्हणवुनि म्हणे, 'तथास्तु' तिला ॥ ७३ ॥

हळुचि म्हणे सावित्री, 'पावेन वरेंकरूनि संततिला ॥
तुमचा प्रसाद म्हणुनि प्रेमें गातील सर्व संत तिला ॥ ७४ ॥

तरि मत्पति मज द्या कीं तुमची पावेल मान सत्या गी ॥
यश रक्षाया प्राणहि सत्य-गुणासक्त-मानस[५] त्यागी[६]' ॥ ७५ ॥

रोमांचित धर्म म्हणे, 'बाई गातिल तुझा प्रभाव सती ॥
पतिशीं अ-विना-भावें[७] वसशिल रविशीं जशी प्रभा वसती[८] ॥ ७६ ॥

राज्य चतुः-शत वत्सर करिल तुझा कांत सोडिला जा गे ॥
हा त्वन्महिमा जागो, सतिनें जेविं जोडिला जागे' ॥ ७७ ॥

तें वृत्त[९] वर्तमान[९] स्वल्पहि न कळे तिच्या वरा[१०] पाशीं[११] ॥
जातां यम सावित्री धांवत आली कलेवरापाशीं ॥ ७८ ॥

पुनरपि तशीच बसली अंकीं घेऊनियां स्व-पति-शिर ती ॥
जशि चेतना धवांगीं होय, इची जीवितांत[१२] मति शिरती[१२] ॥ ७९ ॥

वन-देवता म्हणति त्या, 'बा गा मूर्च्छोत्थिता[१३] चकोरा हो- ॥
स्वस्थ, ज्योत्स्ना कीं हे, द्रुत उठाचि, नमावया नको राहों' ॥ ८० ॥

---

१ देव म्हणे तूं स्वच्छा (व) स्वच्छायाशीच (माझ्या सावलीप्रमाणेंच), मागतीं (मागें) (येत आहेस) (म्हणून) (हे) सति, तिघे (तीन) वर मागोनि (ही) चौथा मागतीस (तर) देतों घे, म्हणजे घेऊन जा. २ अन्वय–तिघे मागोनि मागतीस चवथा देतों. इत्यादि. ३ कल्पवृक्षाला. ४ उदारा. ५ सत्याविषयीं तत्पर आहे मन ज्याचें तो. ६ सोडितो. ७ वियोग न होतां. ८ राहते. ९ झालें काय व होत आहे काय. १० सत्यवानाला. ११ पाशांत असतां. १२ तिच्या जिवांत जीव आला. १३ मूर्च्छा जाऊन सावध झालेला अशा.

नेत्रें उघडुनि पाहे तो दयितेच्या मुखासाचि वनीं, ती- ॥
दे त्यासि जसि नृपासि व्यसनीं देती सुखा सचिव-नीती[१] ॥ ८१ ॥
स्त्रीस म्हणे, 'सु-भगे[२] त्वां मृदु मांडी मांडिली उशी, रमला- ॥
आत्मा निद्रेशीं, रवि मावळला लागला उशीर, मला ॥ ८२ ॥
पुरुष श्याम महौजा[३] ओढित होता बळेंचि मजला जो- ॥
तो कोण, पुसेन तया नसतां स्वप्नोत्तमर्ण[४] मज लाजो' ॥ ८३ ॥
'कथिन उद्यां, झाली बहु रात्रि, बळ असेल तरि उठा राया- ॥
देत्यें हात, चला जी, घेत्यें फळ—भाजना कुठारा या' ॥ ८४ ॥
नेत्रें पुसोनि पदरें पतिस म्हणे, "भेटतील मामाजी ॥
'बाई' म्हणतां रडतां पडतां दाटून कां श्रमामार्जी ॥ ८५ ॥
भेटवित्यें ताताला मातेला, या उठा," असें वदली ॥
आली घेउनि, अद्भुत वाटे कलभाशि[५] सांवरी कदली ॥ ८६ ॥
आला प्रकाश नेत्रीं, अंध-त्वाचा वरें नुरे गंध ॥
परि भूप पुत्र-मोहें[६] केला पहिल्यापरीसही अंध ॥ ८७ ॥
त्याला म्हणती गौतम दाल्भ्य भरद्वाज धौम्य तापस, 'हा- ॥
बा गा उगा मुहूर्तोपास्थित[७] दुर्दैव-दत्त[७] ताप सहा[८] ॥ ८८ ॥
सावित्री शुभ-लक्षण-गुण-संपन्ना महा-सती बा हे ॥
जी जी साध्वी[९] स्व-धवानुमतें[९] द्वास्था[१०] महास[१०] ती बाहे[१०] ॥८९॥
वाखाणिति बहु पाहति मुनि-दाराहि[११] भासुर-व्रत[१२] तिला जे ॥
साध्वीच देवतार्हा साध्वीला बा सुर-व्रतति[१३] लाजे ॥ ९० ॥
शोकें रडतां डोळे जावे, गेले कधीं न यावे गा ॥
दिसतें कल्याण पुढें, होऊंचि नको अधीन या वेगा' ॥ ९१ ॥
ऐसे समजाविति त्या राजाला जों दया-पर महर्षी ॥
तों झाले अवलोकुनि सावित्री-सह तया परम हर्षी ॥ ९२ ॥

---

१ मंत्र्यांनीं सांगितलेली चांगली मसलत. २ हे सुंदरी प्रिये. ३ मोठा तेजस्वी. ४ (स्वप्न+उत्तमर्ण) स्वप्नांतलाही सावकार. ५ बालगजाला. ६ पुत्रशोकानें. ७ क्षणभर प्राप्त झालेलें; दुर्दैवानें दिलेलें दुःख. ८ सहन कर. ९ साध्वी आपल्या नवऱ्याच्या अनुमतानें (वागते). १० दारांत उभा राहिलेल्या (किंवा जवळ असलेल्या) उत्सवास बोलाविते. उत्तरार्ध— आनंद हा पतिव्रतेच्या नेहमीं दारीं उभा असतो, म्हणजे तिला सुलभ असतो, हें तात्पर्य. ११ ऋषिपत्नी. १२ उत्कृष्ट आचारयुक्त. १३ कल्पवल्ली.

मुनि म्हणती, ‘ हा आला, नेत्रें उघडुनि पहा स-दारा या ॥
मोठा भाग्याचा तूं प्रमुदित यांसह रहा सदा राया ॥ ९३ ॥

दे आलिंगन, अंकीं घे, मस्तक-पद्म हुंग, वाराया- ॥
आत्मात्मज-तापातें[१] दे आशी राज-सत्तमा राया ’ ॥ ९४ ॥

पुसतां विलंब-कारण चित्राश्व[२] म्हणे, ‘शिरो-व्यथा-शयन[३]’ ॥
मुनि म्हणति हें नव्हे, ‘वद वत्से, हो तूंचि आमुचें नयन’ ॥ ९५ ॥

सावित्रीनें कथिलें तें वृत्त अ-शेष साधू-सद[४] नमुनी ॥
तेव्हां झाले अतुल प्रीति-क्रीडेशि केलि-सदन[५] मुनी ॥ ९६ ॥

मार्कंडेय म्हणे, ‘ बहु वर्णावें काय, जेविं शिव-सेवा ॥
मज काळापासुनि तशि मुक्त करी त्याशि[६] ती[७] मनुज-देवा[८]’ ॥ ९७ ॥

दुसरे दिवशीं प्रकृति[९] प्रार्थिति येऊनि आपुल्या पतितें ॥
‘या राज्य करा, सचिवें वधिला, हरिली स्व-भूमि ज्या पतितें’ ॥ ९८ ॥

मुनि म्हणति, ‘ अनुभवावें स्वस्थ-मनें राज्य-पद नता राया ॥
न तपोवन वर तुज बहु सावित्री-युक्त सदन ताराया’ ॥ ९९ ॥

सिंहासनीं बसविला सावित्रीच्या व्रतेंचि, हा नियम[१०] ॥
वर-सामर्थ्य म्हणा, परि गेला होता करूनि हानि यम ॥ १०० ॥

सावित्रीनें केला उभय-कुलोद्धार हा असा राजा[११] ॥
कृष्णाहि[१२] अशीच, स्तुति येती न मुखाशि या अ-सारा[१३] जा (ज्या) ॥ १०१ ॥

राम-घन-मयूर[१४] म्हणे, “निववालचि सु-रसिकांशि केका[१५] हो ॥
शंभुहि[१६] म्हणे, ‘न सेविति मंद म्हणुनि झुरसि काशिके[१७] कां हो’ ” ॥ १०२ ॥

---

१ आपणाला व आपल्या मुलाला झालेलें जें ( वियोग ) दुःख त्यांत. २ सत्यवान. ३ मस्तकव्यथेमुळें निजणें. ४ साधूंचा समुदाय. ५ क्रीडेचें स्थान. ६ सत्यवानाला. ७ सावित्री. ८ हे धर्मराजा. ९ प्रजा. १० हेंच खरें समजावें. ११ हे धर्मराजा. १२ द्रौपदीही. १३ निरर्थक. १४ राम हाच मेघ त्याला मोरासारखा मोरोपंत कवि. १५ मयूरवाणी हो. १६ अन्वय—शंभुहि ( काशिकेला ) म्हणे ( हे ) काशिके मंद ( अज्ञान ) ( तुज ) न सेविति, म्हणुनि कां हो झुरसी—अज्ञान जन तुजमध्यें येऊन वास करीत नाहींत, म्हणून तुला खिन्न होण्याचें काय कारण आहे ? असें साक्षात् शंभुही काशीला म्हणतो. तस्मात् हे केका हो अज्ञान जनांनीं तुमचा अनादर केला तरी तुम्हीं खेद करूं नये. जे रसज्ञ आहेत त्यांना तुम्हांपासून आनंद खचीत होईल. १७ हे वाराणसि.

## विराट-पर्वांतील उत्तर-गोग्रहण.

(म० भा० अ० ३५-५३. मोरोपंत अ० ३-६.)

पांडव अज्ञातवास करण्याकरितां विराटाच्या नगरींत राहिले होते. तेव्हां विराटाचा सेनापति कीचक ह्यानें द्रौपदीविषयीं दुर्वासना दर्शविल्यामुळें भीमानें त्यास ठार मारिलें. हें ऐकून विराटापासून फार त्रास पावलेला त्रिगर्तदेशाचा राजा सुशर्मा ह्यानें दुर्योधनास सुचविलें कीं, ही संधि विराटनगरावर स्वारी करण्यास बरी आहे. तो विचार दुर्योधनास पटून त्यानें त्या नगराच्या दक्षिणेच्या बाजूस सैन्यासह सुशर्म्यास पाठविलें आणि आपण स्वत: मोठें सैन्य घेऊन त्याच्या उत्तरेच्या बाजूस आला. ह्या प्रकरणांत उत्तरेकडील सैन्यानें विराटाच्या गाई हरण केल्या, हा प्रकार वर्णिला आहे, ह्यासाठीं ह्यास उत्तरगोग्रहण म्हणतात.

मत्स्य-पुरोत्तर-भागीं[1] प्रात:काळींच ये सु-योधन हो[2] ॥<br>
ज्यासि[2] जय-प्राप्ति मनीं म्हणती भीष्मादिही सु-योध न हो[2] ॥ १ ॥<br>
सहसा व्रजांत गांठुनि बहु ताडुनि करुनि बद्ध-भुज गवळी ॥<br>
षष्टि-सहस्र सुगोधन तो कुरु-कुळ-चंदन-द्रु-भुज-ग[3] वळी ॥ २ ॥<br>
गोपाध्यक्ष रथावरि बैसुनि धांवे नृपासि सांगाया ॥<br>
चित्तीं म्हणे, 'बुडाया कुर्वधमा[4] हरिसि धेनु कां गा या' ॥ ३ ॥<br>
तो राज-गृहीं जाउनि रायाच्या उत्तराख्य तनयातें- ॥<br>
नमुनि म्हणे, 'हो नेतो दुर्योधन धेनु करुनि अ-नयातें ॥ ४ ॥<br>
कवची धन्वी खड्गी व्हा, चित्तीं रामचंद्रहि असा[5] ध्या ॥<br>
बैसा रथीं, जय-श्री गो-विप्रावन-परासि[6] न अ-साध्या' ॥ ५ ॥<br>
उत्तर म्हणे, 'असें जरि मी एकाकी लहान परि सवतें- ॥<br>
यश जोडितोंचि असता सारथि तरि कथन मज न परिसवतें ॥ ६ ॥<br>
कर्णादिकांसि देता[7] समरीं वैराटि-केसरी[8] करि-ता[9] ॥<br>
जिष्णुपुढें[10] अ-सुर-जनीं कोणी वैरा टिके सरी करिता ॥ ७ ॥

---

१ मत्स्यदेशाच्या राजधानीच्या उत्तरेच्या बाजूस. २ ज्यासि (दुर्योधनास) जयप्राप्ति (अर्जुनाची गांठ किंवा जय मिळणें) न हो (असें) भीष्मादिही सुयोध मनीं म्हणती, असा अन्वय. ३ कौरवांचें कुळ हाच चंदनवृक्ष ह्याजवरचा सर्पच (दुर्योधन). ४ कुरुकुलांतील नीचा. ५ कवची, धन्वी व खड्गी असा. ६ गाई आणि ब्राह्मण ह्यांच्या रक्षणाविषयीं जो तत्पर त्यास. ७ देणारा झाला असता. ८ विराटपुत्र हाच सिंह. ९ हत्तीपणा. १० इंद्रापुढें.

मिळवा कोणीतरि हो धैर्याचा मात्र उदधि सारथि जो ॥
कुरु-भट-समूह पाहुनि मज जेविं हिमासि सु-दधि-सार[१] थिजो' ॥ ८ ॥
ऐसे बहुतचि बोले तो बालिश बोल बायकांमाजी ॥
चित्र-पट-कटकसें[२] शिशु-भाषण येईल काय कामा जी ॥ ९ ॥
तें परिसुनि एकांतीं पार्थ म्हणे, 'देवि कृष्ण-सखि जावें ॥
उत्तर-सारथि होउनि म्यां, त्वां मजवरि कदापि न खिजावें' ॥ १० ॥
कृष्णा म्हणे, 'बहु बरें, व्हा मारुत, हो पलाल[३] खळ-बळ तें ॥
मद्धृदय न अरिसैन्यें तुमच्या दैन्येंचि फार खळबळतें ॥ ११ ॥
त्या उत्तरासि सांगे, 'सारथ्य बृहन्नडा करिल यातें ॥
सूत करुनि विजयानें नेले बहु खांडवीं अरि लयातें ॥ १२ ॥
सारथ्य-गीत-नृत्य-प्राप्तीचा हेतु जिष्णु-सह-वास ॥
पूर्णत्वाचा लागे पशु-पां[४] भ्रमतांहि विष्णुसह वास ॥ १३ ॥
भगिनी-मुखेंचि विनवा तन्मतिला उत्तराचि वळवील ॥
अति-सहवासि-वच मना कतक[५] कलुषिता[६] वना[६] निवळवील' ॥ १४ ॥
उत्तर म्हणे, 'कुरु-कटक न पशूंस यशासहि स्वसे नेतें ॥
अवकाश पळहि नाहीं कळवाया वृत्त हें स्व-सेनेतें ॥ १५ ॥
माझें सारथ्य करू तुझिया वचनें बृहन्नडा, गमला— ॥
हाचि सदुपाय वत्से, लागो अप-कीर्तिचा न डाग मला' ॥ १६ ॥
ती धांवत जाय म्हणे, 'गानादिक हें बृहन्नडे राहो ॥
समयीं[७] सारथ्य-गुण न उघडूनि कदर्युचा न[७] डेरा हो' ॥ १७ ॥
उठल्या उत्साहाच्या त्या शांतश्रीमदुदधिवरि लहरी ॥
[८]धरितां हनु न 'नु' म्हणतां प्रणताचें कां न सु-दधि[८] वरिल हरी ॥ १८ ॥
उत्तर म्हणे, 'बहु बरें, देउनि वचनास मान आलीस' ॥
बोले बृहन्नडा स्मितपूर्वक, 'विटविल कोण आलीस ॥ १९ ॥

---

१ तूप. २ चित्रपटावरील सैन्याप्रमाणें. ३ केरकसपट. ४ कृष्णाच्या सहवासानें गोपाळांस (अज्ञान गुराख्यांस) परमेश्वर जो कृष्ण त्याचे सर्व गुण प्राप्त झाले. ५ निवळीचें बीं. ६ गढूळ पाण्यास. ७ कृपणानें डेऱ्यांत पुरून ठेवलेलें द्रव्य कधींच कोणाच्या उपयोगी न पडल्यामुळें व्यर्थ होय. तसा तुझा सारथ्यगुण समयीं प्रकट न होईल तर व्यर्थ होय, असें तात्पर्य. ८ प्रेमळ भक्तानें आर्जवानें दिलेलें सुदधि (उत्तम दहीं) हरी नु (नको) न म्हणतां कां न स्वीकारील? तसें युद्धप्रिय अर्जुनास दुर्योधनाबरोबर युद्ध करण्याची प्रार्थना कशी न रुचेल?

वाद्य असो नृत्य असो हो अभिनय किमपि[1] गीत अथवा हो ॥
जाणोनि कसें म्हणतां समरांत बृहन्नडाचि रथ वाहो' ॥ २० ॥
वैराटि म्हणे, 'नर्तन[2] हो कीं वादक तथैव गायन[3] हो ॥
सारथि हो या समयीं एकहि वश कौरवांसि गाय न हो' ॥ २१ ॥
ऐसें वदे, कवच दे त्या श्रित-कुशलावहास[4] ल्यायाला ॥
तद्धारणीं चुके तों, कन्या पाहूनि हांसल्या याला ॥ २२ ॥
स-त्वर बृहन्नडा नृप-सुत-रथ घेऊनि जाय बाहेर ॥
त्यासि म्हणे, 'हेरावें म्हणसी कुरु-कटक[5] काय बा हेर' ॥ २३ ॥
कुरु-कटकासि पहातां तो उत्तरबाळ फार गडबडला ॥
स्व-पर-बळाबळ[6] नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥ २४ ॥
बोले, 'बृहन्नडे हें कुरु-बळ कल्पांत-सिंधुसें[7] गमतें ॥
ने रथ पुरांत, माझें मन नयनहि पाहतां बहु भ्रमतें ॥ २५ ॥
दुर्योधन दुःशासन कर्ण कृप द्रोण भीष्म ज्या कटकीं ॥
त्यांत मरेनाचि शिरतां कांव्यावरि घालितां चिरे पट[8] कीं' ॥ २६ ॥
पार्थ म्हणे, "राज-सुता आतां वदतोसि हें अहा काय ॥
शय्येवरि न पडाया योग्य रण-क्षितिवरीच हा काय ॥ २७ ॥
तेव्हां स्त्रियांत तैसें बोलुनि आतां असें कसें वदसी ॥
एकहि बाण न सुटला नाहीं अद्यापि झळकला सदसी[9] ॥ २८ ॥
निज-वृत्ति-रसीं[10] लोभी हो.[10] साधो बुद्धि अन्यथा न करीं ॥
निज-हित-लोभें धरितो शिशुहि मुखीं एक, अन्य थान करीं ॥ २९ ॥
मरतीच न दाखविती पाउलहि पळोनि तोंड लेंक वित्या[11] ॥
म्हणती 'सद्यः-कीर्ती-प्रज्ञा-घ्न-स्पर्श[12] तोंडलें' कवि त्या" ॥ ३० ॥

---

१ (किं+अपि) = कोणतेंही; हें गीताचें विशेषण. २ नाचणारा. ३ वाजविणारा. ४ (श्रित+कुशल+आवहास) आश्रिताचें कल्याण करणाऱ्या (अर्जुनाला). ५ बा, कुरुकटक हेरावें म्हणसी काय ? हेर (पहा) असा अन्वय. ६ आपलें तसेंच शत्रूचें बळ व अबळ. ७ प्रलयकालच्या समुद्रासारखें. ८ वस्त्र. ९ (सत्+असी) चांगली तरवार. १० क्षत्रियाच्या कर्माची (युद्धाची) आवड धर. ११ बापाला. १२ कीर्तीरूप प्रज्ञा (बुद्धि) हिचा ताबडतोब नाश करणारा आहे स्पर्श ज्याचा, हें तोंडल्याचें विशेषण.

ऐसें पार्थ वदे तों भिउनि कटक-बागुलासि पोर पळे ॥
शत्रु-प्रताप-दाव-ज्वाळांनीं तो कुरंग होरपळे ॥ ३१ ॥
उत्तर म्हणे, 'नको गे पायां पडतों बृहन्नडे सोड ॥
जोड दिली[1], दुखवुं नको, केवळ पितृ-कर-तळ-स्थ[2] हा[3] फोड' ॥ ३२ ॥
कुरवाळोनि म्हणे, " गा राज-सुता योग्य तूं न कांपाला ॥
मृदुल-त्व म्लान-त्व स्वीकारुनि जाहलासि कां पाला ॥ ३३ ॥
तुज उत्साह नसे तरि करितों घेउनि धनूस मी रण हो ॥
मज मेघासि कराया शर-वृष्टि[4] सहाय तूं समीरण हो ॥ ३४ ॥
आतां सोडवितों पशु खल-बल पल न लगतांचि पळवीतों ॥
मी 'विजय' असें तुजचि न सकळांही कौरवांसि कळवीतों " ॥ ३५ ॥
धृत-रश्मि[5] कुमार म्हणे, 'दारुक कीं आज मातली लाजो ॥
दंड करावा या कुरु-सेनेला योग्य मातलीला जो' ॥ ३६ ॥
काढूनि शंख-वलयें[6] ल्याला पुं-भूषणें सितें वस्त्रें ॥
बांधूनि केश माथां प्राङ्मुख[7] होऊनि आठवी अस्त्रें ॥ ३७ ॥
जातां कुरु-कटकावरि वाजविला दिव्य देवदत्त दर ॥
तो होय जनां जैसा कल्पांतीं रुद्र-देव[8] दत्त-दर[9] ॥ ३८ ॥
भ्याला उत्तर त्यातें जिष्णु म्हणे, 'पावलासि कांप दरें ॥
अद्यापि बांधिलेंसे तुझिया मतिनें अ-धैर्य कां पदरें' ॥ ३९ ॥
हांसोनि म्हणे हरि-सख, 'हो गाढासन[10] वि-कंप-धी[11] धीट॥
न धरीं बा दर[12] हा[13] दर, सादर[14] दे वाजवूं पुन्हां नीट' ॥ ४० ॥

---

१ तुला हवी ती देणगी देतों. ह्यास आधार—महाभारत विराटपर्व अ० ३८, श्लो० ४३, ४४—

शातकुंभस्य शुद्धस्य शतं निष्कान्ददामि ते ॥
मणीनष्टौ च वैदूर्यान्हेमबद्धान्महाप्रभान् ॥ १ ॥
हेमदंडप्रतिच्छन्नं रथं युक्तं च सुव्रतैः ॥
मत्तांश्च दश मातंगान्मुंच मा त्वं बृहन्नले॥ २ ॥

२ बापाच्या करतळावर असणारा. ३ हा मी (करतळावरील फोडाप्रमाणें बाप मला जपतो) हें तात्पर्य. ४ बाणांची वृष्टि पक्षीं, जलवृष्टि. ५ दोऱ्या (लगाम) धरल्या आहेत असा. ६ शंखाचीं केलेलीं वलयें (चुडे). ७ पूर्वाभिमुख. ८ महादेव. ९ दिलें आहे भय ज्यानें असा. १० दृढ आहे आसन ज्याचें असा (हो)—बळकट बैस. ११ निर्भय आहे वुद्धि ज्याची असा. १२ भय. १३ शंख. १४ मनापासून.

द्रोण म्हणे, 'न दिसे जय कां करितां आननें नत पहा रे ॥
आला विजय जयाचें[1] श्री-शंभु-तपापुढें न तप हारे' ॥ ४१ ॥
गांधार[2] म्हणे, 'गुरुजी पण न करुनि पूर्ण हा प्रकटला हो ॥
पुनरपि वन-वास करूं गुरु-घातक-पातक[3] प्रकट लाहो' ॥ ४२ ॥
कर्णाद्यासांसि म्हणे, 'तुमचे वि-जयी असोत हात रणीं ॥
शर-पटलाच्छादित[4] हो अर्जुन-शस्त्र-प्रताप हा तरणी ॥ ४३ ॥
गुरुजींस[5] काय पुसतां चापीं गुणें मद्वचेंचि चढवा हो ॥
यांला हेंचि म्हणावें कीं आम्हां धर्म-शास्त्र पढवा हो ॥ ४४ ॥
पढवावें मात्र इहीं भेदावें पर-हृदब्ज[6] कटुक वचें ॥
कीं[7] दूरूनि दिसावे प्रेक्षक-दृष्टीस युद्ध-पटु कवचें[7] ॥ ४५ ॥
प्रार्थुनि पुढें करावे हे यज्ञीं कीं सु-भोजनावसरीं ॥
सिंधूंत तरेल कशी जी केली केलि-हेतु[8] नाव सरीं' ॥ ४६ ॥
खळ-कृत गुरु-निंदेतें वर्णील कधीं न विस्तरें सु-कवी ॥
कीं तीं[9] श्री-गुरु-भक्ति-प्रेमामर-पादपांकुरा[10] सुकवी ॥ ४७ ॥
कर्ण म्हणे, 'सत्य वदसि परि आधि तुझ्या नसो मनीं कांहीं ॥
यद्यपि समरोत्साह त्यजिला अर्जुनभयें अनीकांहीं[11] ॥ ४८ ॥
म्यां जोडिलीं सदस्त्रें शस्त्रें जालींच आजि अनपार्थें[12] ॥
देउनि दर्शन केलें माझें अतिमात्र हृष्ट मन पार्थें ॥ ४९ ॥
श्रीभार्गवास्त्रतेजें भंगावें संगरांत सुत्राम्यां[13] ॥
आश्चर्य काय, त्याच्या केलें जरि भग्न आजि पुत्रा म्यां' ॥ ५० ॥

---

१ जयाचें तप श्रीशंभुतपापुढें न हारे असा अन्वय; ह्याची कथा अशी आहे कीं पाशुपतास्त्र मिळवावें म्हणून अर्जुन हिमालयावर शिवप्रसादार्थ उग्र तप करीत असतां त्याच्या बलाची परीक्षा पहाण्याकरितां शिवानें भिल्लाचें रूप घेतलें आणि एक रानडुकर उत्पन्न केला. तो रानडुकर अर्जुन तप करीत होता तेथून कांहीं अंतरावरून जातांना त्यावर दोघांनीं एकदम बाण सोडून त्याचा प्राण घेतला, तेव्हां तो मीं मारिला, मीं मारिला असें म्हणून दोघेही त्याविषयीं भांडूं लागले आणि हातघाईवर आले. त्या प्रसंगीं अर्जुनानें महान् पराक्रम करून शिवाला जेर केलें; तेणेंकरून शिव प्रसन्न होऊन त्यानें अर्जुनास पाशुपतास्त्र दिलें ह्या कथेस लक्षून हें लिहिलें आहे. २ दुर्योधन. ३ गुरुहत्या करणाराचें पातक. ४ बाणांच्या समुदायानें पक्षीं, मेघांनीं झांकलेला. ५ (४४, ४५ व ४६) ह्या आर्यांतील बोलणें कर्णाचें आहे. ६ दुसऱ्याचें हृदयकमळ. ७ अथवा कवच घातल्यामुळें हे गुरु पाहाणाराच्या दृष्टीला युद्धपटु (रणचतुर) असे दिसावे. ८ क्रीडा हाच आहे उद्देश जिचा अशी. ९ गुरुनिंदा. १० श्रीगुरुभक्तीचें प्रेम हाच कल्पवृक्षाचा अंकुर, त्यास. ११ सैन्यांनीं. १२ सफळ. १३ इंद्राला.

त्यासि कृप म्हणे, 'कर्णा सु-ज्ञांहीं ऐकतांचि डोलावें ॥
ऐसेंचि बोलणें जरि तरि पुरुषानें दहांत बोलावें ॥ ९१ ॥
तूं नीति-विरुद्ध वदसि साहस हें फळ न दे वचन-यज्ञ[१] ॥
अद्भुत कर्म करूनिहि बा न वदति एकही वच नय-ज्ञ ॥ ९२ ॥
वाळूं पाहसि, दंष्ट्रा उपडाया अहि-मुखांत आंगोळी ॥
ऐसें साहस करितां होईल तनुची क्षणांत रांगोळी ॥ ९३ ॥
कंठीं बांधूनि शिळा बाहु-बळें सागराशि तरशील ॥
परि साहसें न विजया, हें[२] शील[२] नसो असो इतर शील ॥ ९४ ॥
सर्वहि मिळोनि भांडूं कर्णा व्हावें न साहसा मान्य ॥
यत्नें नृप-यश रक्षूं आजि, नव्हे श्वेत-वाह[३] सामान्य' ॥ ९५ ॥
द्रोणि म्हणे, 'एकाकी तूंचि क्षम जिष्णु-वारणा[४] सूत[५] ॥
बहुधा बद्ध करीलचि लूतेचें[६] जिष्णु-वारणा[७] सूत ॥ ९६ ॥
करिसि वि-कत्थन जिंकुनि नेलें नसतांहि गो-धन शिवेतें ॥
सत्प्रिय शुचि यश कर्णा, भलत्या न करूनि शोध शिवे तें ॥ ९७ ॥
पावोनि सर्व महितें वि-गुणाहि गुरूसि जे कुल-ज नर ते- ॥
सत्कारिति, अलि कमलीं तेविं गुरु-पदीं महा-कुल-जन[८] रते ॥ ९८ ॥
राधेया,[९] उद्धत तूं हा दुर्योधनहि फार उद्धत रे ॥
गुरु-निंदक हो स्पष्ट व्यसनांत बुडे अ-शुद्ध, शुद्ध तरे ॥ ९९ ॥
सिंहासीं द्वेष करुनि कोण बळी वारणांत उरणारे ॥
कां भ्रमलासि कसा त्वां जय पावावा रणांत उरणा[१०] रे' ॥ ६० ॥
दुर्योधन नमुनि म्हणे, 'गुरुजी मज अरि-करीं न सोंपावें ॥
तेजो-जननार्थ[११] असें वदलों, त्वन्मत्सरीं नसों, पावें' ॥ ६१ ॥
हांसोनि द्रोण म्हणे, 'आम्हा कोपों न देचि वत्सल-ता ॥
नसतें क्षमा-कवच[१२] तरि हृदयीं त्वच्छब्द अशनिवत् सलता' ॥ ६२ ॥

---

१ शुष्क—तोंडचा यज्ञ. २ हा साहसाचा स्वभाव. ३ अर्जुन. ४ अर्जुनाचा पराभव करण्यास. ५ सारथी-कर्ण, हा एका सारथ्याच्या राधा नांवाच्या बायकोस लहानपणीं सांपडला व तिनें त्यास वाढविलें म्हणून त्याचीं सूत, सूतपुत्र, राधेय अशीं नांवें आहेत. ६ कोळ्याचें. ७ इंद्राच्या हत्तीला म्हणजे ऐरावताला. ८ मोठ्या कुलांत झालेला जन. ९ राधापुत्रा कर्णा. १० हे मेंढ्या. ११ ईर्ष्या उत्पन्न व्हावी म्हणून. १२ क्षमारूप चिलखत.

भीष्मासि मग म्हणे नृप, 'पुसतों अ-ज्ञात-वास-पण पुरला- ॥
कीं कांहीं मास तरी पक्ष तरी दिन तरी असे उरला' ॥ ६३ ॥

भीष्म म्हणे, 'गांधारे[1] पांडव पंडित खरे न दभ्र-मती[2] ॥
न भ्रमले, जे प्राकृत तेचि मनीं धरुनियां मद भ्रमती ॥ ६४ ॥

कामी कोपी लोभी जे संसारांत पावती भ्रम ते ॥
प्राकृत पंडित पांडव असते तरि हेहि केविं न भ्रमते ॥ ६५ ॥

शास्त्र-मतें[3] मास-द्वय पांचां वर्षांत अधिक लेखावें ॥
अ-ज्ञात-वास यास्तव सरलाचि असेंच तत्त्व देखावें ॥ ६६ ॥

तेरा वर्षांत अधिक दश पक्ष द्वादश क्षपा पडती ॥
चांद्र-शरन्मानें[4] हे संख्या संख्यावदादृता[5] घडती ॥ ६७ ॥

एवंच[6] चांद्र-मानें तेराही स्पष्ट सारिले अब्द ॥
सत्य-प्रतिज्ञ पांडव लागों देतिल न आपणां शब्द ॥ ६८ ॥

येतां अ-न्याय-लवें अल्पायासेंहि इंद्र-पद पदरा- ॥
'हूं[7]' न म्हणतील, काळापासुनिही पावतील हे न दरा ॥ ६९ ॥

युद्धेंकरूनि पाक्षिक[8] जय, त्यांतहि विजय पातला समरा ॥
सम रामाशीं[9] हा, हो शम[10] राज्य-समर्पणें, हटें न मरा' ॥ ७० ॥

कुर्वधम म्हणे, 'युद्धचि हो, सख्य न हो पितामहा यासीं ॥
शक्रहि बुडेल, यातें मद्धृत[11] पद ओपितां महायासी[11]' ॥ ७१ ॥

पार्थ म्हणे, 'वैराटे रथ कुरु-कटकासमीप राहूं दे ॥
गो-धन हरावयास्तव आले भट[12] कोण कोण पाहूं दे ॥ ७२ ॥

---

१ दुर्योधना. २ अल्पबुद्धीचें. ३ शास्त्रमानानें. ४ चांद्रवर्षाच्या मानानें—चांद्रमानानें वर्षाचे दिवस सुमारें ३५४ व सौरमानानें ३६५¼ असतात. चांद्रमानाचा सौरमानाशीं मेळ घालण्यासाठीं चांद्रमानाच्या पांच वर्षांत सुमारें २ महिने अधिक धरितात. ह्या मानानें १३ वर्षांत चांद्रमानाचे ५ महिने व १२ दिवस जास्त धारिले जातात. ५ (संख्यावत्+आदृता) जोतिःशास्त्र जाणणाऱ्या पंडितांस मान्य. ६ ह्याप्रमाणें पाहिलें असतां. ७ हें स्वीकारार्थ अव्यय. ८ अनियमित, कोणत्या तरी पक्षाचा. ९ रामचंद्र जसा नीतिस्तव राज्यत्याग करून वनवासास गेला तसे तुम्ही न्यायास अनुसरून पांडवांस राज्य द्या, असा भाव. १० शांति. ११ मद्धृत (मत्+हृत) पद (मीं घेतलेलें राज्य) यातें (अर्जुनातें) ओपितां शक्रही महायासीं (महा+आयासीं=मोठ्या संकटांत) बुडेल असा अन्वय. १२ योद्धे.

त्यासि कृप म्हणे, 'कर्णा सु-ज्ञांहीं ऐकतांचि डोलावें ॥
ऐसेंचि बोलणें जरि तरि पुरुषानें दहांत बोलावें ॥ ५१ ॥
तूं नीति-विरुद्ध वदसि साहस हें फळ न दे वचन-यज्ञ[१] ॥
अद्भुत कर्म करूनिहि बा न वदति एकही वच नय-ज्ञ ॥ ५२ ॥
वाळूं पाहसि, दंष्ट्रा उपडाया अहि-मुखांत आंगोळी ॥
ऐसें साहस करितां होईल तनुची क्षणांत रांगोळी ॥ ५३ ॥
कंठीं बांधूनि शिळा बाहु-बळें सागराशि तरशील ॥
परि साहसें न विजया, हें[२] शील[२] नसो असो इतर शील ॥ ५४ ॥
सर्वहि मिळोनि भांडूं कर्णा व्हावें न साहसा मान्य ॥
यत्नें नृप-यश रक्षूं आजि, नव्हे श्वेत-वाह[३] सामान्य' ॥ ५५ ॥
द्रोणि म्हणे, 'एकाकी तूंचि क्षम जिष्णु-वारणा[४] सूत[५] ॥
बहुधा बद्ध करीलचि लूतेचें[६] जिष्णु-वारणा[७] सूत ॥ ५६ ॥
करिसि वि-कत्थन जिंकुनि नेलें नसतांहि गो-धन शिवेतें ॥
सतिप्रिय शुचि यश कर्णा, भलत्या न करूनि शोध शिवे तें ॥ ५७ ॥
पावोनि सर्व महितें वि-गुणाहि गुरूसि जे कुल-ज नर ते- ॥
सत्कारिति, अलि कमलीं तेविं गुरु-पदीं महा-कुल-जन[८] रते ॥ ५८ ॥
राधेया,[९] उद्धत तूं हा दुर्योधनहि फार उद्धत रे ॥
गुरु-निंदक हो स्पष्ट व्यसनांत बुडे अ-शुद्ध, शुद्ध तरे ॥ ५९ ॥
सिंहांसीं द्वेष करुनि कोण बळी वारणांत उरणारे ॥
कां भ्रमलासि कसा त्वां जय पावावा रणांत उरणा[१०] रे' ॥ ६० ॥
दुर्योधन नमुनि म्हणे, 'गुरुजी मज अरि-करीं न सोंपावें ॥
तेजो-जननार्थ[११] असें वदलों, त्वन्मत्सरीं नसों, पावें' ॥ ६१ ॥
हांसोनि द्रोण म्हणे, 'आम्हा कोपों न देचि वत्सल-ता ॥
नसतें क्षमा-कवच[१२] तरि हृदयीं त्वच्छब्द अशनिवत् सलता' ॥ ६२ ॥

---

१ शुष्क—तोंडचा यज्ञ. २ हा साहसाचा स्वभाव. ३ अर्जुन. ४ अर्जुनाचा पराभव करण्यास. ५ सारथी-कर्ण, हा एका सारथ्याच्या राधा नांवाच्या बायकोस लहानपणीं सांपडला व तिनें त्यास वाढविलें म्हणून त्याचीं सूत, सूतपुत्र, राधेय अशीं नांवें आहेत. ६ कोळ्याचें. ७ इंद्राच्या हत्तीला म्हणजे ऐरावताला. ८ मोठ्या कुलांत झालेला जन. ९ राधापुत्रा कर्णा. १० हे मेंढ्या. ११ ईर्ष्या उत्पन्न व्हावी म्हणून. १२ क्षमारूप चिलखत.

भीष्मासि मग म्हणे नृप, 'पुसतों अ-ज्ञात-वास-पण पुरला- ॥
कीं कांहीं मास तरी पक्ष तरी दिन तरी असे उरला' ॥ ६३ ॥

भीष्म म्हणे, 'गांधारे[1] पांडव पंडित खरे न दभ्र-मती[2] ॥
न भ्रमले, जे प्राकृत तेचि मनीं धरुनियां मद भ्रमती ॥ ६४ ॥

कामी कोपी लोभी जे संसारांत पावती भ्रम ते ॥
प्राकृत पंडित पांडव असते तरि हेहि केविं न भ्रमते ॥ ६५ ॥

शास्त्र-मतें[3] मास-द्वय पांचां वर्षांत अधिक लेखावें ॥
अ-ज्ञात-वास यास्तव सरलाचि असेंच तत्त्व देखावें ॥ ६६ ॥

तेरा वर्षांत अधिक दश पक्ष द्वादश क्षपा पडती ॥
चांद्र-शरन्मानें[4] हे संख्या संख्यावदादृता[5] घडती ॥ ६७ ॥

एवंच[6] चांद्र-मानें तेराही स्पष्ट सारिले अब्द ॥
सत्य-प्रतिज्ञ पांडव लागों देतिल न आपणां शब्द ॥ ६८ ॥

येतां अ-न्याय-लवें अल्पायासेंहि इंद्र-पद पदरा- ॥
'हूं[7]' न म्हणतील, काळापासुनिही पावतील हे न दरा ॥ ६९ ॥

युद्धेंकरूनि पाक्षिक[8] जय, त्यांतहि विजय पातला समरा ॥
सम रामाशीं[9] हा, हो शम[10] राज्य-समर्पणें, हटें न मरा' ॥ ७० ॥

कुर्वधम म्हणे, 'युद्धचि हो, सख्य न हो पितामहा यासीं ॥
शक्रहि बुडेल, यातें मद्धृत[11] पद ओपितां महायासीं[11]' ॥ ७१ ॥

पार्थ म्हणे, 'वैराटे रथ कुरु-कटकासमीप राहूं दे ॥
गो-धन हरावयास्तव आले भट[12] कोण कोण पाहूं दे ॥ ७२ ॥

---

१ दुर्योधना. २ अल्पबुद्धीचें. ३ शास्त्रमानानें. ४ चांद्रवर्षाच्या मानानें—चांद्रमानानें वर्षाचे दिवस सुमारें ३५४ व सौरमानानें ३६५¼ असतात. चांद्रमानाचा सौरमानाशीं मेळ घालण्यासाठीं चांद्रमानाच्या पांच वर्षांत सुमारें २ महिने अधिक धरितात. ह्या मानानें १३ वर्षांत चांद्रमानाचे ५ महिने व १२ दिवस जास्त धरिले जातात. ५ (संख्यावत्+आदृता) जोतिःशास्त्र जाणणाऱ्या पंडितांस मान्य. ६ ह्याप्रमाणें पाहिलें असतां. ७ हें स्वीकारार्थ अव्यय. ८ अनियमित, कोणत्या तरी पक्षाचा. ९ रामचंद्र जसा नीतिस्तव राज्यत्याग करून वनवासास गेला तसे तुम्ही न्यायास अनुसरून पांडवांस राज्य द्या, असा भाव. १० शांति. ११ मद्धृत (मत्+हृत) पद (मीं घेतलेलें राज्य) यातें (अर्जुनातें) ओपितां शक्रही महायासीं (महा+आयासीं=मोठ्या संकटांत) बुडेल असा अन्वय. १२ योद्धे.

तो गुरु[1], तो गुरु-नंदन, तो कृप, तो कर्ण, तो पितामह, रे ॥
यांहीं धेनु वळाव्या ! ! शिव शिव गोपाळ राम कृष्ण हरे ! ! ॥ ७३ ॥

रे उत्तरा शकुनिचा[2] या व्यूहांत न दिसे मला भाचा[2] ॥
त्यावांचूनि यांसीं जो करणें संग्राम तो न लाभाचा ॥ ७४ ॥

हें कटक सोड, तिकडे चाल, तुझ्या हरुनि गोधना खळ तो- ॥
"प्राण-त्राण-परायण[3] जिकडे निरपत्रपाग्रणी[4] पळतो' ॥ ७५ ॥

उत्तर निज तुरगातें द्याया अरुणासि[5] कौतुक पिटाळी[5] ॥
तों गर्जोनि कुरु-कटक-कर्णीं बसवी ध्वज-स्थ[6] कपि टाळी ॥ ७६ ॥

कोठें जाल उभे रे, मत्स्येश्वर-धेनु-पश्यतो-हर[7] हो ॥
सोडा गो-धन नाहीं तरि वधिन तुम्हांसि ह्रश्य तो हर हो' ॥ ७७ ॥

'खल-बल-जलधि-निमग्ना धेनु उसळल्या अलाबु जाल्या हो ॥
हांसुनि विजय मनिं म्हणे, 'कां गोप-सख्या[8] मला बुजाल्या हो' ॥ ७८ ॥

गेल्या पळोनि गाई पृष्ठावरि पुच्छ-भार वाहोनी ॥
राहूनि निश्चल क्षण विजय निवे त्यांकडेचि पाहोनी ॥ ७९ ॥

येतांचि विक्रम-लवें श्री-हरिचा दयित दास वीर गडी ॥
हरि करि-घटेसि[9] जैसा त्या कुरु-सेनेसि वासवी रगडी ॥ ८० ॥

तत्काळ उत्तरें तो नेला कर्णाकडेचि रथ वातें ॥
घन गिरिकडे, सु-वैद्यें स्वौषध रुग्णाकडेचि अथवा तें ॥ ८१ ॥

दव जेविं तृणावरणा[10] वृष[11] भस्म करी महा-शरावरणा ॥
पार्थ म्हणे, 'करितो गिरिश-कमंडलुशीं[12] पहा शराव[13] रणा' ॥ ८२ ॥

---

१ कौरव पांडवांचा गुरु द्रोणाचार्य. २ शकुनीचा भाचा—दुर्योधन. ३ प्राण राखण्याविषयीं तत्पर. ४ ( निर्+अपत्रपा+अग्रणी ) निर्लज्जांमध्यें श्रेष्ठ ( दुर्योधन ). ५ सूर्याचा सारथि अरुण हा सूर्याच्या घोड्यांना जो वेग देतो, त्यापेक्षांही उत्तर आपल्या घोड्यांस जास्त वेग देता झाला असा भाव. ६ एका समयीं अर्जुन व मारुति ह्यांचा एकमेकांच्या बळाविषयीं कांहीं पण पडला असतां अर्जुनास कृष्णाचें साहाय्य असल्यामुळें त्यांत मारुति हरला ; तेव्हां कृष्णमतें असा नियम ठरला कीं, "मारुतीनें प्रत्येक युद्धप्रसंगीं अर्जुनाच्या ध्वजावर बसून आपल्या गर्जनेनें शत्रूंस भयभीत करावें." ह्यावरूनच अर्जुनास 'कपिध्वज' हें नांव पडलें आहे. ७ विराट राजाच्या गाई पाहतां पाहतां नेणारे. ८ गवळ्याच्या ( कृष्णाच्या ) मित्रास. जो गोपसख त्यास गायींनीं बुजूं नये हें तात्पर्य. ९ हत्तींचा समुदाय ( घटा ). १० ( तृण+आवरणा ) गवताच्या आच्छादनास. ११ कर्ण. १२ महादेवाच्या कमंडलूबरोबर. १३ परळ. ( मातीचें पात्र ).

होते यदंश-शेष-श्वास-ज्वलनांत[1] हे समिद्ध धरणी ॥
त्याचा सखा धनंजय होय खल-शलभ-लया समिद्ध[2] रणीं ॥ ८३ ॥
मग गगन-ग-नग-भिन्मुख-सुर-मत-गुरुसींहि[3] अ-नव[4] मुनि नर तो-॥
कलह[5] करी, कीं इतरीं गुरु-कलहीं यासि जन वमुनि न रतो ॥ ८४ ॥
गुरुला विविध शरांची वाहे तो राग-राशि लाखोली ॥
भेटे[6] अस्त्र-तति तया, जाशि पाहों सागरा शिला खोली ॥ ८५ ॥
करिती[7] सुर्यास्तोदय एक मुहूर्तांत एक शतदा ते[7] ॥
त्यांत[8] न एकासमही होती मेघांअसेहि शत दाते ॥ ८६ ॥
द्रोणार्जुन तुल्य-क्रिय बिंब-प्रति-बिंबसेचि[9] ते गमती ॥
किति कुरु-कटकें प्रेक्षक वृत्र-घ्नाचींहि लोचनें भ्रमती ॥ ८७ ॥
अश्वत्थामा धांवे रक्षाया संकटांत जनकास ॥
जन कासया विते सुत कसिते[10] न करावया भजन कास ॥ ८८ ॥

---

१ ज्या कृष्णाचा अंश जो शेष त्याच्या श्वासांच्या अग्नीमध्यें. प्रळयकाळीं प्रखर सूर्यकिरणांनीं पृथ्वी तापून ती आग शेषाच्या मस्तकास पोंचली असतां तो फूत्कार करितो, व त्या योगानें सर्व पृथ्वी जळून जाते; अशी कथा आहे. २ फार पेटलेला. ३ गगनांत गमन करणारे आणि नगभित् (पर्वताचा भेद करणारा) म्हणजे इंद्र तो आहे प्रमुख ज्यांत असे जे सुर म्हणजे देव त्यांना मान्य जो गुरु (द्रोण) त्यावरोबर. ४ पुराणऋषि. अर्जुन हा नरनारायणांपैकीं नराचा अवतार होय. ५ उत्तरार्ध—यासि (क्षत्रियधर्मास अनुसरून मात्र केलेल्या कलहास) वमुनि (खेरीज करून) इतरीं गुरुकलहीं (गुरुशीं दुसऱ्या कोणत्याही प्रकारच्या कलहांत) जन न रतो; असा अन्वय. ६ उत्तरार्धाचा अर्थ—शिळा महासागरांतही टाकली असतां जशी ती त्याच्या थेट तळाशीं जाते, तसे नानाविध अस्त्रांचा प्रयोग करून जे बाण अर्जुनानें महापराक्रमी द्रोणावर सोडिले ते सर्व त्याच्या शरिरास भेदून गेले—असा भाव. ७ एकानें आपल्या बाणांच्या वृष्टीनें सूर्य झांकून टाकावा, व दुसऱ्यानें त्या बाणांचा छेद करून पुनः सूर्याचा उदय करावा, असे ते एक एक (प्रत्येक) मुहूर्तांत शेंकडों वेळां करीत होते; हा भाव. ८ मेघां असेही (मेघांसारखे देखील) शत दाते होती (जन्मतात) [पण] त्यांत (त्या दोघांत, द्रोणार्जुनांत) एकासमही (एकासारखा दुसरा एक) न (जन्मत नाहीं). अर्जुनासारखा वीर एक अर्जुनच होय, द्रोणासारखा वीर एक द्रोणच होय, इतर तत्सम कोणी नाहीं, शंभर मेघांसारखे दाते पुरुष होतात, पण या एकेक वीरासारखा वीर होत नाहीं. (काव्यसंग्रह, महाभारत, विराटपर्व, पाहा.) ९ कोणतेंही प्रतिबिंब (प्रतिच्छाया) ज्या पदार्थाचें असतें, त्या पदार्थास (त्या प्रतिबिंबाचें) बिंब म्हणतात. पदार्थ आणि त्याचें प्रतिबिंब हीं जशीं सर्वांशीं सारखीं असतात, तसे द्रोण व अर्जुन पराक्रमानें अगदीं सारखे भासले. १० सुत भजन (सेवा) करावया (जर) कास न कसिते, (तर) जन (त्यांस) कासया विते? असा अन्वय.

सांवर्तिक[१] मेघांच्या लाजाव्या द्रौणि-सायकां[२] धारा ॥
सत्ताताहुनि[३] होइल सुत, म्हणवायासि 'हाय' कां धारा[३] ॥ ८९ ॥
बहु कल्पना सु-कवि-सा विजयहि बहु शर-परंपरा[४] व्याला ॥
भंगूं पाहे समरीं गुरु-पुत्रासहि जसें पराव्याला[५] ॥ ९० ॥
प्रति-रव-मिषें[६] शरांनीं भरतां कुंथावयासि नभ लागे ॥
देवी म्हणति, 'सख्यांनो दारुण हा क्षात्र-धर्म न भला गे' ॥ ९१ ॥
झाले भाते समरीं आणाया गुरु-सुतीं उणीव रिते ॥
देती[६] सामग्री जय तरि कां सद्रीतिला गुणी वरिते ॥ ९२ ॥
भंगे अश्वत्थामा अश्वत्था[७] मा[७] क्वचित्[७] सदा हरिला ॥
तासि इतरासि जय-श्री नित्य हरिजनासि तो तिणें वरिला ॥ ९३ ॥
हरुनि यशो-धन गो-धन योध न गणित क्षयासि नेऊन ॥
त्या नृप-पुत्रास म्हणे, 'चाल पुरा हें मनींच ठेवून' ॥ ९४ ॥
झांकी[८] वपुला क्षतजें बुसतां मर्मी अरीषु न्हाल्याला[८] ॥
झाला सारथि पहिल्या योषा-वेषासि[९] तो पुन्हां ल्याला ॥ ९५ ॥
विजयी विराट इकडे ये, पूजिति पौर विप्र-जन यातें ॥
येतांचि सभेंत पुसे प्रेमें त्या उत्तरा स्व-तनयातें ॥ ९६ ॥
जन कथिति, "धेनु कुरुंनीं वळिल्या येऊनि उत्तराशेला[१०] ॥
त्वत्कीर्तिनें[११] पसरिला स्व-परित्राणार्थ उत्तरा शेला ॥ ९७ ॥
गेला कुरु जिंकाया आहे सारथि बृहन्नडा, गमला ॥
सत्य कुमारचि[१२], वदला, 'लागो अप-कीर्तिचा न डाग मला' " ॥ ९८ ॥

---

१ प्रलयकालसंबंधीं. २ अश्वत्थाम्याच्या बाणांस. ३ उत्तरार्ध—हाय म्हणावयास (अ हा कुपुत्र निघाला म्हणून दुःखाचे उद्गार काढविण्यास) सुत सत्ताताहुनि (पराक्र बापापेक्षां) धारा (कमी योग्यतेचा) कां होईल? असा अन्वय. तात्पर्य, अश्वत्थ द्रोणापेक्षां पराक्रमानें कमी नव्हता. ४ बाणांच्या पंक्ति. ५ परक्यास. ६ प्रतिध्वनीच्या मिष ६ ह्याच्या स्पष्टीकरणार्थ काव्यसंग्रह महाभा० विराटपर्व पहा. ७ फक्त शनिवा अश्वत्थ (पिंपळ) ह्यापाशीं लक्ष्मीचा वास असतो, अशी प्रसिद्धि आहे. ८ वर्मीं बाण ला रक्तानें भिजलेल्या शरिरास झांकी. ९ स्त्रीवेषास. १० (उत्तर + आशेला) उत्तर दिशे ११ त्वत्कीर्तिनें स्वपरित्राणार्थ उत्तरा शेला पसरिला, हा अन्वय; तुझ्या कीर्तीनें उत्तर पदर पसरून, माझें रक्षण कर अशी विनंति केली. तुझी कीर्ति राखण्याकरितां तो युद्ध गेला; हें तात्पर्य. १२ सत्य कुमारचि गमला—म्हणजे खरोखर कार्तिकस्वामीच वाटला.

भूप म्हणे, 'कुरु होतिल वारे, करितील आजि अभ्र मुला[1] ॥
दुःख सुदेष्णेला[2] जें शिरतां सिंहांत कलभ अभ्रमुला[3]' ॥ ९९ ॥
'देवा कुमार आला, सोडविल्या धेनु पळविलीं कटकें ॥
न[4] वय प्रमाण तेजस्वि-जनीं म्हणती कवी न तें लटकें' ॥ १०० ॥
धर्म म्हणे, 'आयकिलें दूताचें वचन चांगलें कानें ॥
राया, सुख-रोमांचित केलें कीं आजि आंग लेकानें ॥ १०१ ॥
सारथि बृहन्नडा ज्या तद्विजयें करुत बायका नवला ॥
चिंता-मणि-गल[5] बालक ज्यो दुर्लभ त्यासि काय कानवला[6]' ॥१०२॥
दूतातें सुखवुनि नृप सचिवांसि म्हणे, 'गुढ्या उभारा हो ॥
पुर शोभवा, पुढें जा, राजपथीं विप्रजन राहो ॥१०३॥
गाजत वाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो ॥
मज-मागें मत्स्यांचा हा रिपु-शशि-राहु-बाहु[7] राणा हो' ॥१०४॥

---

## उद्योग-पर्वांतील कृष्ण-शिष्टाई.

(म० भा० अ० ७२–९९. मोरोपंत अ० ६–८.)

पांडवांचा अज्ञातवास संपल्यानंतर त्यांनीं आपला राज्याचा हिस्सा आपणांस मिळावा, दुर्योधनाशीं सल्ला व्हावा म्हणून कृष्णास शिष्ट (वकील) करून हास्तिनापुरास पाठविलें, हें ह्या आख्यानांत आहे.

धर्म म्हणे, 'श्री-कृष्णा बुडतों मी सत्य जाण तार मला ॥
भव बुडवी म्हणुनिच तव भजनीं सनकादि जाणता रमला ॥ १ ॥
जेणें न बुडे कुरु-कुळ धर्म, यश, न्याय, त्याचि सदुपाया- ॥
सांग, सख्या भ्रमला हा जन, केवळ आत[8] तूंचि यदु-पा या[8]' ॥ २ ॥
श्रीकृष्ण म्हणे, 'देवा[9] जातो मी त्याकडे हित वदाया ॥
काय सुयोधन, न शके पचवाया वृत्र-हाहि[10] तव दाया[11]' ॥ ३ ॥

---

१ मुलाला (उत्तराला). २ सुदेष्णा ही विराटाची बायको, तिला. ३ हत्तिणीला. ४ अंगांत मोठा पराक्रम असण्यास वय मोठें असावें लागत नाहीं, हें तात्पर्य. ५ चिंतामणि (इच्छिलेलें देणारें रत्न) ज्याच्या गळ्यांत आहे असा बाळक. ६ करंजी. ७ शत्रु हाच चंद्र त्याला राहूसारिखा (ग्रासणारा) आहे बाहु ज्याचा; हें 'राणा' ह्याचें विशेषण. ८ या (ह्या धर्मास) यदुपा (हे कृष्णा) तूंचि आप्त, हित व खरें सांगणारा (आहेस). ९ हे धर्मराजा. १० इंद्रदेखिल. ११ वारसाचा हिस्सा.

धर्म म्हणे, 'हितहि तया अ-हित, अहि तसाचि तो परम खळ गा ॥
व्यसनीं भल्यासि पाडी, दुष्ट गजा जेविं पिहित-मुख[१] खळगा' ॥ ४ ॥

शौरि म्हणे, "राजेंद्रा यद्यपि बलवान् तथापि शुनकानें ॥
हरिचें काय करावें, पारिसो तो[२] हित-कथा पिशुन[२] कानें ॥ ५ ॥

जिंकिल काय हरा तो, जिंकी कुतुकेंचि मन्मथ नरा ज्या[३] ॥
करिल हरि-मथन शश, तरि करिल सु-योधनहि मन्मथन[४] राजा ॥ ६ ॥

योजीन युक्ति सामीं सांदीपनिच्या तुझ्या बहु नव्या ही ॥
प्राणापरीस बहु मज जेविं तुम्ही तेंविं तो बहु न व्याही[५] ॥ ७ ॥

माय करी बाळांचें नित्य श्रमवूनि काय जेंवि हित ॥
तेंवि करितसे मन्मति, होय निज-दयेसि काय जें विहित ॥ ८ ॥

देइल अंश सुयोधन तरि आम्हां पावला सदाशिव हो ॥
म्हणतोसि तूंहि मीही कीं 'प्रज्ञा-चक्षुचें[६] सदा शिव हो'" ॥ ९ ॥

श्रीराम जसा प्रेषी शिकवुनि सामोक्ति[७] अंगदा साच्या ॥
धर्म तसा प्रभुला, जो कार्या देणार अंग दासाच्या ॥ १० ॥

भीम म्हणे, 'केशवजी मृदु बोला उग्र तो सुयोधन हो ॥
बा त्यासीं 'सख्यचि हो युद्धीं हत एकही सु-योध न हो ॥ ११ ॥

इतर असो, लाजेलचि त्या नित्य मदांध सुर-गज गदीशा[८] ॥
दुर्योधना 'गुरु' असें म्हणतिल गरलांध उरग जगदीशा' ॥ १२ ॥

श्रीकृष्ण म्हणे, 'हा रे भीमा जरि तूं महा-भुज गदीन[९] ॥
भ्यालासि, होय जैसा चिंतुनि गरुडा महा-भुजग दीन ॥ १३ ॥

आम्हां तुझा भरंवसा बहु कीं खळ मर्दिशील तूं अगदीं ॥
निर्वीर्यत्व[१०] चिकित्सा-समयीं[११] आलें चिरार्चितीं[१२] अगदीं[१२] ॥ १४ ॥

---

१ गवतानें वगैरे झांकलें आहे तोंड ज्याचें असा. २ तो खल दुर्योधन. ३ ज्याला. ४ माझा नाश. ५ दुर्योधनाची मुलगी लक्ष्मणा ही कृष्णाचा मुलगा सांब ह्यास दिली होती, म्हणून तो व्याही. ६ प्रज्ञा (बुद्धिच) आहे चक्षु ज्यास म्हणजे अंध, त्याचें–धृतराष्ट्राचें. ७ सामाविषयीं भाषणें. (पृ०६५, एकनाथकृत अंगदशिष्टाई, ओव्या १७–२१ पहा.). ८ गदा धारण करण्यांत श्रेष्ठ अशा (दुर्योधनास). ९ गदी+इन–गदा धरणाऱ्यांत श्रेष्ठ. १० निःसारपणा. ११ रोग दूर करण्याच्या वेळीं. १२ पुष्कळ दिवस पूज्य मानिलेल्या औषधांत.

भीम म्हणे, 'हा ध्याया सुत-शोक पित्यासि[१] यादवा[२] लाजे ॥
भस्मचि होतील सकळ ते सांपडतील या दवाला[३] जे' ॥ १५ ॥
अर्जुन म्हणे, 'सख्या जें कीर्ति-कर असेल तेंचि कर जा गा ॥
सांगावें काय, तुझा प्रणत-त्राणीं असेचि कर जागा' ॥ १६ ॥
कृष्णाहि म्हणे, 'कृष्णा, म्हणसि जिला प्रिय-सखी पहा हे ती ॥
विसरो तुझी न समयीं ईस श्रित-भव्य-दा[४] महा-हेति[५]' ॥ १७ ॥
बहु गहिंवरोनि दावुनि दुःशासन-पाणि-कृष्ट-केश[६] वदे ॥
बहु दीर्घ उष्ण सोडुनि सुसकारा तीस अ-भय केशव दे ॥ १८ ॥
श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे ॥
दुर्योधन-प्रमुख-खळ-खद्योत-तदन्य-पद्म-भानु[७] निघे ॥ १९ ॥
धर्म म्हणे, 'शीघ्र सुखें ये जोडुनि सिद्धि कीर्ति-सह देवा ॥
मातेसि नमुनि वद कीं, आहे आरोग्य साधु-सहदेवा[८] ॥ २० ॥
तूं जेविं देवकीला भेटासि तैसाच भेट आतेला[९] ॥
आम्हांहुनि तूंचि अधिक घृत सोडुनि कोण करिल आ तेला ॥ २१ ॥
कृष्णा, कळेल तैसें वद कुंतीला न दुःख बाधावें ॥
पंकीं धेनु[१०] श्रमती पुण्य-श्लोका मुरारि बा धावें ॥ २२ ॥
धृतराष्ट्र भीम बाल्हिक[११] विदुर कृप द्रोण सर्व शुचि तज्ज्ञ[१२] ॥
जे त्यांसि भेट, वद हित, सांगों तुज काय, तूंचि उचित-ज्ञ ॥ २३ ॥
म्यां पुशिलें कुशल[१३] असें कर्णासि सुयोधनासि सांगावें ॥
येतां पंचम[१४] दाटुनि कर्ण-कटु पिकें शिकोनि कां गावें[१३]' ॥ २४ ॥

---

१ कौरवांचा बाप (धृतराष्ट्र) त्यास. २ हे कृष्णा. ३ ह्या (मीच जो) वणवा त्याला. ४ आश्रितांचें कल्याण करणारी, किंवा हें कृष्णाचें संबोधन. ५ शस्त्र. ६ दुःशासनानें हातानें ओढलेले केस. ७ दुर्योधन आदिकरून जे दुष्ट हेच काजवे त्यांस 'व त्या दुष्टांहून इतर म्हणजे (सुजन) तींच पद्में त्यांस' सूर्यासारखा दुष्टांचें दमन करणारा व साधूंस संतोष देणारा असा कृष्ण. ८ बाळा सहदेवाला. सहदेव सर्वांत लहान असल्यामुळें असें म्हटलें आहे. ९ कुंतीला. १० कुंती हीच गाय. ११ हा शंतनुराजाचा भाऊ व भीष्माचा चुलता. १२ ज्ञाते. १३ कोकिळास पंचम (गोड स्वरानें) गातां येत असतां त्यानें शिकून (दाटून) कर्णकटु कां गावें?–धर्म राजा अगदीं सरळ स्वभावाचा व अजातशत्रु होता म्हणून त्यानें कर्णदुर्योधनांस (ते दुष्ट असतांही) कुशल विचारिलें हें तात्पर्य. १४ स्वरविशेष.

ऐसें अ-जात-रिपु नृप सूचित[1] सुचवूनि शौरिला परते ॥
मग विजय म्हणे, 'देवा येऊं द्यावे न मजपुढें पर ते' ॥ २५ ॥
प्रभु पांडवांसि फिरवुनि जातां पाहे पथांत नाकर्षी ॥
राजर्षि ब्रह्मर्षि स्व-यश जयांच्या मनासि आकर्षी ॥ २६ ॥
इच्छा पुसतां वदले, 'बा तुज-सम अन्य बोलका नाहीं ॥
प्राशूं धृतराष्ट्र-सभे-माजि तुझे धन्य बोल कानांहीं ॥ २७ ॥
दे[2] या अयास यांया आज्ञा स-दया महोदया परिसा[2]' ॥
यापरि साधु-मनोरथ जाणोनि म्हणे मुकुंद 'या परिसा' ॥ २८ ॥
'सामार्थ प्रभु येतो', ऐसें धृतराष्ट्र आयके कानीं ॥
बहु तृषित अंधचातक मेघागम जेविं काय केकानीं ॥ २९ ॥
मार्गीं सभादि सर्वहि बहु साहित्य प्रति-स्थळीं करवी ॥
कीं आपणावरि दया-दृष्टि करावी यदूत्तमें बरवी ॥ ३० ॥
देव न पाहे तिकडे कीं तें करणें नव्हेचि निष्कपट ॥
मैंदाचें स्वीकारिल कवण विचक्षण अ-मूल्य निष्कपट ॥ ३१ ॥
धृतराष्ट्र म्हणे, 'विदुरा जो साधु-मनें स्व-सद्गुणें हरितो ॥
येइल वृकस्थळाहुनि[3] आम्हां भेटावया उद्यां हरि तो ॥ ३२ ॥
दासी शत दासहि शत आठ महा-नाग[4] रुक्म-रथ[5] सोळा ॥
देईन तोहि सन्माणि शुचितेजाचाचि जो गमे गोळा' ॥ ३३ ॥
विदुर म्हणे, 'कपट मनीं प्रेम वरि असें करूं नको, पावें ॥
तुजवरि न ईश्वरानें करुणा परती करून कोपावें ॥ ३४ ॥
पांचां पुत्रां द्यावीं पांच, न होउनि खळांसि वश, गांवें ॥
तें तों न करिसि जेणें प्रभुनें स्वमुखेंकरून यश गावें ॥ ३५ ॥
गुळ-खोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा ॥
सत्य प्रेमचि दावुनि सुज्ञें तो विश्व-पाळ कवळावा ॥ ३६ ॥
कपटादरें वळो पर[6] पर परमेश्वर कसा वळेल हरी ॥
कृष्ण-कृपामृत-निधिची अ-कपट-विनताकडे[7] वळे लहरी ॥ ३७ ॥

---

१ (सु+उचित) योग्य. २ हे सदया महोदया (भक्तांचा मोठा उत्कर्ष करणाऱ्या) परिसा, या अयास (हे आम्ही जे लोखंड ह्यांस) याया (येण्याला) आज्ञा दे. ३ वृकप्रस्थ (गांवाचें नांव) तेथून. ४ मोठे हत्ती. ५ रुप्याचे रथ. ६ ईश्वराहून अन्य. ७ कपट सोडून शरण गेलेल्याकडे.

येतो साम कराया, होय यशोर्थीच, तो यशा लाहो ॥
देणार तुम्ही हय गज रथ दासी दास, हें कशाला हो ॥ ३८ ॥
समजाल तरि करिल हरि हर्षे पावोनियां विडा लास्य[1] ॥
नाहीं तरि खेद-द त्या सर्व, जसें प्रस्थिता[2] बिडालास्य[2] ' ॥ ३९ ॥
तेव्हां सुयोधन म्हणे, 'सत्य न सोडील सख्य हरि त्यांचें[3] ॥
न पुरेल कृष्ण-मानस-हरणीं बळ मेरुच्याहि हरित्यांचें ॥ ४० ॥
कृष्णासि वस्तु संप्रति किमपि न द्यावें तुम्हीं अहो तात ॥
भ्याले म्हणेल, मान्य न अव-मानाला कुलीन होतात ॥ ४१ ॥
त्रि-भुवन-पूज्य-तम[4] प्रभु सत्यचि हें किंच[5] तो असे व्याही ॥
परि संप्रति सेव्य नव्हे सेवूं कृष्णेतरा अ-सेव्याही ॥ ४२ ॥
जें वैर वाढलें तें आतिथ्येंकरुनि काय हो शमतें ॥
अव-मान नव्हे जेणें तें क्षत्रोचित[6] असें मला गमतें ' ॥ ४३ ॥
वृष्णि-प[7] वृकस्थळाहुनि येतां भीष्मादि सु-ज्ञ ते सर्व ॥
जन सामोरे गेले अंदुक[8] जाला सुयोधना[8] गर्व ॥ ४४ ॥
धृतराष्ट्र-गृहा नेती राज-पथीं हळुहळूच हरि[9] हरितें ॥
त्यां पशु म्हणेल तो पशु त्यांचें स-कृपत्व अ-तुळ हरिहरि[10] तें ॥ ४५ ॥
भेटे धृतराष्ट्राला तत्कृत पूजेसि बहुत भाउनि घे ॥
मग जगदीश्वर तेथुनि त्याचा[11] निववावयासि भाउ[11] निघे ॥ ४६ ॥
'आहेत[12] सुखी पांडव, देवा आलासि काय सामास[13] ॥
खळ न वळेल झिजविला जरि करितां बोध काय[14] सा[15] मास[15] ' ॥ ४७ ॥
विदुरासि भेटल्यावरि भेटे सर्वाप्त-राज[16] कुंतीतें ॥
जीस अ-सुख सह्य गमे दे जें भेदूनि हृदय कुंती[17] तें ॥ ४८ ॥

---

१ नृत्य. २ बाहेर जाणारास जसें (बिडाल+आस्य) मांजराचें तोंड, (मांजर) वाटेंत आडवें आलें तर तें दुःखद होतें. ३ पांडवांचें. ४ तिन्ही लोकांत पूजा करण्यास अत्यंत योग्य. ५ आणि. ६ क्षत्रियाला योग्य. ७ यादवांचा पति (कृष्ण). ८ गर्वानें दुर्योधन सामोरा गेला नाहीं, हें तात्पर्य ; अंदुक (आंधळें करणारा-गर्व-झाला). ९ घोडे. १० हे शब्द आश्चर्यवाचक आहेत. कृष्णमूर्ति चांगली सर्वांच्या दृष्टीस पडावी म्हणून घोडे हळू चालत होते हें तात्पर्य. ११ धृतराष्ट्राचा भाऊ (विदुर). १२ हें विदुराचें भाषण. १३ संधि करावयास. १४ शरीर. १५ सहा महिने — पुष्कळ दिवस हा अर्थ. १६ सर्व हितचिंतकांमध्यें श्रेष्ठ (श्रीकृष्ण). कोठें सर्वाप्तराजकुंतीतें असें एक पद आढळतें, तसें केल्यास, सर्व आप्त (इष्टमंडळी) ह्यांत प्रमुख कुंतीला, असा अर्थ घ्यावा व भेटे ह्याचा कर्ता कृष्ण अध्याहृत घ्यावा. १७ भाला धारण करणारा.

वैकुंठाच्या कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या ॥
ब्रह्मासहि[१] गहिंवरवी महिवर-वीरेंद्र-पांडुचि भार्या ॥ ४९ ॥
प्रभुला म्हणे, "मुकुंदा बा तूंचि करिसि सुखी स-खेदास[२] ॥
संप्रति आहेत कसे मद्बालक ते तुझे सखे दास ॥ ५० ॥
प्रिय-सुत-विरह सु-दुःसह देह-विरह[३] बहु बरा सु-सह देवा ॥
पावेन कधीं बा मी म्हणतें स्व-बहिश्चरासु[४] सहदेवा ॥ ५१ ॥
वत्सा सहदेवा मी मेल्यावरि 'हाय' नच वदावें हो ॥
तेरा[५] पळेंहि नसती माता, हें हायन चवदावें हो[५]" ॥ ५२ ॥
प्रभु अश्रु पुसोनि म्हणे, 'जें संकल्पित घडेल सत्वर तें ॥
आत्याबाई कवणें ऐसे श्रम भोगिले न सत्त्व-रतें ॥ ५३ ॥
मच्चित्त कौरवांचे चिंतूनि अ-साधु-वाद[६] तळमळतें ॥
असतों मी तैं, तरि न व्यसन-मळें धर्म-पाद-तळ मळतें ॥ ५४ ॥
आहेत स-दार सुखी देवि नमस्कार हे तुला सा[७] जे' ॥
ऐसें सांगुनि वंदी, तें त्या श्रित-शर्म-हेतुला[८] साजे ॥ ५५ ॥
समजावुनि कुंतीतें भेटे दुर्योधना अ-सेव्याही ॥
कीं तो[९] स्व-सुता[१०] स्व-सुता[११] देउनियां जाहला असे व्याही ॥ ५६ ॥
लघु[१२] म्हणति जे सुयोधन-दुःशासन-शकुनि-कर्ण वेनातें[१२] ॥
परिरंभ-पात्र केले, प्रभुचें सौजन्य वर्णवेना तें ॥ ५७ ॥
पूजुनि घे प्रभु, होइल जल-निधिला तृप्ति-दायक विहीर ॥
थोरपण अनंताचें अनंत वर्णील काय कवि-हीर ॥ ५८ ॥
'भोजन करा' म्हणे शठ, देव म्हणे, "मज कशास हो करितां[१३] ॥
जेवा तुम्हीच, दाटुनि आदर आग्रह कशास हो करितां ॥ ५९ ॥
असतों जरि अन्नार्थी प्रथमचि म्हणतों 'अवश्य' मी तुजला ॥
प्रेमार्थी पांडव-सख हा अन्नाकारणें नसे सुजला" ॥ ६० ॥

---

१ निर्विकार अशा ईश्वरालाही. २ दुःखितास. ३ देहाचा नाश. ४ (बहिः+चर+असु) बाहेर संचार करणारा प्राणच. ५ पुत्रवियोग झाला असतां माता (आई) तेरा पळेंही वाचावयाची नाहीं; परंतु मी १३ वर्षें वांचलें आहें, म्हणून मला माता हें नांव शोभत नाहीं, हें तात्पर्य. ६ दुर्भाषणें ७ सहा. ८ आश्रितांचें कल्याण करण्याचा ज्याचा हेतु आहे अशा कृष्णाला. ९ दुर्योधन. १० आपली कन्या (लक्ष्मणा). ११ आपल्या पुत्रास (सांबास). १२ ह्या नांवाचा राजा महापातकी व दुष्ट होता; त्यालाही जें सुयोधनादि लघु (लहान) (तो काय आमच्यापुढें?) असें म्हणति. १३ बोलावतां.

प्रभुला म्हणे सुयोधन, 'तिकडे[1] हिकडेहि[1] सम असे नातें ॥
ज्याकारणें करावा अस्मदनादर[2] तुवां असेना तें' ॥ ६१ ॥
देव म्हणे, 'केवळ ते न सोयरे मदसु सर्व वसु देव ॥
मान्य जसे अक्रूरोद्धव-बळ-भद्रोग्रसेन-वसुदेव ॥ ६२ ॥
जे तत्सख तद्रिपु ते मत्सख मद्रिपु खरे अगा राया ॥
द्विषदन्न[3] न सेवावें म्यां येऊंही नये अगारा या' ॥ ६३ ॥
खोटा सुयोधन म्हणुनि विदुर-गृहा जाय देव नच खोटा ॥
गोपोच्छिष्टा[4] वळला वळता कां वासुदेव न चखोटा[5] ॥ ६४ ॥
दुःसंग-नक्र-दत्त[6] क्लेश निवारूनि सर्व विदुर-गजा[7] ॥
मुक्त करी हरि, लाजे गातां गुण-कीर्ति सर्व-विदुरग[8] जा ॥ ६५ ॥
शत-संख्य वाजवी ज्या जेववितां माय देवकी चिटक्या[9] ॥
तो नित्य-तृप्त भगवान् विदुर-गृहीं भोजनांत दे मिटक्या ॥ ६६ ॥
आले ढेंकर, दिधल्या मिटक्या बहुसाळ, मारिले भुरके ॥
उरके सर्वांमागुनि अशन परि न ताट चाटणें उरके ॥ ६७ ॥
ज्याच्या चरणें स्व-रजा-करवीं प्रणतासि मोक्ष देवविला ॥
देव विलास-मनुज-तनु[10] विदुर-प्रेमें यथेष्ट जेवविला ॥ ६८ ॥
मग रात्रौ एकांतीं सर्वज्ञालाहि साधु-राय कवी ॥
पाय रगडितां दुर्जन-दुर्योधन-दुर्मतासि आयकवी ॥ ६९ ॥
पंगुहि मेरुवरुनिहि न माथां धरितां यदंघ्रि-रज निसरे ॥
त्या दीन-बंधुची ती चिंता न सरे परंतु रजनि सरे ॥ ७० ॥
प्रातःकाळीं स-शकुनि दुर्योधन ये स्वयें बहायाला ॥
प्रातर्विधि करुनि प्रभु जाय प्रज्ञांबका[11] पहायाला ॥ ७१ ॥
जन-दृष्टि-चातकी[12] जी तूर्य-रवेंकरुनि[12] देत ओ तीतें ॥
प्रभु-मेघ दर्शनामृत[12] दुर्लभ जें तन्मुखांत ओती तें[12] ॥ ७२ ॥

---

१ पांडवांकडे व आम्हांकडे. २ आमचा अपमान. ३ द्विषत्+अन्न=शत्रूचें अन्न. ४ गोपाळांच्या उष्ट्या अन्नाला. ५ चांगला. ६ दुःसंग हाच नक्र ह्यानें दिलेले. ७ विदुररूप गजेंद्रास. ८ (सर्व+वित्+उरग) सर्वज्ञ शेष. ९ चुटक्या. १० लीलेनें मनुष्यदेह ज्यानें धारण केला आहे असा. ११ प्रज्ञा (बुद्धि) हेंच आहे अंबक (नेत्र) ज्याचें अशाला म्हणजे अंध धृतराष्ट्राला. १२ जनदृष्टि जी चातकी तीतें प्रभु-मेघ तूर्यरवेंकरुनि ओ देत जें दुर्लभ दर्शनामृत तें तन्मुखांत ओती.

मग जी जलद-श्यामा करुणा[१] बसली नवासनावरि ती ॥
जीच्या उपासक-जना-प्रति विषयांच्या न वासना वरिती ॥ ७३ ॥

केवळ जवळ बसविला विदुर प्रेमेंकरूनि मा-पानें[२] ॥
तद्यश न मोजवेल ब्रह्मांडायेवढ्याहि मापानें ॥ ७४ ॥

टकमक पाहत होते प्रभु-मुख-चंद्राकडेचि चातकसे[३] ॥
नसतील जोडिले श्रवणींहि वसाया मनासि हात कसे ॥ ७५ ॥

सभ्य श्रुति-वदनांतें[४] पसरिति सेवावया भगवदुक्ती ॥
प्राशावयासि जेविं स्वच्छ स्वात्यंबुला[५] जलधि-शुक्ती ॥ ७६ ॥

देव म्हणे, 'धृतराष्ट्रा राया मोठी जगीं तुझी पदवी ॥
पद विद्यांचें तूं, परि परिस, मज बळेंचि आत-ता वदवी ॥ ७७ ॥

जें मेळविलें चंदन-सम झिजवुनि पर-सुखार्थ आंगातें ॥
केवळ कृपाळु-पूर्वज-सद्यश मळविसि बळेंचि कां गा तें ॥ ७८ ॥

दुःख परासि न द्यावें, सत्य वदावें क्षमा न सोडावी ॥
जोडावी कीर्ति, असी कुळ-रीति तुम्हीं कधीं न मोडावी ॥ ७९ ॥

वाढिव धर्मा प्रेमें वाढवि मज जेविं नंद नवनीतें ॥
सत्पुत्रांनीं भवनीं सुर-तरुंनीं न सुख नंदन-वनीं तें' ॥ ८० ॥

म्हणतो युधिष्ठिर, 'नको पायें लोटूं मला अव-नतातें' ॥
वचन-करापत्याचें[६] न करावें काय हो अवन तातें ॥ ८१ ॥

क्रमिले तसेचि कथिले होते त्वां त्यांसि अब्द तेरा जे ॥
'धन्य' म्हणत होते जे लावितिल तुलाचि शब्द ते राजे ॥ ८२ ॥

सुख-संतति-सुकृतर्द्धि-प्रीति-श्री-पुण्य-कीर्ति या लाभें- ॥
साम करीं साधूंसीं नाहींतरि पावलेंचि यांला[७] भें' ॥ ८३ ॥

बहु सत्य बहु प्रिय बहु हित बहु मत बहु दुराप[८] बहु रुचिर ॥
शुचि-रम्य-क्षीरधिजनन-चंद्र-चकोर[९] बोलिला सुचिर ॥ ८४ ॥

---

१ करुणेची मूर्तीच जो कृष्ण. २ लक्ष्मीपतीनें. ३ येथें चंद्राच्या संबंधानें चकोर पद पाहिजे; परंतु प्रास साधण्याच्या व्यवधानांत चातकपद योजण्याचा प्रमाद कवीच्या हातून झाला असावा. ४ कान हींच वदनें त्यातें. ५ स्वातिनक्षत्राच्या उदकास. ६ (वचन+कर+अपत्य) आज्ञेंत राहणाऱ्या मुलाचें. ७ सुखादिकांला. ८ (दुर्+आप) ऐकायाला मिळणें कठीण. ९ लक्ष्मीच्या मुखचंद्राविषयीं चकोरासारखा कृष्ण.

## आर्या–भीष्म-पर्वांतील युद्धप्रकरणीं

(म० भा० अ० २३ व १३६. मोरोपंत अ० १–१०.)

युद्धारंभीं श्रीकृष्णानें सांगितल्यावरून विजयानें (अर्जुनानें) रथाखालीं उतरून आपल्यास विजय मिळावा म्हणून श्रीदुर्गेचें स्तवन केलें. त्यानंतर देवी प्रगट होऊन तिनें 'तुला जय प्राप्त होईल' असा आशीर्वाद दिला व ती गुप्त झाली. मग आपल्या समोर सर्व आप्तमंडळी उभी राहिलेली पाहून त्यांच्यावर बाण कसे टाकावे म्हणून अर्जुनाला भीति उत्पन्न झाली असें पाहून श्रीकृष्णानें अठरा अध्याय गीतेचा अर्जुनास उपदेश केल्यानंतर तो भीष्माशीं युद्ध करूं लागला. त्यांत भीष्माचे बाण अर्जुनास लागून तो घायाळ होऊन रथांत पडला. तें पाहून श्रीकृष्ण रथावरून खालीं उडी टाकून भीष्मास मारण्याकरितां त्याच्या अंगावर धावून गेला व त्यानें भीष्माचा पराभव केला ही कथा या आख्यानांत आहे.

युद्धारंभीं यदु-पति वदला, 'विजया रथातळीं उतर ॥
दुर्गेसि हात जोडीं, होइल खल-बल-समुद्र हा सु-तर ॥ १ ॥
त्रि-भुवन इच्या प्रसादें जेविं वसंतर्तुनें समस्त वन- ॥
शोभे, म्हणुनि करावें त्वां केवळ दुर्बला-सम स्तवन' ॥ २ ॥
स्व-रथाखालें उतरुनि नमुनि म्हणे विजय, 'विजय दे दुर्गे ॥
त्वत्पद-भजनीं बहु सुख म्हणुनि म्हणे भक्त मुक्तिला 'दुर्गे[१]' (दुर गे) ॥ ३ ॥
वासर-मणि-कोटि-रुचे[२], हास-रस-वशीकृत-स्मराराते[३] ॥
कासर-नगासने[४], हा दास रणीं विजय-पात्र हो, माते' ॥ ४ ॥
ऐसें स्तवितांचि शिवा दर्शन देउनि म्हणे, 'अगा साधो ॥
त्वदुदारता जसी तसि न सुरांच्या[५] बहु-मता अ-गा[५] साधो ॥ ५ ॥
द्याया मज यश, लोकां सुख, गृध्रां तो लुलाय[६] मास[७] मरे ॥
मरतिल तसेंचि तव रिपु मानुनि समरीं तुला यमासम रे' ॥ ६ ॥
देउनि विजय-वर असा झाली अंतर्हिता भवानी ती ॥
सदवन असदनवन[८] या नित्य जिच्या बहु-मता भवा नीति ॥ ७ ॥

---

१ गे दूर हो. २ कोटि सूर्यांप्रमाणें आहे तेज जिचें. ३ आपल्या सुंदर हास्यानें स्वाधीन केला आहे मदनाचा शत्रु (शिव) जिनें. ४ महिषासुर व विंध्याचल ह्यांवर बसणारी. ५ कल्पवृक्षास. ६ महिषासुर. ७ मांस. ८ असत्+अन्+अवन=दुष्टांचें रक्षण न करणें.

युद्धारंभीं भीष्म-द्रोण-प्रमुखाखिलाप्त-वध-भीता[१] ॥
शक्र-सुता[२] त्रि-जगद्गुरु-कृष्णें उपदेशिली स्वयें गीता ॥ ८ ॥

त्या योगानें अर्जुनाचा मोह दूर होऊन तो युद्धास तयार झाला तेव्हां-

बहु-विध-वाद्य-रव अमर-नाथादि-विमान दाटले खांत[३] ॥
वर्णिति नर-नारायण[४] कोण तयांचे न भाट लेखांत[५] ॥ ९ ॥

भीष्म पुढें करुनि, उठे प्रथम सुयोधन करावया कदन ॥
भीम पुढें करुनि, उठे धर्म प्रभु जो सु-कीर्तिचें सदन ॥ १० ॥

भीमाचा सिंह-ध्वनि कोणासहि आयकों न दे वाद्यें ॥
सोडुनि समाधि, मस्तक डोलविलें आयकोन देवाद्यें[६] ॥ ११ ॥

वृद्ध-तरुण भीष्मार्जुन परि न रणीं न्यून अधिक ते गमले ॥
सम लेखर्षि[७] तयांतें जाणुनि तद्भुज-पराक्रमीं रमले ॥ १२ ॥

सूं सणणण सणणणणण वाजति शर-निकर काय-हानि-कर[८] ॥
वदले सुर मुनि, 'करितो नर-रूपें रुद्र काय हा निकर' ॥ १३ ॥

शरधि-शर-जलधि[९] फुटले कीं दैवें पाश एकदां तुटले ॥
ते काल-व्याल[१०], करटि-घोटक-भट-भेक[११] खावया[११] सुटले ॥ १४ ॥

कवि योजुनि उपमा गज-हर-नर-शर-ततिस[१२] वाहुटळ लाजो[१२] ॥
अ-तुल-बल न कां गर-गल-कलहींहि[१३] न विजय-बाहु[१४] टळला जो ॥ १५ ॥

देवासुराहव न बहु त्या कौरव-पांडवाहवाहून ॥
शोणित-नदींत गेले स-भट-रथ-द्विरद-वाह[१५] वाहून ॥ १६ ॥

तिसरे दिवशीं राया[१६], भीमानें अतितरोग्र-कोपानें[१७] ॥
दुर्योधन नृप मूर्च्छित केला, भेदुनि उरांत रोपानें ॥ १७ ॥

---

१ भीष्म, द्रोण आदिकरून संपूर्ण आप्तांचा वध होईल म्हणून भ्यालेला जो त्याला. २ इंद्राचा मुलगा अर्जुन त्यास. ३ स्वर्गांत. ४ अर्जुन व कृष्ण ( वर्णिति ह्यांचें कर्म ). ५ देवांत. ६ महादेवानें. ७ देव व ऋषि. ८ शरिरांचा नाश करणारे. ९ भात्यांतील बाणरूपी समुद्र. १० कृष्णसर्प. ११ हत्ती, घोडे, व योद्धे हेच कोणी बेडूक ह्यांस गिळावयास. १२ हत्तींचा नाश करणाऱ्या अर्जुनाच्या बाणसमुदायास उपमा वाहुटळ योजून कवि लाजो. १३ विष आहे कंठांत ज्याच्या अशा शिवाबरोबर युद्ध करण्यांत. १४ अर्जुनाचा बाहु. १५ योद्ध्यांसह रथ, हत्ती व घोडे. १६ हे धृतराष्ट्रा. १७ अति+तर+उग्र+कोप=फारच भयंकर कोप.

सावध होउनि राजा भीष्मासि म्हणे, 'अहो पितामहजी ॥
झाली[१] भवत्-प्रतिज्ञा[२] काय जनां दे सुधा पितां मह जी ॥ १८ ॥
असतां तुम्ही पति[३] पृथा-पुत्र मथिति या मदीय पृतनेतें[४] ॥
नवल ज्वलदनलाचें[५] सर्वस्वें बळ हरोनि घृत नेतें ॥ १९ ॥
जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें ॥
पायें अनन्य लोटुनि लावावें काय अन्य[६] थानातें' ॥ २० ॥
हांसुनि पृथुल-जलज-दल-निभ-शुभ-नयनें सलील फिरवून ॥
पाहुनि सुयोधनानन, शांतनव वदे स्वकोप जिरवून ॥ २१ ॥
'राया भलतेंचि वदसि पथ्य[७] हित स्व-गुरु-वच न आइकसी ॥
अन्य असोत, वदेल स्व-सुताप्रति अहितवचन आइ कसी ॥ २२ ॥
कैसा जिंकावा हो, करुनि बळें आहवा युवा[८] जीनें[९] ॥
बा जिंकिला कधीं तरि जवनें[१०] तरुणेंहि वायु वाजीनें ॥ २३ ॥
मी आजि साग्रजानुज[११] शक्र-सुताचें करीन वारण गा ॥
बहु हेंहि पदभरिहि जरि सारील अ-नव[१२] करी नवा रण-गा[१३]' ॥ २४ ॥
असि करुनियां प्रतिज्ञा विष्णु-पदी-नंदनें[१४] अति-त्वरितें ॥
पांडव-चमू-पतीचें मथुनि चमू पाडिलें पति-त्व रितें ॥ २५ ॥
जिकडे जिकडे पळती तिकडे तिकडे महा-जवन तो बा ॥
बहु 'हाय हाय' म्हणती प्राकृत, बुध 'हंत हा,' यवन 'तोबा' ॥ २६ ॥
गरुडहि अहींसि न तसा न करि-कुळालाहि तेविं हरी खपवी[१५] ॥
दुर्योधनासि जैसा दे भीष्म न हरिस[१६] तेविं हरिख पवी[१७] ॥ २७ ॥
धर्म-कटक खांडव-वन, भीष्म विजय[१८], विजय तोचि हरि[१९] गमला ॥
शर दव, रक्त ज्वाला, रूपक याहूनि होय बहु न मला ॥ २८ ॥

---

१ अन्वय—जी भवत्प्रतिज्ञा सुधा ( आपली प्रतिज्ञानरूप सुधा ) पितां ( प्राशन केली असतां ) जनां ( लोकांला ) मह ( आनंद, उत्सव ) दे ( देत असे ) [ ती ] काय झाली ? ती आपली प्रतिज्ञा व्यर्थ झाली काय ? मी पांडवांस जिंकीन किंवा ते मला जिंकितील, अशी भीष्माची प्रतिज्ञा होती. ( का० सं० महाभा० भीष्मपर्व, पृ० ६५ ). २ पांडवांस मी जिंकीन किंवा ते मला जिंकितील अशी ( भार० भीष्म—प० अ० ८१ ). ३ सेनापति. ४ सेनेस. ५ ( ज्वलत्+अनल ) पेटलेल्या अग्नीचें. ६ दुसरें मूल. ७ नीतीस अनुसरून असणारें. ८ तरुण—अर्जुन. ९ म्हातारा जो मी ह्यानें. १० वेगवान. ११ वडील व धाकट्या भावांसह. १२ म्हातारा. १३ रणांत आलेल्या. १४ गंगा सुतानें ( भीष्मानें ). १५ मारी. १६ इंद्राला. १७ वज्र. १८ अर्जुन. १९ इंद्र. अर्जुनानें अग्नीस खांडव-वन जाळावयास दिलें, तेव्हां इंद्राचें व अर्जुनाचें युद्ध झालें अशी कथा आहे.

पडतांचि गांठ झाले समर-चमत्कार फार न वद्वती ॥
लिहितां सरस्वतीच्या सरतिल शत-कलश-सदृश नव दवती ॥ २९ ॥
वाटे तुमचा उरविल कृष्णांचे जीव न स्थविर[१] तात ॥
दिसले शरांत ते न-ग[२] कल्पांबुधि-जीवन-स्थ[३] विरतात ॥ ३० ॥
शांतनव सिंह गमला, पळतां नर-रथहि[४] तो पळ ससाच ॥
स-सख[५] प्रभुहि वसंतीं बहु फुलला होय हो पळस साच[५] ॥ ३१ ॥
जों जों हाणी खर शर तो रिपु-यवस-दव[६] तारकोपाया[७] ॥
तों तों लागे हळुहळु कमला-धव-सद्वतार[८] कोपाया ॥ ३२ ॥
जो मातृ-स्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घाली[९] ॥
तो भीष्मावरि कोपे, स्व-मधु-हरा-उपरि[१०] जेविं सरघाली[११] ॥ ३३ ॥
चक्र करीं धरुनि रथा-खालीं टाकुनि उडी सजव धावे ॥
वाटे त्या सिंहानें सर्वहि भीष्मादि ते गज वधावे ॥ ३४ ॥
धावुनि यत्नें धरि परि वोढुनि ने त्यासि[१२] देव वोढक-सा ॥
जाणों म्हणे, ‘भुज-बळें पाहूं जरि वोढितोसि वोढ कसा’ ॥ ३५ ॥
कर जोडुनि भीष्म म्हणे, ‘येतां मारावयासि या हो या ॥
हा सत्य-संध केला, मुक्तहि साधूंसि गावया होया’ ॥ ३६ ॥
केला उभा सिताश्वें चरणीं घालुनि मिठी पदीं[१३] दशमीं[१३] ॥
प्रभु तत्त्व असें कळवी कीं, ‘प्रेम-बळेंचि पद-नता वश मी’ ॥ ३७ ॥
पाय धरुनि पार्थ म्हणे, ‘त्यागुनि धन काय जीप्रति ज्ञाते- ॥
बहु जपले तद्गुरुंनीं त्यागावी काय जी प्रतिज्ञा ते ॥ ३८ ॥
या दासाकरवींच क्षिप्र तुम्ही या यशास करवाल ॥
नखहि नको ज्या कार्या त्या काढावा कशास करवाल’ ॥ ३९ ॥
यापरि हित प्रिय पृथा-पुत्रोक्ति अ-मान्य कां करील हरी ॥
सन्मित्रोक्ति करी जें अमृत-रसाची न तें करी लहरी ॥ ४० ॥

---

१ वृद्ध-भीष्म. २ कृष्णार्जुन. ३ कल्प+अंबुधि+जीवन+स्थ—प्रलयकालच्या समुद्राच्या पाण्यांतील. ४ नर=अर्जुन. ५ अर्जुन व कृष्ण ह्यांस भीष्माचे पुष्कळ वाण लागून त्याच्या अंगांतून रक्त वाहूं लागलें असतां ते फुललेल्या पळसासारखे दिसूं लागले. ६ शत्रुरूप तृणास वणवाच. ७ तारणारा उपायच जो (कृष्ण) ह्यास. ८ लक्ष्मीचा पति जो विष्णु त्याचा पूर्ण लक्षणाचा अवतार—विष्णूचा कृष्ण पूर्ण अवतार मानिला आहे. ९ पाडतो. १० आपला मध हरण करणाऱ्यावर. ११ मधमाशांचा थवा. (सरघा+आली). १२ अर्जुनास. १३ दहाव्या पावलीं.

बहु काय वदों राया, तिसऱ्या दिवसाच्िया चरमयामीं ॥
भूमि-तळा मांस-मया देखत होतों नभा शर-मया मी ॥ ४१ ॥
भीष्मासि म्हणे राजा, 'व्हावी ऐसी रणांत मदवस्था ॥
झाला मला सु-दुः-सह हा ऐसा होय ताप न दव-स्था[१] ॥ ४२ ॥
शिरला भीम व्यूहीं जेविं अज-कुळांत लांडगा शिरतो ॥
दैवेंचि रक्षिलें मज, कापित होताचि दांडगा शिर तो ॥ ४३ ॥
या तुमच्या पावाव्या दुर्बल-सेनां-समान वध सेना ॥
हें झाल्या, कां स्वर्गीं जोडुनि एनास[२] मानव धसेना ॥ ४४ ॥
झालीं युद्धें शतशः सर्व-प्रेक्षक-मनोहरें स-रसें ॥
होय रणांगण[३] रक्तोत्पल-वन-चित-पद्मराग-भू-सर-सें[३]' ॥ ४५ ॥
भीष्म ग्रीष्म-तरणि-सा अर्जुन हेमंत-तरणि-सा गमला ॥
देव म्हणे, 'बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचाचि राग मला ॥ ४६ ॥
हो[४] शूर दूर ओसर म्हणणार महा-प्रभाव हा रविला ॥
हार विलासि-जनेंसा येणें कैसा प्रभाव हारविला[४] ॥ ४७ ॥
झाला धीर, परि परि-म्लान सखा जाति-पुष्प-गुच्छक-सा ॥
तुच्छ कसा हा प्र-वया[५] चिरडिल भलता अहींद्र-पुच्छ कसा ॥ ४८ ॥
हा पांडवांसि भस्मचि करिल उपेक्षा करूं नये याची ॥
पदरीं अ-कीर्ति आश्रित-सुहृदनवन-पंथ[६] करून[६] येयाची[७]' ॥ ४९ ॥
आणुनि मनीं असें ज्या धन्य म्हणति सर्व विप्र तो दास- ॥
भीष्म वधाया धांवे हरि, हस्तें कवळुनि प्रतोदास[८] ॥ ५० ॥
देव रथातें सोडुनि धांवे देवापगा-विलापार्थ[९] ॥
कीं त्या सुदुस्तरारि-समुद्रीं[१०] कासेसि लाविला पार्थ ॥ ५१ ॥

---

१ वणव्यांत सांपडलेल्यास. २ पातकास. ३ तांबड्या कमलांच्या समुदायानें युक्त व माणकांची ज्यास जमीन आहे अशा सरोवरासारखे सर्व रणभूमीवर रक्ताचे प्रवाह वाहूं लागले, व त्यांत मनुष्यांचीं मस्तकें (तोडिलेलीं) तरंगत होतीं, हें तात्पर्य. ४ हा शूर (व) महाप्रभाव (अर्जुन) हो दूर, ओसर (असें) रविला म्हणणार, (त्या) येणें (ह्या अर्जुनानें) विलासिजनें हारसा, प्रभाव कैसा हारविला; हा अन्वय. ५ वृद्ध. ६ आश्रित व मित्र ह्यांचें संरक्षण न करण्याचा मार्ग स्वीकारून. ७ यावयाची. ८ चाबुकास. ९ (देव+आपगा+विलाप+अर्थ) गंगेला पुत्राच्या मरणानें विलाप करावयास लावावें म्हणून. १० (दुस्तर+अरि+समुद्रीं)—तरण्यास कठीण अशा शत्रुरूप समुद्रांत.

पार्थी-प्रति प्रयत्नें तो बळ कारुण्य-सिंधु राखाया ॥
क्रोधें गर्जत धांवे सिंह जसा मत्त-सिंधुरा खाया ॥ ९२ ॥
'एह्येहि[1] देव-देव श्रीकृष्ण नमोऽस्तु ते[1]' असें बोले ॥
बोले गल्ल प्राज्य-प्रेमाश्रु-भरें करूनियां डोले ॥ ९३ ॥
भीष्म म्हणे, 'त्वद्धस्तें व्हाया समरांत शांत[2] नवसा जो- ॥
होता करीत, तो हा जेविं हरि-हतेभ[3] शांतनव साजो ॥ ९४ ॥
जरि मारिसील मज गति-लाभ, तुजहि कीर्ति-लाभ गुरु-तर तो ॥
विश्व-गुरो प्राकृतही तारुनि शरणागतासि गुरु तरतो ॥ ९५ ॥
तूं हरि-सा हरि, साची हरिणी सुर-सिंधु,[4] मीहि पाडस-सा ॥
पाड[5], स-साध्वस[6] हो अरि, हरिशीं पावेल काय पाड ससा ॥ ९६ ॥
ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दर-रक्त-चक्षुच्या[7] पातें ॥
तो तूं आंगें मारूं पाहसि मज दावुनि प्रतापातें ॥ ९७ ॥
झालों धन्य त्रि-जगीं, भास पळ प्राकृतांस मारक-सा ॥
त्या प्रभुनें[8] तो केला भस्म स्वातिक्रमेच्छु[9] मार[10] कसा' ॥ ९८ ॥
धांवुनि धरी धनंजय मागुनि त्या माधवासि बाहूंनीं ॥
मग दृढ चरणींच मिठी घाली, पहिलीच रीति पाहूनी ॥ ९९ ॥
दूर उसळला होता कोपावेशें मुकुंद कंदुक-सा ॥
राहे उभा प्रभु गमे इभ-सा[11] धृत-चरण भक्त अंदुक-सा[12] ॥ ६० ॥
पार्थ म्हणे, "श्री-धर्मा-वरि धरितिल जे असि-प्रति ज्ञाती ॥
मरतील, त्यजसी कां 'आयुध न धरिन' असि प्रतिज्ञा ती ॥ ६१ ॥
मारिन भीष्मातें मी इतरांतेंही भवद्दयाधारें[13] ॥
बा त्वत्प्रसाद ज्यावरि केवळ मेर्वग्रही[14] तया धारें" ॥ ६२ ॥
कुरु-कुंजरासि गेला होता यदु-सिंह तो खरा खाया ॥
परते, पर तेथूनि प्राण-प्रिय-मित्र-तोख राखाया ॥ ६३ ॥
कृष्ण स्व-रथीं चढतां समर-चमत्कार मग नवा तातें- ॥
दाखविला, वाहों दे न शर-व्रज-पूर्ण-गगन वातातें ॥ ६४ ॥

---

१ एहि एहि (ये ये) ते नमः अस्तु (तुला नमस्कार असो). २ मृत. ३ (हरि+हत+इभ) सिंहानें मारिलेला हत्ती. ४ गंगा. ५ मार. ६ सभय. ७ किंचित् डोळे लाल करून पाहिलें असतां. ८ महादेवानें. ९ आपली अमर्यादा करण्यास इच्छिणारा. १० काम. ११ हत्तीसारखा. १२ सांखळदंडासारखा. १३ (भवत्+दया+आधारें). तुझ्या कृपेच्या आश्रयानें. १४ (मेरु+अग्र) मेरु पर्वताचें शिखरही.

भीष्म-शर-व्रज हावचि पांडव-भट-निकर तो गमे वास ॥
क्षण सोसवे न कोणासहि जैसा वायु-वेग मेवास ॥ ६५ ॥
जेविं महा-वात करी अभ्रांचा न लवितां पळ विसंकट ॥
त्वत्तात-शर-व्रात[1] ध्वंसुनि सर्वांसही पळवि सकट ॥ ६६ ॥
बहु वधिले, उरले जे ते केले बाहु-ज-प[2] पराभूत ॥
पाहों शकले न जसे श्री-नरहरि-मंत्र-जप-परा भूत ॥ ६७ ॥
तों मावळला दिन-कर, होय बहु प्राप्त साध्वस, मग तिहीं- ॥
केला अवहार[3] परि-श्रांतांहीं लंघिताध्व-सम-गतिंहीं[4] ॥ ६८ ॥

---

## द्रोण-पर्वांतील युद्ध-प्रकरणीं

(म० भा० अ० १६–८४. मोरोपंत अ० १–१०).

भीष्म शरपंजरीं पडल्यावर दुर्योधनानें द्रोणाचार्यास सेनापति केलें. त्यानें धृष्टद्युम्न आपल्यास मारण्याकरितांच उत्पन्न केला आहे असें जाणून त्याला मात्र आपण मारणार नाहीं, असें दुर्योधनाजवळ कबूल केलें होतें. द्रोणाचार्याचें व पांडवांचें युद्ध चाललें असतां 'चक्रव्यूह' नांवाचा व्यूह द्रोणानें रचिला. त्या व्यूहाचा भेद करण्याकरितां अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु हा झटत होता. त्यानें पुष्कळ पराक्रम केला; परंतु शेवटीं दुःशासनाच्या मुलानें त्याच्या मस्तकावर तो सावध नसता गदा घालून त्यास मारून टाकिलें. पुढें धृष्टद्युम्नानेंही द्रोणास अन्यायानेंच मारिलें. इत्यादि कथा या आख्यानांत आहे.

भीष्म पडतांचि गेले सर्वांचेही पळांत आवांके ॥
नसतां धुरंधर वृषभ बाळ-वृष भेरें करूनि आ वांके ॥ १ ॥
रवि-रुचिचें तीमागें संपादे स्वल्प काज वातीस ॥
विसरविल काय? तेज प्रकट करुनि अल्प काजवा तीस[5] ॥ २ ॥
कुरु-राज म्हणे, 'गुरुजी सेना-पति शत्रु-बळ-विरामा[6] व्हा ॥
तुमची आव्हा पळवू अ-हित-मदा जेविं पळवि रामाव्हा' ॥ ३ ॥

---

१ हे धृतराष्ट्रा तुझा जो तात (बापासारखा) त्याच्या बाणांचा समुदाय. (भीष्म हा धृतराष्ट्राचा चुलता होता.) २ क्षत्रियश्रेष्ठ. ३ पसरलेल्या सैन्याचें एकीकरण. ४ लांबून चालून आलेल्या मनुष्याप्रमाणें ज्यांची (मंद) गति आहे अशा. ५ सूर्याच्या कांतीला. ६ शत्रूच्या सैन्याच्या नाशाकरितां अथवा (नाश करणाऱ्या) हें संबोधन समजावें.

द्रोण म्हणे, 'सेना-पति होतों, म्हणतोस जरि, परि स्पष्ट- ॥
धृष्टद्युम्नासि[१] न मी वधिन, करीन त्वदर्थ बहु कष्ट ॥ ४ ॥
मी समर पांडवांसीं करिन, हरिन अरि-नराधि-पति-कटकें[२] ॥
भट केविं टिकेल इतर, गरुड निरखिजेल काय गा चटकें[३] ॥ ५ ॥
गुरु-रथ-वेग अ-सह्यचि झाला त्या विष्णु-पत्र-रथ-वेगा[४] ॥
केला पांच दिवस बहु युद्ध-चमत्कार तो न कथवे गा ॥ ६ ॥
धृष्टद्युम्नें वधिला अन्यायें, सकळ सैन्य हळहळतें ॥
गुरु-मरण तसें देतें जैसें दे मोह दैन्य हळहळ[५] तें ॥ ७ ॥
धृतराष्ट्र विलाप करी, बहु आपण आपणासि निंदुनि घे ॥
स्मृति हरपे, करपेचि[६] न तन्नयनांतूनि अश्रु-बिंदु निघे ॥ ८ ॥
बहु जन बुडवुनि शोकीं दुष्टा दुर्योधना, बुडालास ॥
मकरालय[७] लंघाया मत्ता मशका, कसा उडालास ॥ ९ ॥
गज गोष्पदीं[८] बुडाला, हा दैवा सिंधु शोषिला मशकें ॥
न शकें सोसाया हें, वधिला तो केसरी कसा शशकें ॥ १० ॥
मी[९] माझें[९] हें घातक, लागो या आजि आग मोहाला ॥
न मनांत अहं-ममताभ्यधिका[१०] लोकास या गमो हाला[११] ॥ ११ ॥
सांग रण-कथा, काढिल नसतां मनिं मोह काय बाप रडें ॥
वांकेल ताजव्याचें भारावांचोनि काय बा, परडें ॥ १२ ॥
संजय म्हणे, 'नृपा मन[१२] लावूनि अ-नश्वरीं[१२] सुखीं[१२] न रडें ॥
हो सावध काळानें जो नाहीं घातलें मुखीं नरडें ॥ १३ ॥
पुत्रास-राज्य-मोहें होय जरि तुज व्यथा परि सराया- ॥
मोह श्रोत्यांचा मी कथिन गुरु-वरें[१३] कथा, परिस राया ॥ १४ ॥
आम्हां अर्जुन-पालित-धर्म-नृप-बलाकडे पहावेना ॥
त्या पांडवाहि कुरु-गुरु-रक्षित-कटक-प्रभा सहावेना ॥ १५ ॥

---

१ धृष्टद्युम्न हा आपल्या वधार्थ उत्पन्न झाला आहे, असें द्रोणास माहीत होतें (भारत द्रो० प० अ० ७). २ शत्रुकडील राजांचीं सैन्यें. ३ चिमणीनें. ४ विष्णूच्या पक्ष्याच्या (गरुडाच्या) वेगास. ५ विष. ६ ह्याचा कर्ता अश्रुबिंदु. ७ (मकर+आलय) समुद्र. ८ गाईच्या उमटलेल्या पावलाच्या पाण्यांत. ९ अहंता व ममता. १० (अहं+मम+ता+अभि+अधिका) अहंता व ममता ह्यांपेक्षां अधिक (मोहक). ११ मद्य. १२ अक्षय सुखाकडे मन लावून म्हणजे मोक्षसुख प्राप्त करून देणाऱ्या मार्गाकडे मन वळवून. १३ व्यासाच्या प्रसादानें.

भट गांठिती भटांतें अहि अहितें जेविं पतग पतगातें ॥
कीं हरि हरितें अत्यद्भुत होय द्वंद्व-युद्ध-शत गा तें ॥ १६ ॥
करिते झाले युद्ध क्रुद्ध शरभ-सिंह-देव-दानवसे ॥
मानवसे गमले न, स्नेह-कणहि तन्मनीं तदा न वसे ॥ १७ ॥
रविला झांकी गगनीं कुरु-गुरु बहु-शर-भरीं तिमिर[1] विखरी[1] ॥
लीलेनें नर-केसरि[2] लक्ष चिरी, शरभ-रीति मिरवि खरी ॥ १८ ॥
धर्माला गांठाया धांवे तो विप्र[3] कटक विसकटुन ॥
वाटे तदेक-विशिखाहुनि सिंधु-ज-गरल-घट[4] कविस कटु न ॥ १९ ॥
रक्त-नदी वाहविली राया, त्या शत्रु-सिंह-शरभानें[5] ॥
केवळ कुरु-कटकांचीं[6] हरिलीं,[6] विखरुनि अनंत-शर भानें[6] ॥ २० ॥
पार्थाचा प्रलय-घनाधिक दारुण देवदत्त दर[7] वाजे ॥
दरवाजेसे डोळे झांकिति, आइकति भीति-द रवा जे ॥ २१ ॥
शर्मा रथ धर्मा धनु बाहू भ्राते सु-पूर्व[8] पांच विति ॥
ज्यां[9] त्यांशि पूतनाशी[10] विजय विशिख-वृष्टि पळ न वांचवि ती ॥२२॥
वेष्टा[11] धनंजयाला आत्म-यशें सत्यपांड[12] वेष्टाया ॥
चेष्टा करूं न द्याव्या गोपाळा सत्य पांडवेष्टा[13] या ॥ २३ ॥
संशप्तकां[14] नर, जसा नर-हरि मारी वि-शृंखळ खळातें ॥
होय असृक्स्रोत:-शत, वाहे समराजिरीं[15] खळखळा तें ॥ २४ ॥
अरिकदन जसें अर्जुन, कुरु-गुरुहि तसेंचि-वीर कदन करी ॥
मिरवी तयापुढें भट जेविं हरिपुढें बलीहि मद न करी[16] ॥ २५ ॥
कौंतेय[17] गांठिला[17] रण-रंगीं नटउनि महा-भट-कबंध[18] ॥
जैसा जल-द समीरें तैसा विसकटुनियां कटकबंध[19] ॥ २६ ॥

---

१ अंधार पाडी. २ मोठे वीर–हें चिरी ह्याचें कर्म. ३ ब्राह्मण (द्रोण). ४ समुद्रांतून निघालेला विषाचा कलश. ५ ( शत्रुरूप सिंहाला शरभाप्रमाणें असणाऱ्यानें ) अर्जुनानें. ६ अन्वय–( व त्यानें ) अनंतशर विखरुनि कुरुकटकाचीं केवळ भानें हरिलीं. ७ शंख. ८ 'सु' आहे आद्यक्षर ज्यांचें असे म्हणजे सुशर्मा, सुरथ, सुधर्मा, सुधनु व सुबाहु. ९ ज्या बाणांस. १० पूतनाराक्षसीप्रमाणें. ११ हें संशप्तकांचें भाषण आहे. १२ ( सत्य+प+अंड ) ब्रह्मांड. १३ ( पांडव+इष्ट ) पांडवांस इष्ट असणाऱ्या. १४ त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा व त्याचे अनुयायी ह्या सर्वांनीं युद्धांत अर्जुनास मारूं, किंवा आपण मरूं, अशी प्रतिज्ञा केली होती, म्हणून त्यांस येथें संशप्तक ही संज्ञा दिली आहे. १५ रणांगणांत. १६ हत्ती. १७ कुंतीचा मुलगा – धर्म. गांठिला ह्याचा कर्ता द्रोणानें (अध्याहृत). १८ महावीरांचीं धडें. १९ व्यूहरचना.

धीर धरुनि धर्म-ज्ञें धीरें धर्मे धनुष्य चढवीलें ॥
दाखविलें तें गुरुला जें होतें आपणासि पढवीलें ॥ २७ ॥
भीमावरि न गणुनि शर-वृष्टीची झड करी करी[1] लगट ॥
वाटे जनासि काळचि तो, त्याला झडकरी करील गट ॥ २८ ॥
कुरु-कटका तप्त करी पार्थ, ग्रीष्मीं जसा पतंग जगा ॥
तों प्रेरिला तयावरि भगदत्तें[2] काळसा मतंगज गा ॥ २९ ॥
देव गजासि[3] म्हणे, 'रे गर्व अयः-स्तंभ-सम-रदा[4] न[5] वहा[5] ॥
हा[6] मत्सख नर सिंहचि, वज्र-धरासह्य-समर[7] दानव-हा[8]' ॥ ३० ॥
होय पुढेंचि न मागें पार्थ-शराहतहि[9] शत-मख-सख[10] सरे ॥
मुनि म्हणति, 'अर्जुनीं तव शक्ति जसी सागरांत खसखस रे' ॥ ३१ ॥
प्रकट करूं दे समरीं श्री-देवी जेविं सैरिभास[11] कला[12] ॥
तेविं विजय-चाप-लता,[13] मग दवडी दूर वैरि-भा[14] सकला ॥ ३२ ॥
विजय-विशिखार्त[15] होतां, पूर्वीं दुष्करहि आयकोन करी[16] ॥
भगदत्ताचें[16] कथिलें, अ-धनाचें जेविं बायको न करी[16] ॥ ३३ ॥
तिसरे दिवशीं चक्र-व्यूह सु-दुर्भेद्य युक्तिनें रचिला ॥
जो धीर-वीर-हीर-प्रवर-प्रकरें करोनियां खचिला ॥ ३४ ॥
व्यूहातें भेदाया धर्म झटे करुनि यत्न सानुजनीं[17] ॥
परि लोपवि प्रतापा गुरु तपना जेविं रत्न-सानु[18] जनीं ॥ ३५ ॥
सौभद्र[19] म्हणे, 'शिरतों व्यूहीं, डोहीं जसा मतंगज, वा ॥
हरि-पोत दंति-यूथीं, कीं दहनीं करुनियां पतंग जवा ॥ ३६ ॥
भीमादि स-बळ सर्वहि ते उठले व्यूह-कोट फोडाया ॥
इकडुनि कौरव-कटकहि होय पुढें शत्रु-सैन्य मोडाया ॥ ३७ ॥

---

१ भगदत्तानें भीमाच्या अंगावर घातलेला सुप्रतीक नांवाचा हत्ती. २ कौरवांकडील एक योद्धा (राजा). ३ (भगदत्ताच्या) हत्तीला. ४ लोखंडाच्या खांबासारखे आहेत दांत ज्याचे अशा. ५ वाहूं नको (ह्याचें कर्म गर्व). ६ हा अर्जुन. ७ इंद्राला (ही) असह्य आहे युद्ध ज्याचें असा म्हणजे इंद्रापेक्षां बलिष्ठ. ८ दानवांस मारणारा. ९ अर्जुनाच्या बाणांनीं विद्ध. १० इंद्राचा सखा (भगदत्त). ११ महिषासुरास. १२ युद्ध-चातुर्य. १३ अर्जुनाचें धनुष्य. १४ शत्रूंचें तेज. १५ अर्जुनाच्या बाणांनीं पीडित. १६ भगदत्ताचा हत्ती भगदत्तानें सांगितलेली दुर्घटही गोष्ट पूर्वी ऐकत होता; परंतु दरिद्र्याची बायको जशी त्याची आज्ञा मानीत नाहीं, तसा जखमी झाल्यावर तो त्यानें सांगितलेलें ऐकेनासा झाला. १७ आपल्या धाकट्या भावांसह. १८ मेरुपर्वत. १९ सुभद्रेचा मुलगा—अभिमन्यु.

रथ थडकले, भडकले हय, शस्त्र-ज वन्ही धडकले वरते ॥
अन्योन्य व्यंगुलही[१] राहों देती न धड कलेवर ते ॥ ३८ ॥
पावत असतां दोन्ही करुनि सु-तुमुलाहवास[२] वध सेना ॥
व्यूहीं शिरे गुरुपुढें ; चित्तेंहि जयांत वासव धसेना ॥ ३९ ॥
प्रभुचा[३], मर्मीं हाणी सर्वांसहि तीन तीन शर, भाचा[३] ॥
वाटे बहु सिंहांशीं समर करी कुपित पोत शरभाचा ॥ ४० ॥
अंध म्हणे, 'रे संजय हें त्या पौत्रास वर्ष सोळावें ॥
लोळावें मांडीवरि तेणें द्रोणादिकांसि घोळावें ॥ ४१ ॥
न पवे सु-नीतिचें[४] परमार्थाची वाट लेंकरूं[४] काय ! ॥
सत्यचि कथिशी परि हें मज लटिकें वाटलें करूं काय' ॥ ४२ ॥
संजय म्हणे, 'म्हण अ-नृत भीष्माचा एकला पणतु मुलगा ॥
करिता झाला गुह-सा बहुतांनीं वेढिला पण तुमुल गा ॥ ४३ ॥
कुरु-सैन्यांत गमे ज्यापरि रंभा-काननांत[५] वारा हो ॥
त्या[६] विजय-श्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो[६] ॥ ४४ ॥
अ-क्षत-धनु तोंवरि हें वीरशिरो-रत्न नावरायाचें ॥
यास्तव सर्वहि रक्षूं आजि करुनि यत्न नांव रायाचें' ॥ ४५ ॥
कर्ण करी चर्मांचे श्रित-विघ्नाचे जसे गण-प[७] टुकडे ॥
तरि पाहोंहि न शकले वीर वि-शस्त्राहि त्या रण-पटु-कडे ॥ ४६ ॥
त्या सौभद्रावरि बळ-सागर गरगर गदेसि फिरवीत ॥
दुःशासन-सुत धांवे, निज-भुज-भुज-ग-प्रताप[८] मिरवीत[८] ॥ ४७ ॥
युद्ध-चमत्कार रुचिर, सुचिर प्रकटुनि[९] महा-गद[१०] भ्राते[११] ॥
अन्योन्य-कृताघातें बा, मूर्च्छा पावले अ-दभ्रा[१२] ते ॥ ४८ ॥
आधीं उठोनि, उठतां सौभद्र शिरीं प्रभो[१३] गदा घाली ॥
वि-वश[१४] करी ती दुष्परि-हार्या जेविं प्र-भोग-दावाली[१५] ॥ ४९ ॥

---

१ दोन बोटेंही. २ अत्यंत दारुण युद्धाला. ३ श्रीकृष्णाचा भाचा अभिमन्यु. ४ सुनीति नांवाच्या स्त्रीचा मुलगा ध्रुव. ५ केळींच्या वनांत. ६ त्या नातवा (अभिमन्यूला) विजयश्री परिरंभा (आलिंगनाला) देउनि कां न राहो ? म्हणजे त्यास जय कां नाहीं मिळणार ? ७ गणपति. ८ आपल्या बाहूंची सर्पाप्रमाणे चपलता दाखवीत. ९ हा शब्द येथें 'प्रकटवून' ह्याबद्दल घातला आहे. १० गदायुद्धांत प्रवीण. ११ दुःशासनाचा पुत्र व अभिमन्यु. १२ पुष्कळ वेळ असणारी–मोठी. १३ हे धृतराष्ट्रा. १४ मूर्छित. १५ (प्र+भोग+द+अघ+आली) अतिशय दुःख देणारी पातकपंक्ति.

पडली जशी कराया प्रेक्षक-सुर-वि-रस मस्तकोपरि ती ॥
भूवरि सौभद्र-तनुहि ओकुनि स-रुधिर समस्त कोप रिती ॥ ५० ॥

धर्म म्हणे, 'हा हा म्यां मंदें दाटुनि कुमार मारविला ॥
बहु-वीर-सूंत दिसल्या अधिक समुद्रा उमा रमा रविला[१] ॥ ५१ ॥

तुज उत्तरे, मुलि, दिला म्यां कापायास मान विश्वास ॥
कलि-काल[२] काय बुडविल मज बहु-पापा-समान विश्वास[२]' ॥ ५२ ॥

संशप्तक मथुनि विजय सांजे शिबिरासि यावया परते ॥
प्रभुसि म्हणे, 'कां कांपे मन कांपविलें जरि स्वयें पर ते ॥ ५३ ॥

कंठ गहिंवरें भरला, शिरली हृदयांत केशवा धडकी ॥
येतें रडें वृथा कां बा माझी प्रकृति काय गा, रडकी ॥ ५४ ॥

अ-तुल प्र-ताप लोकीं ज्या खल-बल-जलधि-वाडवाभाचा[३] ॥
तो कृष्णा आज तुझा मज आला कां न आडवा भाचा' ॥ ५५ ॥

शिबिरीं शिरोनि विजयें धर्मादिक देखिले अधो-वदन ॥
तें पुत्र-रत्न एकचि न निरखिलें सद्गुणर्द्धिचें[४] सदन ॥ ५६ ॥

मृदुल-प्रकृति[५] न साहे सुत-शोका जेविं न रविला पाला ॥
शिबिरीं करी परोपरि नारायण-मित्र नर विलापाला ॥ ५७ ॥

'ज्याची शस्त्रीं शास्त्रीं व्यवहारीं वासुदेववत् समज[६] ॥
काय तुम्हीं केला हो आणुनि तो भेटवाचि वत्स मज ॥ ५८ ॥

बहुधा तुम्हीं धरुनि गुरु-कृत-चक्र-व्यूह-भेद-कामातें[७] ॥
केलाचि पुढें, नाहीं तरि करिता स्पर्श खेद कां मातें ॥ ५९ ॥

तुमच्या भुज-शस्त्रांतें धिक् हा निःसार[८] हो खटाटोप ॥
शिर ज्या न रक्षवे तो कार्याचा काय ओखटा टोप ॥ ६० ॥

---

१ सूर्य हा जगच्चक्षु आहे, म्हणून त्यास दिसल्या, म्हणजे सर्व जगास दिसल्या हें तात्पर्य. २ अन्वय–कलिकाल (कलियुग) (अधर्मप्रवृत्तीनें जगताचा मोठा नाश करणारा आहे, तरी तो) मज बहुपापासमान (मी जो परम पापी हा जितका बुडवील तितका) विश्वास (जगतास) बुडवील काय? ३ शत्रुसैन्यरूप समुद्राला वडवाग्नीसारखें तेज आहे ज्याचें अशाचा. ४ उत्तम गुणांच्या समृद्धीचें म्हणजे पुष्कळ उत्तम गुणांचें. ५ कोंवळ्या मनाचा. ६ ज्ञान. ७ द्रोणानें रचलेला चक्रव्यूह फोडण्याच्या इच्छेला. ८ व्यर्थ.

कुंतीस काय सांगूं कृष्णेला दाखवूं कसें वदन ॥
दुष्कर मला सुभद्रा-सांत्वन, दुर्दर्श उत्तरा-सदन ॥ ६१ ॥

कां माझें उर न उले, कवि पवि कीं म्हणति तोक-शोकाला ॥
लोका लाजे मन, कीं जावें यश हारवूनि ओकाला[1] ॥ ६२ ॥

हा वत्सा रक्ताक्षा, झाले त्वत्सु-गुण आजि घातक-से ॥
बा वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे ॥ ६३ ॥

मारिन जयद्रथ, करिन यश भुवनीं, विशिख-जाल वितत रणीं ॥
हें न घडतां जळेन ज्वलनीं, होतांचि अस्तमित[2] तरणी ' ॥ ६४ ॥

कृष्णोत्तरा-सुभद्रा-धेनूंच्या मथुनि मोह-यवनातें ॥
भवनातें येउनि, तो प्रभु विजयाच्या करी[3] समवनातें[3] ॥ ६५ ॥

शयनीं निजोनि पाहे परमेश्वर, परि न पळहि निज लागे ॥
चित्तीं चिंतेशि म्हणे, ' त्वां वरिला[4] कोण जडहि निजला[4] गे ' ॥ ६६ ॥

धर्म म्हणे, ' जें झालें तें कथितों सर्व ऐक बा ज्ञात्या ॥
म्यां व्यूहीं द्वार करीं ऐशी केली स्वयेंचि आज्ञा त्या ॥ ६७ ॥

द्वार करी, शिरतां भी न व्यूहा जेविं सागरा मकर ॥
नुरवी कुमार पर-मद लवहि जसा धरूनि राग राम-कर ॥ ६८ ॥

होय जयद्रथ आम्हां हेतु कुमारास अंतरायास ॥
त्यास न निवारवे बा जेवीं प्रबलास अंतरायास ॥ ६९ ॥

आम्हां त्या क्षुद्र-वरें रुद्र-वरें[5] करुनि वारिलें वाटे ॥
प्रभुनें सौभद्रासि न पांचांसहि आजि मारिलें वाटे ॥ ७० ॥

देव निशीथीं शयनीं बैसे मग दारुकासि आणवुनी ॥
त्यासी वदे प्रतिज्ञा पार्थाची प्रथम सर्व जाणवुनी ॥ ७१ ॥

' भक्तीं जसा मदात्मा देहींहि तसा न दारुका रमला ॥
या विजय-वेद-वचना[6] द्यावा लागे सदा रुकार मला ॥ ७२ ॥

---

१ गृहाला. २ अस्त पावलेला. ३ ( सम्+अवन )—उत्तम रक्षण. ४ अर्जुनाची प्रतिज्ञा शेवटास जाऊन त्याचें रक्षण कसें होतें ह्याचा विचार करूं लागला, हें तात्पर्य. ५ ह्या पुस्तकांतील जयद्रथकृत द्रौपदीहरण पृष्ठ ३७८/७९ आर्या ६६/७० पहा. ६ वेदवाक्य जसें उल्लंघितां येत नाहीं तसें अर्जुन जें म्हणतो तें मला मोडतां येत नाहीं, हा आशय.

निज-रक्षणाधिक ध्वज-रक्षण राजासि दारुका, पडतें ॥
मोलें राज-शिराहुनि बहु असतें काय दारु[1] कापड[1] तें ' ॥ ७३ ॥
देव म्हणे, ' अर्जुनजी व्हा सिद्ध रथ-स्थ तपन-कोपार्थ[2] ॥
तें कां न म्हणेल मनीं ब्रह्मपदाद्यर्थ[3] तप नको, पार्थ ॥ ७४ ॥
करुनि प्रदक्षिणा द्विज-वृंदासि रथासि तो कवि नयानें- ॥
मग बेंघोनि अधिष्ठी,[4] जनकांकीं जेविं तोक विनयानें ॥ ७५ ॥
झाला निज-दासाचा ज्या स्तविति सु-धीर विप्र तो दास ॥
श्री-नलिनीचा[5] चक्र त्यजुनि धरि सुधी रवि[5] प्रतोदास ॥ ७६ ॥
पांसु-निकरहि प्रभुच्या हेतु बहु-प्रीतिचा बुकासा च ॥
वाटे न कौस्तुभाला जपला जगदीश चाबुका साच ॥ ७७ ॥
कृष्ण रथीं चढले, मग तोहि चढे पुत्र[6] सत्यकाचा[6] हो ॥
जेविं हर-रथीं विधि-हरि दुसरा दृष्टांत सत्य काचा हो ॥ ७८ ॥
द्रोणें रचिला सैंधव[7]-रक्षार्थ व्यूह-नायक व्यूह ॥
परमार्थ-रक्षण-क्षम[8] अ-परा-जित[9] जेविं काय कव्यूह[10] ॥ ७९ ॥
सेनाग्रीं वाजविती नर-नारायण सखे दर-वरा[11] जे ॥
ते मोर-से, भुजग-से ऐकति होउनि स-खेद रव राजे ॥ ८० ॥
रोमांच-कंचुकाला[12] कडकडतां कृष्ण-कंबु[13] कपि[14] ल्याला॥
पर सोडी भानाला सिंह-रवें जेविं जंबुक पिल्याला ॥ ८१ ॥
हांसोनि द्रोण म्हणे, ' पार्था मजला न जिंकितां आजी ॥
जिंकावया जयद्रथ शक्य नव्हे मज-सवें करीं आजी[15] ' ॥ ८२ ॥
ऐसें वदोनि मार्गण-वृष्टि तयावरि महा-तपा सोडी ॥
जैसी आटोपाया मत्त-गज-शिरीं महात पासोडी ॥ ८३ ॥
मारुति सात्यकि धृष्टद्युम्न तसे कुरु-बळासि तुडवीती ॥
कु-नृपति-राष्ट्रांसि जसे दुष्काळ व्याधि चोर बुडवीती ॥ ८४ ॥

---

१ ध्वजाचें लाकूड व वस्त्र. २ सूर्यास राग आणावा म्हणून; म्हणजे तूं सूर्यापेक्षां तेजस्वी दिसलास म्हणजे त्यास राग येईल. ३ (ब्रह्म+पद+आदि+अर्थ) सत्यलोकादिकांच्या प्राप्त्यर्थ. ४ बसे. ५ श्री (लक्ष्मी) हीच कमलिनी, तिला रविच (कृष्ण). ६ सात्यकि. ७ सिंधु देशाचा राजा (जयद्रथ). ८ सुरस अर्थ अथवा मोक्ष ह्यास राखण्याविषयीं समर्थ. ९ अबाध–सर्वांस मान्य. १० (कवि+ऊह) कवीची कल्पना. ११ शंखश्रेष्ठ. १२ बंडी, चिलखत. १३ कृष्णाचा शंख. १४ मारुति. १५ युद्ध.

द्रोण न थारे[१] क्षण पर-कटकांत जसा न रुद्र थारावा ॥
तच्चाप-रवा पांडव भीति जसे अहि गरुद्रथारावा[२] ॥ ८५ ॥
इषुंनीं झांकुनि घेती ते करुनि छत्र-केतु विध्वस्त ॥
तो अ-प्रकाश[३] त्यांचा आप्त-कुमुद-खेद-हेतु विध्वस्त[३] ॥ ८६ ॥
अरि एक क्रोश पुढें लक्षुनि[४] ज्या ज्या शरा विजय सोडी- ॥
क्रोश पुढें गेल्यावरि मागें तो तो तदीय शिर तोडी ॥ ८७ ॥
श्वश्रू-कर जेविं शिरे गेहिं जरी न म्हणती सुना सीर ॥
व्यूहीं तेविं कुरु-चमु धिक्कारुनि तो धरा-सुनासीर[५] ॥ ८८ ॥
श्रमला जयद्रथाच्या जायासि न शक्त हा निकट कांहीं ॥
हें योजुनि वेढियला पार्थ करायासि हानि कटकांहीं ॥ ८९ ॥
त्या समयीं पार्थ म्हणे, ‘ देवा संश्रित-शुभाकरा[६] वाजी- ॥
श्रमले कीं श्रम-शमना घडिभरि तरि रथ उभा करावा जी ’ ॥ ९० ॥
उतरे रथावरुनि नर पळवी कुरु-कटक कृत-पराभव तें ॥
कारि निर्मनुष्य मंडल तो एक क्रोश आपणा-भवतें ॥ ९१ ॥
स्वस्थ-स्वांतें क्रीडे कुरु-बळ-पंक-ज-वनांत पार्थ-करी ॥
मंत्र-बळें सु-सरोवर निर्मुनि शर-गृह अनातपार्थ[७] करी ॥ ९२ ॥
शर जेविं किरण भवतें जें कौरव-कटक तोचि परि-वेष ॥
रविच कवि-मतें अर्जुन तेजें रूपेंहि, भिन्न परि वेष ॥ ९३ ॥
निः-शंक कुरु-बळीं नर जेविं हरि-शतावृतींहि शरभ वनीं ॥
पवीं शिवालयींसा शिरला देवर्षि शीघ्र शर-भवनीं[८] ॥ ९४ ॥
प्रभुनें मुक्त करुनि हय चुचकारुनिया हळूच कौशल्यें ॥
निज-बोधें[९] श्रित-हृद्गत-दुःखेंशीं सकळ काढिलीं शल्यें ॥ ९५ ॥

---

१ स्थिर झाला नाहीं म्हणजे शत्रुसैन्यास अत्यंत दुःसह झाला ; हें तात्पर्य. २ ( गरुद्रथ+आरावा ) गरुडाच्या शब्दास. ३ बाणांनीं झांकल्यामुळें त्यांचें अदर्शन, हें आप्तरूप कुमुदांच्या खेदास कारणीभूत. ( विधु+अस्त )-चंद्रास्तच झाला. ४ अर्जुनाच्या रथाचा वेग इतका होता कीं, शत्रु एक कोसभर दूर असतां त्याला मारण्याकरितां अर्जुन जो बाण सोडी तो त्या शत्रूचें शिर तोडीत आहे तोंच तो रथ त्या शत्रूच्यापुढें एक कोसभर जाई. ५ पृथ्वीवरील इंद्रच ( अर्जुन ). ६ ( संश्रित+शुभ+आकरा ) आश्रितांच्या कल्याणाची खाणच-अशा देवा. ७ ( अन्+आतप+अर्थ ) ऊन न लागावें म्हणून. ८ बाणांच्या गृहांत. ९ परमात्मस्वरूपज्ञानानें.

अश्व पर-शरांहीं भव-तापांहीं जेविं दास पोळविले ॥
ते देवें भक्ति-रसें जाणों स्व-चरण-रजांत लोळविले ॥ ९६ ॥

देवर्षि मुखीं घालुनि बोट म्हणे, 'हा सुयोधना कुटिला ॥
भक्ति-बळेंचि पहा हा परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला ॥ ९७ ॥

ज्याचें पद-नख दासां जें सुख दे तापल्या न तें विधु तो- ॥
भगवान् स्वयें अहा, या विजय-हयां सत्पदांस[१] तेविं धुतो[१] ॥ ९८ ॥

ज्याच्या श्री-पद-दास्यें पावे तोखा सदा रमा ज्याया ॥
हरितो[२] मना नराचा होउनि[२] तो खासदार माज्या या[२] ॥ ९९ ॥

पुरुषार्थ-द ते केले दास-हय-हितोदया[३] कर खरारे ॥
झालासि दास-दास प्रभुहि तूं बा दया-कर खरा रे ॥ १०० ॥

प्रेमें माता बाळा न्हाणी, कीं भक्त शंभुच्या लिंगा ॥
तैसाचि नर-हयां हरि, कवि हो, याचेचि पाय आलिंगा ॥ १०१ ॥

औषध सु-चणक कल्पी पीत-पट[४] पसाहि तोबरा माप[४] ॥
श्रित-साहित्य कराया न बरा मंदार[५] तो बरा मा-प[६] ॥ १०२ ॥

हरि हरित तृणीं चारी तो प्रभु ज्याचा प्रताप दुर्वार ॥
'हरि[७] हरि[७]' तईं करिति पद देउनि गणपति-शिरींहि दुर्वा र[८] ॥ १०३ ॥

तोक-तृषा-शमना कीं क्षालाया तात तोक-मल पाणी— ॥
प्यायाचेंही वेंची, करि न पिउनि तेंवि तो कमल-पाणी[९] ॥ १०४ ॥

उच्चैःश्रवा म्हणावा पार्थाच्या कां न 'नीच' तुरगांनीं ॥
ज्यां पूजी तो, ज्याचें यश नंदन-काननीं[१०] चतुर-गानीं ॥ १०५ ॥

योजुनि तुरग-वर रथीं, आपण कुरु-बळ पहात देव रिघे ॥
मग त्रिजयातें मर्दुनि रडवाया खळ-प[११] हात दे, वरि घे ॥ १०६ ॥

---

१ तो (कृष्ण) साधूंचे पाय धुवावे त्याप्रमाणें. २ नराचा (अर्जुनाचा) खासदार होऊन या माज्या (माझ्या) मना हरितो (हें नारदाचें म्हणणें आहे.) ३ (आपल्या) दासाच्या घोड्यांच्या (हित+उदय) कल्याणासाठीं. ४ पीतपट (पितांबर) हाच तोबरा व पसा हेंच माप. ५ कल्पवृक्ष. ६ लक्ष्मीपति. ७ हे उद्गारबोधक शब्द. ८ र (रुदन.) ९ कृष्ण. १० ज्या कृष्णाचें यश नंदनवनांत चतुरगाणीं (चतुरांच्या गायनांत) आहे तो (कृष्ण) ज्यां पूजी (ज्यांची सेवा करितो) त्या तुरगांनीं इत्यादि. ११ महादुष्ट.

## कर्ण-पर्वांतील कर्णार्जुन-युद्धाच्या आर्या

(म० भा० अ० ३१-९१. मोरोपंत अ० २०-४९.)

द्रोणाचार्य मरण पावल्यावर कर्ण हा कौरवांच्या सैन्याचा सेनापति झाला. नंतर कर्णानें दुर्योधनास सांगितलें, " जर मद्र देशाचा राजा शल्य हा माझें सारथ्य करील तर मी अर्जुनाचा समाचार घेईन. आज युद्धांत तो मला मारील किंवा मी त्याला मारीन. " हें ऐकून दुर्योधन राजा शल्याच्या शिबिरांत गेला व कर्णाचा सारथि होण्याविषयीं त्यानें त्याची प्रार्थना केली. तें ऐकून शल्यास फार राग आला. परंतु दुर्योधनानें फारच विनवणी केल्यामुळें अखेरीस त्यानें, ' मी कर्णाचें सारथ्य करितों,' असें कबूल केलें. परंतु ' मी कर्णास युद्धाच्या प्रसंगीं हवें तें बोलेन त्याचा राग त्यानें मानूं नये, ' अशा त्याच्या अटीलाही कर्ण व दुर्योधन हे दोघे कबूल झाले. शल्यानें रथ तयार करून आणल्यावर त्यांत कर्ण बसून युद्धास गेला. युद्धाचे वेळीं शल्यानें कर्णाची फार निर्भत्सना करून त्याचा उत्साह-भंग केला तरीही त्यानें मोठें शौर्य केलें. सरतेशेवटीं रथाचें चाक पृथ्वींत गेलेलें वर उचलीत असतां अर्जुनानें त्यास मारिलें, अशी कथा या आख्यानांत दिलेली आहे.

कर्ण म्हणे, ' कुरु-नाथा पार्थाशीं संगरांगणामाजी ॥
घालीन गांठि, त्यातें मी कीं मारील तो मला आजी ॥ १ ॥

कार्य-बहुत्वा-साठीं गांठि न पडली तया-सवें मागें ॥
त्वां आम्हां दोघांचीं आजि पहावीं बळें महा-भागें ॥ २ ॥

मी जिष्णुतें न वधितां आजि न मागें फिरेन, हे वाचा- ॥
साची, असा असावा निश्चयचि तुझा मनुष्य-देवाचा ॥ ३ ॥

अश्वांच्या हृदयाचा ज्ञाता कृष्णा-समान कौशल्य ॥
जाणतसे जरि माझें सारथ्य करील आजि हा शल्य ॥ ४ ॥

तरि मी धनंजयाधिक होइन तुज जय घडेल अ-भ्रांत ॥
मग मज पार्थांत[१] सु-कर जैसा क्षुब्धानिळासि अभ्रांत[२] ' ॥ ५ ॥

तेव्हां म्हणे सुयोधन, ' हें आहे सर्व सिद्ध मी आंगें- ॥
चालेन तुझ्या मागें मज भक्ताला अभीष्ट तें सांगें ' ॥ ६ ॥

---

१ (पार्थ+अंत) अर्जुनाचा वध. २ (अभ्र+अंत) मेघांचा नाश-ढग उडवून टाकणें.

ऐसें वदोनि गेला विनयें शल्या-समीप मग राजा ॥
प्रणयेंकरूनि त्यातें प्रार्थी साधावया महा-काजा ॥ ७ ॥
'सत्य-व्रता समर्था, मद्राधीशा[1] महा-रथा साधो ॥
वंदूनि विनवितों बा तुझ्या प्रसादेंचि कार्य हें साधो ॥ ८ ॥
पदर पसरिला तुजला रिपु-गज-पंचानना नृपां-माजी ॥
व्हावें प्रसन्न मजला द्यावा वर एक याचका आजी ॥ ९ ॥
वर-दा, त्वां कर्ण-वचन केलेंचि श्रवण सु-प्रबुद्धा, तें ॥
स-फळ करीं पार्थाशीं व्हावा अंगेंद्र[2] योग्य युद्धातें ॥ १० ॥
बा, वासुदेव-सम तूं जाणसि सारथ्य-कर्म नर-नाथा ॥
तुजसम पटु अन्य नसे म्हणवुनि मी ठेवितों पदीं माथा ॥ ११ ॥
ब्रह्मा[3] महेश्वराचा[3] झाला, कीं जेविं कृष्ण विजयाचा ॥
सारथि तूं कर्णाचा हो वर-दा, हेतु मुख्य विजयाचा ॥ १२ ॥
तो कृष्ण संकटीं त्या पार्थातें रक्षितो यथा राया ॥
तूं कर्णातें रक्षीं, हो सेतु स्व-यश-तोय थाराया ॥ १३ ॥
बल अल्प पांडवांचें, परि त्यांहीं फार मर्दिलें सैन्य ॥
आतां निज-पक्षींचे दोघे योद्धे तुम्ही हरा दैन्य ॥ १४ ॥
अरुण रवीचा सारथि, दहनाचा वायु, यत्न कीं विधिचा ॥
सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्य-बळ-पयो-निधिचा' ॥ १५ ॥
शल्य सुयोधन-वाक्यें कोपे, चोळी करें करा, डोळे- ॥
आरक्त करी, चावे अधरातें, फार तो मनीं पोळे ॥ १६ ॥
मग कुरु-राजासि म्हणे, "राया अव-मानितोसि बाहूनीं ॥
म्हणसी, 'सोडुनि धनु शर, धरीं हय-रश्मि प्रतोद बाहूंनीं' ॥ १७ ॥
करिशी बहु प्रशंसा या नर-वर-मंडळांत कर्णाची ॥
सांगसि सारथ्याची पदवी मजलागिं हीन-वर्णाची ॥ १८ ॥
सिंहासनोचिताला मज सारथ्याधिकार हा नीच ॥
इच्छिसि नृपा कराया मत्तेजाची जनांत हानीच ॥ १९ ॥

---

१ (मद्र+अधीश) मद्रदेशाच्या राजा (शल्य). २ अंगदेशचा स्वामी–कर्ण. ३ शंकरानें जेव्हां त्रिपुरासुर मारिला तेव्हां ब्रह्मदेव त्याचा सारथि झाला होता, अशी कथा आहे.

युद्धीं दुर्बळ मी हें गमलें तुज म्हणवुनीच भूपा हें- ॥
सारथ्य योजिलें, तरि दे दावुनि भाग[1], शक्ति तूं पाहें ॥ २० ॥
सांग मला भाग तया जिंकुनि जाईन आपुल्या देशा ॥
अथवा एकचि मी रिपु-बळ मर्दिन दे मला रणादेशा ॥ २१ ॥
हे दास, सूत, बंदी यांहीं आम्हां नृपांसि वानावें ॥
सारथि होउनि उच्चें जो नीच रथी तदुक्त मानावें ? ॥ २२ ॥
'हो' म्हणसी 'सूताचा सूत' भला गा भला मला पदवी- ॥
देसी, हे सीमा तव सुज्ञ-पणाचीच हें असें वदवी ॥ २३ ॥
जातों गृहासि झालों कृत-कृत्य प्राप्तमोक्ष-सम यज्ञ ॥
प्रेक्षुनि धालों कीं तूं धृतराष्ट्र-सुता गुण-ज्ञ समय-ज्ञ" ॥ २४ ॥
ऐसें वदोनि मग नृप वीर-समाज त्यजूनि करि गमन ॥
आटोपेना त्याचें त्यासहि अपमान-कोप-करि-ग[2] मन ॥ २५ ॥
तेव्हां धांवे कुरु-वर दीर्घ दृढ प्रेम-बाहु-पाशातें ॥
पसरोनि शीघ्र कवळी नमुनि म्हणे, 'न करिं वंध्य आशांतें ॥ २६ ॥
शत्रूंच्या हृदयीं तूं शल्य म्हणुनि शल्य म्हणति तुज राया ॥
कुब्जेसि कृष्ण-सा तूं पटु मज्जय-सिद्धि-लागिं उजराया[3] ॥ २७ ॥
बहु विक्रम कर्णाचा न्यून पराक्रम तुझा असें न मनीं ॥
असतें जरि तरि माझें शिर होतें सिद्ध हें कसें नमनीं ? ॥ २८ ॥
कर्णाहुनि मजहुनि तूं अधिक अधिक यादवाधिपाहूनी ॥
व्हावें प्रभो, वर-प्रद मज आजि पराभवाधि[4] पाहूनी ॥ २९ ॥
हय-हृदय कृष्ण जाणे त्याहुनि तूं द्वि-गुण जाणसी माम्या ॥
भुज-युद्धींहि परिसिली न बळासि, तुझीच आण, सीमा म्यां ॥ ३० ॥
पार्थाधिक कर्ण तसा कृष्णाधिक तूं म्हणूनि सार थिता ॥
स्व-गुण न लोपीं[5] प्रगटीं, वरिली विधिनेंहि शंभु-सारथिता' ॥ ३१ ॥
शल्य म्हणे, "राया मज राज-समूहांत हात जोडोनी- ॥
म्हणसी, कृष्णाधिक हें दुर्लभ यश जात नाहिं सोडोनी ॥ ३२ ॥
झालों प्रसन्न तुज मी वर देतों घे करीन सारथ्य ॥
पथ्य अपथ्य न म्हणतां परि सोसावें मदुक्त हें तथ्य ॥ ३३ ॥

---

१ नेमून दिलेलें काम. २ अपमानामुळें आलेला राग हाच हत्ती त्यावर बसलेलें. ३ चांगल्या दशेला आणण्याला. ४ (पराभव+आधि) पराभवापासून होणारें मनाला दु:ख. ५ हें येथें लोपवी ह्या अर्थीं योजिलें आहे.

सारथि होतों परि मी प्रभु सूतातें[1] म्हणेन कां 'हां जी' ॥
गांजीन तरि सहावें, म्हणिजे वैद्यें दिली सुधा कांजी" ॥ ३४ ॥
कर्ण सुयोधन म्हणती, 'केलें मान्य त्वदुक्त बापा हें ॥
अंगीकृत कार्याच्या निर्वाहीं सु-यश तूंहि बा पाहें' ॥ ३५ ॥
शल्यें सारथ्याचा केला स्वीकार तेधवां यास- ॥
कुरु-पति कथि इतिहास त्रिपुराचा[2] चित्त हृष्टवायास[3] ॥ ३६ ॥
सांगोनि त्रिपुरदहन इतिहास प्रथम मग दुजा राया ॥
कथि 'अकुलज कर्ण' अशा शल्याच्या संशयासि वाराया ॥ ३७ ॥
"सूत-कुळांत न झाला मज वाटे देव-पुत्र हा कर्ण ॥
क्षत्र-कुळींच उपजला, हें याचा स्पष्ट सूचवी वर्ण ॥ ३८ ॥
लोकांत प्रगट न हो कुल कारण एक हेंचि सत्य जिला ॥
झाला तिनें उपजतां बाळपणीं करुनि साहस त्यजिला ॥ ३९ ॥
हा दीर्घ-भुज स-कुंडलकवच उपजतांचि बाळ-भास्कर-सा ॥
प्रसवे न यासि राधा प्रसवेल सुधाकरासि काय रसा[4] ॥ ४० ॥
अजि सिंधु-शुक्ति-गर्भीं मौक्तिक उपजे, नदींतही असती- ॥
पुष्कळ शिंपा तरि तीं त्यांच्या उदरीं न मौक्तिकें वसती ॥ ४१ ॥
राधा धात्रीच गमे कर्णाच्या न जननी शरीरा या ॥
सांगा जी व्याघ्रासि प्रसवेल मृगी कधीं तरी राया ॥ ४२ ॥
हा प्राकृत पुरुष नव्हे, सांगावें काय म्यां तुला कविला ॥
कर्णाच्या तेजें बहु वीरां-करवीं स्व-गर्व टाकविला ॥ ४३ ॥
सारथि होय पितामह रुद्राचा, तेविं तूंहि कर्णाचा ॥
लाजो तुज रवि-रथ-हय-गुणधर तो बंधुही[5] सु-पर्णाचा[5] ॥ ४४ ॥
सारथि अधिक रथीहुनि असतांचि घडे जय प्रजा-पाळा ॥
पाळा कर्णासि तुम्ही घाल्ह कंठांत कीर्ति मणि-माळा ॥ ४५ ॥
पार्थातें कृष्ण तसा कर्णातें तूंहि संगरीं रक्षीं ॥
त्वां मारुतें करावा कर्ण-बळाग्नि प्रदीप्त रिपु-कक्षीं[6]" ॥ ४६ ॥
शल्य 'अवश्य' म्हणे तों कर्ण म्हणे, 'तूं यथोक्त रथ कल्पीं ॥
मद्र-पते, निजवूं[7] दे सत्वर भीमानुजासि शर-तल्पीं[7]' ॥ ४७ ॥

---

१ सारथ्याच्या कुळांत झालेल्या कर्णास. २ पृथ्वी हा रथ, ब्रह्मदेव हा सारथी व विष्णु हा बाण करून महादेवानें त्रिपुराचा नाश केला, अशी कथा आहे. ३ आनंदित करण्याकरितां. ४ पृथ्वी. ५ गरुडाचा भाऊ—अरुण. ६ शत्रुरूप तृणांत. ७ बाणांच्या आंथरुणावर निजवूं दे म्हणजे मारूं दे.

शास्त्र-प्रोक्त-विधानें रथ कल्पुनि शीघ्र आणिला शल्यें ॥
जेविं मनोरथ साक्षात् केला दैवेंचि सिद्ध वात्सल्यें ॥ ४८ ॥
शल्य बसे, मग बैसे वैकर्तन[1] निज-रथीं जसा तरणी ॥
पाहुनि शोभा मानिति जन कीं, केलाचि पार्थ-घात रणीं ॥ ४९ ॥
'धर्म धरावा किंवा मारावा पार्थ, वर मला दे हा ॥
अथवा पांचहि मारीं विजय-श्री-शुद्ध-कीर्तिच्या-गेहा[2]' ॥ ५० ॥
ऐसें वदे जयार्थी नृप त्यासि म्हणे 'अवश्य' तो कर्ण ॥
झाला सिद्ध महात्मा वाराया सर्व आप्त-लोकर्ण[3] ॥ ५१ ॥
हर्षें शल्यासि म्हणे, 'मद्राधीशा, वर-प्रतापा' हूं- ॥
प्रेरीं वाजी, आजी त्वद्दर्शित यान-शीघ्रता पाहूं ॥ ५२ ॥
मारीन पांडव रणीं, शल्या निश्चियचि जाण ते जितकीं ॥
शस्त्रें धरितिल खंडिन, माझे अति-तीव्र बाण तेजित[4] कीं ॥ ५३ ॥
शर-वृष्टिनें धनंजय शांतीतें पाववीन मी थोर ॥
घन नृत्य-रसीं सादर आजि रणीं या करीन कुरु-मोर' ॥ ५४ ॥
शल्य म्हणे, 'सूत-सुता कां गा अवमानिशी सु-भव्य जना ॥
वंशजहि[5] शूर्प न गुणें लंघी सभ्यादृता शुभ व्यजना[6] ॥ ५५ ॥
न विलोकिला धनंजय म्हणवुनि ऐसें यथेष्ट बोलवतें ॥
न लवे वेतस-शिर परि येतां गुरु-पूर तें किं हो लवतें ॥ ५६ ॥
मद-भूत-ग्रस्ता, तुज धर्मात्मा सिद्ध-मंत्र पाहील ॥
साधुपुढें मोह तसा क्षणभरिहि न हा प्रलाप राहील' ॥ ५७ ॥
कर्ण अनादरुनि वचन शल्यासि म्हणे, 'सु-शीघ्र हय हाकीं' ॥
आकर्षिला कृतांतें चुंबक-मणिनेंच[7] जेविं अय हा[8] कीं ॥ ५८ ॥
कर्ण म्हणे, 'शल्या गति भीष्माची शत्रुंनीं तशी केली ॥
गुरुहि अ-धर्में वधिला, विजय-श्री ओढुनी बळें नेली ॥ ५९ ॥
पार्थ-प्रताप साहे आहे मजवेगळा असा कोण ॥
गंगा-सुत वृद्ध भला तो ब्राह्मणही पुरातन द्रोण ॥ ६० ॥

---

१ विकर्तन म्हणजे सूर्य त्याचा मुलगा—कर्ण. २ विजयलक्ष्मीपासून होणारी जी निर्मळ कीर्ति तिचें स्थानभूत अशा कर्णा. ३ (आप्त+लोक+ऋण) आप्तांचें ऋण. ४ तेजस्वी, प्रखर. ५ एकाच कुळांत जन्मलेलें (पक्षीं) वेळूपासून झालेलें. ६ पंख्यास. ७ लोहचुंबकानें. ८ कर्ण.

माझें प्रिय बहु केलें धृतराष्ट्र-सुतें तदर्थ साधीन ॥
ह्याविषयीं प्रिय-भोगांसह जीवित करिन अंतकाधीन ' ॥ ६१ ॥
इत्यादि आत्म-विक्रम जेव्हां स्व-मुखें यथेष्ट कर्ण वदे ॥
शल्य तया उत्तर दे उग्र जसें विष हरासि अर्णव दे ॥ ६२ ॥
' नर-वर अर्जुन कोठें, पुरुषाधम सूत-पुत्र तूं कोठें ॥
वाचाळा, नाचावें सत्स्तवनीं न स्व-वर्णनीं ओठें ॥ ६३ ॥
तुज नित्य घोष-यात्रा-स्मरण[1] असावें, परंतु हा मद तों ॥
आहेचि वि-स्मृतीचें बीज म्हणुनि लेशमात्र मी वदतों ॥ ६४ ॥
तूं प्रथम पळालासि प्राण-क्षय-भय धरूनि मनिं मागें ॥
जिंकोनि बद्ध केला दुर्योधन ख-चर-नायकें[2] रागें ॥ ६५ ॥
बंध-विमुक्त सुयोधन तेव्हां त्वां कीं धनंजयें केला ? ॥
राधेय अन्य तूं, तो अन्यचि, जाणों पळोनि जो गेला ॥ ६६ ॥
त्या गो-ग्रह-प्रसंगीं भीष्म-द्रोणादि सर्व एकानें- ॥
केले भग्न, दशा ते तुमची क्षण आयकों नये कानें ॥ ६७ ॥
तेव्हां त्वां तो अर्जुन राधेया, कां न जिंकिला शस्त्रें ? ॥
अस्त्रें गेलीं होतीं कोठें, नेलीं हिरोनि जैं वस्त्रें ॥ ६८ ॥
झालें युद्ध उप-स्थित आजि, पळेनासि तरि तुला पार्थ- ॥
मारिल निश्चयें हें कर्म करिशि निज-वधू-विलापार्थ ' ॥ ६९ ॥
ऐसें सज्जन-संमत हित, सत्य, श्राव्य, जें वदे शल्य- ॥
कर्णाच्या कर्णा दे दुःख तसें ततही न दे शल्य ॥ ७० ॥
कर्ण म्हणे, ' गा शल्या मागील कथा कशास जरि आजी- ॥
मज जिंकील तरि खरें तव कत्थन[3], शीघ्र चालवीं वाजी ' ॥ ७१ ॥
शल्य म्हणे, ' बहु बरवें पार्थाशीं गांठि घालितों तूर्ण ॥
ईश्वर-वरानुकूलें दैवें होतात कामना पूर्ण ' ॥ ७२ ॥

---

१ घोष—गौळवाडा, त्याप्रत यात्रा—गमन. पांडव द्वैतवनांत असतां त्यांस आपलें वैभव दाखवावें म्हणून दुर्योधन हा, कर्ण, शकुनि वगैरे मंडळी व चतुरंग सैन्य बरोबर घेऊन, तेथें असणाऱ्या आपल्या गायी पाहण्याच्या मिषानें त्या वनांत गेला. तेथें क्रीडा करण्याकरितां चित्रसेन गंधर्व आला होता. त्याचें व दुर्योधनाचें कांहीं कारणावरून युद्ध झालें. त्यांत कर्ण पळाला व चित्रसेन दुर्योधनाला बांधून स्वर्गलोकीं नेऊं लागला असतां अर्जुनानें त्यास सोडविलें. ह्या सर्व प्रकरणास ' घोषयात्रा ' असें म्हणतात. २ चित्रसेन गंधर्वानें. ३ बडबड.

यापरि बोलत जातां पांडव-पृतना विलोकिली दूर ॥
'कोठें अर्जुन', ऐसें सादर ज्या त्यासि तो पुसे शूर ॥ ७३ ॥
कर्ण म्हणे, 'सुखवाया भूप-सखा करुनि शत्रुचें निधन ॥
सांगेल पार्थ मज जो देइन मागेल जें तयासि धन' ॥ ७४ ॥
शल्य म्हणे, 'राधेया वांटिशि कां धन कुबेरसा, अ-ज्ञा ॥
पार्थ पहाशील सुखें व्यय-वेत्ते वित्त वेंचिती यज्ञा ॥ ७५ ॥
कंठीं बांधोनि शिळा बाहु-बळें जेविं सागरीं तरण ॥
कीं भृगु-पतन[1] तसें हें जें तूं करणार त्या अरींत रण ॥ ७६ ॥
व्यूह रचोनि सकळ-नृप-बंधु-सुत-सुयोधनादिकांसहित ॥
पार्थाशीं युद्ध करीं, जरि म्हणसी स्व-जय हो न हो अ-हित' ॥ ७७ ॥
कर्ण म्हणे, 'शल्या मी स्व-भुज-बळें प्रार्थितों रणीं पार्था ॥
हे[2] प्रभु[2] सहाय असतां साधीना कर्ण कोणत्या स्वार्था ॥ ७८ ॥
तूं निश्चित हित-शत्रु स्तविशी घडिघडि स-धर्म-भीमातें ॥
साच्युत-धनंजयातें तूं देऊं पाहतोसि भी मातें ॥ ७९ ॥
या दृढ मदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला ॥
मर्त्यांची काय कथा, प्राकृतसा काय कर्ण हा गमला ?' ॥ ८० ॥
शल्य म्हणे, "राधेया जेव्हां तुझिया स्मरोनि कर्मातें ॥
अर्जुन तीव्र शरांनीं समरीं भेदील सर्व मर्मातें- ॥ ८१ ॥
तेव्हां पश्चात्तापा बापा, तूं पावशील पापानें ॥
सापानें धरिला प्लव[3] न जगे बडबडसि तूं जसा पानें[4] ॥ ८२ ॥
तूं विजयासि वधाया वांछिसि हें कोण जाणता साहे ॥
अंबांक-स्थित[5] शिशु शशि-मंडळ कवळावया जसा पाहे ॥ ८३ ॥
शव-मांस-मत्त जंबुक तूं, गज-मुक्ताश[6] सिंह तो जिष्णु ॥
तूं शशक, पार्थ गज-पति, कीं दानव तूं सिताश्व तो विष्णु ॥ ८४ ॥
स्व-बिल-स्थ कृष्ण-सर्पा काष्ठें टोंचोनि खवळिशी कां गा ॥
तीव्र त्रिशूळ-वदनें तूं खाजवितोसि आपुल्या आंगा ॥ ८५ ॥
पार्थ-पयो-धर गर्जे, स्पर्धा मंडूक तूं वृथा धरिशी ॥
त्याच्यापुढें टुरुटुरू टरौंटरौं शब्द हे किती करिशी ॥ ८६ ॥

---

१ पर्वताच्या कड्यावरून पडणें. २ हे माझे समर्थ ( बाहु ). ३ बेडूक.
४ मद्यप्राशनानें. ५ ( अंबा+अंक+स्थित ) आईच्या मांडीवर बसलेला.
६ ( गज+मुक्त+आश ) हत्तीच्या गंडस्थळांतील मोत्यें खाणारा.

श्वान स्व-पोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे ॥
जिकडे वनांत गर्जे शार्दूल तया दिशेकडे पाहे ॥ ८७ ॥
भुंके बळें यथेष्ट, व्यथित करी निकट-वर्ति-जन-कर्णां[१] ॥
अर्जुनदृष्टि न पडली तोंचि तसा भुंकतोसि तूं कर्णा ॥ ८८ ॥
शश-मंडळींत कोल्हा म्हणतो 'मी सिंह' वल्गना करितो ॥
जोंवरि न पाहिला गज-गंड-पलल-कवळ भक्षिता हरि तो" ॥ ८९ ॥
कर्ण म्हणे, 'गुणवद्गुण जाणे गुणवंत अ-गुण नेणेची ॥
प्रसवे[२] तीच अभि-ज्ञा शल्या तैसी न वांझ वेणेची[२] ॥ ९० ॥
मी आपणासि जाणें, जाणें त्या जिष्णुलाहि तत्त्वानें ॥
तैसें न जाणिजे त्वां, इतरें वा सत्त्व-हीन[३] सत्त्वानें[३] ॥ ९१ ॥
पार्थ-वधाचें साधन आहे तें सांगतों तुला, जेणें- ॥
आज द्वैरथ-युद्धीं[४] विजयाचे प्राण निश्चियें घेणें ॥ ९२ ॥
आहे अहि-मय[५] सायक मृदु-चंदन-चूर्ण-पूर्ण भात्यांत ॥
त्यावांचुनि शर दुसरा नाहींच क्षोणि-वल्लभा त्यांत ॥ ९३ ॥
तो आहेय[६] शरोत्तम सोडुनि मी मेरुतेंहि फोडीन ॥
कवचाची काय कथा पार्थीं कीं केशवींच सोडीन ॥ ९४ ॥
तूं झालासि कु-देशीं संगर-पांडित्य काय तुज ठावें- ॥
शल्या, कल्याण-गुणा पात्र जगीं पुण्य-संग्रहें व्हावें ॥ ९५ ॥
भ्यालासि मूढ-बुद्धे, बडबडसी फार वानिसी अरिला ॥
भाव तुझा मज कळला धीर तुझा मृत्युच्या भयें हरिला ॥ ९६ ॥
ते मारतील मज कीं त्यांला मारीन मी स्व-बळ जाणें ॥
कृष्णांला कर्ण न भी, तनु टाकुनि एकदां असे जाणें ॥ ९७ ॥
दोघांची काय कथा जरि कृष्णार्जुन सहस्र येतील ॥
तरि माझे शर त्यांच्या प्राण-धनातें हिरोनि घेतील ॥ ९८ ॥
तुज भेदिलें परांनीं स्पष्ट म्हणुनि बोलसी असें खोटें ॥
सर्वां पापांमध्यें हें मित्र-द्रोह-पाप बहु मोठें ॥ ९९ ॥

---

१ जवळ असणाऱ्या मनुष्यांच्या कानाला. २ प्रसववेदनेची (बाळंतीण होण्याच्या वेळच्या दुःखाची) जाणणारी. ३ बुद्धिरहित प्राण्यानें. ४ रथ्यांच्या द्वंद्वयुद्धांत. ५ सर्परूप—अग्नीनें अर्जुनाच्या मदतीनें खांडववन जाळलें त्यावेळीं त्यानें सर्व तक्षककुळ जाळलें फक्त तक्षकाचा पुत्र अश्वसेन हा वांचला. तो ह्या वेळीं अर्जुनाला मारावें ह्या हेतूनें कर्णाच्या भात्यांत बाणरूपानें येऊन राहिला होता, अशी कथा आहे. ६ सर्पाचा.

मज युद्धाभिप्रायापासुनि मागें बळेंचि फिरवील- ॥
ऐसें भूत नसेचि त्रि-जगीं जें ह्या यशास मिरवील ॥ १०० ॥
भ्याडासि भेडसावीं मी भ्याया उपजलों नसें कांहीं ॥
विक्रम-यश साधाया झालोंसें, चाल पथ पुढें पाहीं' ॥ १०१ ॥
शल्य म्हणे, 'रे सूता, बडबड करितोसि फार मद्य-प-सा ॥
गुरु-सागर बहु गर्जे परि मुनिचा एकही भरे न पसा' ॥ १०२ ॥
तेव्हां दुर्योधन नृप निज-कार्याचा न व्हावया घात- ॥
कर्णास मित्र-भावें वारी, शल्यासि जोडुनी हात ॥ १०३ ॥
नृप-बहु-मानें झाले अति वाद त्यजूनि उप-रमा वरिते ॥
मग हरिवर[1] करि-वरसे गेले दोघे नरोत्तमावरि[2] ते ॥ १०४ ॥
कर्ण त्रिदश-गुरु-मतें[3] रचुनि महा-व्यूह तन्मुखीं ठाके ॥
बार्हस्पत्य-व्यूहा पाहुनि बहु धर्म तो मनीं धाके ॥ १०५ ॥
भूप म्हणे, 'तूंचि करीं कर्णाशीं युद्ध उद्धरीं कांटा ॥
भांडो सुयोधनाशीं भीम, तयाचाचि तो असे वांटा' ॥ १०६ ॥
अमृत-रसाची धारा धर्माची श्वेत-वाह[4] आज्ञा पी ॥
होय पुढें, सैन्यातें 'ऐसें वर्ता' म्हणोनि आज्ञापी ॥ १०७ ॥
शल्य म्हणे, 'राधेया तो येतो जिष्णु विष्णु-सम-शील ॥
गरुडीं कालीय तसा ज्यावरि तूं कोप-गरळ वमशील ॥ १०८ ॥
कर्णा, पुससी ज्याला आला तो पार्थ दाव-पावक-सा ॥
वधितो मृगांसि हरि-सा, सोसेल परांसि तत्प्रभाव कसा ॥ १०९ ॥
तुजशीं धनंजयाशीं गांठि पडाया नकोचि बहु वेळ ॥
पाहीन मी तयाचा आणि तुझाही रणांगणीं खेळ ॥ ११० ॥
वधिशील जिष्णुला तरि कर्णा, होशील आमुचा राजा ॥
परि हें दुर्घट इंद्रा, जरि काय सहाय आणिला आजा[5]' ॥ १११ ॥
कर्ण म्हणे, 'मद्रेशा नीट पहा पार्थ-केतुचा शेंडा ॥
संशप्तकांत झाला मग्न जसा सागरोदरीं भेंडा[6]' ॥ ११२ ॥
शल्य म्हणे, 'वरुणातें कोण समुद्रोदकांत बुडवील ॥
विझवील तृणें दहना अनिळाला करुनि बद्ध तुडवील' ॥ ११३ ॥

---

१ सिंहावर. २ अर्जुनावर. ३ देवांचा गुरु बृहस्पति त्याच्या मताप्रमाणें.
४ अर्जुन. ५ ब्रह्मदेव. ६ मातीचा गोळा.

ऐसें जों कर्णाशीं शल्य वदे तोंचि शीघ्र त्या सेना ॥
मिळती, मारण-मरणाहूनि दुजें अधिक ज्यांसि भासेना ॥ ११४ ॥
कुरु-पांडव-सेनांसीं होतां संग्राम राम-शिष्य-मणी[1] ॥
गजयूथावरि हरि-सा धांवे मारी अनेक वीर-मणी ॥ ११५ ॥
अरि एक बाण हाणी तों हाणी कर्ण शर तया ति-पट ॥
निपट[2] प्रत्युपकृति-पटु झांकी रिपु पसरुनि स्व-हेति-पट[3] ॥ ११६ ॥
काढी जोडी ओढी सोडी शर कर्ण, लाघवास्तव तें ॥
न दिसे, दिसे शरासन-मंडळ हत शत्रु-बळहि त्या-भवतें ॥ ११७ ॥
हत-नर-तुरग-गजांच्या रक्तांची गुरु तरंगिणी वाहे ॥
साक्षात् सरस्वती ती, स्वर्ग जन जिच्या निमज्जनें लाहे ॥ ११८ ॥
रक्त-नदीच्या स्नानें, पानें गंधेंहि वीर ते भुलले ॥
दिसती वसंत-समयीं किंशुक-तरु[4] कटक-काननीं फुलले ॥ ११९ ॥
शल्य म्हणे, 'आला रे आला काळानळ-प्रबळ भीम ॥
भी मन काळाचेंहि, यास प्रति-मल्ल एक बळ-भीम[5] ॥ १२० ॥
बहु-काळ-संचितोग्र-क्रोध-गरळ[6] तुजवरीच ओकाया ॥
हा भीम-भुजग आला, सावध हो देख तेज-ओका[7] या' ॥ १२१ ॥
कर्ण म्हणे, 'मद्रेशा, सत्याचि वदतोसि भीम हा साचा ॥
घेईल सूड समरीं आम्हीं केल्या महोपहासाचा ॥ १२२ ॥
हा वीर धीर कोपी प्रबळ नसे यासि चाड देहाची ॥
चौघांहुनी शत-गुण प्रीति द्रुपदात्मजेशि दे हाची ॥ १२३ ॥
याला वधीन किंवा विरथ तरी मी करीन कोपार्थे ॥
याच्या कैवारें तरि मजशीं घालील गांठि तो पार्थ' ॥ १२४ ॥
शल्य म्हणे, 'न वदें बहु आधीं भीमासि चाल वाराया' ॥
कर्ण म्हणे, 'तुज सागर भासे, मज भीम कालवा राया' ॥ १२५ ॥
भीमातें नाराचें[8] ताडी कर्ण स्तनांतरीं आधीं ॥
मग बुडवि शर-समुद्रीं कपि गिरितें जेविं दुस्तरागाधीं ॥ १२६ ॥
भीमहि झांकी कर्णा बाण-पटें तत्तनूंत नव रोप-[9] ॥
खोंवी, तो वीर-मणी स्व-मनीं तेव्हां धरी अ-मित कोप ॥ १२७ ॥

---

१ परशुरामाच्या शिष्यांमध्यें श्रेष्ठ असा—कर्ण. २ केवळ. ३ आपलें शस्त्ररूपी पट. ४ पळसाचीं झाडें. ५ हनूमान. ६ सांचत आलेला भयंकर क्रोध हेंच विष. ७ पराक्रमाच्या स्थानाला. ८ बाणानें. ९ बाण.

लोक म्हणति, 'दारुण रण, नेणों होईल आजि काय कसें ॥
दोघेही प्रबळ हटी दिसतें हें युद्ध भीति-दायक-सें' ॥ १२८ ॥
हांसे भीम मनिं म्हणे, 'जरि नसता कर्ण जिष्णुचा वांटा ॥
कां टाकितों सु-यश कां गुरु-हृदयांतिल न काढितों कांटा' ॥ १२९ ॥
कौसुंभ-रंग-रंजित वस्त्रानें शोभते जशी महिला ॥
हत-कटक-रक्त-रंगें आली शोभा तशी रणीं महिला ॥ १३० ॥
भीमें कुरु-बळ मथिलें जरि केलें गुरु-सुतादिकीं जतन ॥
हत-नष्ट रुद्र-रोषें होय जसें दक्ष-मख-महायतन[1] ॥ १३१ ॥
पार्थ मुकुंदासि म्हणे, 'संशतक मारिले पहा कृष्णा ॥
कृष्णा-देवीची जशि तशि पुरवाया स्व-भूमिची तृष्णा ॥ १३२ ॥
कर्णाचा गज-कक्ष-ध्वज[2] दिसतो आमुच्या बळांतचि तो ॥
पुरुष-व्याघ्र-प्राया वीरांचे राशि संगरीं रचितो ॥ १३३ ॥
चाल सख्या, हरि सत्वर तेथें ने तन्निवारणार्थ मला ॥
यम लाजो तव दासा, वाटे वृष काळ पांडवां गमला ॥ १३४ ॥
कर्णातें साहेसा न दुजा मजवेगळा तुला कळतें ॥
अद्भुत तेज तयाचें भस्मचि केलें असेल गा बळ तें ॥ १३५ ॥
जो सारथि सुख-धामा तुज-सम शूरहि नवांबुद-श्यामा- ॥
आला अरिच्या कामा तो राजा शल्य आमुचा मामा ॥ १३६ ॥
ने रथ तेथें जेथें कर्ण करितसे मदीय-बल-दमना ॥
स्मरत[3] असेल वृष-दहन-दग्धांच्या[3] कृष्ण-मित्र-जल-द मना' ॥ १३७ ॥
हरि हर्षें हरि हांकी तैं हरिणांचाचि न हरिती सर्व- ॥
ते ऐसे जवन लव न पवन-कुमारींहि[4] उरविती गर्व ॥ १३८ ॥
शल्य कपि-ध्वज पाहुनि कर्णासि म्हणे, 'पहा महा-बाहो- ॥
आला अर्जुन, सावध आतां युद्धार्थ शीघ्र तूं बा हो' ॥ १३९ ॥
कर्ण म्हणे, 'सत्य वदसि धैर्याची धरुनि घट्ट कास रहा ॥
वदलासि यथार्थ नृपा, मज झाला प्राप्त धन्य वासर हा ॥ १४० ॥

---

१ (दक्ष+मख+महा+आयतन) दक्षप्रजापतीच्या यज्ञाचें स्थान (यज्ञमंडप). २ हत्ती ज्याच्या पदरावर काढिला आहे असा. ३ कर्णरूप अग्नीनें जळणाऱ्या (माझ्या) लोकांस कृष्णाचा मित्र जो अर्जुन हाच मेघ तो आठवत असेल म्हणजे माझे लोक अशा संकटसमयीं माझी आठवण करीत असतील. ४ वायुपुत्र हनूमान् त्याच्या अंगीं.

मी शुद्र युद्र यासीं निर्भय-चित्तें करीन, काम रणीं- ॥
होतो पूर्ण, पहावा धर्मज्ञ-जनेंहि दोष का मरणीं ॥ १४१ ॥
भीष्म-द्रोण-चरित्राहुनि कोणाचें चरित्र सन्महित ॥
परि तेंहि विसरवीन स्व-चरित्रें मी करीन जन्म-हित ' ॥ १४२ ॥
कृष्ण म्हणे, ' पार्था हा आला क्रोधांध कर्ण अंतक-सा ॥
मृत्युंजय-वर-पात्रा, तूं याचा न करिशील अंत कसा ॥ १४३ ॥
याच्या शरासि साहे ऐसा त्रि-जगांत तूंचि एक रणीं ॥
वीर उदंड असति, परि त्यांला पार्था तुझी न ये करणी ॥ १४४ ॥
कर्णातें जिंकाया तूं शक्त, तव प्रताप मी जाणें ॥
झाला प्रसन्न तुज तो, जो जाळी त्रिपुर एकले बाणें ॥ १४५ ॥
मारीं हर-प्रसादें कर्णा, वृत्रा जसा सुनाशीर[1] ॥
राधे-सह ताडूत व्याकुळ-चित्ता तिच्या सुना शीर ' ॥ १४६ ॥
पार्थ म्हणे, ' कृष्णा मज जय घडतो आजि निश्चयें हा कीं ॥
बा, सर्व-लोक-गुरु तूं आहेसि बहु प्रसन्न, हय हाकीं ॥ १४७ ॥
आजि पहाशील सख्या, मच्छर-शकलीकृतांग[2] कर्णातें ॥
तदसृक्कण-सिक्तातें[3] आकाशातेंहि शोण-वर्णातें[4] ॥ १४८ ॥
मी त्याचें कीं माझें तो आजि करील निश्चयें हनन ॥
मन न व्यग्र तुझें हो, रणिं जय-मरणार्थ आमुचें जनन ' ॥ १४९ ॥
जिष्णुसि हरि ने धर्म-स्वांतींचें उद्धरावया शल्य ॥
कर्ण रथासह आणी सत्वर समरांगणांत तो शल्य ॥ १५० ॥
उत्साह तेज विद्या शिक्षा बळ धैर्य शौर्य दोघांचें ॥
तुल्यचि ज्यापरि गंगा-यमुनांच्या पावन-त्व ओघांचें ॥ १५१ ॥
इंद्र म्हणे, ' कर्ण-वधें हो पार्थ स्तोत्र-पात्र अमरांत ' ॥
सूर्य म्हणे, ' पार्थ-वधें संपादू विजय कर्ण समरांत ' ॥ १५२ ॥
कर्ण म्हणे, ' शल्या जरि मजला मारील आजि पार्थ कसें- ॥
करिशील, सांग ऐकों मैत्रीचें होय ज्यांत सार्थकसें ' ॥ १५३ ॥

---

१ इंद्र. २ ( मत्+शर+शकलीकृत+अंग ) माझ्या बाणांनीं छिन्नविछिन्न केलें आहे अंग ज्याचें अशा. ३ ( तत्+असृक्+कण+सिक्तातें ) त्याच्या रक्तबिंदूंचा सडा ज्यावर झाला आहे अशा. ४ तांबडा रंग असलेल्या.

शल्य म्हणे, 'कर्णा तें न घडो, दैवें घडेलही जरि तें ॥
तरि मी त्वदर्थ युद्धीं मारीन रणांत जिष्णुतें हरितें' ॥ १५४ ॥
पार्थहि हरिस म्हणे, 'जरि अरि मज मारील काय करिशील ॥
न पुसावे परि पुसतों, कीं तूं संशय समस्त हरिशील' ॥ १५५ ॥
ऐकोनि कृष्ण 'शिव शिव' ऐसें आधीं म्हणोनि मग हांसे ॥
कीं कर्ण काय, न बळी काळाचेही स्व-सेवकीं[1] फांसे[1] ॥ १५६ ॥
'शुष्क उदधि, शीत अनळ, जरि होईल प्रभा-करा पात- ॥
तरि ह्या कर्णापासुनि नाहीं होणार बा तुझा घात ॥ १५७ ॥
जरि विपरीतचि होइल तेंही स्मर-हर-वर-प्रदान मृषा ॥
तरि मी निज-भुज-तेजें भस्म करिन मद्र-पति-समेत वृषा' ॥ १५८ ॥
ऐसा निश्चय केला पार्थें कर्णेंहि मांडिलें समर ॥
कौतुक पाहति कौरव-पांडव-पक्ष-स्थ आणखी अमर ॥ १५९ ॥
पार्थाकडील कटकें कर्णें, कर्णाकडील त्या पार्थें ॥
केलीं तीव्र-शरांहीं भग्नें मग्नें भयीं, हत-स्वार्थें[2] ॥ १६० ॥
वर्षति अन्योन्यावरि कर्णार्जुन ते घनावरी घनसे ॥
पुरुहूत[3]-दूत-वात-द्युमणिकरां शर-गृहांत रीघ नसे ॥ १६१ ॥
तों आला वध-समय, द्विज-शापहि[4] भू-मुखेंचि तो डावें- ॥
गिळवी रथ-चक्र, म्हणे 'रामास्त्रा[5] प्रेम तूंहि तोडावें' ॥ १६२ ॥
चक्र क्षितिनें गिळितां न स्मरतां भार्गवास्त्र रविजाला- ॥
स्पर्शे विषाद, म्हणती 'बळ-तेजो-नाश-हेतु' कवि ज्याला ॥ १६३ ॥
व्यसनीं पडतां, क्षात्रीं धर्मीं होऊनि तो वि-रस 'हाय' ॥
कर्ण म्हणे, धर्मासहि मानी कीं, 'हा नव्हे चिर सहाय' ॥ १६४ ॥
विधि फिरतां जरि दिधला व्यसनें त्या फार कंप दात्यातें ॥
परि परिरंभण[6] देउनि होती शुचि-सत्त्व-संपदा त्यातें ॥ १६५ ॥

---

१ माझ्या भक्ताला ( बांधण्याला ). २ ज्यांचा स्वार्थ ( जयाशा ) नाहींसा झाला आहे अशीं. ३ इन्द्र. ४ कोणी एका वेळीं कर्ण मृगयेस गेला असतां त्याच्या बाणानें एका ब्राह्मणाची गाय मेली ; तेव्हां त्या ब्राह्मणानें "ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं युद्धांत पृथ्वी तुझ्या रथाचें चक्र गिळील," असा शाप दिला होता. ५ परशुरामानें दिलेल्या अस्त्रा. परशुरामाचा भीष्माशिवाय इतर क्षत्रियांस विद्या न सांगण्याचा नियम होता. तेव्हां कर्ण ब्राह्मणाचा वेष घेऊन त्याजपासून कपटानें विद्या शिकला. पुढें तो क्षत्रिय आहे असें परशुरामास कळल्यावर मजपासून मिळविलेली विद्या प्रसंगीं तुला उपयोगीं पडणार नाहीं असा त्यानें शाप दिला होता. ६ आलिंगन.

तो वृष भूमि-ग्रस्त-स्यंदन-चक्रासि[१] उद्धरायातें ॥
उतरे स्व-रथाखालें करुनि असें अ-तुल युद्ध राया तें ॥ १६६

उद्धरण करूं पाहे कर्ण भुजांनीं धरूनि चक्राचें ॥
परि पृथ्वी सोडीना जाणों व्रत घेतलेंचि नक्राचें ॥ १६७

सप्त-द्विपा पृथ्वी वृष उचली चार अंगुळें वरि ती ॥
बडिशासि जशी मत्स्यी, नुगळी[२] चक्रासि कांपली परि ती ॥ १६८

सद्रसना[३] नामातें कीं सोडी बंधु-ता[४] न दायातें[५] ॥
तैशी क्षिति चक्रातें, श्रम झाला फारसा तदा यातें ॥ १६९

त्या व्यसनीं तो पाणी आणी नेत्रासि वृष म्हणे, 'हाय' ॥
काय करील, न[६] साहे[६] ते बहु मर्मीहि साहिले घाय ॥ १७०

स्व-वधोद्यतार्जुनातें कर्ण म्हणे, 'बळ तुझें अनंत रहा- ॥
स्वस्थ मुहूर्तभरि, रण-श्रद्धा पुरवील गा अनंतर हा ॥ १७१

रथ-चक्र उद्धरूं दे, श्रुति-शास्त्र-ज्ञा महारथा कुल-जा ॥
साधु न हाणिति अरिला, पाहति अ-धृतायुध व्यथाकुल ज्या ॥ १७२

तूं स्व-रथीं, क्षितिवरि मी, तूं सायुध, मी अ-शस्त्र-कवच रणीं ॥
न वधावें मज, जों मी रथ-चरणीं लाग तूंहि भव-चरणीं[७] ॥ १७३

भ्यालों न तुज हरीसहि जो न तुला वि-मुख काय कातर तो ॥
कथितों यास्तव कीं, जन धर्में भव-सिंधु-नायका तरतो ॥ १७४

रक्षावा धर्म बुधें कुशळाचा धर्म हा निधी, राहें- ॥
स्थिर जें करिसि निरायुध-मथन करिल धर्म-हानि धीरा हें' ॥ १७५

कृष्ण म्हणे, 'राधेया भला बरा आजि स्मरसि धर्मातें ॥
नीचि-व्यसनीं बुडतां निंदिसि दैवास न स्व-कर्मातें ॥ १७६

जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि एक-मति झालां ॥
कैसें कपट-द्यूतीं चित्तींहि न धर्म लंवितां भ्यालां ॥ १७७

जेव्हां सभेसि नेली पांचाळी मानिलें मनीं शर्म ॥
तेव्हां गेला होता कोठें राधा-सुता तुझा धर्म ॥ १७८

फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग ॥
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा, सांग ॥ १७९

---

१ जमिनींत रुपलेलें रथाचें चाक त्याला. २ न सोडी. ३ साधूंची।
४ भाऊबंद. ५ विभाग (हिस्सा). ६ सहन न होतील असे. ७ शिवपदीं.

चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले नृपें असें खोटें ॥
कर्म करवितां, कर्णा होता तव धर्म तेधवां कोठें ॥ १८० ॥
केले दग्ध जतु-गृहीं त्वां पांडव वारणावतीं जेव्हां- ॥
गेला होता कोठें धर्म तुझा सूत-नंदना तेव्हां ॥ १८१ ॥
अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म ॥
तेव्हां गेला होता कोठें राधा-सुता, तुझा धर्म ॥ १८२ ॥
पूर्वीं धर्म न रुचला, त्यजिला निपटूनि जो जसा कुचला[1] ॥
आतांचि बरा सुचला काळ-गृहा सर्व व्हा परासु[2] चला ॥ १८३ ॥
मागेंचि तुम्ही भजतां धर्माला तरि तुम्हांस वांचविता ॥
आतां मरा. न वांचे दीप्त-गृहीं जो न तोय सांचविता ॥ १८४ ॥
मागेंचि धर्म करितां जरि देतां राज्य धर्म वांचविता ॥
न जगे जो दुर्भिक्ष-व्यसनापूर्वीं न धान्य सांचविता ॥ १८५ ॥
आतां रक्षील कसा धर्म, तुम्हीं वित्त-मद्य-मत्तांनीं- ॥
जो लोटिला दहादां स्व-हितहि मानूनि अहित लत्तांनीं ॥ १८६ ॥
रक्षावा धर्म असा करिशी उपदेश तरि असे मान्य ॥
रक्षितसों धर्मातें[3] आम्हांला धर्म ठाउका नान्य' ॥ १८७ ॥
आश्रित-जनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें ॥
निश्वास नृपें लज्जावनत-मुखें सोडिला जसा नागें ॥ १८८ ॥
न वदे कांहींच, रथीं वेंचे वे सूर्य-सूनु चापातें ॥
सोडी बाण कराया मूर्छित शक्रासि सूनुच्या पातें ॥ १८९ ॥
तेव्हां पर-पुरुष[4] म्हणे, 'पार्था दिव्यास्त्र-वात सोडावा ॥
झोडावा मोडावा वैर-द्रुम-कर्ण, बाण जोडावा' ॥ १९० ॥
कर्णावरि बहु कोपे पार्थ जईं तेधवां अनळसाचा-[5] ॥
देह ज्वाला-माली[6] भासे त्या रण-मखीं अनळ साचा ॥ १९१ ॥
शर सोडिला रवि-सुतें, धीर जनेंहि स्व-धीर यामागें ॥
जो सोडिलाचि नव्हता व्यसनांत कधींहि माणि जसा नागें ॥ १९२ ॥
तो शर गर-धर-वर[7]-सा पवि-सा रवि-सा स्मरारि-सायक-सा ॥
पार्थ-भुजांतरीं शिरला, वल्मीकामाजि नाग-नायक-सा ॥ १९३ ॥

१ विषविशेष. २ गतप्राण. ३ धर्मराजाला. ४ परमात्मा (कृष्ण).
५ (अन्+अळसाचा) ज्याला आळस नाहीं अशाचा. ६ ज्वालायुक्त अग्नि. ७ विष धारण करणारा शंकर.

त्या खर-शर-प्रहारें विव्हळ झाला महेंद्र-सुत राया ॥
जरि होता निकट कुशल मंत्री प्रभु बाण-सर्प उतराया ॥ १९४ ॥
ऐसा निज-भुज-विक्रम दावुनि सर्वां भटांसि शुद्ध-रणीं ॥
उतरे वृष दावाया भू-ग्रस्त-रथांघ्रिच्याहि उद्धरणीं ॥ १९५ ॥
बहु यत्न करी, प्रार्थी परि धरिलें सोडिनाचि चाक रसा ॥
द्विज-शाप मान्य पति-सा गुरु, कर्ण न मान्य तीस चाकर-सा ॥ १९६ ॥
देव म्हणे, 'पाहिलें गुरु-नाम मग स्व-धनु बाण बरवें घे ॥
खंडीं शिर रिपु पुनरपि जों रथ-रत्नाचिया न वर वेंघे' ॥ १९७ ॥
प्रभुची आज्ञा होतां पार्थ प्रखरेषु सोडुनी त्वरित- ॥
रण-दक्षा स्व-विपक्षा करि कक्षा-केतु[१] खंडुनी ज्वरित ॥ १९८ ॥
तुटला ध्वजचि न केवळ विजयाचा भरंवसाहि तुटला हो ॥
सुहृदश्रुबिंदुंसह तो पडला, बळ-धैर्य-सेतु फुटला हो ॥ १९९ ॥
केतु च्छेदुनि पार्थ द्यु-मणि-सुताचे हरावया प्राण ॥
जोडी गांडीव-गुणीं शत्रु-हर हरायुधा-असा[२] बाण ॥ २०० ॥
योजुनि महास्त्र-मंत्रित शर विजय म्हणे "जरि स्व-गुरु सर्व- ॥
तोषविले असतील, ज्ञान-बळाचा नसेल तिळ गर्व-, ॥ २०१ ॥
विधिनें[३] जोडुनि नेलें असेल जरि कीर्तनें न तप नाशा- ॥
तरि या शरें वृष मरो, हरिचीच पुरो, पुरो न तपनाशा" ॥ २०२ ॥
ऐसें वदोनि पार्थें ओढुनियां स-गुण-बाण कर्णांत ॥
पाठविला काळें निज-दूत तसा व्हावयासि कर्णांत ॥ २०३ ॥
नयनाग्नि-कील[४] नील-ग्रीवाचा[४] मीनकेतुवरि[४] जैसा ॥
अरिवरि सायक-नायक जाय कराया क्षय त्वरित तैसा ॥ २०४ ॥
तो शर कृत्यानळसा[५] दुर्घट चक्रोद्धृति-क्रियानळसा-[६] ॥
गांठी कुरु-बळ-विजय-प्रासादाच्या रवि-प्रभा[७] कळसा ॥ २०५ ॥

---

१ ध्वजवस्त्राचा पदर. २ शंकराचें आयुध पाशुपतास्त्र त्यासारिखा. ३ अन्वय-जरि विधिनें तप जोडुनि (तें) कीर्तनें (मुखानें उच्चारिल्यानें) नाशा न नेलें असेल तरि इ०. ४ शंकराच्या (तृतीय) नेत्रांतील अग्नीची ज्वाला मदनावर जशी पडली. ५ (कृत्या+अनळ+सा) शत्रूचा घात व्हावा म्हणून जो होम करावयाचा त्याच्या अग्नीसारखा. ६ (चक्र+उद्धृति+क्रिया+अनलस) रथाचें चाक उपटून काढण्याच्या व्यापारांत आळस न करणाऱ्या अशा कर्णास. ७ रविप्रभा कुरुबळविजयप्रासादाच्या कळसा गांठी, असा अन्वय म्हणजे कौरवांच्या पराजयाची वेळ आली.

शाण-निशित-मुखबाण[1] प्राणाभृदीड्यार्क-सूनुच्या[2] अमळा- ॥
खंडी नाळापासुनि कमळा मारुत तसा शिरः-कमळा ॥ २०६ ॥

साप्ताश्रु[3] शिर वृषाचें प्रथम क्षोणी-तळीं गळालें हो ॥
मग स-कुसुम-वृष्टि[4] तनू स-धर्म-भय[5] शत्रु-बळ पळालें हो ॥ २०७ ॥

कर्ण-शरीरापासुनि तेज निघालें दिवा-करीं शिरलें ॥
गुरु हृच्छोक-तमावरि[6] जाणों सत्पुत्र-सत्त्व तें फिरलें ॥ २०८ ॥

ऐसा केला असतां कृष्ण-कृपेनेंचि कर्ण-नाश तदा ॥
पांडव पांचाळ करिति विजयाच्या वीर्य-वर्णना शत-दा ॥ २०९ ॥

बहु-सिंह-नाद वाद्य-ध्वनि जय-जय-कार करिति धर्म-बळें[7] ॥
म्हणति, 'तरला युधिष्ठिर दुस्तर कर्णार्णवासि धर्म-बळें' ॥ २१० ॥

भग्न-रथें शल्य पळे, क्षितिस म्हणे, 'क्षोभलीस तूं कां गे' ॥
दुर्योधनासि भेटे, स्व-मुखें कर्णांत-वृत्त तें सांगे ॥ २११ ॥

भूप म्हणे, 'हा हा आशि काशि झाली आजि अंग-राज-गती ॥
स्वर्ग-श्री साधावी मग, आधीं करुनि संगरा जगती ॥ २१२ ॥

तें विपरीत कसें त्वां केलें, कर्णा सख्या अगा, धार्मी- ॥
सुख काय, तरों कैसा ह्या त्वद्विरहार्णवा अ-गाधा मी' ॥ २१३ ॥

---

## आर्या ; सन्मणि-मालेंतील

"सत् म्हणजे साधु हींच रत्नें ह्यांची माला." ह्या आर्यांपैकीं प्रत्येकींत एकेका साधूचें वर्णन केलें आहे, म्हणून ह्या प्रकरणास सन्मणिमाला म्हटलें आहे.

जो ज्ञानराज[8] भगवान् श्रवणें सु-ज्ञान दे, वदे वाचा ॥
अवतार गमे अकरावा कां सुज्ञां न देवदेवाचा ॥ १ ॥

---

१ साणेवर तीक्ष्ण केलेलें आहे मुख ज्याचें. २ जीवांना स्तुत्य असा जो सूर्य त्याच्या पुत्राच्या म्हणजे कर्णाच्या (प्राणभृत्+ईड्य+अर्क+सूनु). ३ (स+आप्त+अश्रु) इष्टमित्रांच्या अश्रूंसहवर्तमान. ४ देवांनीं केलेल्या पुष्पवृष्टिसह. ५ धर्मराजाच्या मनांतील भयासुद्धां. ६ आपल्या बापाच्या हृदयांतील शोकरूप अंधारावर. ७ धर्मराजाकडील सैन्यें. ८ ज्ञानदेव.

नमिला शमि-लास्य-प्रद[१] शांति-जलधि एकनाथ तो भावें ॥
शोभावें ज्याचें यश विश्वीं ज्या देव-वृंद लोभावें ॥ २ ॥
कर जोडून करिन मी न नृसिंहसरस्वतीस[२] कां नमन ॥
सज्जन सेविति ज्याचें सद्यश व्हाया सु-तृप्त कान मन ॥ ३ ॥
स्वर्वल्लि-सुरभि-सुर-सरिदधिका[३] श्रित-सर्व-काम-दा साची ॥
श्रीरामाची जैशी सत्कीर्ति तशीच रामदासाची ॥ ४ ॥
नमिला साष्टांग श्री-पति-भक्ति-रस-ज्ञ वामन-स्वामी[४] ॥
रस-भवना[५] तत्कवना मानीं या तेविं वाम[६] न स्वा[७] मी[८] ॥ ५ ॥
वंदन नंदनसा मी करितों भावें मुकुंदराजाला ॥
वश झाल्या सद्विद्या सकीर्ति सु-मुक्ति सुंदरा[९] ज्याला ॥ ६ ॥
वंदाया मजला तो ब्राह्मण बहिरा[१०] तथा पिसा मान्य ॥
जरि उकिरड्यांत पडला मळला न हिरा तथापि सामान्य ॥ ७ ॥
हरिविजय ग्रंथातें आधिं मग श्रीधरासि वंदीन ॥
शिव-वंदन-कामांहीं लंघावा[११] प्रथम देव, नंदी न ॥ ८ ॥
श्री-मुक्तेश्वर कवि-वर यातें कोण न शुभेच्छु वंदील ॥
बंदी लक्ष जयाचें, ज्याचें यश भव्य जेविं मंदील ॥ ९ ॥
कीर्तन-सुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा[१२] ॥
भलत्या मुखांतुनि अशी सु-रस-खनि निघेल काय जी वाचा ॥ १० ॥
कर जोडितों सुटाया तनु-रूपा ताप-हेतु कारा मी ॥
कीं स-तनु-मुक्त झाला योगाची सिद्धि हे तुकारामीं ॥ ११ ॥
माया हे संसृतिची जाळूनि स-शोक तो कवी रमला ॥
राम-पदाब्जीं अलि-सा, बहु-मत सु-मुदोक[१३] तो कबीर मला ॥ १२ ॥
साधु[१४] म्हणावे म्हणती नर माधवदास साधु याला जे[१४] ॥
अति-सारीं पट ज्याचे न रमा-धव दाससा धुया लाजे ॥ १३ ॥

---

१ शांतिप्रधान अशा जनाला लास्य (नत्य) लक्षणेनें आनंद देणारा. २ ह्या नांवाच्या साधूस. ३ कल्पलता, कामधेनु व (सुर+सरित्) भागीरथी ह्यांच्या-(कीर्ती) पेक्षां अधिक. ४ (कवि) वामन पंडित. ५ शृंगारादि रसाचें गृह. ६ सुंदर. ७ स्वकीय कवनास. ८ मी मोरोपंत. ९ सुंदर स्त्रिया. १० ह्या नांवाचा. ११ नवनीताच्या जुन्या आवृत्तीमध्यें 'वंदावा' असा पाठ आहे; परंतु मोरोपंतकृत 'स्फुट काव्यें' (भाग १, १८९६) मध्यें 'लंघावा' असा पाठ आहे आणि तोच खरा दिसतो. १२ बृहस्पतीचा. १३ (सु+मुद+ओक)-उत्तम आनंदाचें स्थान. १४ जे नर माधवदास याला साधु म्हणती (ते) साधु म्हणावे, असा अन्वय.

नरहरि-नामा[1] पावे संत न सोनार दास-मान कसा[1] ॥
तरला करुनि भवाचा अंत नसो नारदा-समान कसा ? ॥ १४ ॥

---

## आर्या ; धर्मोपदेश-प्रकरणीं

सत्यातें जोडावें सु-ज्ञें धर्मासि पळ न सोडावें ॥
पाशांतें[2] तोडावें धीरें न कदापि पाप जोडावें ॥ १ ॥
बा गा धर्माच्या तों कोणीं सोडूं नयेचि कासेतें ॥
निष्फल[3] होती मेघें त्यजिलीं आलींहि जीविका सेतें[3] ॥ २ ॥
अंभो-दास पहाती जैशीं पसरूनि[4] नित्य आ[4] शेतें ॥
धर्मासि तशीं भूतें[5] करि पूर्ण समर्थ हाचि आशेतें ॥ ३ ॥
निज-हित-कर धर्माचें कुशलें विटवूं नयेचि मन कांहीं ॥
यापरि[6] पोषण पालन लालन करिजे न अन्य जनकांहीं ॥ ४ ॥
साधु म्हणति[7] जो न करी धर्माशीं नीतिशीं विरोधा[7] त्या- ॥
रक्षीं व्यसनीं, तदितर जन उदकीं लोष्ट-सा विरो, धात्या ॥ ५ ॥
म्हणऊनि अनुसरावें सु-ज्ञें न क्रोध-लोभ-काम-मता ॥
पतनार्थ कां अहंता पोषावी गा तशींच कां ममता ॥ ६ ॥

---

## आर्या ; संशय-रत्न-माला

संसारसागरांत बुडत असतां परमेश्वरानें आपणांस तारावें म्हणून मोरोपंतानें त्याचा धावा केला. भक्ताविषयीं अत्यंत प्रेमळ असा ईश्वर भक्ताच्या हाकेसरसा धांवत यावयाचा, असें असून त्याला यावयास उशीर लागला ; हें पाहून मोरोपंत अनेक प्रकारचे संशय घेत आहे, ते पुढील आर्यांत वर्णिले आहेत, म्हणून ह्या प्रकरणास 'संशय-रत्न-माला' (संशयरूप रत्नांची माला) असें नांव दिलें आहे.

---

१ अन्वय–(जो) भवाचा अंत करुनि तरला, (तो) सोनार (जातीचा) नरहरिनामा संत दासमान (भगवद्भक्तांची योग्यता) कसा न पावे ? (आणि) कसा (कसोटीस लाविला असतां) नारदासमान नसो (काय ?). २ मायापाशांस. ३ पिकाला आलेलीं हीं शेतें (जर) मेघें त्यजिलीं (तर) निष्फळ होतात. ४ आ पसरून=मोठ्या उत्कंठेनें. ५ हा शब्द पाहोत ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ६ धर्माप्रमाणें. ७ साधु म्हणति हे धात्या (ईश्वरा), जो धर्माशीं (व) नीतिशीं विरोधा न करी इत्यादि.

उठतां बहु त्वरेनें 'कोठें जातां' असें तुम्हां देवी[१] ॥
पुसती झाली जाणों[२] पुसतां ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥
किंवा नारद आला आलापीत[३] स्वकीय[४] सच्चरितें ॥
प्रेमळ गीत तुम्हांला हरि[५] हरिणापरिस बहुत वश करितें ॥ २ ॥
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें ॥
शरणागत-भय-शमना[६] यास्तव येणें तुझें नसे घडलें ॥ ३ ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ॥
तच्छुभ-दैव-समीरें[७] त्यावरि करुणा-घन प्रभू वळला ॥ ४ ॥
अथवा येतां[८] झालां तन्मय शिव-तांडवांत कैलासीं[८] ॥
केला[९] असेल गरुडें गर्व पुन्हा काय त्याच बैलासीं[९] ॥ ५ ॥
बहुधा बळिचें द्वार क्षणभरिही सोडितां नये देवा ॥
न चुकावी छल-पाप-प्रायश्चित्तार्थ[१०] साधुची सेवा ॥ ६ ॥
प्रायः सु-मुहूर्ताचा शोध करायासि लागला वेळ ॥
होय महत्[११] कार्य परि प्रभुचा तों नित्य सहज हा खेळ ॥ ७ ॥
कीं मी भागवतांचा[१२] भाग[१२] असें आणिलें मनीं स्वामी ॥
हें सत्याचि परि कैंचा हा भेद प्रभु-वरा तुझ्या धामीं ॥ ८ ॥
किंवा तुज एकाकी पाहुनि खळ दैत्य आडवे[१३] आले[१३] ॥
फुटतां सागर सिकता-सेतूचें[१४] काय त्यापुढें चाले ॥ ९ ॥
किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयार्द्र या रंकीं ॥
उद्धरित्यासि न सज्जन गुंतविती गाय कष्टतां पंकीं ॥ १० ॥

---

१ लक्ष्मी. २ कोणी कामाकरितां बाहेर जात असतां त्याला कोठें जातां, असें कोणीं विचारिलें तर तो अपशकुन समजून त्यानें बाहेर जाऊं नये असें आहे; ह्या गोष्टीस अनुलक्षून हें लिहिलें आहे. ३ गात गात. ४ तुमचीं स्वतःचीं. ५ अहो हरि. ६ शरण आलेल्याचें भय नाहींसें करणाऱ्या. ७ त्याचें शुभकारक दैव हाच समीर म्हणजे वायु, त्यानें. ८ येत असतां ( वाटेंत ) कैलासपर्वतावर शिवाच्या नृत्यांत तर तुम्हीं तल्लीन झालां नाहीं ना? ९ एकदां विष्णु कैलासीं शिवदर्शनार्थ गेला असतां त्याचें वाहन गरुड ह्यानें बळाच्या गर्वानें नंदीच्या नाकांत बोटें घालून त्याचा उपहास केला; तेव्हां त्यास मोठा क्रोध येऊन त्यानें गरुडाला श्वासानें नाकांत ओढून घेतलें; अशा रीतीनें त्याच्या गर्वाचा परिहार केला; अशी कथा आहे. १० वामनावतारीं ( बळीचा ) छळ केल्यामुळें जें पाप लागलें त्याच्या प्रायश्चित्ताकरितां. ११ मजसारख्या मोठ्या पातक्यास तारणें हें महत्कृत्य खरेंच. १२ मी ( ईश्वर ) भक्तांच्या मात्र वांट्यास येणारा म्हणजे त्यांसच प्राप्त होणारा. १३ ( युद्धाकरितां ) आडवे आले. १४ वाळूच्या बांधाचें.

किंवा चुकतें कांहीं स्तवनीं तेणेंचि मागुता वससी ॥
तरि हें मन्मूर्खत्व प्रभु तूं दोष-ज्ञही तसा नससी ॥ ११ ॥
कीं[१] कळवाया कर्में धर्में तुज दाविली असेल वही[१] ॥
त्वद्दृष्टि-पुढें राहे ऐसा पापांत त्या नसे लव ही ॥ १२ ॥
कीं न श्रवणीं गेली ही माझी हाक, हा कसा तर्क ॥
कशि गुरु-जनीं सतीची[२] शिवला ज्या कुमुदिनीस असदर्क[३] ॥ १३ ॥
अथवा स्वस्थाचि असली कीं घेतो नाम रक्षणीं शूर ॥
हें सत्य परि प्रबळहि बळ[४] दुर्बळ जरि रणीं धणी दूर ॥ १४ ॥
कीं 'भीतो भ्रांत वृथा मृग-जळ-मग्नासि काय तारावें' ॥
सत्यचि हें, परि शिशुचें भय जाया बागुलासि मारावें ॥ १५ ॥
कीं कांहीं व्रत-नियमीं बोलों चालों नये असें झालें ॥
तरि दीन-रक्षणाहुनि अधिक-फळ-व्रत[५] कधीं मना आलें ॥ १६ ॥
कीं हाक ऐकतांचि प्रभुला हा रक्षणार्हसें वाटे ॥
वाटे या[६] दुःशील-ग्रीष्मीं[६] तव नव दया-नदी[७] आटे ॥ १७ ॥
कीं पावावें समयीं सदय मनांतून योजिलें जरि तें ॥
तरि[८] जेविं रुक्मिणीचें चित्ता माझें अधीर मन करितें[८] ॥ १८ ॥
किंवा पुराण-पुरुषा[९] संप्रति बहु भागलासि या कामीं[१०] ॥
तुज नीज लागली तों सजलों मारावयासि हाका मी ॥ १९ ॥
किंवा बरी परीक्षा केल्यावांचूनि न प्रसाद करा ॥
तरि वरि तसाच आंतहि उगाळितां कोळसा, प्रयास[११] करा[११] ॥ २० ॥

---

१ यम हा प्राणिमात्राचीं सर्व कर्में जींत लिहून ठेवीत असतो, ती. अशा महापातकी मनुष्यास तारणें योग्य नाहीं, असें म्हणून यमानें तुला माझीं पातकें दाखविलीं असतील. असा संशय. २ पतिव्रता द्रौपदी हिची. ३ (असत्+अर्क) खलदुःशासनरूप सूर्य. ४ सैन्य. ५ (दीनरक्षणापेक्षां) अधिक आहे फल ज्याचें असें व्रत. ६ हा मी (मोरोपंत) जो अत्यंत दुष्ट स्वभावाचा हाच ग्रीष्मऋतु ह्यांत (हे ईश्वरा) तुझी. ७ दयारूप नदी आटे (आटली). ८ तुम्हीं जरी मला प्रसंगीं पावावयाचा संकेत केला असेल, तरी तुम्ही अतिप्रिय व दुर्मिल असल्यामुळें विवाहाच्यापूर्वी रुक्मिणीचें मन जसें तुम्हांविषयीं अधीर झालें होतें तसें माझें मन अधीर झालें आहे असा भाव. ९ म्हातारा. पक्षीं अनादि. १० दीनांचा उद्धार करण्याच्या कामांत. ११ हातास श्रम (मात्र होईल).

कीं धाडिलें पुढें निजनाम करो सर्व सिद्धता आधीं ॥
ऐसें प्रभो म्हणावें तरी तुमचीं चरण-सारसें साधीं[१] ॥ २१ ॥
कीं आर्जविला[२] नाम-प्रतिनिधि हा अमृत उधळितो स्वैर[२] ॥
न पुसे, न भी, न ऐके[२] यास्तव दोघांत[३] लागलें वैर ॥ २२ ॥
कीं संप्रति अभय दिलें कलिला चालावया बरें राज्य ॥
परि कोण प्राणि सदय शिंपील बळें दवानळीं आज्य ॥ २३ ॥
किंवा म्हणसि समर्थोहं[४] कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं[४] ॥
दीनावनाविणें[५] क्षण देइल दयिता[६] दया[६] कशी वर्तुं[७] ॥ २४ ॥
कीं अक्ष-क्रीडेनें[८] हरिलें मन, सर्व कार्य जी चुकवी[९] ॥
तरि बद्ध-मूळ[१०] एकचि भजदवन-व्यसन[११] वर्णिती सु-कवी ॥ २५ ॥
कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे नसावेंची ॥
वसवा पुरें, पुरे कां म्हणतां, धनवंत कण कसा वेंची[१२] ॥ २६ ॥
कीं बहुकाळ विसरला फारचि संकोचला सखा लाजे ॥
येत असेल हळुहळू म्हणुनाचि एकहि न पादुका वाजे ॥ २७ ॥
कीं नाम स्पर्श-मणि स्पर्शे परि काय करिल खापर मी ॥
सदयहि घालील कसा दुर्दैवाला सुखीं सखा परमी ॥ २८ ॥
कीं प्रथम मदपराधें तारूं ना म्हणुनि वाहिल्या आणा ॥
प्रभुजी पुरे प्रतिज्ञा, भारत-रण-वृत्त[१३] तें मनीं आणा ॥ २९ ॥
कीं याचकांसि देता सरले चारीहि[१४] मुक्ति-धन-राशी[१४] ॥
भक्तिच मज द्या, द्यावें देवाला अमृत, योग्य न नराशी ॥ ३० ॥
कीं जरि म्हणाल 'असतां जन्म-शुचि[१५] स्व-पद-नीर-जा मिळतो'॥
तरि झकवितां मला अजि चुकला नव्हताचि कीं अजामिळ तो ॥ ३१ ॥

---

१ ज्यांना डामडौल आवडत नाहीं अशीं. २ नाम हा तुझा प्रतिनिधि ह्याचें (कोणीं) आर्जव केलें असतां तो यथेच्छ मोक्ष देतो; व तुम्हांला पुसत नाहीं इत्यादि. ३ तुझ्यां दोघांत. ४ समर्थः (समर्थ) अहं (मी) कर्तुं (कोणतीही गोष्ट करावयास). अकर्तुं (को० गो० न करावयास). अन्यथा कर्तुं (को० गो० उलट करावयास). ५ दीनांच्या रक्षणावांचून. ६ तुमची आवडती दया. ७ वागावयास. ८ सोंगटी खेळण्यानें. ९ (कार्य करण्यांत) विघ्न आणिते. १० दृढ झालेलें. ११ भक्तांचें रक्षण हेंच व्यसन. (छंद.) (भजत् + अवन). १२ वेंचतो (सांचवून ठेवतो). १३ कृष्णानें 'मी शस्त्र धरणार नाहीं' ही प्रतिज्ञा अर्जुनाचें रक्षण करण्याकरितां मोडिली. ह्या कथेस अनुलक्षून हें लिहिलें आहे. १४ सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्य असे मुक्तीचे चार प्रकार आहेत. १५ जन्मापासून पवित्र.

कीं वाटलें खळाला मुक्ति न द्यावी जशी सुधा सर्पा ॥
तरि ती अघादिकांला[1] द्या, सु-वरा भक्ति-मात्र मज अर्पा ॥ ३२ ॥
कीं अ-कृपा नावडती आवडती स्त्री कृपा तिचें प्राज्य[2] ॥
लोक-त्रयांत देवा पहिलींचें[3] काय एक मी राज्य[4] ॥ ३३ ॥
कीं गमलें जरि आधीं[5] म्हणतों दावा[6] स्व-पाद या[6] लोकीं ॥
जो जो वांछिल जें जें तें द्यावें हें मुधा[7] दयालो कीं ? ॥ ३४ ॥
कीं आज काल ज्याचा तेणें अधिकार घेतला रागें ॥
तरि हें अ-श्रद्धेय[8] प्रभ्वंतर[9] ऐकिलें नसे मागें ॥ ३५ ॥
कीं भेटि बहुदिसां भय भेटाया दीन-बंधुला वाटे ॥
तरि[10] भेटावें विधिनें गेले ; जाताति साधु ज्या वाटे[10] ॥ ३६ ॥
कीं स्त्री-पूर्व-शिखंडी[11] त्यातें समरांत भीष्म पाहेना ॥
मीही[12] पहिला पापी तैसें करितां[12] सु-कीर्ति राहेना ॥ ३७ ॥
कीं भीशी मज एका उद्धरितां लागतील फार झटें ॥
तरि कोणाहि न कळतां न्यावा झांकूनि दास पीत-पटें ॥ ३८ ॥
कीं लक्ष-भोजनापरि केला संकल्प संपला देवा ॥
तरि दाते क्षुद्विकला[13] मग न म्हणाति काय 'या बसा जेवा' ॥ ३९ ॥
कीं मीच एक उरलों पापी, हें बीज ठेविलें जतन ॥
वतन[14] स्वकीय मज कां करितें[15] त्वन्नाम मंगलायतन[16] ॥ ४० ॥
कीं कार्य-बहु-त्वें तुज फावेना यावया जगत्पाळा ॥
तरि रूप घ्या दुजें, ती विद्या कंठीं वसे जशी माळा ॥ ४१ ॥
कीं मागें गुप्त उभा असासि प्रेमें उभारुनी बाहे[17] ॥
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकशी बा हे ॥ ४२ ॥

---

१ अघासुरादिकांला. हरिविजय (श्रीधर) अध्याय १४ पहा. २ पुष्कळ. ३ अकृपेचें. ४ अधिकार चालविण्याचें स्थान. ५ योग्यता येण्याच्या पूर्वीं. ६ मृत्युलोकीं आपलें दर्शन (मला) द्या असा अर्थ. ७ व्यर्थ. ८ विश्वास न ठेवण्याजोगें. ९ (प्रभु+अंतर) दुसरा ईश्वर. १० बारा वर्षांनंतर आप्ताची भेट घेणें झाल्यास सांबाच्या देवालयांत भेट घ्यावी, असा कांहीं विधि आहे ; त्या विधीनें. ११ (पूर्वीं स्त्री असून पुढें पुरूष झालेला) शिखंडी—कौरवपांडवांच्या युद्धांत भीष्म आटोपेना, तेव्हां पांडवांनीं शिखंडीला पुढें करून मागून, अर्जुनानें बाण मारावे, असें योजिलें. ह्यांत उद्देश हा कीं, भीष्म स्त्रीवर कधीं बाण सोडणार नाहीं. ह्या गोष्टीस लक्षून हें लिहिलें आहे. १२ मी पूर्वींचा पापी म्हणून मला न पाहाणें असें कराल तर. १३ भुकेनें व्याकुल झालेल्यास. १४ हक्काची जागा. १५ तुझें परम मंगलकारक नांव मुखीं येत असतां मी खचीत तरल्यावांचून राहणार नाहीं हा भाव. १६ कल्याणाची जागा. १७ हात.

## केकावली. परमेश्वर-प्रार्थना

केका म्हणजे मोराचा शब्द आणि आवली म्हणजे पंक्ति. मोरोपंतानें आपणास मयूरपक्षी कल्पून आपण ईश्वरास मारलेल्या हाकांना केकावली अशी संज्ञा दिली आहे.

### पृथ्वी-छंद

तुझ्या बहुत शोधिले[१] अघ-निधी[२] पदांच्या रजें ॥
न तें अनृत वर्णिती बुध[३] जनीं सदाचार जें ॥
असें (से) सतत ऐकते[४], सतत बोलते[४], मीच ते-[५] ॥
प्रमाण[५] न म्हणों जरी उचित माझिया नीचते[६] ॥ १ ॥ (३)

तसाचि उरलों कसा पतित मी नसें काय, कीं-[७] ॥
कृपाचि सरली, असेंहि न घडे जगन्नायकीं ॥
नसेन दिसलों कसा, नयन सर्व-साक्षी रवी, ॥
विषाद धरिला म्हणों, न[८] सुरभी विष क्षीर वी[८] ॥ २ ॥ (४)

मला निरखितां भवच्चरण-कन्यका[९] आपगा ॥
म्हणे 'अगइ[१०] ऐकिलेंहि न कधीं असें पाप' गा ॥
कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, वे भीतिला[१०] ॥
न घालिन भिडेस मी जरिहि कार्य-लोभी तिला ॥ ३ ॥ (१०)

सदैव नमितां जरी पद[११] ललाट केलें[११] किणें ॥
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें[१२] ॥
नता करुनि मुक्तही म्हणसि 'मी बुडालों रिणें' ॥
अशा तुज न जो भजे मनुज, धिक् तयाचें जिणें ॥ ४ ॥ (११)

---

१ शुद्ध केले. २ पापाचे राशीच (असे लोक). ३ जनीं सदाचार (चांगलें आचरण करणारे) बुध (ज्ञानी पुरुष) जें (प्रथमचरणांतलें) वर्णिती तें अनृत (खोटें) न (नाहीं). ४ ऐकणारे व बोलणारे (लोक). ५ ते प्रमाण न (ते खरे नाहींत) असें मी जर म्हणेन तर. ६ हलकेपणास. ७ अथवा. ८ सुरभि (कामधेनु) जरी कोपली तरी विष कधींही विणार (देत) नाहीं क्षीर (दूधच) देते. ९ तुमच्या पायांची कन्या (पायांपासून उत्पन्न झालेली) नदी (भागीरथी). १० या पद्यांत 'स्वभावोक्ति' नामक अलंकार आहे. ११ ललाट (कपाळ) किणें (घट्ट्यानें) पद (स्थान) केलें किंवा 'सदैव पद नमितां जरी ललाट किणें केलें' कपाळास जरी घट्टे पडले असा अर्थ. १२ आपल्या चरणकमलावांचून.

सदैव अपराध हे रचितसें असे कोटि गा ॥
स्वयेंहि कथितों, नसे तिळहि लाज मी कोटिगा[१] ॥
अजांड-शत-कोटि ज्या उदरिं सर्वदा नांदवा ॥
न त्यांत अवकाश या, स्थळ दिलें तदा कां दवा[२] ॥ ५ ॥ (१७)
दयाब्द वळसील तूं तरि न चातकां सेवकां ॥
उणें किमपि, भाविकां उबगशील तूं देव कां ॥
अनन्य-गतिका[३] जना निरखितांचि[४] सोपद्रवा[४] ॥
तुझेंचि करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा[५] ॥ ६ ॥ (२०)
कळी करि सु-निर्मळीं परम उग्र दावा नळीं[६] ॥
तयांत[७] अ-विशुद्ध[८] मी शलभ जेविं दावानळीं ॥
व्रणार्त[९] (र्थ) पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे- ॥
स्मरादिरिपु[१०] मन्मनीं, अहि न काळ[११] भेका कसे ॥ ७ ॥ (२१)
धना परिजना घरीं तुमचिया उणें कायसें ॥
न लाभ मणि-हेम-भूपतिस[१२] जोडिल्या आयसें ॥
परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती ॥
गुणा न म्हणतां उणा[१३], अधिक[१३] आदरें सेविती ॥ ८ ॥ (२३)
अ-तर्क्य महिमा तुझा, गुणहि फार, बा हे विधी ॥
श्रुति-ज्ञहि म्हणे सदा, स्तविल आमुची केविं धी ॥
तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती ॥
स्तवार्थ तुझिया तुझ्या सम कवी कधीं जन्मती ॥ ९ ॥ (२७)
निज-स्तुति तुम्हां रुचे स्तविति त्यां वरें तर्पितां ॥
नमस्कृति-परां बरें स्व-धन सर्वही अर्पितां ॥
स्वभाव तुमचा असा विदित जाहला याचकां ॥
करूं स्तव जसातसा फळ नव्हे जना याच कां ॥ १० ॥ (२८)

---

१ कोडगा, निर्लज्ज. २ दावाग्नीला. श्रीधर—हरिविजय, अध्याय ११ पाहा. ३ नाहीं (आपणावांचून) दुसरा थारा ज्याला. ४ पीडलेले असे पाहतांच. ५ कळवळ्यास. ६ नळराजाविषयीं. ७ त्या कळीच्या झपाट्यांत. ८ अत्यंत अपवित्र (सांपडलों आहे). ९ जखमेनें पीडलेल्या. १० कामादि शत्रु. ११ अहि (सर्प) भेका (बेडकाला) काळ कसे न (होतील)? १२ आयसें मणि-हेम-भू-पतिस जोडिल्या लाभ न, असा अन्वय. १३ गुणानें कमी किंवा जास्त असें न म्हणतां त्यास आदरानें सेवितात.

'तुम्ही परम चांगले बहु-समर्थ दाते असे ॥
सु-दीन जन मी तुम्हां शरण आजि आलों' असें ॥
पुन्हांहि कथितों बरें श्रवण हें करा यास्तव ॥
समक्ष[१] किति आपुला सकळ-लोक-राया स्तव ॥ ११ ॥ (२९)

किती[२] श्रवण झांकिती प्रभुहि[२], काय ते पोळती ॥
पुसाल जरि कोण ते, पद-रजीं तुझ्या लोळती ॥
बरें तुजचि सोसवे स्तवन, कृत्ति-वासा[३] गरा- ॥
न पी[३], तरि कसें घडे, हित-करा दया-सागरा ॥ १२ ॥ (३०)

गमो मधुर हें विष स्तवन, सेवितां माजवी ॥
करी मलिन सद्यशो-मुख,[४] हलाहला लाजवी ॥
हरापरिस[५] तूं बरा प्रभु-वरा सदा जो पिशी ॥
असा रस समर्पि त्या अमृत आपुलें ओपिशी[६] ॥ १३ ॥ (३१)

प्रभो शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे ॥
म्हणोनि इतुकेंचि हे स्व-हित-कृत्य जीवांकडे ॥
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा खरें ॥
घनांबु[७] न पडे मुखीं उघडिल्याविना[७] पांखरें[७] ॥ १४ ॥ (४०)

शिवे न तुझिया पदा अदयताख्य[८] दोष क्षण ॥
प्रभो चुकतसों तरी करिशी तूंचि संरक्षण ॥
नसेचि[९] शरणागती घडलि सत्य अद्यापि ती[९] ॥
रुचे विषय[९], ज्यां मिळे अमृत ते न मद्या पिती ॥ १५ ॥ (४१)

---

१ तुमच्या तोंडावर. २ कित्येक प्रभुही, (समर्थ स्तुतिपात्र असेही लोक) कोणी आपली स्तुति समक्ष करूं लागलें असतां जसे काय पोळतात व (आपले) हात कानावर ठेवितात. ३ (जर) महादेव विष न पिता तर (लोकांची) कशी अवस्था झाली असती ? म्हणून भक्तांकरितां स्तवनरूप विष तुम्हांला सोसणें अवश्य आहे हें तात्पर्य. ४ चांगली कीर्ति हेंच मुख. ५ महादेवापेक्षां तूं बरा ; कारण तो एकदांच विष प्याला आणि तूं (स्तुतिरूप विष) नित्य पितोस. ६ देतोस. ७ चातकपक्षानें तोंड उघडल्या-खेरीज पर्जन्याचें पाणी त्याच्या तोंडांत पडत नाहीं, तद्वत तुम्हांस शरण आल्याशिवाय तुमचा प्रसाद व्हावयाचा नाहीं. हा सारांश. ८ अदयता (निर्दयपणा) ह्या नांवाचा. ९ अद्यापि (माझी) ती शरणागती (शरण येणें) सत्य घडली नसेचि ; (कारण कीं मला अद्यापि) विषय रुचे ; असा अन्वय.

म्हणा[१] मज उताविळा गुणाचि घेतला[१], घाबरें- ॥
असो मन असेंचि बा भजक-बर्हि-मेघा[२] बरें ॥
दिसे क्षणिक सर्व हें,[३] भरंवसा घडीचा कसें- ॥
धरील मन, आधिनें बहु परिभ्रमे चाकसें ॥ १६ ॥ (४९)

कृतांत-कटकामल-ध्वज[४] जरा[४] दिसों लागली ॥
पुरःसर-गदांसवें[५] झगडतां तनू भागली ॥
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा ॥
न हों जरि उताविळा, स्व-रिपु[६] कापितो हा गळा ॥ १७ ॥ (४६)

कथा-सुरभि[७] या भल्या स्व-जननीहुनी वाटती ॥
शिशूंसि जरठांसही निरखितां रसें[८] दाटती[८] ॥
दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती ॥
स्व-वत्स-मल[९] भक्षिती परि न सर्वथा बाटती ॥ १८ ॥ (९८)

असो वरि कसा तरी विमल भाव ज्याचा करा- ॥
तयावरि दया, पचे वर असाचि द्या चाकरा ॥
वृथाचि गमतें दिलें बहुहि जें न दासा जिरे ॥
पुसोनि अधिकार द्या, सु-कर तें सदा साजिरें ॥ १९ ॥ (६७)

तुझ्या समाचि हें गुणें, अणु उणें नसे नाम, हा[१०]- ॥
दिसे अधिकही तसा गुण तुला असेना महा ॥
सदैव भलत्यासही[११] सुलभ, आणखी गायका- ॥
छळी न, न अधो-गति[१२] क्षणहि दे जगन्नायका ॥ २० ॥ (७९)

१ उतावळेपणा हा तुम्हीं माझा गुणच घेतला, (दोष नव्हे असें मी समजतों). २ भक्तरूप मोरांस मेघासारखा. ३ हें जग. ४ जरा (म्हातारपण) हाच यमाच्या सैन्याचा पांढरा ध्वज. ५ अग्रभागीं येणाऱ्या रोगांबरोबर. ६ आपला शत्रु—मृत्यु. ७ कथारूप कामधेनु. ८ त्यांस पान्हा फुटतो. ९ आपल्या वत्सांचा मल म्हणजे पुरीष, पक्षी-पातक. १० तिसऱ्या व चौथ्या चरणांत सांगितलेला गुण. ११ अनधिकाऱ्यासही. १२ विष्णूनें वामनावतारीं बळीशीं कपट केलें व त्यास अधोगति दिली म्हणजे पाताळांत घातलें ही गोष्ट सुचवून कवीनें ईश्वरापेक्षां नामाचें महत्त्व वर्णिलें आहे.

छळाल कृपणासि कां अजि दया-निधे, कांपिती- ॥
भटासि भट संगरीं, परि न कातरा दापिती ॥
कराल तितुकी कृपा बहु, अहो शरण्या, तमीं[१]- ॥
बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत[२] मी ॥ २१ ॥ (७९)
तयीं[३] प्रभुवरा तसे सदय, कां असे[४] आज हो ॥
विचारुनि पहा बरें निज-मनीं महा-राज हो ॥
वनोवनिं फिरां पिशापरि, म्हणा अहो-रात्र 'हा'[५] ॥
नसे कुशल भाषणीं परि असे कृपा-पात्र हा ॥ २२ ॥ (८१)
न जें प्रिय स-दोष तें, प्रिय स-दोषही चांगलें ॥
स्व-तोक पितरां रुचे जरिहि कर्दमीं रांगलें ॥
तुलाचि धरि पोटिशीं कशि तदा यशोदा बरें ॥
जरी मळविशी रजो-मलिन-काय[६] तूं अंबरें[७] ॥ २३ ॥ (८५)
प्रसिद्ध तुमचे महा-सदय पाय, जीवांकडे- ॥
चुकी म्हणुनि होतिल क्षणहि काय जी वांकडे ॥
न निष्ठुर[८] पिता म्हणे मनिं न हो प्रजा टोणपी ॥
अपथ्य-रुचि[९] रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी ॥ २४ ॥ (८९)
असंख्य खळ संगरीं निज-करीं तुवां मारिले ॥
न निष्ठुरपणें, कृपा करुनि ते भवीं तारिले ॥
जगज्जनक तूं मुलें सकळ जीव, यां भातुकें ॥
दटावुनिहि देशि बा अमृत नेदिजे घातुकें ॥ २५ ॥ (९०)
सदाहि हित नायकों बहु अपाय केले, करूं ॥
तरी स-कृप बाप तूं म्हणसि, 'नायके लेंकरूं' ॥
कधीं न करिसी प्रभो भजक-बालकोपेक्षण[१०] ॥
न तूजवरि ज्यापरी पशु-प-पाळ[११] कोपे क्षण ॥ २६ ॥ (९२)

---

१ अज्ञानांधकारांत. २ संसाररूप अरण्यांत. ३ रामावतारीं सीता रावणानें नेली असतां त्यावेळीं. ४ असे निर्दय. ५ हायहाय. ६ धुळीनें मळलें आहे शरीर ज्याचें. ७ वस्त्रें. ८ पिता (बाप) निर्दय नसतो; फक्त त्याच्या मनांत इतकेंच असतें कीं, आपली संतति मूर्ख न व्हावी. म्हणून तो तीस शासन करितो. ९ प्रकृतीस न मानणाऱ्या पदार्थांविषयीं ज्याला आवड आहे असा—आम्हांला विषयाची गोडी असल्यामुळें पहिल्यानें कठीण वाटणारा असा जो सन्मार्ग तो कसा गोड लागेल? हा अर्थ येथें विवक्षित आहे. १० भक्तरूप (बालक + उपेक्षण) लेंकराची उपेक्षा. ११ गवळ्यांचा नायक—नंद.

पिता जरि विटे विटो न जननी कु-पुत्रीं विटे ॥
दयामृत-रसार्द्र-धी[१] न कुल-कज्जलें[२] त्या किटे[३] ॥
प्रसाद-पट[४] झांकिती परि परा[५] गुरूचे[५] थिटे ॥
म्हणूनि म्हणती भले, 'न ऋण जन्म-देचें फिटे' ॥ २७ ॥ (९५)

अशी तरि कृतज्ञता हरि, तुझ्याच ठायीं अगा ॥
सख्या, अणुचि मानिसी करुनि सु-प्रसादा अ-गा[६] ॥
भुले सु-कवि-वाग्वधू[७] तव गुणा अनर्घ्या-नगा[८] ॥
म्हणेल जन कोण कीं यश पुनःपुन्हा तें न[९] गा[९] ॥ २८ ॥ (९९)

करा श्रवण एवढें अ-पटु लोक हांसो मला ॥
अहो, जरि गिळावया प्रिय कुमार घे सोमला ॥
तयासि ठकवूनि दे बहुत शर्करा माय जी ॥
तिला स्व-शिशु-वंचनें अदयता शिवे काय जी ॥ २९ ॥ (१०६)

सु-संगति सदा घडो, सुजन-वाक्य कानीं पडो ॥
कलंक मतिचा झडो विषय सर्वथा नावडो ॥
सदंघ्रि-कमळीं[१०] दडो[१०] मुरडितां हटानें अडो ॥
वियोग घडतां रडो, मन[११] भवच्चरित्रीं जडो ॥ ३० ॥ (११८)

न निश्चय कधीं ढळो कुजन-विघ्न-बाधा टळो ॥
न चित्त भजनीं चळो मति सदुक्त-मार्गीं वळो ॥
स्व-तत्त्व हृदया कळो दुरभिमान सारा गळो ॥
पुन्हा न मन हें मळो दुरित आत्म-बोधें जळो ॥ ३१ ॥ (११९)

मुखीं हरि, वसो तुझी कुशल-धाम[१२] नामावली ॥
क्षणांत पुरवील जी सकळ कामना मावली ॥
कृपा करिशि तूं जगत्रय-निवास दासांवरी ॥
तशी प्रकट हे[१३] निजाश्रितजना सदा सांवरी ॥ ३२ ॥ (१२०)

---

१ दयारूप अमृतरसानें स्निग्ध आहे अंतःकरण जिचें अशी. २ कुलाला कलंक लावणारा जो पुत्र त्याच्या योगानें. ३ मळत नाहीं, म्हणजे तिची त्याच्यावरची ममता कमी होत नाहीं. ४ प्रसादरूप वस्त्रें. ५ श्रेष्ठ बापाचे. ६ पर्वतप्राय. ७ सुकवींची वाणी हीच उपवर कन्या. ८ बहुमोल अलंकाराला. ९ नका गाऊं. १० साधूंच्या चरणकमलीं सक्त होवो. ११ हा शब्द दडो इत्यादि क्रियापदांचा कर्ता. १२ कल्याणाचें केवळ स्थानच अशी. १३ नामावली.

दयामृत-घना अहो हरि, वळा मयूराकडे ॥
रडे शिशु तयासि घे कळवळोनि माता कडे ॥
असा अतिथि धार्मिक-स्तुत-पदा[1] कदा सांपडे ॥
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे ॥ ३३ ॥ (१२१)

---

## अंबरीषाख्यान

(श्रीमद्भागवत स्कंद ९ अ० ४ व ५)

मागें सूर्यवंशांत अंबरीष या नांवाचा राजा होऊन गेला. तो परम विष्णुभक्त असल्यामुळें एकादशीव्रत करीत असे. एके दिवशीं साधनद्वादशीचा काल अगदीं थोडा असतां त्याजकडे दुर्वास ऋषि गेला. राजानें ऋषीचा सत्कार करून त्यास भोजनास बोलाविलें. तें ऐकून ऋषि कालिंदीवर स्नानास गेला. तिकडून यावयास त्यास उशीर लागला असें पाहून व भोजनास उशीर केला असतां साधनद्वादशीचा काल निघून जाईल म्हणून राजानें तीर्थ प्राशन केलें. आपणास टाकून आधीं राजानें पारणा केली म्हणून दुर्वासास फार राग आला. त्यानें आपल्या जटेंतून एक कृत्या उत्पन्न करून तिला राजाचा छल करण्यास सांगितलें. श्रीविष्णूनें राजाच्या रक्षणाकरितां सुदर्शनचक्र मागेंच दिलें होतें, त्यानें तिच्यावर एकदम चाल केली. तेव्हां ऋषि तेथून भिऊन पळाला. चक्र त्याच्या मागें लागलें. ऋषि ब्रह्मलोक, कैलास इत्यादि लोक फिरला; परंतु त्यास आश्रय कोठें मिळेना. शेवटीं तो वैकुंठीं विष्णूस शरण गेला व चक्रापासून रक्षण करण्याविषयीं त्याची प्रार्थना करूं लागला. 'मी भक्ताधीन आहें, माझ्या भक्तालाच शरण जा, याशिवाय रक्षणाचें दुसरें साधन नाहीं,' असें विष्णूनें सांगितल्यावरून दुर्वास हा पुनः अंबरीषाकडे परत आला व त्यास शरण गेला. त्याची ती स्थिति पाहून राजाला दया आली व त्यानें हात जोडून चक्राची प्रार्थना केली व त्यास मागें फिरविलें. ही कथा येथें वर्णिली आहे.

---

१ धर्मशील जनांनीं स्तविलीं आहेत पदें ज्याचीं अशा तुला.

## श्लोक

स्रग्धरा. अत्युग्र ब्रह्म-शापादिकहि हरि-जना ताप नेदीच कांहीं ।
जो कोणी देव-दास-च्छळक खळ तया रक्षिता अन्य[1] नाहीं ॥
रक्षी साधूचि येतां शरण निपटुनी त्यागितां उद्धत-त्व ।
ज्ञाते हें अंबरीष-क्षिति-पति-चरितीं पाहती शुद्ध तत्त्व ॥ १ ॥

शा० वि०. दुर्वासा भगवान् करी छळ बळें, हें तत्त्व दावी जनीं ।
कीं माझीहि अशी दशा हरि-जन-द्वेषें धरा हें मनीं ॥
दैवें भागवतीं[2] विरोध घडतां त्यांचीं धरा पावलें ।
संसारांत तरा, म्हणाल मजला खोटा म्हणा पावलें[3] ॥ २ ॥

पूर्वीं भू-पति अंबरीष रविच्या वंशीं महात्मा असे ।
धर्में राज्य करी सदैव भगवद्भक्तांत भावें वसे ॥
भासे सिंहचि संगरांत गमती तच्छत्रु राजे ससे ।
तो शांतांत[4] नितांत[5] शांत कमळा-कांतींच चित्तें वसे ॥ ३ ॥

राजा साधु-समागमें समजला संसार निःसार-सा ।
सेवी श्री-पतिच्या पदा अलि जसा अत्यादरें सारसा[6] ॥
नामाची धरि कास दास करुनी सद्भक्तिचा आसरा ।
प्राशी निर्मल विष्णुचेंचि यश जें हांसे सुधेच्या सरा ॥ ४ ॥

ज्यांमध्यें बहु दक्षिणा सु-विधिवत् विप्रादि-संतर्पण ।
प्रेमें यज्ञ करूनि सर्व करि ते श्री-विष्णुला अर्पण ॥
आंगें होउनि सत्तपो-हुतवहीं[7] तो सर्वदा सर्पण ।
स्वच्छ-त्वें नृप जाहला सु-मणिचा जैसा नवा दर्पण ॥ ५ ॥

तो भूतीं सम-दृष्टि साधु-भजनीं राबे, सदा सांवरी ।
आंगें दृग्विकळादिकांसि[8], भर[9] हा टाकी न दासांवरी ॥
सेवेवांचुनि आपुल्या न विषयीं याचें शरीर क्षण ।
श्रीशें जाणुनि हें सुदर्शन दिलें त्याचें करी रक्षण ॥ ६ ॥

---

१ साधूंवांचून इतर. २ भगवद्भक्तांच्या ठिकाणीं. ३ पुरवलें. ४ शांत अंत:करणाचा. ५ अत्यंत. ६ कमळाला. ७ (सत्+तपस्+हुतवह) चांगलें तप हाच अग्नि त्यांत. ८ आंधळे वगैरे व्यंग लोकांस. ९ ओझें.

स्रग्धरा. सोडीना सु-व्रतें तो जसिं जलधि-जलें तापलें याद[१] शीतें ।
विष्णु-प्रीत्यर्थ वर्षाऽवधि करुनि करी साधन-द्वादशीतें[२] ॥
गेला निर्विघ्न सिद्धी-प्रति नियम न[३] त्या लागला[३] शब्द[३] ' सारा[४] ।
कीर्ति श्री-माधवाच्या सतत परिसतां संपला अब्द सारा ॥ ७ ॥

शा० वि०. गो-दानें शुभ साठि लक्ष नृप दे विप्रोत्तमांकारणें ।
दे वाजी गजही जयांसि हरिच्या[५] गावें हयें वारणें ॥
तर्पी ब्राह्मण-वृंद तृप्ति अ-तुला दावी तयां अन्न ती ।
देवांलाहि न दे स्वयें अमृत तें यातें[६] करी सन्नती ॥ ८ ॥

स्वाद्वन्नें परमादरें करुनियां विप्रोत्तमां तर्पुनी ।
त्यांतें कांचन दक्षिणा सु-वसनें सद्भूषणें अर्पुनी ॥
आज्ञा घेउनियां व्रतोक्त-नियमा रक्षावयाकारणें ।
तो राजेंद्र करी उपक्रम सुखें साधावया पारणें ॥ ९ ॥

तों जो केवळ सर्व कालहि तपस्येसीं सुखें रातला ।
ज्याच्या उग्रपणा प्रणाम अ-सकृत् कल्पानलें वातला ॥
जेणें शक्रहि[७] शिक्षिला जइं महा संपन्मदें मातला[७] ।
दुर्वासा भगवंत तो अतिथि त्या काळीं स्वयें पातला ॥ १० ॥

पुष्पिताग्रा. मुनिस निरखितांचि होय दास ।
प्रमुदित जेविं मयूर तोय-दास ॥
नमुनि बसविला वरासनींच ।
स्तवि नृप जेवि उमा-वरास नीच[८] ॥ ११ ॥

द्रु० वि०. अमृत-सिंधु तुम्हीच विभो जनीं ।
जरि धरा न तुम्ही चवि भोजनीं ॥
मदुदयार्थ अहो तरि जेमन[९] ।
प्रभु करूनि सुखी करिजे मन ॥ १२ ॥

---

१ जलचर प्राणी. २ एकादशीचा उपवास करून दुसऱ्या दिवशीं द्वादशी संपली नाहीं तों पारणा सोडावयाची ह्यास साधनद्वादशी म्हणतात. ३ दोष लागला नाहीं. ४ श्रेष्ठ. ५ इंद्राच्या. ६ अन्नांत. ७ दुर्वास ऋषीनें, इंद्र ऐश्वर्यानें मदोन्मत्त झाला होता म्हणून, त्यास शाप दिला होता कीं तुझी संपत्ति समुद्रांत पडेल. ८ पामर. ९ जेवण.

व० ति०. ऐसें हळूचि नृप जोडुनि हात याची ।
ती आयके विनवणी मुनि हा तयाची ॥
स्नानार्थ जाय मग नायक तापसांचा ।
कृष्णेसि जी नुरवि लेशहि ताप साचा ॥ १३ ॥

हरिणी. प्रथम अमृतीं कालिंदीच्या करी मति-मज्जन- ।
स्तुत-पद[1] मग ब्रह्म-ध्यानामृतीं अति मज्जन ॥
उठविल कसा सुत स्वांकीं महा अहि, साधुनीं ।
शुचिपण दिलें तीर्थां गंगादिकांसहि साधुनी[2] ॥ १४ ॥

पृथ्वी. उशीर बहु लागतां नृपति पावला आधिला[3] ।
म्हणे, 'नियम-पारणा-समय[4] पाहिजे साधिला'॥
तपो-व्रत-जप-क्रतु-प्रमुख-धर्महीं साधुनी ।
मनेंहि न वि-लंघिली अतिथि-सत्क्रिया साधुनीं ॥ १५ ॥

द्रु०वि०. परम संकट तें मन घाबरें । करि म्हणोनि तया अनघा बरें ॥
श्रुति-मत[5] द्विज सांगति वारितें-। पिउनि हो अघ हे स्थिर वारितें ॥१६॥

मालिनी. अशन न जल-पानें होय पीतांहि पाणी ।
अनशनहि नव्हेचि स्पष्ट हे वेद-वाणी ॥
श्रुतिस अनुसरे जो त्यासि कोणी न दापी ।
म्हणुनि मुनि-मतें तो तोय राजा तदा पी ॥ १७ ॥

स्रग्धरा. तों दुर्वासा करूनि स्नपन[6] जप[6] बृहद्ध्यान[6] तत्काळ आला ।
प्याला भूपाळ पाणी त्यजुनि अतिथिला यास्तव क्रुद्ध झाला ॥
अत्युष्ण श्वास टाकी अहि खवळविला मांत्रिकें तेविं डोले ।
तोले कल्पांत-रुद्रासम मग भगवान् तो असें त्यासि बोले ॥१८॥

पृथ्वी. 'अरे कुमति दुर्जना गुरु-अलंघ्य तें पारणें ।
न मी गुरु अ-लंघ्य हें स्व-मत ह्या[7] जनाकारणें[7] ॥
स्वयेंचि कळवावया प्रथम आदरें बाहिलें ।
असें मग विलंघिलें नवल आजि म्यां पाहिलें ॥ १९ ॥

---

१ बुद्धिमान् लोक (मतिमेत्+जन) यांनीं स्तविले आहेत पाय ज्याचे असा दुर्वास ऋषि. २ मिळवून. ३ मनोव्यथेला. ४ नेमलेली पारण्याची वेळ. ५ वेदाला संमत गोष्ट. ६ स्नान, जप व (बृहत्+ध्यान) ब्रह्मचिंतन. ७ मला.

स्रग्धरा. हा दुर्वासा अ-लंघ्य त्रि-भुवनिं सकळां भूसुरांमाजि राया ।
सत्कार प्राप्त झाला बहु बहु दिवसां ब्राह्मणा साजिरा या ॥
आम्ही सेवानुरूप त्वरितचि फळतों त्या वृथा वाद[1] पांचा[1] ।
देवांच्या[1] सु-प्रसिद्धां भजक-जन-तृषा-पूरकां पादपांचा[1] ॥ २० ॥

प्रहर्षिणी. कर्मांचा तुज परिपाक चाखवाया ।
आलों मी निज-पुरुषार्थ दाखवाया ॥
दुर्वासा अवगणिला तुवांचि शील- ।
भ्रष्टा न क्षत-सुकृतायु[2] वांचशील' ॥ २१ ॥

स्रग्धरा. ऐसें बोले प्रबद्धांजलि-नर-पतिला क्षोभ त्या तापसाचा ।
सांगावा काय भासे निज-मणि-हरणें कोपला साप साचा ॥
दुर्वासा वज्रि-ताप-प्रद[3] परि अनिळें वृक्षसा कांपवीला ।
जेणें[4] तो कोप लज्जा जड-भयद-बळा[5] त्या न दे कां पवीला ॥ २२ ॥

अनुष्टुप्. जटा तोडूनि हुंकार-सु-महा-नाद सोडिला ।
तोडावें जेविं लीलेनें कंबलाच्या दसोडिला ॥ २३ ॥

सु-लभा भार-भूता जी, त्यजिली ते जटा किती ।
कोपी दुर्लभ कष्टेंही जोडिलें तेज[6] टाकिती ॥ २४ ॥

शालिनी. झाली उग्रा त्या जटेचीच कृत्या[7]। धांवे खाया त्या नृपा विष्णु-भृत्या ॥
तों ती दुष्टा देखिली देव-चक्रें[8]। जैशी व्याळी स्वार्ति-दा[9] पक्षि-शक्रें[10]॥ २५ ॥

स्रग्धरा. ज्याचें शंभु-स्वयं-भु-प्रभृति-सुर[11] यश प्रार्थिती पूत नाकीं ।
त्या रामें ताटिका ती जशि तशि अथवा माधवें पूतना कीं ॥
सद्बोधानें अ-विद्या जसि तासिच महा-भीति-दा विप्र-कृत्या[12] ।
जी उग्रा विष्णु-चक्रें त्वरित निवटीली ती तदा वि-प्र-कृत्या[13] ॥ २६ ॥

---

१ पांच कल्पतरूंचा. कल्पतरु हे इच्छिलेलें फळ तत्काळ देतात हें लोकांतील म्हणणें. २ ज्याचें पुण्य व आयुष्य क्षीण झालें आहे असा तूं. ३ इंद्राला ताप देणारा. ४ ज्या कोपानें. ५ जड जे पर्वत त्यांस भय देणारें आहे सामर्थ्य ज्याचें अशा. ६ मोठेपणा, प्रतिष्ठा. ७ राक्षसी. ८ सुदर्शनानें. ९ अत्यंत पीडा देणारी (सु+आर्ति+दा.). १० गरुडानें (पक्षि+शक्र—शक्र म्ह० इन्द्र म्ह० श्रेष्ठ). ११ शंकर, ब्रह्मदेव आदिकरून देव. १२ ब्राह्मणानें उत्पन्न केलेली कृत्या (एक स्त्रीरूप अक्राळविक्राळ व्यक्ति). १३ मोठा नाश करणारी.

प्रहर्षिणी. ऐसा हा बहुतचि विप्रकार भारी ।
योजी जो हरि-जनिं विप्र कारभारी ॥
त्या चक्र त्रि-भुवन-कंप-दास दापी ।
जें सर्वाहित-बळ-संपदा[१] सदा पी ॥ २७ ॥

स्रग्धरा. जैसें दावानळानें प्रखरतर बळें काननीं सापिणीचें ।
चक्रानें भस्म सद्या करुनि उडवितां त्या महा पापिणीचें ॥
दुर्वासा भीति पावे बहुतचि सहसा गर्व त्याचा गळाला ।
सिंह-त्रस्त-द्विपेंद्रासम मग भगवान् तो महात्मा पळाला ॥ २८ ॥

होती अत्युग्र कृत्या परि करुनि तिचा घात दावी प्रतापा ।
जेव्हां तें चक्र, पावे बहुत निरखितां त्या तदा विप्र तापा ॥
प्राण-त्राणार्थ धैर्य त्यजुनि मुनि पळे सत्तपः-संपदेतें ।
वेंची व्यर्थ क्षणांत, प्रभु-जनिं[२] रचिलें वैर तें कंप देतें ॥ २९ ॥

भु०प्र०. पळे विप्र तो चक्र पाठीस लागे । भ्रमे सर्व दिङ्-मंडळीं फार भागे ॥
न सोडीच तें जेविं केलें स्वकर्म । भ्रमे साधु वैरें न पावेचि शर्म[३] ॥३०॥

मालिनी. मग करुनि विचार ब्रह्म-लोकासि गेला ।
नमुनि विधि-पदातें हस्त जोडोनि ठेला ॥
व्यसन सकळ सांगे प्राण-दानासि याची ।
स-चकित परिसे तो प्रार्थना ती तयाची ॥ ३१ ॥

व० ति०. ब्रह्मा म्हणे, 'भगवदिष्ट-जनीं[४] न घाला ।
तूं घालितासि करितासि न या अघाला ॥
देतीं तुला व्यसन-सागरिं हात पेंच[५] ।
क्षिप्र स्वयें नुरवितींच महा-तपेंच ॥ ३२ ॥

विश्वांत मुख्य म्हणतां मजला जनांहीं ।
तें काय गा परिसितां मज लाज नाहीं ॥
ज्याच्या भयें धरितसे मणि-सानु[६] कंप ।
श्री-कांत तोचि विधिचा धणि सानुकंप ॥ ३३ ॥

---

१ सकळ शत्रुसैन्याच्या संपत्ति. २ भगवद्भक्तांविषयीं. ३ सुख. ४ भगवंताला प्रिय अशा लोकांवर. ५ संकटें. ६ रत्नाचीं आहेत सानु ( शिखरें ) ज्याचीं असा मेरु पर्वत.

स्रग्धरा. आम्हीं ज्याचें धरीतों धरिति मनिं जसें सासवेचें सुना भें ।
त्याच्या मूर्त-प्रतापें सदवन-निपुणें दुष्ट-काळें सु-नाभें[१] ॥
जेव्हां हा क्षोभ केला तुजवरि मज हें वाटतें फार भारी ।
क्रुद्ध ज्ञात्या प्रभूचें मन वळवुं शके कोण गा कारभारी ॥ ३४ ॥

शा० वि०. ब्रह्म्यानें शरणागताहि मुनिला नाहीं दिला आसरा ।
लत्ता मारिल काम-धेनु भगवद्भक्ताहिता वासरा ॥
वाटे सद्रिपुचा[२] न ताप हरिल श्री-शंभुचा[३] सासरा[३] ।
तान्हेलाचि मरेल पावुनिहि तो जाणो सुधेच्या सरा ॥ ३५ ॥

स्रग्धरा. दुर्वासा ब्रह्म-लोकाहुनिहि परतला तापला विष्णु-चक्रें ।
गेला मृत्युंजयाला शरण मग जया सेविती योगि-चक्रें ॥
कैलासीं शंकराला नमन करि म्हणे, 'ईश्वरा आसरा हो ।
वांचो त्वच्चिंतनार्थ द्विज निज-भजकांमाजि हा दास राहो' ॥ ३६ ॥

त्या विप्राला म्हणे तो त्रि-पुर-हर, 'अगा ऐक गा बा मला जे ।
प्राणी तापार्थ कोणी स्मरति मनिं न त्यां रक्षिता नाम लाजे ॥
नाशावे ताप-पाप-प्रकर[४] भुज दहा वाहतों याच काजा ।
आम्ही निः-शेष वांछा पुरवुनि म्हणतों आदरें याचका जा ॥ ३७ ॥

शा० वि०. रक्षावे शरणागत व्रत असें माझें असे, लक्षिले ।
जे काळाकुळ[५] जीव ते सकळही तत्काळ म्यां रक्षिले ॥
मार्कंडेय-कथा तुझ्या श्रुति-पथा आली असावी, क्षण ।
ध्यान-स्तोत्र-परा[६] जना सुखवितें माझें कृपा-वीक्षण[७] ॥ ३८ ॥

स्रग्धरा. या ऐशा रीति नीति श्रवण करुनियां सेवितां मद्यशाला ।
साधूंला अन्य वार्ता गमति सु-मतिच्या मोहका मद्य-शाला[८] ॥
यासाठीं तूं तपस्वी मुनि शरण महा-संकटीं पातलासी ।
'त्राहि[९] त्राहीश' ऐसें म्हणुनि मज नमस्कारही घातलासी ॥ ३९ ॥

स्वागता. भस्म मी करिन गा शत कोटी । काळ-दंडहि किती शत-कोटी[१०] ॥
वारणाप्रति जसें हरि-चक्र[११] । स्पष्ट हें मज तसें हरि-चक्र ॥ ४० ॥

---

१ चक्रानें. २ साधूंच्या शत्रूचा. ३ हिमालयपर्वत. ४ ताप आणि पाप ह्यांचे समुदाय. ५ मृत्यूनें व्याकूळ केलेले. ६ ध्यान आणि स्तुति ह्यांमध्यें निमग्न. ७ कृपेचें अवलोकन. ८ दारूचे पिठें. ९ रक्षण कर. १० वज्र. ११ सिंहांचा समुदाय.

मालिनी. परिहरिन नताचे मी स्वयें ताप सारे ।
परि गुरु अ-जिताचें[1] शस्त्र हें तापसा रे ॥
मज बळ न असे बा याचिया वारणासी ।
हरि-वध हरिच्याही[2] होइना वारणासी ॥ ४१ ॥

अनुष्टुप्. करूनि काय जिंकील रविला काजवा रण ।
करील गज-वक्राचें[3] काय गा काज वारण ॥ ४२ ॥

शा० वि०. आम्ही सर्वहि दास त्यास भजतों तच्छासनीं वागतों ।
रक्षाया स्व-जनांसि शक्ति-धन त्या विश्वंभरा मागतों ॥
अस्मत्पालन-लालनादि करितो स्नेहार्द्र तो बापसा ।
त्याची ज्यावरि त्यावरींच करितों आम्ही दया तापसा ॥ ४३ ॥

पृथ्वी. सुतासि गुरुच्या गृहा दवडितो जसा बाप हा ।
तसा शिव न रक्षणीं पटु जरी तरी बा पहा ॥
उपाय कथितों तुला व्यसन हें सराया, पदा ।
सुदर्शन-धराचिया धरिं, हरील तें आपदा ॥ ४४ ॥

शिखरिणी. 'क्षमस्व श्री-जाने[4]' म्हण, शरण जा त्याचि हरिला ।
उदंडांचा तेणें प्रणति करितां ताप हरिला ॥
दया-पीयूषाब्धि प्रभु-वर जगद्भावन,[5] मनीं ।
न ठेवी दोषातें क्षमि-तिलक[6] सद्भाव-नमनीं' ॥ ४५ ॥

स्रग्धरा. सांगे नाम क्षुधार्ता स-दय जन जसें आदरें अन्न-दाचें ।
कीं दावी वर्त्म जैसें परम तृषित जो पांथ त्या सन्नदाचें ॥
वैद्याचें गेह रुग्णा सु-मति कथि तसें या द्विजा शंभु लावी ।
वैकुंठाच्या पथीं कीं पुनरपि न असी बुद्धि त्याची भुलावी ॥४६॥
दुःख-घ्नी ओषधी जी असि कथि भगवल्लोक-पद्या[7] पिनाकी ।
श्रद्धेनें सेविती हो, पिउनि अमृतही जीस अद्यापि नाकी[8] ॥
पावे[9] तीतें वरूनि द्विज, अ-मित पितां दैत्य-चक्रायु[10] धाला ।
नाहीं कांहींच ज्याचा भुज-भुजग तया दिव्य चक्रायुधाला[11] ॥४७॥

---

१ अपराजित अशा विष्णूचें. २ इंद्राच्याही. ३ हत्तीचें आहे मुख ज्याला अशा गणपतीचें. ४ हे विष्णो (लक्ष्मी आहे जाया ज्याची). ५ जगदुत्पत्तिकर्ता. ६ सहनशील पुरुषांमध्यें श्रेष्ठ. ७ विष्णुलोकाचा मार्ग. ८ स्वर्गलोकांत रहाणारे देव. ९ येऊन पोहोंचला. १० दैत्यांच्या समुदायाचें आयुष्य. ११ परम तेजस्वी जें चक्र तें आहे आयुध ज्याचें अशा विष्णूला.

अनुष्टुप्. पाहिला प्राशिता दैत्य-चक्रायु धरणी-तळीं ।
भरिता रक्त-पूरें जो चक्रायुध रणीं तळीं ॥ ४८ ॥
गेला शरण वैकुंठीं हरितें परि तें तया ।
चक्र दे वक्र देवाच्या भक्तीं म्हणुनियां भया ॥ ४९ ॥
विप्र तो क्षिप्र तोयासी मीनसा प्रभुच्या पदा ।
कवळी, जवळी प्रेमें ज्याच्या श्री मधुपी[१] सदा ॥ ५० ॥
म्हणे 'करूनि त्वद्भक्तीं अपराध पराभवा ।
पावलों मज या ऐशा अ-क्षमा[२] रक्ष माधवा ॥ ५१ ॥
अ-मळा-कमळा-केलि-भवना[३] भव-नाशना ।
पावना पाव नाशीं या व्यसनास[४] सनातना ॥ ५२ ॥

शा०वि०. दुष्टाही शरणागता अ-भय दे पाहे न तोटा कवी[५] ।
त्वत्पादाब्ज-पराग दुर्गुण असे जो सर्व तो टाकवी ॥
तीर्थांची कुळ-देवता त्रि-भुवन-ख्यातांहि गंगा सती ।
जी धिक्कार करील काय शिवतां रथ्यांबु[६] अंगास ती ॥ ५३ ॥

शिखरिणी. जरी साधु-द्वेष्टा द्विज सकळ-लोकीं अधम हा ।
तरी सत्कीर्तीचा क्षय-करचि याचा वध महा ॥
क्षमा-शीला देवा वद न कवणा मोह चुकवी ।
असें जो जाणोनि प्रभु करि कृपा तोचि सु-कवी ॥ ५४ ॥

अनुष्टुप्. येती शरण जे त्यांचें करिती संत रक्षण ।
जाणते न पडों देती या व्रतीं अंतर क्षण ॥ ५५ ॥

शा०वि०. वारावें निज-चक्र हें बहु मला देवा पहा भाजितें ।
जे ब्रह्मण्य[७] शरण्य[८] हें यश तुझें रक्षीं प्रभो आजि तें ॥
चित्तीं आणुनि दोष रोष न धरीं विप्रास या वांचवीं ।
भीताला अभय-प्रदान करुनी सत्कीर्तिला सांचवीं' ॥ ५६ ॥

शिखरिणी. जयाच्या ठायींच स्थिर करुनियां संतत रती ।
अ-सारा संसाराप्रति बहु-सुखें संत तरती ॥
मुकुंदाचे तो ते सुर-तरु-गुरू-पाय[९] नमुनी ।
असें चक्र-त्रासेंकरुनि वदला काय न मुनी ॥ ५७ ॥

---

१ भ्रमरी. २ अहितकारी जो मी त्या मला. ३ पवित्र अशी जी लक्ष्मी तिचें क्रीडास्थान अशा. ४ संकटास. ५ ज्ञाता. ६ रस्त्यांतलें पाणी. ७ ब्राह्मणाविषयीं दयाळु. ८ शरण आलेल्याचें रक्षण करणारे. ९ कल्पवृक्षाचे गुरु असे पाय.

अनुष्टुप्. भक्ताभिमानी भगवान् वदला तेंचि आयका ।
करूनि नमन प्रेमें त्याचि लोकैक-नायका[1] ॥ ५८ ॥

स्रग्धरा. "मी भक्ताधीन, भक्त प्रिय मज न तसें आवडे अन्य, काय ।
श्री, जेथें सान वाटे तदधिक[2] मजला आपुला धन्य काय ॥
माझी सेवाचि मोक्षाहुनिहि बहु-मता ज्यांसि जे अंतराय ।
ध्यानीं होऊं न देती क्षणहि बहु मला मान्य ते संत-राय ॥ ५९ ॥

मालिनी. त्यजुनि धन-सुत-स्त्री-देह-गेहादि काम ।
स्मरति मजचि गाती नित्य माझेंचि नाम ॥
भजति भजन-कामें जे मला त्यांसमान ।
प्रिय इतर न, देऊं मी न कां त्यांस मान ॥ ६० ॥

शा०वि०. भक्तीनें वश सत्पतीस करिती साध्वी, मला मज्जन ।
प्रेमांभो-निधि संत त्यांत करितों मी मीनसा मज्जन ॥
त्यांला मीच मलाहि तेच रुचले ते हंस मी मानस ।
श्री[3] त्याहींच मला मदीय-भजनें त्यांचें सुखी मानस ॥ ६१ ॥

अनुष्टुप्. सर्व-स्व मी सज्जनांचें माझें सर्व-स्व सज्जन ।
पावेन मी न पावेल कष्टीं मज्जन मज्जन ॥ ६२ ॥
सु-दासीं न उदासीन प्राकृत-प्रभुही[4] मनीं ।
कसा दास प्रसादास माझा पात्र नव्हे जनीं ॥ ६३ ॥

शा०वि०. लोकीं निस्पृह मी सदा अ-जित मी चित्तीं उदासीन मी ।
स्वाधीन प्रभु हें खरेंचि परि या[5] भावें[5] सु-दासीं[5] नमी ॥
बापा प्रेमळ-सज्जनाशय-महा-गंभीर[6] आवर्त[6] तो ।
जैसें वर्तवितो तसेंचि पडला त्यामाजि हा[7] वर्ततो ॥ ६४ ॥

स्रग्धरा. साधूंचा त्याग अर्ध-क्षणहि न करवे आमुचे देव संत ।
श्री दे सत्संग आम्हां जसि करुनि कृपा कानना दे वसंत ॥
संतांसीं वक्र जो तो खल मल-जलधी[8] पावतो आपदेतें ।
त्याला त्याचेंचि पाप प्रळय-शत[9] शत ब्राह्मणा ताप देतें ॥ ६५ ॥

---

१ लोकांचा एक नायक म्हणजे मुख्य नायक जो विष्णु त्याला. २ लक्ष्मीहून अधिक. ३ शोभा. ४ लौकिकांतले प्रभु म्हणजे राजे वगैरे. ५ मी ह्या उत्तम भक्ताला प्रेमानें नमून आहें. ६ प्रेमळ असें जें सज्जनांचें अंतःकरण हाच मोठा खोल भोंवरा. ७ मी. ८ दोषांचा समुद्र. हें खलाचें विशेषण. ९ प्रळयांच्या शतांचें शत म्हणजे शेकडों प्रळयपर्यंत.

घनाक्षरी. ते न जाणती मदन्य । मीही न जाणें तदन्य ॥
वर्णूं किती तैसे धन्य । तेचि एक पाहिले ॥ १ ॥
त्यांच्या गुणा नसे अंत । भक्ति-ज्ञान-भाग्यवंत ॥
दया-क्षमा-निधी संत । माझ्या मनीं राहिले ॥ २ ॥
मीही नव्हें त्यांचें मोल । संत-सिंधु बहु खोल ॥
त्यांहीं निंदकाचे बोल । तैसे म्यां न साहिले ॥ ३ ॥
साधु बाप साधु माय । साधु मंदरांचे[1] राय ॥
साधूंचे पवित्र पाय । आम्हीं माथां वाहिले ॥ ४ ॥ ६६ ॥

पृथ्वी. तुला वि-कळ पाहतां मम मन श्रमें घाबरे ।
गमेल निज-चातक-व्यसन काय मेघा बरें ॥
उपाय कथितों करीं नमन त्याचि संता, पहा ।
चमत्कृति, हरील तो नृपाचि सर्व संताप हा ॥ ६७ ॥

पुष्पिताग्रा. हरि-जनचि खरे सखे, दरा हे ।
नुरविति, यां नमितां न खेद राहे ॥
न निववित? जरी पदीं नमीना ।
खळ म्हणुनि त्यजिती नदी न मीना ॥ ६८ ॥

हरिणी. चरण धरिले ज्यांहीं ते तों कधींहि न तापले ।
कळकळविले सत्पादांनीं न आश्रित आपले ॥
अमृतहि पितां न स्वास्थ्याला वरील गदी[2] क्षण ।
त्रुटि[3] न भरतां नाशी सारेहि ताप सदीक्षण ॥ ६९ ॥

शा०वि०. त्वां केला अभिचार[4] साधु-पुरुषीं जो तो तुला बाधला ।
कोणालाहि निजेष्ट-लाभ न सदुच्छेदोद्यमें[5] साधला ॥
पाषाण स्व-शिरीं पडेचि गगनीं मित्रासि[6] जो हाणिला ।
कीं पाय ज्वलनीं जळेचि, हृदयीं हा भाव कां नाणिला ॥ ७० ॥

अनुष्टुप्. साधूच्या लंघनीं होतो नीचाचा घात रोकडा ॥
बोकडा मारक नव्हे मेरूचा काय हो कडा ॥ ७१ ॥

---

१ कल्पवृक्षांचे. २ रोगी. ३ क्षणाचा, चतुर्थांश, थोडा वेळ. ४ दुसऱ्याचा घात व्हावा म्हणून केलेला जारणमारणादि योग. ५ ( सत्+उच्छेद+उद्यम ) सज्जनांच्या नाशाच्या उद्योगानें. ६ सूर्याला.

स्रग्धरा. होतोचि प्राप्त मृत्यु स्व-भुज-बळ-मदें लंघितां अर्णवातें ।
पावे गर्वें उडे तो पतन उडविलें ज्या परी पर्ण वातें ॥
ज्या दुष्टें सज्जनाचा अ-करुण-हृदयें चिंतिला घात, 'लागा- ।
पाठी त्या खा[1] न' साधू म्हणति परि[1] अघीं तो मुखीं[1] घातला गा ॥७२॥

अनुष्टुप्. विद्या तपस्या ज्या यांहीं भले ते विप्र तारिले ॥
खोटे सुधा-मोहिनींहीं[2] दैत्य तेविं प्रतारिले ॥ ७३ ॥

शा०वि०. दुर्वासा मुनि हो, सदुक्ति स-रसा साक्षात् सुधेच्या नद्या ।
सेवा, लेशहि पाप ताप न उरो देवा तुम्ही मान द्या ॥
प्रार्था त्या नृप-सत्तमासि 'चुकलों रक्षीं' म्हणा जा जगा ।
तो रक्षीलचि साधु लक्षिति निजापत्यापरी ह्या जगा" ॥ ७४ ॥

पृथ्वी. असें प्रभु वदे न दे अभय, अंबरीषाकडे ।
मुनि त्वरित जाय त्या नृपतिच्याचि पायीं पडे ॥
द्विजें स्व-पद वंदितां सुमति भूप तो लाजला ।
तयाहुनि तदद्भुत-व्यसन-पावकें[3] भाजला ॥ ७५ ॥

व०ति०. पाहोनि ताप बहुतांपरि तापसाचा ।
पावे तयापरिस तो परिताप साचा ॥
दे चक्र[4] ताप पळ-मात्र तपोनिधीतें[4] ।
ज्याच्या[4] तसा सु-कठिना न तपोनि धीतें[4] ॥ ७६ ॥

द्रु०वि०. वरि दिसे मृदु मौक्तिक पोवळें । परि न लेश तदंतर कोवळें ॥
न तुळवे विधु अंकित तो मळें । स-रस साधु-मनें शुचि कोमळें ॥ ७७ ॥

स्रग्धरा. मित्राप्तां[5] म्लानि देतो जरि अमृत-रसालागिं हा चांद वीतो ।
साधू तैसा कसा, जो सुखवुनि सकळ प्राणियां नांदवीतो ॥
साधूंच्या दर्शनानें अ-शिव तिथि अशी सर्वथा आढळेना ।
साधूचें तेज रात्रि-दिव समचि, न तें सोडुनी त्यां ढळेना ॥ ७८ ॥

---

१ त्या पाठी लागा ( आणि ) खा ( असें ) साधू ( अघांस ) न म्हणति, परि गा तो अघीं ( पातकांनीं ) मुखीं घातला; असा अन्वय. २ अमृत आणि मोहिनी ह्यांनीं. ३ त्या दुर्वासाला जें अद्भुत संकट तोच अग्नि त्यानें. ४ चक्र तपोनिधीतें ( दुर्वासाला ) पळमात्र (जसा) ताप दे तसा तापोनि ज्याच्या सुकठिना धीतें (मनाला ) न ( झाला नाहीं ); असा अन्वय. ५ मित्र म्हणजे सूर्य त्याचे आप्त जीं कमळें त्यांस; पक्षीं मित्र आणि आप्त ( सुहृत्संबंधी ) ह्यांस.

स्रग्धरा. राजा पाहोनि चक्रें करुनि अतिशयें ब्राह्मणा तापल्याला ।
सर्वांगीं तप्त झाला उतरुनि मुनिचा काय तो ताप ल्याला ॥
वैकुंठास्त्रासि जोडी कर बहु विनवी, कोपतां फार भारी ।
दासीं स्वामी तयाला स्व-पदर पसरी हा जसा कारभारी ॥ ७९ ॥

शा०वि०. चक्रा तूं भगवत्प्रताप स-सुरा[१] शक्रा तुवां रक्षिलें ।
नक्राचेपरि भक्त-पीडन-परा वक्रा जना भक्षिलें ॥
पीडा लेश नसोचि या श्रुति-शुकी-नीडा[२] मुनीला पहा ।
व्रीडा-कारक विप्र-गंजन[३] तुज क्रीडारि-दर्पाप-हा[४] ॥ ८० ॥
तूं गो-ब्राह्मण-धर्म-पाळक जगन्नाथ-प्रिय ख्यात कीं ।
हें काय द्विजवर्य-पीडन बरें दुष्कीर्ति या पातकीं ॥
हो अन्वर्थ सुदर्शना मुनि-वरीं दासीं दया दाखवीं ।
अत्यच्छ[५] स्व-यशः-सुधा-रस रस-ज्ञात्या जना चाखवीं ॥ ८१ ॥

पृथ्वी. कुळोचित तप-क्रतु-व्रत-जप-द्विजोपासना ।
असेल घडली, मनीं जरि असेल सद्वासना ॥
तरि त्वरित वि-ज्वर द्विज असो, दया लोभ या ।
नतीं करिं, हरीं प्रभु-प्रहरणा[६] दयाळो भया ॥ ८२ ॥
बुभुक्षित जना जसें रुचिकरेष्ट[७] जें अन्न तें ।
असेल जरि अर्पिलें स-बहुमान म्यां सन्नतें ॥
तरि त्वरित वि-ज्वर द्विज असो, दया लोभ या ।
नतीं करिं, हरीं प्रभु-प्रहरणा दयाळो भया ॥ ८३ ॥
कुळांत कुळ-देवता जरि नसेल विप्राधिका ।
असेल गुरु-सत्क्रिया घडलि शुद्धिची साधिका ॥
तरि त्वरित वि-ज्वर द्विज असो, दया लोभ या ।
नतीं करिं, हरीं प्रभु-प्रहरणा दयाळो भया ॥ ८४ ॥
असेल जरि ईश्वर स्थिर-चरीं बरा पाहिला ।
नसेल अणुमात्रहि क्षणहि भेद म्यां साहिला ॥
तरि त्वरित वि-ज्वर द्विज असो, दया लोभ या ।
नतीं करिं, हरीं प्रभु-प्रहरणा दयाळो भया ॥ ८५ ॥

---

१ देवांसहवर्तमान. २ श्रुति (वेद) हीच शुकी (पोपटीण) तिचें नीड म्हणजे घरटेंच; म्हणजे वेदाचें स्थान अशा दुर्वासऋषीला. ३ ब्राह्मणाला गांजणें. ४ (क्रीडा+अरि+दर्प+अप+हा) क्रीडेनें शत्रूचा गर्व हरण करणाऱ्या. ५ फार स्वच्छ. ६ विष्णूच्या अस्त्रा. ७ रुचिकर+इष्ट.

तें०. गो-विप्र-दीन-शरणागत याचकां मी ।
झालों असेन वश तत्पर याच कामीं ॥
तैसाचि लुब्ध जरि सत्परि-शीलनातें[1] ।
तूं दीन-बांधव खरें करिशील नातें ' ॥ ८६ ॥

रा. रक्षाया ब्राह्मणातें सु-कृत सकळही अर्पितां भूप-शक्रें ।
पावोनी क्षिप्र शांती-प्रति अ-भय दिलें त्या द्विजा विष्णु-चक्रें ॥
जें क्षीरांभोधि-फेनामृत-शुचि[2] दिधलें अंबरीषा नृपातें ।
श्रोत्या वक्त्या जनाही सु-यश निववितें दावुनी सत्कृपा तें ॥८७॥

रिणी. छळी अ-न्यायेंचि प्रणति करितांही तदपि त्या ।
भजे विप्रा जैसा सुत धरुनि माथां पद पित्या ॥
पडे स्पर्शी[3] भेदास्तव जरि बळानें घण, मणी[4] ।
करीं स्वर्णे स्पर्शें किमपि न[5] महात्मा घणमणीं[5] ॥ ८८ ॥

ांता. श्री-रामाचा सु-गुण निववी जेविं गातां शिवाला ।
श्री-दुर्वासा मुनि बहु तसा साधु-संगें निवाला ॥
भेटे भूपाप्रति अतिशयें तो करी प्रेम, हर्षे ।
'पाद-प्रक्षालन' नृप म्हणे तैं, 'करूं दे महर्षे' ॥ ८९ ॥

वे०. त्या भूपासि म्हणे मुनीश्वर, 'सुधा सेवूनि कां जीभली ।
ज्ञात्याची रसिकीं म्हणेल पुसतां गोडीस कांजी भली ॥
साधूंची तसि कीर्ति तत्सम दुजी नाहींच जीवां चवी ।
श्रोत्रीं दावुनि, दुःसहीं भव-दवीं दग्धांसि जी वांचवी ॥ ९० ॥
लोकीं संत तुम्हीच धन्य, तुमचें न स्तोत्र हें सत्य, या ।
विप्राच्या तुमचा अ-गाध महिमा आला नृपा प्रत्यया ॥
एकीं साधु-जनींच शांति करुणा मैत्री क्षमा सन्मती ।
मुक्तांचे[6] इतर-त्र राशि न जसे रत्नाकरीं जन्मती ॥ ९१ ॥

r. साधूवांचूनि अन्य त्रि-भुवनिं भुजगा घातका जीव-दाना ।
कोणी देईल काय क्षण तरि पुसतों सत्य कां जी वदा ना ॥
देऊनी प्राण-दान छळक सुखविला धन्य बापा, मराया ।
होता योग्य स्व-पापें तरिहि जिवविलें त्वांचि बा पामरा या ॥ ९२ ॥

---

साधूंच्या सहवासाला. २ क्षीरसागराचें फेंसाळलेलें पाणी त्यासारखें पांढरें. सुयश ह्याचें ग. ३ परिसावर. ४ स्पर्शमणि. ५ मागेंपुढें पाहत नाहीं (?). ६ मोत्यांचे.

शा० वि०. लागों देति विधीश-विष्णु करितां नम्रीं न भद्र क्षण ।
त्यांचें म्यां पद वंदिलें परि तिहीं केलें न मद्रक्षण ॥
साधो त्वां शरणागता मज महा-तापातुरा रक्षिलें ।
नाहीं मत्कृत-पाप बा पर-हितोद्यक्ता तुवां लक्षिलें ॥९३॥

तूं ब्रह्मण्य, शरण्य तूं, स-दय तूं, सत्कीर्तिचा चांदवा ।
लोकीं साधु तुम्हीं असाचि उभवा प्राणी सुखें नांदवा ॥
आयुर्वृद्धि असो, वसो मनिं सदा भूतानुकंपा, दिलें ।
मातें तें इतरांहि द्या यश भलें जन्मोनि संपादिलें' ॥९४॥

शालिनी. ऐशी आशीर्वाद-पीयूष-वृष्टी । केली विप्रें त्या नृपीं प्रेम-दृष्टी ॥
राजा लाजे, शंभुला जेविं नंदी । वारंवार श्री-मुनींद्रासि वंदी ॥९५॥

शा० वि०. राजा त्या मुनिला म्हणे, "मज जडा देतां तुम्ही थोरवी ।
पादें आपुलिया जसा विधुसि कीं रत्नासि देतो रवी ॥
केला हा निज-दास वासव-नुता[१] सत्कीर्तिला[१] भाजन ।
स्वामी, युष्मदुपासनेच्छु कवणा पावे न लाभा जन ॥९६॥

पृथ्वी. तुम्ही प्रभु जगद्गुरु स्व-पद-दास-मंदार, हा- ।
जन स्तविल काय, या श्रुति म्हणेल, 'मंदा रहा' ॥
म्हणोनि तुमचा मला सु-महिमा न वाखाणवे ।
प्र-कूप-खनका[२] कसा जल-निधी नवा खाणवे" ॥९७॥

शा०वि०. केला प्रार्थुनि तृप्त तो मुनि नृपें अत्यादरें जेमनीं[३] ।
होते सिद्ध पदार्थ विप्र-पतिच्या आले मुखीं जे मनीं ॥
आज्ञा दे गुरु-राज त्या नृपतिला जेवावया तो मग ।
ब्रह्म्याच्या सदनासि जाय भगवान् भास्वान् जसा व्योम-ग ॥९८॥

वर्षानंतर तापसेश्वर पुन्हा येतां गृहा पाहिला ।
तावत्काल उपोषित प्रभु-जल[४] प्राशूनियां राहिला ॥
आज्ञा घेउनि जेविला मग सुहृद्वर्गासवें तो भला ।
ऐसा सन्नत[५] अंबरीष सु-यशें लोक-त्रयीं शोभला ॥९९॥

आर्या (गीति). हा ग्रंथ भक्त-भूषण कंठीं जे साधु यासि धरितील ॥
ते आत्म-दर्शनीं अति स-स्पृह निःस्पृह जनासि करितील ॥१००॥

---

१ इंद्रानें स्तुत्य अशी जी सत्कीर्ति तिला. २ मोठी विहीर खणणारास. ३ जेवणीं.
४ देवाचें तीर्थ. ५ साधूंविषयीं नम्र.

## सुदाम-चरित्रांतील पृथुकोपाख्यान

कृष्णाचा सखा सुदामा नांवाचा अति दरिद्री ब्राह्मण त्याच्या भेटीकरितां द्वारकेंत गेला. तेव्हां त्यानें आपल्या अतिशय गरिबीमुळें नुसते पृथुक (पोहे) त्यास नजर करण्यासाठीं नेले होते, तरी भक्तांविषयीं अत्यंत प्रेमळ जो श्रीकृष्ण त्यानें मोठ्या आदरानें त्या पोह्यांचा स्वीकार केला, व त्याबद्दल सुदाम्याला सोन्याची नगरी दिली. असें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे म्हणून ह्यास पृथुकोपाख्यान हें नांव दिलें आहे.

### साक्या

गावीं संत-चरित्रें हो। तारक मधुर पवित्रें हो ॥ ध्रु० ॥
हरिचा सखा सुदामा ब्राह्मण निःस्पृह आत्मज्ञानी ॥
होता गृहीं, यदृच्छा-लाभें[१] परम सुखातें मानी ॥ १ ॥
त्या विप्राची भार्या आर्या मलिना कृशा कु-चैला[२] ॥
पति-पद-भजनें[३] सर्षप[४] मानी भव-दुःखाभिध-शैला[५] ॥ २ ॥
ते एकदा पतीच्या पाशीं बहु भीत भीत गेली ॥
अवाङ्मुखी कंपित-तनु साध्वी कर जोडुनियां ठेली ॥ ३ ॥
भय-गद्गद-कंठी[६] ते साध्वी म्हणे पतीतें, 'स्वामी ॥
श्रीपति तो स्व-सखा हें कथितां नित्य तुम्ही निज-धामीं ॥ ४ ॥
भेटाया त्या दीन-बंधुला द्वारावतिला जावें ॥
गातां ध्यातां परि सखयातें नेत्रें अवलोकावें ॥ ५ ॥
भजकाला आत्माही देतो ऐसा उदार तो कीं ॥
दीन-जनाचा कल्प-वृक्ष, ही कीर्ति तयाची लोकीं ॥ ६ ॥
मोक्षहि देतो तेथें देणें अर्थ काम हें काय ॥
यास्तव जाउनि पहा कुटुंब-त्राणार्थें यदु-राय ॥ ७ ॥
देइल कांहीं दयाळु तो प्रभु रक्षाया हीं बाळें ॥
तुम्हांला स्व-सख्याचें दर्शन घडेल बहुता काळें' ॥ ८ ॥

---

१ आपोआप जें मिळेल तेणेंकरून. २ मळकीं वस्त्रें नेसणारी. ३ नवऱ्याच्या पायाच्या सेवेनें. ४ मोहरीसारखें एक धान्य. ५ (भव+दुःख+अभिधा+शैल) संसारसंबंधीं दुःख हेंच आहे अभिधा म्हणजे नांव ज्याला असा शैल म्हणजे पर्वत त्याला. ६ भयानें दाटला आहे कंठ जिचा अशी.

ऐसें स्त्रीचें प्रिय हित भाषण ऐकुनि मुनी सुखावे ॥
आलें मनांत कीं, 'जाउनियां प्रभुचे पाय पहावे' ॥ ९ ॥

स्त्रीस म्हणे आनंदें तो द्विज, 'जातों सखा पहाया ॥
तच्चरणावरि निज-तनु मनही पुष्पांजळी व्हाया ॥ १० ॥

आहे कांहीं गृहीं उपायन दे हो सत्वर आणीं ॥
रिक्त-पाणिनें[1] न विलोकावा गुरु ऐशी स्मृति-वाणी' ॥ ११ ॥

ऐसें परिसुनि भिक्षा मागुनि चार मुष्टि पृथुकांसी ॥
आणुनि बांधुनि चैल-खंडीं[2] अर्पी निज-कांतासी ॥ १२ ॥

घेउनि मुनि तो उपायनाला बहु हर्षेंचि निवाला ॥
भेटेल कसा प्रभु हें स्व-मनीं चिंतित जाता झाला ॥ १३ ॥

हरिला हृदयीं चिंतित जातां मार्ग जाहला थोडा ॥
बहुधा केला हरि-संदर्शन-कामें[3] प्रेमा[4] घोडा ॥ १४ ॥

अमरावती-समाना द्वारावती परी कनकाची ॥
विलोकिली दिव्य राजधानी विश्वाच्या जनकाची ॥ १५ ॥

काय तिची वर्णावी शोभा सत्यवती जिस लाजे ॥
'मी धन्य' म्हणुनी जीच्या योगें रत्नाकर बहु गाजे ॥ १६ ॥

जेथिल लोक वि-शोक स्व-सुखें तुच्छ मानिती स्वर्गा ॥
लाजति सुर-वर योगी ज्ञानी नागरिकांच्या वर्गा ॥ १७ ॥

त्या नगरींत मुनी तो गेला जैसा वैकुंठातें ॥
ब्रह्मण्य-देव-पुरींत[5] नाहीं निरोध[6] पळ विप्रातें ॥ १८ ॥

एकापरीस एक सु-रम्यें यादव-गृहें अ-पारें ॥
विप्रावांचुनि जेथें न शिरे आज्ञा नसतां वारें ॥ १९ ॥

त्यांतहि सोळा सहस्र आणिक अष्टोत्तर शत गेहें ॥
स्त्री-सुत-युक्तें केलीं शोभित हरिनें अनेक-देहें ॥ २० ॥

---

१ रिकाम्या हातांच्या मनुष्यानें. २ फडक्यांत. ३ कृष्णाला पाहण्याची अत्यंत आवड आहे ज्याला अशा सुदाम्यानें. ४ प्रेम ( पुल्लिंगी ). ५ ब्राह्मणांविषयीं दयाळु जो देव म्हणजे कृष्ण, त्याच्या पुरांत. ६ अडथळा.

त्यांतुनि एका गृहांगणीं तो गेला ब्राह्मण दीन ॥
सुख पावला स्व-चित्तीं जैसा ब्रह्मानंदीं लीन ॥ २१ ॥

श्री-रुक्मिणिच्या पलंगिं तेव्हां होता जगन्निवास[1] ॥
तेथें कळलें कीं भेटाया आलासे निज-दास ॥ २२ ॥

झडकरि उठला दयाळु माधव वस्त्रादिक नावरितां ॥
धांवत आला पुढें रमेला सांडुनि दासाकरितां ॥ २३ ॥

'ये ये बंधो' ऐसें सद्गद बोलत धांवत आला ॥
कडकडुनी भुज-युग्में[2] स्व-सखा हृदयीं धरिता झाला ॥ २४ ॥

मित्रांग-स्पर्शानें झाला सुखी दयेचा सिंधू ॥
लोचन-पद्मापासुनि[3] गळती प्रेमाश्रूचे बिंदू ॥ २५ ॥

धरुनि स्व-सखा करीं हरीनें पर्यंकीं बसवीला ॥
सात्त्विक-भावें[4] भक्ति-प्रेमा देवें बहु दाखविला ॥ २६ ॥

जळ घाली रुक्मिणी पदांवरि मणि-कनकाच्या[5] पात्रें ॥
प्रक्षालन केलें श्री-नाथें सुख-रोमांचित-गात्रें ॥ २७ ॥

शंभु-शिरीं ज्याचें चरणोदक, वेद जयाचे बंदी ॥
तो तीर्थ-रूप तीर्थांचाही मुनि-पादोदक वंदी ॥ २८ ॥

गंधालेपें[6] धूपें दीपें पुष्पें गुरू-समान ॥
ब्रह्मण्यदेव मुनितें पूजी वाढवुनी बहु मान ॥ २९ ॥

व्यजन चामरें घेउनि हातीं शैब्या[7] घाली वारा ॥
तें परिसुनियां आला तेथें अंतः-पुर-जन[8] सारा ॥ ३० ॥

हरि-स्त्रिया त्या म्हणति 'अगाई, कोण विप्र हा आला ॥
जगद्गुरूसहि बला-परिस हो पूज्य कसा हा झाला' ॥ ३१ ॥

कृष्ण सख्यातें करीं धरुनियां सांगे गोष्टी गोड ॥
त्यांशीं सर्व-रसाधिक परि तें अमृत न पावे जोड ॥ ३२ ॥

---

१ (जगत्+निवास) विश्वाचा आधार कृष्ण. २ दोन्ही हातांनीं. ३ कमळासारख्या [नेत्रां]तून. ४ रोमांचादिक जें आठ प्रकारचे सात्त्विक भाव आहेत त्यांनीं; ते हे :–स्तंभ [स्तंभ, जाड्]य, रोमांच, स्वेद, वैवर्ण्य, वेपथु अश्रु आणि वैस्वर्य. ५ रत्नजडित सोन्याच्या [भां]ड्यानें. ६ गंधाच्या उटीनें. ७ रुक्मिणी. ८ जनानखान्यांतील जन म्हणजे स्त्रिया.

देव म्हणे, 'मी बंधो गुरुची[१] आलों घेउनि आज्ञा ॥
संपादिला तदुत्तर[२] पाणि-ग्रहण-विधी[३] कीं प्राज्ञा ॥ ३३ ॥
बहुधा गृहीं उदासीन तुझें मन धन-वांछा कांहीं ॥
नाहीं, हें मज पूर्वींपासुनि अवगत आहे पाहीं ॥ ३४ ॥
परि लोकसंग्रहास्तव[४] मीही करितों गृहस्थधर्म ॥
योगचि[५] हा फळ-वांछा टाकुनि सर्व करावें कर्म ॥ ३५ ॥
गुरु-कुळ-वास[६] तुला स्मरतो कीं, जेणें तरतो मूढ ॥
त्वरितचि होतो अ-क्षय-सुख-द-स्वात्म-पदीं[७] आरूढ ॥ ३६ ॥
सांदीपनि-गुरुच्या[८] पत्नीनें काष्ठें आणायासी ॥
पाठविलें विपिनाला; स्मरतें तें माझ्या हृदयासी ॥ ३७ ॥
गेलों आपण वनासि तेव्हां झाली अकाल-वृष्टी ॥
कल्पक्षयचि निशा-काळीं तो झाला गोचर दृष्टी ॥ ३८ ॥
प्रातः-काळीं श्री-गुरु आला आम्हां शोधायाला ॥
श्रांत शिष्य देखतां स्व-हृदयीं फार दयाकुळ झाला ॥ ३९ ॥
धरुनि पोटिशीं आशीर्वादें गौरविलें बहु सकळां ॥
दिल्या चतुर्दश-विद्या हृद्या[९] शुद्ध चतुःषष्टि कला ॥ ४० ॥
हें सारें मजला आठवतें स्मरतें तुज कीं नाहीं ॥
गुरु-प्रसादें शिष्य-जनांला नसे उणें सुख कांहीं' ॥ ४१ ॥
हें ऐकुनियां तो श्री-दामा म्हणे, 'प्रभो सर्वज्ञा ॥
लोक-विडंबन[१०] सारें केलें वदतों करुनि अवज्ञा[११] ॥ ४२ ॥
आम्हांला तारायाकारितां गुरु-कुळ-निवास केला ॥
तुझ्या प्रसादें या दासाचा सारा संशय[१२] गेला ॥ ४३ ॥
वेद-मया[१३] कल्याणाधारा जगद्गुरो तुज कवणें ॥
सर्वज्ञाला अज्ञ-मनुष्यें काय ज्ञान शिकवीणें' ॥ ४४ ॥

---

१ कृष्णाचा जो गुरु सांदीपनि त्याची. २ त्यानंतर. ३ विवाह. ४ लोकांची स्वधर्माविषयीं प्रवृत्ति व्हावी ह्या उद्देशानें. ५ ईश्वरप्राप्तीचें साधन—मोक्षसाधन. ६ गुरूच्या घरीं राहून त्याची सेवा करणें. ७ अविनाशि अशा प्रकारचें सुख देणारें स्वात्मपद म्हणजे मुक्ति तीवर. ८ ह्या नांवाचा कृष्णाचा गुरु त्याच्या. ९ सुंदर. १० लोकांसारखें वागणें. ११ भीड-मुरवत न धरितां. १२ अज्ञान-द्वैत-भ्रांति. १३ ज्ञानस्वरूपा.

देव म्हणे, 'सखया मज द्याया काय उपायन आजी ॥
अणिलें असेल देउनियां तें वांछा पुरवीं माजी ॥ ४५ ॥
भक्तें प्रेमें अणुही दिधलें तें मज पुष्कळ होतें ॥
बहुहि अभक्तें समर्पिलें परि अल्पचि भासे हो तें ॥ ४६ ॥
पत्र, पुष्प, फल, जळ, जें मजला भक्त आदरें अर्पी ॥
तें विश्वात्म्याला मज बंधो सुधा-रसाहुनि तर्पी' ॥ ४७ ॥
हें परिशिलें परंतु स्व-मनीं मुष्टि-चतुष्टय[१] पोहे ॥
द्यावे प्रभुला हा धीर तरी त्या विप्राला नोहे ॥ ४८ ॥
संकोचला अधो-मुख बसला विप्र न बोले कांहीं ॥
बुडताचि होता मुनि तो केवळ लज्जा-नदी-प्रवाहीं ॥ ४९ ॥
सखा कृतार्थ कराया निंद्या चिंध्या आपण पाहे ॥
पृथुक-मोटली[२] सांपडतां प्रभु बहु-हर्षाला लाहे ॥ ५० ॥
सोडुनि गांठी पृथुक-मुष्टि तो वदनीं घालुनि भक्षी ॥
तों तों लाजे विप्र प्रभुच्या मुख-पद्मासि न लक्षी ॥ ५१ ॥
'भूतात्म्याला मजला तार्पिति[३] पोहे हे बहु फार ॥
याहुनि न रुचे भुवनीं बंधो अन्य उपायन-सार[४]' ॥ ५२ ॥
ऐसें स्तवुनि उपायन दुसरी मुष्टि श्री-पति उचली ॥
तों रुक्मिणी धरी कर धांवुनि म्हणे, 'मला हे रुचली ॥ ५३ ॥
द्यावा प्रसाद हा सर्वांला भक्षूं वाडेंकोडें[५] ॥
सेवन करितां तुम्हांला तों हें ब्रह्मांडहि थोडें ॥ ५४ ॥
इह-पर[६] भवज्जनाला[७] येणें सर्वहि समृद्धि झाली ॥
पुरे मुष्टि-पृथुकांचें भक्षण ब्रह्मांडावलि धाली' ॥ ५५ ॥
पोहे नेले हिरोनि भगवत्-पर-पद्म-जा-सतीनें[८] ॥
प्रार्थुनि रिझवुनि हंसवुनि रमवुनि निज-पतिला सु-मतीनें ॥ ५६ ॥

---

१ चार मुठी. २ पोह्यांची गांठोडी. ३ तृप्त करितात. ४ उत्तम नजराणा. ५ मोठ्या कौतुकानें. ६ ह्या लोकीं व परलोकीं. ७ तुमच्या भक्तांस. ८ भगवत्सेवेविषयीं तत्पर जी पद्मजा म्हणजे लक्ष्मी तद्रूप जी सती म्हणजे पतिव्रता रुक्मिणी तिनें.

षड्रसयुक्तें[1] चतुर्विधान्नें[2] भोजन झालें रातीं ॥
ब्रह्माद्यलभ्य-पंक्ति[3] लाधली दैवें विप्र-वरा ती ॥ ५७ ॥

निज-पल्यंकीं[4] मृदु-शयनावरि विप्राला यदु-राय ॥
निजवुनि परमादरें हळूहळु करें चुरी मग पाय ॥ ५८ ॥

स्वर्ग-सुखाहुनि बहु सौख्याला विप्र पावला रातीं ॥
प्रातःकाळीं उठतां आज्ञा मग दे कंसाराती[5] ॥ ५९ ॥

पावित[6] गेला दूर जगत्पति कंठ दाटला भारी ॥
मित्र-वियोगें प्रभुच्या वाहे नेत्रांपासुनि वारी ॥ ६० ॥

'माझें स्मरण असों दे', ऐसें म्हणे स-गद्गद-कंठ ॥
आलिंगुनि वंदुनि विप्राला परते मग वैकुंठ[7] ॥ ६१ ॥

ब्राह्मण देव-वियोगें व्याकुळ होउनि सावध झाला ॥
भगवद्दर्शन-लाभ घेउनी स्वांतीं पुष्कळ धाला ॥ ६२ ॥

मनीं म्हणे द्विज, 'मजला कांहीं कृष्णें न दिलें वित्त ॥
मी मागावें तेंहि विसरलों स्व-मुखें, भुललें चित्त ॥ ६३ ॥

स्त्री परि हांसेल घरा जातां यासि करावें काय ॥
हांसो सुखें, परंतु वदान्य-श्रेष्ठ[8] खरा यदु-राय ॥ ६४ ॥

दरिद्र मी वित्ताच्या लाभें होइन मत्त उदंड ॥
आतांचेपरि मग न घडेल प्रभुचें स्मरण अ-खंड ॥ ६५ ॥

यास्तव करुणा-निधिनें दुर्लभ दर्शन देउनि मातें ॥
धन न दिलें हें बरवें केलें दीन-जनाच्या तातें' ॥ ६६ ॥

असें मनीं चिंतित निज-मार्गें आला स्व-गृहापाशीं ॥
तों त्याच्या दृष्टीला पडला सहसा तेजो-राशी ॥ ६७ ॥

म्हणे, 'काय हें कैसें झालें गृह जें माझें होतें ॥
तेथें कैशी स्वर्ण-पुरी[9] ही काय जाहलें हो तें' ॥ ६८ ॥

---

१ गोड, आंबट, तिखट, खारट, तुरट, कडू; असे सहा रस. २ खाद्य, पेय, लेह्य व चोष्य अशीं चार प्रकारचीं अन्नें. ३ ब्रह्मादिक देवांसही मिळण्यास कठीण. ४ आपल्या मंचकावर. ५ कंसाचा अराति म्हणजे शत्रु कृष्ण. ६ पोंचवीत. ७ कृष्ण. ८ मोठा उदार. ९ सोन्याची नगरी.

विस्मित होउनि पाहे तो मुनि नानोपवनें[1] रम्यें ॥
कनक-पुरीच्यामध्यें सदनें रत्नांचीं अनुपम्यें[2] ॥ ६९ ॥
नर-नारी-जन देव-समान स्वालंकृत[3] अति गेहीं ॥
रत्न-भूषणें वस्त्रें रवि-सम दीप्ति जयांच्या देहीं ॥ ७० ॥
आला स्वामी म्हणुनि पुढें मग नागरीक जन धांवे ॥
वाजत गाजत गृहासि आणिति मुनिला पूजुनि भावें ॥ ७१ ॥
देवांगना तशी शुभ-गात्री विप्राची स्त्री गेहीं ॥
पति आला हें परिसुनि झाली सुख-रोमांचित देहीं ॥ ७२ ॥
देव-स्त्री-सम दासी-शत-युत[4] आली धांवुनि दारा ॥
पतिस विलोकुनि हृदयीं भेटे[5] साध्वी परमोदारा[6] ॥ ७३ ॥
नेला गेहीं पति निज-हस्तें धरुनि करीं बहु-मानें ॥
दिव्य समृद्धि विलोकुनि जाणे मुनि तद्बीज[7] ज्ञानें ॥ ७४ ॥
म्हणे मुनी, "मी जन्मापासुनि दरिद्र केवळ पापी ॥
हरि-दर्शनाविणें कोण दुजा या भाग्य-पदीं स्थापी ॥ ७५ ॥
महा-विभूति-यदूत्तम-दर्शन[8] समृद्धि-कारण साचें ॥
काम-द मेघ-श्याम पुरवितो कामित[9] निज-दासाचें ॥ ७६ ॥
देवाचे-परि देव-प्रभुनें समर्पिलें मज हस्तें ॥
तीर्थ-पदें[10] मत्पदावनेजन[11] धरिलें कीं निज-मस्तें ॥ ७७ ॥
केली माझी सेवा देवें निजवीलें स्व-पलंगीं ॥
सु-गंध-लेपन केलें प्रभुनें निज-हस्तेंचि मदंगीं[12] ॥ ७८ ॥
मज दीनातें 'बंधो बंधो' ऐसें वदला स्वामी ॥
अन्वर्थता[13] प्रकट केली कीं दीन-बंधु या नामीं ॥ ७९ ॥

---

१ नानाप्रकारच्या बागा. २ ज्यांना उपमा नाहीं अशीं. ३ उत्तम प्रकारें अलंकारांनीं शोभविलेलें. ४ शेंकडों दासींसहित. ५ आलिंगन देई. ६ फार मोठ्या मनाची. ७ त्या समृद्धीचें कारण. ८ मोठा ऐश्वर्यवान् जो यदूत्तम म्हणजे यदुकुलांत उत्तम श्रीकृष्ण त्याचें दर्शन. ९ इच्छिलेलें. १० ज्याच्या पायांच्या ठिकाणीं तीर्थें आहेत अशा श्रीकृष्णानें. ११ (मत्+पद+अवनेजन) ज्यांत माझे पाय धुतले आहेत असें पाणी (अवनेजन—अव+निज=धुणें). १२ माझ्या आंगाला. १३ नांवाच्या अर्थास अनुरूप अशी कृति.

सौहृद मैत्री[१] सख्य[१] दास्य[१] त्या देवाचेंचि असावें ॥
जन्मोजन्मीं तद्भजनाचें प्रेम मनांत वसावें ॥ ८० ॥

केलें कृतार्थ भुवनहि माझ्या सख्या मुकुंदा स्वामी ॥
तूं करुणांबुद-जीवन-सुख-कर[२] मयूर चातक आम्ही" ॥ ८१ ॥

ऐसा भगवत्सखा सुदामा स्त्रीसह भजे प्रभूतें ॥
इह-पर नित्यचि पावता झाला तेणें सुख प्रभूतें ॥ ८२ ॥

दीनोद्धरण[३] चरित्र विभुचें पावन गोड उदार ॥
राम-नंदनें मयूरेश्वरें फार मानिलें सार ॥ ८३ ॥

वाणी पवित्र करावयास्तव पथुकोपाख्यान सुखें ॥
लेश-मात्र वर्णिलें पुन्हाही[४] मयुरेश्वरेंच स्व-मुखें ॥ ८४ ॥

रसिक विष्णु-भक्ताहीं प्रेमें शिशु-भाषण परिसावें ॥
दोष निवारूनि गुण घेउनियां स्व-सुखानें नाचावें ॥ ८५ ॥
गावीं संत-चरित्रें हो । तारक मधुर पवित्रें हो ॥ ध्रु० ॥

---

१ येथें बहुधा एकार्थकच अशा अनेक शब्दांची योजना करून कवीनें सुदाम्याचा प्रेमभर दाखविला आहे. २ मयूरपक्षीं करुणांबुद व चातकपक्षीं करुणांबुद जीवन ( करुणारूप मेघोदक, असा अर्थ समजावा. परंतु ही रचना अशीच असेल तर सदोष आहे). ३ दीनांचा उद्धार करणारें. ४ एकदां आर्यावृत्तानें लिहिलें असून आतां आणखी साकीवृत्तानें लिहिलें आहे, म्हणून 'पुन्हाही' म्हटलें आहे.

# नरहरि

नरहरि या नांवाचे अनेक कवि होऊन गेले. प्रस्तुत कवीचा काल किंवा वैयक्तिक माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. 'कात्यायनीव्रत', 'नौकानयन', 'दानव्रत' हींही काव्यें याचींच दिसतात. याची काव्यरचना वामनाच्या धर्तीवर सयमक असल्यामुळें हा कवि त्याचा शिष्यपरंपरेंतील असावा, असा एक तर्क आहे. 'गंगारत्नमाला' हें संपूर्ण काव्य प्रथम 'काव्येतिहाससंग्रहांत' (१८८९) प्रसिद्ध झालें.

विशेष माहितीकरितां पहा :—अनेक कविकृत कविता (भाग ४)—सं० ज. बा. मोडक.

## गंगारत्नमाला

व० ति०.

भागीरथि त्रि-पथ-गे पद-वंदनातें ।
मी दीन गे करितसें मति-मंद मातें ॥
हेतू मनांत भरला तव गूण गाया ।
जावो न मागत असें इतुकेंचि वायां ॥ १ ॥

(विश्वामित्र रामलक्ष्मणांसह आपल्या आश्रमास जात असतां वाटेंत,)

दिंडी.

पुढें जातां पाहोनि जान्हवीला । राम-चित्तीं संतोष फार झाला ॥
वंदुनीयां गाधिज-मुनी-पायां । म्हणे सांगा ही कोण मुनी-राया ॥२॥

नांव काय ही उत्पन्न कोण ठायीं । पाहतांची संतोष दे मला ही ॥
दाट झाडी अत्युच्च दों तटा या । स्वयें तापा साहोनि करी छाया ॥३॥

आम्र जंबू जंबीर ताल-जाती । नभा स्पर्शाया काय ऊर्ध्व जाती ॥
वरी चाषहि कोकील मत्त रावे । पांथ जातां बोलाविताति 'यावें' ॥४॥

शा० वि०.

आहा जी मुनि-राय धन्य बहु मी पाहोनियां आश्रमा ।
माझें चित्त सुखावलें पुनरपी हें आठवीं न श्रमा ॥
चाले निर्मळ वेद-घोष मजला ऐकावया येतसे ।
स्वाध्यायाभ्यसनीं द्विजौघ अवघा हा मग्न झाला असे ॥ ५ ॥

शा० वि०. येथें आश्रमसन्निधींच तटिनी स्वच्छोदका वाहती ।
वैरा श्वापद टाकुनीहि सहजा शत्रूसवें खेळती ॥
हत्ती-पोटिशिं वासरूं दडतसे, आखू[1] न ओतूस[2] भी ।
व्याघ्रांगावरि मान ठेवुनि पहा ही गाय आहे उभी ॥ ६ ॥

उ० जा०. निर्वैर या पाहुनि आश्रमातें । भारीच होतें सुख आजि मातें ॥
प्रेमें वृकांनीं मृग खाजवावे । जेथें, अशा टाकुनि काय जावें ॥ ७ ॥

साकी. मध्यान्हीं रवि आला पाहुनि, नदी-जलाचे कांठीं ॥
दर्भ करीं निजकर्म कराया, झाली मुनिंची दाटी ॥ ८ ॥
शिशू किती उप-नीत[3] ऋषींचे, आले गंगा-तीरीं ॥
दंड कमंडलु दर्भ-मुष्टि करिं, कृष्णाजीन शरीरीं ॥ ९ ॥
जटा-मुकुट शिरिं कटिस मेखला, भस्म विलेपन तनुसी ॥
ब्रह्म-सूत्र-युत वामन मूर्ती, सुखविति बघतां मजसी ॥ १० ॥
पहा पहा हे पोहुं लागले, उदकीं जाउनि कैसे ॥
देह जलांतरिं मान दिसे वरि, भासति कच्छप जैसे ॥ ११ ॥
जनक मारिती हका परंतु, पर-तीराला जाती ॥
अहं-पुर्विके[4] करुनि पुन्हा ते, परतुनि सत्वर येती ॥ १२ ॥
लाटा येतां त्यांवरि मारुनि, कर-युग शब्दा करिती ॥
पुढें पोहतां गुप्त जाउनी, मागुनि त्यांतें धरिती ॥ १३ ॥
बुडे एक त्या हुडकी दुसरा, तंव तो वरती आला ॥
जवळीं येतां सुसर पाहुनी, मागें परते भ्याला ॥ १४ ॥
स्नान करोनी तीरिं पातले, धरिती कौपीनाला ॥
भस्म लावुनी कंठिं घालिती, रुद्राक्षांच्या माळा ॥ १५ ॥
मध्यान्हीं सु-स्नात सर्वही, पवित्र-पाणी झाले ॥
ब्रह्म-कर्म मुनि समाप्त करुनी, कांहीं परत निघाले ॥ १६ ॥

---

१ उंदिर २ बोक्यास. ३ ज्यांचा व्रतबंध झाला आहे असे. ४ मी पुढें जाईन मी पुढें जाईन अशा ईर्ष्येनें.

दिंडी. जिचे तोयीं मत्स्यादि जंतु राहे। शीत-मंजुळ सू-गंध वायु वाहे ॥
गमे स्पर्शें निष्पाप करी काया। वदा ईचें माहात्म्य मुनी-राया ॥ १७ ॥

(मग विश्वामित्र म्हणाला :—)

व० ति०. ऐकोनि राम-वचना मुनि-गाधिजाला।
आनंद होय पथिंचा श्रमही रिझाला[१] ॥
रामा म्हणे मज तुवां अजि धन्य केलें।
प्रश्नें सख्या सकल कल्मष दूर गेलें ॥ १८ ॥

जीच्या तरंग-पवनें पशुही तरावे।
स्नानें तसें सकल पातक संहरावें ॥
जीतें मुनींद्र सुर-किन्नर-सिद्ध गाती।
ही राघवा हरि-पदी सुर-सिंधु गा ती ॥ १९ ॥

ईचा अगाध महिमा विधि शेष भानू।
वर्णू न ते शकति, मी वद काय वानूं ॥
विस्तार मंद-मतिच्या वदनें कशाचा।
होतो, परंतु कथितों तुज अल्प साचा ॥ २० ॥

देई सुखासि इह आणिं परत्र लोकीं।
उंचा पदार्थ दुसरा न जगीं विलोकीं ॥
गंगेविणें म्हणउनी जगदीश्वरानें।
ही मस्तकीं धरियली गिरिजा-वरानें ॥ २१ ॥

सर्पा खगेंद्र धरुनी वदनीं वरोनी।
जातां नदींत पडला अहि तो मरोनी ॥
तात्काळ होउनि चतुर्भुज त्याच पक्षी-।
राजावरी चढुनि विष्णु-पदास लक्षी ॥ २२ ॥

शा० वि०. गंगा ही हरि-पाद-पंकज-भवा स्वर्गावरी राहिली।
तेथें स्वर्ग-नदी म्हणोनि पहिले नांवाप्रति पावली ॥
तेथोनी मग शंकरें निज-जटा-जूटांतरीं वाहिली।
आली[२] भूमिवरी हरी अघ जरी पाप्यांनिं ही गाहिली ॥ २३ ॥

---

१ गेला. २ प्रवेशिलो, म्हणजे महापाप्यांनीं जरी हिजमध्यें स्नान केलें.

शा० वि०. रामा पुण्य-हरी-पदांबु-लहरी-बिंदू शरीरा जरी ।
स्पर्शे तत्क्षणिं जो असेल पदरीं तत्पाप-वृंदा हरी ॥
घेतां नांव जिचें अनंत जनुचें जें पाप देहीं असे ।
गंगा त्या सकलासि घालवितसे ती भूवरी ही वसे ॥ २४ ॥

( हें ऐकून राम विचारतो :— )

उ० जा०. भागीरथी कां इजला म्हणावें । कैशी वदा जान्हवि नांव पावे ॥
आश्चर्य मातें बहु होत आहे । दीनार्थ जी भूवरि माय वाहे ॥२५॥

( विश्वामित्र सांगतो :— )

उ० जा०. मुनी म्हणे आइक राम-राया । जो लागला मृत्यु-करा मराया ॥
सकृत् जरी घे नर नाम वाचे । तात्काळ नाशी भय तें भवाचें ॥२६॥

शा० वि०. साकेताधिप-नंदना हरि-पदी गंगा जगन्माउली ।
ऐकें सांगतसें सख्या तुज कशी स्वर्गाप्रती पावली ॥
जीच्या सानुज आयिकोनि सकला हो सच्चरित्रा सुखी ।
नित्य श्री-कर सर्वदाहि तुझिया तन्नाम राहो मुखीं ॥२७॥

प्रल्हादात्मज जो विरोचन तया सत्पुत्र झाला बळी ।
नामें सर्व सुरांसि जिंकुनि करी राज्य त्रि-लोकीं बळी ॥
तत्त्रासें स्तविला रमेश अमरीं जो भक्त-चिंतामणी ।
घे तो कश्यप-गेहिं जन्म अदिती-पोटीं जगाचा धणी ॥२८॥

गीति. न्हस्वाकृति धरि म्हणुनी, वामन हें नांव ठेविलें बाळा ॥
उपनयन-योग्य झाला, तेचि क्षणिं देव शिक्षि जो काळा ॥२९॥

( मग तो ब्रह्मचारी वामन बळी यज्ञ करीत होता तेथें गेला; तेव्हां :— )

उ० जा०. बळी तया पाहुनि देव-राया । प्रेमें नमी होउनि नम्र पायां ॥
म्हणे मला धन्य तुं आजि केलें । त्वद्दर्शनें कल्मष सर्व गेलें ॥३०॥

सिंहासनीं बैसवि वामनाला । संतोष झाला बळिच्या मनाला ॥
ब्रह्मादिकीं यद्यश शुद्ध गावें । पूजी तया दैत्य-पती स्वभावें ॥३१॥

कामदा. माग जें तुला पाहिजे असे । राय घे म्हणे सर्व देतसें ॥
ऐकुनी तया बोलिला हरी । सांग कोण त्वत्तुल्य भूवरी ॥३२॥

पूर्वजांचिये नांव राखिलें । एक मागतों पाहिजे दिलें ॥
मत्पदें धरा तूं त्रिपाद दे । ऐकुनी बळी बोलिला मदें ॥३३॥

कामदा. गांव आथवा राज्य माग कीं । काय पाहिजे सांग आणखी ॥
देव बोलिला, 'ईतुकें पुरे । लोभ केलिया कायही नुरे' ॥ ३४ ॥

पृथ्वी. नको म्हणत आसतां गुरु[1] धरा तयाला दिली ।
विरोचन-सुतें, तदा वचन-सत्यता राखिली ॥
तदैव जगदीश्वरें निज-विराट-रूपच्छलें ।
अनंतहि पद-द्वयें जग समग्रही व्यापिलें ॥ ३५ ॥

स्रग्धरा. गेला जो ऊर्ध्व-पाद त्रि-भुवन-गुरुचा तन्नखें रंध्र झालें ।
ब्रह्मांडाच्छादनाला तदुपरि जळ जें शुद्ध तें आंत आलें ॥
पाद-स्पर्शें प्रभूच्या सकल-जगदघ-ध्वंस-कर्तृत्व त्यातें ।
ये स्वर्गी ब्रह्मदेवाद्यमर-नुत पडे घोर तोयौघ पातें ॥ ३६ ॥

गीति. विष्णु-पद-स्पर्शानें विष्णु-पदी-नांव पावली राया ॥
तेथुनि स्वर्गी राहे गंगा-नामें सुरांसि ताराया ॥ ३७ ॥

देव-मुनि स्तविति जिला गाती गंधर्व सर्वदा राया ॥
सुर-सिंधू ती भूवरि आली कलुषौघ सर्व दाराया ॥ ३८ ॥

मालिनी. सगर-तनय रामा मत्त होवोनि गेले ।
कपिल-नयन-वन्हीमाजि पोळोनि मेले ॥
शुभ-गति पितरांतें द्यावया दीन-बंधु ।
भगिरथ नृप आणी भूवरी स्वर्ग-सिंधु ॥ ३९ ॥

उ० जा०. भगीरथें आइकिलें स्व-कानीं । केलें महत्पाप मदें स्वकांनीं ॥
पिता[2] परं-धाम-पदास[3] गेला । जाणोनि पुत्रें मग यत्न केला ॥४०॥

देवोनि राज्यासि निजात्मजातें । निघे मुनी वानिति देव ज्यातें ॥
गंगा-जळातें पितरांसि द्याया । सु-पुत्र ये काननिं राम-राया ॥४१॥

जेथें असंख्यात अ-मर्त्य येती । गंधर्व विद्याधर सिद्ध गाती ॥
अ-गम्य जो पातकि-मानवाला । हिमाचळीं त्या नर-पाळ आला ॥४२॥

जेथें दिसे उंच पवित्र झाडी । स्व-पल्लवें स्वर्ग-मलासि झाडी ॥
कोंदाटलीं पक्षि-रवें वनें तीं । बोलावुनी देव-गतीस नेती ॥४३॥

हिमाचळीं जें सुख देव यांतें । न होय तें नंदनिं मंद-वातें ॥
कळेल कोणा महिमा तयाची । रामा, सुता ती गिरिजा जयाची ॥४४॥

---

[1] शुक्राचार्य. [2] दिलीप. [3] मोक्षपदास.

भु० प्र०.

करी व्याघ्र शब्दासि एके ठिकाणीं ।
कडेलोट चाले खळाळोनि पाणी ॥
पडे ओघ खालीं जळांचा कडाडे ।
न त्या साहतां ती महीही धडाडे ॥ ४५ ॥

कडे तूटले एक ठायासि खालीं ।
मदें मत्त-दंती-कदंबें निघालीं ॥
तशा हस्तिंना पाहतां शैल-काया ।
गमे मेघ जाती तळीं काय राया ॥ ४६ ॥

गुहेमाजि जे नीजले सिंह त्यांला ।
महत्तोय-शब्दें गमे शत्रु आला ॥
प्रतिस्पर्धितेनें स्वयें गर्जताती ।
तया ऐकतां श्वापदें दूर जाती ॥ ४७ ॥

तपस्वी उभे राहिले एक-पायीं ।
तसे बैसले नेत्र झांकोनि कांहीं ॥
नसे मांस देहीं त्वगस्थीच राहे ।
दिसे एक डोयी जटा-भार वाहे ॥ ४८ ॥

किती पर्ण भक्षोनियां राहताती ।
जितेंद्रीय कोणी सदा ब्रह्म ध्याती ॥
किती वायु-भक्षी किती धूम्र-पानी ।
किती देह टाकोनि जाती विमानीं ॥ ४९ ॥

कामदा.

एक ठायिं ते वाहती झरे । कूट-तुल्यही[१] बर्फ पाझरे ॥
तूटले कडे श्वापदां नसे । मार्ग पाहतां भीति होतसे ॥ ५० ॥
म्लान दीवसा ज्या वनस्पती । अग्निचे परी रात्रिं दीसती ॥
त्या मणि-प्रकाशीत वारुळीं । बैसले किती थोर कुंडली[२] ॥ ५१ ॥
चंदनाचिये वृक्षिं वेष्टना । करुनि डोलवी कुंडली[२] फणा ॥
जो कधीं नसे पक्षि पाहिला । नृप विलोकितां स्तब्ध राहिला ॥ ५२ ॥
पर्वताचिये शीखरावरी । शरभ बैसुनी ओरडा करी ॥
वैनतेयही त्याच काननीं । धरुनियां उडे सर्प आननीं ॥ ५३ ॥

---

१ पर्वताच्या शिखराएवढें. २ सर्प.

कामदा. खालिं पाहुनी हस्ति केसरी । वरुनि घे उडी मस्तकावरी ॥
वानरें उड्या वृक्षिं मारिती । तनय वेडनी पोटिशीं किती ॥ ९४ ॥
पायिं चालतां सर्प थोरले । अजगरादि ते मत्त पाहिले ॥
पाहि जो पुढें व्याघ्र एकला । महिष फाडुनी खात बैसला ॥ ९५ ॥

उ०जा०. करी तशा घोर नगीं तपाला । भक्षोनियां शुष्क गळीत[1] पाला ॥
जिंकोनि सर्वेंद्रिय-वृत्ति राही । कित्येक संवत्सर पी निराही ॥ ९६ ॥

शिखरिणी. सहस्राब्दें ऐसें भगिरथ करी उग्र तप जें ।
तया योगें गंगा-हृदयिं करुणा फार उपजे ॥
धरोनी देहातें सकळ-जनता-पाप-हर ती ।
उभी राहे भावें नृप-निकट रामा प्रहर ती ॥ ९७ ॥
जया पाहे त्यातें करिल नयनें भस्म यतिला ।
अशा पाहोनी त्या बहुत उपजे विस्मय तिला ॥
म्हणे राया पाहें नयन उघडीं चिंतिसि जिळा ।
प्रसन्ना मी आहें वद कवण बा कष्ट तुजला ॥ ९८ ॥
नृपाच्या गंगेचा मधुर श्रवणीं शब्द पडला ।
तृषार्ताच्या जैसा वदनिं अमृत-स्राव घडला ॥
किती वानूं झाला तिजसि बघतां हर्ष न मिती ।
उभी गंगा जेथें विधि-मुख जिला देव नमिती ॥ ९९ ॥
सहस्रादित्यांची जणु सम[2] रुची एकवटली ।
जगत्पापांधारा खनन करण्या काय नटली ॥
अशी देखे माता चरणिं करि लोटांगण तदा ।
नृप क्षाली प्रेमोद्गत-नयन-तोयें मग पदा ॥ ६० ॥

व० ति०. झाला नृपासि अति-हर्ष न माय चित्तीं ।
रोमांच-रूप उमटे सकलांग-भित्ती ॥
प्रेमें तदक्षि-युगलांतुनि जाय पाणी ।
होतां सगद्गद गळा वदवे न वाणी ॥ ६१ ॥
पाहोनि माय करितां नमना तयाला ।
आणी कृतार्थ करणेंचि मनांत याला ॥
ठेवी भगीरथ-शिरीं कर-पंकजा ती ।
जेणें सुरेंद्रपदवीसहि मर्त्य जाती ॥ ६२ ॥

---

१ गलित—गळून पडलेला. २ संपूर्ण.

व० ति. वंदोनि पाद-कमळीं 'उदयोऽस्तु[१]' तीला ।
ऐसें वदोनि करि विष्णु-पदी-स्तुतीला ॥
माते सभाग्य मजवांचुनि कोण आहे ।
जो मस्तकीं मि तव पाद-रजांसि वाहें ॥ ६३ ॥

ललित. जाणती तुला सुर न दीन मी । जाणुनी असे सुर-नदी नमीं ॥
वाटतें मला स-फळ आजसें । काक मानसीं[२] उतरतां जसे ॥ ६४ ॥
देवता मुनी नमिति सर्वदा । तूजवांचुनि कवण सर्वदा ॥
ब्रह्मदेवही तुजसि वानितां । थोर पावला विबुध-मान्यता ॥ ६५ ॥

गीति. माते सहस्र-वदना नाहीं सामर्थ्य तव गुणा गाया ॥
नागाही, तुजवांचुनि जाऊं कवणा अभीष्ट मागाया ॥ ६६ ॥
तुजवांचुनि मत्पितरां कवणा सामर्थ्य सांग ताराया ॥
रविनेंचि जाय तम जें, उगवुनि करितील काय तारा या ॥ ६७ ॥
मत्पूर्वज कपिलाच्या शापें गेले मरोनि नरकाला ॥
दैवें करील पर-वश झाल्या प्रतिकूळ काय नर काला ॥ ६८ ॥
यास्तव मदर्थ ये तूं भूवरि करण्यासि शुद्ध पितरां या ॥
वितराया स्वर्गातिला होई सोपान-पद्धति तराया ॥ ६९ ॥

शा० वि. गंगा ऐकुनि भूप-वाक्य वदली राया कसें हें घडे ।
वेगें कोण धरील सांग मजला जी भूवरी मी पडें ॥
भूमी भेदुनि खालती निज बळें जाईन मी अन्यथा ।
याचा काय विचार सांग मजला ये भूपते त्वन्मता ॥ ७० ॥

दिंडी. म्हणे नृपती जाइन शंकरातें । भक्तियोगें मी शरण आजि मातें ॥
तूज मुकुटीं वाहील शूल-पाणी । भक्त-राज ही जाण सत्य वाणी ॥ ७१ ॥
वदोनीयां गंगेसि तदा ऐसें । जाउनीयां कैलास-नगीं बैसे ॥
करी ध्यान चित्तांत शंकराचें । वेद-मंत्रेंकरूनि स्तवी वाचे ॥ ७२ ॥

पद. ये सज्जन-हृदय-कमल-वास शंकरा रे ये ॥ ध्रु० ॥
दक्षाध्वर-हर[३] हर भव सच्चित्सुखपूर्ण-विभव ॥
निर्दाळीं भय भव-भय ज्ञान-सागरा रे ॥ १ ॥ ये० ॥

---

१ (उदयः+अस्तु)=तुझा उदय असो. २ मानससरोवरीं. ३ पुढें पृष्ठ ४८७ पद्य १०५ पहा.

पद. जगताचा माय-बाप तूंच हरिसि सर्व पाप ॥
निववुनि मच्चित्त-ताप सुखविं पामरा रे ॥ २ ॥ ये० ॥

कारितां स्तवनासि राय, प्रगटे शिव सदय-काय ॥
रघुपति-सुत धरुनि पाय; घे म्हणे वरा रे ॥ ३ ॥ ये० ॥७३॥

भु०प्र०. उभा राहिला येउनी शूल-पाणी। 'वरं[१] ब्रूहि[१]' ऐशी वदे मूळ वाणी[१] ॥
नृपा ऐकतां थोर आनंद झाला। जसा मेघ-शब्दें मनीं चातकाला ॥७४॥

नृपें देखिला चंद्रकोटीप्रकाश। करी जो प्रभू भक्त-हृत्ताप-नाश ॥
शिरीं चंद्र भाळीं शिखी कंठिं काळा। चतुर्बाहु शोभे उरीं सर्प-माळा ॥७५॥

दिसे कृत्ति-वासा शिवा वाम-अंगा। तनू-भूषणीं लेइलासे भुजंगा ॥
प्रसन्नासि त्या पाहुनी देव-राया। धरी नम्र होवोनि भूपाळ पायां ॥७६॥

म्हणे राय आणीक तें काय मागूं। असे सत्य माझेवरी आनुरागू ॥
कृपाळू जगन्नायका देवराजा। म्हणोनीच दृष्टी पडीलासि माझ्या ॥७७॥

परी लागली एक चिंता मनासी। दयाळा तुम्हांवांचुनी कोण नाशी ॥
गती द्यावया पूर्वजां येत आहे। तया स्वर्नदीचा शिरीं भार वाहें ॥७८॥

नृपाची अशी ऐकुनी दीन वाणी। तथास्तू म्हणे राजया शूल-पाणी ॥
सवें घेउनी तो निघे भूत-सेवा। शिरीं घ्यावया विष्णु-पादोद-गंगा ॥७९॥

हिमाद्रीवरी शंभु जांवाइ आला। श्वशूरासि दावावया विक्रमाला ॥
म्हणे हाक मारीं नृपा स्वर्धुनीतें। पहा भार घेतों शिरीं आज मी तें ॥८०॥

पृथ्वी. करी स्मरण भूपती जंवर[२] आठवोनी पदा।
बसे सुरतरंगिणी नृपति-दक्षिणांकीं तदा ॥
म्हणे भगिरथा तुझी समज कन्यका बा मला।
पतीजवळि पोंचवीं जगतिं[३] हो यशस्वी भला ॥ ८१ ॥

विलोकुनि म्हणे तिला नृप दिली मला पामरा।
पितृत्वपदवी तुवां जननि वंद्य जी सामरा[४] ॥
महत्त्व दिधलें तसें झटिति तात-कार्या करीं।
शिरीं तुज धरी जगत्प्रभु अतांचि ये भूवरी ॥ ८२ ॥

---

१ वर माग हे शब्द शंकर प्रथम बोलला. २ जोंपर्यंत. ३ पृथ्वीवर. ४ देवादिकांस.

व० ति०. त्यातें तथास्तु म्हणुनी मग गुप्त झाली ।
येण्यासि भूमिवरि वेग-बळें निघाली ॥
भागीरथी म्हणति यद्दुहिता म्हणोनी ।
गंगेसि धन्य गमला न तदन्य कोणी ॥ ८३ ॥

## कटाव

सुर-लोकाहुनि गंगा खालीं, भूमिवरि येण्यासि निघाली, शर्व-जटीं ती उडीच घाली, देव-मंडळी पाहूं आली, फिरति विमानें दाटी झाली, मुनि-गण-संतति सर्व मिळाली, जयोऽस्तु म्हणुनी स्तवनें करिती, सुरांगना ओंवाळिति अरती, किन्नर टाकिति पुष्पें वरती, हाहा हूहू तुंबरु गाती, सर्व अप्सरा प्रेमें नाचति, घो घो शब्दें पूर चालला, अरुण सांवरी सूर्य-रथाला, नक्षत्रांच्या वाहती माळा, मोत्यांपरि त्या दिसति तळाला, पाहुनि पर्वत-फेन-मळाला, ऐरावतिचा गर्व गळाला, द्वि-रदांगापरि लाटा वाहती, विमान-नावा वरी पोंहती, विचित्र रंगा तरंग दाविति, भुजं-गांगपरि प्रवाह धांवति, लयासि कच्छप मत्स्य पावती, तरंग-वातें पाप हरावें, स्मरण करितां निर्मळ भावें, काळाचें भय मुळीं न पावे, स्नानें विष्णु-पदाला जावें, पवित्र ज्यांनीं चरित्र गावें, एकवीस कुळ उद्धारावें, त्या गंगेचें दर्शन घ्यावें, तरीच मनुजें जन्मा यावें, गंगा आली शिवजटेंत गुप्त झाली ॥ ८४ ॥

शा० वि०. गंगा-गर्व हरावया सगरजा तारावया गावया ।
कीर्ती भक्त-जनीं पवित्रहि जगत्पापा विनाशावया ॥
व्हाया शांत विषोत्थ-ताप सदयें श्री-विष्णु-पादोद्भवा ।
गंगा मस्तकिं घेतली सुर-वरें वर्णूं किती त्या भवा ॥ ८५ ॥
होता गर्व नदीस वेग धरिता नाहींच कोणी परी ।
येतां शंभु-जटेंत सर्व हरला बिंदूपमेला धरी ॥
झाली गुप्त जटांतरीं न कळली जावोनि कोठें वसे ।
थोरांशीं अभिमान जो धरि तया लोकांत थारा नसे ॥ ८६ ॥
होतां गुप्त शशांक-शेखर-जटीं भागीरथी तेधवां ।
होतां खिन्न करोनि यत्न पहिला त्या खेद झाला नवा ॥
भ्याला भूप म्हणे अतां करुं कसें देवाधि-देवा मला ।
रक्षीं दे पितरांसि स्वर्ग-गतिला सोडोनि गंगा-जळा ॥ ८७ ॥

शा० वि०. ऐकोनि करुणार्द्र-वाक्य द्रवला शंभू नृपाचें तदा।
टाकी त्याच हिमालयीं अति शुची गंगाप्रवाहा मुदा ॥
संपादोनि पराक्रमेंचि दिधली जांवाइ यानें खरी।
दावायासि गमे जनां श्वशुर त्या कीर्तीस वाहे शिरीं ॥ ८८ ॥

झाले सात प्रवाह त्यांत इतर-द्वीपीं सहा चालती।
आला एक भगीरथार्थ जहला तो तीन भागाकृती ॥
ब्रह्मा-विष्णु-शिवात्मक प्रकृतिचें त्रैगुण्य तें भिन्नता।
पावे काय, जगच्छिवार्थ वहतें स्वीकारुनी तोयता ॥ ८९ ॥

गंगोत्री पहिली दुजीस म्हणती मंदाकिनी यापरी।
तत्पूर्वेस असे जिला अलकनंदा नांव ती तीसरी ॥
गंगोत्रींत असे भगीरथ-शिळा केदार मंदाकिनी।
कांठीं तीसरिचे वसे नर अणी नारायण श्रीमुनी ॥ ९० ॥

मालिनी. निज-पद-विभवाचें काय माहात्म्य आहे।
समजुनि मनिं व्याया येउनी विष्णु राहे ॥
नर-सह तप चाले उग्र रामायणाचें।
सुर-मुनि अति हर्षें पाहुनी गात नाचे ॥ ९१ ॥

हरि-हर वसती ज्या स्वर्नदी-पुण्य-कांठीं।
सतत सुर-मुनींची दर्शनालागिं दाटी ॥
अनुपम किती वानूं स्थान तें मी स्व-वाचा।
शत-जनु-कृत्य-पुण्यें लाभ होतो तयाचा ॥ ९२ ॥

सुलभ सुर-पदाचा लाभ यज्ञादि-कर्त्या।
अ-सुलभ बदरीच्या काननीं वास मर्त्या ॥
करुनि सुर-नदीचें स्नान केदार-नाथा।
नमि जरि नर त्याच्या येतसे मुक्ति हाता ॥ ९३ ॥

अतिशय महिमा तो थोर नारायणाचा।
भव-भय हरि ज्याचें नांव घेतांचि वाचा ॥
करुनि अलकनंदा-स्नान जो मूर्ति पाहे।
सकृदपि नर वैकुंठासि जावोनि राहे ॥ ९४ ॥

व० ति०.

अन्वर्थक प्रकट नांव हिमालयाचें ।
भारीच बर्फ दिसताति थवे जयाचे ॥
षण्मास यास्तव सु-पुण्य तया स्थळासी ।
देवांविणें गमन-शक्ति नसे नरासि ॥ ९५ ॥

भु० प्र०.

पुढें ओघ तेथोनि येतात खालीं ।
मधें ऐक्यता त्यांत दोघांसि झाली ॥
मिळे यत्र गंगोत्रि मंदाकिनीतें ।
धरी स्थान रुद्र-प्रयागाभिधेतें ॥ ९६ ॥

दिला भाग रुद्रासि तेथें सुरांनीं ।
असें सेवितां मुक्ति दे जें नरांनीं ॥
तया तीर्थिं साहोनियां ताप साचा ।
तपातें करी स्तोम तो तापसांचा ॥ ९७ ॥

असे श्रीपुरी पूर्व-अंगास खालीं ।
रमा कांत-नारायणासाठिं आली ॥
तपो-भंग-भीत्यर्थ दूरीच राहे ।
म्हणोनी पुरी श्री असें नांव वाहे ॥ ९८ ॥

पुढें तीनही ओघ एकेच ठायीं ।
मिळाले मुळीं भिन्नता ज्यांसि नाहीं ॥
अवस्था-त्रयीं द्वैत-भावासि वाहे ।
परी आत्म-रूप स्वयें एक आहे ॥ ९९ ॥

सुरेंद्राचि ती वृत्र-हत्या हराया ।
सुरीं याग केला असे याचि ठाया ॥
तशा देव-यज्ञीं हरी तुष्ट झाला ।
म्हणे कांहिं मागा सुरांतें वराला ॥ १०० ॥

तया बोलिले देव देसी वरासी ।
तरी ईतुकें दे दयाळा अम्हांसी ॥
अम्हीं याग येथें असे आजि केला ।
धरो तीर्थ देव-प्रयागाभिधेला ॥ १०१ ॥

भु०प्र०. करी स्नान जो दान त्या मुक्ति व्हावी।
तपा जो करी त्या स्व-रूपासि दावीं ॥
'तथास्तू' म्हणोनी हरी गुप्त झाला।
वसे नांव देव-प्रयाग स्थळाला ॥ १०२ ॥

साकी. म्हणे गाधि-सुत सुर-प्रयागापासुनि गंगा आली ॥
उल्लंघोनी हिमालयातें पर्वत-राजाखालीं ॥ १०३ ॥
तये ठिकाणीं हरि-द्वार हें स्थान असे रघु-राया ॥
स्वर्ग-द्वारचि जाण लक्ष्मणा विष्णु-दर्शना जाया ॥ १०४ ॥
शिव-द्वेष मनिं धरुनि यज्ञ ते ठायीं दक्षें केला ॥
यज्ञ-पती शिव कोपें दक्षासह मख नाशा नेला ॥ १०५ ॥
सभय सुरांनीं स्मरतां ते क्षणिं श्रीहरि तेथें आला ॥
शिवासि जातां शरण सुरांसह शिवही येता झाला ॥ १०६ ॥
शर्वाज्ञेनें बस्त-मुखातें[1] लावुनि गंगा-स्नाना ॥
घालितांचि तो सजिव दक्ष करि शिव-स्तुतीतें नाना ॥ १०७ ॥
रुद्रातें सुर भाग देउनी स्तविती जोडुनि पाणी ॥
वरद-राज तो संतोषे मग वदे सुरांतें वाणी ॥ १०८ ॥
हरि-प्राप्तिचें द्वार म्हणोनी हरि-द्वार हें राहो ॥
नांव पुरीला, येथें येतां पतितहि मुक्ती पावो ॥ १०९ ॥
ऋतु-दर्भानें पूर्ण-गर्भ हें तीर्थ जाहलें याला ॥
कुशावर्त हें नांव जनांतें ने स्नानें मोक्षाला ॥ ११० ॥
असें वदोनी शंभु राहिला बिल्वकेश या नांवें ॥
पश्चिम-भागीं गंगा-तीरीं पुरींत हरिही राहे ॥ १११ ॥
माया-नगरी तीच राघवा हरि-हर जेथें वसती ॥
त्या गंगेला काय वर्णुं मी सहस्र जिव्हा नसती ॥ ११२ ॥
शर्व-जटोद्भव वीरभद्र जो दक्ष वधाया आला ॥
हरि-द्वार या क्षेत्रामागें प्रेमें वसता झाला ॥ ११३ ॥
क्षेत्राजवळी पश्चिम-वाहिनि रामा गंगा झाली ॥
पुढें अग्निच्या दिशे लक्षुनी वेगें सिंधु निघाली ॥ ११४ ॥

---

[1] बोकड.

गीति. आहे तदग्र-भागीं जो निंदी दक्ष लोक-पा वांया ॥
दावाया सु-पथ तया कनखल हें तीर्थ लोक पावाया ॥ ११५ ॥

तत्तीरीं दक्षेश्वर पुण्य-क्षेत्रहि असे नरा ज्याचा ॥
बा लाभ सुखद जैसा इंद्राच्याही तसा न राज्याचा ॥ ११६ ॥

ऐशीं अनंत तीर्थें जींत मला वर्णवे न रामा तीं ॥
नेती विष्णु-पदातें यत्तीर-ज लागतां नरा माती ॥ ११७ ॥

संक्षेपें तुज कथितों गंगा-तीर्थासि राम-राया गा ॥
यत्स्नानें स्वर्ग मिळे जो न मिळे करुनि पामरा यागा ॥ ११८ ॥

त्याच्या पुढेंहि पश्चिम-भागीं रानांत गडमुनीसाठीं ॥
मुक्ती द्याया आला गडमुक्तेश्वर वसे धुनी-कांठीं ॥ ११९ ॥

भु०प्र०. तयाच्या पुढें हास्तिनापूर रामा ।
असे चंद्र-वंशांत जो हस्ति-रामा ॥
महा शूर तो भूपति श्रेष्ठ झाला ।
सुरांच्या सभेमाजि गाताति ज्याला ॥ १२० ॥

अ-पापी निरोगी चिरायू तसाही ।
वसे लोक जेथें परोत्कर्ष-साही ॥
अकालीं नसे मृत्यु राज्यांत याच्या ।
रिपु-त्रास स्वप्नीं न राज्या तयाच्या ॥ १२१ ॥

करी यज्ञ भागीरथी-तीरिं भारी ।
सुखें नांदती ज्या स्थळीं मर्त्य नारी ॥
प्रतापी पुरा आपुलें नांव ठेवी ।
प्रसन्न जया सर्वदा सिंधु-देवी ॥ १२२ ॥

शा०वि०. रम्य क्षेत्र तसें पुढें दिसतसे ज्या ऊपमाही नसे ।
ब्रह्मावर्त असें जयासि विलसे नांव स्वयें स्वर्गसें ॥
गंगा कांठिं वसे जयांत निवसे ब्रह्मेश्वर-श्री[१] रसें ।
संपूर्ण स्व-यशें जनाघ दवसें नाशी सुखा देतसे ॥ १२३ ॥

१ ब्रह्मेश्वरश्री म्हणजे श्रीब्रह्मेश्वर.

पृथ्वी. पुढें सरळ चालली निज-पतीस भेटावया ।
हिमाचल-सु-कन्यका पितृ-कुला त्यजोनी दया ॥
सती पितृ-गृहांतुनी श्वशुर-गेहिं जातां जशी ।
पुन्हा न परते जनीं कुल-पती-सुता ही तशी ॥ १२४ ॥

हिमाद्रिंतुनि ये मधें कुशिक-सिंधु भेटीस ती ।
समर्थ तनया निवे सखिस देत भेटी सती ॥
पुरें उभयतां तटीं असति दोनही तीं तशीं ।
प्रकाश-कर शोभती श्रवण-भूषणें तीं जशीं ॥ १२५ ॥

शिखरिणी. पुढें आली रामा करित तट-देशा सफळ ती ।
करावें ज्या कामें भजन विमदें त्यास फळती ॥
सुता घाया धांवे जननि पय जें कश्मल हरी ।
हका मारी शब्दें करुण सदया पुण्य-लहरी ॥ १२६ ॥

शा० वि०. आली धांवत जी तशीच यमुना भागीरथी-भेटिला ।
हर्षे पाहुनि पातली निज-सखी घे तीहि पोटीं तिला ॥
दावायासि जगीं अ-भेद यमुना ही वैष्णवी श्यामला ।
गंगा जी शिव-शक्ति तींत मिसळे ज्ञानेंचि दृश्या मला ॥ १२७ ॥

दोघी संगति पावतांचि तिसरी ब्राम्ही तदंशाच ती ।
दावी गुप्त सरस्वतीहि असतां प्राकट्य मध्यें सती ॥
गंगा आणि सरस्वतीहि यमुना ज्या ठायिं झाल्या जमा ।
मोक्ष-द्वार सख्या त्रि-वेणि म्हणती लोकीं तया संगमा ॥ १२८ ॥

ब्रह्मा-विष्णु-महेश-शक्ति मिळती त्या एकमेकींमधें ।
यांचा संगम देवतांसि अवघ्या स्वर्गाहुनी सौख्य दे ॥
आले देव समस्त यास्तव तया ठायासि सानंद ते ।
पुष्पें वर्षति गाति नाचति स्वयें स्तोत्रें करीती शतें ॥ १२९ ॥

स्रग्धरा. ब्रह्यानें सोम-याग प्रथम करुनि तत्तीरिं सोमेश्वरासी ।
स्थापोनी दीधलासे वर जरि असला नीचही पाप-राशी ॥
वेणी-स्नानेंचि त्याचें सकल अघ हरे पूजिल्या देव मुक्ती ।
स्वर्गी रोंवी ध्वजा जो सुर-पति-पद घे देह-पातेंहि मुक्ती ॥ १३० ॥

उ० जा०. वेणीपरी संगम जाहलासे । त्रिवेणि हें नांव मनोज्ञ भासे ॥
सर्वामरीं यज्ञ उदंड केले । प्रयाग हें नांव म्हणोनि झालें ॥ १३१ ॥

शा० वि०. गंगा होउनि पश्चिमाभिमुख त्या कालिंदिला भेटली ।
जेथें तें स्थळ तीर्थ-राज म्हणुनी प्रख्यात बा भू-तळीं ॥
तेथें माधव लोक-मुक्तिकरितां प्रीती धरोनी वसे ।
तीर्थें ज्यांत अनंत तीर्थ दुसरें ऐसें न कोठें असे ॥ १३२ ॥

वेणी-माधव तीर्थ-राज म्हणती तो हा प्रयागाभिधें ।
राहे कल्प-तरूच काम-द जना भू-मंडलाच्या मधें ॥
पापांधार हरावया उगवला कीं सूर्य भूमीवरी ।
तीर्थ क्षेत्र हरि-प्रिय त्रि-जगतीं नाहीं दुजें यापरी ॥ १३३ ॥

गीति. सित-कृष्ण तोय भासे अद्यापी पावली जिथें संगा ॥
पूर्वाभिमुखी होउनि यमुनेसह चालली पुढें गंगा ॥ १३४ ॥

व० ति०. पाणी सु-निर्मळ जिचें अति रम्य भासे ।
मोठे लहान फिरती अ-गणीत मासे ॥
तैसे च कच्छप अ-संख्य जळांत कांहीं ।
तीरीं बहूत रमती तप घ्यावया ही ॥ १३५ ॥

भौंरे अनंत फिरताति अ-गाध पाणी ।
तेथील नक्र-समुदाय न अंत जाणी ॥
लाटांवरी भिडति येउनि उंच लाटा ।
तीरास लागाति न होय जळांत सांठा ॥ १३६ ॥

उ० जा०. एकापुढें एक सहस्र नावा । धावोनि जाताति नसे विसांवा ॥
तरंग-वेगें वर-खालिं होती । होड्या किती त्यांतुनि पार जाती ॥ १३७ ॥

भागीरथी शब्द करीत वेगें । येऊनि सारी यमुनेसि मागें ॥
येतां तिचा ओघ मिळोनि दोघी । प्रेमें पुढें चालति पूर्व-भागीं ॥ १३८ ॥

भागीरथीचें अति शुभ्र वारी । काळी दिसे सूर्य-सुताहि भारी ॥
दोघींमधें जें जळ लाल आहे । सरस्वती ती प्रकटोनि वाहे ॥ १३९ ॥

शा० वि०. आकाशापरि तोय त्यांत ढगसे फेनौघ ते चालती ।
उष्णें अग्नि तशा स-शब्द लहरी विद्युल्लता हालती ॥
नावा त्यांत विमान-पंक्ति ताळिंचीं मोती जशा तारका ।
रामा विष्णु-पदासि याचि धरिं तूं चित्तीं सदा तारका ॥ १४० ॥

पृथ्वी. नरामर शतावधी पुलिनिं बैसुनि ते किती।
सुधा-रस-समान त्या अति अ-तृप्त तोया पिती ॥
सु-कांत पुलिनांत ते पसरले दुहीं बाजुंला।
गमे जननि पाजवी पय धरोनि तेथें मुला ॥ १४१ ॥

मृदू सुख-द वालुका लखलखीत शोभे बरी।
हिरे चुरुनि वोपिले म्हणुनि स्वच्छ तेजा धरी ॥
सुखें भरित मत्स्य ते वरिवरी उड्या मारिती।
सुरां कळविती न ती वरि[1] जळीं अम्हां जी रती ॥ १४२ ॥

मदांध गज आंतुनी करिति जीं कराग्रें वरी।
करेणु-सह चालतां दिसति पंकजाचे परी ॥
खळाळुनि जलौघ तो करित भोंवरे चालला।
तयांत फिरती तरी करिति अप्सरांच्या कला ॥ १४३ ॥

हिमाद्रि-भव चालतां पवन पत्र-पुष्पें जळीं।
समर्पण त्रि-वेणिच्या करि म्हणोनि झाला बळी ॥
तटानिकट भू-रुह श्रम-हर स्वयें वांकले।
जनांसि सुख द्यावया सु-जन संगतीच्या फळें ॥ १४४ ॥

साकी. उभय बाजुनें चित्र तरूंची दाट लागली छाया ॥
पांथस्थाला सुख-कर मोठी श्रम-हर मार्गीं जाया ॥ १४५ ॥

जंबु कंवठ सुरदारु नारळी केळि पोफळि अंबे ॥
फणस पेरु आणि लिंब-तरूंच्या भरलें तीर कदंबें ॥ १४६ ॥

सरल कुटज वट-वृक्ष सातवण प्लक्ष[2] दाडिमी चांफा ॥
शाल ताल किति तमाल उंबर घालविती जन-तापा ॥ १४७ ॥

मंदारामल बकुल बिल्व कुट[3] अशोक चंदन जाती ॥
वृक्षिं बैसले पक्षि सर्वदा भागिरथी-गुण गाती ॥ १४८ ॥

कामदा. दूर जाउनी फीरली पुढें। स्वर्ग-वासिनी उत्तरेकडे ॥
उत्तरामुखी स्नान दुर्लभा। दर्शनेंचि दे माय सु-प्रभा ॥ १४९ ॥

---

१ स्वर्गांत. २ पिंप्री अथवा पिंपळ. ३ चित्रकाचें झाड.

शा० वि. जीच्या पश्चिम-कांठिं सुंदर असें वैकुंठ जें भूवरी ।
कीं कैलास जयास नांव विलसे वाराणसी यापरी ॥
रामा योग नको तपो-बळ नको यज्ञादि सिद्धी नको ।
जेथें मुक्ति मृतासि होय सखया वेदांत-विद्या नको ॥ १९० ॥

उ० जा. गंगा उदग्वाहिनि ज्या पुरासी । अनंत जन्मार्जित पुण्य-राशी ॥
संपादिलासे पदरांत जेणें । तें पाविजे सत्य तरीच तेणें ॥ १९१ ॥

गीति. सर्ग-स्थिति-लय-कर्ता ज्याचें घेतांचि नांव भव नाशी ।
ये काशींत महेश्वर तोचि दिवोदास भक्त-भजनाशी ॥ १९२ ॥

तो विश्वेश्वर राहे येउनि भक्तार्थ काशिकेमाजी ॥
त्याच्या वासें पुरवी मनुजाच्या सर्व काशि कामा जी ॥ १९३ ॥

व० ति. जो काळ-भैरव अशा धरि सत्य नांवा ।
पापासि काळ अणि भैरव दुष्ट-भावा ॥
जे लागती सु-जन येउनि नाथ-पाया ।
तो त्यांवरी करि कृपा-भर पूर्ण छाया ॥ १९४ ॥

भु०प्र. जिथें अन्न-पूर्णा जगन्माय रामा ।
जगन्नाथ-राणी करी पूर्ण कामा ॥
वसे काशिका-गेहिं जी सर्व-दात्री ।
धरी द्यावया अन्न हस्तांत पात्री ॥ १९५ ॥

स्वागता. धुंडिराज गण-नायक काशी—। मध्यभागिं पुर-विघ्न विनाशी ॥
विश्वनाथ जवळी सुख-धामा । दर्शनें पुरवि जो जन-कामा ॥ १९६ ॥

शा० वि. गंगा भारति[1] सूर्य-सूनु किरणा बा धूत-पापा तसे ।
पांची एकवटोनि तीर्थ निपजे तें पंच-गंगा असें ॥
तन्नामें वरि घाट त्यावरि उमा-कांत-प्रिय श्री-पती ।
बिंदू-माधव नांव ज्यास पडलें मोक्षप्र-दा यत्स्मृति ॥ १९७ ॥

लोकेश-स्थिति सर्व-देव-वसती तैशीच भागिरथी ।
पाहोनी नयनांबु-बिंदुसि त्यजी सानंद लक्ष्मी-पती ॥
झाला यास्तव बिंदु-माधव हरी विख्यात वाराणसी- ।
वासी, धन्य जयासि नित्य नमिती वैकुंठ ते त्या तशी ॥ १९८ ॥

---

१ सरस्वती.

व० ति०. त्याच्याच सन्निध असे मणिकर्णिका हें ।
ज्या नांव तीर्थ वरि घाटहि रम्य आहे ॥
तीर्थें सदैव वसती अवघीं जिथें तें ।
जो देह त्यांत त्यजि त्या हर-रूप देतें ॥ १५९ ॥

भु० प्र०. शिवाचे गणीं मुख्य जो दंड-पाणी ।
हतीं [ करीं ] दंड घेवोनि पापासि खाणी ॥
पुरी-मध्य-भागीं उभा दंड-धारी ।
दिसे, हाक मारोनि पाप्यांसि तारी ॥ १६० ॥

( हें भाषण ऐकून राम म्हणाला :— )

म्हणे राम सांगा कधीं काशिकेला ।
तुम्ही श्री-मुनी-राज सर्वज्ञ गेलां ॥
असे ऐकण्याचा अती हेतु माझा ।
मला काशि-माहात्म्य-पीयूष पाजा ॥ १६१ ॥

( त्यावर विश्वामित्र सांगूं लागला :— )

शा० वि०. सांगे कौशिक पूर्व-वृत्त सखया राजा हरिश्चंद्र या ।
नामें जो तव पूर्व-ज क्षिति-तळीं चित्तीं जयाचे दया ॥
स्वप्नीं अर्पुनि सर्व राज्य मजला जो सत्त्व-शील स्वयें ।
पुत्र-स्त्री-युत दक्षिणेसि सु-कृती देण्यासि काशीस ये ॥ १६२ ॥

त्याचें सत्त्व हरावया बहु तऱ्हे त्या त्रास केला परी ।
सत्यापासुनि राय नाहिं टळला शांतीच चित्तीं धरी ॥
जेणें स्त्री-सुत-विक्रयासि करुनी डोंबा-घरीं वाहिलें ।
पाणी, यापरि सत्त्व अन्य नृपतीमाजी न मीं पाहिलें ॥ १६३ ॥

काशी-वास करोनि मुक्त जहला राजा ऋणापासुनी ।
मातें वास नृपासवेंचि घडला वाहे जिथें स्वर्धुनी ॥
केलें मी तप त्याच मुक्ति-नगरीमध्यें सु-वंशोद्भवा ।
तूंही जाउनि काशिला नदि-जळीं नाहोनि पूजीं भवा ॥ १६४ ॥

उ०जा०. एके दिनीं मी दिन-कृत्य रामा । विलोकिलें जें परि-पूर्ण-कामा ॥
आईक तें तूजसि सांगतों हें । यथा-मती विस्तर फार नोहे ॥१६५॥

उ० जा०. उठोनि जेथें सु-कृती प्रभातीं। स्नानासि त्या भागिरथीस जाती ॥
स्त्रियाहि घेवोनि कितेक बाळा। गातातिं मार्गीं हरि-सद्गुणांला ॥१६६॥
कन्या मुळीं ती हिम-पर्वताची। तीरासि थंडी म्हणवोनि साची ॥
थंडीमुळें कांपति ओंठ भारी। शिवाक्षरें तीं निघताति सारीं ॥१६७॥
कृष्णाजिना दंड-कमंडलूला। कांठावरी ठेवुनि भस्म-माळा ॥
मंदाकिनी-चंदन-पूर्व न्हाती। लावोनि देहासि सदैव माती ॥१६८॥

शा० वि०. दुर्गा-घाटिं कितेक पंचनदिच्या घाटाप्रती पावती।
कोणी श्री-मणिकर्णिकेप्रति किती त्या ब्रह्म-घाटाप्रती ॥
घाटीं घाटिं विचित्र दाटि मिळती वाटा न जाया जना।
गंगा-दर्शन सर्व पाप हरुनी आनंद दे तन्मना ॥१६९॥

उ० जा०. देवांत विश्वेश पुरींत काशी। नदींत गंगा भव-मृत्यु नाशी ॥
असोनि ऐसें त्रय एक ठाया। कां व्यर्थ हे तापविती स्व-काया ॥१७०॥

कामदा. दक्षिणेकडे काशिच्या अशी। उत्तरेकडे वारुणा तशी ॥
देव-सिंधुला मीळती नद्या। पाय पातकां सांगती न द्या ॥१७१॥

साकी. पांच कोस त्या अनंत असती तीर्थें गंगेमाजी ॥
ज्यांचें दर्शन घेतां हरती दुर्धर पातक-राशी ॥१७२॥
पुढें फिरोनी पूर्व दिशेला स्वर्ग-तरंगणि चाले ॥
कु-देश असतां गंगा-गमनें सुदेश अवघे झाले ॥१७३॥
सरयु-गंडकी-नद्यांसि पोटीं घेउनि जातां गंगा ॥
मध्यें जन्हु-नृप यज्ञ करितां वेगें करि मख-भंगा ॥१७४॥
झाला होता गर्व नदीला नाहीं वेग धराया ॥
समर्थ कोणी, परी जन्हुनें घालविला तो वांया ॥१७५॥
योग-बळें नृप नदीस प्याला तदैव गंगा भ्याली ॥
मुक्त कराया आपणास ती जन्हू-तनया झाली ॥१७६॥
मुखें सोडिली रायें तेव्हां जान्हवि-नांवा पावे ॥
सगर-जांसि मग पूत कराया प्रेमें गंगा धांवे ॥१७७॥
ज्याकरितां बहु-श्रमें भगीरथ घेउनि गंगा आला ॥
पडले असती कपिलाश्रमिं ते पूर्व जलधि-तीराला ॥१७८॥
कपिल-मुनीच्या नयनाग्नीनें भस्म जाहले जेथें ॥
साठ हजार सगर कराया मुक्त पावली तेथें ॥१७९॥

शा० वि०. आली धांवत माय जेंवि धरि ती तान्ह्या मुला पोटिशीं ।
गंगा भस्महि जाहल्या सगर-जां पोटांत घेई तशी ॥
गेले साठ हजार भस्म असतां स्पर्शें जिच्या मुक्तिला ।
रामा यास्तव नित्य नित्य सखया चित्तांत चिंतीं तिला ॥१८०॥

भु० प्र०. पुढें धांवली स्वामि-भेटीस बा ती । मिठी कंठिं घालावया काय जाती ॥
करोनी जगा पूत माहात्म्य ती तें । सहस्राननें वर्णि प्रेमें पतीतें ॥१८१॥

मालिनी. जल-निधि-नृपतीची जान्हवी पट्ट-राणी ।
पसरुनि जणु भेटी घे अ-संख्यात पाणी ॥
जननि-जनक घेतां भेटिला हर्ष झाला ।
सुर-मुनि-गण सारे टाकिती पुष्प-माला ॥१८२॥

शा० वि०. होतां भेट तरंग-पंक्ति मिळती त्या ऐकमेकींमधें ।
गंगा-सागर यापरी विधि तयां पाहोनि हर्षें वदे ॥
यातायात कशास तीर्थ-गमनीं हें मूळ पर्वीं मिळे ।
स्नाना जाति अनंत-कोटि वसती स्वर्गीं तयांचीं कुळें ॥१८३॥

उ० जा०. गंगा-चरित्रांकित-रत्न-माला । करोनि मीं अर्पिलि सज्जनांला ।
असे तयां हीच विनंती माझी । कंठीं धरायासि असोत राजी ॥१८४॥

---

# रामजोशी

रामजोशी हा सोलापुराचा राहणारा, जातीचा देशस्थ ब्राह्मण होता. तो कथाकीर्तन करून आपली उपर्जीविका करित असे. हा प्रथमतः चैनी होता व तमाशा करीत असे; आणि तमाशांत आपण केलेल्या लावण्या म्हणत असे. एके प्रसंगीं मोरोपंत कवीनें ह्याची काव्यरचना पाहून तिची फार तारीफ केली व 'तमाशा करण्याचें सोडून हरिकीर्तन करीत जा,' असा त्याला उपदेश केला; त्यामुळें तो पुढें कीर्तन करूं लागला. ह्याच्या आंगीं वक्तृत्व, बहुश्रुतपणा व समयसूचकता हे गुण चांगले होते. त्याच्या समयसूचकतेसंबंधानें पुढील आख्यायिका सांगतात :—एके वेळीं सरदार घोरपडे ह्यांच्या घरीं कथा करीत असतां ह्याला काय बिदागी द्यावी ह्यासंबंधानें घोरपडे ह्यांचे कारकून विचारांत पडून त्यांच्यांत कुजबुज सुरू झाली; ती जोशीबावाच्या ध्यानीं येऊन त्यानें तत्काळ एक समयोचित आर्या रचून तेथेंच म्हटली. ती अशी—'भोजासम कविताप्रिय, कर्णासम दानशूर घोरपडे । ऐसें असतां माझ्या देणगिचा कां

तुम्हांसि घोर पडे ॥' ही समयोचितता पाहून घोरपडयांनीं अंगावरील शालजोडी जोशीबावाच्या अंगावर टाकिली. ह्याची कविता प्राय: लावण्यांच्या चालीवर असून सरस आहे. जुन्या नवनीतांत त्याच्या नांवावर घातलेला 'छंदोमंजिरी' हा ग्रंथ त्याचा नाहीं, असें आतां ठरलें आहे. तो कथेंत बहुतकरून आपलीच कविता म्हणत असे. तथापि कधीं कधीं मोरोपंताच्या आर्याही म्हणत असे. मोरोपंताची कविता ह्यानें फार प्रसिद्ध केली असें सांगतात. जन्म शके १६८४. अलिकडील संशोधक याचा जन्मकाल चारपांच वर्षें याच्याही मागें नेतात. मरण शके १७३४.

विशेष माहितीकरितां पाहा :--रामजोशीकृत लावण्या (चित्रशाळा, पुणें); मराठी शाहीर--श्री. म. वर्दे; ऐतिहासिक पोवाडे--य. न. केळकर.

## बोधपर लावणी १

भला जन्म हा तुला लाधला खुलास हृदयीं बुधा। धरिसि तरि हरिचा सेवक सुधा ॥ ध्रु० ॥ चराचरीं गुरु तरावयाला नरा शिरावरि हरि। जरा तरी समज धरीं अंतरीं। हटातटानें पटा रंगवुनि जटा धरिशि कां शिरीं। मठाची उठाठेव कां तरी। वनांत अथवा जनांत हो कां मनांत भलत्या परी। हरिचें नांव भवांबुधि-तरी ॥ (चाल बदलून) काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लांकडें। हीं काय भवाला दुर करितिल माकडें। बाहेर मिरविशि आंत हरिशिं वांकडें ॥ (चाल पहिली) अशा भक्तिच्या रसा-रहित तूं कसा म्हणविशी बुधा। हरिरस सांडुनि घेसी दुधा ॥ १ ॥ जाळ गळ्यामधिं माळ कशाला व्याळ-काम कोपला। आंतुनि, बाहेर म्हणविशि भला। वित्त पाहातां पित्त येतसे चित्त पाहिजे मला। असें हरि म्हणतो नुमजे तुला। दांभिक वर सभांवित अभ्यंतरीं नाहिंस बिंबला। बहिर्मुख[१] नर नरका लाधला ॥ (चाल बदलून) तूं पोटासाठीं कारें खटपट भलतिशी। परि भक्ति-रसाविण हरि भेटेल काय तुसी। काय ध्यान धरुनियां गोमुखिला जाळिसि ॥ (चाल पहिली) स्वार्थ-सुखें परमार्थ बुडविला अनर्थ केला मुधा। न जाणसि कांजी म्हणसी सुधा ॥ २ ॥ टिळा-टोपिवर शिळा पडो या बिळांत करिशी जपा। तथापि न होय हरिची कृपा। दर्भमुष्टिच्या गर्भि धरुनियां निर्भर पशुच्या[२] वपा। जाळिशी तिळा तांदुळा तुपा। दंड कमंडलु बंड माजविशी मुंड मुंडशी तपा। न सार्थक लटक्या साऱ्या

---

१ ज्याचीं इंद्रियें विषयांवर लुब्ध आहेत असा. २ काळजांत केळीचे कोंवळया पानासारखा जो पापुद्रा निघत असतो.

गपा ॥ ( चा० ब० ) ही बार बार तलवार येइल काय पुन्हा । ह्या दुर्लभ नरदेहांत ठेविशी कुण्हा । भगवंत भुकेला भक्तीचा पाहुणा ॥ ( चा० प० ) वर्म कळेना धर्म घडेना कर्म चित न द्विधा । सदा हरि कविरायावर फिदा । भला जन्म हा तुला लाधला० ॥ ३ ॥

## लावणी २

नर-जन्मामधिं नरा करुनि घे नर-नारायण-गडी । तरिच हे सार्थक मानव-कुडी ॥ ध्रु० ॥ बा चौऱ्यांशीं लक्ष वेळ संसार पडला गळां । चिंतेचा पिकला मळा । दार-धनाचा लोभ टाकुनी झडकर हो वेगळा । हा कसा रुकलिशी पिळा । धनानिमित्तें जनांपुढें तूं दाविसि नाना कळा । किति तुला मुलांचा ळळा ॥ ( चा०ब० ) तूं पडूं नको याचे भरीं । तुझ्या हें खापर फुटतें शिरीं । तुला मी गोष्ट सांगतों खरी । आतां कर तांतडी । ही पुन्हा नये बा घडी ॥ ( चा०प० ) नर-जन्मामधिं० ॥ १ ॥ निपट बावळा या विषयाच्या मागें लागसि कसा । कां होसि बा वेडापिसा । वयो-धनाची किति चंचळ गति कां धरिशी भरवंसा । हें सकळ मनाला पुसा । उदरासाठीं दुर्धनिकांच्या पुढें पसरिशी पसा । किति उगाळशिल कोळसा ॥ ( चा० ब० ) हें तुला शिकविलें कुणीं । दयाळू नर-नारायण धनी । अजुनि तरि करीं ही घोकणी । विष-वल्लीची जडी । तूं म्हणशिल साखर खडी ॥ ( चा०प० ) नर-जन्मामधिं० ॥ २ ॥ नवस कामना करुनि मनामधिं म्हणशिल पुरुषोत्तमा ॥ दे सतत विपुला रमा । विषय-वासना तुला तुटेना मानसिं या संभ्रमा । काय पुढें बोलशिल अधमा । किती प्रपंचामधें फिरुनियां पावसि विफल श्रमा । कां न करिशी भजनोत्तमा । ( चा०ब० ) हें कसें तुला भावलें । करावी अचळा दारा-मुलें । मिळेना पुढती हें बाहुलें । कवि-रायाची वडी । दाविल भवार्णवाची थडी ॥ ( चा० प० ) नर-जन्मामधिं ० ॥ ३ ॥

---

# अनंतफंदी

अनंतफंदी हा नगरजिल्ह्यांतील संगमनेर गांवचा राहणारा. हा यजुर्वेदी कौंडिण्यगोत्री ब्राह्मण. आईचें नांव राऊबाई. ह्याचें आडनांव घोलप. जुन्या नवनीतांत ह्याच्या बापाचें नांव भवानीबावा असें आढळतें, पण तें त्याच्या गुरूचें नांव होतें. त्याच्या कृपेनेंच अनंतफंदीला कवित्वस्फूर्ति झाली, अशी आख्यायिका आहे.

ह्याचें फंदी हें नांव पडण्याचें कारण असें सांगतात कीं, पूर्वीं संगमनेर येथें मलिकफंदी म्हणून कोणी एक फकीर होता; तो नेहमीं लोकांत चमत्कारिक रीतीनें वागत असे, म्हणून त्यास लोक फंदी असें म्हणत. त्या फकिराचा आणि अनंतफंदीचा फार स्नेह असे. त्यावरून त्यासही लोक फंदी म्हणूं लागले.[१]

अनंतफंदी हा पूर्वीं तमाशा करीत असे. पण पुढें त्यानें तो नाद सोडून दिला. ह्याचें कारण असें झालें कीं, एक वेळ संगमनेर येथें अहल्याबाई होळकरीण आली होती; तिला हा लावण्या करून तमाशा करतो असें समजल्यावर तिनें त्यास सांगितलें, "तुम्ही ब्राह्मण असून तमाशा करितां हें नीट नाहीं." तोच पश्चात्ताप होऊन त्यानें डफावर थाप मारून डफ फोडून टाकिला; आणि त्या दिवसापासून तो कथा करूं लागला.

अनंतफंदी यानें कटाव, फटके आणि लावण्या फार केल्या आहेत. क्वचित् श्लोक, आर्याही कथेच्या संबंधानें केल्या आहेत. ह्याचा ओवीबद्ध ग्रंथ एकच आहे. त्याचें नांव 'माधवग्रंथ'. हा ग्रंथ करण्याचें कारण असें झालें कीं, ज्या वेळेस सवाई माधवराव पेशवे माडीवरून उडी टाकून मरण पावले, त्या वेळेस पुण्याच्या कारभारी मंडळींनीं बाजीराव रघुनाथ ह्याजकडून पुढें झालेल्या सर्व हकीकतीचें एक पत्र अनंतफंदीस पाठविलें, आणि त्यावर कविता करावयास सांगितलें; त्यावरून त्यानें हा ओवीबद्ध ग्रंथ केला. या ग्रंथाचे अध्याय पुष्कळ होते, परंतु त्यांतील हल्लीं सहा अध्याय मात्र सांपडतात. ह्याची कांहीं कविता चित्तवेधक आहे.

---

१ तमाशासारखे छंदफंद करितात म्हणून त्यांना हें नांव शंकराचार्यांनीं दिलें व पुढें तें उपनांव बनलें, असें त्यांचे सध्यांचे वंशज रा. अ. ग. फंदी कळवितात.

अनंतफंदीस श्रीपतफंदी म्हणून एक मुलगा होता, त्यास लोक सवाईफंदी म्हणत. तोही कविता चांगली करीत असे. तो शके १७१९त जन्मून शके १७९४त कार्तिक शुद्ध ९ स मरण पावला. अनंतफंदीनें राजेरजवाड्यांवर कवनें करून वर्षासनें मिळवून ठेविलीं आहेत. ह्यांचा वडिलांपासून चालत आलेला धंदा सराफीचा. अनंतफंदीच्या मरणकाळीं त्याचें वय ७५ वर्षांचें होतें.

जन्मकाल शके १६६६. मरणकाल शके १७४१ कार्तिक शुद्ध ४.

विशेष माहितीकरितां पाहा :—अनंतफंदीकृत कविता (चित्रशाळा); मराठी शाहीर—वर्दे; ऐतिहासिक पोवाडे—केळकर.

---

## वेंचे-उपदेशपर फटका

(१)

बिकट वाट वहिवाट नसावी धोपट मार्गा सोडुं नको । संसारामधिं ऐस आपला उगाच भटकत फिरूं नको । चल सालसपण धरुनि निखालस बोला खोट्या बोलुं नको । अंगिं नम्रता सदा असावी राग कुणावर धरूं नको । नास्तिकपणांत शिरुनि जनाचा बोल आपणा घेउं नको । भली भलाई कर कांहीं पण अ-धर्म-मार्गी शिरूं नको ॥ (चाल बदलून) मायबापांवर रुसूं नको । दूर एकला बसूं नको । व्यवहारामध्यें फसूं नको । कधीं रिकामा असूं नको ॥ (चाल पहिली) परी उलाढाली भलभलत्या पोटासाठीं करूं नको ॥ १ ॥ वर्म काढुनी शरमायाला उणें कुणाला बोलुं नको । बुडवाया दुसऱ्याचा ठेवा करूनि हेवा झटूं नको । मी मोठा शाहणा धनाढ्यहि गर्व-भार हा वाहुं नको । एकाहून एक चढी जगामधिं थोरपणाला मिरवुं नको । हिमायतीच्या बळें गरिबगुरिबांला तूं गुरकावुं नको । दो दिवसांची जाईल सत्ता अपेश माथां घेउं नको । बहुत कर्जबाजारी होउनि बोज आपला दवडुं नको । स्नेह्यासाठीं पदरमोड कर परंतु जामिन होउं नको ॥ (चा० ब०) विडा पैजेचा उचलुं नको । उणी तराजू तोलुं नको । गहाण कुणाचें डुलवुं नको । असल्यावर भीक मागुं नको ॥ (चा० प०) नसल्यावर सांगणें कशाला गांव तुझा भिड धरूं नको ॥ २ ॥ उगीच निंदा स्तुती कुणाची स्वहितासाठीं करूं नको । बरी खुशामत

शहाण्याची ही मूर्खाची ती मैत्रि नको । कष्टाची बरी भाजि भाकरी तूप-साकरेची चोरि नको । आल्या अतिथा मुठभर द्याया मागें पुढती पाहुं नको । दिली स्थिति देवानें तींतच मानीं सुख कधिं विटूं नको । असल्या गांठी धन-संचय कर सत्कार्यीं व्यय हटूं नको । आतां तुज ही गोष्ट सांगतों सत्कर्मा ओसरूं[1] नको । सत्कीर्ती-नौबदिचा डंका गाजे मग शंकाच नको ॥ ( चा० ब० ) सु-विचारा कातरूं[2] नको । सत्संगत अंतरूं नको ॥ द्वैताला अनुसरूं नको । हरि-भजना विस्मरूं नको ॥ ( चा० प० ) गावयास अनंतफंदीचे फटके मागें सरूं नको ॥ ३ ॥

(२)

येऊं दे वाचे नाम देवाचें अष्टौ प्रहरा शिव हर हर हर ॥ ध्रु० ॥ दे टाकुनि हे छंद वावुगे फंद, विषयिंची काय मजा । हरि-नामाची लावीं ध्वजा । असार हा संसार त्यजा । तमो-गुणाला देच रजा । सत्त्व-गुणाची करीं पूजा । क्षमा शांति मनिं धरीत जा । भगवीं वस्त्रें करीं पोटभर भिक्षा मागें घर घर वर ॥ येऊं दे० ॥ १ ॥ परोपकारा शरिर झिजावें जैसा मैलागिरी-चंदन । कर सज्जन-चरणीं वंदन । सा शत्रूंचें करिं कंदन । गृह-वैभववाजी स्यंदन । अ-शाश्वतीं ह्या हो धुंद न । आठीव मनीं दशरथ-नंदन । अनंतफंदी म्हणे घालीं विठ्ठला गरके गर गर गर ॥ येऊं दे० ॥ २ ॥

---

## लावणी

नर-देहामधिं येउन नर हो साधन ऐसें करा । जेणें भव-सागर तरुनि सुखें व्हावें पैल-तिरा ॥ ध्रु० ॥ संसारार्णवि भिजा गड्यांनो संसारार्णवि० ॥ परंतु परमार्थ-साधनातें साधा यांतच मजा । मद-मत्सर-मीपणासहित द्या तमो-गुणाला रजा । भाव न ठेवुनी दुजा । गड्यांनो० ॥ अ-कपट होउनि थोर-लहानां सम-दृष्टीनें पूजा । अन्याय-पथें न जा ॥ गड्यांनो० ॥ सदसद्विचार करुनी लोकीं सत्कीर्तीनें सजा । कोणा नच द्या इजा । गड्यांनो० ॥ परि आश्रय दुःखितांस द्याया तन-मन-धनें झिजा । संकट-समयीं धजा ॥ गड्यांनो० ॥ सत्य वचन राखण्यास न ढळा कथितों ह्या हित-गुजा । व्हा सावध नच निजा ॥ गड्यांनो० ॥ पळ घटका प्रहर दिवस, यांहीं अयुष्य होतें वजा । जगदीशाला भजा । गड्यांनो० ॥ अनंतफंदी म्हणे तोचि मग तारिल देउनि करा ॥ नरदेहामधिं ॥ १ ॥

---

१ मागें सरूं नको. २ भिऊं नको.

## प्रभाकर

ह्याच्या वडिलांचें नांव जनार्दनपंत आणि ह्याचें आडनांव दातार होतें. जन्म[१] शके १६९१; मृ० १७६९. हा हर्णई मुरूडचा राहणारा. ह्यानें लावण्या, पवाडे वगैरे रचिले आहेत.

विशेष माहितीकरितां पहा :—प्रभाकरकृत कविता—(चित्रशाळा); मराठी शाहीर—वर्दे ; ऐतिहासिक पोवाडे—केळकर.

**लावणी ; लक्ष्मी-पार्वती-संवाद** [२]. ( हा विनोदपर आहे. )

लक्षुमि गर्वें निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती[३] ।
आहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रीय असो पशु-पती[४] ॥ ध्रु० ॥
स्मशान-वासी भुषण भयंकर पिंगट मुकुटीं जटा ।
भाळ-चंद्र ज्या तीन नेत्र भस्माचा कपाळीं पटा ॥
व्याघ्रांबर गज-चर्मांबर[५] परिधान शुद्ध कानफटा[६] ।
रुंड-माळ[७] ती कंठीं कुंडलें भुजंग रुळती[८] कटा[९] ॥
त्रिशूळ-पाणी त्रि-पुंड्र भाळीं लोह-कंकण मणगटा ।
नंदी-वहन सर्पाचा सदोदित करि कमरे लंगुटा ॥
कसा आवडतो शंकर गिरिजे सांग तुला मजप्रती ।
लक्ष जन्मिचें पातक म्हणवुनि पडलिस ऐशा हतीं ॥१॥ ल० ॥
भोळा माझा सांब लक्षुमी उगाच निंदू नका ।
अनाद्यंत ज्या अ-गम्य सुख तें अलभ्य ब्रह्मादिकां ॥
सोळा सहस्र शत एक मुख्य तुम्हि आठ जणी नायिका ।
कार्य-वादु[१०] तो कृष्ण कसा करि पूर्ण मनोरथ सखा ॥
वक्रदंत शिशुपाळ कंसही कपटें मर्दुनि बका[११] ।
प्रताप बहु वर्णितां कशा भाळल्यात गो-रक्षका[१२] ॥

---

१ य. न. केळकर हा जन्मकाल सुमारें पंधरा वर्षें मागें नेतात. २ ह्या आख्यानांत तर ऱ्हस्वदीर्घाच्या यथायोग्यप्रयोगाकडे कवीनें मुळींच लक्ष दिलें नाहीं. ३ पार्वतीला. ४ शिव. पक्षीं, मोठा पशु. ५ हत्तीच्या कातड्याचें वस्त्र. ६ कानफाटा गोसावी. ७ शरिरापासून तुटलेल्या मस्तकांची माळा. ८ हालती. ९ गालावर. १० केवळ स्वहित साधणारा. ११ बकासुरास. १२ गुरेंराख्याला.

जरासंध-रिपु-भयें वसवली जळांत द्वारावती ।
तस्करास कसा श्वशूर जडला हा भीमक भूपती ॥
मत्स्य कूर्म हा सूकर झाला सिंह वामन श्री-पती ।
जन्म गेला पहा अशाखालिं म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥ २ ॥ ल० ॥

भूतें पिशाचें यक्ष ब्रह्म-राक्षस हे ज्याचे दुत ।
श्वान सभोंते मिळवुनि संगें फिरे भीक मागत ॥
भुंभुं वाजवि शंख मुखानें चिता-भस्म लावि नित[1] ।
शूर्प-कर्ण[2] षण्मूख जयाचे नवल-परीचे[3] सुत ॥
मना गमे तिथें निद्रा करितो जिवंत पहातां मुत ।
हिमालयाचें थोर असे प्रारब्ध पाहुन विस्मित ॥
धन्य तुझी पार्वती अशाची राखितेस चित-वृत्ती ।
दैव-दशा भर्तार तामसी कठीण ते तव गती ॥
लक्षुमि गर्वें निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती ।
आहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रीय असो पशु-पती ॥ ३ ॥ ल० ॥

अनंत घेतो जन्म तुझा पति क्षीर-समुद्रामधीं ।
शेषावर निद्रिस्त नाभिवर चार-मुखांचा विधी ॥
वहन विहंगम दिलें सुदर्शन कळुन शंकरें अधीं ।
सुरासुरीं तुजसाठीं मथिला पराक्रमें जल-निधी ॥
इच्छा करिती प्राणिमात्र तूं चंचळ, नाहिंस सुधी[4] ।
शंख सहोदर[5] तुझा लक्षुमी श्रीमंत झालिस कधीं ॥
कृपा-निधी हा सांब वसें अर्धांगि मी त्याची सती ।
लिला तयाची विचित्र भासे त्रिदीत सर्वांप्रती ॥
मत्स्य कूर्म हा सूकर झाला सिंह वामन श्रीपति ।
जन्म गेला पहा अशाखालीं म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥ ४ ॥ ल० ॥

---

१ नित्य. २ सुपासारखे आहेत कान ज्याचे असा गणपति. ३ विलक्षण प्रकारचे. ४ सरळ स्वभावाची. ५ देवांनीं समुद्र मंथन करून १४ रत्नें काढिलीं, त्यांपैकीं 'लक्ष्मी' व 'शंख' हीं आहेत; म्हणून शंखाला तिचा सहोदर म्हणजे सख्खा भाऊ म्हटलें आहे. ( चौदा रत्नें—लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक, सुरा, धन्वंतरी, चंद्रमा, कामधेनु, ऐरावत, अप्सरा, सप्तमुखी अश्व, विष, हरिधनु, शंख आणि अमृत. )

तप-सामर्थ्यें-करुनि शिवाला भस्मासुरें जिंकिलें ।
धरुनि तुला पार्वती त्वरेनें स्कंधावर वाहिलें ॥
लपूं लागला सांब तेव्हां मम पतीस पाचारिलें ।
मोहिनी-रूप प्रत्यक्ष धरुनि त्या राक्षसास मारिलें ॥
गजेंद्र कारितां धांवा नक्रासह त्या उद्धरिलें ।
सुधन्व्यास तैलामधिं तळतां तैल थंड[1] जाहलें ॥
अशी घालितो उडी संकटीं बघ माझा श्रीपती ।
कोमलांग राजीव-नेत्र, नव्हे शिवासारखा जती[2] ॥
लक्षुमी गर्वे निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती ।
आहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रीय असो पशु-पती ॥ ५ ॥ ल० ॥

नको सांगु बडिवार रिकामा लक्षुमि नाना-परी ।
नंदाचीं गो-धनें चारिलीं कुंजवनाभीतरी ॥
मुखांत घालुनि वेणु वाजवुनि मोहित कारि सुंदरी ।
गवळ्याचें उच्छिष्ट भक्षिलें नव्हे निर्मळ श्रीहरी ॥
श्याम-वर्ण सर्वांग, खोंवितो मयूर-पिच्छें शिरीं ।
नवनित-चोरें कसें मर्दन केलें दैत्याचें तरी ॥
लग्न लाविलें बसून रिसाशीं[3], कुब्जा होती[4] दुती ।
किती एकक गुण सांगूं ऐकतां दुःखित होशिल चित्तीं ॥
मत्स्य कूर्म हा सूकर झाला सिंह वामन श्री-पती ।
जन्म गेला पहा अशाखालिं म्हणे लक्ष्मीला पार्वती ॥ ६ ॥ ल० ॥

---

१ धर्मानें अश्वमेधनिमित्त सोडलेला वारू हंसध्वज राजा ( सुधन्व्याचा बाप ) ह्यानें धरिला, व त्याच्या संरक्षणार्थ आलेल्या पांडवसैन्याशीं लढावयाकरितां आपल्या सर्व लोकांस ( कोणीं आज्ञाभंग केल्यास कढत तेलांत त्यास तळूं असें भय घालून, ) ताकीद दिली ; तथापि त्याचा मुलगा सुधन्वा हा लढावयास आला नाहीं ह्यामुळें राजानें त्यास तापलेल्या तेलांत टाकिलें, तेव्हां तो मुलगा परम कृष्णभक्त होता, म्हणून तें तेल थंड झालें. अशी कथा आहे. २ यति. ३ जांबवान् नांवाच्या अस्वलाची जांबवती कन्या कृष्णानें वरिली ; त्या गोष्टीस अनुलक्षून हें लिहिलें आहे. ४ कुब्जा ह्या नांवाची अंगानें तीन ठिकाणीं वांकडी अशी कंसाची एक दासी होती ; तिचें काम उत्तम चंदनाची उटी तयार करण्याचें होतें. कृष्ण व बळराम ह्यांस कंसानें गोकुळांतून आणविलें असतां ते मथुरेंत रस्त्यांतून चालले, तेव्हां त्यांस पाहून कुब्जेनें त्यांच्या अंगास गंधाची उटी लाविली. मग कृष्णानें तिची हनुवटी हातानें धरून व पायावर पाय देऊन तिला सरळ केलें, आणि तिच्यावर कृपा केली ; अशी कथा आहे.

अनंत कोटि ब्रह्मांड निर्मिता जगांत जग-वेगळा ।
चार वेद सा शास्त्रें धुंडितां कुंठित झाल्या कळा[१] ॥
निराकार निर्गुण स-गुण मी पाहुनि पडलें गळां ।
जन्मोजन्मीं हा असो पती मज घन-श्याम सांवळा ॥
परम सु-शील निष्कलंक वनिं उद्धरलि अहल्या शिळा ।
नाम-स्मरणें शीतळ झाला सांब-देह सागळा[२] ॥
मुगुट-मणी वैकुंठ-पीठ ज्या अमर सदा वंदिती ।
प्राप्त व्हावे हे चरण म्हणूनि किती समाधिस्थ बैसती ॥
लक्षुमि गर्वें निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती ।
आहे ठाउक पुरुषार्थ तुझा तुज प्रीय असो पशु-पती ॥ ७ ॥ ल० ॥

ताड-पत्र शृंगार म्हणुनि म्यां छाळिलें जइं शंकरा ।
प्रसन्न झाला महेश मज समजावी घेउनि करा ॥
शृंगाराचे पर्वत पडले अमोल एकक हिरा ।
कुबेराची संपदा तुळेना अहा रे विश्वेश्वरा ॥
एक-रूप शिव विष्णू लक्ष्मी गौरी एक स्मरा ।
लय लावूनि एकाग्र भजावें मृत्युंजय-श्रीधरा ॥
लक्ष्मी-पार्वतिचा संवाद ऐसा गोड हा खरा ।
भक्तिपुरस्सर जपुनि करावें प्रसन्न नित[३] हरि-हरा ॥
महादेव गुणि सांबहरीच्या चरणांबुजिं लोळती ।
प्रभाकराच्या कवना गुणिजन हेत धरुनि धांवती ॥ ८ ॥ ल० ॥

---

१ चौसष्ट कला. २ सगळा. ३ नित्य.

# कितीएक कविकवयित्रींचे अभंग

## निवृत्ति

शांति क्षमा दया । सर्वभावें करुणा । तोचि नारायणा आवडे दासु ॥ १ ॥
तोचि एक दासु बोलिजे पैं जनीं । निरंतर ध्यानीं कृष्णमूर्ति ॥ २ ॥
जीवशिव एक सर्वत्र चैतन्य । ऐसें जया कारुण्य तोचि धन्य ॥ ३ ॥
तोचि ऐकु भक्तु हरि हरि म्हणे । नित्य नारायणें तारिजे त्यासी ॥ ४ ॥
येउनि जनीं पैं सदा तो विदेही । तारकु सबाहीं सप्रेमळु ॥ ५ ॥
निवृत्ति सांगतु भक्तीचा महिमा । करी शांति क्षमा तो विरळा असे ॥ ६ ॥

---

## ज्ञानदेव

### अभंग १

अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥
जाईन गे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया ॥ २ ॥
सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन परब्रह्मीं ॥ ३ ॥
बाप रखुमादेवीवरा विठ्ठलाची भेटी । आपुलिये संवसाटी करुनि ठेला ॥ ४ ॥

### अभंग २

भावेंवीण भक्ति । भक्तिवीण मुक्ती । बळेंवीण शक्ती बोलूं नये ॥ १ ॥
कैसेनि दैवत । प्रसन्न त्वरीत । उगा राहें निवांत शिणसी वायां ॥ २ ॥
सायास करिसी । प्रपंच दिननिशीं । हरीसी न भजसी कोण्या गुणें ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे हरिजप करणें । तुटेल धरणें प्रपंचाचें ॥ ४ ॥

---

## मुक्ताबाई

### अभंग १

शांति क्षमा वसे देहीं देव पैंसे । चित्त समरसें मुक्तमेळु ॥ १ ॥
निर्गुणें उपरमु देव पुरुषोत्तमु । प्रकृतिसंगमु ॥ चेतनेचा ॥ २ ॥
सज्ञानीं दिवटा अज्ञानी तो पैठा । निवृत्तीच्या तटा नेतु भक्ता ॥ ३ ॥
मुक्ताई दिवस अवघा ऋषीकेश । केशवेंवीण वास शून्य पैंसे ॥ ४ ॥

### अभंग २

मुंगी उडाली आकाशीं । तिणें गिळिलें सूर्यासी ॥ १ ॥
थोर नवलाव जाला । वांझे पुत्र प्रसवला ॥ २ ॥
विंचु पाताळाशी जाय । शेष माथां वंदी पाय ॥ ३ ॥
माशी व्याली घार जाली । देखोनि मुक्ताई हांसली ॥ ४ ॥

---

## सोपानदेव

पृथ्वी सोंवळी आकाश सोंवळें । मन हें ओंवळें अभक्तांचें ॥ १ ॥
ब्रह्म हें सोंवळें न देखों वोंवळें । असों खेळेमेळे इये जनीं ॥ २ ॥
ब्रह्मांड पंढरी सोंवळी हे खरी । तरसी निर्धारीं एक्या नामें ॥ ३ ॥
सोपान अखंड सोंवळा प्रचंड । न बोलें वितंड हरिविण ॥ ४ ॥

---

## चोखा मेळा

(पतिपत्नी)

### अभंग १

देहीं देखिली पंढरी । विठू अविनाश विटेवरी ॥ १ ॥
रुक्मिणी अंगना । आत्मा पुंडलीक जाणा ॥ २ ॥
आकार तितका नासे । निराकार विठ्ठल दिसे ॥ ३ ॥
ऐसें गुज ठायींचें ठायीं । चोखा म्हणे लागा पायीं ॥ ४ ॥

### अभंग २

टाळी वाजवावी गुढी उभारावी । वाट हे चालावी पंढरीची ॥ १ ॥
हरिनाम गर्जतां नाहीं भयचिंता । ऐसें बोले गीता भागवत ॥ २ ॥
पताकांचे भार मिळाले अपार । गर्जे भीमातीर जयजयकारीं ॥ ३ ॥
पंढरीचा हाट कौलाची पेठ । मिळाले चतुष्ट वारकरी ॥ ४ ॥
खटनट यावे शुद्ध होउनी जावे । दंवडी पिटी भावें चोखा मेळा ॥ ५ ॥

### अभंग ३

ऊंस डोंगा परी रस नोहे डोंगा । काय भूललासी वरलिया रंगा ॥ १ ॥
कमान डोंगी पारि तीर नोहे डोंगा । काय भूललासी वरलिया रंगा ॥ २ ॥
नदी डोंगी पारि जळ नोहे डोंगें । काय भूललासी वरलिया रंगें ॥ ३ ॥
चोखा डोंगा पारि विठ्ठल नोहे डोंगा । काय भूललासी वरलिया रंगा ॥ ४ ॥

### अभंग ४

पंचही भूतांचा एकचि विटाळ । अवघाचि मेळ जगीं नांदे ॥ १ ॥
तेथें तो सोंवळा वोंवळा तो कोण । विटाळाचें कारण देह मूळ ॥ २ ॥
आदिअंतीं अवघा विटाळ संचला । सोंवळा तो जाला कोण न कळे ॥ ३ ॥
चोखा म्हणे मज नवल वाटतें । विटाळापरतें आहे कोण ॥ ४ ॥

### अभंग ५

देहासी विटाळ म्हणती सकळ । आत्मा तो निर्मळ शुद्ध बुद्ध ॥ १ ॥
देहींचा विटाळ देहींच जन्मला । सोंवळा तो जाला कवण धर्म ॥ २ ॥
विटाळावांचोनि उत्पत्तीचें स्थान । कोण देह निर्माण नाहीं जगीं ॥ ३ ॥
म्हणुनि पांडुरंगा वानितसें थोरी । विटाळ देहांतरीं वसतसे ॥ ४ ॥
देहाचा विटाळ देहींच निर्धारीं । म्हणतसे महारी चोखियाची ॥ ५ ॥

---

## सेना न्हावी

### अभंग १

सिद्ध ब्रह्मज्ञान बोलतां नोहे वाचे । शांतवन क्रोधाचें जालें नाहीं ॥ १ ॥
पाल्हाळ लटिका करणें तो काय । शरण पंढरीराया गेला नाहीं ॥ २ ॥
जंव नाहीं गेली अज्ञानाची भ्रांति । जंव नाहीं विरक्ति बाणली अंगीं ॥ ३ ॥
जीवाची तळमळ राहिली सकळ । मग ब्रह्मज्ञान कळे सेना म्हणे ॥ ४ ॥

### अभंग २

संतीं सांगीतलें । तेंचि तुम्हां निवेदिलें ॥ १ ॥
मी तों सांगतसें निकें । येतिल रागें येवों सुखें ॥ २ ॥
निरोप सांगतां । कासया वागवावी चिंता ॥ ३ ॥
सेना आहे शरणागत । विठोबारायाचा दूत ॥ ४ ॥

### अभंग ३

हंबरोनी येती । वत्सा धेनू पान्हा देती ॥ १ ॥
तुह्मीं करावा सांभाळ । माझा अवघा सकळ ॥ २ ॥
विसरली भुकतान । तुमचे देखिल्या चरण ॥ ३ ॥
सेना म्हणे प्रेमभातुकें । द्यावें आतां हें कौतुकें ॥ ४ ॥

---

## नरहरि सोनार

### अभंग १

देवा तुझा मी सोनार । तुझे नामाचा व्यवहार ॥ १ ॥
देह बागेसरी जाणें । अंतरात्मा नाम सोनें ॥ २ ॥
त्रिगुणाची करुनी मूस । आंत ओतिला ब्रह्मरस ॥ ३ ॥
जीव शिव करुनी फुंकी । रात्रंदिवस ठोकाठोकी ॥ ४ ॥
विवेक हातवडा घेऊन । कामक्रोध केला चूर्ण ॥ ५ ॥
मनबुद्धीची कातरी । रामनाम सोनें चोरी ॥ ६ ॥
ज्ञान ताजवा घेउनि हातीं । दोन्ही अक्षरें जोखिती ॥ ७ ॥
खांद्या वाहोनी पोतडी । उतरला पैलथडी ॥ ८ ॥
नरहरी सोनार हरिचा दास । भजन करी रात्रंदिवस ॥ ९ ॥

### अभंग २

सकळ धर्माचें कारण । नामस्मरण हरिकीर्तन ॥ १ ॥
दया क्षमा समाधान । घ्यावें संतांचें दर्शन ॥ २ ॥
संतसंग धरा वेगीं । वृत्ति जडो पांडुरंगीं ॥ ३ ॥
नरतनु न येयाची बा कदां । भावें भजा संतपदा ॥ ४ ॥
भुलं नका या संसारीं । हरि उच्चारीं उच्चारीं ॥ ५ ॥
सर्व जायाचें जायाचें । हरिनाम हेंचि साचें ॥ ६ ॥
विठोबा रक्षील शेवटीं । उभा कर दोन्ही कटीं ॥ ७ ॥
नरहरि जाणोनि शेवटीं । संतचरणा घाली मिठी ॥ ८ ॥

## सावतामाळी

### अभंग १

कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी ।। १ ।।
लसूण मिरची कोथिंबिरी । अवघा जाला माझा हरि ।। २ ।।
मोट नाडा विहीर दोरी । अवघी व्यापिली पंढरी ।। ३ ।।
सावता म्हणे केला मळा । विठ्ठलपायीं गोविला गळा ।। ४ ।।

### अभंग २

नको तुझें ज्ञान नको तुझा मान । माझें आहे मन वेगळेंची ।। १ ।।
नको तुझी भुक्ती नको तुझी मुक्ती । मज आहे विश्रांती वेगळीच ।। २ ।।
चरणीं ठेउनि माथा विनवितो सावता । ऐका पंढरिनाथा विज्ञापना ।। ३ ।।

### अभंग ३

नामाचिया बळें न भिउं सर्वथा । कळिकाळाच्या माथा सोटे मारुं ।। १ ।।
वैकुंठींचा देव आणूं या कीर्तनीं । विठ्ठल गाऊनी नाचों रंगीं ।। २ ।।
सुखाचा सोहळा करूनि दिवाळी । प्रेमें वनमाळी चित्तीं धरूं ।। ३ ।।
सावता म्हणे ऐसा भक्तिमार्ग धरा । तेणें भक्तिद्वारा वोळंगती ।। ४ ।।

---

## बहिणाबाई

### अभंग १

संतुष्ट मानसीं सदा सर्वकाळ । हृदय निर्मळ जैसी गंगा ।। १ ।।
संत ते जाणावे ब्रह्मप्राप्तीलागीं । धन्य तेचि जगीं शरण त्यांसी ।। २ ।।
सर्वभूतीं बुद्धि समान सारिखी । आपुली पारखी चिंतूं नेणें ।। ३ ।।
बहिणी म्हणे द्वैत हारपूनी गेलें । अद्वैत बिंबलें ब्रह्म डोळां ।। ४ ।।

### अभंग २

आपुलिया दु:खें जैसे होती क्लेश । दुजिया चित्तास तेचि परी ।। १ ।।
ऐसें जे जाणती आपुले मानसीं । संत निश्चयेंसी वोळखावे ।। २ ।।
पराविया सुखें सुख मानी मनीं । देखें वनीं जनीं जनार्दन ।। ३ ।।
कापुराचें जैसें अंतर्बाह्य शुद्ध । किंवा तें प्रसिद्ध रत्न जैसें ।। ४ ।।
तैसें ज्याचें चित्त सारिखें सर्वदां । संत तयां वदा सर्वभावें ।। ५ ।।
सूर्याचिये अंगीं जैसा नाहीं मळ । चंदनीं निश्चळ धृति जैसी ।। ६ ।।
बहिणी म्हणे पूर्ण ब्रह्म निर्विकार । तेचि हे साकार संत जाणा ।। ७ ।।

# कितीएक कवींचीं पदें

## एकनाथ

सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं । सज्जन-वृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥ ध्रु० ॥ संत-संगें अंतर-रंगें नाम बोलावें । कीर्तन-रंगीं देवासन्निध सुखें डोलावें ॥ सगुण चरित्रें० ॥ १ ॥ भक्ति-ज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या । प्रेम-भरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ॥ सगुण च० ॥ २ ॥ जेणेंकरुनी मूर्ति ठसावे अंतरिं श्री-हरिची । ऐशी कीर्तन-मर्यादा हे संतांचे घरची ॥ सगुण च० ॥ ३ ॥ अद्वय-भजनें अखंड स्मरणें वाजवि करताळी । एका जनार्दनीं मुक्ती होये तत्काळीं ॥ सगुण चरित्रें० ॥ ४ ॥

---

## तुकाराम

### पद १

पुरे एकचि पुत्र माय-पोटीं । हरि-स्मरणें उद्धरी कुळें कोटी ॥ ध्रु० ॥ धन्य वंशीं जन्मला भगीरथ । गंगा आणोनी पूर्वज केले मुक्त ॥ पुरे एक० ॥ १ ॥ गौतमानें आणिली गोदावरी । आपण तरोनि दुजयासी तारी ॥ पुरे एक० ॥ २ ॥ पांचा वर्षांचें ध्रुव बाळ तान्हें । अढळ पदीं स्थापिलें बहू मानें ॥ पुरे एक० ॥ ३ ॥ तेजः-पुंज शीतळ-सौख्य-दानीं । एक चंद्र-प्रकाश त्रि-भुवनीं ॥ पुरे एक० ॥ ४ ॥ पहा कैसा तो पुंडलीक धीट । उभा केला वैकुंठ-नायक ॥ पुरे एक० ॥ ५ ॥ राम-रूपी जन्मला कीर्तिवंत । अंजनीचे उदरीं हनुमंत ॥ पुरे एक० ॥ ६ ॥ तुका म्हणे हरिसी विन्मुख । गांधारीचे उदरीं शत-मूर्ख ॥ पुरे एक० ॥ ७ ॥

### पद २

येथें कोणाचें काय बा गेलें । ज्याचें त्यानेंच अनहित केलें ॥ ध्रु० ॥ संतीं सांगितलें ऐकेना । स्वतां बुद्धिही असेना ॥ वृत्ती निबरली पिकेना । मूढ कोणाचें ऐकेना ॥ येथें कोणाचें० ॥ १ ॥ अन्य यातिचे संगती लागे । साधु-जनांमध्यें न वागे ॥ केल्यावीण पराक्रम सांगे । जेथें सांगे तेथेंचि

भीक मागे ॥ येथें कोणाचें० ॥ २ ॥ नीत टाकुनी अ-नीत चाले । भडभड भलतेंच बोले ॥ मंद होउनी उन्मत्त डोले । अखेर फार वाईट झालें ॥ येथें कोणाचें० ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं नेम । चित्तीं न धरी अधम ॥ सांग पडलासे भ्रम । अंतीं कुटील त्यासी यम ॥ येथें कोणाचें० ॥ ४ ॥

### पद ३

पोटापुरतें देई । मागणें लयि नाहीं लयि नाहीं ॥ ध्रु० ॥ पोळी साजुक अथवा शिळी । देवा देई भुकेच्या वेळीं ॥ मागणें० ॥ १ ॥ वस्त्र नवें अथवा जुनें देवा देई अंग भरून ॥ मागणें० ॥ २ ॥ देवा कळणा अथवा कोंडा । आम्हां देई भुकेच्या तोंडा ॥ मागणें० ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । नका करूं पायापरता ॥ मागणें लयि नाहीं लयि० ॥ ४ ॥

### पद ४

ज्याचें सुख त्याला सुख त्याला । काय असे भलत्याला ॥ ज्याचें० ॥ ध्रु० ॥ एक जेवुनि तृप्त झाला । एक हाका मारि अन्नाला ॥ ज्याचें सु० ॥ १ ॥ एक नदी उतरुनि गेला । एक हाका मारि तारूला ॥ ज्याचें सु० ॥ २ ॥ एक मोक्ष-मार्गीं गेला । एक अधो-गती चालिला ॥ ज्याचें ॥ सु० ॥ ३ ॥ तुका वैकुंठाशी गेला । हाका मारितो लोकांला ॥ ज्याचें सुख त्याला सुख त्याला ॥ काय ॥ ४ ॥

---

## रामदास

धांव रे राम-राया । किती अंत पाहासी ॥ प्राणांत मांडियेला । नये करुणा कैशी ॥ धांव रे० ॥ ध्रु० ॥ पाहिन क्षणभरी । चरण झाडीन केशीं ॥ नयन शीणले बा । आतां केधवां येशी ॥ धांव रे० ॥ १ ॥ मी-पण अभिमानीं । अंगीं भरियेला ताठा ॥ विषय-कर्दमानें । लाज नाहीं लोळतां ॥ चीळस उपजेना । ऐसें झालें बा आतां ॥ धांव रे० ॥ २ ॥ मारुती-स्कंध-भागीं । शीघ्र बैसोनियां यावें ॥ राघवें वैद्य-राजें । कृपा-औषध द्यावें ॥ दयेच्या पद्म-हस्तें । माझे शिरीं ठेवावें ॥ धांव रे० ॥ ३ ॥ या भवीं रामदास । थोर पावतो व्यथा ॥ कौतुक पाहतोसी । काय जानकी-नाथा ॥ दयाळा दीन-बंधो । भक्त-वत्सला आतां ॥ धांव रे० ॥ ४ ॥

---

## आनंदतनय

### पद १

बरवें समजा रे उमजा रे । कां करतां गमजा रे ॥ ध्रु० ॥ माया-मय जग सारें । अवघें दो दिवसांचें वारें ॥ बरवें० ॥ १ ॥ दारा धन सुत पोरें ॥ अवघीं नागवणी-सम चोरें ॥ बरवें० ॥ २ ॥ धरुनी पथ परभारें । तरला आनंदतनय विचारें ॥ बरवें० ॥ ३ ॥

### पद २

रत हरि-पद-कमल-कंद सेविं मनो-भ्रमरा ॥ ध्रु० ॥ दुष्ट दैत्य दमुनि देत निज-भक्ता थारा । द्रुत-तर मनिं धरुनि भाव सांडिं भव-पसारा ॥ रत० ॥ ॥ १ ॥ शुक-सनकादिक मुनी जपति ज्या आधारा । सुर-वर मुनि गाति मुखें नित्य निराकारा ॥ रत० ॥ २ ॥ पावन पद-रजें करुनि गौतम-मुनि-दारा । निशि-दिनिं आनंदतनय गाय वेद सारा ॥ रत० ॥ ३ ॥

### पद ३

त्यांचा सग नको मजलागीं । त्यांच्या तोंडा लागो आगी ॥ ध्रु० ॥ वरि वरि वचनें लागति गोड । अंतरिं दुर्बुद्धीचा मोड ॥ त्यांचा संग नको० ॥ १ ॥ भजतां श्री-रामाचे पाय । मध्यें करिती अंतराय ॥ त्यांचा संग नको० ॥ २ ॥ घेउनि सौजन्याचें सोंग । साधिति जारण-मारण-योग ॥ त्यांचा संग नको० ॥ ३ ॥ भजनीं दावूनियां विश्वास । व्यसनीं घालिति जे विश्वास ॥ त्यांचा संग नको० ॥ ४ ॥ अखंड जन-निंदेतें ध्याय । आनंदतनय वदे कविराय ॥ त्यांचा संग नको० ॥ ५ ॥

---

## शिवरामस्वामी

संत दयाळ कसे । राजा-रंक जया सरिसे ॥ ध्रु० ॥ देउनि भेटी तोडिति माया । नेउनि दाविती निज-पद-ठाया ॥ १ ॥ संत० ॥ श्रवणीं पाजुनि अमृत-वाणी । नेउनि दाविति चिन्मय-खाणी ॥ २ ॥ संत० ॥ शिवरामाचें अभिनव लेणें । लेवविलें मज पूर्ण कृपेनें ॥ ३ ॥ संत० ॥

---

## केशवस्वामी

इतुकें दे मजला दे मजला । मागतसें हरि तुजला ॥ ध्रु० ॥ संत-समागम जोडी । माझी मी-पण वाट मोडी ॥ इतुकें दे० ॥ १ ॥ संत-समागम अर्चा । सारासार-ज्ञान-चर्चा ॥ इतुकें दे० ॥ २ ॥ संत घराप्रति येती । भक्ती-भावें पुजीन त्यांसी ॥ इतुकें दे० ॥ ३ ॥ भगवद्भजनीं जागो । तुझिये स्वरुपीं लक्ष लागो ॥ इतुकें दे० ॥ ४ ॥ हेंचि मागणें मागें । भावें केशव चरणा लागे ॥ इतुकें दे० ॥ ५ ॥

---

## श्रीधर

सखया रामा, विश्रांति तुझिये नामीं । म्हणउनि मजला ने त्वरें निजसुख-धामीं ॥ सखया० ॥ ध्रु० ॥ अवचट सु-कृतें नर-देहा झाली भेटी । पशु-सुत-जाया-धन-धामीं प्रीती मोठी ॥ माझीं माझीं म्हणुनि म्यां धरिलीं पोटीं । यांच्या संगें भोगिल्या दुःख-कोटी ॥ सखया० ॥ १ ॥ सोडुनि स्वहिता धांवलों दिशा दाही । शव-वत झालों मागुता कौतुक पाहीं ॥ परि खळ जन हे नेदिती कवडी तेही । परि हे आशा पापिणी लाजत नाहीं ॥ सखया० ॥ २ ॥ जंववरि दृढता तंववरि या तनुची प्रीती । जर्जर झाल्या निंदक हे अवये होती ॥ यांचीं दुःखें तुजला मी सांगूं किती । म्हणउनि येतो श्रीधर काकूळती ॥ सखया० ॥ ३ ॥

---

## मध्वमुनि

### पद १

उद्धवा शांतवन कर जा, त्या गोकुल-वासि जनांचें ॥ ध्रु० ॥ बा नंद-यशोदा माता, मजसाठीं त्यजितिल प्राण । त्यागुनी प्रपंचा फिरती, मनिं उदास रानोरान ॥ अन्न-पाणि त्यजिलें रडती, अति दुःखित झाले दीन ॥ (चाल बद० ) जन्मलों तैंहुनि झटले । मजलागीं तिळ तिळ तुटले ॥ कटि खांदे वाहतां घटले । आटलें रक्त देहाचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ १ ॥ आइबाप त्यजुनी बाळें, मजसंगें खेळत होतीं । गोडशा शिदोऱ्या

आणुनी, आवडिनें मजला देती ॥ रात्रं-दिस फिरले मागें, दधि गोरस चोरूं येती ॥ (चाल बद०) मी तोडुनि आलों तटका । तो जिवा लागला चटका ॥ मजविण त्या युगसम घटका । आठवतें प्रेम जयांचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ २ ॥ पति-सुतादि गृह धन त्यजिलें, मजवरती धरुनी ममता । मानिलें तुच्छ अपवर्गा, मजसंगें निश्चळ रमतां ॥ मद्दत्त-चित्त त्या गोपी, नेत्रांतरिं लेवुनि समता ॥ (चाल बद०) तिळ-तुल्य नाहिं मनिं डगल्या । दृढ निश्चय धरुनी तगल्या ॥ बहुधा त्या नसतिल जगल्या । भंगले मनोरथ ज्यांचे ॥ उद्धवा शांतवन० ॥ ३ ॥ हरि आहे सुखरुप म्हणुनी, भेटतांचि त्यां सांगावें । सांग कीं समस्तां पुशिलें, प्रत्युत्तर त्यां मागावें ॥ कथुनियां ज्ञान तयातें, सांग कीं शोक त्यजावे ॥ (चाल बद०) हें कार्य नव्हे तुजजोगें । मजसाठीं जावें वेगें ॥ हें मध्वमुनीश्वर सांगे. त्या न पवे ज्ञान जयाचें ॥ उद्धवा शांतवन० ॥ ४ ॥

## पद २

जाणों हरिचे पाय । आम्ही जाणों हरिचे पाय ॥ ध्रु० ॥ नियम न जाणों यमहि न जाणों । नेणों अन्य उपाय ॥ आम्हीं० ॥ १ ॥ परिस देउनी सोनें घेणें । जळो त्याचा व्यवसाय ॥ आम्ही० ॥ २ ॥ कृष्णाचें पद सोडुनि आम्ही । मुक्ति वरूं हाय हाय ॥ आम्ही जाणों हरिचे पाय ॥ ३ ॥

## पद ३

तूं माझा यजमान । रामा तूं माझा यजमान ॥ ध्रु० ॥ जननी-जठरीं रक्षियलें मज । पोसुनि पंचहि प्राण ॥ रामा तूं० ॥ १ ॥ बाहेर निघतां मातेचे स्तनीं । पय केलें निर्माण ॥ रामा तूं० ॥ २ ॥ ऐसें असतां या पोटाची । कां करुं चिंता जाण ॥ रामा तूं० ॥ ३ ॥ मध्वमुनीश्वर स्वामि रमा-पति । धरि माझा अभिमान ॥ रामा तूं० ॥ ४ ॥

## पद ४

तो नर गति चुकला । स्वानंदातें मुकला ॥ तो नर० ॥ ध्रु० ॥ सद्गुरु-वरदा वाणी । नाहीं नाहीं ज्याचे श्रवणीं ॥ तो नर० ॥ १ ॥ शास्त्रें पाहुनि वक्ता । बोलत फार अनुभव नसतां ॥ तो नर० ॥ २ ॥ धर्मवासना

कांहीं । ज्याचे मानासिं तिळभर नाहीं ।। तो नर० ।। ३ ।। संत-संग-हरि-भक्ति । क्षणभरी न ये मनांत विरक्ति ।। तो नर० ।। ४ ।। मध्वनाथ म्हणे भाव । सद्गुरुवांचुनि कैंचा देव ।। तो नर० ।। ५ ।।

---

## अमृतराय

### पद १

अखंड हरि हरि वदा रे । बापांनो अखंड हरि हरि वदा ।। किती सेवाल धन-दुर्मदा । रे बापांनो अखंड हरि हरि वदा ।। ध्रु० ।। काय रानांत आटल्या नद्या । काय तरू म्हणति फळ न द्या ।। किती कांडोकांडिं मिरवाल मुद्या । गेलि आजची घडि न ये उद्यां ।। रे बापांनो० ।। १ ।। काय बिदींत न मिळति चिंध्या । काय न मिळे भोंपळा दुध्या ।। या तों युक्ति सुखाच्या सुध्या । वाचा एकोबाचा भागवताध्या ।। रे बापांनो० ।। २ ।। काय पर्वतिं बुजल्या दऱ्या । काय दुकाळ पडला कऱ्या ।। काय महर्ग तृणाच्या बोऱ्या । या तों वैराग्या युक्ति खऱ्या ।। रे बापांनो० ।। ३ ।। बाहु असतां आपणापाशीं । मग कशास पाहिजे उशी ।। काय अडचण महदाकाशीं । ठाय नेदि काय पृथ्वी कुशी ।। रे बापांनो० ।। ४ ।। काय लोकिं दारवठे रोधिले । काय न मिळति जुने जोंधळे ।। ऐसें टाकुनि दुर्मद आंधळे । व्यर्थ अमोल आयुष्य उधळे ।। रे बापांनो० ।। ५ ।। कर जोडुनि अमृत विनवितो । बाहु उभारुनि गर्जतो ।। जो निश्चय धरुनि बैसतो । त्या घरीं बसल्या राम देतो ।। रे बापांनो० ।। ६ ।।

### पद २

होउनि गोसावी गोसावी । हरि-कथाचि परिसावी ।। ध्रु० ।। गमन नसे ज्या गांवीं । तेथिल वाट कशास पुसावी ।। होउनि० ।। १ ।। सुखें मिळो खंबाइत । अथवा भगवींही नेसावीं ।। होउनि० ।। २ ।। भिक्षा मागुन निस्पृहतेनें । सत्संगति पोसावी ।। होउनि० ।। ३ ।। दुर्वाक्यें सोसुनियां ।। आपण अमृत-वृष्टि वर्षावी ।। होउनि० ।। ४ ।।

## पद ३

बा तुझा चालता काळ। खायाला मिळती सकळ ॥ ध्रु० ॥ हे कोण बायकोचे साले। तुपावेगळा घांस न गिळे ॥ तांदुळ रांधियेले मोकळे। केलें बेंबीचें ऊखळ ॥ बा तुझा० ॥ १ ॥ हे कोण बायकोचे मामे। घरांत वागती रिकामे ॥ साखर शाल्योदन खाणें। भोजन-भाऊ केवळ ॥ बा तुझा० ॥ २ ॥ साल्या मेहुण्या घरासि येती। फराळाच्या पंक्ती बैसती ॥ नातीं कोरकोरून काढिती। सर्व मायेचा गोंधळ ॥ बा तुझा० ॥ ३ ॥ अमृतराय म्हण रे मूर्खा। किती भुललासी मायेच्या सुखा ॥ अंतीं जासी एकटा नरका। भज सद्गुरु दयाळ ॥ बा तुझा ० ॥ ४ ॥

## पद ४

प्राण्या भुलूं नको नटूं नको। स्व-हिता अंतरसील ॥ प्राण्या भुलूं नको नटूं नको ॥ ध्रु० ॥ हा देह पांचांचा[1]। पांच जण नेतील ॥ जीव हा अज्ञानी न्यायाला। धर्म-दूत येतील ॥ हिशेब पापाचा पुण्याचा। चित्रगुप्त घेतील ॥ केल्या कर्माचें फळ बापा। अवश्य ते देतील। प्राण्या भुलूं नको नटूं० ॥ १ ॥ वेद-शास्त्रांच्या उपदेशें। निरभिमानी होय ॥ राहें लीनपणें सर्वांशीं। जैसें पातळ तोय ॥ क्षमा आत्मत्वें धरावी। अबोलणीं जणुं भूय ॥ आत्मविचारें पुसावी। संत जनांतें सोय ॥ प्राण्या० ॥ २ ॥ वैभव जायाचें बा जायाचें। पाप-बळें जाईल ॥ सत्ता श्री-हरिची श्री-हरिची। तो हिरोन नेईल ॥ होईं सावध रे बा सावध रे। तरिच बरें होईल ॥ क्षेम-कल्याणा बा कल्याणा। अमृतेश्वर देईल ॥ प्राण्या भुलूं नको नटूं० ॥ ३ ॥

## पद ५

म्हणउनि हरि भजिजे हरि भजिजे। पदोपदीं संस्मरिजे ॥ ध्रु० ॥ उंदीर देखुनि वचके। तैसा काळालागिं न दचके ॥ १ ॥ दाटति कंठ कफानें। नाना देहीं उठति तुफानें ॥ २ ॥ वरडुनि धाबरें करिती। असली सु-बुद्धि तेही हरिती ॥ ३ ॥ समयीं म्हणती पैका वेंचूं। अंतरिं सहस्र तिडका विंचू ॥ ४ ॥

---

[1] पंचमहाभूतांचा.

लागलि देखुन उचकी । स्त्री सुत बंधु पैका उचकी ॥ ५ ॥ कंठीं कुडक्या मुद्या । अवघी संपत्ति जाइल उद्यां ॥ ६ ॥ अमृतेंविण मति बरळा । अंतरिं सावध तो एक विरळा ॥ ७ ॥

---

## शिवदिनकेसरी

### पद १

जैसें ज्यानें केलें । तैसें त्याला फळ झालें ॥ ऐसें अनुभवासि आलें । यांत आमुचें काय गेलें ॥ ध्रु० ॥ काळ-व्याळ हा विक्राळ । डंखूं पाहे सर्वहि काळ ॥ त्याचें भय सांडुनियां । मूर्खें स्व-हित टोलाविलें ॥ यांत० ॥ १ ॥ भक्त विरक्त योगी संत । सिद्ध ज्ञानी जीवन्मुक्त ॥ त्यांची सेवा कारितां देवें । वैकुंठासी नेलें ॥ यांत० ॥ २ ॥ अर्थ स्वार्थ साधन अर्थ । केसरि शिवदिन गुरु परमार्थ ॥ गुरु-भक्ताचें गुरु-भक्तिनें । जन्म-मरण चुकविलें ॥ यांत० ॥ ३ ॥

### पद २

भाव धरारे । आपुलासा देव करा रे ॥ ध्रु० ॥ कोणी काय म्हणो यासाठीं । वळकट प्रेम असावें गांठीं ॥ निंदा-स्तुतीवर लावुनि काटी । मी[1] तूं[1] हरा[1] रे ॥ आपुलासा देव० ॥ १ ॥ सकाम-साधन सर्वही सांडा । निष्कामें मुळ भजनीं मांडा ॥ नाना कुतर्क-वृत्तिसि दवडा । आली जरा रे ॥ आपुलासा० ॥ २ ॥ दुर्लभ नर-देहाची प्राप्ती । पुन्हा न मिळे हा कल्पांतीं ॥ ऐसा विवेक जाणुनि चित्तीं । गुरुसी वरा रे ॥ आपुलासा० ॥ ३ ॥ केसरिनाथ-गुरूचे पायीं । सृष्टि आजि बुडाली पाहीं ॥ शिवदिनिं निश्चय दुसरा नाहीं । भक्त सखा रे ॥ आपुलासा देव करा रे ॥ ४ ॥

### पद ३

माझी देव-पुजा देव-पुजा । पाय तुझे गुरु-राजा ॥ माझी० ॥ ध्रु० ॥ गुरु-चरणाची माती । तेच माझी भागीरथी ॥ माझी० ॥ १ ॥ गुरु-चरणाचा बिंदु । तोची माझा क्षीर-सिंधु ॥ माझी० ॥ २ ॥ गुरु-चरणाचें ध्यान । तेंचि माझें संध्या-स्नान ॥ माझी० ॥ ३ ॥ शिवदिन केसरि पायीं । सद्गुरुवांचुनी दैवत नाहीं ॥ माझी० ॥ ४ ॥

---

१ भेदभावरहित व्हा.

### पद ४

दैवें नर-तनु सांपडली । मूढा तुज कां भूल पडली ॥ ध्रु० ॥ अमूल्य आयुष्य जातें रे । कां करितोसि मातेरें ॥ दैवें नर-तनु० ॥ १ ॥ मोह-मदें तुम्ही कां भुललां । काळ-व्याळ गिळि तुजला ॥ दैवें नर-तनु० ॥ २ ॥ शिवदिन सांगे मृदु-वचनें । सावध होई श्रुति-वचनें ॥ दैवें नर-तनु सां० ॥ ३ ॥

---

## रामजोशी

भज भज भव-जलधिमाजि, मनुजा शिवाला ॥ ध्रु० ॥ धरिशिल दृढ चरण-कमल, घडिभरि तरि करुनि वि-मल । तरिच सकल पाप शमल, त्यज रे भवाला ॥ भज भज० ॥ १ ॥ सांडुनियां विषय-वमन, झडकरि करिं षड्‍रि-दमन । पूजिं मन हें करुनि सुमन ॥ गिरिजा-धवाला ॥ भज भज० ॥ २ ॥ सावध हो करिशि काय, शंकर गुरु बाप माय । चिंतुनि कविराय पाय हृदयीं निवाला ॥ भज भज० ॥ ३ ॥

---

## जीवनतनय

### पद १

माझ्या बाळावरता रोष । कैकेयि धरिशी कां ॥ ध्रु० ॥ चिमणें बाळक कीं रघु-राय । केला नसतां तव अन्याय ॥ वनासि दवडुनि सुख तरि काय । ऐसा अनर्थ करिसी कां ॥ माझ्या० ॥ १ ॥ राम केवळ नेणत बाळ । फिरेल विपिनीं कीं अळुमाळ ॥ यास्तव वाटतसे हळहळ । ठेविन भाळ चरणीं कां ॥ माझ्या० ॥ २ ॥ अंतरल्यावर श्री-रघुराज । माझे प्राणचि जातिल आज ॥ त्रिभुवनीं अपकीर्तीची लाज । व्यर्थचि आज वरिसी कां ॥ माझ्या० ॥ ३ ॥ देईं भरताशी संभार । परि मजवरता करिं उपकार ॥ जीवन-तनयाचा दातार । चित्तीं दूर धरिसी कां ॥ माझ्या० ॥ ४ ॥

### पद २

माझ्या बाळा रघुवीरा । वनासि जाऊं नको ॥ ध्रु० ॥ कोमळ नाजुक तुझा काय । व्यर्थचि भरीं भरलासी काय ॥ रडतें मोकलोनि मी धाय । पंकीं गाय रोवूं नको ॥ माझ्या० ॥ १ ॥ तुझे पायां येतिल फोड । वन-विचराची इच्छा सोड ॥ देईं मजला एवढी जोड । सुकृत-मोड मोडूं

नको ॥ माझ्या० ॥ २ ॥ सूक्ष्म केवळ तूं तर बाळ । कैसा फिरसिल रानोमाळ ॥ होइल अनर्थ कीं तात्काळ । विपरित काळ दावूं नको ॥ माझ्या० ॥ ३ ॥ विनवित रामासी ते माय । स्वस्थचि मजपासीं तूं राय ॥ जीवनतनय वंदितो पाय । कांहीं उदास होउं नको ॥ माझ्या० ॥ ४ ॥

---

## सोहिरोबा

### पद १

भगवंताला स्मराल तरि हा भव-सागर तुम्हीं तराल हो ॥ ध्रु० ॥ पापामध्यें न व्हाल शुद्ध हें पुण्यचि करा तराल हो । आणी योगी व्हाल तरी मोह-फणीचें विष उतराल हो ॥ भग० ॥ १ ॥ आत्मा ना विसराल विषय-तृष्णा ना पसराल । भ्रमांतुनि कसराल आदि-पुरुषाला अनुसराल हो ॥ भग० ॥ २ ॥ विचार हा विवराल निरंतर भजनीं वावराल । निज-शांतीला वराल चंचळ-मानस हें आवराल हो ॥ भग० ॥ ३ ॥ योगाभ्यासें झराल अ-क्षय प्रेमातें पाझराल ॥ निरंजन-वनीं ठराल तेव्हां नित्यानंदें भराल हो ॥ भग० ॥ ४ ॥ सोहिरा म्हणे कर्म हराल केविं जन्मुनि पुढति मराल ॥ चित्त चैतन्यीं सुधराल तेव्हां उभय कुळें उद्धराल हो ॥ भग० ॥ ५ ॥

### पद २

हरिभजनावीण काळ घालवूं नको रे ॥ ध्रु० ॥
संतसंगतिनें उमज । चिद्रुपासि पुरतें समज ।
अनुभवावीण उगिच । मान हालवूं नको रे ॥ हरि० ॥ १ ॥
दोरिच्या सापा भिउनि भवा । भेटि नाहीं जीवाशिवा ।
अंतरिंचा ज्ञानदिवा । मालवूं नको रे ॥ हरि० ॥ २ ॥
विवेकाचि ठरेल ओल । ऐसे बोलावे कीं बोल ।
आपुल्या मतें उगाचि चिखल । कालवूं नको रे ॥ हरि० ॥ ३ ॥
सोहिरा ह्मणे ज्ञानज्योति । तेथें कैंचि दिवसराति ।
तयाविणें नेत्रपातिं । हालवूं नको रे ॥ हरि० ॥ ४ ॥

### पद ३

हरि-स्मरण-विस्मरण, तरि तुझें काय जिणें रे असून ॥ ध्रु० ॥ स्वार्थचि साधिसी, सार्थक नेणसी । कोणासि पहा तरि पुसून । पुढें नाहीं गति । मलिन झालि मति । साधुची संगति नसून ॥ हरि० ॥ १ ॥ रतिविलासें लंपट

होसी । मानस गेलें डसून । लवकर सर कीं पडसिल नरकीं । फुकट मरशील कुसून ॥ हरि० ॥ २ ॥ आळसि कामा उगा रिकामा । थट्टाचि करिसी बसून । कुकर्माच्या कांहिं वर्माच्या । गोष्टि सांगसी कसून ॥ हरि०॥ ३ ॥ शरीर फिरवी तुजला मिरवी देव असे रे रुसून । जवळि असून तुझे हृदयिं वसून । भगवंत नये रे दिसून ॥ हरि० ॥ ४ ॥ म्हणे सोहिरा गुरुनाथ हा । माझ्या हृदयीं घुसून । जनासि उद्धरावया कारणें । वचन सांगतों ठसून ॥ हरि०॥ ५ ॥

---

## देवनाथ

नामामृतरस रसने । भरावा ॥ ध्रु० ॥
सर्वांतर्गत श्रीगुरु व्यापक । जाणुनियां पदिं भाव धरावा ॥ १ ॥
आत्मा आपण उमजुनि अनुभवीं । मीतूंपण हा हेतु हरावा ॥ २ ॥
नयनद्वारें हृदयभुवनीं । सच्चित्सुख गुरु पूर्ण शिरावा ॥ ३ ॥
देवनाथप्रभु नाथ निरंजन । प्रेमादरें निज आप्त करावा ॥ ४ ॥

---

## स्फुट पदें

### पद १

बोलणें फोल झालें । डोलणें वांयां गेलें ॥ ध्रु० ॥ चित्तीं विषयांचा अभिलाष । नाहीं विश्रांतीचा लेश ॥ मुखें म्हणे निर्विशेष । पर-ब्रह्म सांचलें ॥ बोलणें० ॥ १ ॥ श्रवणीं दावी अष्टहि भाव । म्हणे मृग-जळवत् हें वाव ॥ कवडी वेंचिताही जीव । जाऊं पाहे तळमळुनी ॥ बोलणें० ॥ २ ॥ परोप-देशीं पूर्ण-ज्ञानी । वाहे मत्सर ममता मनीं ॥ नागसुरें तो जैसा फणी । डोले परी विष वदनीं ॥ बोलणें० ॥ ३ ॥ अन्न म्हणतां कोण धाले । शब्दें ब्रह्म कोण झाले । शिकविले बोल बोले । शुक पक्षी पैं जैसा ॥ बोलणें० ॥ ४ ॥ शिकला नाना-कळा छंद । नाहीं अंतरीं निर्द्वंद्व ॥ सहज पूर्ण निजानंद । सर्व रंगीं न भासे ॥ बोलणें फोल झालें ॥ डो० ॥ ५ ॥

### पद २

एक मीच प्रिय-कर ज्याला । माझें हो आयुष्य त्याला ॥ ध्रु० ॥ कृष्ण म्हणे अर्जुनातें । माझें मद्भक्तांसीं नातें ॥ जैसा मत्स्य जळीं जीवनातें । जीवें-भावें न विसंबे ॥ एक मीच० ॥ १ ॥ मजवेगळें दुसरें कांहीं । त्रि-भुवनीं जयासि

उरलें नाहीं ॥ त्याविण क्षण लव पल मज पाहीं । उदास अनंत ब्रह्मांडें ॥ एक मीच० ॥ २ ॥ इंद्र-पदींचें जे उपभोग । त्याचे दृष्टि ते क्षय-रोग ॥ माझे स्व-रूपीं अखंड योग । वियोग नाहीं मज त्यासी ॥ एक मीच० ॥ ३ ॥ ऋद्धिसिद्धी मुक्ती चारी । द्वारीं वोळंगति कामारी ॥ देखुनि वांतीच्चिये परी । अखंड रत हरि-गुरु-भजनीं ॥ एक मीच० ॥ ४ ॥ काया वाचा मना चित्तें । अनन्य भावें भजती मातें ॥ त्यांचा सर्वही मीं अच्युतें । योगक्षेम वहावा ॥ एक मीच० ॥ ५ ॥ विश्वात्म्याचे आत्मे झाले । पूर्ण निजानंदीं रंगले ॥ त्यांसि म्हणती मेले गेले । ते भ्रांतीचे शिरो-मणी ॥ एक मीच प्रियकर ज्याला । माझें हो आयुष्य त्याला ॥ ६ ॥

## पद ३

भज रे गोविंदा गोविंदा । सच्चिदानंद-कंदा ॥ सावध होईं रे मति-मंदा । न करीं आणिक धंदा ॥ भज रे० ॥ ध्रु० ॥ मोहें भुललासी भुललासी । माझें माझें म्हणसी ॥ क्लेशें मेळविल्या धन-राशी । अंतीं टाकुनि जाशी ॥ भज रे० ॥ १ ॥ गृह-सुत-धन-दारा धन-दारा । मिथ्या मोह पसारा ॥ अंतीं जाशिल रे झरारा ॥ करिं कां पूर्ण विचारा ॥ भज रे० ॥ २ ॥ आयुष्य जातें रे घडिघडी । तुज विषयांची गोडी ॥ काळ पाडिल रे मुरकुंडी । तैं तुज कोण सोडी ॥ भज रे० ॥ ३ ॥ विसरुनि भगवंता भगवंता । करिशिल घरची चिंता ॥ काळ नेईल रे अवचिता । तंव तूं पडशिल भ्रांता ॥ भज रे० ॥ ४ ॥ गुंडा केशवीं स्थिर राहे । तरीच तूझी सोये ॥ पाया लागलिया पैं पाहे । अंतीं मोक्षा लाहे । भज रे गोविंदा गोविंदा ॥ ५ ॥

## पद ४

नेदी चित्ता शांति ऐसी विद्या काशाला । नेघे हरिचें नाम ऐशी जिव्हा काशाला ॥ ध्रु० ॥ अप्रिय बोलती पतिला ऐशी बाइल काशाला । बाइलिला जो व्यर्थ गांजितो तो पति काशाला ॥ हृदयीं कृत्रिम अशांशीं ती मैत्री काशाला । मनचा खोटा फिरोनी शिणला तीर्थें काशाला ॥ नेदी० ॥ १ ॥ भावाविरहित नर जो त्याला दैवत काशाला । एक घड ना भाराभर त्या चिंध्या काशाला ॥ एक गुणी ना दुर्गुणि बेटे शंभर काशाला । आदर न करी त्याच्या घरचें भोजन काशाला ॥ नेदी० ॥ २ ॥ गर्वें ताठुनि जाय तयाशीं भाषण काशाला । अभाग्याचें

समर्थाशीं वैर काशाला ॥ करणी नसतां ज्ञान व्यर्थ बडबड काशाला । हृदयीं षड्रिपु वसती त्याला जप-तप काशाला ॥ नेदी० ॥ ३ ॥ गुरु-पदिं निष्ठा न धरी ऐसा शिष्य काशाला । शिष्याला जो वाइट चिंती तो गुरु काशाला ॥ वाद्या अथवा भेद्या ऐसा सेवक काशाला । प्रबोध निर्मळ न करी ऐसा स्वामी काशाला ॥ नेदी० ॥ ४ ॥ प्रीत धरीना सहोदराची ऐसा सोदर काशाला । पोट भरेना जेथें ऐसा देश काशाला ॥ हरि-कवि बोले सद्गुरु-वचनीं संसृति-पाशाला । छेदीना तो मानव जन्मा आला काशाला ॥ नेदी चित्ता शांति ऐशी० ॥ ५ ॥

---

## भूपाळ्या गणपतीवरच्या

### भूपाळी १

उठा उठा सकळ जन । वाचे स्मरा गजानन ॥ गौरी-हराचा नंदन । गज-वदन गणपती ॥ ध्रु० ॥ ध्यानीं आणोनी सुख-मूर्ती । स्तवन करा एके चित्तीं ॥ तो देईल ज्ञान-मूर्ती । मोक्ष-सुख सोज्वळ ॥ उठा उठा० ॥ १ ॥ जो निजभक्तांचा दाता । वंद्य सुर-वरां समस्तां ॥ त्यासी ध्यातां भव-भय चिंता । विघ्न-वार्ता निवारी ॥ उठा उठा० ॥ २ ॥ तो हा सुखाचा सागर । श्री-गणराज मोरेश्वर ॥ भावें विनवीतो गिरिधर । भक्त त्याचा होऊनी ॥ उठा उठा० ॥ ३ ॥

### भूपाळी २

उठिं उठिं बा मोरेश्वरा । चवदा विद्यांच्या माहेरा ॥ चतुर्भुजा परशुकरा । अंकुश-धरा गज-वदना ॥ ध्रु० ॥ माता बोले शैल-नंदिनी । योगी उभे असती अंगणीं ॥ दर्शन द्यावें चिंता-मणी । प्रातः-स्मरणीं स्मरती हे ॥ उठिं उठिं बा० ॥ १ ॥ रत्न-जडित सिंहासन । वरी बैसले गजानन ॥ ऋद्धि सिद्धि दासी दोन । करिती चरण-सेवेतें ॥ उठिं उठिं बा० ॥ २ ॥ अंगीं सेंदुराची उटी । शोभे चंद्रमा ल्लाटीं ॥ मुक्ता-फळ-हार कंठीं । मुखीं प्रभा फांकतसे ॥ उठिं उठिं बा० ॥ ३ ॥ प्रातःकाळीं ही भूपाळी । योगी ध्याती हृदय-कमळीं ॥ निरंजनीं कृपेची साउली । भक्ता हातीं वदवीली ॥ उठिं उठिं बा मोरेश्वरा० ॥ ४ ॥

---

## भूपाळी रामावरची

राम आकाशीं पाताळीं । राम नांदे भू-मंडळीं ॥ राम योगियांचे मेळीं । सर्व काळीं शोभत ॥ ध्रु० ॥ राम नित्य निरंतरीं । राम स-बाह्य अभ्यंतरीं ॥ राम विवेकाचे घरीं । भक्तीवरी सांपडे ॥ राम० ॥ १ ॥ राम भावें ठायीं पडे । राम भक्तीशीं आतुडे ॥ राम ऐक्यरूपीं जोडे । मौन पडे श्रुतीसी ॥ राम० ॥ २ ॥ राम योग्यांचें मंडन । राम भक्तांचें भूषण ॥ राम आनंदाचा घन । करी रक्षण दासांचें ॥ राम० ॥ ३ ॥

---

## भूपाळी कृष्णावरची

ऊठिं गोपालजी जाइं धेनूंकडे । पाहती सौंगडे वाट तूझी ॥ ध्रु० ॥ लोपली हे निशी मंद झाला शशी । मुनि-जन मानसीं तूज ध्याती ॥ ऊठिं० ॥ १ ॥
भानु-उदयाचळीं तेज पुंजाळलें । फुललीं कमळें ऊदकीं हीं ॥ ऊठिं० ॥ २ ॥
धेनु-वत्सें तुला बाहती माधवा । ऊठिं गा यादवा उशीर झाला ॥ ऊठिं० ॥ ३ ॥
ऊठिं पुरुषोत्तमा वाट पाहे रमा । दावीं मुख-चंद्रमा सकाळिकां ॥ ऊठिं० ॥ ४ ॥
कनक-पात्रांतरीं दीप-रत्नें बरीं । ओवाळिते सुंदरी तूजलागीं ॥ ऊठिं० ॥ ५ ॥

---

## भूपाळी घनश्यामावरची

घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला । उठिं लौकर वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥ ध्रु० ॥ सायंकाळीं एके मेळीं द्विज-गण अवघे वृक्षीं । अरुणोदय होतांच उडाले चरावया पक्षी ॥ अघमर्षणादि करूनि तापसी तपाचरण-दक्षी । प्रभात-काळीं उठुनि कापडी तीर्थ-पंथ लक्षी ॥ करुनि सडा-संमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं । यमुना-जळासि जाति मुकुंदा दध्योदन भक्षीं ॥ ( चाल बदलून ) मुक्तता होऊं पाहे, कमळिणीपासुनी भ्रमरा । पूर्व-दिशे मुख धुतलें, होतसे नाश तिमिरा । उठिं लौकरि गोविंदा, सांवळ्या नंद-कुमरा ॥ ( चाल पहिली ) ॥ मुख-प्रक्षाळण करीं अंगिकारीं भाकर-काला ॥ उठिं लौकरी वनमाळी० ॥ १ ॥ घरोघरीं दीप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती । गीत गाती सप्रेमें गोपी सदना येति जाती ॥

प्रवर्तोनि गृह-कामीं रंगावाळि घालूं पाहती । आनंदकंदा प्रभात झाली उठ सरली राती ॥ काढिं धार क्षिर-पात्र घेउनी धेनू हंबरती । द्वारीं उभे गोपाळ हाक मारुनि तुजला बाहती ॥ ( चा० ब० ) हे मुक्ता-हार कंठीं, घालिं या रत्न-माळा । हातीं वेत्र-यष्टि बरवी, कांबळा घेइं काळा । ममात्मजा मधु-सुदना, हृषिकेशी जगत्पाळा ॥ ( चा० प० ) लक्षिताति वासुरें हरि धेनु स्तन-पानाला ॥ उठिं लौकर वनमाळी उदयाचळीं० ॥ २ ॥ प्रातःस्नानें करुनि गोपिका अलंकारें नटती । कुंकुमादि चर्चुनी मंथनालागीं आरंभिती ॥ प्रेम-भरित अंतरांत वदनीं नामावळि गाती । अर्घ्य-दान देउनियां द्विज-गण देवार्चन करिती ॥ नेम-निष्ठ वैष्णव ते विष्णु-पूजा समर्पिती । स्मार्त शिवार्चन-सक्त शक्तितें शाक्तहि आराधिती ॥ ( चा० ब० ) ऋषि-गण आश्रमवासी, जे निरंजनीं धाले । अरुणोदयीं आपुलाले, ध्यानीं निमग्न झाले । पंच पंच उषःकालीं, रवि-चक्र निघों आलें ॥ ( चा० प० ) एवढा वेळ निजलासि म्हणून हरि समजेल नंदाला ॥ उठिं लौकर० ॥ ३ ॥ विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरु-पायीं । अध्यापन गुरु करिती शिष्यहि अध्ययना उदयीं ॥ याज्ञिक-जन कुंडामाधिं आहुति टाकितात पाहीं । रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही ॥ हे माझे पाडसे सांवळे ऊठ कृष्णाबाई । सिद्ध सर्वे बळिराम घेऊनि गो-धनें वना जाईं ॥ ( चा० ब० ) मुनि-जन-मानस-हंसा, श्री-मनःकमल-भृंगा । मुर-हर पंकज-पाणी, पद्म-नाभ श्री-रंगा । शकटांतक सर्वेशा, हे हरि प्रताप-तुंगा ॥ ( चा० प० ) कोटि रवींहुनी तेज आगळें तुझिया वदनाला ॥ होनाजी बाळ नित्य ध्यातसे, हृदयीं नाम-माळा ॥ घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणो० ॥ ४ ॥

---

## आरती गणपतीवरची

सुख-कर्ता दुःख-हर्ता वार्ता विघ्नाची । नुरवी, पुरवी प्रेम कृपा जयाची ॥ सर्वांगीं सुंदर उटि शेंदुराची । कंठीं झळके माळ मुक्ता-फळांची ॥ जय देव जय देव जय मंगल-मूर्ति । दर्शन-मात्रें मनःकामना पुरती ॥ ध्रु० ॥ १ ॥

रत्न-खचित फरा तुज गौरी-कुमरा । चंदनाची उटी कुंकुम-केशरा ॥ हिरे-जडित मुगुट शोभतो बरा । रुणझुणती नूपुरें चरणीं घागरिया ॥ जय देव० ॥ २ ॥ लंबोदर पीतांबर फणि-वर-बंधना । सरळ-सोंड वक्रतुंड त्रि-नयना ॥ दास रामाचा वाट पाहे सदना । संकष्टीं पावावें निर्वाणीं रक्षावें सुरवर-वंदना ॥ जय देव० ॥ ३ ॥

---

## आरती पांडुरंगावरची

युगीं अठ्ठाविसीं विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥ पुंडलिका भेटी पर-ब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥ जय देव जय देव जय पांडुरंगा । रखुमाई-वल्लभा पावें जिवलगा ॥ ध्रु० ॥ १ ॥ तुळशी-माळा गळां कर ठेवुनि कटीं । कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं ॥ देव सुर-वर नित्य येती भेटी । गरुड हनुमंत पुढें उभे राहाती ॥ जय देव० ॥ २ ॥ आषाढीं कार्तीकीं भक्त-जन येती । चंद्रभागेमाजी स्नानें जे करिती ॥ दर्शन हेळामात्रें तयां होय मुक्ति । केशवासी नामदेव भावें ओंवाळिती ॥ जय देव० ॥ ३ ॥

---

## आरती देवीवरची

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं । अनाथ-नाथे अंबे करुणा विस्तारीं ॥ वारीं वारीं जन्म-मरणातें वारीं । हारीं पडलों आतां संकट निवारीं ॥ जय देवी जय देवी महिषासुर-मथिनी । सुर-वर-ईश्वर-वरदे तारक संजिविनी ॥ ध्रु० ॥ १ ॥ त्रि-भुवन-भवनीं पाहतां तुजऐशी नाहीं । चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं ॥ साही विवादितां पडले प्रवाहीं । ते तूं भक्तालागीं पावसि लवलाहीं ॥ जय० ॥ २ ॥ प्रसन्न-वदनें प्रसन्न होसी निज-दासा । क्लेशापासुनि सोडीं तोडीं भव-पाशा ॥ अंबे तुजवांचुन कोण पुरवील आशा । नरहरि तल्लिन झाला पद-पंकज-कोशा ॥ जय देवी० ॥ ३ ॥

समाप्त.

## ह्या ग्रंथांतील कठीण शब्दांचा कोश.

### अ.

अंक—१ मांडी. २ चिन्ह. ३ एक, दोन इत्यादि प्रत्येक.

अकिंचन—१ निर्धन, भिकारी. २ निरिच्छ.

अक्रिय-जें कांहीं करीत नाहीं तें.

अखिल—सर्व.

अग—१ पर्वत, डोंगर. २ वृक्ष.

अगद—औषध.

अंगद—१ बाहुभूषण. २ वालिपुत्र.

अगम्य—जाणतां येत नाहीं असें.

अगाध—खोल, अपार.

अगार—घर.

अंगार—निखारा.

अंगुलिभंग—बोटें मोडणें.

अग्रज—वडील भाऊ.

अघ—पाप.

अघमर्षण—पापनाशक स्नानविधि.

अघवाही—पापी.

अघोर—एक गोसाव्यांची जात आहे. हे लोक घाणेरडे आणि भयंकर असून नागवे फिरतात आणि उजवे हातांत मलमूत्रानें भरलेली मनुष्याची करटी घेतात आणि डावे हातांत निखाऱ्यांचें खापर घेतात.

अंघ्रि—पाय.

अंचल—पदर.

अचक्षु—१ अंध. २ धृतराष्ट्र.

अचाट—अद्भुत, मोठें.

अज—१ ज्याला जन्म नाहीं असा. २ विष्णु ब्रह्मदेव, शिव इत्यादि.

अजंगम—न चालणारें झाड वगैरे.

अंजन—काजळ ; नेत्रौषध.

अजांड—ब्रह्म.

अजातरिपु—ज्याला शत्रु नाहींत असा; धर्मराज.

अजातारि—अजातशत्रु; धर्मराज.

अजितत्व—अजिंकपणा.

अजितनाम—ईश्वराचें नांव.

अजिन—चर्म, कातडें.

अजिर—अंगण.

अटन—फिरणें.

अटापिटा—तसदी, खटाटोप.

अट्टहास—१ खदखदां हसणें, मोठ्यानें हसणें. २ नेटाचा प्रयत्न, मोठा परिश्रम.

अडलावो—अडचणींत मदत.

अडवी—अटवी, अरण्य, रान.

अणु—अल्प, थोडें.

अंतरंग—मन.

अंतराय—१ विघ्न. २ यम.

अंतराल—आकाश.

अंतरि( री )क्ष—पोकळी.

अंतरीं—मनांत, हृदयांत.

अंतरीप-बेट.

अंतरीपायमान—द्वीपतुल्य.

अतर्क्य—ज्याविषयीं कल्पना करितां येत नाहीं असें.

अंतर्हित—गुप्त.

अतिकाळ—बहुकाळ.

अतिक्रम—मर्यादा उल्लंघून जाणें.

अतिपात—भंग, नाश, अमर्यादा, उल्लंघन.

अतिमात्र—अत्यंत, बहुत.

अतींद्रियद्रष्टा—इंद्रियांस समजत नाहीं तें पाहणारा.

अंतुरी—स्त्री, जाया, बायको.

अंत्यज—अतिशूद्र.

अत्याहित–दांडगाई, अत्याचार.
अंत्रपाट–अंत:पट.
अत्रि–सप्त ऋषींपैकीं एक ऋषि.
अदंभित्व–दांभिकपणा नव्हे तें.
अदभ्र–बहुत.
अदिति–कश्यपऋषीची स्त्री व देवांची आई.
अंदुक–हत्तीच्या पायांतली बिडी, सांखळदंड.
अदृष्ट–१ दैव. २ न पाहिलेलें.
अद्रि–पर्वत.
अधर–ओंठ.
अधिष्ठान–१ स्थान. २ आश्रय.
अधिष्ठिली–आक्रमिली.
अधीन–वश.
अध्वर–यज्ञ.
अध्वांग, अध्वंग–ज्याचें अंग अधू आहे तो.
अनंत–१ ज्याला अंत नाहीं तो. २ विष्णु. ३ शेष.
अनंतर–मग.
अनन्य–१ ज्यास दुसरा नाहीं तो, एकटा. २ अगतिक, एकनिष्ठेनें भजणारा.
अनर्घ्य–अमूल्य.
अनव–जीर्ण, वृद्ध, जुना.
अनवरत–निरंतर.
अनवसर–अप्रसंग.
अनसूयासुत–दत्तात्रेय.
अनळ–अग्नि.
अनाथवाणी–अनाथासारखा, दीनवाणी.
अनाद्यंत–ज्याला आदि नाहीं व अंत नाहीं असा, ईश्वर.
अनारिसें–वेगळें.
अनार्य–दुष्ट.
अनिर्देश्य–जें अमुक म्हणून सांगतां येत नाहीं तें.
अनीक–सेना, सैन्य.
अनुकंपा–दया.
अनुकंप्य–दया करण्यास योग्य.
अनुज, अनुजनि–धाकटा भाऊ, मागून जन्मलेला.
अनुबिंब–प्रतिबिंब.
अनुरक्त–प्रेमानें आसक्त.
अनुराग–प्रीति, प्रेम.
अनुवाद–सांगणें, बोलणें.
अनृत–खोटें, असत्य.
अन्यतम–बहुतांतून कोणताही एक.
अन्वय–१ संबंध. २ वंश.
अन्वित–युक्त.
अपरूप–अपूर्व, अदृष्टपूर्व.
अपरोक्ष–समक्ष, प्रत्यक्ष.
अपर्णा–पार्वती.
अपर्णापति–सदाशिव.
अपवर्ग–मोक्ष.
अपसद–दुष्ट, नीच.
अपांपति–समुद्र.
अपेक्षा–इच्छा.
अप्रमेय–जें जाणण्यास किंवा अनुमान करण्यास कठीण तें.
अप्सरा–देवांगना.
अंबक–१ डोळा.
अंबर–१ आकाश. २ वस्त्र.
अबाधित–बिनहरकत.
अंबिका–१ माता. २ पार्वती.
अंबु–पाणी.
अंबुज–कमल.
अब्जज–कमलापासून उत्पन्न झालेला, ब्रह्मदेव.
अब्जिनी–कमलिनी.
अब्द–१ मेघ. २ वर्ष.

अभिनव, अभिन्नव —नवीन व चमत्कारिक.
अभिराम—सुंदर.
अभिज्ञ—जाणता.
अंभोज—कमल.
अंभोद—मेघ.
अंभोरुह—कमळ.
अभ्रमु—ऐरावताची स्त्री.
अमर—देव.
अमरतरु—कल्पवृक्ष.
अमरावती—इंद्राची नगरी.
अमित, अमूप —पुष्कळ.
अमृतकर—चंद्र.
अमोघ—सफल.
अय—लोखंड.
अयन—१ गमन. २ मार्ग. ३ वर्ष.
अयुत—दशसहस्र.
अरि—१ शत्रु. २ विष्णूचें चक्र (सुदर्शन).
अरुण—१ रक्तवर्ण. २ सूर्यसारथि.
अरुवार—मृदु, कोमळ, रवाळ.
अरुष—आर्ष, वेडेंवांकडें.
अर्क—१ सूर्य. २ रुईचें झाड.
अर्की—रुईचें झाड.
अर्जणें—संपादणें.
अर्णव—समुद्र.
अर्थ—पैसा, द्रव्य.
अर्थिला—अर्थी, याचक.
अलंघ्य—उल्लंघण्यास अयोग्य किंवा कठीण.
अलक्ष, अलक्ष्य —अतर्क्य, दुर्लक्ष्य.
अलाबु—भोंपळा.
अलि—१ भ्रमर. २ पंक्ति.
अलिक—कपाळ.
अलिनी—भ्रमरी.
अलिप्त—जो लिप्त नाहीं तो, अलग.
अलोट—मोठें, अचाट, अनिवार.
अवकळा—दुश्चिन्ह, नीचकला.
अवगत—ठाऊक.
अवगाहणें—वर्णन करणें; प्रवेश करणें.
अवंचक—वंचक नव्हे तो, खरा.
अवचट—अवचित.
अवचितां—अकस्मात.
अवतरण—१ उतरणें. २ अवतार घेणें.
अवतंस—भूषण.
अवतीर्ण—ज्यानें अवतार घेतला आहे तो.
अवथिलें—योजिलें.
अवदान— हविर्भाग.
अवधारणें—ऐकणें.
अवन—रक्षण.
अवनत—नम्र, आज्ञाधारक.
अवनि—पृथ्वी.
अवलंब—स्वीकार, आश्रय.
अवलीळा—सहजांत, लीलेनें.
अवलोक—दृष्टि.
अवसर—समय, प्रसंग.
अवहार—पसरलेल्या सैन्यादिकांचा आटोप.
अवाङ्मुखी—खालीं पहाणारी.
अवारित—निवारल्यावांचून.
अवि, अवी —मेंढा.
अविद्या—माया, अज्ञान.
अवो—अरे, अगे.
अव्हाटें—आडमार्गानें.
अव्हेर—तिटकारा, हेळसांड.
अंश—विभाग.
अशन—भोजन, खाणें.
अशनि—वज्र.

अशरीरवाणी, अशरीरिणी —आकाशवाणी.

अशिव—अकल्याण.

अशुद्ध—रक्त.

अशेष—संपूर्ण.

अष्टभाव—निश्चेष्टता, बेशुद्धि (इंद्रियज्ञान-शून्यता), रोमांच उभे राहणें, घाम येणें, मुखाचें वैवर्ण्य, कंप सुटणें, अश्रु येणें, स्वर बदलणें, असे आठ भाव आहेत; यांना सात्त्विकभाव म्हणतात.

असकृत्—वारंवार.

असकें—सर्व.

असती—१ अपकीर्ती. २ खोटी, असत्य.

असंभावनी—संभव नाहीं अशी, अतर्क्य.

असाधुवाद—दुर्भाषण, निंदा.

असाध्वस—निर्भय.

असांरली, असांवली —अश्रुयुक्त झाली.

असित—नीलवर्ण, काळा.

असितपथ—कृष्णवर्त्मा (अग्नि).

असि (सी) पत्र—तरवारीचें पान.

असिवार—खड्गधर, पदाति.

असीपत्रवन—एक नरक आहे. ह्यांत झाडाच्या पानाला तरवारीसारखी धार असते.

असु—प्राण.

असुख—दुःख.

असूं—अश्रु, नेत्रोदक.

असूया—हेवा, मत्सर, ईर्ष्या.

असोशी—हव्यास, अतिइच्छा.

अस्तमित—अस्तास गेलेला.

अस्त्र—१ शस्त्र. २ मंत्रप्रयोगानें सोडण्याचें शस्त्र.

अस्त्रतति—अस्त्रांचा समूह.

अहंकृति—अहंकार.

अहर्निशीं—रात्रंदिवस.

अहिवर—सर्पांत श्रेष्ठ कालिया.

अहेव—सुवासिनी.

अहेवतंतू—सौभाग्यसूत्र.

अहेवपण—सौभाग्य, अवैधव्य.

अळुमाळ—थोडथोडा, थोडासा.

अक्ष—फांसा.

अक्षत—जें तुटलें फुटलें नाहीं तें.

अक्षम—असमर्थ.

अक्षर—जो नाश पावत नाहीं तो, स्थिर, न ढळणारा.

## आ.

आइणी—इच्छा.

आइती—तयारी.

आकण—कणसें एकदां तुडवून काढलेलें धान्य, मातेरें, खडामाती.

आकर्णन—ऐकणें, श्रवण.

आकळणें—१ जाणणें. २ वश होणें.

आकांक्षणें—इच्छिणें.

आक्रंदणें—ओरडणें.

आक्रोशणें—बोलणें.

आखंडल—इंद्र.

आखर—सीमेबाहेरचा प्रदेश.

आखु—उंदीर.

आख्या—१ नाम. २ कीर्ति.

आग—अपराध.

आंगठसा—शरीराचा बांधा.

आंगवठा—शरिराचा बांधा.

आगम—शास्त्र.

आंगवण—१ शक्ति. २ खोड, छंद.

आगळा, आगळें —अधिक.

आगा—१ घर, स्थान. २ अरे.

आंगाथिणें–स्वीकारणें.
आगार–घर, स्थान.
आगीं–अग्रभागीं.
आंगीं–स्वतः.
आंगोळी–अंगुलि, बोट.
आघवें–सर्व, अवघें.
आचार्य–गुरु.
आजी–१ युद्ध. २ आज.
आज्य–तूप.
आझूइं–अजून.
आटणी–मिश्रण.
आटाआटी } –प्रयास, श्रम, खटपट.
आटापीटा }
आटी–खटपट.
आटीं–अरण्यांत.
आटोप–डौल.
आठव–स्मरण.
आडपडे–मागें पडे.
आडळ–आडणूक, अडचण.
आढ्य–धनिक.
आणिक–दुसरें, निराळें.
आततायी–अविचारानें दुसऱ्याच्या प्राणादिकांचें हरण करणारा.
आतप–उष्ण.
आतर–नोर, नावेचा उतार.
आतळणें–स्पर्शणें.
आतिथ्य–पाहुणचार.
आतुडणें–समजणें, सांपडणें.
आतुर–१ मरणोन्मुख. २ उत्सुक.
आतुर्बळी–अतिबळी, बळकट.
आत्त–गृहीत, घेतलेला.
आत्मचर्चा–आत्म्याविषयीं विचार.
आत्मजा–मुलगी, कन्या.
आत्मविद्या–आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान.
आत्महत्या–१ आपला आपण जीव घेणें. २ आपण आपणास न जाणणें.
आत्मज्ञानी–आत्मा म्हणजे ब्रह्म तें जाणणारा.
आथी–आहे.
आदर–सत्कार.
आदर्श–आरसा.
आदळणें–पावणें.
आदिठाणें–मूळपीठ.
आदिशक्ति–मूळशक्ति.
आधि–मनाची व्यथा, दुःख.
आन–अन्य भिन्न, दुसरें.
आनकदुंदुभि–वसुदेव.
आनौतें–अलीकडे.
आपगा–नदी.
आपंगिता–सांभळणारा.
आपद–दुःख, विपत्ति.
आपन्ना–दुःखी.
आपपर–स्वकीयपरकीय.
आपैसा–आपोआप.
आप्त–१ संबंधी. २ सत्यवक्ता.
आभास–कांहींसा भास, भ्रांति.
आमय–रोग.
आमलक–आंवळा.
आमा–स्तन.
आमुष्मिक–परलोकसंबंधी.
आम्नाय–वेद.
आयती–दीर्घ, विस्तीर्ण.
आयस–लोखंड.
आराणुक–१ वेळ, फुरसत. २ शांति, सुख.
आरामत्राटी–बाग.
आरुष–१ आर्ष, छांदिष्ट. २ असमंजस. ३ असंबद्ध.
आरूढ–वर चढलेला.

आरोह–कमर, नितंब.
आर्जव–सरळपणा.
आर्त–१ दुःखसूचक. २ पीडित.
आर्त / आर्ती }–आवड.
आर्या–१ सभ्य स्त्री. २ वृत्तविशेष.
आलवाल–आळें.
आलाप–१ भाषण. २ गाण्यांतला आलाफ.
आलापणें–१ बोलणें. २ गाणें.
आलाबु–भोंपळा. 'अलाबु' पहा.
आली–१ सखी. २ पंक्ति.
आव–१ धैर्य. २ डौल.
आवरण–१ कुंपण. २ आच्छादन, संयमन.
आवांका–धैर्य.
आवास–१ राहणें. २ राहण्याची जागा.
आवृत्त–वेष्टित.
आव्हा–नाम.
आव्हाटें–१ पसारा. २ आडमार्गानें.
आव्हेरणें–टाकणें.
आश–आशा.
आशय–मनोरथ, अभिप्राय.
आशा–१ दिशा. २ इच्छा.
आशी–आशीर्वाद.
आसुद–अशुद्ध, रक्त.
आस्य–तोंड, मुख.
आहव–युद्ध.
आहाळणें–१ पोळणें. २ खळबळणें.
आहे–ज्वाळा.
आळ (ळी)–लळा, हट्ट.
आळविणें–कळवळा उत्पन्न करणें.

## इ.

इंगित–लक्षण, अभिप्राय.
इजारा–मक्ता.
इठाण–स्थान.
इंदिरा–लक्ष्मी.
इंदीवर–कमळ.
इंदु–चंद्र.
इंद्रजाल–गारुड.
इंद्रियग्राम–इंद्रियसमुदाय.
इभ–हत्ती.
इभी–हत्तीण.
इषु–बाण.
इसाळ–ब्रह्मराक्षस.
इक्षु–ऊंस.

## ई.

ईशान–शंकर.

## उ.

उक्त–१ बोललेलें. २ भाषण.
उखेडी–हलकेपणा.
उगला–उगाच, निमूटपणें.
उगवून–उलगडून.
उगाणा–उलगडा, झाडा, गणना.
उचंबळणें–भरून सांडणें.
उचित–योग्य.
उच्चैःश्रवा–इंद्राचा घोडा.
उजाळे–प्रकाश, शुभ्रता.
उटज–पर्णकुटी.
उठाउठी–सत्वर, लवकर.
उठाणें–१ उत्थान. २ तरंग.
उडु–नक्षत्र.
उडुप–चंद्र.
उत–अथवा.
उतटणें–१ भरणें. २ उलटणें.
उतणें–माजणें.
उत्कट–अतिशयित, मोठें.
उत्कर–पुंज, राशि.
उत्तमर्ण–सावकार.

उत्तमांग—मस्तक, डोकें.
उत्तरापति / उत्तरावर —अभिमन्यु.
उत्तराशेला—उत्तरदिशेला.
उत्तरीय—शेला, अंगवस्त्र.
उत्तीर्ण—ऋणमुक्त.
उत्पल—कमल.
उदग्र—१ उंच. २ ज्याचें अग्र वर आहे तो.
उदंड—पुष्कळ.
उदणें—१ उदय पावणें. २ उद्भवणें.
उदरंभर—पोट भरणारा.
उदश्रु—रडणारा.
उद्देशें—हेतूनें, कारणानें.
उद्धत—मस्त.
उद्धार—१ मुक्ति. २ वर काढणें.
उद्भट—मोठा.
उद्यम—उद्योग.
उद्योग—प्रकाश.
उद्विग्न—उतावीळ, विव्हल.
उद्वेग—मनाची अस्वस्थता.
उन्मन—विरक्त.
उन्मूलन—उपटणें.
उपकरण—साहित्य.
उपचार—आदर.
उपतिणें—१ मिळणें. २ उत्पन्न होणें.
उपरति—वैराग्य.
उपरम—१ शांति. २ सुख.
उपराग—ग्रहण.
उपरि—१ मस्तकावर. २ वर.
उपाधि—पदार्थाच्या स्वरूपांत भेद करणारा किंवा भासविणारा अन्य पदार्थ किंवा त्याचा संबंध.
उपानह—चर्मी जोडा, पैजार.
उपायन—भेट, नजराणा.
उपायांतर—अन्य उपाय.
उपाव—उपाय.
उपासना—सेवा.
उपास्ति—उपासना.
उपेखणें—निस्तेज होणें.
उपेगा—उपयोगाला.
उफळतां—उडतां.
उफाळणें—उद्भवणें.
उबगणें—१ उपेक्षणें. २ त्रासणें, कंटाळणें.
उभविणें—उभारणें.
उभारून—उचलून.
उभासे—दिसे.
उभेठाति—उभे राहती.
उमगून—शोधून.
उमस—दम, विसांवा.
उमाणें—मोजणें.
उमासा—उसासा.
उमाळा—उद्भव, हुंदका, लोट.
उमोप—पुष्कळ.
उरग—सर्प.
उरण—मेंढा.
उरी—अवशिष्ट, बाकी.
उर्मिका—आंगठी.
उर्वरित—बाकी राहिलेलें.
उर्वी—पृथ्वी.
उलूक—घुबड.
उल्हाटी—उलटी.
उसंत—विश्रांति.
उससणें—स्वप्नांत बरळणें.

## ऊ.

ऊन—उणें, कमी.
ऊर्ध्वरेता—ब्रह्मचारी.
ऊर्मिला—लक्ष्मणाची बायको.
ऊर्मी—उकळी, गर्व.
ऊर्वरित—उरलेलें, शेष.

ऋ.

ऋत्विक्–यज्ञक्रियेस साह्य करणारा.

ए.

एकनिष्ठ–अनन्य, ईश्वरपरायण.

एकसरें–१ एकदम. २ एकच मोठा लांब.

एणांक–हरिणाचें चिन्ह ज्याला आहे असा (चंद्र).

एणी–हरिणी.

एन, एनस्–पातक.

ऐ.

ऐना–आरसा.

ओ.

ओक–घर, स्थान.

ओखटा–वाईट.

ओगरणें–वाढणें.

ओगरू–वाढणारा.

ओढवणें–पुढें करणें.

ओतु–बोका,

ओपणें–१ देणें. २ विकणें. ३ स्वाधीन करणें.

ओसंग–मांडी.

ओसंडोन–सांडून.

ओसर–एकीकडे हो.

औ.

और्व–वडवानल.

क.

कई–कधीं.

कच–१केश. २ बृहस्पतीचा मुलगा.

कंज–कमल.

कज्जल–काजळ.

कट–हत्तीचें गंडस्थळ.

कटक–१ सैन्य. २ केंड. ३ कडा.

कटकटा–हाय हाय.

कटायी–कढई.

कटाक्ष–दृष्टिपात.

कटाक्षप्रेक्षण-नेत्राच्या प्रांतभागानें सप्रेम पाहणें.

कंठणें–दुःखानें घालविणें.

कडगें–वांकी, भूषणें.

कडवा-वी-वें–क्रूर.

कडसणी–विचार.

कडे–एकीकडे.

कढेंत–कढईत.

कण–रज, खडा.

कणव (वा)–दया.

कणवाळपणें–कृपाळूपणानें.

कणिका–कणी.

कतक–निवळीचें बीं.

कतबा–खत.

कंथा–गोधडी.

कथालाप–वर्णन.

कथिका–कढी.

कदन–१ युद्ध. २ मारणें.

कदंब–१ कळंबाचें झाड. २ समूह.

कदम–पाऊल.

कदर्थले–अवमानिले.

कंदर्प–मदन.

कदर्यु–कृपण.

कदली–केळ.

कंदुक–चेंडू.

कनकबीज–धोतऱ्याचें बीं.

कनकलतिका–सुवर्णाची वेल.

कनवाळ–कृपाळू.

कपाट–१ दार. २ गुहा.

कपि (पी)–वानर.

कंपिततनु–ज्याच्या अंगाला. कंप सुटला आहे तो.

कपिध्वज—अर्जुन.
कबंध—मस्तकावांचून शरीर, धड.
कबरी, कबरीभार—वेणी.
कंबु—शंख.
कमचा—काठी.
कमनीय—सुंदर.
कमळा—लक्ष्मी.
कमळापति—विष्णु.
कर्यी—कधीं.
कर—१ हात. २ सोंड. ३ किरण. ४ खंडणी.
करकर—कटकट.
करंटा—कृपण, हतभाग्य.
करटी—गज, हत्ती.
करंडक—करंडा.
करणीचा—खोटा.
करपुष्कर—१ शुंडाग्र. २ हस्तकमल.
करबाडे—कडबा.
करवाल—तरवार.
करवीर—कण्हेर.
करा—मडकें.
कराळ—भयंकर.
करिता—गजत्व, हत्तीपणा.
करी—हत्ती.
करुण—१ करुणरस. २ दयार्द्र.
करुणांबुद—दयेचा मेघ.
कर्णिका—कमलांतील गड्डा.
कलंकी—लांछनयुक्त.
कलगी—मोत्यांचा अथवा जडावाचा पागोट्यांत खोंचण्याचा डागिना.
कलत्र—स्त्री, बायको.
कलभ—हत्तीचा छावा.
कलभंड—भांडखोर.
कलशजनित, कलशसंभव, कलशोद्भव—अगस्ति मुनि.
कलाप—१ मयूरपिच्छ. २ समुदाय.
कलि—१ कज्जा. २ कलियुग. ३ दुष्ट.
कलिका—कळी.
कलिल, कलुषित—गढूळ.
कलेवर—शरीर.
कल्पांत—जगत्प्रलय ; ब्रह्मदेवाचा एक दिवस आणि एक रात्र. हा काळ मनुष्याच्या ४,३२,००,००,००० वर्षांचा होय.
कल्लोळ—मोठी लाट.
कल्हार—कमळ.
कल्होळ—लाटा.
कवइता—कवनकर्ता, कवि.
कवच—चिलखत.
कवडा—एक पक्षी ( अशुभसूचक ).
कवळ—घास.
कवळणें—आलिंगणें.
कवि—१ शुक्राचार्य. २ ज्ञाता.
कविजा—शुक्रकन्या, देवयानी.
कशा—चाबूक.
कशी—कांचणी.
कश्यप—सप्त ऋषींपैकीं एक ऋषि.
कसणें—१ बांधणें. २ कसोटीस लावणें.
कळकळविणें—दुःख देणें.
कळणा—भरडलेल्या डाळीचा चुरा.
कळानिधि—चंद्र.
कळी—‘ कलि ’ पहा.
कक्ष—तृण.
काई—काया.
काईसेने—कशानेंही.
काग—कावळा.
काचा—कच्चा.

काचावणें–कचरणें.
काज–कार्य.
काजरा–कुचल्याचें झाड.
काजळी–१ जंग. २ डाग.
कांजी–पेज.
काटला–मळला.
कांड–ब्रह्मांड.
कांत–१ पति. २ सुंदर.
कातर–भितरा.
कांता–बायको, सुंदरी.
कातिया–शस्त्र.
कानकोंडें–चोरट.
कानन–अरण्य.
कापडी–यात्रेकरू.
काम–१ इच्छा. २ मदन.
कामद–इच्छा पुरविणारा.
कामारि–१ शंकर. २ चाकर
कामित–इच्छिलेलें.
काय–शरीर.
कारा–बंदिशाळा, तुरुंग.
कार्पास–कापूस.
कार्यवाद–कामापुरतें गोड बोलणारा.
कार्याकारण–१ कारणपरत्वें. २ जितक्यास तितकें.
काला–रक्तमांसाचें मिश्रण.
कालाहि–काळसर्प.
कालिंदी–कलिंद पर्वतांतून निघालेली नदी, यमुना.
कालीय–एक सर्प.
काव्य–शुक्राचार्य.
काश्यप–कण्व ऋषि.
कांस–१ कांसोटा. २ आश्रय.
कासयाची–कशाची.
कासर–महिष, रेडा.
कासार–सरोवर.
कासाविस–दुःखित.
काळकूट–विष.
काळवखें–काळोख.
काळसर्प–काळिया सर्प.
किंकरी–दासी.
किंच–आणखी.
किण–घट्टा.
कितव–१ दुष्ट, कपटी, ठक. २ द्यूतकार.
किनखाप–जरीच्या वेलबुट्टीचें रेशमी कापड.
किरात–कोळी, पारधी.
किरी–डुकर.
किरीट–मुकुट.
किरीटी–अर्जुन.
किशोर–मूल.
किष्किंधा–सुग्रीवाची नगरी.
कीर–१ रावा. २ निश्चयें.
कीरवाणी–१ शुकवाणी. २ खरोखर.
कीर्तिला–वर्णिला.
कीलवाणी–केविलवाणा.
कीला–अग्निज्वाला.
कीश–वानर.
कुचर–(मूग, हरभरे वगैरेचा) न भिजणारा, न शिजणारा दाणा.
कुचुंबणें–दुःख पावणें.
कुचैला–वाईट वस्त्र नेसलेली.
कुच्या–दुस्से, गुच्छे.
कुंजरु–गज.
कुटज–कुड्याचें झाड.
कुटिल–१ वांकडा. २ कपटी.
कुठार–कुऱ्हाड.
कुंडल–कर्णभूषण.
कुडी, कुडें –देह.

कुढावा–साह्यकर्ता.
कुंत–भाला.
कुंतल–केश.
कुत्सा–निंदा.
कुन्हा–आकस, चुरस.
कुंभिणी } –पृथ्वी.
कुंभिनी }
कुंभिनीपाळ–पृथ्वीपति, राजा.
कुंभीपाक–एक नरक आहे; येथें पातक्यास मडक्यांत घालून शिजवितात.
कुमुद–कमळ.
कुमुदिनी–चंद्रविकासी कमलाची वेल.
कुरंग–हरिण.
कुरवंडणें–ओंवाळणें.
कुरुकुल–कौरववंश.
कुरुगुरु–द्रोणाचार्य.
कुलगिरि–भारतवर्षांतील मुख्य ७ पर्वत, त्यांचीं नांवें–महेंद्र, मलय, सह्य, शक्तिमान्. गंधमादन, विंध्य व पारियात्र.
कुलज–कुलीन.
कुलपति–कुलपुरुष, कुळांतील मुख्य.
कुलाल–कुंभार.
कुलिशपाणि–ज्याच्या हातांत वज्र आहे असा (इंद्र).
कुलिश–वज्र.
कुवलय–१ चंद्रविकासी कमळ. २ भूमंडळ.
कुश–दर्भाची एक जात.
कुशली–खुशाल.
कुशस्थली–द्वारकापुरी.
कुश्चल (ळ)–कुत्सित.
कुश्चीळ–दुर्गंधी, घाणेरडा.
कुसरी–चतुराई.
कुसुमचाप–मदन.
कुहू–अमावास्या.
कुक्षि–कूस.
कूजणें–गाणें, शब्द करणें.
कूट–१ पश्चात् निंदा. २ खोटें. ३ शिखर.
कूप–आड.
कूपरे–कोंपर.
कृतांतभगिनी–यमाची वहीण, यमुना नदी.
कृतार्थ–धन्य.
कृत्तिवासा–१ कातड धारण करणारा. २ शिव.
कृत्या–पिशाची.
कृप (कृपाचार्य)–द्रोणाच्या बायकोचा भाऊ.
कृशान–अग्नि.
कृशोदरी–सिंहकटी स्त्री.
कृषिक–शेतकरी, शेतकी.
कृष्ण–अर्जुन.
कृष्णा–१ द्रौपदी. २ यमुना.
कें–काय.
केउती–कोणती.
केउतीं–कशीं.
केउतें–कशाचें.
केका–मोराचा शब्द.
केकी–मोर.
केंडणें–तुच्छ मानणें.
केणें–व्यापाराचा माल.
केतु–ध्वज.
केली–क्रीडा.
केवाळु–बारीक वाळु.
कोंवि–कसें.
केविलवाणें–दीनवाणें.
केसर–कमळतंतु, केशर.
केसरी–सिंह.
कैं–केव्हां.
कैटभारी–कैटभ राक्षसाचा शत्रु (विष्णु).
कैरविणी–चंद्रविकासी कमळाची वेल.

कैवर्तक–धीवर, कोळी.
कैवल्य–मोक्ष.
कैवल्यदानी–मोक्षदाता.
कोटिगा–कोडगा.
कोड–कौतुक, हौस.
कोडी ( ढी )–कोटी.
कोंदाटणें–दाटणें, भरणें.
कोपी–झोंपडी.
कोंब / कोंभ –अंकुर, मोड.
कोमेला–निस्तेज झाला.
कोयाळ–कोकिळ.
कोष्ठ–उदर.
कौपीन–लंगोटी.
कौल–देवाचा प्रसाद.
कौलिक–मांत्रिक.
कौशिक–विश्वामित्र.
कौसुंभ–कुसुंबाचा.
कौस्तुभ–विष्णूच्या गळ्यांतील रत्नविशेष.
क्रतु–यज्ञ.
क्रोड–डुकर.
क्रोष्टा–कोल्हा.

## ख.

ख–आकाश.
खग–पक्षी.
खगगमन–पक्षावर बसून जाणारा (गरुडवाहन विष्णु).
खंगणें–कृश होणें.
खगेंद्र–गरुड.
खचरी–राक्षसी.
खंजन–ताजवा पक्षी.
खटनट–ओंगळ, लुच्चा.
खडतर–फार उग्र.
खडतरणें–आदळणें, खोंचणें.
खंडज्ञान–अल्पज्ञान.
खत–पत्र.
खंत / खंती –खेद, काळजीनें झुरणें.
खद्योत–काजवा.
खनि–खाण.
खबंद–फोड वगैरे होऊन क्षत पडतें तें.
खंबाइत–उंची वस्त्र.
खंबाळें–खंबायती वस्त्र.
खर–१ तीक्ष्ण. २ गाढव. ३ एक राक्षस.
खल्वाट–टकल्या.
खांचना–तुच्छ.
खाजुगें / खाजें –खाद्य, खाऊ.
खांड–एका प्रकारची तरवार; 'खांडा' पहा.
खांडणें–तोडणें.
खांडा–एक प्रकारची तरवार ; हिचें पातें रुंद असून हिला दोहोंकडे धार असते.
खाडाणें–लाथाळ.
खांडियाची–शस्त्राची.
खाणी–खाण. जारज अंडज, स्वेदज आणि उद्भिज्ज अशा चार खाणी आहेत.
खासदार–मोतद्दार.
खुर्द–लहान, अल्प.
खेटक–ढाल.
खेडकुळी–पाण्याचा पाट, कालवा.
खेव / खेवो –आलिंगन.
खोप–टोल, गुहा.

## ग.

गगनग–आकाशसंचारी ( देव ).
गगनवाणी–आकाशवाणी.
गजगमा–हत्ती सारखी (हळू) चालणारी स्त्री.

गजपूर—हस्तिनापूर.
गजबज—गडबड.
गजहंता—सिंह.
गंड—१ अनिष्ट, संकट. २ गंडस्थल. ३ गाल.
गणप—गणपति.
गणिका—वेश्या.
गतवयस्क—म्हातारा, वृद्ध.
गदारोळी—मोठ्यानें.
गदीन } —गदायुद्धांत निष्णात.
गदीश }
गभस्ति—सूर्य.
गभीर—गंभीर, खोल.
गमणें—काळ सुखानें जाणें.
गर—विष.
गरगल—विषकंठ ( शिव ).
गरल—विष.
गरिबनवाज—दीनरक्षक.
गरिमा—मोठेपणा.
गरी—श्रेष्ठ.
गरुद्रथ—गरुडपक्षी.
गलीम—लुटारू.
गल्ल—गाल.
गवसणी—आच्छादन, आवरण.
गवादि—धर्मपोई, अन्नसत्र.
गवाक्ष—धारें, झरोका.
गव्हर—१ गुहा. २ गुह्य, मर्म, तत्त्व.
गहन—१ अरण्य. २ खोल.
गळदंड—हत्तीच्या मानेवरून रिकिबीप्रमाणें चढण्यासाठीं सोडलेली दोरी, किलावा.
गांग—गंगेचें.
गांगेय—गंगेचा पुत्र ( भीष्म ).
गांजणें—छळणें.
गाजी—शूर.
गांठीचें—पदरचें.
गांडीव—अर्जुनाचें धनुष्य.
गाढ—दृढ.
गाढें—दुर्बल.
गात्र—शरीर.
गांधार—दुर्योधन.
गांधर्व—१ स्त्रीपुरुषांचा परस्पर प्रीतीनें विवाह. २ गंधर्वांचें.
गाधिज—विश्वामित्र.
गाबाळ—निरुपयोगी, फुटकळ ग्रंथ.
गाभिणी—सगर्भा, गाभण.
गायन—१ गाणें. २ गाणारा.
गाली—शिव्या.
गांव—योजन, चार कोस.
गांवथा—गांवढळ, अडाणी.
गांवलगणी—संजयाचें दुसरें नांव.
गाळितिया—गाळण्याचें वस्त्रांत.
गिरा—वाणी, वाक्य.
गिरिधर—गोवर्धनपर्वत धारण करणारा (कृष्ण).
गिरीश—सदाशिव.
गिवसणें—मिळविणें, सांपडणें.
गी—१ वाणी. २ सरस्वती.
गीर्वाण—१ देव. २ संस्कृत भाषा.
गीष्पति—बृहस्पति.
गुज—गुह्य.
गुंजारव—गुंगुं असा ( भुंग्याचा ) शब्द.
गुडाकेश—निद्रा ज्याच्या स्वाधीन आहे असा ( अर्जुन ).
गुंढून—गुंडाळून.
गुण—दोरी.
गुणगुणणें—हळूहळू पुटपुटणें.
गुंता—अडचण.
गुरळा—गुळणा.
गुरु—१ बाप. २ वडील. ३ उपदेष्टा. ४ जड. ५ मोठा.

गुर्वी–श्रेष्ठ.
गुह–कार्तिकस्वामी.
गूज–१ गुह्य, अनिवेद्य; ' गुज ' पहा.
गृध्र–गिधाड.
गृहसमार्जन–घरांतील सडासारवण.
गेह–घर.
गै ( गय )–हयगय.
गोट–तळ.
गोठण–गोठा.
गोठी–गोष्ट.
गोत्र–१ पर्वत. २ वंश.
गोधन–गाईचा समुदाय.
गोपायिता–रक्षणकर्ता.
गोपुर–१ शहरचा दरवाजा. २ शहरच्या किंवा देवळाच्या किंवा राजवाड्याच्या दरवाजावर बांधलेली उंच इमारत.
गोप्ता–रक्षण करणारा.
गोमटें–सुंदर, चांगलें, प्रिय.
गोरटी–गोमटी.
गोरोचन–गाईच्या डोक्यांतलें पिवळें द्रव्य.
गोवा } –गुंता.
गोवी }
गोहि–साक्ष.
गोहो–नवरा.
गौरविता–शोभविणारा.
ग्रामहरी–( गांवांतील सिंह ) कुत्रा.
ग्रास–घास.
ग्राहिक–गिऱ्हाईक.
ग्रीवा–मान, गळा.
ग्लह–पण, डाव.
ग्वाही–साक्षी.

घ.

घटना–घडवून आणण्याची तजवीज, योजना.
घटा–हत्ती किंवा मेघ यांचा समुदाय.
घडा (डी)–१ घागर. २ घटका. ३ मोड. ४ जम.
घन–मेघ, ढग.
घरघेणा–घरबुडव्या.
घरटा–स्थान.
घनदाट–गच्च भरलेला.
घनरस–१ कापूर. २ उदक.
घनसार–१ चंदन. २ कापूर.
घाटौल–कलिका.
घापे–पोंहचे.
घामेजेना–श्रांत होईना.
घायेवारा–तडाका.
घावण–पावणें.
घास–गवत.
घूर्णिका–दासी.
घृत–तूप.
घेयिजेना–घेईना.
घोटक–घोडा.
घोटी–गिळी.
घोष–१ शब्द. २ गोठा. ३ गौळवाडा.
घोसुलें–घोंस.
घ्राण–नाक.

च.

चकित–भ्यालेला.
चकोर–पक्षिविशेष ; हा चंद्रकिरणांवर उपजीवन करतो अशी प्रसिद्धि आहे.
चक्र–चक्रवाक पक्षी.
चक्रवर्ती–सार्वभौमराजा.
चक्रवाल–मंडल, वर्तुल.
चक्रव्यूह–सैन्याची चक्राकार रचना.
चखोट–चांगला.
चंचू–चोंच.
चटक–चिमणी.
चंड–मोठा.

चंडांशु—सूर्य.
चणक—हरभरे.
चतुरानन—ब्रह्मदेव.
चतुर्दश—चौदा.
चतुःशत—चारशें.
चतुःषष्टि—चौसष्ट.
चंद्रमौळी—महादेव.
चंद्रशाळा—सर्वांहून उंच माडी.
चपला—वीज.
चपेटा—नाश, फस्त.
चपेटे—वेग.
चमू—सैन्य.
चरम—शेवटला.
चराचर—स्थावरजंगम सृष्टि.
चर्म—१ ढाल. २ कातडें.
चवडा—१ रुंद. २ गंडस्थळ.
चवर—चवरी.
चवी—बऱ्यावाईटाची परीक्षा, गोडी.
चषक—पानपात्र.
चळथ—रास, चवड.
चाकाटणें—थक्क, चकित होणें.
चांग—चांगला.
चांगुणा—श्रियाळराजाची स्त्री.
चाचरणें—अडखळणें.
चांचूवरी—चोंचेंत.
चाड—आवड.
चाप—धनुष्य.
चामर—चवरी.
चामीकर—सुवर्ण, सोनें.
चार—१ जासूद. २ चेष्टा.
चारदेह—१ स्थूलदेह. २ सूक्ष्मदेह. ३ कारणदेह. ४ महाकारणदेह.
चारु—सुंदर.
चावळणें—बडबडणें.
चाळूं—हालवूं.
चिकित्सा—१ रोगाची परीक्षा. २ औषधाची योजना.
चित्—ज्ञान.
चित्तचतुष्टय—मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार या चारांचा समुदाय.
चित्राश्व—सत्यवान्.
चीर—वस्त्र.
चुकूर—चकित.
चूडामणी—शिरोरत्न.
चेइरे—जागृति.
चेटकें—चेटूक.
चेतना—जीवित्व, चलनवलन.
चेतवे—खवळे.
चेल—वस्त्र.
चेववी / चेष्टवी } —सचेतन करी, जीववी.
चैतन्य—आत्मस्वरूप.
चैल—‘ चेल ’ पहा.
चोख—चांगला.
चोखाळपण—चोखपण.
चोखाळिल्या—शुद्ध केल्या.
चोज—कौतुक.
चोजवविली—चोळली, माखिली.
चोहट—चव्हाटा.
चौगुणीनें—चौपटीनें.
चौढाळ—जातिधर्मविरहित आचरण करणारा.
चौधरी—पाटलाचा हस्तक एक अधिकारी, सरदेशमुख, चौगुला.
चौसांचा—चार वेद आणि सहा शास्त्रें यांचा.

छ.

छंद—१ वृत्त. २ नाद, चट.
छद्म—कपट.

छळ–गांजणूक.
छात्र–शिष्य.
छायानायक–सूर्य.
छावा–हत्तीचा बालक.

### ज.

जईं–जेंव्हां
जगढाळ–ध्वज, झेंडा.
जंगम–मनुष्य, पशुपक्षी इत्यादि.
जघन्य–नीच, कनिष्ठ.
जंघाळ–१ उंच. २ वेगवान्.
जंघी–१ जंघावंत. २ त्वरितगति.
जटी–जटायुक्त, तपस्वी.
जठर–पोट.
जडभारी–संकट.
जथिलें–जमविलें, सांचविलें.
जधीं–जेंव्हां.
जनक–१ बाप. २ एक राजा.
जनकतनया–सीता.
जनपद–देश.
जनिता–बाप.
जनु–जन्म.
जन्मदा–आई.
जन्हुकन्या–भागीरथी.
जंबीर–ईडलिंबू.
जंबू–जांबूळ.
जयंती–जिंकणारी.
जरा–म्हातारपण.
जर्जरित–१ (म्हातारपणानें) थकलेला. २ जुना, फाटका.
जलचर–मत्स्य वगैरे पाण्यांतील प्राणी.
जलाशय–सरोवर, तळें, डोह.
जल्पना–बडबड.
जव–वेग.
जवन–वेगवान्.
जाइजणें–नाशवंत.
जीकळणें–पोळणें.
जागवलें–समजलें.
जागीर–जहागीर.
जाजावती–बोलती, बडबडती.
जाण–जाणणार.
जाणीव–ज्ञान, आत्मज्ञान.
जाति–जाईची वेल.
जानु–गुडघा.
जान्हवी–भागीरथी.
जाया–बायको.
जाल–समुदाय.
जावळे–आवळे जावळे.
जिणावें–जिंकावें.
जिणें–वांचणें, जीवन.
जितावें–जिंकावें.
जितेंद्रिय–ज्यांनीं इंद्रियांचें दमन केलें ते.
जिव्हार–मर्मस्थान.
जिष्णु–१ इंद्र. २ विष्णु. ३ अर्जुन. ४ जयशील.
जीणणें–जिंकणें.
जीन–१ जीर्ण. २ म्हातारा.
जीमूत–मेघ.
जीव–१ प्राण. २ बृहस्पति.
जीवखाणी–जीवयोनि.
जीवन–१ वांचणें. २ पाणी.
जीवीं–मनीं.
जेधवां–जेंव्हां.
जेविं (जेवीं)–१ जसें. २ जेंव्हां.
जैं (जईं)–जेंव्हां.
जोगी–गोसावी.
जोपा–पालन, रक्षण, जतन.
जोहर–अग्नि.

जोहारी—रत्नपारखी.
जौंजार—त्रास, कंटाळा.
ज्या—धनुष्याची दोरी.
ज्येष्ठ—वडील, मोठा.
ज्योतिर्विद-ज्योतिषी.
ज्योत्स्ना—चांदणें.
ज्वलन—अग्नि.

### झ.

झकविणें—फसविणें.
झटिति—लवकर, लागलेंच.
झडपणी—निरसन.
झणी—१ सत्वर. २ एकाएकीं. ३ न जाणों, कदाचित्.
झष—मासा.
झळंबणें—चिकटणें.
झांकोळणें—व्यापणें.
झाडा—१ झडती. २ निरास.
झुंजार—योद्धा.
झेला—झुबका.
झोटधरणी—केशधरणी.
झोटी—डोईचे लांब केश.
झोड—दांडगा, निलाजरा.

### ट.

टकमक—१ चकितपणा. २ चकितपणानें.
टकळा—छंद, ध्यास.
टाकाटाकी—त्वरेनें.
टांचर—टांच.
टाहो—सतत ओरडणें.
टोणपा—१ लाकडाचा ठोकळा. २ मूर्ख.
टोप—मुकुट.

### ठ.

ठक—दिङ्मूढता.
ठसावे—ठसे.
ठाणमाण—शरिराचा बांधा.
ठाय—ठिकाण, स्थान.
ठायीं पाडी—थांग लावी.
ठाव—स्थान, ठिकाण.
ठेला—१ राहिला. २ उभा राहिला. ३ कुंठित झाला.
ठेवी—ठेव.
ठोंबरा—बुकांदा, ठोसा.

### ड.

डगमगणें—घाबरा होणें.
डाई—डाव, सरसी, वर्चस्व.
डांगें—झाडी.
डोंगा—वांकडा, वक्र.
डौर—झगा.
डौरला—झांकला.

### ढ.

ढका—धक्का.
ढक्का—डमरु.
ढाळ—उतार.
ढाळणें—१ ओतणें, टाकणें. २ वारणें, हालविणें.
ढालु—डौल.

### त.

तई—तेव्हां.
तगटणें—झटणें.
तटाक—तळें.
तडकणें—पडणें, फुटणें.
तडाग—तळें.
तडीतापडी—गोसावी, बैरागी.
तति—समुदाय.
तंतू—१ सूत्र. २ वात.

तत्वतां–खरेपणानें, निश्चयानें.
तथ्य–खरें.
तंद्रा–आलस.
तधीं–तेव्हां.
तनकुट–गवत.
तप–ग्रीष्मऋतु.
तपन–सूर्य.
तपस्या–तपश्चर्या.
तम–अंधकार.
तमोहर–सूर्य.
तरंगिणी–नदी.
तरंडक–नौका.
तरणि–१ सूर्य. २ नौका.
तराजें–तागडीनें.
तरी–नौका.
तर्जन–भर्त्सन, निंदा, जाच, धिक्कारून बोलणें.
तर्णक–वत्स, वासरूं.
तवक–क्रोध, उकळी, आवेश.
तहशील–वसूलपट्टी.
तळपट–सत्यानास.
तळपणें–चमकणें.
तळवट–खालचा प्रदेश.
तक्षक–सर्पविशेष.
तांडव–नृत्यविशेष.
तांतडी–त्वरेनें.
तादात्म्य–ऐक्य.
तापसी–१ ऋषिपत्नी. २ विचारी.
तामरस–कमळ.
तामरसाक्ष–कमलासारखे डोळे ज्याचे तो.
तार–उंच ( स्वर ).
ताराधीश–चंद्र.
तारुवें, तारूं –नौका, जहाज.
तावी–संतप्त करी.
तितिक्षा–क्षमा, शांति.
तिमाणें–पाखरांनीं शेत खाऊं नये म्हणून केलेलें बुजगावणें.
तिमिर–अंधकार.
तिवाशी–१ तक्या. २ गिरदी. ३ गादी.
तुकणें–बरोबरी करणें.
तुकविणें–हालविणें.
तुकीं–१ पारड्यांत. २ कसोटीस.
तुंग–उंच.
तुझेनी–तुझ्यानें.
तुंड–तोंड.
तुंबळ–अतिशयित, फार.
तुंबळे–दाटे, भरे.
तुमुल–तुंबळ, निकराचें.
तुरगी–घोडी.
तुरंबणें–हुंगणें.
तुरंबी–मंजिऱ्या.
तुला–साम्य.
तुळी–हालवी.
तूण, तूणीर –भाता.
तूर्ण–लौकर.
तूर्य–वाद्य.
तूळ–कापुस.
तेजाळ–तेजस्वी.
तेजी–घोडा.
तेजोनिधी–सूर्य.
तेविं, तेवीं –१ तसें. २ तेव्हां.
तैं–तेव्हां.
तोक–बाळक.
तोख–संतोष.
तोडर–तोरडी, पादभूषण.
तोबा–अरेरे, अहाहा.

तोय—पाणी.
तोरा—झोंक, डौल, नखरा.
तोष—संतोष.
त्रपाकंचुक—लज्जारूप, चिलखत.
त्राण—रक्षण.
त्राहाटिल्या—१ सिद्ध केल्या. २ वाजविल्या.
त्रिगुण—सत्व, रज, आणि तम हे तीन गुण.
त्रितय—तीन पदार्थांचा समुदाय.
त्रिदश—देव.
त्रिपाद—अग्नि.
त्रिवाचा—( सत्य सत्य ), खरेंच, निश्चयानें.
त्रिशुद्धि—त्रिवार शुद्धि.
त्रुटि—क्षण.

## थ.

थडी—कड, तीर.
थाटी—समुदाय.
थान—स्तन.
थार—१ थारा, आश्रम. २ रुतून राहणें.
थिटें—लहान.
थिल्लर—पाण्याचें डबकें.
थीत—व्यर्थ.
थोडकें—थोडें.
थोरावे—वाढे.
थोरीव—मोठेपणा.

## द.

दचक—धाक.
दंडधर—यम.
दंडवत—सर्व अंगें जमिनीवर टेंकून नमस्कार.
दंती—हत्ती.
दंदशूक—सर्प.
दंदिया—योद्धा.
दनुज—दैत्य.
दंपती—मेहूण, नवराबायको.
दबा—हल्ला करण्याची तयारी.
दभ्र—अल्प.
दमयंती—१ गर्व हरण करणारी. २ नळस्त्री.
दमामा—मोठा नगारा.
दमुनी—नाश करून.
दयाळ—दयाळु.
दयित—प्रिय.
दर—१ शंख. २ भय. ३ थोडें.
दरिद्र—दरिद्री.
दर्वी—पळी.
दर्वीकर—सर्प.
दर्शनें—षड्दर्शनें, सहा शास्त्रें.
दव—१ दावानळ, वणवा. २ वन, अरण्य.
दवस्थ—वणव्यांत सांपडलेला.
दशकंधर—( दशकंठ ) रावण.
दशन—दांत.
दशशतमुखांग—( एकसहस्र तोंडें असलेला ) शेषाचा देह.
दशस्यंदन—दशरथ.
दशानन—रावण.
दंष्ट्रा—दाढ.
दस्र—अश्विनीकुमार.
दसोडी—दशी.
दळ ( ल )—१ सैन्य. २ पाकळी.
दळवाडें—१ जाडपणा. २ समुदाय.
दक्षिण—१ उजवा. २ दक्षिण दिशा.
दाटणी—निबिडता, दाटी.
दांतवलें—हस्तिदंताचें केलेलें भूषण.
दादला—नवरा.
दान्त—इंद्रियदमन करणारा.
दापी—दाबी, धमकावी
दाम—१ पुष्पमाला. २ दावें.
दामोदर—कृष्ण.

दाय–१ पितृधन. २ वाटा.
दारा–स्त्री. बायको.
दारु–काष्ठ.
दारुक–कृष्णाचा सारथी.
दारुण–क्रूर, कठीण, भयंकर.
दारेचुड–सुताच्या वांकी, कंगण्या वगैरे.
दाव–' दव ' पहा.
दावार्त–वणव्यानें पीडित.
दाक्षिण्य–औदार्य.
दिठी, दिठीवा –दृष्टि.
दिनमणि, दिनराज –सूर्य.
दिप्ति–प्रकाश, कांति, तेज.
दिव्य–१ स्वर्गांतील. २ सुंदर.
दिव्यरस–अमृत.
दुखंड–दुभंग.
दुग्धसार–तूप.
दुग्धोदधि–क्षीरसमुद्र.
दुणावे–दुप्पट होई.
दुधिया–पांढरा भोंपळा.
दुबळा–१ दरिद्री. २ अशक्त.
दुभणी–धार काढणें.
दुभे–प्रसवे.
दुराप–प्राप्त होण्यास कठीण.
दुरित–पातक.
दुरुक्ति–दुर्भाषण.
दुर्गत–दरिद्री.
दुर्गम–कठीण ; भयंकर ; टाळतां येणार नाहीं असे.
दुर्गा–पार्वती.
दुर्निवार–निवारण करण्यास अशक्य.
दुर्वह–धारण करण्यास अशक्य.
दुर्हृद–दुष्ट, वाईट अंतःकरणाचा.
दुलडी–गळ्यांतील दागिना.
दुष्कर–करावयास कठीण.
दुहणें–दूध काढणें.
दुहिता–१ कन्या. २ सून.
दून–दुःखित, तप्त.
दूरशी–रजस्वला.
देवगर्भ–देवतुल्य.
देवतटिनी–भागीरथी.
देवदत्त–अर्जुनाच्या शंखाचें नांव.
देवधाडी–अकस्मात आलेलें मोठें संकट.
देवनळ–बोरू.
देवर–दीर.
देवराज–इंद्र.
देवर्षि–नारद.
देवलसी–देवळांत राहणारा, साधु.
देवव्रत–भीष्म.
देवांगना–देवांच्या स्त्रिया.
देवाद्य–महादेव.
देवापगा–गंगा, भागीरथी.
देवी–१ देवांगना. २ राजाची पत्नी, राणी.
देवेंद्र–इंद्र.
देव्हारें–देवालय.
देशधडी–देशपार.
देशिक–गुरु.
देसवटा–स्थान, प्रदेश.
देहांतर–अन्य देह.
देहाभिमान–देहच मी अशी बुद्धि.
देहुडी–चौकी.
दैन्यवाणा–बापुडा.
दैवहत, दैवहतक –दुर्दैवी, करंटा.
दोंद निगणें–आनंद होणें.
द्युति–कांति.
द्युमणि–सूर्य.

द्रविण—पैसा.
द्रुति—सुवास, सुगंध.
द्रोणी—( द्रोणपुत्र ) अश्वत्थामा.
द्वंद्वयुद्ध—कुस्ती.
द्वंद्वें—सुखदुःखादि युग्में.
द्वारावती—द्वारका.
द्विज—१ दंत. २ ब्राह्मण. ३ पक्षी.
द्विजराज—चंद्र.
द्विजाति—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे.
द्विप—हत्ती.
द्वैत—भेदबुद्धि.
द्वैपायन—व्यास.

## ध.

धडफुडें (डी)—१कठोर, मर्मभेदक. २ एकदम.
धडाडीत—जळत.
धडौती—व्यवस्थित.
धणी—लाभ, तृप्ति, वैपुल्य.
धत्तूर—धोतरा.
धनंजय—१ अर्जुन. २ अग्नि.
धनद—कुबेर.
धन्व—धनुष्य.
धन्वी—धनुष्य धारण करणारा.
धमनी—१ फुंकणी. २ शीर.
धमिल्ल—केशसंभार.
धर—पर्वत.
धरणी—पृथ्वी.
धरमधका—कार्य न होतां व्यर्थ जे श्रम पडतात ते.
धरा—पृथ्वी.
धराधीश—राजा.
धरारमण—पृथ्वीपति, राजा.
धर्म—यमधर्म.
धर्षण—दांडगेपणा.
धव—नवरा.
धवलारें—घरें.
धवळणें—शुभ्र करणें.
धाटी—रीत, प्रकार.
धाता—ब्रह्मदेव.
धात्री—१ पृथ्वी. २ दायी.
धाम—१ घर. २ तेज.
धाय—१ तृप्त होय. २ रडण्याची आरोळी.
धारा—लहान.
धारें—१ कमी. २ धुराडें.
धाले—तृप्त झाले.
धावणें—पाठलाग करणारे लोक.
धावण्या—रक्षणासाठीं.
धिवसा, धिंसा—उत्कंठा, धैर्य, हव्यास.
धी—बुद्धि.
धुधुवाट—वेग.
धुमकुस—गर्दी.
धुर—अग्रभाग.
धूर्जटि—महादेव.
धृति—धैर्य.
धोपणें—तहानेनें किंवा आशेनें गळा सुकणें.
धौम्य—पांडवांचा उपाध्याय.

## न.

नई—नदी.
नक्र—सुसर.
नग—१ पर्वत. २ भूषण. ३ वृक्ष.
नटले—सिद्ध झाले.
नति—नमस्कार.
नंदन—मुलगा.
नंदिनी—कन्या, मुलगी.
नभोवाणी—आकाशवाणी.
नय—न्याय.

नर—१ मनुष्य. २ अर्जुन. ३ एक अति प्राचीन ऋषि.
नरसिंह, नरेंद्र—राजा.
नर्तक—नाचणारा.
नलद्—वाळा.
नव—१ नवीन. २ तरणा. ३ नऊ (संख्या).
नवनीत—लोणी.
नवलाव—नवल, चमत्कार.
नवाई—गोडी, कौतुक.
नवाजणें—वर्णणें.
नवाळी—कौतुक, गोडी.
नवोढा—नववधू, नवरी.
नव्हाळी—नावीन्य.
नहुष—ययातिराजाचा पिता.
नाक—स्वर्ग.
नाकर्षि—देवऋषि.
नाकेश—इंद्र.
नाग—हत्ती.
नागवण—हानि.
नागवण—मुकणें.
नाटकशाला—कलावंतीण.
नाट्य—नृत्य.
नाडा—मोटेचा वरचा दोर.
नातळणें—न स्पर्शणें.
नातुडणें—न प्राप्त होणें.
नाथिला—१ व्यापला. २ खोटा, जो नाहीं तो.
नायकवडी—सेनापति.
नाराच—बाण.
नावेक—अंमळ, क्षणभर.
नाहूत—न बोलावलेला.
नाहो—नवरा, पति.
नाळ—नळी.
निकर—१ समुदाय. २ कहर.
निकषनिसाण, निकषपाषाण—कसोटीचा दगड.
निकाश—सदृश.
निकें—खरें.
निखंदणें—झिटकारणें, धिसपिटावणें.
निगदणें—बोलणें.
निगम—वेद.
निगुती—निश्चयें.
निग्रह—१ निश्चय. २ अटकाव.
निजपद—आत्मपद.
निजबोध—आत्मज्ञान.
निटिल—कपाळ.
निटिलदेश—कपाळभाग.
निडळीं—कपाळीं.
निडारीं—दृष्टींत.
नितंबिनी—स्त्री.
निदाघ—उष्णता.
निदान—१ कारण. २ शेवट.
निदिध्यास—अखंड ध्यान.
निदेला—निद्रिस्त.
निधडा—धैर्याचा.
निधडें—अभेद्य.
निधान—ठेव, निक्षेप.
निधि—ठेवा.
निधोट—१ परिपूर्ण. २ एकरूप. ३ धीट.
निनद—शब्द, नाद.
निपट—केवळ.
निबर—घट्ट.
निंबलोण—दृष्ट काढण्याचें साधन.
निमग्न—बुडालेला, गढलेला, तत्पर.
निमाला—संपला.
निम्नगा—नदी.
नियति—दैव.

निरखणें—पहाणें.
निरंजन—१ निष्कलंक, निरुपाधिक. २ परमेश्वर.
निरपत्रप—निर्लज्ज.
निरय—नरक.
निरवणें—स्वाधीन करणें.
निरसतां—नष्ट होतां.
निरक्षर—अक्षरशून्य, मूर्ख.
निरुतें—स्पष्ट, पूर्ण.
निरुपचार—उपचारहीन.
निरें—शुद्ध, निखालस.
निरोध—अटकाव.
निरोपणें—सांगणें.
निर्जर—देव.
निर्दळणें—नाश करणें.
निर्धारी—निश्चय, खचीत.
निर्धूत—निःशेष.
निर्भर्त्सना—धिक्कार, निंदा.
निर्भर—पूर्ण.
निर्वाण—अंत, समाप्ति.
निर्वाणीं—संकटसमयीं.
निऱ्हां—अगदीं.
निलय—घर, स्थान.
निवटणें—१ प्रवीण होणें. २ टाकणें, नाश करणें.
निवाड—निर्णय, निकाल.
निवांत—स्तब्ध, स्वस्थचित्त.
निवास—स्थान.
निवृत्ति—मुक्ति.
निशाणीं घाव घालणें—जिंकणें.
निशीथ—मध्यरात्र.
निःशेष—निखालस, निस्संशय.
निष्क—पदक, अलंकार.
निष्कल—एकरूप.
निष्टंकें—निश्चयें.
निस्त्रप—निर्लज्ज.
निस्पृह—निरिच्छ.
निःसाराया—दूर कराया.
निःस्व—निर्धन.
नीर—पाणी.
नीरज—कमल.
नीलग्रीव—महादेव.
नुगवे—न कळे.
नुत—स्तुत, वाखाणलेला.
नुमजें—न समजे.
नुमसे—१ न विसंबे. २ न सांगे.
नुरे—न उरे.
नुसधी—नुस्ती, केवळ.
नूत—' नुत ' पहा.
नृपासन—राजाची गादी.
नेघे—न घेई.
नेटका—मनोहर.
नेणता—अजाण, लहान.
नेणीव—अज्ञान.
नेदितां—न देतां.
नैषध—नळराजा.
नोलांडवे—न उल्लंघवे.
नोहावी—न व्हावी.
न्यसीत—ठेवीत.

## प.

पंकेरुह—कमळ.
पंक्ति—१ ओळ. २ दहा.
पंक्तिकंधर—( दशकंधर ) रावण.
पंक्तिफट—दहा फणांचा.
पंगु—पांगळा.
पंघळणें—पसरणें.
पंचम—सप्तस्वरांपैकीं एक स्वर.
पंचवदन—शिव.
पंचानन—सिंह.

पंचाक्षरी–मांत्रिक.
पंचू–१ पक्षी. २ चुवा, पक्कडदार.
पंजर–पिंजरा.
पट–वस्त्र.
पटु–१ हुशार. २ निरोगी.
पडसाद–प्रतिध्वनि.
पडिभरू–सांगाती, सोबती.
पडियासणें–भासणें.
पढिये–आवडे.
पण्यांगना–गणिका, वेश्या.
पतग–पक्षी.
पतंग–१ सूर्य. २ पक्षी. ३ एक प्रकारच्या रंगाचें लाकूड.
पतन–१ शाप. २ पातित्य, नीचत्व.
पति–१ धनी. २ नवरा.
पतित–पापी.
पत्ररथ–पक्षी.
पथ–वाट.
पथ्य–हितकारक.
पद–स्थान.
पदातीत–जागेवरून दूर केलेला; काढलेला.
पद्म–कमळ.
पद्मभवांड–ब्रह्मांड.
पद्मयोनि–ब्रह्मदेव.
पद्मराग–एक प्रकारचें माणिक.
पद्मा–लक्ष्मी.
पद्मासन–१ ब्रह्मदेव. २ योगशास्त्रांत एक प्रकारचें आसन आहे.
पद्मिनी–कमलिनी.
पद्यावें–कवितारूपानें रचावें.
पनस–फणस.
पय–१ दूध. २ उदक.
पयोधर–१ स्तन. २ मेघ.
पयोधि–समुद्र.
पर–१ शत्रु. २ दुसरा. ३ उत्तम. ४ परंतु.
परती–पलीकडे.
परत्र–परलोक, परलोकीं.
परदार–परस्त्री.
परम–अत्यंत, फार.
परमेष्ठी–ब्रह्मदेव.
परवंटा–कंबरेभोंवतीं गुंडाळण्याचा पदर.
परस्व–परधन.
पराग–१ महापराध. २ पुष्पांतील रज.
परावा–१ परका. २ शत्रु.
परिकर–१ कमरपट्टा. २ प्रयत्न. ३ समूह.
परिखा–खंदक.
परिग्रह–१ घेणें, ग्रहण. २ संग्रह. ३ परिवार.
परिचर्या–सेवा.
परिजन–सेवक.
परिणामलें–परिणाम पावलें.
परिधान–वस्त्र.
परिधि–खळें.
परिमल–सुगंध.
परिरंभ–आलिंगन.
परिवर–प्रकार.
परिवार–बरोबर असणारीं माणसें.
परिवेष–खळें.
परी–प्रकार.
परेश–भगवान.
परेसी–वाणिविशेषास. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी अशा चार वाणी आहेत.
परोक्ष–दृष्टीच्या मागें.
परौतें–दूर ; वेगळें ; पलीकडे.
पर्णणें–वरणें, विवाह करणें.
पर्यंक–पलंग.
पर्याय उत्तर–भलतें उत्तर.
पऱ्हा–पलीकडे.
पल–मांस.

पलाल–पाचोळा, कोंडा.
पलाश–राक्षस.
पल्ली–गांव.
पवनज } –मारुती.
पवनतनय }
पवनारि–सर्प.
पवमान–वायु.
पवाड–स्तव, स्तुतिपर कविता.
पवि–वज्र.
पवे–पावे.
पव्हे–पाणपोई.
पशुप–१ गुराखी. २ शंकर.
पशुपति–सांब.
पश्यतोहर–पाहात असतां नेणारा, उचल्या, भामटा.
पहुडणें–१ निजणें. २ पावणें.
पक्ष–१ पंधरवडा. २ बाजू, तरफ.
पक्षती–पक्षमूळ.
पक्षिगमन–गरुडवाहन. 'खगगमन' पाहा.
पाक्षिपति–गरुड.
पाइकी–सेवा.
पाखर–आसरा, रक्षण.
पाखाळा–स्वच्छपणा.
पांग–अडचण, संकट.
पाचारणें–बोलावणें.
पांचाळ–एक देश ; लाहोर.
पाटव–चातुर्य.
पाटस्थळ–पाटाच्या पाण्यानें होणारें शेत वगैरे.
पाटा फुटणें–अज्ञान नाहींसें होणें.
पाटाव–रेशमी वस्त्र.
पाटीर–चंदनवृक्ष.
पाटोरी–पाट्या.
पांटोळा–पितांबर.
पाठारीं–पृष्ठभागीं.
पाड–१ मान, लेखा. २ सादृश्य.
पाडें–प्रमाणें.
पाणी–हात.
पातला–आला, पावला.
पाता–पालनकर्ता.
पातां–पाहतां.
पाती–पंक्ति.
पातेजूं–विश्वासूं.
पात्री–भांडें.
पादप–वृक्ष.
पाप्में–पातकें.
पामर–हलकट, यःकश्चित.
पायकी–चाकरी.
पायवणी–पादोदक.
पायस–खीर.
पायाळु–जन्मतांना पायांकडून जन्मलेला.
पायु–गुदस्थान.
पार–( प्रहर ) वेळ.
पारद–पारा.
पारिजात–कल्पवृक्ष.
पारिबर्ह–लवाजमा.
पारु–( पार ) अंत.
पारुषे–१ रुसे. २ दुखावे.
पार्श्व–बाजू.
पालऊ–पालव, पदर.
पालखीं–पाळण्यांत.
पालखती–मांडी.
पालाणणें–१ झांकणें. २ खोगीर घालणें.
पालानविणें–सज्ज करणें.
पाव–पाय.
पावक–अग्नि.
पावन–१ पवित्र. २ पवित्र करणारा.

पाशी—वरुण.
पांसु—धूळ, रज.
पाहुणेरु—पाहुणचार.
पाळ—कांठ.
पाळा—वेढा.
पाळांती—पाहातात.
पाक्षिक—१ संशयाचा. २ एकपक्षी.
पिक—कोकिल.
पिटणें—ताडणें.
पिंड—देह.
पितामह—१ बापाचा बाप, आजा. २ भीष्म.
पितृप—यम.
पिनाक—शंकराचें धनुष्य.
पिनाकी—शंकर.
पिपीलिका—मुंगी.
पिशित—मांस.
पिशुन—दुष्ट, चहाड.
पिष्ट—पीठ.
पिसाट—भूत, पिशाच.
पिसूण—दुष्ट, चहाड. 'पिशुन' पहा.
पीठ—स्थान, आसन.
पुंख—पिसारा.
पुंगव—श्रेष्ठ.
पुंज—रास.
पुजी—१ शोभवी. २ पूजा करी.
पुटामाजी—अग्निपुटांत.
पुंड—दंगेखोर, अधम.
पुढतापुढती—वारंवार, पुन्हापुन्हा.
पुढती—पुनरपि.
पुढां—पुढें.
पुढिल—अन्य, दुसरा, परकी.
पुंभूषण—पुरुषवेष.
पुरिजेना—पुरेना.
पुरुषव्याघ्र—पुरुषश्रेष्ठ.
पुरुषार्थ—धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्यां-पैकीं प्रत्येक.
पुरुहूत—इंद्र.
पुरोधा—उपाध्याय.
पुरोहित—उपाध्याय.
पुलिन—वाळवंट ( नदीचें ).
पुष्कर—१ कमल. २ शुंडाग्र.
पूर्ती—समाप्ति, परिपूर्णता.
पूर्वरेखा—पूर्वीचें कपाळीं लिहिलेलें.
पृतना—सेना.
पृथा—कुंती.
पृथुक—पोहे.
पें—पाशीं, कडे.
पेंचपाड—पेंचपाच.
पेटे—ओझीं.
पैं—१ निश्चयें, खचित. २ वाक्यपूरक अव्यय.
पैजार—खेटर, जोडा.
पैशुन्यवादी—उणें पाहणारा.
पैंसे—पैं असे.
पोटपोशा—पोटबाब, पुखानंद.
पोटळगें—पोटाशीं धरणें.
पोत—१ बालक. २ दिवटी. ३ नांव.
पोतास—भीमसेनी कापूर.
पोरवडा—१ मुलांचा समुदाय. २ पोरकटपणा.
पोसणें—पोसायास घेतलेलें ( लेकरूं ).
पोहणी—पोहावयाजोगें पाणी.
पोही } —पाणपोई.
पोहे }
पौत्र—नातु.
पौळी—१ पोंवळीं. २ चौदिवाली.
प्रकर—समुदाय.
प्रकाम—अत्यंत, फार.
प्रकृति—१ माया. २ प्रजा.
प्रकृतिपुरुष—माया आणि ईश्वर.

प्रचुर–पुष्कळ.
प्रजा–१ संतति. २ लोक.
प्रणत–नम्र, शरण.
प्रणति–नमस्कार.
प्रताप–१ सामर्थ्य. २ उष्ण.
प्रतिभा–१ स्फूर्ति, स्मृति, आठवण. २ बुद्धि.
प्रतिम–सारखा.
प्रतीची–पश्चिमदिशा.
प्रतोद–चाबूक.
प्रत्यगात्मा–कूटस्थ, जीवाचें लक्ष्य स्वरूप.
प्रत्यय–अनुभव.
प्रधानज–प्रकृतिजन्य.
प्रपंचीक–संसारसंबंधीं.
प्रपदें–पायांचीं अग्रें.
प्रबंध–रचना.
प्रभंजन–वावटळ.
प्रभूत–पुष्कळ.
प्रमदा–तरुण स्त्री.
प्रमाद–दुर्लक्ष्यामुळें झालेला दोष, बेसावधपणा.
प्रयाणीं–जातेवेळीं.
प्रवया–वृद्ध.
प्रवाल–१ पल्लव. २ पोंवळें.
प्रवृत्ति–वार्ता, बातमी.
प्रश्रय–लीनता.
प्रक्षालन–धणें.
प्रज्ञा–बुद्धि.
प्रज्ञाचक्षु–१ आंधळा. २ धृतराष्ट्र.
प्रज्ञांबक–आंधळा.
प्राकृत–१ साधारण. २ नीच.
प्राची–पूर्वदिशा.
प्रांजळ–उघड, मोकळा.
प्राज्य–पुष्कळ, विपुल.
प्राण–वायु.
प्राणवृत्ति–१ जीवन, निर्वाह. २ वायुसदृश.
प्रांत–कडा, शेवट.
प्रातर्विधि–शौचस्नानादि क्रिया.
प्रायः–बहुधा.
प्रायश्चित्त–प्रायः ( पाप ) + चित्त ( शोधन ), पापदूरीकरण.
प्राज्ञ–चतुर, शहाणा.
प्रेतगतिंगत–मेलेला, प्रेताच्या स्थितीला गेलेला.
प्रेषणें–पाठविणें.
प्रोत्तुंग–उंच, दीर्घ.
प्लवंग–वानर.

## फ.

फटकाळ–दुष्ट.
फडकणें–उडून जाणें.
फणिक–सर्प.
फणी–सर्प.
फरा–१ पिंपळवण. २ रांग, समूह.
फाणस–कंदील.
फाल्गुन–अर्जुन.
फिटणें–मुक्त होणें, सुटणें.
फिरंगणी–फिरंगी लोकांसंबंधीं.
फिराद–फिर्याद.
फुटाचें–हिरव्या आंब्याचें.
फुंफाट–फो ! फो !
फुलारा–गुंफलेलीं फुलें.
फेडिशी–घालविशी.
फोल–व्यर्थ, फुकट, वांयां.

## ब.

बंक, बंका –१ चौकी, पहारा. २ पहारेकरी.
बक–बगळा.
बजागी–भांडखोर, भिसखोर.
बडिवार–थोरवी.

बडिश–मासे धरण्याचा गळ.
बडुवा–देवदूत.
बंदी–स्तुतिपाठक, भाट.
बंधकी–दासी.
बंभर–भ्रमर.
बभ्रा–१ उपहास. २ बोभाटा.
बरवंटा–सुंदर.
बराडी–भिकारी, खा खा सुटलेला.
बर्ह–पंख, पक्ष.
बर्ही–१ मोर. २ पक्षी.
बलभद्र–बळराम.
बलहा–बलनामक दैत्याला मारणारा-(इंद्र).
बल्लव–१ गौळी. २ आचारी, स्वयंपाकी.
बसणें–मूळ, बीज.
बहुवस–पुष्कळ.
बहुवसाळ–पुष्कळ.
बळ–१ बळराम. २ शक्ति.
बळवंड–दांडगा.
बळसत्राणें–मोठ्या बळानें.
बळी–१ बळकट. २ एक राजा (प्रल्हादाचा नातू).
बागूल–बाऊ, भयंकर पदार्थ.
बागेसरी–सोनाराची शेगडी.
बाजा–गजर.
बाजी–१ डाव. २ संकट.
बाड–कनाथ, पडदा.
बाढ–दृढ.
बाणणें–ठसणें.
बाद–काढून टाकलेला.
बाधा–इजा, त्रास, दुःख.
बाधारी–१ डोंगरावरचा प्रदेश. २ बंधन.
बाप–१ बाप हो. २ मोठा.
बापया–चातक.
बापुडे–अज्ञजन.
बापोषाख–उत्तम वेष.
बारबार–वारंवार.
बारी–डोंगराळ अडचणीची वाट ; रांग.
बालिश–मूर्ख, पोरकट.
बाष्प–१ आसवें, अश्रु. २ वाफ.
बाहणें–बोलावणें.
बाहे–बाहु.
बाह्य–१ बाहु. २ बाहेरचें.
बाह्यवटें–बाहुभूषणें.
बिक–महत्त्व.
बिडाल, बिडालक–मांजर.
बिनी–१ अघाडी. २ पागोट्याचें केळें.
बिंब, बिंबफळ, बिंबीफल–पिकलेलें तोंडलें.
बिथाळ–भलतेंच.
बिरडें–बंधन.
बिरीद–कौतुक.
बिरुदाइत–बाणा बाळगणारा.
बिलोरी–काचेचें.
बिस–कमळाचा देंठ.
बिसिनी–कमलिनी.
बीज–१ द्वितीया तिथि. २ कारण. ३ बीं.
बीजें–स्थलांतर, गमन.
बींबूडी–बींमोड.
बीभत्सु–अर्जुन.
बुका–सुवासिक चूर्ण.
बुडतया–बुडणाऱ्यास.
बुडीं–१ शेवटीं, परिणामीं. २ तळीं.
बुझणें–समजणें.
बुझावणें–समजावणें.
बुध–१ पंडित, शहाणा. २ एक ग्रह; हा चंद्राचा मुलगा.

बुभुक्षु–भुकेलेला.
बेसक–स्थान.
बोनें–भोजन.
बोभात–हाक मारीत.
बोभाय–हाक मारी, बोलावी.
बोळवणें–पोचवणें, रवानगी करणें.
ब्रह्मघ्न–ब्राह्मणास मारणारा.
ब्रह्मण्य–ब्राह्मणाविषयीं दयाळू.
ब्रह्मनंदन–( ब्रह्मपुत्र ) नारद.
ब्रह्ममुहूर्त–पहांटेच्या चार घटका रात्रीचा समय.
ब्रह्मांड–सर्व जग.
ब्रह्मांडावली–ब्रह्मांडांची पंक्ति.
ब्राह्मण्य–१ ब्राह्मणांचा समुदाय. २ ब्राह्मणपणा.
ब्रीद–बाणा.

## भ.

भ–नक्षत्र.
भंग–१ तरंग, लाट. २ नाश.
भगण–नक्षत्रसमूह.
भगवान–षड्गुणैश्वर्यसंपन्न ईश्वर.
भगळा–भेगा, चिरा.
भजक–सेवक.
भट–योद्धा.
भंड–१ फजिती. २ भांडखोर.
भणग–भिकारी.
भणणें–म्हणणें.
भद्र–१ कल्याण. २ सिंहासन.
भद्रजाती–१ भीम. २ गज. ३ अश्व.
भर–अतिशय.
भरण–पोषण.
भरावरी–वरचेवर, लवकर.
भर्ग–महादेव.
भर्जित–भाजलेलें.
भर्म–सुवर्ण.
भव–१ संसार. २ महादेव. ३ उत्पत्ति.
भवंडा–गरका.
भवन–घर.
भवाब्धि–संसारसमुद्र.
भवार्कातपत्र–संसाररूपी सूर्याला छत्राप्रमाणें असणारा भवतापनाशक.
भव्य–कल्याण.
भसित–भस्म.
भा–शोभा, कांति, तेज.
भाऊ–भावू, मानू.
भाक–भाषण, वचन.
भागवत–भगवद्भक्त.
भाग्य–१ ऐश्वर्य. २ दैव.
भाज–भार्या, बायको.
भाजन–पात्र, भांडें.
भाजा–‘ भाज ’ पहा.
भाट–स्तुतिपाठक
भांड–वाचाळ.
भांडार–द्रव्याची कोठी, खजिना.
भाता–बाणांची पिशवी.
भातुकें–खाऊ.
भान–चैतन्य, शुद्धि.
भानुनंदन–सूर्याचा मुलगा, ( कर्ण ).
भानें–शेषान्न.
भांबरभुतें–वेडे.
भार–समूह.
भारती–वाणी, वाग्देवता.
भारद्वाज– कुकुडकुंभा ( पक्षी ).
भारी–पुष्कळ मोलाचा.
भाव–१ निष्ठा. २ अभिप्राय.
भावरीय–मर्मज्ञ.
भावोनी–मानून.

भाळ—१ मस्तक. २ कपाळ.
भाळणें—भुलणें.
भिडणें—झगडणें.
भिदुर—वज्र.
भिझावितां—भिजवितां.
भिक्षु—ब्रह्मचारी.
भिक्षुकी—याचकी.
भीतरीं—आंत.
भीमकी—१ रुक्मिणी. २ दमयंती.
भीरु—भितरा.
भुज (जा)—बाहु, हात.
भुजंग, भुजंगम —सर्प.
भुजंगमारी—सापांचा शत्रु गरुड.
भुजे—भोगी.
भुवन—१ गृह. २ जग.
भूतात्मा—प्राणिमात्राचा आत्मा.
भूदेव, भूनिर्जर —पृथ्वीवरील देव, ब्राह्मण.
भूप—राजा.
भूभुजेंद्र—राजाधिराज.
भूभृत्—१ पर्वत. २ राजा.
भूभृदरि—१ (भू+भृत+अरि) पर्वतांचा शत्रू, इंद्र.
भूमिधर—पर्वत.
भूषण—१ मोठेपण, थोरपण. २ दागिना.
भृंग—भ्रमर.
भे—भय.
भेक—बेडूक.
भेड—भ्याड, भितरा.
भेंडा—मातीचा गोळा.
भेणें—भयानें.
भेदरा—भय.
भेरी—नौबत.
भेषज—औषध.
भोग—विषय.
भोगावती—पाताळांतील गंगा.
भोगी—सर्प, नाग.
भोज—कौतुक.
भोजें—खाणीं पिणीं.
भोवणें—फिरणें, ग्रासणें.
भ्रू—भुवई.

## म.

मकरंद—पुष्परस.
मकरालय—समुद्र.
मंचक—पलंग.
मंजु—कोमळ (शब्दांनीं).
मंडण—भूषण.
मंडल—चक्राकार प्रदेश.
मंडूक—बेडूक.
मणिक—मडकें, डेरा.
मणिबंध—मणगट.
मतंगज—हत्ती.
मतिप्रकाश—बुद्धिस्फूर्ति.
मथन—१ नाश. २ घुसळणें.
मदगज—माजलेला हत्ती.
मदनशत्रु—महादेव.
मंदाकिनी—भागीरथी.
मंदार—कल्पवृक्ष.
मंदिल—फेटा.
मदीय—माझा.
मधु—१ वसंत. २ मध. ३ मद्य.
मधुकरी—भ्रमरी.
मधुप—१ भ्रमर. २ मद्यपी.
मधुपुढाळी—मधुधारा.
मध्य—कटिप्रदेश, कमर.
मनसूर—राजपत्र, सनद, दस्तक.

मनी—मानी.
मनु—१ मंत्र. २ चौदा (मनु).
मनुष्यदेव—राजा.
मनोज, मनोभव, मन्मथ—मदन.
मरंद—पुष्परस.
मराळ (ल)—हंसपक्षी.
मरु—मारवाड देश.
मरुत—वायु.
मलपणें—डुलत चालणें.
मल्ल—पहिलवान.
मवणें—मोजणें.
मवाळ—मऊ.
मशक, मश्यक—घुंगुरडें.
मषीपत्र—लिखितपत्र.
मस्त—१ पुष्कळ. २ मस्तक. ३ कैफ चढलेला.
मह—१आनंद, उत्साह. २ तेज.
महापगा—महानदी.
महारथी—मोठा योद्धा.
महित—पूजित, सन्मानित.
महिमा—महत्त्व.
महिला—स्त्री.
महिवर—पृथ्वीपति, राजा.
मही—पृथ्वी.
महीध्र—पर्वत.
महेंद्र—इंद्र.
महेला—जाया, स्त्री; 'महिला' पहा.
मा—१ लक्ष्मी. २ निश्चयें. ३ नको.
माकंद—आंब्याचें झाड.
माखणें—भरणें.
मागध—जरासंध.
मागुती—पुन्हा.
माघां, माघुता—मागें.
माजिवटा—उन्माद.
माजुम—भांगेच्या वड्या.
माझारीं—आंत, मध्यें.
मात—गोष्ट, बातमी.
मातलि—इंद्राचा सारथी.
मात्रा—औषध.
मात्सर्य—द्वेष, हेवा.
माथा—मस्तक, वरचा भाग.
मांदी—१ मेळा. २ पेटी.
माधव—कृष्ण.
माधुरी—गोडी.
मानवणें—१ मान डोलावणें, मान्य होणें. २ हर्ष पावणें.
मानस—१ अंतःकरण. २ मानससरोवर.
मानिनी—मानवती स्त्री.
माप—१ लक्ष्मीपति (कृष्ण). २ प्रमाण.
मायराणी—पिशाची.
माया—मावयास.
माया—१ अविद्या, अज्ञान. २ ममता, प्रीति.
मायापडळ—मायोपाधिक, मायेच्या स्वाधीन.
मार—मदन.
मारुत—वायु.
मार्गण—बाण.
मार्तंड—सूर्य.
मालपुवा—एक प्रकारचें पक्वान्न.
मालवणें—नाहींसा करणें.
मालिन्य—मळीणपणा.
मिणधी—(मिंधी) ओशाळलेली.
मित—थोडें, परिमित, मोजकें.
मिति—परिमाण.
मिथिला—जनकराजाची नगरी.
मिनला—मिळाला, मिसळला, जमला.

मिनेगारी–मिन्याच्या रंगाचे.
मिलिंद–भ्रमर.
मीन–मत्स्य.
मीनकेतन–ज्याच्या ध्वजावर माशाचें चिन्ह आहे असा, मदन.
मुकुर–आरसा, दर्पण.
मुक्त–सुटलेला.
मुक्तलग–मोत्यें लावलेला.
मुक्ता–मोती.
मुक्तार्पित–मोत्यांची.
मुक्तें–मोत्यें.
मुग्धा–नुकतीच तारुण्यांत आलेली सुंदर स्त्री.
मुजूम–मुलखाची सर्व जमाबंदी करण्याचा व सर्व खर्चाचा बदोबस्त राखण्याचा अधिकार.
मुंड–१ नीच. २ डोकें.
मुद्धारा–प्रीतिरसाची धारा.
मुद्रा–१ बंधन. २ चिन्ह. ३ बंद पडणें.
मुधा–१ खोटें. २ व्यर्थ.
मुनिवर–नारद.
मुमुक्षु–मुक्त होण्यास इच्छिणारा..
मुरारी–श्रीकृष्ण.
मूर्त–मूर्तिमंत, देहधारी.
मुऽआजमतीचा–मिजाजी, गर्विष्ठ.
मुलायम–१ चांगलें, सुंदर. २ नरम.
मूस–साचा.
मूळ–बोलावणें.
मृगडोळस–हरिणाच्या डोळ्यांप्रमाणें डोळे जिचे, मृगनयना.
मृगपति–सिंह.
मृगया–पारध.
मृगराज–(पशूंचा राजा) सिंह.
मृगांक–चंद्र.
मृड–शंकर.
मृतक–मढें, प्रेत.
मृति–मरण.
मृत्युंजय–महादेव.
मृषा–खोटें.
मेखला–कमरपट्टा.
मेघश्याम–मेघाप्रमाणें काळा.
मेदिनी–पृथ्वी.
मेसाई–एक क्षुद्र देवता.
मेळ–मेळवण, मिश्रण, आंबवण.
मेळवण–आंबवण.
मेळावे–समुदाय.
मेळीकार–वसतीस्थान.
मैंद–फांसेगार, ठक.
मोकलणें–सोडणें, उपेक्षणें.
मोटकी–चांगली.
मोतीलग–मोत्यें लावलेला. ‘मुक्तलग’ पहा.
मोदेना–हर्षेना, आनंद वाटेना.
मोवणीं–मननांत.
मोह–ममता.
मोहड–मुख.
मोहरा–एक रत्न.
मोहरी–मोहित करी.
मोहिनीरूप–विष्णूनें सुंदर स्त्रीचें घेतलेलें रूप.
मोहिरे–मोहरा, अग्रभाग.
मौल–मस्तक.
मौल्य–मोल, किंमत.
मौळ–मस्तक.
म्हणियारा–अंकित, ताबेदार.
म्हूण, म्हून –म्हणून.

### य.

यथासांग–संपूर्ण, अंगांनीं युक्त.
यदुभूषण–कृष्ण.
यमनंदन–धर्मराज.

यमु–यमस्वरूपी.
यया–ज्यास.
यवस–तृण, गवत.
यशाचळ–यशोरूप पर्वत.
यष्टि–काठी.
यज्ञसूकर–वराहावतार.
याग–१ यज्ञ. २ पूजा.
याच–माग, याचना कर.
याजी–यज्ञकर्ता.
यातायात–जन्ममरणपरिश्रम.
यातिवैराकार–जातिवैर.
यातु, यातुधान –राक्षस.
यातुप–राक्षसेंद्र, रावण.
याद–जलचर.
यान–१ पालखी. २ वाहन. ३ स्वारी.
याम–प्रहर.
यामिनी–रात्र.
यावा–येणें, आगमन.
याज्ञसेनी–द्रौपदी.
युग–जोडी, द्वय.
युवराज–राजाच्या आज्ञेनें राज्यकारभार पाहणारा त्याचा मुलगा.
युवा–तरुण.
यूथ–समुदाय, कळप.
यूप–यज्ञस्तंभ.
येर–अन्य.
येसपार–ठावठिकाण, पत्ता.
योगक्षेम–चरितार्थ.
योत–येवोत.
योध–योद्धा.
योषा–स्त्री.
यौवराज्य–युवराजपण.

र.

रंक–भिकारी.
रंकु–हरिण.
रक्तप–रक्त पिणारा, राक्षस.
रंग–१ सभा. २ रंगमहाल.
रज–१ कण. २ रजोगुण.
रंजणें–१ अनुरक्त होणें. २ रंजविणें.
रंजयंती–रमविणारी.
रजस्वला–विटाळशी.
रणचत्वर–रणांगण, युद्धाची जागा.
रणझेंडा–युद्धांतील निशाण.
रणशौंड–युद्धनिपुण.
रतिकांत, रतिपति –मदन.
रत्नाकर–समुद्र.
रथचरण–रथचक्र.
रंभा–१ केळीचें झाड. १ एक अप्सरा.
रमणी–सुंदर स्त्री.
रमा–लक्ष्मी.
रय–वेग.
रव–शब्द.
रंवदळी–नाश, कत्तल.
रवा–साखर.
रशना–कमरपट्टा.
रश्मि–१ किरण. २ रथाच्या घोड्यांच्या दोऱ्या.
रस–१ आवड, प्रीति. २ उदक. ३ अमृत. ४ आनंद.
रसद–१ मेघ. २ पैशाचा भरणा.
रसना–जीभ.
रसा–पृथ्वी.
रसानाथ–राजा.
रसाळ–१ गोड. २ स्निग्ध. ३ आंबा. ४ रसज्ञ.

रसिक—रसज्ञ.
रहंवर—मोठा रथ.
रहिवास—वस्ती.
राऊळ—देऊळ.
राका—पूर्णिमा.
राग—१ प्रीति. २ रक्तिमा.
रागेजणें—रागावणें.
राजन्य—राजे.
राजस—सुंदर.
राजीव—कमळ.
राडोळी—कत्तल.
रांडोळी—क्रीडा.
राणिवसा—अंतःपुर.
राणीव—राज्य.
राणेपण—मोठेपण.
रातला—रतला, रममाण झाला.
रात्रिंचर—राक्षस.
राधेय—कर्ण.
रामा—स्त्री.
रावणि—रावणपुत्र, इंद्रजित.
रावो—राजा.
रासभ—गाढव.
राहटणें—वर्तणें.
राहटी—वर्तणूक.
रिगतां } —शिरतां
रिघतां }
रिचविणें—ओतणें.
रितें—रिकामें.
रितुराज—( ऋतुराज ) वसंत.
रीघ—प्रवेश.
रीस—अस्वल.
रुका—पै.
रुक्म—सुवर्ण.
रुग्ण—रोगी.
रुचि—१ गोडी. २ कांति.
रुचिर—सुंदर.
रुंजणें—गुंजारव करणें, भोवतें फिरणें.
रुजू—सुरू.
रुदित—रडणें.
रुळणें—लोंबणें.
रू—कापूस.
रूख—झाड.
रेख—सुंदर मांडणी.
रेखून—लिहून.
रेंच—१ रंग. २ खोड.
रेवतीरमण—(रेवतीचा नवरा) बळराम.
रोकडी—तात्कालिक, प्रत्यक्ष.
रोजन्या—विलाप.
रोध—तीर, तट.
रोप—बाण.
रोम—केस.
रोहिणीपति—चंद्र
रोहिणीपुत्र—बळराम.
रोहिणीवर—चंद्र.
रौरव—एक नरक आहे. रुरु म्हणून एक किडा आहे, ते किडे ह्यांत फार असतात.

## ल.

लंकानाथ—रावण.
लकुच—एक प्रकारचें फळ.
लगदा—खोटें सोनें.
लघिमा—लघुत्व, हलकेपणा.
लंड—ठक.
लडिवाळ—लाडकी.
लत्ता—लाथ.
लंपट—आसक्त, नादावलेला.
ललना—सुंदर स्त्री.
ललाम—भूषण, अलंकार.

ललामायमान—भूषणीभूत.
लवण—१ नम्रता, लवणें. २ मीठ.
लवलाही } —त्वरेनें.
लवलाहे }
लसती—रूपवती.
लहरी—लाट.
लक्ष } —लक्ष्य.
लक्षा }
लाघव—चातुर्य, कौशल्य.
लाघवी—वश करणारी.
लाजा—लाह्या.
लाजाविरोन—लाजेनें विरघळून जाऊन.
लाधणें—पावणें.
लालन—लाड.
लासी—मांजरी.
लास्य—नृत्य, नाचणें.
लाहणें—लाभणें, पावणें.
लाहो—१ लाभ. २ छंद, घोष.
लिंग—शिवलिंग.
लिगाड—लचांड.
लीन—गढलेला.
लुटे—लुटारू.
लुब्धक—लोभी, कृपण.
लुलाय—महिष, रेडा.
लूता—कोळी, कांतीण.
लेख—देव.
लेखर्षि—देवर्षि.
लेखा—पाड, गणना, हिशेब.
लेणीं } —अलंकार.
लेणें }
लोकबंधु—१ सूर्य. २ लोकहितकर्ता.
लोटे—हाले.
लोल—१ लुब्ध. २ चंचल.
लोलुपता—लुब्धपणा.
लोलो—छंद.



लोष्ठ—ढेंकूळ.
लोह—लोखंड.
लोळ—१ कल्लोळ. २ लहरी, लाटा. ३ लोळणें.
ल्हाणें—लाभणें.

## व.

वक्र—तोंड.
वक्रदंत—शिशुपाळाचा भाऊ.
वंग—कथील.
वच—वाक्य.
वचणें—जाणें.
वंचीजे—१ ठकविणें. २ टाकिजे.
वंचील—नाकारील.
वज्र—हिरा.
वडवानळ—'वाडव' पहा.
वडील—१ जुनाट. २ थोर.
वडीलपण—वृद्धत्व.
वण—घट्टा.
वणिक—वाणी.
वतंस—भूषण.
वत्स—१ बालक. २ वासरू.
वत्सर—वर्ष.
वत्सल—दयाळू.
वदान्य—दाता.
वंदारुता—स्तुती करण्याचें शील.
वधू—१ बायको. २ सून.
वन—१ अरण्य. २ उदक.
वनद—मेघ.
वनमाळी—कृष्ण.
वनाळी—वनपंक्ति.
वनिका—वन.
वनिता—स्त्री.
वपु—शरीर.
वमणें—टाकणें, ओकणें.

वर–१ श्रेष्ठ. २ पति. ३ इच्छिलेली गोष्ट (देवादिकांपासून मागितलेली).
वरदानी–वर देणारा.
वरपंगें–वर वर करण्यानें.
वरपडी–झडप.
वरव–समृद्धि, बाहुल्य.
वरवर्णिनी–१ उत्तम स्त्री. २ हळद.
वराह–डुकर.
वरिचिल–वरची.
वरुणालय–समुद्र.
वर्ण–१ जात. २ रंग. ३ अक्षर.
वर्णसंकर–जातींची मिसळ.
वर्ति, वर्तिका }–दिव्याची वात.
वर्धिष्णु–वाढणारा.
वर्म–गुह्य.
वल्क, वल्कल }–झाडाची साल.
वल्गना–बडबड.
वल्गा–लगाम.
वल्मीक–वारूळ.
वल्लभ–प्रिय.
वश–स्वाधीन.
वंशी–मुरली, पांवा.
वंशोत्तंस–कुलभूषण.
वश्य–सहाय.
वसुंधरा–पृथ्वी.
वसुधा, वसुमती }–पृथ्वी.
वहिला, वहिलें }–सत्वर, तात्काळ.
वळघणें–चढणें.
वळसा–१ फेरा, घेरा, गोता. २ पुकारा.
वक्ष–ऊर.
वागुरा–फास.
वाग्ध्वजीं–प्रसिद्धीस.
वाग्विलास–वाक्चातुर्य.
वाङ्नियम–प्रतिज्ञावचन.
वाच्यत्व–निंदा.
वाज–बोभाट.
वाजट–वाचाळ.
वाजी–अश्व, घोडा.
वाटिका–बाग.
वाटुली–वाट, मार्ग.
वाड–मोठें, थोर.
वाडव–वडवानळ नांवाचा समुद्रांतील अग्नि.
वाडेंकोडें, वाडेंपाडें }–कौतुकानें, आवडीनें.
वाढ–पुष्कळ.
वाढप–वाढावयाचें अन्न.
वाणिज्य–व्यापार, देवघेव.
वाणी–१ वाचा. २ उणीव, वाण.
वाणें–वर्णन करणें.
वात्सल्य–दया.
वाथया(थ्या)–पोट, गर्भाशय.
वादक–वाजविणारा.
वानणें–स्तवणें, वर्णणें.
वापिका–विहीर, तळें, सरोवर.
वाम–१ सुंदर. २ डावा.
वामदेव–शिव.
वामलोचनी–सुंदरनेत्री.
वाय, वायांविण }–व्यर्थ.
वारण–हत्ती.
वारिज, वारिजात }–कमल.
वारी–१ यात्रा. २ उदक.
वार्ता–गोष्ट, वाक्य, वर्तमान.

वार्तिक–बातमीदार.
वाराशि–समुद्र.
वालभणें–प्रिय होणें.
वाली–कैवारी, रक्षक.
वाव–व्यर्थ, पोकळ.
वास–१ वस्त्र. २ गंध, सुवास. ३ वस्ती, राहणें.
वासर–दिवस.
वासरमणि–सूर्य.
वासव–इंद्र.
वासवि–इंद्रपुत्र, अर्जुन.
वाह–घोडा.
वाहणी–मार्ग.
वाळणें–करणें.
विकत्थन–बडबड.
विकराल–भयंकर.
विकळ–विव्हल.
विकोश–नागवें ( शस्त्र ).
विखरणें–पसरणें.
विंगळ–विस्तव, निखारा.
विग्रह–१ देह. २ युद्ध. ३ कलह.
विचक्षण–पंडित.
विचारणें–१ विचार करणें. २ पुसणें.
विंजण–पंखा.
विजन–निर्जनप्रदेश.
विजय–अर्जुन.
विजें–वारा घालतो.
विज्वर–दुःखरहित.
विटंब–विटंबना.
विटपी–वृक्ष.
विटली–१ रुसली. २ कंटाळली.
वितत–विस्तुत.
वितरण–दान.
वित्त–द्रव्य.
विंदाण–चातुर्य, विलास, कपट.
विदेह–१ जनकराजा. २ विरक्त.
विद्रुम–पोंवळें.
विधान–करण्याचा प्रकार.
विधि–१ आज्ञावाक्य. २ ब्रह्मदेव. ३ दैव.
विधु–चंद्र.
विधुमणि–चंद्रकांतमणि.
विध्वस्त–भग्न, नष्ट, मोडलेला.
विन–वांचून, शिवाय.
विनटली–१ शोभली. २ तल्लीन (तत्पर) झाली.
विनत–नम्र.
विनतानंदन–गरुड.
विनायक–१ गरुड. २ गणपति.
विनासा–नकटी.
विपति–गरुड.
विपर्यय–व्यत्यास, वैपरीत्य.
विपक्ष–शत्रु.
विपिन–अरण्य.
विप्रकर्ता–वाईट करणारा.
विप्रयासीं–मोठ्या आयासानें, कष्टानें.
विप्रिय–न आवडणारें.
विभव–ऐश्वर्य.
विभाडणें–बिघडविणें.
विभांडी–मारी, पराभव करी.
विभूति–१ ऐश्वर्य. २ मूर्ति.
विभ्रम–भ्रांति, विलास.
विमल–स्वच्छ, निर्दोष.
विरमणें–थांबणें, शांत होणें.
विरस–भग्नोत्साह.
विरहद–विरहदुःख देणारा.
विरहितु–निराळा.
विरिंचि–ब्रह्मदेव.
विरिंचितनया–ब्रह्मदेवाची कन्या ( सरस्वती ).

विरोचनसुत—( प्रल्हादाचा मुलगा ) विरोचन-दैत्य ह्याचा मुलगा ( बळी ).
विरोध—द्वेष.
विरोधी—शत्रु, द्वेषी.
विलसणें—१ शोभणें. २ राहणें. ३ नाचणें.
विवर—भोंक.
विवरण—स्पष्टीकरण.
विवर्त—अन्यथाभास.
विवश—पराधीन.
विवशी—जखीण.
विवळणें—विस्तारणें.
विवळेना—कळेना.
विविक्तदेश—एकांतस्थान.
विवेक—विचार.
विशद—स्पष्ट.
विशारद—ज्ञाता, शहाणा.
विशिख—बाण.
विश्रब्ध—विश्वासलेला.
विश्राम—विश्रांति, सुख.
विश्लेष—वियोग.
विश्वंभर—१ जगाचें पोषण करणारा. २ मुक्तेश्वराच्या आराध्यदेवतेचें नांव.
विषकंठ—महादेव.
विषम—प्रतिकूळ, मारक, कठीण.
विषमता—वैषम्य, दुजाभाव.
विषमें—विषमाचरणानें.
विषय—इंद्रियग्राह्य पदार्थ.
विषयक—विषयींचें.
विषव्रतति—विषवल्ली.
विषाद—खेद.
विष्णुपदी—भागीरथी.
विसंबणें—दूर ठेवणें.
विहंग, विहंगम—पक्षी.
विहगराज—गरुड.
विहार—क्रीडा.
विहित—सांगितलेलें, योग्य.
विहिरा—झरा.
वीट—कंटाळा.
वीतरागी—विरक्त.
वीरगुंठी—बुचडा.
वीरसू—वीरमाता.
वृक—लांडगा.
वृत—वरलेला.
वृत्त—वर्तमान, बातमी.
वृत्ति—१ उपजीवन. २ वतन.
वृत्रघ्न, वृत्रहा—वृत्रासुरास मारणारा, इंद्र.
वृंद—समुदाय.
वृंदारक—देव.
वृंदावन—कवंडळ फळ.
वृष—१ कर्ण. २ बैल.
वृषभ—बैल.
वृष्णि—यादव.
वेगळ—भिन्न.
वेंघणें—चढणें.
वेंच— खर्च.
वेडीव—वेडेपणा.
वेणु—पावा, मुरली.
वेतनभोक्ते—पगार खाऊन राहिलेले, पगार देऊन ठेवलेले.
वेताटी—वेताची छडी.
वेदश्रुति—वेद.
वेध—१ छंद. २ लय.
वेल्हाळ—प्रिय.
वेव्हारे—उदीम करणारे सावकार.
वैकुंठ—१ कृष्ण. २ विष्णुलोक.
वैखरी—वाणी.

वैजयंत–इंद्राच्या राजवाड्याचें नांव.
वैजयंती–१ ध्वज, पताका. २ विष्णूच्या गळ्यांतील माळ.
वैदर्भराज–विदर्भ देशाचा राजा भीम (दमयंतीचा बाप).
वैद्युत–विजेचा.
वैरणीयाचा–पांघरायाचा.
वैरागर–१ रत्नांची खाण. २ दुकान.
वैवस्वत–सूर्यपुत्र (यम).
वैश्वानर–अग्नि.
वैषम्य–वैपरीत्य.
वो–अहो.
वोखटें–वाईट.
वोज–कौतुक, चांगलें.
वोजें–प्राप्त होई.
वोटी–स्थान, जागा.
वोढक–ओढणारा.
वोढवणें–पुढें करणें.
वोढवारा–प्रतिबंध.
वोढसी–धावसी.
वोता–अधिक.
वोतारी–ओतकाम करणारा.
वोपणें–देणें.
वोस–तोटा.
वोंसडणें–१ भरून खालीं सांडणें. २ टाकून जाणें.
वोळगणें–१ तत्प्रवण होणें, ओढवणें. २ सेवा करणें.
वोळणें–१ देणें. २ वळणें, प्रीति करणें.
वोळसा–१ वळसा, फेरा. २ वर्तुळसा. ३ पुकारा.
व्यंकट–१ भयंकर. २ वांकडा.
व्यजन–पंखा.
व्यतिरेक–वियोग.
व्यवसाय–१ व्यापार. २ उद्योग. ३ निश्चय.
व्यवहार–१ प्रपंच. २ वागणूक.
व्यसन–१ संकट. २ छंद, नाद.
व्यसु–गतप्राण, मृत.
व्यस्त–अस्ताव्यस्त.
व्यापक–सर्वगत, सर्वत्र स्थित.
व्यापें–व्यापकत्वें.
व्याप्त–अल्पदेशस्थित.
व्याल, व्याळ–सर्प.
व्यूह–युद्धासाठीं केलेली सैन्याची रचना.
व्योम–आकाश.
व्योमघटीं–गगनोदरीं.
व्रज–१ समुदाय. २ गोकुळ. ३ गौळीवाडा.
व्रात–समूह.
व्रीडावलोकन–सलज्ज पाहणें.

## श.

शकुंत–पक्षी.
शकुनी–१ पक्षी. २ दुर्योधनाचा मामा.
शक्ति–देवी.
शक्तिचक्र–मायोपाधि.
शक्तिसुत–कार्तिकस्वामी.
शक्र–इंद्र.
शख–कपोलप्रांत, आंख.
शंखद्वय–दोन आंख.
शची–इंद्राणी.
शतकोटि–इंद्राचें वज्र.
शतपत्र–कमल.
शंपा–वीज.
शबरी–भिल्लीण.
शबल–मिश्रित.
शम–१ शांतता. २ सल्ला.
शमन–१ दूर करणारा. २ यम.

शमी–योगी.
शय–हात.
शरण्य–रक्षण करण्यास समर्थ.
शरतांडव–बाण सोडण्याचें चातुर्य.
शरधि–भाता.
शरभ–एक जातीचा अति बलाढ्य पशु.
शराव–परळ.
शरासन–धनुष्य.
शर्म–सुख.
शर्व–महादेव.
शलभ–टोळ, पतंग.
शल्य–१ बाणाग्र. २ मनांत सलतें तें.
शव–प्रेत.
शश, शशक –ससा.
शशांक–चंद्र.
शशिकांत–चंद्रकांतमणि.
शशिमौळी–महादेव.
शस्त्री–शस्त्र, सुरी.
शाक–भाजी.
शाठ्य–वंचकपणा.
शाण–सहाण.
शांतनव–शंतनुराजाचा पुत्र (भीष्म).
शारद–शरदृतूंतला
शारदा–सरस्वती.
शार्दूल–वाघ.
शाल–वृक्षविशेष.
शालीवन–भाताचें शेत.
शावक–बालक.
शाश्वत–चिरस्थायी.
शासन–१ आज्ञा. २ शिक्षा.
शिऊ–शिव.
सिकावण–बोध.
शिखा–ज्वाला.
शिखी–१ मयूर. २ अग्नि.
शितिकंठ–१ शिव. २ मयूर.
शिबिका–पालखी.
शिबिर–सेनेचा तळ.
शिराणी–१ आवड, कौतुक. २ लाभ.
शिरोमणि–श्रेष्ठ.
शिल्पीकार–कारागीर.
शिव–१ कल्याण. २ सांब, महादेव.
शिंव–सीमा, हद्द.
शिवत्व–ईश्वरत्व.
शिवा–१ गौरी, पार्वती २ कोल्ही.
शिशु–मूल, बाळ.
शिष्ट–१ संभावित. २ मध्यस्थ.
शिळाचुंबी–लोहचुंबक.
शीण–श्रम.
शीतभानु–चंद्र.
शीर्णपर्ण–ज्याचीं पानें गळलीं आहेत असा.
शील–१ स्वभाव. २ सद्वर्तन.
शीला–द्रौपदीस सूर्यानें जी अन्नाची स्थाली दिली होती ती.
शुक–१ रावा. २ व्यासमुनींच्या पुत्राचें नांव.
शुकतात, शुकपिता –व्यास.
शुक्ति–शिंप.
शुचि–१ आषाढ. २ शृंगार. ३ शुद्ध, पवित्र. ४ पांढरें.
शुनक–कुत्रा.
शुनासीर–इंद्र.
शुभांगी–सुंदरी.
शून्यवादी–नास्तिक.
शूर्प–सूप.
शूर्पनखा–रावणाची बहीण.
शूलपाणी–महादेव.
शृंगार–१ भूषणें, अलंकार. २ शृंगाररस.

शेख–शेष.
शेखी–१ कीर्ति. २ बढाई.
शेखीं–शेवटीं.
शेजे–शयनीं.
शेली–मान, गळा.
शैल–पर्वत.
शोण (णें)–लाल.
शोणित–रक्त.
शोभन–चांगलें.
शौण्ड–चतुर, शहाणा.
शौरी–कृष्ण.
श्याम, श्यामल –निळा.
श्रवण–१ कान. २ ऐकणें.
श्रांत–थकलेला.
श्रित–आश्रित.
श्रीद–कुबेर.
श्रीविद्या–ब्रह्मविद्या, मंत्रविद्या.
श्रुत–वेदशास्त्र.
श्रुति–वद.
श्रुतिपारग–सर्व वेद म्हटलेला.
श्रेणि–पंक्ति.
श्रोत्रिय–१ वैदिक. २ अग्निहोत्री.
श्लाघणें–चाहणें, आवडणें.
श्लोक–कीर्ति.
श्वपच–चांडाळ.
श्वशुर–सासरा.
श्वश्रू–सासू.
श्वित्र–कुष्ठ, कोड.
श्वेतवाह, श्वेताश्व –अर्जुन.

## ष.

षट्पद–भ्रमर, भुगा.
षण्मुख–कार्तिकस्वामी.
षष्टि–साठ.

## स.

संकल्पणें–सोडणें.
सकृत्–एकवार.
संकेत–खूण.
संकेतकुंज–क्रीडास्थान.
सक्ति–आसक्ति.
संख्यावान्–पंडित, विद्वान्.
सगुणाथिली–गुणवती.
संघाट–समूह.
संचित–दैव, पूर्वकर्म.
सजणे–हे प्रिये, हे सखि.
संजीवनी–मेलेल्यास जिवंत करण्याची विद्या.
सठवणें–पतन पावणें.
सती–१ पार्वती. २ पतिव्रता.
सत्कृति–१ उत्तम काव्य. २ सत्कृत्य.
सत्यप–ब्रह्मदेव.
सत्यपांड–ब्रह्मांड.
सत्यलोक–ब्रह्मलोक.
सत्यवती–ब्रह्मदेवाची नगरी.
सत्यवतीहृदयरत्न–व्यास.
सत्यवान्–एक राजा, सावित्रीचा नवरा.
सत्यसंध–सत्यप्रतिज्ञ.
सत्या–सत्यभामा.
सत्यापति–श्रीकृष्ण.
सत्राण–बळानें, वेगानें.
सद्–सभा.
सदन–गृह.
सदर–सभा.
सदसि ( सी )–उत्तम खड्ग.
सदीड्य–साधूंनीं पूज्य.
सदेवा–नेहमीं.
सदैव–१ दैववान्. २ नेहमीं
सद्गद–भरून आलेला ( गळा ).
सद्म–घर.

सद्य—तत्काल.
सधर—सह्याश्रय.
संधा—प्रतिज्ञा.
संध्या—संध्याकाळ.
सनातन—ज्याला आदि व अंत नाहीं असा.
सनोळख—ओळखीचें, परिचित.
सन्नद्ध—तयार, सिद्ध.
सन्निध—जवळ.
सन्निधान—१ उत्तम ठेवा. २ जवळ असणें.
सन्निपात—त्रिदोषी ज्वर.
सपत्न—शत्रु.
सपोष—पुष्ट.
सबाही—अंतर्बाह्य.
सबोखणें—सांत्वणें, शांतवन करणें.
सभाचारी—सभेंत जाणारा.
संभार—सामग्री, समुदाय.
सभ्य—सभेंतील लोक.
संभ्रम—१ आदर. २ गडबड. ३ हौस. ४ समारंभ.
समता—बरोबरी.
समन्वित—युक्त.
समयज्ञ—प्रसंग जाणणारा.
समर—युद्ध.
समरस—परिपूर्ण.
समाये—मावे, सांठवे, राहे.
समित्—समिध.
समिद्ध—पेटलेला.
समीर } —वायु.
समीरण }
समृद्धि—ऐश्वर्य.
सये—१ सखे. २ स्मरणास.
सरकाळें—कडब्याचें ताट.
सरघा—मधमाशी.
सरता—१ कृतकृत्य. २ शेवटास गेला तो.
सरस—उत्साहयुक्त, प्रीतियुक्त.
सरसावणें—१ पुढें सरणें. २ प्राप्त होणें.
सरसिज—कमळ.
सरसिजोद्भव—ब्रह्मदेव.
सरसिजोद्भवकुमारी—ब्रह्मदेवाची कन्या सरस्वती.
सरसीरुह—कमळ.
सरस्वती—एक नदी.
सराय—विश्रांतिस्थान.
सरिता—नदी.
सरिसा—१ सदृश, तुल्य. २ नीट, दुरुस्त.
सरी—उपमा, बरोबरी, साम्य, सर.
सरोरुह—कमळ.
सर्वदेखणा—विश्वद्रष्टा.
सर्वविद्याविदु—सर्व विद्या जाणणारा.
सर्षप—मोहरी.
सलगी—मैत्री.
सलिल—पाणी, जल.
सलील—सहज.
सवडीं—आश्रयास.
सवतें—वेगळें, निराळें.
सवंसाटी—बरोबरी.
सविता—सूर्य.
सवे—१ बरोबरी. २ संवय.
सवें—बरोबर, सहवर्तमान.
सवेंचि—तात्काळ, लागलाच, तेव्हांच.
सव्यसाची—अर्जुन.
संशप्तक—युद्धांतून परत न येण्याची शपथ वाहून युद्धास जाणारे वीर; मरूं अगर मारूं म्हणून युद्धास जाणारे वीर.
संसरण—जन्ममरण प्रवाह, स्वरूपापासून च्युति.
संसर्ग—संबंध.
संसार—व्यवहार, जन्ममरणप्रवाह.

संसृति—संसार.
सस्मेर—सहास्य.
सळ—बंद.
सळें—ईर्ष्येनें.
सहस्रकर—सूर्य.
सहस्राक्ष—इंद्र.
सहोदर—सख्खा भाऊ.
सा—१ सहा. २ सारखा.
साई—झाडी.
साउजी—सात्त्विक, गरीब.
सांकडे—दु:ख पावे.
सांकडें—संकट.
साकेत—अयोध्यापुर.
साक्षर—पंडित, विद्वान्.
साक्षरता—विद्वत्ता.
साक्षेपें, साक्षोपें—अगत्यानें.
साग—सापराध.
सांग—१ मूर्तिमान्, अंगांसहित. २ संपूर्ण.
सांगडा—भोपळ्याचें पेटें.
सांगडें—अडचण.
सांगाती—१ सोबती. २ बरोबर, संगें.
सांगोपांग—सर्वांशीं.
साच, साचा—खरा.
साचार—सत्य, खरोखर.
साचोकार—१ खरा. २ खरेपणा.
साजिरा—सुंदर.
साटी—१ संगत. २ सांड.
साठ— १ सवदा. २ सांठा.
सांठणें—संपादणें, गांठीं बांधणें.
सांड—त्याग, उपेक्षा.
सांडणें—१ टाकणें. २ हरवणें.
सांडावला—मुकला.
सांत—बाजार.
सात्त्विकभाव—'अष्टभाव' शब्द पहा.
साद—हाक, आरोळी.
सांदीपनि—कृष्ण व सुदामा ह्यांचा गुरु.
सांद्र—दाट, निबिड भरलेलें.
साधी—दु:खी.
साधु—१ शाबास. २ सज्जन.
साध्वस—भय.
साध्वी—पतिव्रता.
सान, साना—लहान.
सानुले—केवळ लहान.
सानेवानें—थोडेंबहुत.
सापत्न—१ शत्रु. २ सावत्र.
सावरें—कुब्ज.
साम—सल्ला, समेट, संधि.
सामानुक्रम—सल्ला करण्याचा प्रकार.
सायक—बाण.
सायकासन—धनुष्य.
सायास—परिश्रम.
सायुज्य, सायोज्य—मुक्तीचा एक प्रकार, ब्रह्मरूप होणें.
सारजा—सरस्वती.
सारंगपाणी—शार्ङ्ग नांवाचें धनुष्य ज्याचे हातांत आहे असा (विष्णु).
सारमेय—कुत्रा.
सारस—१ कमल. २ पक्षिविशेष.
सारसाक्षी—कमलाक्षी.
सारिका—साळुंकी, मैना.
सारीपाट—सोंगट्यांचा खेळ.
सारोनी—उरकून, करून, आटोपून.
सार्थ—समूह, तांडा.
सार्वभौम—चक्रवर्ती राजा.
साल—१ कातडें, त्वचा. २ मेहुणा.

सांवडणें–गोळा करणें.
सांवर्तिक–प्रळयकाळचा.
सांसीनणें–बहरणें.
सासु–सप्राण, जिवंत.
सिकताहरळ–वाळूचा कण.
सित–पांढरें.
सिता–शर्करा.
सिताश्व–अर्जुन.
सिंधु–१ समुद्र. २ नदी.
सिंधुर–गज.
सीर–शिरणें.
सुकंठ–सुग्रीव.
सुकृत–पुण्य.
सुकृती–पुण्यवान.
सुगळ–सुग्रीव.
सुघड–चतुर.
सुचिर–फार वेळ.
सुजाण–ज्ञाता, सुज्ञ.
सुज्ञें–पावे.
सुढाळ–१ बांधेसूद, सुरेख. २ तेजस्वी, स्वच्छ.
सुणें–१ शून्य, ओकें. २ कुत्रें.
सुतनु–रूपवती.
सुतर–तरायास सुलभ.
सुतरी–उत्तम नौका.
सुतर्केना–तर्कितां येईना.
सुदती–जिचे दांत चांगले आहेत ती, सुंदर स्त्री.
सुदधिसार–तूप.
सुदर्शन–विष्णूचें चक्र.
सुधा–अमृत.
सुधाकर, सुधांशु –चंद्र.
सुधी–बुद्धिवान्.
सुनासीर–इंद्र.
सुपर्ण–गरुड.
सुपर्णव्यूह–सैन्याची गरुडाकार रचना.
सुभग–१ भाग्यवान्. २ सुंदर.
सुभट–शूर.
सुभटा, सुभवटा–उत्तम पुरुष.
सुभ्रू–जिच्या भिंवया चांगल्या आहेत ती, सुंदर स्त्री.
सुम–पुष्प.
सुमन–१ पुष्प. २ देव. ३ चांगल्या मनाचा.
सुमनश्चाप–मदन.
सुयोधन–दुर्योधन.
सुरंग–गोड.
सुरगज–देवांचा हत्ती, ऐरावत.
सुरगायक–गंधर्व.
सुरगुरु–बृहस्पति.
सुरद्रु–कल्पवृक्ष.
सुरनग–कल्पवृक्ष.
सुरनीस–राजपत्रावर शिक्का ठोकणार कारकून.
सुरभी–कामधेनु.
सुरभूरुह–कल्पतरु, पारिजात.
सुरयानी–देवयानी.
सुरयुवती–देवांगना.
सुरलोक–स्वर्ग.
सुरवाड–सुखाचा.
सुरसदन–स्वर्गलोक.
सुरसद्म–स्वर्ग, देवांचें घर.
सुरसा–देवासारखा.
सुरसिंधु–भागीरथी.
सुरा–मद्य.
सुरेंद्र–देवश्रेष्ठ, मुख्य.
सुलोचन–चांगल्या डोळ्यांचा.
सुवर्णरेखा–सोन्याची रेघ.

सुषमा–उत्तम शोभा.
सुहृदभाव–मित्रत्व.
सुक्ष्मीं–सूक्ष्म स्थानीं.
सूत–सारथी.
सूत्ये–ओढवे.
सूदिलें–घातलें.
सूनी–शून्य.
सूनु–पुत्र.
सूपरम, सूपराम –मरण.
सूये–प्रवृत्त होई.
सूर्यदुहिता–यमुनानदी.
सूक्षम–सूक्ष्म.
सेज–बिछाना.
सेना–समुदाय.
सेनानी–१ सेनापति. २ कार्तिकस्वामी.
सैंधव–१ जयद्रथ. २ घोडा. ३ मीठ.
सैरा, सैराट, सैरावैरा -स्वच्छंदानें, मनास येईल तसें.
सैरिभ–१ रेडा. २ महिषासुर.
सोइरा–आप्त.
सोइरेपण–स्नेहसंबंध.
सोगयाचे–शेवटाचे, पदराचे.
सोपा–१ सुलभ. २ घराचा भाग.
सोपाण–पायरी.
सोपारें–फार सोपें.
सोपावें–द्यावें.
सोयरीक–संबंध.
सोर–रोदन, आक्रांत.
सोल–जाड दोरी, सांखळी.
सोसे–हौसेनें.
सोळाके–वजनदार व डौलदार.
सौजन्य–सुजनपणा.
सौदागर–व्यापारी.
सौदामिनी–विद्युल्लता, वीज.
सौध–राजमंदिर, राजवाडा.
सौबळ–शकुनि.
सौभद्र–सुभद्रेचा पुत्र, अभिमन्यु.
सौरस–प्रीति, स्नेह.
स्कंध–खांदा.
स्तबक–पुष्पगुच्छ.
स्तोम–समूह.
स्त्रीधर्मिणी–रजस्वला.
स्थविर–म्हातारा.
स्थिर–निश्चल, स्थावर.
स्थूळ–मोठा.
स्नेह–१ मैत्री. २ तेल.
स्पर्शमणि–परिस.
स्फीति–१ कीर्ति. २ डौल.
स्फूर्ति–१ ज्ञान. २ कंप, स्फुरण.
स्मर–मदन.
स्यंदन–रथ.
स्रक्–माळ.
स्रजिली–निर्मिली.
स्रष्टा–ब्रह्मदेव.
स्वक–आप्त, नातलग.
स्वयमेव–आपणच.
स्वयंज्योति–स्वप्रकाश.
स्वयंवेद्य–स्वानुभवानें जाणण्यास योग्य.
स्वरत–आत्मरत.
स्वरूप–आत्मरूप.
स्वसा–बहीण.
स्वांत–अंतःकरण.
स्वादु–गोड.
स्वानुभव–आत्मानुभव.
स्वानुभवी–स्वानुभव ज्यास झाला आहे तो.
स्विन्नवदना–घाम आलेल्या मुखाची.
स्वैर–‘ सैरा ’ पहा.

## ह.

हक्क–खाऊन पचलें तें.
हत–१ मृत. २ नष्ट.
हतियेरा–( हत्यारा ) शस्त्रास.
हनु–हनवटी.
हय–अश्व, घोडा.
हरळ–तृण, बारीक खडा.
हरि–१ इंद्र, २ सिंह. ३ अश्व. ४ विष्णु. ५ वानर.
हरिख–हर्ष.
हरिखग–गरुड.
हरित–हिरवें.
हरिता–हरण करणारा.
हरिद्रा–हळद.
हरिहरि–खेद, आश्चर्य, इत्यादि दाखविणारा उद्गार.
हरुष–हर्ष.
हलधर–बलराम.
हलहलास्वन–हाहाकार.
हवि–होमद्रव्य.
हव्यवाट–अग्नि.
हव्यास–हौस, छंद.
हंत–खेदसूचक अव्यय.
हंस–१ सूर्य. २ राजहंसपक्षी.
हस्त–१ शुंडाग्र. २ हात.
हस्तिप–महात.
हस्ती–हत्ती.
हळुवार–फार हळू.
हा–खेदसूचक अव्यय.
हाकारून–हाका मारून.
हाट–बाजार.
हाटक–सोनें.
हाटीं–बाजारांत.
हाणी–( हानि ) तोटा.
हातजौळ–ओंजळ.
हामी–जामीन.
हायन–वर्ष.
हारपिणें–घालविणें.
हारीं आणणें–वश करणें.
हाला–मद्य.
हालाहल–विष.
हाव–१ उत्साह. २ इच्छा. ३ आग्रह.
हाळाहळ–विष.
हिंपुटी–कष्टी, दुःखी.
हिम–थंडी.
हिमसा–थंड, शांत.
हिमांशु–चंद्र.
हिरण्यगर्भ–ब्रह्मा.
हिरोन–हिसकावून.
हीर–१ हिरा. २ श्रेष्ठ.
हुजत–पावती, रसीद.
हुडा–बुरूज.
हुतवह, हुताश –अग्नि.
हुमणी–बुक्की.
हूप–औत्सुक्य, धैर्य, हुरूप.
हृत्–हृदय.
हृदयंगमा–मनांत भरणारी, सुंदर.
हृद्गत–हेतु, उद्देश.
हृद्य–मनास रुचणारें.
हृष्ट–हर्षयुक्त.
हेजीब–दूत.
हेती–खड्ग.
हेरणें–पाहणें.
हेला, हेळा –१ लीला. २ रेडा.
हेलावे–लाटा.
हेवा–१ मत्सर. २ इच्छा.

हेळावणें—उचंबळणें.
हैयंगवीन—साजूक तूप.
होकारितां—बोलावितां.
होता—यज्ञकर्ता.
होमीन—जाळीन.
होया—व्हावयास.
होळी—भस्मरूप.
ह्रद—डोह.

## क्ष.

क्षतज—रक्त.
क्षति—नाश.
क्षत्ता—दासीपुत्र विदुर.
क्षत्र—क्षत्रिय.
क्षपा—रात्र.
क्षम—शक्तिमान्, समर्थ.
क्षमा—पृथ्वी.
क्षर—१ पंचमहाभूतें. २ नाशवंत.
क्षामा—कृश.
क्षिति—पृथ्वी.
क्षिप्र—लवकर.
क्षीण—दरिद्री.
क्षीरधी—क्षीरसागर.
क्षीरोदक—पांढरें पातळ.
क्षुत्क्षाम—क्षुधेनें.
क्षुद्र—तुच्छ, अल्प.
क्षुधित—भुकेलेला.
क्षुर—वस्तरा.
क्षेम—१ आलिंगन. २ कल्याण.
क्षोभ—क्रोध.
क्षोभलें—विषयासक्त झालें.
क्षोभवणें—क्रुद्ध करणें.
क्ष्मा—पृथ्वी.

## ज्ञ.

ज्ञप्तिकळा—ज्ञानशक्ति.
ज्ञप्तिचिन्मात्र—ज्ञानस्वरूप.
ज्ञाति—जात.
ज्ञान—जाणणें.
ज्ञानदीप्ति—ज्ञानज्योति.
ज्ञेय—जाणावयाचें तें.



---